आलोचना प्रस्थान मुंबई द्वारा अहमदनगर कॉलेज संचलित
ज्ञानोदय लेखनसारसूची प्रकल्प

सल्लागार मंडळ
प्राचार्य डॉ. पी. एस्. जेकब
डॉ. टी. बार्नाबस
डॉ. मनोरमा बार्नाबस
वसंत दावतर
डॉ. गंगाधर मोरजे (संचालक)

प्रस्तुत प्रकल्पाला भा. पां. हिवाळे एज्युकेशन संस्थेचे अहमदनगर कॉलेज व महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, यांनी आर्थिक साहाय्य दिलेले आहे. आलोचना प्रस्थान व प्रा. वसंत दावतर, यांचे मौलिक मार्गदर्शन प्रकल्पाला लाभले आहे.

निवेदन

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने हाती घेतलेल्या वाङ्मयीन कार्यक्रमात दुर्मिळ साहित्याचे संकलन, संपादन करून घेऊन ते प्रकाशित करण्याच्या कार्यक्रमाचाही समावेश करण्यात आला आहे. महात्मा फुल्यांच्या समग्र वाङ्मयाचे संपादन करण्याचे तसेच "दीनमित्र" साप्ताहिकातील सत्यशोधक समाजासंबंधीचे लेख संकलित, संपादित करून घेऊन त्यांचे प्रकाशन मंडळाच्या वतीने करण्याचा प्रस्तावही मंडळाच्या विचाराधीन आहे.

मंडळाने हाती घेतलेल्या या कार्यक्रमाचाच एक भाग म्हणजे ख्रिस्ती मिशनऱ्यांनी अहमदनगर येथून "ज्ञानोदय" मासिक १०० वर्षांवर चालविले, त्याची सारसूची करून ती प्रसिद्ध करण्याची योजना आलोचना प्रस्थान, मुंबई या संस्थेच्या सहकार्याने मंडळाने कार्यान्वित केली आहे. एकूण ६ खंडात व १२ भागात प्रसिद्ध व्हावयाच्या या सारसूचीचे संपादन अहमदनगर येथे डॉ. गंगाधर मोरजे यांच्या देखरेखीखाली चालू आहे.

या सूचीचा खंड १ (भाग १ व २) मंडळामार्फत या पूर्वीच प्रकाशित करण्यात आला असून खंड २, भाग २ चे मुद्रणाचे काम शासकीय मुद्रणालय, वाई येथे चालू आहे. डॉ. मोरजे व प्रा. वसंत दावतर यांनी सूचीच्या खंड २ भाग १ चे काम पूर्ण करून दिल्याबद्दल त्यांचे आभार. अभ्यासक सूचीच्या या भागाचेही स्वागत करतील याबद्दल शंका नाही.

यशवंत मनोहर,

अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई-४०० ०३२.

१५ ऑगस्ट, १९८९.

अहमदनगर कॉलिज सुरू केले, तेव्हा ग्रामीण परिसरातील लोकांना उच्च शिक्षणाचा लाभ मिळावा, असा संस्थापकांच्या मनांत एक प्रमुख हेतू होताच, पण त्याचबरोबर आपल्या समोवतालच्या परिसराची, संस्कृतीची जाण नव्याने होऊ घातलेल्या जीवनसंदर्भात व्हावी, यासाठी नगर कॉलिज सदैव जागृत राहिले आहे. ग्रामीण विकासकेंद्र, जीवरसायनशास्त्र, आदी क्षेत्रांत नगर कॉलिजने केलेले संशोधन व कार्य सर्वश्रुत आहे. नव्याने येणाऱ्या विचारांत, प्रत्येक देशाच्या परिसराचा विचार, त्या त्या परिसराच्या भूभागाशी संबंधित संस्कृतीच्या, समाजधारणेच्या संदर्भात होणारे विचार, यांना स्थान लाभत आहे.

अहमदनगर शहराला महाराष्ट्राच्या इतिहासात आणि सांस्कृतिक जीवनात एक महत्त्वाचे स्थान आहे. याच शहरात ज्ञानोदय नियतकालिक सुरू झाले. ब्रिटिश राजवटीच्या आगमनापासून स्वातंत्र्यपूर्व काळातील महाराष्ट्राची सांस्कृतिक, सामाजिक, धार्मिक जडणघडण समजण्यासाठी, ज्ञानोदयाच्या संचिका म्हणजे अभ्यासकाला महत्त्वाची साधनसामग्री आहे. महाराष्ट्राचा सर्वांगांनी नव्याने इतिहास लिहिण्यासाठी अशा साधनांची गरज आहे. अहमदनगर कॉलिजने अशा प्रकारचा प्रकल्प हाती घेऊन, तो सिद्ध करणे, हे कॉलिजने स्वीकारलेल्या एका व्रताचे फलित आहे. तसेच, अहमदनगर कॉलिज केवळ कॉलिज चालवून समाधान न मानता, नव्या नव्या ज्ञानक्षितिजांच्या अंगांनी झेपावत आहे, याचा नगर कॉलिजला सार्थ अभिमान आहे.

आमच्या कॉलिजचे मराठी विभागप्रमुख डॉ. गंगाधर मोरजे महाराष्ट्रातील एक मान्यवर संशोधक आहेत. या प्रकल्पाची कल्पना, आखणी आणि प्रकल्प पुरा करण्याची त्यांची तळमळ व जिद्द लक्षणीय आहेच. पण त्यांना या प्रकल्पसिद्धीसाठी साहाय्य करणारे डॉ. स. वा. मुळे व संपादनसाहाय्य करणाऱ्या प्रा. सौ. पद्मा मोरजे, यांची प्रशंसा करणे, तितकेच महत्त्वाचे आहे.

प्रारंभापासून या प्रकल्पसिद्धीसाठी प्रयत्नशील असणारे डॉ. सुरेंद्र बार्लिंगे, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई, यांची सक्रिय प्रेरणा,

या प्रकल्पपूर्तीमागे आहे, हे नमूद करण्यास मला अभिमान वाटतो. त्यांच्या मार्गदर्शनाने आणि साहाय्याने आम्ही काम चालू ठेवू शकलो आहो.

आलोचना प्रस्थान (मुंबई)चे प्रा. वसंत दावतर यांचा आणि नगर कॉलेजचा जिव्हाळ्याचा संबंध आहे. या प्रकल्पास आलोचना प्रस्थानाद्वारा साहित्य आणि संस्कृती मंडळाने मान्यता दिली. प्रा. वसंत दावतर यांनी या प्रकल्पसिद्धीसाठी जे मार्गदर्शन आणि अन्य सक्रिय साहाय्य केलेले आहे, ते ऋण केवळ आभार मानून संपणारे नाही. त्यांचे आमचे ऋणानुबंध अधिकाधिक वृद्धिंगत होवोत.

भास्कर पांडुरंग हिवाळे एज्युकेशन सोसायटी (अहमदनगर)चे चिटणीस व माजी प्राचार्य डॉ. टी. बार्नाबस, हे सदैव अशा कामांना प्रेरणा व प्रोत्साहन देत आले आहेत. त्यांचे बळ आमच्या पाठीशी आहे. तसेच प्रा. डॉ. सौ. मनोरमा बार्नाबस, यांना महाराष्ट्राच्या सामाजिक, सांस्कृतिक चळवळींत विशेष रस. कारण तो त्यांच्या अभ्यासाचा विषय. या उभयतांचे मनःपूर्वक आभार. 'ज्ञानोदयलेखनसारसूची' महाराष्ट्राचा सांस्कृतिक, सामाजिक, भाषिक आदी चळवळींचा इतिहास साधार उभा करण्यास अभ्यासकांना उपयोगी होईल, असा भरवसा आहे. जाणकार अभ्यासक व सामान्य वाचक या कार्याची योग्य ती दखल घेतील, याबद्दल मला खात्री आहे.

अहमदनगर कॉलेजने स्वीकारलेल्या संशोधन-व्रताची ज्योत अशीच अधिकाधिक तेजाने उजळत ठेवण्यासाठी आम्ही प्रयत्नशील आहोत, हे खरे.

पी. एस्. जेकब, प्राचार्य, अहमदनगर कॉलेज.

'ज्ञानोदय' हे नियतकालिक शंभर वर्षांहून अधिक काळ चालू आहे. याचे जुने अंक अभ्यासकांना सर्वच ठिकाणी सहज उपलब्ध होण्यासारखे नाहीत. मूळ अंक आता इतक्या जीर्ण अवस्थेत आहेत की, ते हाताळणे म्हणजे ते पुढील संदर्भासाठी योग्य त्या अवस्थेत न ठेवणे, असा प्रकार आहे. म्हणून त्यांचे जतन वस्तुसंग्रहालयासारख्या पद्धतीनेच (म्युझियममध्ये) करता येणे शक्य आहे आणि आवश्यकहि आहे. इतक्या दीर्घकालातील अंकांचे सूक्ष्मपट तयार करणे हे बरेच अवाढव्य काम आणि असे सूक्ष्मपट एखाद्याच ठिकाणी राष्ट्रीय प्रकल्पात उपलब्ध करणे शक्य.

ही परिस्थिति लक्षात घेऊन या अंकांची शंभर वर्षांची 'लेखनसारसूची' तयार करून प्रकाशित करण्याची कल्पना डॉ. सुरेंद्र बारलिंगे यांच्या सूचनेद्वारा प्रथम नजरेसमोर आली. त्या अनुरोधाने डॉ. हिवाळे एज्युकेशन सोसायटी व अहमदनगर कॉलिज येथील अधिकारीवर्गाशी आणि अहमदनगर कॉलिजमधील मराठीचे प्राध्यापक व विभागप्रमुख डॉ. गंगाधर मोरजे यांच्याशी विचारविनिमय करण्यात आला. महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाचे त्यावेळचे अध्यक्ष डॉ. सुरेंद्र बारलिंगे यांच्याशी संपर्क साधून चर्चा केली. या सर्व विचारविनिमयातून व चर्चेतून 'लेखनसारसूची'चा आराखडा तयार होऊ लागला. इ. स. १८४२ ते १९४१ या कालावधीतील अंकांमधील सर्व लेख–कविता–इत्यादी साहित्याची ही सार-सूची सहा खंडांत तयार करण्याची योजना नक्की करून हा प्रकल्प संघटित केला. मदतीसाठी तो महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळापुढे ठेवला. सर्व प्रकारच्या सहकार्याची आणि उर्वरित मदतीची जबाबदारी डॉ. हिवाळे एज्युकेशन सोसायटी, अहमदनगर कॉलिज, यांनी स्वीकारली. साहित्य आणि संस्कृती मंडळानेही हा भार उचलण्यास आम्हांस मदत करून आश्वासित केले.

'ज्ञानोदय' या नियतकालिकाचे महत्त्व ते शंभर वर्षांहून अधिक काळ चालले आहे, ख्रिस्ती मराठी मंडळींनी ते चालविले आहे, इतकेच नाही. ख्रिस्ती मराठी संस्कृतीचे ते प्रतीक तर आहेच, पण त्याशिवायहि महाराष्ट्रातील धार्मिक, सामाजिक, शैक्षणिक, वाङ्मयीन, इत्यादी अनेक जीवनांगांमधील स्थित्यंतरे, विचारमंथने, वस्तुस्थिती, यांचे दप्तर म्हणूनही ते महत्त्वाचे आहे. या विषयांतील अभ्यासकाला व जिज्ञासूलाही या

नियतकालिकातील हे लेखन अवलोकनार्थ आणि चिकित्सेसाठी मिळाले नाही, त्याचा उपयोग करून घेता आला नाही, तर त्याच्या अभ्यासात व ज्ञानात बरीच मोठी उणीव राहिल्यासारखे होईल. म्हणून ही उणीव दूर करण्याचा प्रयत्न या लेखनसारसूचीद्वारे केला आहे. या सूचीमध्ये केवळ सारकथन केलेले नाही, तर मुळांतील शैली व भाषा यांची जाणीवही वाचकाला होऊ शकेल, अशा धोरणाने संशोधन–संपादन केलेले आहे.

मराठीतील कोणत्याही नियतकालिकाची अशी सारसूची केली गेलेली नाही. या दृष्टीने ही अशी पहिलीच सूची आहे. इतकेच नव्हे, तर कोणत्याही विषयाची अशी सारसूची मराठीत अजून तयार झालेली नाही. प्रस्तुत सूचीने आरंभ करून दिला आहे आणि धडा घालून दिला आहे, ही वस्तुस्थिती नमूद करण्यात आत्मश्लाघा नाही. हा पहिलाच आणि अनोखा असा प्रकल्प आहे. त्यामुळे तो चुकतमाकत झालेला असणे शक्य आहे. प्रयोग करीत आणि अनुभव घेत यातील उणीवा दूर होतील. इतर काही विषयांत असे प्रयत्न सुरू झाले की, या प्रकारच्या सूचीचे प्रारंभिक प्रवर्तनाचे कार्य म्हणून 'ज्ञानोदया'च्या या सूचीकडे बघावे लागेल. अशा प्रकारच्या कार्याचे 'सूतो उवाच' करण्याची संधी आलोचना प्रस्थानला डॉ. ह्विवाळे एज्युकेशन सोसायटी– अहमदनगर कॉलेज आणि महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ यांच्या बहुमोल साहाय्याने मिळाली आहे.

सारसूचीमध्ये प्रत्येक अंकातील मजकुराचे क्रमवार आणि कालानुक्रमाने सारकथन केलेले आहे. त्यांचे संदर्भही नमूद केलेले आहेत. विषयवार सूचीचीही जोड दिलेली आहे. उपयुक्तता, संदर्भ सहजतेने सापडणे आणि पद्धतशीर मांडणी, यांच्याकडे लक्ष पुरवून सारसूचीची रचना केलेली आहे. हे काम निव्वळ संकलनाचे नाही. शास्त्रीय दृष्टी बाळगून, संशोधनपद्धती नजरेसमोर ठेवून, सार करताना मुळातील विचार, अनुभव, निवेदन, मांडणी, इत्यादींना धक्का लागणार नाही, याची काळजी घेत, अभ्यासनीती पाळीत सारसूचीतील लेखन व त्याची मांडणी केलेली आहे. अभ्यासकांची सोय आणि एका मराठी सांस्कृतिक ठेव्याचे मुळाशी संवादी राहून जतन, या दृष्टींनी या सारसूचीची पूर्तता करण्यासाठी अवश्य ते संयोजन केलेले आहे. असे हे काम

करण्यांत सहभागी होण्याची संधी आलोचना प्रस्थानला मिळाली, याबद्दल संबंधित सर्वांचेच मन:पूर्वक आभार.

पहिल्या खंडाच्या सूचीप्रमाणे या सूचीच्या दुसऱ्या खंडाच्या पहिल्या भागाची मुद्रणाची मांडणी, तिचे मुखपृष्ठ, यांबाबत श्री. बाळाराम पवार यांचे साहाय्य उल्लेखाविना जाऊ देणे योग्य होणार नाही. तसेच, महाराष्ट्र राज्य मुद्रण व लेखनसामग्री संचालनालयाचे संचालक व उपसंचालक, शासकीय मुद्रणालय, वाई, येथील व्यवस्थापक, संबंधित इतर सर्व अधिकारी आणि कामगार-सेवक यांनी ज्या आस्थेने व तत्परतेने या किचकट कामासंबंधी मुद्रणव्यवस्था केली व हे काम पार पाडले, त्याचाही कृतज्ञतापूर्वक उल्लेख केला पाहिजे. डॉ. मोरजे, प्रा. सौ. पद्मा मोरजे, डॉ. मुळे यांच्या संपादनकार्याचाही खास ऋणनिर्देश आवश्यक वाटतो. डॉ. सुरेंद्र बारलिंगे आणि महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे सर्व सभासद, अधिकारी व सेवक यांचाही हातभार हे काम यथोचितपणे पार पाडण्याच्या कामी लागला आहे, याचाही निर्देश करणे कर्तव्य आहे. डॉ. बारलिंगे यांच्याप्रमाणे अहमदनगर कॉलेजचे माजी प्राचार्य डॉ. टी. बार्नाबस, डॉ. सौ. एम्. बार्नाबस आणि आजी प्राचार्य डॉ. पी. एस्. जेकब यांनी हे काम आपलेच मानून पाठीशी सदैव उभे राहून या कामाच्या पूर्तीची निश्चिती करून ठेवली आहे, याचाही कृतज्ञतापूर्वक उल्लेख केल्याशिवाय या मनोगताची पूर्ती करता येणार नाही.

वसंत दावतर,
आलोचना प्रस्थानकरिता

ज्ञानोदय नियतकालिकाच्या प्रारंभापासूनच्या संचिका संग्रहित करून, त्या संचिका जोपासण्याची दूरदृष्टी ज्यांनी दाखविली त्या डॉ. भास्कर पांडुरंग हिवाळे, यांच्या जन्मशताब्दीच्या वर्षी ज्ञानोदय लेखनसारसूची खंड दुसरा (इ.स. १८५८ ते १८७४) भाग पहिला (इ.स. १८५८ ते १८६३) अभ्यासकांच्या हाती देताना फार आनंद होत आहे.

या सूचिप्रकल्पासंबंधी पहिल्या खंडात सविस्तर विवेचन केलेले आहे. तसेच, या सूचीची वेगळिक व तिचे महत्त्व यांचेही पूर्वी स्पष्टीकरण केलेले आहे.

या सूचीचा उपयोग करणारासाठी काही स्पष्टीकरणे आवश्यक आहेत. ती अशी–
प्रत्येक खंडातील नोंदक्रमांक १ या संख्येने सुरू होतो.

खंड दुसरामधील नोंदीसंबंधी विवरण–

उदा. पृ. ४३० वरील नोंदक्रमांक १४२०

(या नोंदक्रमांकामुळे आपणास हवी ती माहिती मिळणार आहे)

नोंदक्रमांकाच्या पुढे कंसात येणाऱ्या बारीक ठश्यातील मजकूरासंबंधी–

१९ : ज्ञानोदय नियतकालिकाचे एकोणिसावे वर्ष.

२३ : ज्ञानोदय नियतकालिकाचा तेविसावा अंक.

१ डिसेंबर ६० : ज्ञानोदय नियतकालिक प्रसिद्धीची तारीख, महिना, सन.

३५४–३५६ : मूळ लिखाण मुद्रित झालेली पृष्ठे.

नोंदक्रमांक १४२० चा मजकूर संपल्यावर १४२० अ, अशा क्रमांकाची नोंद आहे. व पुढे कंसात बारीक ठशांत मजकूर आहे. त्यासंबंधी स्पष्टीकरण–

अ : इंग्रजी मजकुराचे सूचक चिन्ह.

इंम : इंग्रजी मजकूर.

३५३–३५४ इंग्रजी मजकूर मुद्रित झालेली पृष्ठे.

याच ४३० पृष्ठावर

नोंदक्रमांक १४१९ चा मजकूर संपल्यावर, बारीक ठशांत मुंबई, एक्स्चेंज प्रेस, फोर्ट, असा मजकूर आहे. तो ज्ञानोदय नियतकालिक कुठे, कुठल्या छापखान्यात छापले, मुद्रक कोण, यांसंबंधी माहिती देतो. आणि अंकाचा शेवट सुचवितो.

तर –

याच पृष्ठावरील दोन समांतर रेषांमधील ठळक ठशातील मजकूर ज्ञानोदय नियतकालिकाच्या नवीन अंकाचा प्रारंभ दर्शवितो.

'ज्ञानोदय'मध्ये काही वेळा तत्कालीन इतर नियतकालिकांमधील मजकूर उद्धृत केलेला आहे. तसा निर्देश नोंदमजकूराच्या अखेरीस केलेला आहे.

उदा. पृ. ४३० वरील १४१९ नोंदमजकूरानंतर (प्रभोदय) असे कंसात दाखविले आहे. काही मजकूर चित्रासह असतो. त्याचा निर्देश मजकूरानंतर कंसात (सचित्र) असा केलेला आहे.

काही कविता आहेत. त्यांचे गद्यसार दिलेले आहे, तर कधी (कविता) असे निर्देशिले आहे.

'ज्ञानोदय'मधील लेखन अनेक विषयांवर आहे. त्या प्रत्येक लेखनाला मूळांत मथळा आहे. हे मथळे सूचीच्या विषयवार सूचीत दिले आहेत. पहिल्या खंडाप्रमाणेच सूचींची सूची तयार केलेली आहे.

या प्रकल्पसिद्धीसाठी अहमदनगर कॉलेजमधील मराठी विभागातील माझे सहकारी डॉ. स. वा. मुळे, एम्.ए., पीएच्.डी. यांचे संशोधनसाहाय्यक म्हणून सहकार्य लाभत आहे. तसेच संपादनसाहाय्यक म्हणून माझी पत्नी प्रा. सौ. पद्मा मोरजे, एम्.ए. हिचे नेहमीच्या तत्परतेने आणि जिद्दीने सहकार्य लाभत आहे. खरे तर या दोघांच्या सहकार्यावर हा प्रकल्प उभा आहे. हे नम्रतापूर्वक नमूद करणे माझे कर्तव्य ठरते.

प्रकल्पाच्या सुरुवातीपासून तो आतापर्यंत गुरुवर्य प्रा. वसंत दावतर यांचे मार्गदर्शन, विचारविनिमय व सक्रिय साहाय्य या स्वरूपात लाभत आहे. याची कृतज्ञतापूर्वक

नोंद घेणे आवश्यक आहे. अहमदनगर कॉलिजचे प्राचार्य डॉ. पी. एस्. जेकब, माजी प्राचार्य डॉ. टी. बार्नाबस व डॉ. सौ. मनोरमा बार्नाबस यांचे प्रोत्साहन आणि सहकार्यही या कामी आम्हा सर्वांना प्रेरक ठरली आहेत, हे नमूद करण्यास मला आनंद होत आहे.

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाचे पूर्वाध्यक्ष डॉ. सुरेंद्र बारलिंगे यांनी या प्रकल्पास मान्यता देऊन, ग्रंथरूपाने सहाही खंड प्रकाशित करण्याची जबाबदारी मंडळाने स्वीकारली, त्याबद्दल व्यक्तिशः त्यांचा व साहित्य संस्कृती मंडळाचा मी आभारी आहे.

अहमदनगर महाविद्यालयाच्या ग्रंथपाल सौ. हळबे व ग्रंथालयातील कर्मचारी यांनी ज्ञानोदयाच्या संचिका मुक्तहस्ते वापरण्यास परवानगी दिली. त्याबद्दल त्या सर्वांस मनःपूर्वक धन्यवाद.

टंकलिखित मुद्रणप्रत तयार करणारे माझे तरुण, उत्साही मित्र श्री. शांताराम घोलप यांचे आभार आवर्जून मानीत आहे.

अशा प्रकारच्या कामाला अनेकांचा अनेक संदर्भात हातभार लागलेला असतो. अशा प्रकारे ज्यांचे ज्यांचे साहाय्य झाले त्या सर्वांच्या साहाय्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करतो.

गंगाधर मोरजे,
प्रमुख संपादक



**डॉ. भास्कर पांडुरंग हिवाळे**
संस्थापक व प्रथम प्राचार्य
अहमदनगर कॉलेज, अहमदनगर



## ज्ञानोदय, पुस्तक १७, अंक १, मुंबई, १ ज्यानुएरी १८५८

१ (१७ : १, १ ज्यानुएरी ५८, २)
सत्राव्या पुस्तकाचा पहिला अंक ही देवाची मोठी व विशेष दया मानावी लागेल; कारण सात महिने या खंडात भयंकर फितुरी आणि भयंकर लढाया चाललेल्या आहेत. आम्ही किंवा आमच्या बापांनीही त्या पाहिल्या किंवा कल्पिल्या नाहीत. वाहत्या रक्ताचा आवाज आम्ही ऐकला त्याचे विषाक्त थेंब आम्हांवरही उडाले. आता आभाळ फाटून आस्मान दिसू लागेल. काही वेळाने सारे निर्विघ्न होईल. ख्रिस्ती धर्म पसरावा म्हणून जुलूम न करता आम्ही प्रयत्न करू. ख्रिस्ती धर्माची मदत करणे हा आमचा अभिप्राय आहे. एक महिन्यातून दोन वेळा ज्ञानोदय येत जाईल. वार्षिक किंमत दीड रुपया राहील.

१ अ (इंम : १–२)

२ (१७ : १, १ ज्यानुएरी ५८, ३)
मि. हेजण मडमेसह स्वदेशी जात आहेत. त्यांनी ११ वर्षे मिशनाचे काम केले. गेली तीन वर्षे ते ज्ञानोदयाचे काम करीत होते. ज्ञानोदयाचा मजकूर हितकारक व मनोरंजक व्हावा म्हणून प्रयत्न करीत. सुज्ञानासाठी व सुधारणेसाठी मेहनत घेत असत. हेजणमडमही उपदेशाचे काम करीत असे.

२ अ (इंम : ३)

**३** (१७ : १, १ ज्यान्युएरी ५८, ४)

मि. टकर मडमेसह भारतात परत आले. ते पुन्हा तिनवल्ली प्रांतात जातील. त्यांनी तेथे १३ वर्षे काम केले व दोन हजार माणसांना बाप्तिस्मा दिल्हा. ४८ भक्तिस्थाने बांधली. त्याच आगबोटीतून कित्येक जेर्मन मिशनरीही मुंबईस येऊन पोहचले आहेत.

**३ अ** (इंग : ३)

**४** (१७ : १, १ ज्यान्युएरी ५८, ४)

फ्रीचर्च इनस्तितुशनाची आणि जनरल असेंब्लीच्या शाळांची परीक्षा मॅडम नेसबिट आणि पेटन यांनी घेतली. तेथील विद्यार्थी मेहनती असून पवित्रशास्त्राबद्दल अगत्य दाखविणारे आहेत. मणी स्कूलची नवी इमारत तयार झाली. या तीन शाळांत हिंदु-मुसलमान-पारशी मिळून ५०० विद्यार्थी शिकतात. इंग्लिश शिकणारी सर्व एतद्देशीय मुलें मुंबईस सुमारे २५०० असतील.

**४ अ** (इंग : ४)

**५** (१७ : १, १ ज्यान्युएरी ५८, ७–१०)

मुंबईच्या टपालखात्यात चौदा वर्षे काम करणारा तैयण आंबू हा हिंदू गृहस्थ ख्रिस्ती झाला. गेले ८ महिने तो बाप्तिस्मा मागत होता. लहानपणी कालिकत येथे असताना देव, सर्प व भुते यांची भक्ती पाहून तो त्रासला. तामसी व अन्यायी देवतांना कंटाळला. आपल्या भ्रष्ट मनाला सुटका मिळण्याचा मार्ग म्हणजे ख्रिस्तच अशी त्याची खात्री झाली. ब्रह्मचारी बाबाची व्याख्याने ऐकून त्यास असे वाटले की पाप व पुण्य यांच्या कल्पनांतच मोठा गोंधळ आहे. दयाळू याजक येशू ख्रिस्त यालाच तो शरण गेला, कारण ख्रिस्ती धर्मच ईश्वरापासून आहे. दोन धर्मांमध्ये तो लंगडत होता. आता त्यास आश्रय सापडला. खांब उचलून ख्रिस्तामागे आला.

## ५ अ (इंग : ५–७)

६ (१७ : १, १ ज्यान्युएरी ५८, ११)
ग्लीसरैन ४ औंस, पेपरमिंटाचे तेल २½ औंस आणि, टर्पेण्टैन तेल ४ द्राम ह्यांचे मिश्र करून, शरीराचे उघडे भागास चोपडावे. डांस, मत्सर वगैरे जिवांच्याने उपद्रव देववणार नाही.

## ६ अ (इंग : ११)

७ (१७ : १, १ ज्यान्युएरी ५८, ११)
अहमदनगर जिल्ह्यातील शेवगाव तालुक्यात कांबी येथे पन्नास लोकांनी दरोडा घातला होता. लोकांनी ३ रोहिले व ४ महार यांना पकडले. जड्ज पार्टिंजर यांनी या सात जणांना फाशी सुनावली व ती अंमलात आणली.

८ (१७ : १, १ ज्यान्युएरी ५८, ११–१२)
लखनो येथे बंडखोरांच्या वेढ्यात सापडलेले इंग्रज लहान किल्ला बांधून राहात होते. जनरल हावलाक आणि ओटराम यांनी फार प्रयत्न केले. पण बंडखोरांची संख्या एक लाखावर असल्यामुळे इंग्रजांची सुटका होऊ शकली नाही. सर कांबिल यांनी ६ हजार सैनिकांसह त्यांवर हल्ला केला. शिकंदर बागेत घनघोर लढाई झाली. १५०० बंडखोर मेले. इंग्रजांची सुटका झाली.

९ (१७ : १, १ ज्यान्युएरी ५८, १२–१३)

उत्तर हिंदुस्थानात जागोजाग बंडे होत आहेत. बंडवाल्यांचा मुख्य जमाव दिल्लीत होता. पण पराक्रमी व शूर इंग्रज सैनिकांपुढे त्यांचे काही चालले नाही. अनेक बंडखोर मृत झाले, कित्येक पळाले. मोठ्या शहरात आता त्यांचा पायरवसुद्धा ऐकू येत नाही. इंग्रजांच्या इमानी फौजांनी त्यांना जेरीस आणले. इंग्रज सेनेस आणखी मदत मिळून ती फौज एक लक्षावर जाईल. दुष्टांची दुष्ट वासना लवकरच लयास जाणार आहे. ईश्वराने अशीच कृपा लवकर करून आमच्या सरकारास यश द्यावे अशी आमची इच्छा आहे. (ज्ञानप्रकाशवरून)

१० (१७ : १, १ ज्यान्युएरी ५८, १३)

कर्नेल जेकब यांच्या विद्युल्लतेच्या तारेवरून असे कळते की, गेल्या महिन्याच्या ६ तारखेस अनेकांनी बंड करून कोल्हापूर शहर ताब्यात घेतले. गावाची पूर्ण नाकेबंदी केली. कर्नेल जेकब यांनी ताबडतोब चाल करून बंडवाल्यांना पकडले. ३६ बंडवाल्यांवर कोर्ट मार्शल करून राजवाड्यासमोर त्यांची डोकी उडविली. ५० लोक कैदेत ठेवले. कोल्हापूरच्या राजाने मात्र इंग्रजांनाच मदत केली. राजवाडा उडवून देण्याचा बंडखोरांचा बेत इंग्रज फौजेने अयशस्वी केला. (वर्तमानदीपिकेवरून)

११ (१७ : १, १ ज्यान्युएरी ५८, १३–१४)

आस्ट्रेलियन बोटीतून इंग्रजी फौजेची नवी कुमक आली आहे. तिने ग्वाल्हेर छावणीतील बंडखोरांचा पूर्ण पराभव केला. दारूगोळा ताब्यात घेऊन इंग्रजांच्या बायकामुलांना अलाहाबादेत सुरक्षितपणे पोहोचविले. काल्पी गावाच्या रस्त्याने कित्येक बंडखोरांचा पाठलाग करून त्यांना मारले. १६ तोफा हस्तगत केल्या. इंग्रज फौजेचे मात्र सांगण्याजोगे नुकसान झाले नाही. (ज्ञानप्रकाशवरून)

१२ (१७ : १, १ ज्यान्युएरी ५८, १४-१५)

प्राचीन काळापासून खबुतरे जलद जासुदाप्रमाणे पत्रे नेण्याचे काम करतात. त्यांची गति मिनटास एक मैल असते. आलेप्पोच्या डाक्तर रसेल याने खबुतरांचा उपयोग करून साठ मैलांवर टपाल पाठविले. फ्रान्समधील खबुतरे एका तासात सहा कोशपर्यंत जातात व पत्र देऊन पूर्वस्थळी येतात. धुक्यामुळे काही वेळा त्यांचा मार्ग चुकतो, उशीर लागतो. जलप्रलयाच्या वेळी सतत वाढणाऱ्या पाण्याची बातमी एका पारव्याने नोहापर्यंत आणली असे पवित्र शास्त्रात म्हटलेले आहे.

१३ (१७ : १, १ ज्यान्युएरी ५८, १५)

आजपर्यंत कोटामध्ये काळ्या सैनिकांचा पहारा असे. आता ते बदलून गोऱ्या लोकांचे पहारे ठेविले आहेत. (वर्तमानदीपिकेवरून)

१४ (१७ : १, १ ज्यान्युएरी ५८, १६)

गेल्या दोन वर्षांत मुंबईकर मंडळी स्टाकिंग (बूट) व इंग्रजी जोडे वापरू लागली आहेत. सफेद अंगरख्याऐवजी आलपाकाचे कपडे वापरीत आहेत. यामुळे धोबी लोकांना भिक्षांदेही करावी लागेल, किंवा गाव सोडून दूर जावे लागेल. आता साहेबी टोपी घातली की ते पुरे इंग्रज बनतील! (वर्तमानदीपिकेवरून)

१५ (१७ : १, १ ज्यान्युएरी ५८, १६)

सरकारने जाहीरनाम्याद्वारे प्रकट केले आहे की बंडवाल्यांची जी जी मिळकत जप्त झाली ती सरकारजमा समजली जाईल. ज्या लष्कराने ती जिंकली त्याला सहा महिने जादा भत्ता मिळेल. (वर्तमानदीपिकेवरून)

१६ (१७ : १, १ ज्यान्युएरी ५८, १६)

सन १८५८ चे पंचांग छापून तयार आहे. किंमत १ आणा आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**१७** (१७ : २, १५ ज्यान्युएरी ५८, १७–१८)

सन १८५८ च्या सरकारी सुट्या जाहीर झाल्या. प्रत्येक धर्मांच्या सणाप्रमाणे विशेष सुट्टी घेता येते. मात्र चौकीदारांना व चपराशांना हे नियम लागू नाहीत. रविवारी सुटी दिल्यामुळे या सरकारवर ईश्वर आशीर्वाद पाठवील. लोकांनी परधर्मीय सुटीच्या दिवशी काम करून सरकारी नुकसान टाळावे.

यावरील ज्ञानप्रकाशचा अभिप्राय :

सदरहू सरकारी ठराव फार योग्य आहेत. रविवार जो विसाव्याचा दिवस त्या दिवशी सरकारी हपीसातील कामकाज बंद असावे असा ठराव केल्यामुळे ज्याला सरकार एकच खरा व जिवंत देव असे मानितात त्याचा त्यांनी योग्य सन्मान राखिला. (ज्ञानप्रकाशवरून)

**१७अ** (इंम : १९)

**१८** (१७ : २, १५ ज्यान्युएरी ५८, १९–२२)

मार्गशीर्ष पोर्णिमेस मांडवगणला (अहमदनगर) सिद्धेश्वरची जत्रा भरते. पशूप्रमाणे निर्लज्जपणे व्यभिचारादि दुष्ट कर्मे करणाऱ्या कोल्हाटणी सर्वांत आधी पाले उभारतात. यात्रेचा खर्च ५०० रुपयांवर जातो. तमाशे पाह्यताना कज्जे करणाऱ्यांना पकडण्यासाठी पोलिसांचा बंदोबस्त असतो. यंदा यात्रा कमी भरली, कारण मद्यपानावर बंदी आहे! खिस्ती धर्मोपदेशकांनी तमाशेवाल्यांची समजूत घालून अनेक तमाशे गुंडाळावयास लावले. शास्त्रीलोकांशी वाद करून खऱ्या देवाची जाणीव दिल्ही. बगाड, दारू व तमाशा यांना बंदी झाली की यात्रा अगदी कमी भरते. खऱ्या आत्म्याने व सत्यतेने देवाची भक्ती केली पाहिजे.

**१८अ** (इंम : २२)

**१९** (१७ : २, १५ ज्यान्युएरी ५८, २२–२३)

(नेटिव्ह ख्रिश्चन) लक्ष्मीबाई अवघ्या २६ व्या वर्षी अतिसाराने वारली. प्रभू येशूच्या दयाळूपणावर तिचा पूर्ण विश्वास होता. आता ती अक्षय सुखात वास करील. कारण की, जो मनाने ईश्वराकडे जातो त्यास तो घालवीत नाही. ती हिंदूच राहिली असती तर अक्षय नरकवासात पडली असती. नुसत्या नामोच्चाराने तारण होत नसते, तर खऱ्या भक्तीने मोक्ष मिळतो.

असे 'ज्ञानोदय वाचणारा' पत्रात लिहितो.

**२०** (१७ : २, १५ ज्यान्युएरी ५८, २३–२५)

'फिरस्ता' आपल्या पत्रात लिहितो की, खेड्यातील लोकांची इंग्रजी राज्यावर फार आवड आहे. त्यांची खात्री झाली की पूर्वीच्या राजवटीपेक्षा इंग्रजी अंमलात लुटारू व परचक्र यांपासून जास्त संरक्षण मिळते. बंडाबद्दल ते अगदी अज्ञानी आहेत. इंग्रजी इनसाफावर त्यांचा पूर्ण विश्वास असून लुच्च्या कामदारांमुळे आपणांवर अन्याय होतो, असे ते समजतात. मारवाडी-सावकारांच्या जुलमामुळे ते फार खिन्न आहेत. शेकडा २५ किंवा ५० टक्के व्याजाच्या योगाने त्यांच्या डोक्यावर कर्जाचे पर्वत तयार होतात. शेतीतील अल्प प्राप्तीमुळे कर्ज लवकर फिटतही नाही. सावकार त्यांची जिनगी व शेतमळे हिसकावून घेतात. कर्जबाजारी होण्याची चालच या देशात पडून गेली आहे. त्यांची गरज पाहून चढ्या व्याजाने सावकार पैसा देतो व शेवटी जप्ती आणतो. मग यांच्याजवळ कवडीसुद्धा उरत नाही. सावकाराला शिव्या देऊन ही भयंकर दशा संपणार नाही.

**२० अ** (इंग : २५–२६)

२१ (१७ : २, १५ ज्यान्युएरी ५८, २६–२८)

'स्वदेशस्थ लोकांचे कल्याण इच्छिणारा' लिहितो की : पावसाळ्यात धाब्याची घरे कोसळून अनेक माणसे मरतात. परदेशस्थ लोकांना ही घरे बोडखी वाटतात. यांत प्रकाश आणि वारा यांचा अभाव असतो. मातीच्या पेंडाने पावसाळ्यात घरे गळत राहातात. उन्हाळ्यामध्ये मनस्वी उकडते. स्वैपाक करणाऱ्या स्त्रीचे तर अनन्वित हाल होतात. ढेकणांचा त्रास तर इतका की एखाद्या वज्रदेहीलाच सुखाने झोप यावी. हे लोक घरास बळद करून त्यात धान्य ठेवतात. पण उबाऱ्याने धान्यही खराब होत असते. चोरापासून बचाव व्हावा म्हणून ही पेटीसारखी घरे बांधण्याची चाल पडली. परंतु मानवी प्रकृतीस ती अनर्थकारक आहेत. ही घरे मळीण व अस्वच्छ राहातात. या घरांना खिडक्या पाडाव्यात व मनासही शुद्ध व पुण्याचा वारा मिळू द्यावा.

२२ (१७ : २, १५ ज्यान्युएरी ५८, २८–२९)

'एक ज्ञानोदय वाचणारा' लिहितो की : अहमदनगरजवळच्या खोकर या गावात मारवाड्याच्या घरावर दरोडा पडला. मारवाड्याच्या आईचा दिवस असल्यामुळे घरमंडळी लाडू वळीत होती. रात्री दरोडेखोरांची टोळी आली. तिने सर्वांना मारहाण करून ५०० रुपयांचा ऐवज नेला. थ्याचरसाहेबांनी वहिमी भिल्लांची चौकशी सुरू केली. पोलिसांनी फिरता बंदोबस्त ठेवला आहे.

२३ (१७ : २, १५ ज्यान्युएरी ५८, २९-३०)

(वृक्षवर्णन चालू) चीन, इराण देशांत व हिमालयाच्या परिसरात अक्रोडाची झाडे आढळतात. यांची फळे पेरूएवढी असतात. कवच कठीण होण्यापूर्वी त्याचे लोणचेही करतात. जंताच्या उपद्रवावर त्याचा औषध म्हणून उपयोग होतो. आश्विन व कार्तिक महिन्यांत या फळांचा हंगाम असतो. पण वृक्ष लावल्यावर फळे येण्यास मोठा काळ जावा लागतो. आपल्या नातवंडांकरिता हे फळ लावले पाहिजे. कारण आपल्या आजोबांनी लावलेले अक्रोड आपण खातोच की! दुसऱ्याच्या हिताकरिता श्रम करण्यात मोठा आनंद आहे.

२४ (१७ : २, १५ ज्यान्युएरी ५८, ३०-३१)

गवरमेंट ग्याजेटात सरकारने असे प्रसिद्ध केले आहे की, एतद्देशीय फौजेमधील फितूर लोकांच्या कुशीत काखेखाली एम् अक्षर कोरण्याचा अधिकार इंग्रज अधिकाऱ्यांना देण्यात आला आहे. फरारी कैदी पकडल्यावर ही अक्षर कोरले जाईल. हा हुकूम ताबडतोब अंमलात येत आहे. (गवर्नमेन्ट गॅजेटवरून)

२५ (१७ : २, १५ ज्यान्युएरी ५८, ३१)

काचेवर वितळलेल्या मेणाचा थर देऊन त्यावर अक्षरे किंवा ठसा हवा तो कोरावा. सुईने कोरल्यावर फ्लआरस्पार व गंधकाम्ल तापवून त्याच्या वाफेवरती ही काच धरावी. म्हणजे अक्षरे टिकाऊ बनतात. (ज्ञानप्रसारकवरून)

२६ (१७ : २, १५ ज्यान्युएरी ५८, ३१)

मद्रास, मुंबई, भडोच व कलकत्ता ही शहरे तारायंत्राने जोडली गेली. (धूमकेतूवरून)

२७ (१७ : २, १५ ज्यान्युएरी ५८, ३१)
न्युजीम बेटावरील नदीत दिवसाला साडेचार शेर सोने मिळते. (ज्ञानप्रसारकवरून)

२८ (१७ : २, १५ ज्यान्युएरी ५८, ३१)
तीन वेस्ट इंडियन पलटणी भारताकडे निघाल्या. (धूमकेतूवरून)

२९ (१७ : २, १५ ज्यान्युएरी ५८, ३१)
बाळाराम रामचंद्र असि. इनाम कमिशनर यांचे निधन झाले.

३० (१७ : २, १५ ज्यान्युएरी ५८, ३२)
ग्लासगोच्या आस्टीन या संशोधकाने आगीवर चालणारा नांगर शोधला आहे. एका यंत्रास रोजी ८ हंड्रेडवेट कोळसा लागतो. दोन माणसे सहा एकर जमीन रोज नांगरतील अशी या नांगराची क्षमता आहे. (जगन्मित्रवरून)

३१ (१७ : २, १५ ज्यान्युएरी ५८, ३२)
फ्रान्स देशातील टाकसाळीत एका वर्षात ६० कोटी सोन्याची नाणी तयार झाली. (ज्ञानप्रकाशवरून)

३२ (१७ : २, १५ ज्यान्युएरी ५८, ३२)
प्रिन्स नेपोलियनचे पदार्थालय पाहण्यासाठी लावलेल्या तिकिटापोटी ५१ लाख ६२ हजाराचे उत्पन्न झाले. (ज्ञानप्रकाशवरून)

३३ (१७ : २, १५ ज्यान्युएरी ५८, ३२)
विलायतेतील एका देवळासाठी खाणीतून काढलेला ४५ हजार पौंडाचा दगड वापरला जाणार आहे. (ज्ञानप्रकाशवरून)

३४ (१७ : २, १५ ज्यान्युएरी ५८, ३२)
विलायतेस एका प्रोफेसराने एक संगमरवरी दगड खाणीतून काढला (ज्ञानप्रकाशवरून)

३५ (१७ : २, १५ ज्यान्युएरी ५८, ३२)
फार खाल्ल्याने मनुष्य बळकट होत नाही, तर ते खाऊन जिरविल्याने होत असतो. फार पैका मिळविल्याने तो धनवान होत नाही, तर संचय केल्याने श्रीमंत होतो. फार वाचल्याने आपण विद्वान होत नाही, तर स्मृती राखल्याने शहाणे होतो. (वृत्त.)

३६ (१७ : २, १५ ज्यान्युएरी ५८, ३२)
न्यूपोर्टच्या एका घड्याळजीने अगदी नवीन बांधणीचे घड्याळ तयार केले. त्यावर जगातील प्रसिद्ध ठिकाणांची वेळ एकाच वेळी समजत राहाते. नावाड्यांना या घड्याळाचा फार उपयोग होईल. (जगन्मित्रवरून)

३७ (१७ : २, १५ ज्यान्युएरी ५८, ३२)
खान बहादूर बरजुजी सेट यांना सुरतेहून अहमदनगर येथे प्रिन्सिपल सदर अमीन नेमले आहे. (ज्ञानप्रकाशवरून)

३८ (१७ : २, १५ ज्यान्युएरी ५८, ३२)
विलायतेहून हिंदुस्थानकडे २ कोटी ६० लक्षांचे सोने रवाना होणार. (ज्ञानप्रकाशवरून)

३९ (१७ : २, १५ ज्यान्युएरी ५८, ३२)
हरमंड नावाच्या इंग्रज शिपायाचे वय १०८ वर्षे आहे. त्याच्या अंगावर ४० जखमांचे वण आहेत. (ज्ञानप्रकाशवरून)

**४०** (१७ : २, १५ ज्यान्युएरी ५८, ३२)

मुंबई स्तानडर्ड नावाचे इंग्रजी वर्तमानपत्र सुरू झाले. (ज्ञानप्रकाशावरून)

अमेरिकन मिशन प्रेस, टी. मुंबई, गॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १७, अंक ३, मुंबई, १ फेब्रुएरी १८५८

**४१** (१७ : ३, १ फेब्रुएरी ५८, ३३–३४)

भरतखंडास अनीतिकारक महान रोगांनी जर्जर केले असून पवित्र शास्त्राखेरीज दुसरा उपायच नाही, असे पवित्र शास्त्र मंडळीच्या मुंबई शाखेचे मत आहे. फौजेस शास्त्राचा उपदेश केला असता, तर गतवर्षीचा बंडाचा अनर्थ झालाच नसता. सरकारने फौजेस शास्त्रापासून अगदी दूर ठेवले ही मोठीच चूक झाली. नास्तिकपणाचे भयानक परिणाम सर्वांनाच भोगावे लागले. शास्त्राला वटाड्या केले, तर लढाया व बंडे एकदम थांबतील. बळी तो निर्बळाचा कान पिळी हा अन्याय चालला नसता. हिंदुशास्त्रातील बोधाने तिळमात्रही सुखाचे दिवस दिसणार नाहीत. दुबळ युद्ध व रक्ताचे पूर यांतच त्यांच्या देवांना मोठा संतोष वाटत असतो. कुवासना, दुष्टाई, विश्वासघात हे लढायांचे मूळ आहे. त्याऐवजी परोपकार, प्रीत, यांची शिकवण दिल्ही पाहिजे, म्हणून हा प्रसंग ∧ न गमावता खऱ्या शास्त्राकडे गेले पाहिजे.

∧ (पवित्रशास्त्राच्या छापील पुस्तकाला उद्देशून वापरलेले आहे.)

**४१ अ** (इंम : ३४–३५)

**४२** (१७ : ३, १ फेब्रुएरी ५८, ३५–३८) ( –अंक २ वरून पुढे चालू )

'फिरस्ता' लिहितो की : सावकारी जुलमाने खेड्यांतल्या कुणब्यांची दशा फार वाईट होते आहे. कर्जावर नियंत्रण घातले, तरच या दुःखाचा थोडासा परिहार होईल. जवळ शिवाराई नाही, मुलेबाळे नागवी हिंडताहेत, असे आजचे दृश्य अगदी करुण आहे. इनसाफ व कायदा यांचे निमित्त सांगून सावकार सगळेच घेऊन जातो. शेतकरी अन्नालाही मोताद होतो. सरकारने निदान घर व शेत जप्त करण्यावर बंदी करावी. क्रूर सावकारांनी गावेच्यागावे उजाड केली आहेत. कुळ म्हणजे सावकाराचा गुलाम झाल्याने त्याची बायकोही त्याच्यावर नाराज होते. सगळी मानहानी निमूटपणे सोसावी लागते. दैवावर हवाला ठेवावा लागतो. सावकाराची वर्तणूक कायद्याविरुद्ध असते, म्हणून कर्जरोख्यावर २ साक्षीदारांच्या सह्या असण्याची सक्ती पाहिजे. म्हणजे दगाबाजी होणार नाही. रोख्यात खाडाखोड करणाऱ्या सावकारास शिक्षा झाली पाहिजे. कर्जाने अनीती वाढते. काही सावकार तर कर्जापोटी कुळाच्या बायकांनाही कामाला ठेवतात. रुपये देऊन त्यांना सोडवणे भाग पडते.

पत्रावर ज्ञानोदयकर्त्यांचा अभिप्राय : कर्ज केल्यामुळे लोकांत अनीतीची जी वृद्धी होते तिजविषयी वरील पत्रात जे लिहिले ते अगदी खरे आहे

**४२ अ** (इंग्र : ३८–४०)

**४३** (१७ : ३, १ फेब्रुएरी ५८, ४०-४२)

येसोबा हा अहमदनगर जिल्ह्यातील किन्हीचा रहिवासी असून सद्‌गुणी व सुस्वभावी होता. लष्करात चाकरी केल्यावर तो काशीयात्रेस गेला. तेथील गंगा त्याने शिंगवे गावी आपल्या गुरूच्या अस्थीवर ओतली. १२ वर्षे व्रते व नियम पाळले. इकडे त्याचा भाऊ भागोबा खिस्ती झाला. भावाच्या सहवासात त्याला पटले की, व्रते वगैरे कुचकामी आहेत. दुर्वासना आणि दुष्कर्म टाकून देऊन सुनीती, विश्वास, प्रीत, सदाचार या गुणांचा अवलंब झाला, तरच तारण होते. येशूने आमच्यासाठी प्रायश्चित्त भोगले. त्याने जीवनी पाण्याची झारी सादर केली, म्हणून जुन्या मतांचे लक्तर फेकून तो खिस्ती झाला. पाच वर्षे शुभवर्तमानाचा प्रसार करीत गावोगाव हिंडला. मिशनने त्यास लोणी मंडळीचे कारभारी नेमले.

**४३ अ** (इंग : ४२-४४)

**४४** (१७ : ३, १ फेब्रुएरी ५८, ४४)

इंदुरात बंड झाले तरी इंग्रज अधिकाऱ्यांनी बंडवाल्यांना दयाळू वृत्तीनेच वागविले. एकूण ३३१ कैदी पकडले, त्या सर्वांची कोर्ट-मार्शलमध्ये चौकशी करण्यात आली. त्यांच्या पुढाऱ्यास मात्र सर्वांदेखत फाशी दिल्हे. इतरांना फक्त कैदेमध्ये ठेवले. २५ असामींनी इंग्रज स्त्रियांना व मुलांना मदत केली म्हणून त्यांची सुटका करण्यात आली. चांगले कर्म केलें तर चांगलेच फळ मिळते. ठार झालेल्या युरोपियनांच्या दफनविधीनंतर रिपोर्ट केला. पण या ३३१ कैद्यांबाबत अजून काही हुकूम आला नाही. (ज्ञानप्रकाशवरून)

**४५** (१७ : ३, १ फेब्रुएरी ५८, ४५)

अयोध्येजवळ आलमबाग या ठिकाणी चार हजार गोऱ्या शिपायांनी तीस हजार बंडखोरांवर चाल करून ४०० लोक जाया केले. सर जेम्स आऊटरॅम यांच्या फौजेने हा विजय मिळविला. (ज्ञानप्रकाशवरून)

४६ (१७ : ३, १ फेब्रुएरी ५८, ४५–४६)

मुंबईमध्ये जेवढे जुगाराचे महत्त्व आहे, तेवढे इतरत्र कुठेही नाही. २-३ वर्षांपूर्वी रात्रंदिवस जुगारखाने चालत व सतत चोऱ्या होत. आपली दिवसाची कमाई जुगारात घालवून लोक कफल्लक होतात. जुगाराच्या भांडणांनी माजिस्त्रेतासमोर अनेक खटले झाले. मिस्तर स्पेन्सरनी कायदा करून जुगारावर बंदी घातली, परंतु गुप्तपणे जुगार चालूच राहिला. अब्रूदार लोकांना शासन झाले, तरी हे व्यसन सुटणार नाही. अनंतऋषींच्या वाडीत १५-१६ लोक पकडले. पण ते जामिनावर सुटले. सुशिक्षा पढलेले लोकही यात असावेत, हे त्यांच्या अब्रूस कालिमा आणणारे कृत्य होय. बंगालपुरा येथेही जुगारी पकडले व त्यांची जुगाराची रक्कम जप्त करून त्यांस दंड भरावयास लावले.

४७ (१७ : ३, १ फेब्रुएरी ५८, ४६)

अनानस या झाडास केवड्यासारख्या पाती असतात. त्यांच्यामध्ये अनानस पिकतो. तांबूस व पिवळ्या रंगाचे हे फळ सुंदर व स्वादिष्ट असते. ज्येष्ठ–आषाढात त्यांचा हंगाम असतो. अननसाची पाती कुजवून त्यांच्या रेशमासारख्या दोऱ्या वळतात. त्या तागाच्या दोऱ्यापेक्षा बळकट असून त्याची वस्त्रेही विणता येतात.

४८ (१७ : ३, १ फेब्रुएरी ५८, ४६)

ज्यानुआरीपासून बुद्धिवर्धक हे गुजराथी मासिक निघत आहे. दरवेळी त्यात ३२ पृष्ठे असतात. सालीना किंमत १॥ रुपया आहे.

४९ (१७ : ३, १ फेब्रुएरी ५८, ४७)

ग्रांट वैद्यपाठशाळेत विषबाधेचा प्रकार झाला. प्राध्यापकांच्या पिण्याच्या पाण्यात कोणीतरी दुष्टपणाने वनस्पतीचे विष टाकले. त्यामुळे एक प्राध्यापक व्याख्यान देतानाच ओकू लागले. याविषयी तपास चालू आहे. (वर्तमानदीपिकेवरून)

६० (१७ : ३, १ फेब्रुएरी ५८, ४७)
गायकवाड सरकारकरिता जहांगीर शापूरजी यांच्या दुकानात एक शिवणयंत्र आले आहे. एका दिवसात हे यंत्र २० आंगरखे व १०० पासोडे शिवून देऊ शकेल. हे यंत्र बडोद्यास पाठविण्यात येईल. (वृत्त).

६१ (१७ : ३, १ फेब्रुएरी ५८, ४७–४८)
युरोपियन फौजेस खाना देण्यास १५०० रुपये खर्च झाले. (धूमकेतूवरून)

६२ (१७ : ३, १ फेब्रुएरी ५८, ४७–४८)
वेहाड तलावाचे काम उपयोगी आहे यास्तव चालूच राहील. (वर्तमानदीपिकेवरून)

६३ (१७ : ३, १ फेब्रुएरी ५८, ४७–४८)
सर जमशेदजी जीजीभाईच्या कुटुंबीयांनी कलकत्ता बोटीस भेट दिली. (वर्तमानदीपिकेवरून)

६४ (१७ : ३, १ फेब्रुएरी ५८, ४७–४८)
आग्रा प्रेसिडेन्सीतील नाणेटंचाई कमी करण्यासाठी ५० लाख रुपये पाठविले जातील. (ज्ञानप्रकाशवरून)

६५ (१७ : ३, १ फेब्रुएरी ५८, ४७–४८)
पुण्यात एक तीन वर्षांची 'वधू' व ३० वर्षांचा वर यांचा विवाह साजरा झाला. (ज्ञानप्रकाशवरून)

६६ (१७ : ३, १ फेब्रुएरी ५८, ४७–४८)
सरकारी हुकूम मोडून दंगलग्रस्त विभागात बायकोमुलांस नेण्याबद्दल रिचर्डसन या साहेबास सस्पेंड करण्यात आले. (ज्ञानप्रकाशवरून)

५७ (१७ : ३, १ फेब्रुएरी ५८, ४७–४८)
खंडाळा ते पुणे रेल्वे सुरू होणार. (ज्ञानप्रकाशवरून)

५८ (१७ : ३, १ फेब्रुएरी ५८, ४७–४८)
सर हेन्री लारेन्सच्या स्मरणार्थ धर्मशाळा होणार आहे.
(ज्ञानप्रकाशवरून)

५९ (१७ : ३, १ फेब्रुएरी ५८, ४८)
दादोबा पांडुरंग यांच्या मराठी व्याकरणाची तिसरी आवृत्ती छापून झाली. पृष्ठे ३५२ आहेत.

६० (१७ : ३, १ फेब्रुएरी ५८, ४८)
असे म्हणतात की : हिंदुस्थानप्रमाणे जगात कोठेही कामगारांना पगार नाहीत. गव्हरनर जनरल यांना सालीना २५ हजार पौंड वेतन आहे. त्यांच्या कौन्सिलमधील सभासदास ९६०० पौंड, तर जड्जास ८३४७ पौंड मिळतात. सिविल आफिसरांना ५ हजारांपासून १५ हजारांपर्यंत वेतन मिळते. मुंबई व मद्रासच्या बिशप मंडळींना २५०० पौंड मिळतात.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिन्टर

## ज्ञानोदय, पुस्तक १७, अंक ४, मुंबई, १५ फेब्रुएरी १८५८

**६१** (१७ : ४, १५ फेब्रुएरी ५८, ४९–५१)

सरकारी शाळांत शूद्रांना मज्जाव आहे. विवेकी व ज्ञानी मिशनेऱ्यांच्या शाळेमध्ये मात्र त्यांना प्रवेश आहे. धारवाड शाळेत नुकताच एका शूद्रास प्रवेश नाकारण्यात आला. इतर मुलांच्या भीतीपोटी सरकार त्यांना शाळेत घेत नाही. विद्येच्या योगाने माणसांचे भले होते म्हणून त्यांनाही शिकावेसे वाटते. तेच जर मुसलमान झाले, तर त्यांना शाळेत घेतात व विहिरीवर पाणी भरू देतात. मुंबई सरकारप्रमाणेच बंगाल सरकारही शूद्रांना प्रवेश देत नाही. हा प्रवेश मुख्याध्यापकाच्या लहरीवर अवलंबून असतो. तरी सरकारने त्यांस प्रवेश देण्याचा निश्चित ठराव करावा. जातिभेदाची चाल मोडण्याचा हा उत्तम उपाय आहे. मुंबई सरकार तसा विचार करीत आहे.

**६१ अ** (इंम : ५१–५२)

**६२** (१७ : ४, १५ फेब्रुएरी ५८, ५२–५३)

लखनौमध्ये कोंडून ठेवलेल्या इंग्रज स्त्रियांना व मुलांना सोडवून कलकत्ता येथे नेण्यात आले. आगबोट कलकत्त्याजवळ आल्यावर या अमोलिक अशा जयाबद्दल तोफांची सरबत्ती झाली. डोळे फुटलेले व हात तुटलेले लोक बोटीतून उतरले, तेव्हा त्यांच्या चेहऱ्यावर आनंद दिसला. तांबड्या पायघड्यांवरून त्यांना सन्मानाने घरी पाठविले.

**६२ अ** (इंम : ५२)

**६३** (१७ : ४, १५ फेब्रुएरी ५८, ५३-५७) येसोबा-पुढे चालू

येसोबाजवळ उणेपण किंवा दुर्गुण काहीच नव्हते. तो अगदी शुद्ध भाषेमध्ये शुभवर्तमान सांगे. आपल्या वक्तृत्वाने धर्माचे खरेपण पटवून देई. साहेबास पाणी आणून येई. शेतात कामे करणाऱ्या स्त्रियांना मदत करी. खाण्यापिण्याची पर्वा न करता गावोगाव हिंडत असे. एकदा तर उपाशी महारांना त्याने जवळचे सर्व दाणे वाटून टाकले. मडमसाहेबाकडून कपडे मागून घेऊन सर्वांना देई. बावनकशी शुद्ध सोन्याप्रमाणे तो पवित्र होता. आजाऱ्याची चिळस न मानता तो शुश्रूषा करीत असे. तो निरभिमानी व नम्र असे. आजाराने म्लान झाल्यावरही तो पवित्र शास्त्र वाचीत असे. तो शांतपणे मृत्यूला सामोरा गेला. एका कामकरी सेवकास देवाने स्वतःकडे बोलावले.

**६३ अ** (इंम : ५७-५९)

**६४** (१७ : ४, १५ फेब्रुएरी ५८, ६०)

अयोध्येचा सरदार युसुफखान एका इंग्रज सेनापतीस म्हणाला की : इंग्रज लोक फार शूर आहेत. देवाच्या आच्छादणाऱ्या पंखांखाली सर्व इंग्रजांचे रक्षण झाले. चार लक्ष लोकांचा गराडा पडलेला असतानाही त्यांचा बचाव झाला.'शत्रूंनीही तारीफ करावी, असे त्यांचे शौर्य होते. सिंहापेक्षा अधिक हिंमत दाखवून ४०० लोकांनी अशा गर्दीस तोंड दिले. स्त्रियांनींही तोफा निकामी केल्या. फिरंगी लोकांचा हा विजय आश्चर्यकारक आहे. लखनौच्या बंडावर एक पवाडाही रचला गेला.

**६४ अ** (इंम : ५९-६०)

६५ (१७ : ४, १५ फेब्रुएरी ५८, ६०)

शेख हुसेन या फत्तेपूरच्या रहिवाशाने ख्रिस्ती धर्म स्वीकारला. चौदा वर्षांपूर्वी त्यास येशूची प्रथम माहिती झाली. गोगो येथील फलटणीमध्ये शिपाई म्हणून आल्यानंतर त्याने नवा करार वाचण्यास सुरवात केली. ख्रिस्ती धर्म हाच खरा आहे, अशी त्याची खात्री झाली.

६६ (१७ : ४, १५ फेब्रुएरी ५८, ६०–६१)

बेळगावचा फौजदार मूत् यास गावात बंड होऊन साहेबलोकांना ठार मारणार आहेत अशी बातमी कळली, तेव्हा त्याने आधीच सूचना देऊन साहेबांचा बचाव केला. सरकारने त्यास १०० रु. बक्षिस दिले. पण त्याच्या हुशारीच्या मानाने हे बक्षिस अगदी कमी आहे.

६७ (१७ : ४, १५ फेब्रुएरी ५८, ६१)

दामोदर रावजी हा त्र्यंबकेश्वराच्या देवळाचा पुजारी बंड करण्याच्या विचारात होता. त्यास दरसाल दोन हजारांची नेमणूक असून तो फितूर झाला म्हणून त्यास फाशी देण्यात आले. निदान सरकारी पगार घेणारांनी तरी इंग्रजांशी एकनिष्ठ असावे.

६८ (१७ : ४, १५ फेब्रुएरी ५८, ६१–६३)

अज्ञानी व मूढ लोक स्वतःच्या धर्मास उत्तम आणि परिपूर्ण समजतात. इतर धर्मांना निरुपयोगी व अशास्त्र मानतात. अकबर बादशहा मात्र अशा दुराभिमानापासून अगदी दूर होता. त्याची तीव्र बुद्धी कुराणपठणावर न थांबता इतर शास्त्रांचाही अभ्यास करण्यात प्रवीण होती. हिंदू मात्र आपले ज्ञान इतरांना देत नाहीत. अगर इतरांचे ज्ञान समजून घेत नाहीत. हे ओळखून अकबराने अबुल फजीलचा मुलगा फेजी यास वेषांतर करून ब्राम्हणांकडे पाठविले व १० वर्षे अभ्यास करण्यास लावले. पुढे फेजीने ब्राम्हणाजवळ आपला अपराध कबूल केला. त्या ब्राम्हणाने त्यास क्षमा केली. पण वेदांचे भाषांतर न करण्याची अट घातली. बादशहाचा उद्देश सफल झाला नाही. (ज्ञानप्रसारकवरून)

६९ (१७ : ४, १५ फेब्रुएरी ५८, ६३)

फ्रेंच व इंग्रज फौजांनी चीनमधील कांटन शहर जिंकले अशी बातमी आली आहे. इंग्रज कम्यांडरने चिनी रहिवाशांना उदार मनाने गावातून निघून जाऊ दिले. त्यामुळे फारशी प्राणहानी झाली नाही. (धूमकेतूवरून)

७० (१७ : ४, १५ फेब्रुएरी ५८, ६३-६४)

मुंबई इलाख्यात ८ दिवाणी कामाचे जिल्हे आहेत. ७३ मुनसफ आहेत. जड्जांना ५ हजार रुपयांपर्यंतच्या अपिलांचा फैसल्ला करण्याचा अधिकार आहे. मुंबई इलाख्याची एकंदर जमीन १ लाख ४० हजार ४०७ चौरस मैल आहे.

७१ (१७ : ४, १५ फेब्रुएरी ५८, ६४)

इटलीत नेपल्स येथील धरणीकंपात दोन हजार माणसे मेली. (वर्तमानदीपिकेवरून)

७२ (१७ : ४, १५ फेब्रुएरी ५८, ६४)

इंडियन विकली पोस्ट हे इंग्रजी वृत्तपत्र सुरू झाले.

७३ (१७ : ४, १५ फेब्रुएरी ५८, ६४)

अमेरिकन मिशनजवळच्या विहिरीत जीव देणाऱ्या एका स्त्रीस वाचवण्यात आले.

७४ (१७ : ४, १५ फेब्रुएरी ५८, ६४)

मोहनपुरी व आग्रा या शहरांमधील डाक पूर्ववत चालू झाली. (वर्तमानदीपिकेवरून)

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १७, अंक ५, मुंबई, १ मार्च १८५८

**७८** (१७ : ५, १ मार्च ५८, ६५–६६)

एक फिरस्ता लिहितो की : व्याजाचा दर कायद्याने निश्चित करणे जरूरीचे आहे. कर्जापायी लोक फकीर होत आहेत. एखाद्या रोगाप्रमाणे वंशपरंपरा कर्जरूपी व्याधी त्यांच्या मानगुटावर बसलेली आहे. त्यांची घरे तरी जप्त करू नयेत. लेकरांबाळांना देशोधडीस लावू नये. शेत व बैलजोडीही सुरक्षित राहील असा कायदा हवा आहे. प्रत्येकाचे श्रमाचे फळ आजतरी सावकाराच्या वशात जात आहे. मग पोटात काड्याकुट्या घालण्यावाचून दुसरा उपायच नाही. सावकार लोक नीतीचे किंवा माणुसकीचे बंधारण मानीत नाहीत. कायदा केला, तर ऋणमुक्त होण्याचा सुलभ उपाय सापडेल.

**७८ अ** (इंग : ६६–६७)

**७९** (१७ : ५, १ मार्च ५८, ६७–७०)

महमदी धर्माचा त्याग करणाराला तुर्कस्थानात शिरच्छेदाची शिक्षा दिली जात असे. परंतु रशियन परचक्राच्या काळात इंग्रज-फ्रेंचांनी तुर्की सुलतानास मदत केली म्हणून तुर्की सरकारने कायदा बदलला. आता धर्माच्या कारणास्तव कोणासही मरणदंडाची शिक्षा होणार नाही. एक मुसलमान जोडपे ख्रिस्ती झाले, तेव्हा त्यांपैकी स्त्रीच्या आईने तक्रार केली, तेव्हा सुलतानाने चौकशी केली. पण मनाचा पूर्ण निश्चय होऊनच धर्मान्तर झाल्यामुळे तक्रार फेटाळली गेली. एक मुसलमान तर ख्रिस्ती पालक झाला आहे. तुर्की कायद्याच्या जोडीस नवीन ठरावाचा विचार करून आता निवाडे दिले जातात. आपल्याजवळ भुतांचे सामर्थ्य असून ख्रिस्ती उपदेशकांना आपण पळवून लावू असे म्हणणाऱ्या काझीचीही फार फजिती झाली. लोक मनापासून ख्रिस्ती उपदेशकाची व्याख्याने ऐकतात.

७६ अ (इंग : ७०–७२)

७७ (१७ : ५, १ मार्च ५८, ७२–७३)

दादाभाई डोसाभाई याने ख्रिस्ती धर्म स्वीकारला म्हणून त्याचे जातभाई त्याचा छळ करू लागले. तो कचेरीत जाण्याला निघाला तेव्हा त्यास धोंडमार झाली. दादाभाई याने माजिस्त्रेत क्राफर्ड यांच्यासमोर अतिशय क्षमाशीलतेची वर्तणूक केली. त्याच्या सहनशीलतेने साहेब फार प्रभावित झाला. त्याच्या संयमशील वागणुकीची फार प्रशंसा झाली. गुन्हेगारांची कानउघाडणी करून साहेब म्हणाला की, असले दांडगाईचे वर्तन करीत जाऊ नका. त्यांना २० रुपये दंड झाला. धर्मावरून कोणाचाही छळ करणे हे गैरशिस्त आहे. सर्व पारशांनी जमशेदजीप्रमाणे उदारमतवादी व्हावे.

७८ (१७ : ५, १ मार्च ५८, ७३–७८)

अलाहाबाद मिशनाचे उपदेशक रे. गोपीनाथ नंदी फत्तेपुरास उपदेशक म्हणून काम करीत होते. तिथला कलेक्टर खान ख्रिस्ती धर्माचा द्वेष करी. एकदा तर त्याने गायीची व डुकराची हाडे विहिरीत टाकून ख्रिस्त्यांवर आळ घेतला. मीरत येथे बंड झाल्यानंतर गोपीनाथजी मडमांसह सुरक्षित ठिकाणी जाण्यास निघाले. रस्त्याने बंडवाल्यांनी त्यांना फार छळले. पाणीही मिळाले नाही. त्यांच्या बरोबरच्या लेकरास ६ दिवस दूधदेखील मिळाले नाही. एका गृहस्थाने राहण्यास जागा दिली. पण त्यांना ठार मारण्याचा प्रयत्न केला. एके मौलवीने मुस्लीम धर्म स्वीकारण्याविषयी जबरदस्ती केली. गावोगावची प्रार्थनामंदिरे बंडखोर शिपाई जाळून टाकीत होते. अशा संकटातही गोपीनाथजींनी जखमी चौकसाहेबाची काळजी घेतली. नंतर मेजर ब्रायरची फौज आली व तिने सर्वांना सुरक्षित जागी नेले. चौक मृत्यू पावला. गोपीनाथजी प्राणसंकटातून वाचले.
(कलकत्ता ख्रिश्चन ऑबजर्व्हर, जान्युअरी यावरून)

७९ (१७ : ५, १ मार्च ५८, ७८–७९)

इंग्रज फौजेने जिंकलेले चीनमधील क्यांटन शहर बेटासारखे आहे. त्याची लोकवस्ती वीस लक्ष आहे. सभोवती ४० फुटांची तटबंदी आहे. इंग्रज-फ्रेंचांची पाच हजार सेना गोळा झाली व तिने एका दिवसात हे शहर जिंकले. बंडखोरांनी जागोजाग आगी लावून शहराचा फार नाश केला. चीनचा राजा तहास तयार आहे. (ज्ञानप्रकाशवरून)

८० (१७ : ५, १ मार्च ५८, ७९)

मुंबईचे पोलीस-कमिशनर क्राफर्ड कळवितात की : मुंबई टापूमधून तरवारी, बंदुका, बंदुकीची दारू, शिसे, तांब्याचे फटाके दुसऱ्या प्रांतामध्ये नेण्यास बंदी करण्यात येत आहे. जो कोणी या वस्तू नेईल अथवा नेण्यास दुसऱ्यांना प्रोत्साहन देईल त्यास ५०० रु. दंड होईल व त्या वस्तू जप्त केल्या जातील. (वर्तमानदीपिकेवरून)

८१ (१७ : ५, १ मार्च ५८, ७९–८०)

बिठूर या ठिकाणच्या एका विहिरीतून इंग्रज सैनिकांनी ३८ शेर सोने आणि १२६ शेर रुपे शोधून काढले. ते नानासाहेबाने लपवून ठेवले होते. आणखी २ विहिरींतून बाजीरावाचे जडजवाहीर निघेल, असा अंदाज आहे. हे वर्तमान कळल्यावर नानाने अक्षरशः ऊर बडवून घेतले. नेटिव संस्थानिक त्याला आपल्या प्रदेशातून जाऊ देत नाहीत. म्हणून तो हात चोळीत बसला आहे. मिनपुरीच्या बंडखोर तेजसिंगाचे १ लाख १० हजार रुपयेही जप्त झाले. बांद्याच्या दिवाणाकडून २५ लाख ५५ हजारांच्या नोटा जप्त केल्या कारण ते बंडखोरांना सामील होते.

८२ (१७ : ५, १ मार्च ५८, ८०)

दिल्लीचा राजा गंभीर आजारी आहे. अजून त्याचा इन्साफ व्हावयाचा आहे.

८३ (१७ : ५, १ मार्च ५८, ८०)
पुण्याचा मोलवी नूर उल्ला यास काळ्या पाण्याची ठेप झाली.

८४ (१७ : ५, १ मार्च ५८, ८०)
मद्रासमधील रयतेस हत्यारबंदीचा कायदा लागू होणार. (ज्ञानप्रकाशवरून)

८५ (१७ : ५, १ मार्च ५८, ८०)
चीन व कलकत्याहून ४० लक्ष ९७ हजारानी चांदी आयात झाली. (ज्ञानप्रकाशवरून)

८६ (१७ : ५, १ मार्च ५८, ८०)
पार्लमेंटचे सभासद लेयर्ड हैदराबाद पाहून अजंठा-वेरूळास भेट देऊन इंदूरकडे रवाना झाले. (ज्ञानप्रकाशवरून)

८७ (१७ : ५, १ मार्च ५८, ८०)
कोर्ट आव डरेक्टर्स बंडाच्या कारणांचा शोध करण्यासाठी ३ कमिशनर नेमणार आहेत. (ज्ञानप्रकाशवरून)

८८ (१७ : ५, १ मार्च ५८, ८०)
३२ हजारांचा हिरा एका व्यापाऱ्याकडे ठेव म्हणून ठेवला होता त्याची किंमत वाढल्याने कोर्टात खटला दाखल झाला आहे. (ज्ञानप्रकाशवरून)

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १७, अंक ६, मुंबई, १५ मार्च १८५८

**८९** (१७ : ६, १५ मार्च ५८, ८१–८४)

'ब्यॉंकृत आक्ट' करण्याची कारणे 'एक फरिस्ता' देतो आहे. गरिबांकडून भागरूप भांडवल गोळा करून दिवाळे काढणाऱ्या कंपन्यांपासून लोकांची बुडवणूक होणार नाही; सावकाराच्या जबर व्याजातून कुळाची सुटका होईल. व्याज तुंबले की सावकार नवनवीन रोखे करतात. त्यातून मूळ रक्कम कळत नाही. सावकाराच्या फासात गरीबांचा गळा गुंतत जातो. इंग्रज सरकार या वागवणुकीस अनुकूल होते. प्रारब्धास दोष देऊन लोक सावकार व सरकार या दोघांना शिव्याशाप देतात. यातून नीती बिघडते. ऋणजन्य अनर्थ वाढल्यामुळेच रयत कुभांडे व बंड यांत निमग्न झाली. प्रजेची खराबी थांबविण्यासाठी तिच्या पाठीवरचे हे ओझे उतरविले पाहिजे. अज्ञानी लोक दासपणात राहातात. म्हणून ज्ञान व खरा धर्म यांचा प्रसार व्हावा. खाण्यावाचून मरणारांना जगविण्यासाठी हा कायदा आवश्यक ठरतो.

**८९ अ** (इंग्र : ८४–८५)

**९०** (१७ : ६, १५ मार्च ५८, ८६)

बंडाचा वणवा विझल्यानंतर चोटा नागपूरच्या जुलमी जमीनदारांनी खिस्ती लोकांचा फार छळ केला. मालमत्ता तर गेलीच, पण जीव वाचविण्यासाठी अरण्यात लपावे लागले. तिघांना तर दुर्गादेवीपुढे बळी देण्यासाठी ठेवले. इंग्रज लष्कराने त्यांची सुटका केली. त्यांची सहनशीलता व धैर्य पाहून नवीन १४० जणांनी खिस्ती धर्माची दीक्षा घेतली आहे. ईश्वराने आपल्या गौरवासाठी त्यांना निवडून घेतले आहे.

**९० अ** (इंग्र : ८६)

९१ (१७ : ६, १५ मार्च ५८, ८६–९०)

दिल्लीच्या माजी राजाची चौकशी २७–१–५८ ला सुरू झाली. राजा अत्यंत अशक्त झाला आहे. तक्याशिवाय त्यास बसता येत नाही. आरोप वाचल्यावर तो क्षीणपणे हसला. रोहटक येथे जाहीरनामा काढून त्याने बंड पुकारले. आपल्या नावाची द्वाहीसुद्धा फिरविली. आपले सरदार गोळा करून त्यांना इंग्रजाविरूद्ध फितविले. एका स्वप्नाचा दृष्टांत देऊन इराणच्या फौजेस बोलावले. चपात्या वाटण्यास उत्तेजन दिले. रशियन फौजा येणार अशीही वंदता पसरविली. अनेक इंग्रजांना, मडमांना व मुलांना ठार मारले. चांदीच्या राजसिंहासनावरती बसून फिरंग्यांना हाकलून देण्याचा हुकूम सोडला. बंडाच्या काळात एकही गाय कापली नाही व हिंदू प्रजेची सहानुभूती मिळविली. यावरून तो कटवाला आहे हे सिद्ध झाले.

९२ (१७ : ६, १५ मार्च ५८, ९०–९२)

वलायत अली हा आग्रा येथील एका सभ्य कुटुंबात जन्मला. मक्केची यात्रा त्याने दोनदा केली. पण तो धर्मातील अनीती व निर्दयपणा यांवर टीका करीत असे. म्हणून बंडाच्या धामधुमीत त्याचा खून करण्यात आला. कर्नल व्हीलरच्या सहवासात तो पवित्र शास्त्र वाचू लागला. २० वर्षांपूर्वी त्याने बाप्तिस्मा घेतला. त्याच्या दुष्ट नातलगांनी त्यास विष देऊन मारण्याचा प्रयत्न केला. पण असल्या गोष्टींना त्याने दाद दिली नाही. अलीची नेमणूक नेटिव उपदेशक म्हणून झाली. चांदणी चौकात उभा राहून तो प्रकटपणे शुभवर्तमान सांगे. वलायतला जेव्हा दुष्टांनी तरवारीने मारले, तेव्हा सिलास हा तेथेच होता. आपल्या रक्ताचे शिंपण करून अलीने मंडळीचे बीज पेरले आहे.

९३ (१७ : ६, १५ मार्च ५८, ९२)

बंडाच्या विपत्तीत सापडून ज्यांचे नुकसान झाले, त्यांच्या दुःखपरिहारार्थ एक निधी जमविला जात आहे. तुर्कस्थानचा सुलतान आणि इराणचा बादशहा यांनी प्रत्येकी दहा हजार रुपये दिले. यावरून लक्षात येते की, बंडवाल्या शिपायांच्या अघोर कृत्याचा त्यांना तिरस्कार वाटतो.

९४ (१७ : ६, १५ मार्च ५८, ९२–९३)

'एक मित्र' आपल्या पत्रात २४ प्रश्न विचारतो. त्यापैकी महत्त्वाचे प्रश्न असे आहेत : सत्याची आवड असताना असत्याचा आश्रय का करता? हे ढोंग नव्हे काय? मूर्तिपूजेने ईश्वराचा सन्मान होतो काय? स्वतः पाप करून इतरांना नीतीचा उपदेश करणे योग्य आहे का? तुम्ही विवेकाप्रमाणे का चालत नाही? मूर्तीची पूजा हा बाहुल्यांचा खेळ नाही काय? मरणानंतर चिरकालिक सुख भोगावे, असे तुम्हांस वाटत नाही काय?

९५ (१७ : ६, १५ मार्च ५८, ९३–९४)

नेटिवांना सुख व्हावे म्हणून वाफेच्या गाड्या धावतात, हे एक परोपकाराचे कृत्य आहे. पण प्रवाशांना मात्र इजा भोगावी लागते. स्त्रियांना तर फारच त्रास होतो. एकाच गाडीत बायका-पुरुष मेंढरांप्रमाणे कोंबतात. कंपनीने चांगला बंदोबस्त ठेवावा. (वर्तमानदीपिकेवरून)

९६ (१७ : ६, १५ मार्च ५८, ९४)

साताऱ्च्या काशीकर महाराजांना द. म. २५०० रु. पेन्शन मिळत असे. ते सरकारी हुकमाने बंद झाले. ते पदरच्या लोकांना रजा देणार आहेत. (वर्तमानपदीपिकेवरून)

९७ (१७ : ६, १५ मार्च ५८, ९४)

विलायतेत ग्रेट ईस्टर्न नावाची आगबोट तयार झाली. ती इतकी प्रचंड आहे की, लांबी २६५ फूट व रुंदी ५१॥ फूट आहे. तिचा वेग अकरा हजार पाचशे घोड्यांच्या शक्तीएवढा आहे. बोटीत १२०० लोक राहू शकतात. ताशी वेग वीस मैलांचा आहे. बोटीवर इशाऱ्यासाठी तुतारी व बातमीकरिता तारायंत्र ही ठेवली आहेत. उजेडाची तजवीज आहे. (ज्ञानप्रकाशवरून)

९८ (१७ : ६, १५ मार्च ५८, ९४)

बडोद्याचा माजी दिवाण भाऊ तांबेकर लुच्चेगिरीमुळे बरतर्फ झाला होता. मग तो नानासाहेबाच्या आश्रयास गेला. नानाही मोठाच कुलदीपक निघाला! भाऊ इतका कपटी की नानास पकडून दिल्याने इंग्रजाकडून पन्नास हजारांचे बक्षिस मिळेल म्हणून लोभाने मोहित होऊन नानाविरुद्ध डाव रचू लागला. तेव्हा नानाने त्यास व त्याच्या ५ कुटुंबीयांना फासावर चढविले!

९९ (१७ : ६, १५ मार्च ५८, ९५)

दिल्लीच्या राजाचा चिटणीस मुकुंदलाल सगळी कारस्थाने इंग्रजांना सांगणार आहे.

१०० (१७ : ६, १५ मार्च ५८, ९५)

बंडाच्या संशयावरून धारचे संस्थान खालसा झाले.

१०१ (१७ : ६, १५ मार्च ५८, ९५)

साताऱ्याच्या सेनापतीजवळ सापडलेल्या पत्रात 'नाना नर्मदा ओलांडून येणार व पेशवाईची पुन्हा स्थापना करणार,' असा मजकूर आढळला. साताऱ्यातील कित्येक बडी बडी धेंडे आता कैदेत आहेत.

१०२ (१७ : ६, १५ मार्च ५८, ९५)

मुंबई राज्यातील काळ्या पलटणीमधील शिपायांची बंडाच्या वेळी लोकांची भावना कशी होती याचा रिपोर्ट करावा असा हुकूम कमांडर इन चीफने काढला.

१०३ (१७ : ६, १५ मार्च ५८, ९५)

अलाहाबाद व कानपूर येथीलप्रमाणे फत्तेगड व मिनपुरीस शूद्रांच्या पलटणी तयार कराव्या.

१०४ (१७ : ६, १५ मार्च ५८, ९५)

नगर जिल्ह्यात चांदवडच्या डोंगरात लपलेल्या भिल्लांना व शिपायांना पकडण्यात आले.

१०५ (१७ : ६, १५ मार्च ५८, ९५)

काशीच्या तुरुंगांत दंगल झाल्यामुळे इंग्रजांनी गोळीबार केला. १२ बंदिवान मेले, तर १३ जणांना फाशी दिल्हे.

१०६ (१७ : ६, १५ मार्च ५८, ९५)

बंडकाळात उत्तम कामगिरी केल्याबद्दल मुत्तु कुमारैया यांना पुण्यास दिस्त्रिक्त माजिस्त्रेत नेमले आहे.

१०७ (१७ : ६, १५ मार्च ५८, ९६)

दोन मार्चला एक वाघ समुद्राकडून माजगावात शिरला. समुद्रकाठावरील नावेवर चढला. लोकांनी गोळ्या घालून त्यास ठार केले. त्याचे वजन १७६।। शेर व लांबी ६ हात होती. अशी चमत्कारिक शिकार गेल्या १०–१५ वर्षांत झाली नव्हती.

१०८ (१७ : ६, १५ मार्च ५८, ९६)

अयोध्येचा राजा हुसेन अली खाबाने ३५ हजार बंडखोर जमा केले. पण जनरल फ्रयांकसाहेबाच्या फौजेने हल्ला करून १८०० सैनिक मारले. तोफा हस्तगत केल्या व दारुगोळाही हस्तगत केला.

१०९ (१७ : ६, १५ मार्च ५८, ९६)

बंडात भाग घेतल्याबद्दल भडोचच्या मौलवीस सेशन कोर्टाने दहा वर्ष काळ्या पाण्याची शिक्षा दिली होती, ती मुंबई कोर्टाने कायम केली.

११० (१७ : ६, १५ मार्च ५८, ९६)

संस्थान बडगांव पेटा मायणी तालुका खानापूर येथील कृष्णाजी बुवा गोसावी यांना शस्त्रांचा साठा केल्याबद्दल सहाशे रुपये दंड झाला व सहा महिने कैदेची शिक्षा झाली.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १७, अंक ७, मुंबई, १ एप्रेल १८५८

१११ (१७ : ७, १ एप्रेल ५८, ९७–९८)

पुस्तक मंडळीच्या सभेत असा ठराव झाला की, धर्मसंबंधी पुस्तकांची भाषांतरे करून घ्यावीत व छापावीत. गेल्या वर्षी १० पुस्तके प्रकाशित झाली. उत्तमोत्तम प्रकारच्या पुस्तकांचा प्रसार करण्यासाठी अधिक पैसा हवा आहे. गेल्या वर्षी ३ हजार रुपये जमले. पैसा कमी असूनही पुस्तकांच्या किंमती कमी ठेवलेल्या आहेत.

मागील साली (१८५७) जी पुस्तके मराठीत नवीनच झाली ती येणेप्रमाणे–

१) पाप कसे आहे व त्याचे परिणाम काय?

२) ईश्वर दयाळू असता मनुष्यास दुःखे का लागतात?

३) मात्थीच्या शुभवर्तमानावर टीका.
४) ख्रिस्ती धर्माचा प्रसार होण्याविषयींच्या भविष्यवचनांची पूर्णता.

भाषांतरित पुस्तके :

५) ख्रिस्तीधर्म ईश्वरस्थापित आहे याविषयी संवाद.
६) हिंदू शास्त्रातील पदार्थविज्ञानसंबंधी चुका.
७) खगोल विद्या हे पुस्तक पहिल्याने अहृदनगर मिशनातील एका साहेबाने केले. त्याची दुसरी आवृत्ति या मंडळीने छापिली.
८) खरा आश्रय
९) मतपरीक्षा भाग २ रा

मागील सालात (१८५७) सरासरी ५० पृष्ठांचे एक अशी ३० पुस्तके छापिली.

## १११ अ (इंम : ९८)

## ११२ (१७ : ७, १ एप्रेल ५८, ९८–१०१)

'नगरचे पालक' लिहितात की : अहमदनगर जिल्ह्यातील देडगांव येथील उपदेश ऐकण्यास ७० माणसे जमली होती. दोन स्त्रिया असणाऱ्या एका ख्रिस्ती माणसास मंडळीने प्रवेश नाकारला. अहमदनगर जिल्ह्यातील चांद्याच्या मंडळीत २० लोक जमत असतात. देडगावात पृथक मंडळी स्थापना करावी, असा विचार करून रे. फेरब्यांक यांनी कारभाऱ्यांची नेमणूक केली. नेवासा गावात १८५२ पासून मिशनाची शाळा चालू आहे. धर्मप्रसाराचे चांगले फळ या भागात दिसते आहे. नेवासे तालुक्यात ८ शाळा चालतात. आणखी बहुत लोक या मंडळाकडे येतील याची खात्री वाटते.

## ११२ अ (इंम : १०१–१०२)

११३ (१७ : ७, १ एप्रेल ५८, १०२–१०३)

मुंबई गार्डियन पत्रात अशी बातमी आली आहे की : नगर जिल्ह्यात पारनेर येथील डोंगरात एक महादेवाचे देऊळ आहे. तेथे काही बीभत्स प्रकार चालतात. तेथे एक स्त्री–महाराज आहे. ती नग्न राहून अंगाला भस्म फासते. देवळामध्ये विड्या ओढीत बसते. लोक भाविकपणे तिच्या पाया पडतात. खंडोबाला वाहिलेल्या मुरळ्या हे तर भ्रष्टाचाराचे उगमस्थान आहे. नेवाशाजवळच्या भेंडीगावी एक नंगाबुवा राहात असे. भाविक स्त्रिया त्याच्या पाया पडत. तो पाऊस बंद करू शकतो, अशी लोकांची समजूत होती. पण असले प्रकार एक दिवसही चालू देऊ नयेत. ज्या संतांनी इंद्रियदमन करावयाचे, तेच यथेच्छ विषयसुख अनुभवून लोकांना पीडा देत आहेत.

११४ (१७ : ७, १ एप्रेल ५८, १०३–१०७)

जर्मनीतील बर्लिन शहरात गोसनेर हा वयोवृद्ध गृहस्थ धर्मप्रसारास मदत करतो. चोटा नागपूरचे जर्मन मिशन त्याच्या प्रेरणेने स्थापन झाले. १८५६ मध्ये या गावात शेकडो खिस्ती लोक सभेसाठी आले होते. पण मध्य प्रदेशातील लोभी जमिनदार तात्पुरत्या राहण्याबद्दलही पैसे घेतात. सभा संपल्यानंतर त्यांनी गजप केला की, खिस्ती लोकांनी धान्य पळविले. म्हणून कित्येकांची घरे लुटली, जाळली. वृद्धांना निष्कारण कैदेत ठेवले. स्त्रियांची अबरू घेतली. जमीनदार ब्राह्मण असल्यामुळे न्यायाधीश त्यांना निर्दोष सोडून देतात, किंवा अगदी अल्प दंड करतात. गतवर्षी बंडखोर शिपायांनीही खिस्तीजनांची घरे जाळली. त्यांचे सर्व गेले. अंगावर पुरता कपडाही नाही. तरी याही पाठलागामधून खिस्ती लोक प्रभूच्या कृपेने सुरक्षित राहातील, याची खात्री वाटते.

**११५** (१७ : ७, १ एप्रिल ५८, १०७–१०८)

अयोध्येची राणी पॅरिस येथे मृत्यु पावली. तेव्हा प्रेतामध्ये मसाला भरून तिला भरजरी वस्त्रे लेववण्यात आली. महमदी उपाध्यायांनी आपल्या पुस्तकातून मंत्र वाचले. मोठ्या मिरवणुकीने अंत्ययात्रा कबरस्थानाकडे गेली. राणीचा पुत्र हसमत बहादूर रत्नजडित मुकुट घालून अग्रभागी चालत होता. सर्वजण फार दुःखी झाले.

**११६** (१७ : ७, १ एप्रिल ५८, १०८)

जालंदरच्या दोन शिक्षकांनी रे. गोलकनाथाकडून बाप्तिस्मा घेतला.

**११७** (१७ : ७, १ एप्रिल ५८, १०८)

अलिकडे मादागास्करमध्ये ख्रिस्ती लोकांचा फार छळ होत आहे. ८ जणांना विषप्रयोगाने मारण्यात आले. ६० जणांना हातापायात बेड्या घालून कैदेत ठेवण्यात आले. अनेक ख्रिस्ती लोकांना गुलाम करून त्यांची विक्री करण्यात आली. शेकडो लोक कैद भोगीत असल्यामुळे सविस्तर बातमी समजत नाही.

**११८** (१७ : ७, १ एप्रिल ५८, १०८)

पंजाबी या वृत्तपत्रावरून कळते की, गतवर्षी पुष्कळ ख्रिस्ती लोकांचा संहार झाला. असले संकट पूर्वी कधी आले नव्हते. नेटिव ख्रिस्त्यांची सर्रास कत्तल करण्याच्या धमक्या दिल्या जात आहेत. पण त्यांचे रक्त सांडले, तरी ते नवीन लोक ख्रिस्ती होण्याचे बी समजावे लागेल. एकजण मारला गेला, तर शंभर नवे लोक येतील.

**११९** (१७ : ७, १ एप्रिल ५८, १०८–१११)

आयुष्य हे वाफेसमान आहे, असे शास्त्र सांगते. पण मृत्यूची जाणीव लोकात दिसत नाही. एखादा प्रिय नातलग मृत्यु पावला, तर ते आकांत आणि आक्रोश करीत बसतात. एक दिवस हे जग सोडून जावे लागेल व कृतकर्मांचा झाडा द्यावा लागेल, म्हणून देवाकडे फिरावे, हे त्यांच्या मनासही येत नाही. पुराणश्रवण, जपतप, तीर्थयात्रा, यांसारखे शुष्क उपाय ते करतात. परंतु ईश्वरप्राप्तीचा नक्की मार्ग त्यांस ठाऊक नसतो. असल्या अज्ञानी लोकांपासून एखाद्या बोकेसंन्याशाचा मात्र फायदा होतो. भक्तीचे रहस्य आपणांस कळले व अकटोपासून विकटोपर्यंत आपणांस ज्ञान झाले, अशी त्यांची समजूत असते. मरणोत्तर स्थितीचा तर्कशुद्ध असा विचार त्यांच्याजवळ नसतो. परमेश्वराचे भय हा ज्ञानाचा आरंभ आहे. ईश्वर न्यायी असला, तरी पापद्वेष्टा असतो. हतभाग्य मनुष्य पापात मग्न राहून ईश्वरी कृपेस मुकतो. पाप कबूल करून त्याला शरण जाणे, हा पुनर्जन्म होय. ईश्वराच्या आज्ञेचा अवमान करू नये. खऱ्या मनाने ईश्वरास पतकरावे, हाच योग्य मार्ग होय.

**१२०** (१७ : ७, १ एप्रिल ५८, १११–११२)

एक राजा अरण्यात हिंडत असताना त्याला फार तहान लागली. तेव्हा समोरच दोन मुले पाहून राजाने त्यांना पाणी देण्यास फर्माविले. मुलांनी पाणी दिले, तेव्हा राजा खूष झाला. 'तुमच्या इच्छेप्रमाणे बक्षिस मागा' असे म्हणाला. तेव्हा एका मुलाने म्हैस मागितली, तर दुसऱ्याने अक्कल मागितली. एका मुलास म्हैस मिळाली, पण ती दोनच वर्षांनी मरून गेली. अक्कल मागणारा राजाश्रयावर शहाणा व विद्वान झाला. राजा त्याच्या विद्वत्तेवर खूष झाला व राजाने त्याला दोन गावे इनाम दिली.

**१२१** (१७ : ७, १ एप्रिल ५८, ११२)

११ एप्रिल १८५८ रोजी हैलँडर पलटणींनी लखनौच्या राजमहालाचा विध्वंस केला. घनघोर लढाई होऊन उभयपक्षाचे अनेक सैनिक मेले. गुरखा सैन्याने इंग्रजांना चांगली मदत केली. जनरल औटराम केसरबागेतून पुढे जाऊन बंडखोरांचा पूर्ण बीमोड करीत आहे. (वर्तमानदीपिकेवरून)

**१२२** (१७ : ७, १ एप्रिल ५८, ११२)

पुणे आब्झरवरची बातमी आहे की, तुळशीबागेचे इनामगाव जप्त होणार. (धूमकेतूवरून)

**१२३** (१७ : ७, १ एप्रिल ५८, ११२)

ज्या शाळेवर बंडखोरांनी जाहीरनामा लावला, ती शाळा सरकार बंद करील. (धूमकेतूवरून)

**१२४** (१७ : ७, १ एप्रिल ५८, ११२)

१ मे १८५७ पासून बेपत्ता असलेल्या सैनिकांना जन्मठेपेची शिक्षा होईल. (ज्ञानप्रकाशवरून)

**१२५** (१७ : ७, १ एप्रिल ५८, ११२)

सर हेन्री लारेन्स यांनी शाळा काढण्यासाठी भांडवल जमविले आहे. (वर्तमानदीपिकेवरून)

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १७, अंक ८, मुंबई, १५ एप्रेल १८५८

**१२६** (१७ : ८, १५ एप्रेल ५८, ११३–११५)

चरबी लावलेली कार्तुसे व सक्तीने ख्रिस्ती धर्मप्रसाराबाबतच्या अफवा यांतून उत्तर हिंदुस्थानात बंड झाले. इराणच्या व इंग्लंडच्या लढाईत इराणचा जय होईल व नंतर इंग्रजांना हिंदुस्थानातून हाकलून देणे सोपे जाईल, असे समजून दिल्लीच्या बादशहाने बंडाची तयारी केली. हिंदू प्रजेस अनेक प्रलोभने दाखविली. हिंदू शिपाई या कृत्रिमी व कावेबाज घोषणांना फसले. जे हिंदू मदत करणार नाहीत, त्यांना जबरीने गाईचे मांस खाण्यास लावण्याच्या धमक्याही देण्यात आल्या. दुसरे असे की या देशात जबरदस्तीने ख्रिस्ती धर्माचा प्रसार कधीही झालेला नाही. १० मे रोजी मीरतच्या छावणीत प्रथम बंड झाले. गावोगावचे शिपाई दिल्लीत येऊन बसले. इंग्रजांचा पराभव व्हावा, म्हणून प्रत्येक मशिदीत प्रार्थना होत होत्या. कैक मौलव्यांनी आपल्या चेल्यांस पत्रे पाठविली. परंतु ईश्वर इंग्रजांच्या बाजूस होता, म्हणून इंग्रजांचा जय झाला. बादशहाचे सगळे कुटुंब फासावर गेले. जे प्रभू येशूवर विश्वास ठेवतात, त्यांचा नेहमी जय होतो.

**१२६ अ** (इंग : ११५–११६)

**१२७** (१७ : ८, १५ एप्रेल ५८, ११६–१२०)

दिल्लीच्या राजाचे चौकशीत कप्तान मार्टिनाने माहिती दिली की : कार्तुसांना चरबी कधीच लावलेली नव्हती, तर तूप व मोहोळाचे मेण लावीत असत. दिल्लीकरांची प्रामाणिक समजूत अशी होती की, इराणी फौजा येऊन सगळ्या युरोपियनांची कत्तल करतील. महमद सादिक याने बादशहाचा जाहीरनामा प्रथम लावला. बहादुरशहा तक्ताधिपती झाला असे त्यात प्रकट केले होते. आपणांस मदत करणारांना बादशहा सोने वाटणार होता. इंग्रज मिशनरी लोकांना ख्रिस्ती बनवतात. हाडांचे चूर्ण पिठात टाकतात. अशा बातम्या उठविण्यात आल्या. यातच दातांनी काडतुसे तोडण्याच्या हुकुमाची भर पडली. हिंदूंनी तुळसी–शालिग्रामाची, तर मुसलमानांनी कुराणाची शपथ घेऊन बंडाची तयारी केली. बादशहाने व हिंदू राजांनी दरबार भरवून करभार घेण्यास सुरुवात केली. युरोपियनांची निर्दयपणे कत्तल सुरू झाली. गावोगाव अधिकाऱ्यांच्या नेमणुका झाल्या. इंग्रजांचे खजिने जप्त झाले. ठिकठिकाणचे बंडवाले आपल्या प्रगतीच्या बातम्या दिल्लीकडे पाठवित होते. साहेबलोकांना मारल्यावर मिठाई वाटली जात असे. तरीही आपणांस मदत करणारांना बंडवाल्यांनी वाईट वागणूक दिल्याबद्दलचीही पत्रे मिळाली आहेत. बादशहाची चौकसी पुढे चालूच राहील.

**१२८** (१७ : ८, १५ एप्रेल ५८, १२०–१२१)

लखनौ येथे बंडखोरांच्या ताब्यात सापडलेल्या मडमांची सुटका झाली. त्या आता इंग्रजांच्या छावणीत सुरक्षित आहेत. अत्यंत आजारी व कृश अवस्थेत आहेत. या भयानक संकटात नवा करार वाचणे एवढाच त्यांचा विरंगुळा आहे. धार्मिकास पिडणारांचा सर्वथा नाश होतो, या देवाच्या वचनावर भरवसा ठेवून आहेत. अत्याचारातून बचावल्यामुळे देवाच्या संजीवक शब्दावर त्यांचा विश्वास वाढला. अखेरीस संकटसमयी शास्त्रांतील वचनांचा आधार लाभतो.

**१२९** (१७ : ८, १५ एप्रेल ५८, १२२–१२४)

'एक फिरस्ता' लिहितो की : आपले सुख व उत्कर्ष आपल्याच गुणस्वभावावर आणखी प्रयत्नावर अवलंबून असतात. एकटे सरकार तुमचे दुःख दूर करू शकणार नाही. राजा व प्रजा या दोघांनी प्रयत्न केले पाहिजेत. पृथ्वीवरील सर्वांत न्यायी व सुधारलेले सरकार म्हणजे इंग्रजांचे आहे, पण लोकांच्या गैरसमजुतीमुळे सुधारणा अडून राहातात. अज्ञानाच्या व कांक्षेच्या शृंखला काढायला लोकच तयार नाहीत. विधिलिखित, प्राक्तनभोग, अशा कल्पनांत ते गुंतून पडतात. पण इच्छा असली की, मार्ग दिसतो. स्वतः प्रयत्न केले, तर देव सहाय्य करतो. नशिबापुढे उपाय नाही, असे म्हणणे चूक आहे. तुम्हीच तुमच्या नशिबाचे कारागीर व्हा. वडिलोपार्जित रूढीविरुद्ध काहीच करू नये, अशी समजूत येथे पडली आहे. जुन्या चालीवर टीका झाली की, धर्म बुडाल्याची हाकाटी ऐकू येते. खोट्या चाली सोडून लोकोपयोगी कामे करावीत, म्हणजे हिंदुस्थान देश सुधारक राष्ट्रांच्या प्रभावळीत मोठ्या दिमाखाने चमकेल.

**१२९ अ** (इंग : १२१–१२२)

**१३०** (१७ : ८, १५ एप्रेल ५८, १२४–१२६)

'वांबोरीचा पंतोजी' लिहितो की : अहमदनगर जिल्ह्यातील विळदला म्हसोबाची यात्रा भरते. यावेळी तमाशा होतो. तो पाहण्यास स्त्रियाही येतात. अचकट विचकट गाणी ऐकताना हसतात. तमाशा पाहण्याऐवजी कीर्तने ऐका, अशी विनंती केल्यावर मारामारी सुरू झाली. एका माणसाचे डोके फुटले. सरकारी कामदाराने तंटा मिटविला. ब्राह्मणीच्या बरोली देवीच्या यात्रेत बकरे कापून मांसाचा प्रसाद सगळे खातात. प्रभू येशू हा नीतिमत्त्वाचा सूर्य असून त्याची कोणालाही ओळख नाही. लोक अंधारात चाचपडत आहेत.

**१३१** (१७ : ८, १५ एप्रेल ५८, १२६)

सीलोनच्या बंदरातून एलिझाबेथ आरकर नामक जहाज लिव्हरपूल येथे जाण्यासाठी निघाले. मार्गात मोठे वादळ झाले. ते चोवीस तास टिकले. जहाजाचे सुकाणू व नाळ अगदी तुटली. दैवयोगाने तिमांडा हे जहाज तेथे आले, त्याच्या खलाशांनी बुडणाऱ्या लोकांना वाचविले. तरी १ लाख ८० हजार रुपयांचे नुकसान झाले.

**१३२** (१७ : ८, १५ एप्रेल ५८, १२६)

सदर दिवाणी अदालतीत वकिलीच्या उमेदवारांची परीक्षा होऊन ३३ उमेदवार उत्तीर्ण झाले. त्यांना वकिलीची सनद दिल्ही जाईल. (ज्ञानप्रकाशवरून)

**१३३** (१७ : ८, १५ एप्रेल ५८, १२७)

टेलिग्राफच्या बातमीदार कळवितो की : शेवटी जमखेंडी राजास इंग्रज सेनेने पकडले. त्याच्या घोडेस्वारांची शस्त्रे काढून घेऊन त्याला बेळगावकडे रवाना केले आहे. जमखेंडीचा किल्ला संपूर्ण खणून काढण्याचे ठरले आहे. (वर्तमानदीपिकेवरून)

**१३४** (१७ : ८, १५ एप्रेल ५८, १२७)

गोव्याच्या सरहद्दीवर वाडीकर हनुमंत सावंत याने उपद्रव मांडला असून त्याला पकडण्यासाठी ५ हजारांचे बक्षिस जाहीर झाले. (वर्तमानदीपिकेवरून)

**१३५** (१७ : ८, १५ एप्रेल ५८, १२७)

नानासाहेब उर्फ धोंडोपंत पेशवा यास जिवंत धरून देणारास १ लाख रुपयांचे बक्षिस देण्यात येईल. पकडून देणारा बंडवाला असेल, तर त्याची शिक्षासुद्धा माफ होईल. (वर्तमानदीपिकेवरून)

**१३६** (१७ : ८, १५ एप्रेल ५८, १२७–१२८)
आयोध्येच्या राजाचा भाऊ सिकंदर याचा मृत्यु झाला.
(वर्तमानदीपिकेवरून)

**१३७** (१७ : ८, १५ एप्रेल ५८, १२७–१२८)
मद्रासचा जज्ज हेन्री डेविसन यास मुंबईचा चीफ जस्टीस नेमले आहे. (वर्तमानदीपिकेवरून)

**१३८** (१७ : ८, १५ एप्रेल ५८, १२७–१२८)
मुंबईच्या कापड गिरणीसाठी पाच लाखांचे भांडवल गोळा झाले.
(ज्ञानप्रकाशवरून)

**१३९** (१७ : ८, १५ एप्रेल ५८, १२७–१२८)
मीरतमध्ये बंड सुरू झाले, तेव्हा १ लाख १० हजार ५१७ सैनिक लष्करात होते. (ज्ञानप्रकाशवरून)

**१४०** (१७ : ८, १५ एप्रेल ५८, १२७–१२८)
लखनौ शहर इंग्रजांच्या हाती आले. २५०० बंडवाले मारले गेले.
(वर्तमानदीपिकेवरून)

**१४१** (१७ : ८, १५ एप्रेल ५८, १२७–१२८)
वर्तमानपत्रात खोट्या बातम्या देणारांना कायद्याप्रमाणे शिक्षा होणार आहे. (वर्तमानदीपिकेवरून)

**१४२** (१७ : ८, १५ एप्रेल ५८, १२७–१२८)
आवा बोट बुडाल्याने सरकारने १० लाखांची नुकसानभरपाई दिल्ही.
(वर्तमानदीपिकेवरून)

**१४३** (१७ : ८, १५ एप्रेल ५८, १२७-१२८)

मद्रासचे माजी जज़ विल्यम बर्टन यांना १२ हजारांचे निवृत्तिवेतन मिळेल. (वर्तमानदीपिकेवरून)

**१४४** (१७ : ८, १५ एप्रेल ५८, १२७-१२८)

ब्रह्मदेशच्या राजाने रिलीफ फंडास १० हजारांची देणगी पाठविली. (वर्तमानदीपिकेवरून)

**१४५** (१७ : ८, १५ एप्रेल ५८, १२७-१२८)

मेल्बरो कॉलेजाचा हेडमास्तर रे. जी. एल्. काटन यास कलकत्त्याचा मुख्य पाद्री नेमला आहे. (वर्तमानदीपिकेवरून)

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १७, अंक ९, मुंबई, १ मे १८५८

**१४६** (१७ : ९, १ मे ५८, १३१–१३२)

'एक मित्र' पत्रात म्हणतो की : 'मी सरकारी कामदार असून सुखी कुटुंबात होतो. पण मला नाचतमाशाचा नाद जडला. त्यातून एक भयंकर रोग लागला. मग मात्र पश्चात्ताप झाला, पण पश्चात्तापाने काही रोग बरा होत नसतो. आता मरणाबद्दल भीती वाटते. बायकोमुलांची चिंता वाटते. मृत्यूनंतर काय गति मिळणार, या चिंतेने मी ग्रस्त झालो.' या दुःखितास उत्तर देताना लेखक म्हणतो की : वर्तमानपत्रामधून मोघम उपदेश करणे कठीण आहे. दुसऱ्याची मते आम्ही समजून घेत नाही. विचारलहरी व सद्धर्मदीपिका त्यांची टिंगल करते, त्यात आनंद मानतो. ईश्वराने आपल्या कर्मांची झडती घेतली, तर काय होईल, याचा विचारही कोणी करीत नाही. येशूस शरण गेले, तर मरणाची नांगी मोडेल; मृत्युलोकाचा पगडा कमी होईल. ख्रिस्तास शरण जावे व आपल्या नातेवाईकांची काळजी देवावर सोपवावी.

**१४६ अ** (इंम : १३२–१३५)

**१४७** (१७ : ९, १ मे ५८, १३५–१३७)

महार लोकांना सार्वजनिक विहिरीवर कोणी पाणी भरू देत नाहीत. बोर्ड ऑफ कन्सर्वन्सीने असा कायदा केला की, त्यांना पाणी भरू द्यावे, पण हे आल्हादकारक वृत्त त्यांना खरेच वाटत नाही. बोर्डाने पोलीसखात्यास काहीच कळविले नसल्यामुळे पाण्यावरून महारांना त्रास दिला, तरी पोलीस शांतच राहतात. इतर धर्मीयांना पाणी भरू देतात, पण महारांना ते प्रतिबंध करतात. मुंबईचे मुस्लीम व पारशी लोकदेखील महारांचा द्वेष करतात. हा प्रकार किती दिवस चालणार आहे कोण जाणे.

**१४८** (१७ : ९, १ मे ५८, १३७)

'एक फिरस्ता' याने ब्थांकृत आक्ट मंजूर करण्याविषयी सरकारला जाहीर विनंती केली होती. सिंधमध्ये ब्रिगेडियर जेकब यांनी एक हुकूम काढून कर्ज देण्यावरच बंदी घातली. तीन महिन्यांपेक्षा जास्त दिवस राहिले तर ते बुडेल, असा नियम केला. आता सावकारही आपल्या कुळांची चालचालणूक नीट पाहूनच कर्जे देतील, असे वाटते.

**१४८ अ** (इंम : १३७)

**१४९** (१७ : ९, १ मे ५८, १३७–१३८)

फत्तेगडचा जज्ज एडवर्ड बंडाच्या गर्दीत सापडला. मडम व चार लेकरे यांसह त्यास पळून जावे लागले. एका नेटिवाच्या आश्रयास राहिला. त्याची दोन लेकरे मरून गेली. तो स्वतः अत्यंत क्षीण झाला. विश्रांतीसाठी कलकत्त्यास जाण्यास निघाला, तेव्हा नेटिवाने ५० रुपयांची मदत केली. शिपायांच्या दुष्टपणामुळे लोकांचे फार हाल झाले. फत्तेपूर आणि बरेली येथे अनेकांचा घात झाला. आता ते ख्रिस्ती नोकरच कामास ठेवणार आहेत.

**१५०** (१७ : ९, १ मे ५८, १३८–१४१)

शीव नदीच्या तीरावर लासूर गाव आहे. तेथे दाक्षायणी देवीचे देऊळ असून मोगल सरकारचा अंमल आहे. ही देवी म्हणजे दक्षराजाची कन्या असून तिला तेलाचा व शेंदराचा पोषाक चढवितात. तेथील गुरवास २५ रुपये पगार आहे. पण त्याची वागणूक अनैतिक आहे. चैत्री यात्रा ८ हजारांची भरते. पण तमाशांची गर्दीच फार जमत असते. देवीचा भक्त नाथ अविवाहित असून त्यास इनाम आहे. गळ टोचण्याचे काम तो करतो. दारूचे कलाल यात्रेत दारू विकतात, तेव्हा स्वतः नाथच दारू पिऊन बेशुद्ध पडत असतो. तरी नवा नाथ नेमताना सदाचारी माणूस नेमावा. यात्रेने माणसे दारूबाज व आळशी मात्र बनतात. –

१८१ (१७ : ९, १ मे ५८, १४१)

नामदार गवरनर जनरल जाहीर करतात की : फत्तेपुरच्या ५६ व्या पलटणीचा मुख्य ब्रौन यास दंग्याच्या वेळी मदत केल्याबद्दल सुभेदार गंगासिंग, अजागरसिंग, परशादीसिंग, बाळ गोविंद, चोळासिंग यांना ५०० पासून २००० रुपयांपर्यंत बक्षिसे दिलेली आहेत. फत्तेपुरच्या जमीनदारांना व शेतकऱ्यांना यंदाचा जमीनसारा माफ केला आहे. या प्रसंगाची आठवण म्हणून तेथे एक विहीर खोदली जाईल.
(ज्ञानप्रकाशवरून)

१८२ (१७ : ९, १ मे ५८, १४१-१४२)

साताऱ्च्या सेनापतीने नानासाहेबाशी पत्रव्यवहार ठेवल्यामुळे त्याला मृत्युदंडाची शिक्षा फर्माविण्यात आली. त्याने तोफेच्या तोंडी जाण्याची इच्छा प्रगट केली. पण इंग्रजांनी ऐकले नाही. कारण त्याचा अपराध मोठा होता. त्याच्या जबानीवरून कळते की, या दुष्टांनी सगळ्या इंग्रजांना ठार मारण्याचा बेत केला होता. कित्येक संभावित लोक तोंडावर इंग्रजांची तारीफ करीत. पण ते मनातून वैर करीत. कोल्हापूरच्या राजासही काळ्या पाण्यावर पाठविले जाईल व सेनापतीसही त्याच मार्गाने पाठविले जाईल.

१८३ (१७ : ९, १ मे ५८, १४१-१४२)

अजिमगड येथे व बरेलीत काही बंडखोर जमले आहेत. इंग्रजांचे सैन्य तिकडे रवाना झाले. झाशीत व कोट्यात दंगल केल्याबद्दल ६०० बंडवाल्यांना काळ्या पाण्याची शिक्षा झाली. दोन हजार बंडवाले मारले गेले.

१८४ (१७ : ९, १ मे ५८, १४२-१४३)

कलकत्याप्रमाणे मुंबई व मद्रास येथेही विद्यापीठे आपली विद्यालये सुरू करतील.

१८५ (१७ : ९, १ मे ५८, १४२-१४३)
चाबूक नावाच्या गुजराथी वृत्तपत्रावर सरकारी बंदी आली.

१८६ (१७ : ९, १ मे ५८, १४२-१४३)
पुणे व नगर जिल्ह्यांतील ब्राह्मण लोकांनी भागूजी नाईक भिल्ल याला सरकारविरुद्ध बंड करण्यास चिथावले, असा संशय आहे.

१८७ (१७ : ९, १ मे ५८, १४२-१४३)
पंजाबात २८२ खिस्ती आहेत.

१८८ (१७ : ९, १ मे ५८, १४२-१४३)
एका हिंदू मोलवीस बंडाच्या संशयावरून पकडण्यात आले.

१८९ (१७ : ९, १ मे ५८, १४२-१४३)
कोल्हापूर पलटणींतील दोघा सुभेदारांना सरकारने फाशी दिल्हे.

१९० (१७ : ९, १ मे ५८, १४२-१४३)
नानांचा ३० लक्षांचा ऐवज सरकारने जप्त केला, अजून त्यास धरिले नाही.

१९१ (१७ : ९, १ मे ५८, १४२-१४३)
बंगालचे ले. गवरनर हालीरे यांनी नेटिव खिस्ती लोक सरकारी नौकरीत किती आहेत, त्याची चौकशी सुरू केली. पंजाबचे कमिशनर सर जान लारेन्स यांनी नेटिव्ह खिस्ती लोकांस सरकारी कामे देण्यास सुरुवात केली.

**१६२** (१७ : ९, १ मे ५८, १४३–१४४)

बरासेतच्या बंडखोरांनी ५ लाख लोकांच्या सभा भरवून सगळ्या इंग्रजांना ठार करण्याची प्रतिज्ञा केली होती. मिशनच्या देवळांचा व शाळांचा त्यांनी फार नाश केला.

**१६३** (१७ : ९, १ मे ५८, १४३–१४४)

फत्तेगडच्या ख्रिस्ती लोकांना रे. फुलरटन यांच्या तजविजीप्रमाणे तीनशे रुपयांची मदत देण्यात आली.

**१६४** (१७ : ९, १ मे ५८, १४३–१४४)

रशियन व तुर्कस्तान लढाईत तुर्की लोकांस मदत करण्यात इंग्रज–फ्रेंचांचे १ लाख ३४ हजार २९८ सैनिक होते.

**१६५** (१७ : ९, १ मे ५८, १४३–१४४)

बंडकाळात इंग्रजांना मदत केल्याबद्दल झिंद व पटियाला येथील राजांना जहागीर देण्यात आली.

**१६६** (१७ : ९, १ मे ५८, १४३–१४४)

कैद्यांच्या कामातून मिळणाऱ्या पैक्याचा त्यांना भावी आयुष्यात उपयोग व्हावा, म्हणून तुरुंगात असताना केलेल्या कामाच्या पैक्याची शिल्लक त्यांना देण्यात येईल.

**१६७** (१७ : ९, १ मे ५८, १४३–१४४)

लंडनमध्ये सभ्य वसतीत राहण्याची कसबिणींना बंदी होणार.

**१६८** (१७ : ९, १ मे ५८, १४३–१४४)

डाक्तर भाऊ दाजीने मुलाची मुंज केली, पण कसबिणीचा नाच कटाक्षाने टाळला. अशी सुधरणूक सर्वांनी करणे जरूर आहे.

१६९ (१७ : ९, १ मे ५८, १४३–१४४)

मिसर देशाच्या बादशहाने इंग्रज सरकारास २०० घोडे नजर केले.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

---

## ज्ञानोदय, पुस्तक १७, अंक १०, मुंबई, १५ मे १८५८

---

१७० (१७ : १०, १५ मे ५८, १४५–१४९)

आपल्या निवेदनात विलायत अलीची पत्नी फातिमा बीबी लिहिते की : ११ मे १८५७ रोजी माझा नवरा प्रार्थनेस निघाल्यावर बातमी आली की, गावात बंडाचा उठाव झाला. कितीही संकटे आली तरी खिस्तच आपणांस वाचवील, अशी खातरी त्याच्या मनात होती. पण बंडवाले अचानक आले व त्यांनी विलायतला गोळ्या घालून ठार मारले. बंडवाल्यांनी अभद्र भाषणे करून खिस्ती धर्म स्वीकारल्याबद्दल त्याची निर्भर्त्सना केली. घरास आग लावून दिल्ही. शेजाऱ्यांना धमक्या दिल्या की, त्याच्या बायकोमुलांना आश्रय दिला, तर तुम्हांस ठार करू. तलवारी पुऱ्यातल्या खोलीत फातिमाबीबीस राहावे लागले. सगळे दिल्ली शहर बंडखोरांच्या ताब्यात होते. दळण-कांडण करून ती कसेबसे दिवस घालवीत होती. धाकटे मूल मेले, तर त्याच्या दफनविधीसही पैसा उरला नाही. शेवटी आग्रा येथील मिशनरीसाहेबाने या कुटुंबास आश्रय दिल्हा.

**१७१** (१७ : १०, १५ मे ५८, १५१-१५५)

एक फिरस्ता पत्रांत लिहितो की : या देशात पराकष्ठेचे अज्ञान आहे. खडबडीत दगडातून सुंदर मूर्ती घडवावी त्याप्रमाणे चांगली विद्या देऊन नेटिवांना शहाणे करता येईल. सरकारने अनेक शाळा सुरू केल्या. पण दरिद्र आणि जातिभेद यांमुळे त्यांचा विशेष उपयोग होत नाही. मुलींना शिकविण्यास ते तयार नाहीत. पंतोजीचा पगार देण्याचे गावकऱ्यांच्या जिवावर येते. बुके घेण्यासाठी दोन पैसेही कोणी खर्चीत नाही. असे लोक शाळेचा अर्धा खर्च देतील, अशी आशा करणेही व्यर्थ आहे. मुलेसुद्धा काम करून पैसे मिळवितात. त्यांना शाळेत घातले, तर उत्पन्न बुडेल. म्हणून त्यांना शाळाच नको असते. यावर उपाय म्हणजे सरकारनेच शाळेचा सगळा खर्च चालविला पाहिजे. अर्थात फी ठेवावी. कारण कोणतीही गोष्ट फुकट मिळाली, तर तिची किंमत वाटत नाही. गावकऱ्यांनीही निदान एक तृतीयांश खर्च तरी द्यावा. शाळेतील मुलांच्या पालकांनी या रकमेची भरपाई करावी. गाव गरीब असेल, तर दोन गावांसाठी एकच पंतोजी नेमावा. हुशार व मेहनती पंतोजी मिळाले, तर मुलांचे कल्याण होईल.

**१७१ अ** (इंम : १४९-१५१)

**१७२** (१७ : १०, १५ मे ५८, १५५)

तांजोरच्या देवळातील एक पुजारी पितळी मूर्ती मिरवीत चालला होता. उन्हाने मूर्ती तापली, तेव्हा देव आजारी झाला, म्हणून पुजाऱ्याने त्यास राजाकडे नेले. राजवैद्याने तीव्र ज्वर आणि वाखा असे निदान केले. मूर्ती सावलीत ठेवून तिच्यावर थंड पाणी ओतले. देव बरा झाला, अशा समाधानाने सगळे घरी गेले! या गोष्टीवर इतरांनी हसू नये. कारण त्यांच्याही समजूती अशाच अडाणी व भोळसटपणाच्या आहेत.

**१७२ अ** (इंम : १५५)

**१७३** (१७ : १०, १५ मे ५८, १५५-१५७)

'एक ख्रिस्ती' पत्रात म्हणतो की : पूर्वी मी महार होतो, तेव्हा माझी जात म्हणजे मला पूर्वजन्मीच्या पापाचे फळ वाटत असे. उष्टे अन्न व कुजलेले मांस यांवर गुजराण करावी लागे. स्वच्छ पाणीसुद्धा मिळत नसे. माझा बाप म्हारकी करून थोडेसे जोंधळे मिळवी, मग ज्वारीची भाकर मिळे. काही वेळा भीकही मागण्याची पाळी येई. फाटक्या चिंध्या हेच आमचे वस्त्र होते. दुखणे आले, तर वैद्याकडे न जाता बिबवे घालणे किंवा डाग देणे, असले उपचार आम्ही करीत होतो. आमची फार हालहलाकी होती. पोटासाठी आमच्या जातीचे लोक भ्रष्ट कर्मे करीत. उंच जातीचे लोक आमच्याशी बोलणेही कमीपणाचे समजत. श्रेष्ठ जातींनी धर्माचे निमित्त करून आमच्यावर पाहिजे तसा जुलूम केला. आम्हांस विहिरीचे पाणी भरू देत नाहीत. धर्मशाळेत मुक्काम करू देत नाहीत. सरकारी कचेरीतही येऊ देत नाहीत. हा जुलूम किती दिवस चालणार ? सरकारनेच यावर कायद्याने उपाय करावा.

**१७४** (१७ : १०, १५ मे ५८, १५७-१५८)

पुण्याच्या सरकारी दवाखान्यात पुष्कळ रोगी औषध घेतात. तरीही या समाजामध्ये इंग्रेजी उपचारपद्धतीबद्दल अश्रद्धा असून ती बाडे नेटिव वैद्यांनी टिकवून धरली आहे. इंग्रजी औषधे हिंदू प्रकृतीस मानवणार नाहीत, असा अपसमज मुद्दाम निर्माण केला जातो. हा दवाखाना १८४४ मध्ये सुरू झाला. हल्ली बाळकृष्ण चिंतोबा यांच्या औषधोपचारांनी बरेच रोगी येऊ लागले. अनाथ रोग्यांचीही ते उत्तम व्यवस्था ठेवतात. श्रीमान लोकांना मदत करण्याची वासनाच नसते. न देल्याचा वार शनिवार आहे. अन्नावाचून तळमळणारे, पाण्यावाचून तृषाक्रांत होणारे, आच्छादनावाचून पीडा पावणारे, अशांस साहाय्य करणे, हा खरोखर धर्म आहे. पोटार्थी लोक या कार्याची स्तुती करणार नाहीत. सुज्ञ मात्र करतील.
(ज्ञानप्रकाशवरून)

**१७५** (१७ : १०, १५ मे ५८, १५८–१५९)

पुण्याच्या लष्करी छावणीत नेहमी आग लागते; म्हणून चौकशीकोर्ट नेमण्यात आले आहे.

**१७६** (१७ : १०, १५ मे ५८, १५८–१५९)

अरबस्थानातील आदन त्या ठिकाणी लष्करी छावणीत कुरापती काढणाऱ्या अरबांचा इंग्रज लष्कराने पूर्ण निःपात केला.

**१७७** (१७ : १०, १५ मे ५८, १५८–१५९)

मिसर देशातील केरो शहरात फाक्सन या एका दारूबाजाचा श्वास दिव्याने पेटला व भयंकर यातना होऊन त्याचे निधन झाले.

**१७८** (१७ : १०, १५ मे ५८, १५८–१५९)

१८६१ मध्ये लंदन येथे पुन्हा १८५१ सारखे पदार्थसंग्रहालय होणार आहे.

**१७९** (१७ : १०, १५ मे ५८, १५८–१५९)

एकट्या न्यूयॉर्क शहरात ३१,५६३ शिक्षक आहेत. विद्येवर ६॥ कोटी रुपये खर्च होतो.

**१८०** (१७ : १०, १५ मे ५८, १५८–१५९)

विलायतेतील लिवायथन या प्रचंड गलबतास ७॥ लाख रुपये खर्च आला.

**१८१** (१७ : १०, १५ मे ५८, १५८–१५९)

खंबायतच्या खाडीत मनोऱ्यावरून उजेड पाडण्यासाठी यापुढे फी घेतली जाणार नाही. ( ज्ञानप्रकाशावरून )

१८२ (१७ : १०, १५ मे ५८, १५८–१५९)

कलकत्ता ते एलोर कायम तारयंत्रणा बसविली जाईल.
(ज्ञानप्रकाशवरून)

१८३ (१७ : १०, १५ मे ५८, १५८–१५९)

चर्च मिशनरी सोसैटीच्या रीलीफ फंडास एका गृहस्थाने ५०,००० रुपये दिल्हे. नाव कळवले नाही.

१८४ (१७ : १०, १५ मे ५८, १५८–१५९)

(हिंदुस्थान) या देशातील रीलीफ फंडास ब्रह्मदेशच्या राजाने १०,००० रुपये दिल्हे.

१८५ (१७ : १०, १५ मे ५८, १५९)

भूगोलाच्या एका क्रमिक पुस्तकात लिहिले आहे की : काही ऋषींच्या मते पृथ्वी सपाट, तर दुसऱ्यांच्या मते त्रिकोणी; काहींच्या मते अंडाकृती, तर इतरांच्या मताने कदंबपुष्पाकृती आहे. मग कोणत्या ऋषींची साक्ष खरी मानावी? शिक्षण खात्याच्या इन्स्पेक्टोरांनी हे पुस्तक शाळेत शिकवू नये, अशी मागणी केली आहे.

१८६ (१७ : १०, १५ मे ५८, १६०)

म्युनिसिपल फंडाच्या नव्या कायद्यानुसार तीन कमिशनरांची नेमणूक होईल. त्यांपैकी एक सरकार नियुक्त राहील. (वर्तमानदीपिकेवरून)

१८७ (१७ : १०, १५ मे ५८, १६०)

कोल्हापूरच्या राजपुत्रास बंडाच्या आरोपावरून कैद झाली.
(वर्तमानदीपिकेवरून)

**१८८** (१७ : १०, १५ मे ५८, १६०)

दिल्लीच्या बादशहाची ५ लाखांची जाहागीर जप्त झाली. (वर्तमानदीपिकेवरून)

**१८९** (१७ : १०, १५ मे ५८, १६०)

कलकत्ता, मद्रास व मुंबई येथे डेप्युटी शेरीफला कारोनेरचे अधिकार दिले आहेत. (वर्तमानदीपिकेवरून)

**१९०** (१७ : १०, १५ मे ५८, १६०)

ग. ज. ने असा जाहीरनामा काढला आहे की, मौलवी अहमद उल्लाशास पकडून देणारास ५० हजारांचे व बाबू कवरसिंगला धरून देणारास २५ हजारांचे बक्षीस मिळेल. (वर्तमानदीपिकेवरून)

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १७, अंक ११, मुंबई, १ ज्युन १८५८

**१९१** (१७ : ११, १ ज्युन ५८, १६१–१६४)

'लोककल्याणेच्छु' लिहितो की : 'फिरस्ता' हे टोपण नाव घेणारा कोणी युरोपियन साहेब असावा. कर्जापायी होणाऱ्या अनर्थावर त्याने चांगले विचार मांडले. परंतु ब्यांकृत आक्ट जर झाला, तर सरकारचे स्टांपचे उत्पन्न अगदी बुडेल. महसुलामध्ये मोठी तूट येईल. शिवाय बारशापासून श्राद्धपक्षापर्यंतच्या कारणासाठी लोक सतत कर्ज काढीत असतात. लोक व्याजदेखील वेळेवर देत नसल्यामुळे फिर्याद करणे सावकारास भाग पडते. पुण्याच्या व मुंबईच्या तरुण विद्वानांनी यावर उपाय सुचवावेत. जबरदस्त व्याजाने लोक खराबीस आले आहेत. म्हणून मोठ्या शहरात सुज्ञांचे मंडळ नेमून एक फंड तयार करावा. सावकारापेक्षा एक चतुर्थांशाने कमी असे व्याजाचे दर आकारून कर्जे द्यावीत. दंडेलकी व कुभांडे करणारे कूळ असेल, तर मात्र फिर्याद करावी. नेटिव्ह राजाकडून देणग्या घेऊन हा कर्जनिधी वाढवावा. रयतेने स्वावलंबनाने दुरवस्थेतून मार्ग काढावा.

**१९१ अ** (१७:११, १ ज्युन ५८, १६४–१६६)

१९२ (१७ : ११, १ ज्युन ५८, १६६–१६९)

'शुभचिंतक' पत्रात लिहितो की, मनुष्यमात्राचे कर्तव्य हे आहे की : इतर माणसांना प्रीतिपूर्वक भेटावे. त्यांच्या बऱ्यावाईट स्थितीत भागीपण असावे. जो रोगी असेल त्यास आत्मिक विचाररूप औषधोपचार द्यावा. देशांतरी गेलेच तर पत्रद्वारे समाचार कळवावा. इतर लोक सुखी असले, तर आपणही आनंद करावा. परदुःखाने दुःखित विरळाच असतो. ख्रिस्ती लोक मात्र पापाची क्षमा मिळवून आकाशातील अक्षय सुखाचा अनुभव घेतात. परलोकच्या सुखाविषयी तर विशेष लक्ष दिल्हे पाहिजे. माणसाच्या इच्छेची तृप्ती मरण येईपर्यंत होत नसते. म्हणून क्षणिक लाभास तुच्छ मानून अक्षय सुखासाठी झटावे. पाप जाण्याचा उपाय ईश्वराने दिलेलाच आहे. पापाची मजुरी मरण असते. आज्ञाभंगाने माणसे गुन्हेगार व अन्यायी झाली, तरी विवेकबुद्धीचा उपयोग करणे आवश्यक आहे. देहिक गोष्टीचे चिंतन, हे मरण; तर आत्मिक गोष्टीचे चिंतन म्हणजे जीवन व शांती असतात.

१९३ (१७ : ११, १ ज्युन ५८, १६९–१७०)

मुलांना दागिने घातल्यामुळे सहस्रावधी मुलांचे खून झाले, तरी या दुष्ट चालीस अनुसरून लोक द्रव्याचा व मुलांचा नाश करून घेतात. एक कैदी माणक्या वल्लद संभू याने एका कुणब्याच्या मुलाचा अवघ्या चार रुपयांच्या कड्याकरिता खून केला. माणक्यास पकडले असून माजिस्त्रेतासमोर हजर केले. (ज्ञानप्रकाशवरून)

**१९४** (१७ : ११, १ ज्युन ५८, १७०)

गृहसूत्र म्हणजे संसार कोणत्या रीतीने चालला याविषयी मार्गदर्शन होय. संसारात स्त्री व पती या उभयतांमध्ये फार स्नेह असला पाहिजे. आईबापांकडे अंमल प्रीत कमी असली, तरी हरकत नाही. पण स्त्रीपुरुषांत स्नेह नसला, तर मात्र आईबापाबरोबरच स्वताचीही फजिती होईल. स्वामीच्या आज्ञेत राहून त्यांच्या मर्जीप्रमाणे राहिले, तर मातापित्यांचीही कीर्ती वाढेल. काही लोकांचे मुलीवर फार प्रेम असते. ती सासरी न जाईल तर बरे, असेही त्यांस वाटते. गैरवर्तणूक व हट्ट करून ते मुलींना त्रासही देतात. पण त्यांच्यामागे भाऊ काही मुलीचे पालन करू शकणार नाही. तिच्या वाट्यास फार दुःख येईल. मुलींनी चंद्री, गोमटी, कृष्णीबरोबर स्नेह करण्यापेक्षा पतीच्याच आज्ञेत राहावे. (ज्ञानप्रकाशवरून)

**१९५** (१७ : ११, १ ज्युन ५८, १७०–१७१)

अलाहाबाद ते फत्तेपूर या गावादरम्यान लोखंडी सडक पूर्ण झाली असून रहदारी सुरू झाली. गवरनर जनरलची स्वारी पहिल्या गाडीत होती. रेल्वेचे स्टेशनही चमत्कारिक शृंगारले होते. महिनाअखेर कानपूरपर्यंत रेल्वे जाऊ शकेल. (वर्तमानदीपिकेवरून)

**१९६** (१७ : ११, १ ज्युन ५८, १७१)

सरकारी ग्याझेटांतील माहितीनुसार खानदेशातील १२२ गावांकरिता १७,७८५ रुपये खर्च झाला. त्यातून ७७ चावड्या, ५ विहिरी, १ तळे व २ धर्मशाळा ही तयार झाली. जुन्यांची मरामतही झाली. सोलापूरकडील १३ गावांकरिता २४६० रुपये खर्च झाला. पिण्याच्या पाण्याची सोय करण्यात आली. सिंधकडील ४२ गावांसाठी २४ हजाराचा खर्च झाला. १४ पूल, २० विहिरी, ७ धरणे व २ शाळा ही तयार झाली. सुरतसाठीही १ हजाराची कामे मंजूर झाली. (ज्ञानप्रकाशवरून)

**१९७** (१७ : ११, १ ज्युन ५८, १७१)

ग्वाल्हेर मुक्कामी दादासाहेब खाजगीवाले यांच्या सुनेने मातीच्या बाहुला-बाहुलीचे लग्न लावले. हजार रुपये खर्च झाला. यावरून सुज्ञांच्या लक्षात येईल की, एथील बडे लोकांत पैशाचा व्यय करण्याची तऱ्हा व समजूत कशी आहेत. त्यांनी एखाद्या गरीब ब्राह्मणाचे लग्न लाविले असते, तर बहुत श्रेयस्कर होते. परंतु भिक्षुक व आर्जवी मंडळी यांच्या विचित्रपणामुळे यजमानाचा दुर्लौकिक होतो. (ज्ञानप्रकाशवरून)

**१९८** (१७ : ११, १ ज्युन ५८, १७१-१७२)

(प्राणीविज्ञान पुढे चालू) मुंगूस हा सर्पाचा पक्का वैरी आहे. हे फार लहान जनावर असते. ते सर्पास मारते, म्हणून फार उपयोगी असते. ईश्वराने त्याच्या ठिकाणी फार आश्चर्यकारक गुण ठेविले. ही ईश्वराची मानवावर कृपाच होय. सर्प दृष्टीस पडला की, त्याच्यावर झडप घालून त्यास जिवे मारतो.

**१९९** (१७ : ११, १ ज्युन ५८, १७२)

नामदार गवरनरचे सक्रतार जाहीर करतात की : चालत्या वर्षात लंकेतील आरिपो टापूत मोत्ये काढण्याचे काम सुरू होईल. ६० बोटी हे काम १५ दिवसांत करतात. इच्छुकांनी २० फेब्रुवारीपूर्वी गवरनरांसमोर हजर राहावे. १ मार्चला काम सुरू होईल. आपल्या पैशांचा भरणा कंपनीकडे करावा. सावकारांना त्याची पावती रीतसर दिली जाईल. मोत्यांच्या विक्रीचा पैकाही शिरस्त्याप्रमाणे मिळेल. या कामाकरिता निदान ५०० रुपये अनामत ठेवावे लागतील.

**२००** (१७ : ११, १ ज्युन ५८, १७२-१७४)

जेजुरीच्या खंडोबाचे वर्षासन सरकारने बंद केले.

२०१ (१७ : ११, १ ज्युन ५८, १७२–१७४)

ग्रेट ब्रिटनमध्ये ६० लाख स्त्रिया आहेत, त्यांपैकी ४२ लाख विवाहित आहेत. (वृत्त)

२०२ (१७ : ११, १ ज्युन ५८, १७२–१७४)

लखनौ शहरात १० लाखांचा लुटीचा माल सापडला. (वर्तमानदीपिकेवरून)

२०३ (१७ : ११, १ ज्युन ५८, १७२–१७४)

सुप्रीम कोर्टाचे चीफ जस्टीस हेन्री डेविसन यांनी पदाची शपथ घेतली. (वर्तमानदीपिकेवरून)

२०४ (१७ : ११, १ ज्युन ५८, १७२–१७४)

हिंदुस्थानात बंड सुरू झाले, तेव्हा इंग्रजी फौज २ लाख ९१ हजार होती. (वर्तमानदीपिकेवरून)

२०५ (१७ : ११, १ ज्युन ५८, १७२–१७४)

यंदा ग्रेट इंडियन पेनिनशुला रेलवेस ६ हजार रुपयांचे जादा उत्पन्न झाले. (वर्तमानदीपिकेवरून)

२०६ (१७ : ११, १ ज्युन ५८, १७२–१७४)

काळ्या पलटणीचा लेफ्टनंट काटंग्रेव पार विलोबी याचा मृत्यु झाला. इराण व रशियाच्या लढाईत त्याने फार मोठी कामगिरी बजाविली होती. (वर्तमानदीपिकेवरून).

२०७ (१७ : ११, १ ज्युन ५८, १७२–१७४)

गुजराथ प्रांतास बिनहत्यारी करण्याचे काम सुरू आहे. (ज्ञानप्रकाशवरून)

२०८ (१७ : ११, १ ज्युन ५८, १७२–१७४)
गायकवाड यांच्या हातून पळून गेलेल्या सात बंडखोरांना पकडून देणारास १० हजार रुपये इनाम मिळणार. (ज्ञानप्रकाशवरून)

२०९ (१७ : ११, १ ज्युन ५८, १७२–१७४)
पुण्याचे डेपुटी कलेक्टर उइल्यम प्राक्टर यांचे निधन झाले. (ज्ञानप्रकाशवरून)

२१० (१७ : ११, १ ज्युन ५८, १७२–१७४)
पारिस एथे तंबाकूच्या कारखान्यांत ११०० बायका आणि ३०० पुरुष प्रतिदिवशी काम करतात. (वृत्त)

२११ (१७ : ११, १ ज्युन ५८, १७४)
सुरतेच्या आगीत १५ हजारांचे नुकसान झाले. (ज्ञानप्रकाशवरून)

२१२ (१७ : ११, १ ज्युन ५८, १७४)
दिल्लीच्या बादशहाच्या मुकदम्याचे कागद कोर्ट आव डरेक्टरांकडे पाठविण्यात आले. (वर्तमानदीपिकेवरून)

२१३ (१७ : ११, १ ज्युन ५८, १७४)
सिंदमध्ये लोखंडी सडक बांधण्यास सुरुवात झाली. (वर्तमानदीपिकेवरून)

२१४ (१७ : ११, १ ज्युन ५८, १७४)
अमेरिकन संशोधकांनी असे सिद्ध केले की, माणसे समुद्रात २॥ मैल पोहत जाऊ शकतात. (ज्ञानप्रकाशवरून)

२१५ (१७ : ११, १ ज्युन ५८, १७४)

मुंबईच्या काळ्या किल्ल्यात आग लागून चार सैनिक जखमी झाले. (वर्तमानदीपिकेवरून)

२१६ (१७ : ११, १ ज्युन ५८, १७४)

कुंवरसिंग हा जगदीशपूरचा बंडखोर मृत्यू पावला. त्याचा भाऊ उमर सिंग ब्रिटिशांच्या ताब्यात आहे.

२१७ (१७ : ११, १ ज्युन ५८, १७४)

अयोध्या प्रांतात आता चांगला बंदोबस्त असून शांतता नांदत आहे.

२१८ (१७ : ११, १ ज्युन ५८, १७४)

पुंच येथील बंडवाल्यांशी झालेल्या लढाईत तेथील किल्ला इंग्लिशांच्या हस्तगत झाला, अवघे बंडवाले मारले गेले.

२१९ (१७ : ११, १ ज्युन ५८, १७४-१७६)

नगर येथील एक लंगडा फकीर कलेक्टरला शिव्या देऊन सरकारविरुद्ध नेहमी बकवा करतो, म्हणून त्याची चौकशी झाली. डॉक्टरांच्या मते तो वेडा असून आता त्यास सात वर्षांची ठेप झाली आहे.

२२० (१७ : ११, १ ज्युन ५८, १७४-१७६)

बंगाल सरकारने १५० नेटिव ख्रिस्ती लोकांची सैन्यात भरती केली. त्यांना धर्माप्रमाणे शास्त्र वाचण्यास परवानगी दिली जाते. काम मात्र सर्व धर्मीयांना सारखे पडते.

२२१ (१७ : ११, १ ज्युन ५८, १७४-१७६)

इंदूरच्या महाराजांचा १९ महिन्यांचा पुत्र मृत्यु पावला.

२२२ (१७ : ११, १ ज्युन ५८, १७४–१७६)

सरकारी शाळेमध्ये महारमांगांना प्रवेश दिलाच पाहिजे, असा हुकूम निघाला आहे.

२२३ (१७ : ११, १ ज्युन ५८, १७४–१७६)

बंगालमध्ये असा डांगोरा पिटण्यात आला की, तीन महिने तेरा दिवसांनी एक पांढरा जिन्नस दुर्भिळ होईल. ते बहुधा मीठ असावे. हिंदू लोकांनी अशा अफवा उठविल्या आहेत की, चरबी लावलेले तांदूळ आणि मासाचे चूर्ण लावलेले मीठ सरकार विकील. कोणी फकीर-गोसावी असल्या गप्पा उठवीत असावेत.

२२४ (१७ : ११, १ ज्युन ५८, १७४–१७६)

नानासाहेब विठूराहून पळून गेल्याबर मिळालेल्या कागदपत्रांवर गोपाळसिंग आणि मंगूलाल नाना यांच्या सह्या होत्या. गोपाळसिंघाचा शोध लावून त्याला फाशी दिल्हे. अजून मंगूलालचा ठिकाणा नाही.

२२५ (१७ : ११, १ ज्युन ५८, १७४–१७६)

मुंबई इलाख्यातून पाठवलेल्या काळ्या पलटणी बंडवाल्यांशी चांगल्या लढतात. संतोषाची बाब आहे.

२२६ (१७ : ११, १ ज्युन ५८, १७६)

फ्री चर्च देवळाजवळील कसबिणींना सरकारने हाकलून लावले.

२२७ (१७ : ११, १ ज्युन ५८, १७६)

सिंध प्रांतात तुफान होऊन बंदुकीच्या गोळीएवढ्या गारा पडल्या.

२२८ (१७ : ११, १ ज्युन ५८, १७६)

खंडाळ्यापासून पुण्यापर्यंत आगीची गाडी सुरू झाली.

२२९ (१७ : ११, १ ज्युन ५८, १७६)

काही दिवसांपूर्वी चीनमधून चहाच्या ५१ पेट्या आल्या. पण त्यात भूस भरलेला होता. हा माल आबदुल्ला नूर महंमद आणि दोसाकीरमल या दोघा खोजा व्यापाऱ्यांचा होता. दगाबाजी चिन्यांचीच असावी.

२३० (१७ : ११, १ ज्युन ५८, १७६)

आपल्या मालमत्तेचा कब्जा घेऊन दोघे भाऊ वकिलाकडे गेले. वकिलाने एका भावास चिठ्ठी देऊन दुसऱ्या वकिलाकडे पाठविले. पत्रात असा मजकूर होता की 'मजकडे दोन पुष्ट तंगड्या आल्या असून त्यांपैकी एक मी तुमच्याकडे पाठवीत आहे. इच्छा असेल तितकी खावी.' याचा मतलब समजून वादी यांनी भांडण आपसांतच समजुतीने मिटविले.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**२३१** (१७ : १२, १६ ज्यून ५८, १७७-१७९)

अहमदनगरमधील एका तरुण हिंदूने इंग्रजी शाळेत चांगला अभ्यास केला. त्यास प्रतिष्ठेची जागाही मिळाली. आपल्या धर्मातील पोकळ चालीरीतींवरील त्याचा विश्वास कमी कमी होत गेला. ख्रिस्ती धर्मच चांगला, याविषयी त्याची खात्री पटली. पण आईबापांना दुःख होईल, या कारणावरून तो प्रसिद्धपणे धर्म बदलीत नव्हता. पुढे अकस्मात् रोगी होऊन तो मृत्यु पावला. जणू काही मृत्यु म्हणतो की : 'माझ्या धन्याची आज्ञा मला ताबडतोब अंमलात आणावी लागते. तरुण--म्हातारे, श्रीमंत-गरीब असा भेद मी करीत नाही. मी अकस्मात झडप घालीत असतो. सावध होऊन बोध घ्या. जगाशी मैत्री करून धनी ईश्वराशी शत्रुत्व करणे चांगले नव्हे. ईश्वराचा अपमान मी सहन करू शकत नाही. देवाने आपल्या पुत्रासही रोखले नाही. देवाने सिद्ध केलेला तारणोपाय पाहा आणि देवास शरण जा. अहो सर्व तान्हेल्यांनो, प्रत्येक पाण्याजवळ या. अविनाशी, निर्मळ व न कोमणारे वतन मिळवा. उद्याच्या दिवसाविषयी फुशारू नकोस. एक दिवस काय प्रसवेल हे तुला ठाऊक नाही. चालती घटिका तुझी आहे. त्यातच पापाची क्षमा मिळव.'

•

**२३१ अ** (इंग : १७९-१८०)

२३२ (१७ : १२, १६ ज्यून ५८, १८०–१८२)

'एक ख्रिस्ती' आपल्या पत्रात लिहितो की : हिंदुस्थानांतील बंडरूपी अग्नीकडे सगळ्या जगाचे डोळे लागले आहेत. बंडवाल्यांच्या क्रूर कर्मावरून मला फार लाज वाटती. पशूंनाच शोभणारी दुष्ट कर्मे करून त्यांनी देशास लांछन लावले. आपल्या लोकांचा वास्तविक स्वभाव बदलला, तरच परिस्थिती सुधारेल. क्रूर व घातकी लोक सरकारशी भांडावयास उठले. ते बहकलेले होते. त्यांच्या जिभांनी कपट केले. त्यांच्या ओठांखाली विष होते. त्यांचे पाय रक्त पाडावयास उतावीळ झाले. त्यांची क्रूर कर्मे पाहून अंगावर रोमांच उठतात. पापवासनेने त्यांच्या बुद्धीत पालट झाला. म्हणून आधी त्यांचे अज्ञान दूर झाले पाहिजे. योग्यायोग्य व खरेखोटे यांचा समज आला पाहिजे. आज तरी आपला विवेक पाहून एकही माणूस वागत नाही. सुधारलेल्यांचे पुढारी तर झोपी गेले आहेत. विधवाविवाहाचा प्रश्न घेऊन बाबा पदमनजींनी 'यमुनापर्यटन' लिहिली. पण लोकांनी त्यांची फार निंदा केली आहे. ख्रिस्ती धर्म स्वीकारलेले हजारो लोक धार्मिक वर्तन करून चांगले उपदेशक बनत आहेत. धर्माने माणसाचे कल्याण होते, याची अनेक प्रत्यक्ष प्रमाणे तुमच्या डोळ्यांसमोर आहेत. मनःकल्पित उपाय योजून काहीच लाभ होणार नाही.

२३२ अ (इंम : १८२–१८३)

**२३३** (१७ : १२, १६ जून ५८, १८४–१८७)

अमेरिकेच्या काही भागात लोक धर्माविषयी फार उत्तेजित झाले आहेत. न्यूयार्क, बास्तन, फिलदेल्फिया येथे अनेक मंडळ्या भरत असतात. तिकडे तीन हजार लोक मावतील अशी भव्य प्रार्थनागृहे आहेत. पन्नास हजारांपासून एक लाखापर्यंत लोक दिवसातून तीनदा तरी प्रार्थना करतात. व्यापारी व कामकरी दुकाने बंद ठेवून प्रार्थनेसाठी जातात. ईश्वरविषयक प्रीतीने त्यांचे मन उचंबळून येते. अधार्मिक आणि पापी लोक ईश्वराकडे फिरून शुद्ध व पवित्र आचरण करू लागले. परलोकातील सुखाकरिता ते उत्सुक बनले. प्रार्थनेची आवड आणि देवावरील हवाला व विश्वास वाढत आहेत. ही काही सामान्य गोष्ट समजता येणार नाही. त्यांचे धर्मोपदेशकही प्रेमळ व गंभीर आहेत. ईश्वराची सद्भीती हा ज्ञानाचा प्रारंभ होय. अनंत काळच्या स्थितीकरता देवास शरण जावे. मनापासून प्रार्थना केली, तर देव आशीर्वाद पाठवील. सैन्यांच्या परमेश्वराने असे आश्वासन दिले आहे की, जगात खिस्ताचा धर्म सतत वाढत राहील. सर्व लोक अमेरिकन लोकांप्रमाणे शहाणे होतील, तर किती चांगले होईल.

**२३३ अ** (इंग्र : १८३–१८४)

**२३४** (१७ : १२, १६ जून ५८, १८७)

पुण्यांतील महारमांगांच्या शाळेच्या अहवालावरून असे दिसते की : अतिशूद्रांचा अभ्यास चांगला चालला आहे. २५८ विद्यार्थी शिकतात. २८५९ रुपयांच्या देणग्या मिळाल्या. ७१९ रुपये शिल्लक आहेत. हे काम उत्तरोत्तर चांगले चालावे, अशी ईश्वराजवळ प्रार्थना आहे.

२३८ (१७ : १२, १६ ज्यून ५८, १८७–१८८)

लहान मुलांसाठी पृथक् शाळा काढण्याचा विचार करण्यासाठी काही श्रीमंत एतद्देशीय गृहस्थ एकत्र जमले होते. तेव्हा एका गृहस्थाने सुचविले की, अमेरिकन मिशनाने छापलेले 'लेकरांची पहिली पोथी' हे पुस्तक शाळेत चालू करावे. मग काहींनी हरकत घेतली की, त्यातील प्रार्थना हिंदु मुलांना योग्य नाहीत. मग त्या पूर्वीच्या गृहस्थाने त्यांना सुचविले की, नीतिपर गोष्टी तर त्यात चांगल्या आहेत. प्रार्थनेत म्हटले आहे की 'देवाने जगावर प्रीत करून आपला एकुलता पुत्र जगास दिल्हा' यापेक्षा 'देवा, मजवर दया करून तू डुकर झालास' हे वाक्य फार चांगले आहे काय ? हे ऐकून सर्वजण हसले. पाद्र्यांची पुस्तके शाळांत चालून करण्याचे कारण उघड झाले व हरकत घेणाऱ्या हिंदू धर्मीयांची फजिती झाली.

२३६ (१७ : १२, १६ ज्यून ५८, १८८–१८९)

धारवाड जिल्ह्यांत मुनदुर्गचे भीमराव, हेमगडचे देसाई, नरगुंदचे जहागीरदार यांनी इंग्रज सरकारविरुद्ध बंड उठविले, तेव्हा पोलिटिकल एजंट म्यान्सनसाहेब रामदुर्ग येथे एकटेच गेले. नंतर सोळा स्वारांसह सूरबंद येथे उतरले. नरगुंदच्या जहागीरदाराने १७ लोकांसह तेथे येऊन म्यान्सनना व इतर १६ जणांना झोपेतच ठार मारले. सरकारने नरगुंदची जहागिरी जप्त केली. मेजर ह्यूमने स्वारी करून भोपाळचा किल्ला जिंकला, तर माल्कमने नरगुंद ताब्यात घेतले. नरगुंदचा जहागीरदार बाबासाहेब यास सहा असामींसह अटक केली. सरकारविरुद्ध गेल्यामुळे बंडवाल्यांचा केवढा नाश होतो, हे त्यांनी ध्यानात घ्यावे.

२३७ (१७ : १२, १६ ज्यून ५८, १८९–१९०)

(निसर्गविज्ञान– पुढे चालू) :

पृथ्वीच्या पृष्ठभागावर दोनतृतीयांश पाणी आहे. महासागर, सागर, खाडी, सरोवर, यांच्या रूपाने हे जलाशय मिळतात. महासागर आणि समुद्र यांत पाण्याचे प्रवाह निर्माण होतात. कारण चंद्रसूर्यांच्या आकर्षणाने भरती-ओहोटी होते, शिवाय उष्णतेने पाणी पातळ होते. नद्यांच्या वेगानेही पाणी ढकलले जाते. हा विषय हवा प्रकरणाशी संबद्ध आहे. मिस्तर आरगो म्हणतात की : उष्णतेच्या फेरफारामुळेच प्रवाह उत्पन्न होतात. समुद्राच्या पृष्ठभागाचे पाणी तापून ते दुसरीकडे वाहात जाते. समवृत्ताजवळचा ओघ अतिशय उष्ण असतो. या घटनेने पाण्याची खारट चव कितपत बदलते, याचा मात्र शोध लागलेला नाही.

२३८ (१७ : १२, १६ ज्यून ५८, १९०–१९२)

बरेलीत इंग्रज व नेटिव सैन्यांची लढाई होऊन बंडवाल्यांचा पुरता बीमोड झाला.

२३९ (१७ : १२, १६ ज्यून ५८, १९०–१९२)

दिल्लीच्या बादशहास कलकत्ता येथे कैदेत ठेवणार आहेत. काही काळानंतर त्याला केप आफ गुड होप येथे ठेवतील, असे दिसते.

२४० (१७ : १२, १६ ज्यून ५८, १९०–१९२)

बंगाल खात्याच्या आठ काळ्या पलटणीच्या जोडीस गोऱ्या घोडेस्वारांची पलटण ठेवण्याचा हुकूम झाला आहे.

२४१ (१७ : १२, १६ ज्यून ५८, १९०–१९२)

नागपूरजवळ चंदा परगण्याच्या जमीनदाराने आरब व रोहिले दंगेखोर गोळा करून बंड केले व एक साहेब मारला. इंग्रज सैन्य तिकडे रवाना झाले.

२४२ (१७ : १२, १६ ज्यून ५८, १९०–१९२)

मुंबईत सार्वजनिक ठिकाणी महारास पाणी भरण्यास सरकारची परवानगी आहे, पण संरक्षण मिळत नाही. त्यासाठी फोजिटसाहेबाकडे अर्ज करणे जरूर आहे.

२४३ (१७ : १२, १६ ज्यून ५८, १९०–१९२)

सरकारच्या टाकसाळीत गतवर्षी ६ कोटी ७७ लाखांची रुपयांची नाणी तयार झाली. (ज्ञानप्रकाशवरून)

२४४ (१७ : १२, १६ ज्यून ५८, १९०–१९२)

धारवाड जिल्ह्यात गेल्या वर्षी ५७३० रुपयांची विहिरींची कामे करण्यात आली. (ज्ञा. प्र. वरून)

२४५ (१७ : १२, १६ ज्यून ५८, १९०–१९२)

सागर बेटात लोकांनी एक वाघ पकडला. त्याची किंमत दोन हजारांवर गेली. आस्ट्रेलियात याची किंमत दुप्पट येईल. म्हणून हा वाघ तिकडे रवाना होणार आहे. (जर्मनमिशनवृत्तावरून)

२४६ (१७ : १२, १६ ज्यून ५८, १९०–१९२)

माहीमजवळ मिस्तर अल्फान्सो यांनी मोठा वाघ मारला. (ज्ञानप्रकाशवरून)

२४७ (१७ : १२, १६ ज्यून ५८, १९२)

एका वकिलाने आपल्या अशिलास विचारले की, तुझी निशाणी काय ? तेव्हा त्याने सांगितले की, 'माझी निशाणी झोळी आहे,' मग वकील म्हणाला की, 'मला निशाणी नको, तुझ्या इमानावरच माझा भरोसा आहे.' (जगन्मित्रवरून)

२४८ (१७ : १२, १६ ज्यून ५८, १९२)

सन १८५४ सालात इंग्रज सरकारचा वसूल २८ कोटी १३ लाख ४६० रुपये होता. (जगन्मित्रवरून)

२४९ (१७ : १२, १६ ज्यून ५८, १९२)

मयत जनरल हावलाक याच्या पत्नीस व मुलास सालीना १० हजार रुपयांचे वेतन मिळेल. (वर्तमानदीपिकेवरून)

२५० (१७ : १२, १६ ज्यून ५८, १९२)

एक नेटिव मुंबईतून २०० बंदुका पिशवीतून रवाना करीत होता, पण हा दगा उमजल्यावर त्यास पोलिसांनी अटक केली. (वर्तमानदीपिकेवरून)

२५१ (१७ : १२, १६ ज्यून ५८, १९२)

कलकत्त्याच्या वायव्य प्रांतातील दिवाणी कामदारांची बनारसला बदली झाली. (वर्तमानदीपिकेवरून)

२५२ (१७ : १२, १६ ज्यून ५८, १९२)

मद्रासची डाक विजापुरऐवजी सोलापूरमार्गे जाण्याचा ठराव झाला. (ज्ञानप्रकाशवरून)

२५३ (१७ : १२, १६ ज्यून ५८, १९२)

मुंबईच्या पोस्टातील सरक्युलरप्रमाणे पत्रे त्वरित मिळाली नाहीत, तर साहेबलोकांनी अशी तक्रार लगेच नोंदवावी. (वर्तमानदीपिकेवरून)

२५४ (१७ : १२, १६ ज्यून ५८, १९२)

मिस्तर डब्ल्यु. इ. फ्रेयर यांना मुंबई कौन्सिलचे प्रोव्हिजनल मेंबर नेमण्यात आले आहे.

२५५ (१७ : १२, १६ ज्यून ५८, १९२)

मुंबई ते पुणे दरम्यान आगीच्या गाडीचे दर पुढीलप्रमाणे राहातील. पहिल्या प्रतीस १० रु. ९ आणे ६ पै. दुसऱ्या प्रतीस ६ रु. १ आणा, तर तिसऱ्या प्रतीस १ रु. १२ आ. ३ पै.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १७, अंक १३, मुंबई, १ ज्युलै १८५८

२५६ (१७ : १३, १ ज्युलै ५८, १९३–१९५)

मणीराम मोतीराम हा गृहस्थ रे. डॉ. विल्सनच्या सहवासात राहिला. खिस्ती धर्माचा शोध करून त्याने माहिती घेतली व नंतर बाप्तिस्मा घेतला. बाबू विश्वेश्वर चक्रवर्ती यांनीही अशी दीक्षा घेतली. दुर्दैवाने खुद्द इंग्लंडमध्ये नास्तिक मताचा प्रसार होत आहे. टॉमस कूपर याने अशा नास्तिकपणाचा प्रचार केला. पण नंतर तो खिस्ताचा भक्त झाला. पण नास्तिक मताचे लोक अत्यंत आग्रही असतात. अर्थात नास्तिक मत दुबळे झाले. अमेरिकेत तर धर्मसंजीवन जोरात आहे. धर्माला सर्व उद्योगांपेक्षा ते अगत्याचा समजतात. एका महिन्यात ५० हजार लोक खिस्ती झाले. ऐन बंडाच्या धामधुमीत नगर भागात ५६ जण खिस्ती झाले. शिवाय लंका, आफ्रिका, ब्रह्मदेश, या देशांत शेकडोजण खिस्ती होत आहेत. १८५७ हे वर्ष बंडामुळे व दुष्टपणामुळे कुख्यात झाले, तर १८५८ खिस्ती धर्माच्या प्रसाराविषयी प्रख्यात होईल.

२५७ (१७ : १३, १ ज्युलै ५८, १९६-१९७)

"एक फिरस्ता" या पत्रलेखकाचे मत असे होते की : कर्जविषयक कायदा केला, तर उत्पन्न बुडेल. म्हणून सरकार कायदाच करणार नाही. कदाचित कर्नल जेकब याने सिंधमध्ये केलेला कायदा रद्द होईल. मि. लिजेटने कौन्सिलास अशी विनंती केली की, नादार ऋणकोसाठी कायदा करावा. आता एक कमिटीही नेमण्यात आली आहे. 'फ्रेंडस् आव इंडिया' चा संपादक म्हणतो की : कर्जबाजारी भिल्लच दंगली माजवतात. कर्जाच्या खटल्यांना दोनशे रुपयांची मर्यादा घातली, तर लहान कर्जे कोणी देणार नाहीत. ऋणकोलोकांची अडवणूक होईल. पण कसेही झाले तरी शेती... व घरदार कर्जापोटी जप्त होऊ नये, असा कायदा झालाच पाहिजे. डोळाही फुटू नये, बोटही दुखावू नये, गरीब रयतेच्या कल्याणाची सरकार तजवीज करीत आहे.

२५७अ (इंग : १९५-१९६)

२५८ (१७ : १३, १ ज्युलै ५८, १९७-१९९)

'दिनवृत्त' लेखात एक धर्मोपदेशक लिहितो की : प्रवासात मी एका मित्राच्या घरी उतरले. त्याचा वाडा सुंदर आहे. त्याला बाग आहे. उत्तम मासिक प्राप्तीही आहे. पण कुटुंबात सौख्य नाही. मुले दांडगाईखोर व वांड असून एकमेकांना शिव्या देतात. नोकर आळशी आहेत. कोठेही समाधान नाही. जेवण गोड लागत नाही व झोपही येत नाही. कारण तो ऐहिक गोष्टीतच गुंतला आहे. नंतर दुसऱ्या मित्राच्या गावी गेलो. तो धनवान नाही. पण धार्मिक असल्यामुळे समाधानी व संतुष्ट आहे. तारणोपाय देणाऱ्या ख्रिस्तावर विश्वास ठेवून तो जगतो. स्तोत्रे वाचताना गहिवरून त्याच्या डोळ्यांना पाणी येते. सुभक्ती व मनाची तृप्ती हीच खरी दौलत समजावी.

२५८अ (इंग : १९९-२००)

२५९ (१७ : १३, १ ज्युलै ५८, २००–२०३)

उद्योगाचे परिणाम सुखकारक असतात. प्रपंचासंबंधी सुखे त्यातून मिळतात. सुउद्योगात मग्न झाले की, कुवासना पळतात. केवळ मजुरी म्हणजेच उद्योग नव्हे, तर निरुद्योगी माणूस अधम व दुःखी समजावा. बादशहा असो की कंगाल माणूस असो, त्याने काहीतरी काम केलेच पाहिजे. आळशी माणूस पशूपेक्षाही नीच समजावा लागेल. पत्रावळीचा उद्योग दिसण्याला अगदी क्षुल्लकच आहे. मालवण, गोमंतक, वेंगुर्ले, सुरत, या ठिकाणी पत्रावळी तयार होतात. वड, मोह, पळस, फणस, इत्यादी यांच्या पानांपासून त्या बनविल्या जातात. विधवा व गरीब स्त्रिया हे काम करतात. त्यात कुशलता व हुषारी तर आहेच. वाया जाणाऱ्या पानांचा हा सदुपयोग आहे. ज्या गरिबांना ताटे परवडत नाहीत, त्यांचीही सोय होते. सरकारने यावरची जकातही उदार मनाने रद्द केली. अज्ञानरूप दारिद्र्याचा उपमर्द होऊन ज्ञानरूप संपत्तीचा झेंडा लागला पाहिजे. आलस्यरूप कुंभकर्णी निद्रा हटली पाहिजे. ख्यालीखुशाली कमी होऊन विद्येकडे लक्ष लागले पाहिजे, म्हणजे सद्यःपरिस्थिती सुधारेल. (ज्ञानप्रसारकावरून)

२६० (१७ : १३, १ ज्युलै ५८, २०३–२०४)

सध्या इंग्रेजी खुर्दा आणि शिवराई खुर्दा यांचा भाव सारखाच आहे. शिवराई नाणे पारखून घ्यावे लागते. वजन तोलून पहावे लागते. त्यावरील दोन रेघांच्या योगाने त्यास दुदांडी नाणे म्हणतात. चिरा व भेगा पडल्या, तर हे नाणे अगदी निरुपयोगी होते. अशा खटपटीमुळे शिवराई कोणीही पारखूनच घेतात. डोळेफोड मात्र करावी लागते. इंग्रजी नाणे सुबक आहे. त्यावरच्या आकृती व हरणे सुबक आहेत. सराफलोक त्यात लबाडी करू शकत नाहीत. समुद्रशिक्का म्हणजे कवड्यांची तर गरजच नाही. रुपयांचा खुर्दा पयामध्ये घेत जावा. (ज्ञानप्रकाशवरून)

२६१ (१७ : १३, १ ज्युलै ५८, २०४–२०५)
सुरापुरचा राजा व्यंकटप्पा बहादुर यास बंडाबद्दल काळ्या पाण्याची शिक्षा झाली.

२६२ (१७ : १३, १ ज्युलै ५८, २०४–२०५)
न्यू हॉलंडमधील विक्टोरिया शहरात ४० नियतकालिके चालतात.

२६३ (१७ : १३, १ ज्युलै ५८, २०४–२०५)
नरगुंदचे जहागीरदार बाबासाहेब यांना म्यान्सनसाहेबास मारण्यावरून फाशीची शिक्षा सुनावण्यात आली.

२६४ (१७ : १३, १ ज्युलै ५८, २०४–२०५)
कोल्हापूर आणि कराची येथील बंडखोर सैनिकांना बरतरफ करण्यात आले.

२६५ (१७ : १३, १ ज्युलै ५८, २०४–२०५)
इंग्लंडच्या पवित्र शास्त्र मंडळीस १ कोटी ५३ लाख रुपयांचे उत्पन्न मिळाले.

२६६ (१७ : १३, १ ज्युलै ५८, २०४–२०५)
इंग्रज सैनिकांना उत्तम बिजारी पुरविण्यासाठी कलकत्याच्या श्रीमंतांनी ६ हजार रुपये जमविले.

२६७ (१७ : १३, १ ज्युलै ५८, २०४–२०५)
कमिशनर ग्रेथेड यांचा जीव वाचवल्याबद्दल एका जमादारास हजार रूपये तर माळ्यास ५०० रुपये बक्षीस देण्यात आले.

**२६८** (१७ : १३, १ ज्युलै ५८, २०४–२०५)

जामे जमशीद या गुजराथी वृत्तपत्रात काही गैरशिस्त मजकूर आला म्हणून सरकारने त्यावर बंदी घातली होती. चौकशीनंतर ते पुन्हा सुरू केले आहे.

**२६९** (१७ : १३, १ ज्युलै ५८, २०४–२०५)

एका काळ्या पलटणीच्या सैनिकात अफवा पसरली की, सरकार आपणांला बोटीवर नेऊन समुद्रात बुडवणार आहे, म्हणून ते बंड करणार होते. आता ते शांत आहेत.

**२७०** (१७ : १३, १ ज्युलै ५८, २०५–२०७)

कप्तान गबानचा जीव वाचवल्याबद्दल दोन शिपायांनी इनामी गावे मिळाली.

**२७१** (१७ : १३, १ ज्युलै ५८, २०५–२०७)

२० सोजिरांनी पुण्याच्या एका पुस्तकालयात जाऊन गोंधळ माजविला. मग ते लहान लेकरांच्या शाळेत गेले. मुले व शिक्षक पळून गेली. काही शिपायांनी धैर्य करून त्यांना पकडले. सोजिरांची वर्तणूक दुःखकारक वाटते.

**२७२** (१७ : १३, १ ज्युलै ५८, २०५–२०७)

काल्पीच्या शिपायांनी बंड केल्यामुळे सर ह्यू रोजच्या सैनिकांनी त्यांजवर हल्ला करून त्यांचा पूर्ण बीमोड केला. दोन तीन लक्षांचा दारूगोळा जप्त केला. काल्पीस इंग्रजांचा जय झाल्यामुळे शिंदे सरकारने मोठा उत्सव केला. पण शिंद्याचे सैनिक नाराज होऊन त्यांनी फुलबाग जाळला. शिंदे सरकार राण्यांना घेऊन सिप्री गावाकडे पळून गेले.

२७३ (१७ : १३, १ ज्युलै ५८, २०५–२०७)
जलंदर एथे बंडाच्या आरोपावरून २८ शिपायांना मृत्युदंड देण्यात आला.

२७४ (१७ : १३, १ ज्युलै ५८, २०५–२०७)
बंडकाळात उत्तम कामगिरी केली म्हणून कमांडर इन चीफ सर कोलीन क्यांबेल यांना लॉर्डचा किताब मिळाला.

२७५ (१७ : १३, १ ज्युलै ५८, २०५–२०७)
लॉर्ड एलेन बरो यांनी भारताच्या सक्रेतारपदाचा राजीनामा दिल्हा.

२७६ (१७ : १३, १ ज्युलै ५८, २०५–२०७)
लार्ड हावलाक यांनी बंडात कामगिरी करून मृत्यु पतकरला म्हणून त्यांच्या मुलास बास्तनचा बर्फाचा व्यापारी एक तलवार व रिवाल्वर बक्षिस देणार आहे.

२७७ (१७ : १३, १ ज्युलै ५८, २०७–२०८)
अहमदनगरच्या रामचंद्र नगरकरांनी बहिणीच्या लग्नात दुष्ट स्त्रियांच्या नाचाची पद्धत मोडली.

२७८ (१७ : १३, १ ज्युलै ५८, २०७–२०८)
काशी हलालखोर या स्त्रीला पाच बॅंक नोटा सापडल्या. त्या तिने प्रामाणिकपणाने माजिस्त्रेताकडे आणून दिल्ह्या. प्राणाणिकपणाबद्दल तिला माजिस्त्रेताने रु. १० बक्षिस दिल्हे.
(वर्तमानदीपिकेवरून)

२७९ (१७ : १३, १ ज्युलै ५८, २०७–२०८)
मुंबईत गेल्या २ आठवड्यांत ५८४ लोक मृत्यु पावले.
(वर्तमानदीपिकेवरून)

**२८०** (१७ : १३, १ ज्युलै ५८, २०७–२०८)

हिंदुस्थानात लोखंडी गजांच्या सडकेवरून वाफेच्या गाड्या चालविणाऱ्या कंपनीने १९ कोटींचे भांडवल जमा केले. (ज्ञा. प्र. वरून)

**२८१** (१७ : १३, १ ज्युलै ५८, २०७–२०८)

बोरी नायबजीभाई या व्यापाराचा मुलगा बारीस्तरच्या शिक्षणासाठी विलायतेस गेला. (वर्तमानदीपिकेवरून)

**२८२** (१७ : १३, १ ज्युलै ५८, २०७–२०८)

विजयादशमीस इंग्रज सरकारतर्फे सरदारांना पोशाक देण्याची पद्धत बंद होणार. त्याऐवजी राणीसरकारच्या जन्मदिनी देण्यात येणार. (जगन्मित्रवरून)

**२८३** (१७ : १३, १ ज्युलै ५८, २०७–२०८)

पुण्यात गारपीर स्टेशनवर लोखंडी पट्ट्यांच्या गठ्ठ्यांना आग लागून तीन हजारांचे नुकसान झाले. काळ्या पायदळाने आग विझविली. (ज्ञानप्रकाशवरून)

**२८४** (१७ : १३, १ ज्युलै ५८, २०८)

यंत्राने कापड तयार करण्याची नवी गिरणी सुरू करावी म्हणून पुण्यात एक सभा भरली. इंजिनियर बेल व वकील मिस्तर बाकरही हजर होते. गिरणीकरिता भांडवल गोळा करण्याचा ठराव झाला. नेटिव लोक उद्योग – व्यापारात लक्ष घालतात, हे पाहून आम्हांस फार संतोष झाला. व्यापाऱ्यांनी हे काम मनावर घेतले, तर या देशाची दरिद्रावस्था उत्तरोत्तर क्षीणतेस पावेल. सूत काढण्याचे यंत्र विलायतेहून मागवावे असे ठरले. माजिस्त्रेत, प्रिन्सिपाल, गावचे मोठे लोक, या सभेस आले. ही सभा पुण्यात रास्तापेठेतील रास्तेवाड्यात भरली. (ज्ञानप्रकाशवरून)

२८५ (१७ : १३, १ ज्युलै ५८, २०८)

फ्रेंड आव इंडियावरून कळते की : एका इंग्रज गृहस्थाच्या बरगडीजवळ एक छिद्र पडले असून त्यातून पोटाचा सर्व भाग दिसतो. सध्या त्याला दवाखान्यात ठेवले आहे. मनुष्याचे पाचन कसे होते, त्याचे निरीक्षण करण्याची ही सुसंधी डॉक्टरांना मिळते आहे. या निरीक्षणानंतर काही औषधयोजनेचाही शोध लागेल. (ज्ञानप्रकाशावरून)

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

---

## ज्ञानोदय, पुस्तक १७, अंक १४, मुंबई, १५ ज्युलै १८५८

---

२८६ (१७ : १४, १५ ज्युलै ५८, २०९–२११)

दिनवृत्तचा लेखक म्हणतो की : माझा धार्मिक मित्र दररोज सायंकाळी मुलांबरोबर ईश्वराची प्रार्थना करतो. ईश्वराच्या खऱ्या भक्तांना आकाशलोकात विसावा मिळेल, हे तत्त्व त्याने मुलांच्या मनावर ठसविले आहे. खोड्या करणाऱ्या मुलांना मात्र तारण मिळणार नाही. प्रभू म्हणतो की : मुलांस वर्जू नका. कारण आकाशातले राज्य अशांचेच आहे. आमच्या जीवनाचा सूर्य मावळला, तरी तारणाचा सूर्य उगवल्याशिवाय राहणार नाही. सर्वकाळचे सुख भोगण्यासाठी सगळे लोक तेथे भेटतील. एखाद्या सावकाराचे दिवाळे निघाले की एखाद्याचे घर जळून गेले, तरी ज्यांचा प्रभूवर विश्वास आहे, त्यांना कशाचेही भय नाही. सर्व काळजी देवावर टाकली पाहिजे. देवच आपला सांभाळ करीत असतो. ईश्वरास आपले सर्वस्व माना म्हणजे गरीबीतही सुख वाटेल.

२८६ अ (इंग : २११–२१२)

२८७ (१७ : १४, १५ ज्युलै, ५८, २१४–२१९)

'एक फिरस्ता' आपल्या पत्रात लिहितो की : सरकारी शाळांची संख्या वाढल्यामुळे मुलांना मोलवान शिक्षण मिळेल, अशी आशा होती. पण तेथे फक्त पाठांतराचीच विद्या शिकविली जाते. ज्ञान हे स्मरणशक्तीचे भूषण झाले आहे. व्यावहारिक ज्ञान मुलांना मिळत नाही. स्वतंत्रपणे विचार करण्यास कोणी त्यांना शिकवित नाही. दंतकथा आणि रूढी यांच्या कचाट्यातून मुलांची सुटका होणे कठीण आहे. मुलांच्या मनावर अयुक्तिक आणि तर्कदुष्ट गोष्टी ठसविल्या जातात. सत्य व प्रामाणिकपणा यांची बूज राखली जात नाही. देशी तरुणांना सुशिक्षण मिळाले पाहिजे. म्हणून ख्रिस्ती शास्त्र शाळेत शिकविले पाहिजे. असे केल्यामुळे उंच जातीची मुले शाळा सोडून गेली तरी खालच्या जातीची शेकडो मुले शिकण्यासाठी येतील. विद्येचे प्रापंचिक लाभ आता सर्वांना समजले आहेत. धर्माविषयी निःपक्षपात राहाणे हे सरकारचे कर्तव्य असले, तरी अयुक्तिक गोष्टी सांगून शिक्षणाचा पाया पोकळ ठेवण्यात अर्थ नाही. खोट्या कल्पनांना आश्रय देऊ नये. पृथ्वीचा आकार गोल आहे या सिद्धांताएवढीच खऱ्या धर्मनीतीची जरूरी आहे. शुद्ध नीती व सचोटी मुलांना शिकवावी. म्हणून ख्रिस्ती धर्मशास्त्र शिकविणे अगत्याचे असते. त्यातून लोकांचे गैरसमज दूर होतील. संशय मुळापासून दूर होईल.

२८७अ (इंम : २१२–२१४)

२८८ (१७ : १४, ५ ज्युलै ५८, २१९)

नेरळ ते खोपोली दरम्यान रेल्वेचा रस्ता खराब झाला होता. तो आता दुरुस्त झाला असून रेल्वे-वाहतूक पूर्ववत सुरू झाली.

**२८९** (१७ : १४, १५ ज्युलै ५८, २१९–२२२)

मंगरोळजवळील एका गावात एका सधन कुणब्याच्या घरावर दरोडा पडला, म्हणून त्याने बंदुकीचे बार उडविले. एक चोर मृत्यु पावला. कुणब्याच्या दुर्दैवाने तो चोर ब्राह्मण निघाला. गावाने कुणब्यास वाळीत टाकले. सरकारने त्याचा सन्मान केला. पण गावातले लोक त्यास छळू लागले. त्याने तीर्थयात्रा केली, तरी गावकऱ्यांनी त्याचा अपांक्तपणा चालूच ठेवला. आमचे धर्माधिकारी भावभोळे व अपस्वार्थी आहेत. एखाद्याने प्राणरक्षणासाठी चोरास मारले, तरी त्यास क्षमा करण्यास तयार नाहीत. चोरांचा धैर्याने प्रतिकार केल्याबद्दल त्याचे कौतुक करावयास कोणीही गावकरी पुढे आला नाही. भूदेव जरी दरोडेखोर असला, तरी तो पूज्यच, अशी खुळचट समजूत सर्वत्र दिसते. वास्तविक अंधारात माणसाची जात ओळखणे अतिशय अवघड आहे. अशा घातकी व जुलमी लोकांना अधिकारी मानणे कठीण नाही काय? दुष्ट दरोडेखोरास उंच जातीचा गुरू कसे मानावे, असा प्रश्न 'हिंदूंचा कळवळा करणारा'ने विचारला आहे.

**२९०** (१७ : १४, १५ ज्युलै ५८, २२२–२२३)

इंग्लंडमधून आणखी ९ हजार गोरे सैनिक येणार आहेत. (ज्ञा. प्र. वरून)

*

**२९१** (१७ : १४, १५ ज्युलै ५८, २२२–२२३)

लंडनजवळ दरचस्तर हे जहाज बुडून सगळे प्रवासी बुडून गेले. (ज्ञा. प्र. वरून)

**२९२** (१७ : १४, १५ ज्युलै ५८, २२२–२२३)

मद्रासकडे ३६ मैलांची रेल्वेगाडी तयार झाली. (वृत्तसारवरून)

**२९३** (१७ : १४, १५ ज्युलै ५८, २२२–२२३)

अमेरिकन ४१,३९१ मैलांची तार विजेच्या यंत्राकरिता बसविण्यात आली. (ज्ञानप्रकाशवरून)

२९४ (१७ : १४, १५ ज्युलै ५८, २२२-२२३)
आता डाकेत फक्त सरकारी ठंग्याच स्वीकारल्या जातील.
(ज्ञा. प्र. वरून)

२९५ (१७ : १४, १५ ज्युलै ५८, २२२-२२३)
कोल्हापूरचे बाबासाहेब राजे यांना पुत्र झाला.

२९६ (१७ : १४, १५ ज्युलै ५८, २२२-२२३)
बंडखोर झाशीची राणी इंग्रज सैन्याशी लढत असताना मृत्यु पावली.
(वर्तमानदीपिकेवरून)

२९७ (१७ : १४, १५ ज्युलै ५८, २२२-२२३)
मुंबई ते सावंतवाडी तारायंत्र सुरू झाले. (वर्तमानदीपिकेवरून)

२९८ (१७ : १४, १५ ज्युलै ५८, २२२-२२३)
सावकाराच्या जबर व्याजातून लोकांची सुटका व्हावी, म्हणून मुंबईतील तरुणांनी गरीब लोकांना कर्ज देण्यासाठी म्युच्युअल युनियन फंड उभारला आहे. (वर्तमानदीपिकेवरून)

२९९ (१७ : १४, १५ ज्युलै ५८, २२२-२२३)
दिल्लीच्या बादशहाचा ज्योतिषी हासन अस्करी यास फाशी देण्यात आले.

३०० (१७ : १४, १५ ज्युलै ५८, २२२-२२३)
काल्पीजवळच्या इत्रोबा गावी बंडात भाग घेतल्याबद्दल एका स्त्रीला फाशीची शिक्षा झाली. बंडाच्या कारणावरून फाशी झालेली ही पहिलीच स्त्री आहे.

**३०१** (१७ : १४, १५ ज्युलै ५८, २२२–२२३)

नरगुंदच्या बाबासाहेब जहागिरदारांनी बंडात भाग घेतला म्हणून नरगुंदकराची गढी सुरुंगाने उडविली जाईल. नरगुंदकराला फाशी दिल्ह्यावरून सर्व बंडवाल्यांस दरारा बसला.

**३०२** (१७ : १४, १५ ज्युलै ५८, २२३–२२४)

मीरतच्या माजिस्त्रेताने १९ हजार हत्यारे रयतेकडून जप्त केली.

**३०३** (१७ : १४, १५ ज्युलै ५८, २२३–२२४)

बंगाल प्रांतात इंग्रजांशी एकनिष्ठ राहणाऱ्या सैनिकांची 'वफादार पलटण' तयार झाली आहे.

**३०३ ब** (१७ : १४, १५ ज्युलै ५८, २२३–२२४)

उत्तरेकडील कर्वी गावच्या बंडखोरांकडून १ कोटी रुपये रोख व ४० जुन्या तोफा जप्त करण्यात आल्या.

**३०४** (१७ : १४, १५ ज्युलै ५८, २२३–२२४)

अयोध्येजवळ 'नवाबगंज' येथे बंडखोर व इंग्रज सैन्यांत युद्ध झाले. त्यात ८०० जण मेले. एकूण बंडवाले १८ हजार होते. त्यांची दाणादाण होऊन ते पळाले.

**३०५** (१७ : १४, १५ ज्युलै ५८, २२३–२२४)

एका बंडखोर मौलवीने राजा जगन्नाथसिंगाच्या गढीस वेढा घातला. त्यात मौलवीचा मृत्यु झाला. जज्ज टक्कर यांना मारणारा महबूब खान यास फाशी झाली.

३०६ (१७ : १४, १५ ज्यूलै ५८, २२३–२२४)

बुंदेलखंडामध्ये काही बंडखोरांनी जाहीरनामा काढून दंगल सुरू केली. इंग्रजांशी मैत्री करणारांना धमक्या देण्यास सुरुवात केली. जो सरकारशी एकनिष्ठ राहील तो पापी ठरेल, असाही प्रचार केला. पण इंग्रजांचा जय व्हावा अशीच ईश्वराची इच्छा दिसते आहे. अर्थात इंग्रज सरकार कोणावर सूड उगवील, अशी भीती लोकांनी बाळगू नये.

३०७ (१७ : १४, १५ ज्यूलै ५८, २२४)

बामदाद नावाचे गुजराथी पत्र सुरू झाले. त्याची १६ पृष्ठे असतात. वर्गणी एक रुपया आहे. त्याचे काम चांगले चालावे अशी ईश्वराजवळ आमची प्रार्थना आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १७, अंक १५, मुंबई, २ ऑगस्ट १८५८

३०८ (१७ : १५, २ ऑगस्ट ५८, २२५–२२७)

दिनवृत्ताचा फिरता उपदेशक लिहितो की : एका गावात मुक्काम केला. तेथे एका गरीब स्त्रीचा नवरा पटकीने मृत्यु पावला. ती बाई धाय मोकलून रडू लागली. उपदेशकाने तिचे समाधान केले की, संसार म्हणजे मायेचा बाजार आहे. देव निर्दय आहे अशी तिची समजूत झाली. यावरून ख्रिस्ती धर्म किती अमूल्य आहे, तें दिसते. कारण अशा दुःखात तो मनाला समाधान देतो. आमचे उपदेशक रुग्णाईतांच्या घरी जाऊन त्यांचे समाधान करतात. दुखणेकरी माणूस संपूर्णपणे धार्मिक असल्यामुळे तो म्हणतो की, येशू माझा तारणहार असल्यामुळे मला मरणाचे भय वाटत नाही. मरताना लेकरासाठी व बायकोसाठी तो आशीर्वाद मागतो. रुग्णाईत मेला, तरी त्याची बायको म्हणते की, आम्ही निराश्रित नाही. ईश्वराचे राज्य आणि न्यायीपण मिळविण्याकरिता ते झटत असतात. हे जग द्रव्याकडून सुखावह नाही, तर भक्तीकडून आनंददायी आहे.

३०८ अ (इंग : २२७–२२८)

३०९ (१७ : १५, २ ऑगस्ट ५८, २२९)

टेलिग्राफ अॅंद कूरियर पत्राने म्हटले आहे की : एतद्देशी गृहस्थांनी 'परस्पर ऐक्य संग्रह' (म्यूच्यूअल युनियन फंड) स्थापन केला आहे. आता पैक्यावाचून कुळाचे अडणार नाही. जमीन गहाण ठेवावी लागणार नाही. व्याजही हलके पडणार आहे. रा. बाळकृष्ण त्रिंबक आणि सीताराम नारायण यांच्याप्रमाणे गावोगाव असे प्रयत्न होणे आवश्यक आहे. अवघ्या देशासाठी एकच मोठा फंड करितील तर किती बरे !

३०९ अ (इंग : २२८–२२९)

३१० (१७ : १५, २ ऑगस्ट ५८, २२९)

सुरतेस एका मुस्लीम गृहस्थाने ख्रिस्ती धर्माची दीक्षा घेतली. चोटा नागपुरात बंडाच्या गडबडीतून स्वस्थता झाल्यानंतर २०० हून अधिक लोकांनी बाप्तिस्मा घेतला. विशेष म्हणजे एकाच दिवशी शंभर जणांनी ख्रिस्ती धर्म स्वीकारला. ख्रिस्ती धर्माची वृद्धि यावरून कळते.

३११ (१७ : १५, २ ऑगस्ट ५८, २२९–२३०)

एक हौसी भांग्या आपल्या भांग घोटण्याच्या सामानासह सगळीकडे हिंडत असे. एका ओढ्याकाठी भांग तयार करून तो प्याला. झाडाच्या सावलीत झोपी गेला. झोपताना त्याने कुंडी डोक्याखाली घेतली. तेवढ्यात दुसरा भांग्या तेथे आला. त्याने पहिल्याची कुंडी ओढून घेऊन भांग घोटली व ती पिऊन, कुंडी उशाशी घेऊन तो झोपला. मग पहिला जागा झाला. आपली कुंडी त्याने शोधली. मग भांगेच्या तारेत त्यास कुंडीत आपले डोके आहे असे वाटू लागले. त्याचे डोकीस खाज सुटली. तेव्हा तो दुसऱ्याचे डोके स्वतःचे समजून खाजवू लागला !! खाजविण्याने दुसरा माणूस जागा झाला, तेव्हा पहिल्याने त्याची क्षमा मागितली. हे काय भांगजन्य आत्मज्ञान काय ? वाहवा रे !

**३१२** (१७ : १५, २ ऑगस्ट ५८, २३०–२३३)

'एक ख्रिस्ती' पत्रात लिहितो की : नेटिव लोक अज्ञानांधकाराच्या छायेमध्ये वावरत आहेत. सद्धर्माला शरण यावे, हे सोडून तीर्थयात्रा करीत बसतात. भीमानदीच्या उगमाजवळ भिमाशंकर येथे शिवरात्रीस मोठी यात्रा भरते. ब्राह्मणलोक मंत्र म्हणून प्रवाशांच्या स्नानास पवित्र बनवितात. यात्रेच्या गर्दीत स्वस्त जिन्नसही महाग विकले जातात. एकादशण्या व ब्राह्मणभोजन यांची एकच गर्दी उडते. या यात्रेत ५०० लोकांना प्रभू येशूची वचने समजावून दिल्ही. पण बहुतेक लोकांचे लक्ष गोंधळी, वासुदेव व भोपे यांकडेच असते. खेडकडूस या ठिकाणी तंबू ठोकून मुक्काम केला आणि उपदेश केला. 'अंधारातील निरर्थक कामामध्ये भागी होऊ नका' असे येशू सांगतो. जे काही मागावयाचे ते देवाजवळ मागा.

**३१३** (१७ : १५, २ ऑगस्ट ५८, २३३–२३६)

रा. गोविंद नारायण यांनी 'लोखंडी सडकांचे चमत्कार' या नावाचा ग्रंथ लिहिला आहे. त्यात जेम्स वोटने लावलेला वाफेचा शोध आणि लोखंडी सडकेचा इतिहास यांचे वर्णन केले आहे. इंग्लंडचा एक खेडूत डाक्तर जानसन यानें असें सुचविलें की : रस्ते जर गुळगुळीत असतील तर मालाची ने आण गाड्यातून करणे सुलभ होईल. प्रथम त्यांनी सडकांची दुरुस्ती करून घोड्यांच्या गाड्या सुरू केल्या. त्यांना 'ट्र्याम रोडस' म्हणत. हे रस्तें १८०१ मध्ये सुरू झाले. पुढे टॉमस ग्रे याने लोखंडी सडकेवरून वाफेच्या गाड्या नेण्याची कल्पना सुचवून अंमलात आणली. आगगाडी हा सुधारणुकीचा खांब ठरला. धनिकांचा मोठा आश्रय मिळाल्यामुळे १८२४ मध्ये मांचेस्तरपासून लिवरपूलपर्यंत लोखंडी सडक तयार झाली. सन १८३० मध्ये आठ वाफेची यंत्रें जोडलेली आगीची गाडी प्रथम चालविण्यात आली. तिचा वेग तासाला ३० कोस होता. १८५१ पर्यंत ६८९० मैलांचा लोखंडी रस्ता तयार झाला. अमेरिकेत रेल्वेचा प्रसार फार झपाट्याने झाला. रेल्वेच्या वाहतुकीत मोठा लाभ आणि सुख आहेत. हिंदुस्थान सरकारने चापमन या गृहस्थास १८४४ पासून हे काम सांगितले. अज्ञानी लोकांच्या विकल्पाला न जुमानता गावोगाव सडका बांधण्यात आल्या. खोपवली रेल्वे तयार झाली, तेव्हा लहान मुलांच्या बळीची अफवा उठली होती. १८५३ मध्ये मुंबईहून ठाण्यापर्यंत रेल्वेगाडी चालू झाली. पहिल्या गाडीत गवरनर व मोठे हुद्देदार लोक होते.

**३१४** (१७ : १५, २ ऑगस्ट ५८, २३६–२३७)

तळापासून माथ्यापर्यंत बोरघाटाची उंची २ हजार फूट आहे. यातून आगगाडीसाठी १५ मैल रस्ता करावा लागेल. २५३५ वारांचे भुयार करावे लागेल. सुरूंगासाठी प्रत्येक आठवड्याला १८ खंडी बंदुकीची दारू लागते. हे काम २० हजार मजुरांचे आहे. पण सध्या ४-५ हजार मजूर काम करतात. मिस्तर फाविएल या कंत्राटदाराने ५९ लक्ष ७२ हजार २२० रुपयांस कामाचे कंत्राट घेतले आहे. हे काम ३ वर्षांत पूर्ण होईल.

**३१५** (१७ : १५, २ ऑगस्ट ५८, २३७–२३८)

ग्रेट इंडिया सबम्यारिन टेलिग्राफ कंपनीने विलायतेहून हिंदुस्थानपर्यंत जलमार्गाने तारायंत्र बसविण्याचे कंत्राट १० कोटी रुपयांस घेतले. (ज्ञानप्रकाशवरून)

**३१६** (१७ : १५, २ ऑगस्ट ५८, २३७–२३८)

आप्पासाहेब जमखिंडीकर यांना सरकारने निर्दोष मुक्त केले.

**३१७** (१७ : १५, २ ऑगस्ट ५८, २३७–२३८)

सदर अदालतीचे वकील फकीर आपांना नरगुंदकराशी सामील झाल्याबद्दल अटक झाली.

**३१८** (१७ : १५, २ ऑगस्ट ५८, २३७–२३८)

अहमदनगरच्या सरकारी शाळेत एका महार मुलास प्रवेश दिल्यामुळे ब्राह्मण व इतर जातीची मुले शाळेतून निघून गेली. गावकऱ्यांनी उच्च जातीसाठी वेगळी शाळा घातली आहे. पण त्यांनी नेमलेला शिक्षक गोरकाय मद्यपी आहे. किती निभावेल ते पाहू !

**३१९** (१७ : १५, २ ऑगस्ट ५८, २३७–२३८)

छापखान्याचा आक्ट मुदत संपल्यामुळे रद्द झाला.

**३२०** (१७ : १५, २ ऑगस्ट ५८, २३७–२३८)

हरि केशवजी पाठारे मागच्या महिन्यात मृत्यू पावले. त्यांनी रसायनशास्त्र व इतर अनेक लोकोपयोगी ग्रंथ केले होते. 'अट्टलचोर–दारू' हा लेख त्यांचाच होता.

**३२१** (१७ : १५, २ ऑगस्ट ५८, २३७–२३८)

बंडाच्या गडबडीत ज्यांचे नुकसान झाले, त्यांना भरपाई देण्याचे सरकारने ठरविले आहे.

**३२२** (१७ : १५, २ ऑगस्ट ५८, २३७–२३८)

एका अमेरिकन शोधकाने अशी चमत्कारिक खुरशी तयार केली की, उष्णकाळात तिच्या दोन्ही बाजूंच्या भात्यांतून वारा येतो. (जगन्मित्रवरून)

**३२३** (१७ : १५, २ ऑगस्ट ५८, २३८–२३९)

तांब्याची नाणी पाडण्याकरिता कलकत्त्यात नवी टाकसाळ सुरू होणार. (ज्ञानप्रकाशवरून)

**३२४** (१७ : १५, २ ऑगस्ट ५८, २३८–२३९)

सागर व ग्वाल्हेर हे वेगळे जिल्हे होणार. (ज्ञानप्रकाशवरून)

**३२५** (१७ : १५, २ ऑगस्ट ५८, २३८–२३९)

नान्किंग शहरात एक घंटा होती. तिचे वजन ५० हजार रत्तल होते. पेकिन शहरात ७ घंटा होत्या. प्रत्येकीचे वजन २ लाख २२ हजार रत्तल होते. मास्कोमधील घंटेचे वजन १ लाख २७ हजार ८३६ रतल आहे. क्रेमलिनमधील घंटा तर ४ लाख ४३ हजार रत्तल असून ती सर्वांत मोठी मानावी लागेल.

**३२६** (१७ : १५, २ ऑगस्ट ५८, २३८–२३९)

लंडन शहरात ३० हजार विक्रेते भाजी व मासे विकतात. इतर व्यावसायिकांची संख्या ३० हजार आहे.

३२७ (१७ : १५, २ ऑगस्ट ५८, २३८–२३९)

न्यूयॉर्क शहरातील १९,१११ शिक्षकांपैकी दोन तृतीयांश स्त्रिया आहेत. शिक्षणावर ६॥ कोटी रुपये खर्च होतो. (ज्ञानदीपिकेवरून)

३२८ (१७ : १५, २ ऑगस्ट ५८, २३८–२३९)

बंडकाळात ख्रिस्ती लोकांना मारले किंवा मारण्यास मदत केली, अशा अपराध्यांना ते ३० सप्टेंबरपर्यंत सरकारच्या स्वाधीन न झाले, तर माफी मिळणार नाही, असे सरकारने जाहीर केले. स्वाधीन होऊन पुढे चांगले वर्तन केले तर त्यांना अपराधाची माफी होईल.

३२९ (१७ : १५, २ ऑगस्ट ५८, २३८–२३९)

हैदराबादच्या निजामास पुत्ररत्नाचा लाभ झाला. गादीस वारस मिळाला.

३३० (१७ : १५, २ ऑगस्ट ५८, २३९–२४०)

बऱ्हामपूर येथे रामदोयल चक्रवर्ती या एका ब्राह्मणाच्या विधवा कन्येचा पुनर्विवाह झाला.

३३१ (१७ : १५, २ ऑगस्ट ५८, २३९–२४०)

लंडनहून आणखी ३० हजार गोरी फौज येणार, असे वर्तमान आले.

३३२ (१७ : १५, २ ऑगस्ट ५८, २३९–२४०)

लार्ड एलेनबरोच्या जागेवर त्याने राजिनामा दिल्हा म्हणून मि. स्टानलींची नेमणूक झाली.

३३३ (१७ : १५, २ ऑगस्ट ५८, २३९–२४०)

कलकत्त्यात यंदा १०० ते १०५ अंश असे विक्रमी उष्णतामान होते. २० जण मेले.

३३४ (१७ : १५, २ ऑगस्ट ५८, २३९–२४०)
तुर्कस्तानची राजधानी स्तांबूलचे वर्तमान तारायंत्रामुळे लंडनमध्ये निमिषार्धात जाऊन पोहोचते.

३३५ (१७ : १५, २ ऑगस्ट ५८, २३९–२४०)
मनुष्याचे वजन दोन पंचमांशाने कमी झाले, तर तो लगेच मरतो. यावरून दिसेल की, उपवास ही एक अघोरी चाल आहे.

३३६ (१७ : १५, २ ऑगस्ट ५८, २३९–२४०)
पासिफिक महासागरांत कॅलिफोर्नियाजवळील वांकुवर बेटात सोन्याचे साठे सापडले.

३३७ (१७ : १५, २ ऑगस्ट ५८, २३९–२४०)
जनरल हावलाकचे शव लखनौतील आलमबाग एथून लंदनला नेणार आहेत.

३३८ (१७ : १५, २ ऑगस्ट ५८, २३९–२४०)
लखनौमध्ये मातीची घरे पाडण्याकरिता हत्तींचा उपयोग करतात.

३३९ (१७ : १५, २ ऑगस्ट ५८, २४०)
युनैटेड स्तेत्स देशात जितका कागद खपतो, तेवढा इतर कोणत्याही देशात खपत नाही. फ्रान्समध्ये ७० हजार टन कागद तयार होतो. इंग्लंडमध्ये २६०० टन कागद तयार होतो. अमेरिकेत या दोन्ही देशांएवढा कागद तयार करतात. त्याचा खपसुद्धा तसाच आहे.

**३४०** (१७ : १५, २ ऑगस्ट ५८, २४०)

ज्यास अनेक प्रकारची व्यसने आहेत, त्याच्या वाऱ्यासही उभा राहू नकोस. कारण तो तुला बिघडवील.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

---

**ज्ञानोदय, पुस्तक १७, अंक १६, मुंबई, १६ ऑगस्त १८५८**

---

**३४१** (१७ : १६, १५ ऑगस्त ५८, २४१–२४३)

'निःशास्त्रवादपरीक्षा' हा ग्रंथ रा. बाबा पदमनजी यांनी रचिला. प्रस्तुत असल्या ग्रंथाची फार आवश्यकता आहे. कारण ईश्वराने शास्त्रच दिले नाही व देण्याची गरजच नाही, असे मत धरणारे लोक सध्या फार झाले आहेत. तरुणांची स्थिती फार वाईट होते. म्हणून हा ग्रंथ उपयुक्त ठरतो. पण हा ग्रंथ ठळक छापला नाही. त्यात मनस्वी चुक्या आहेत. टिंबाच्या चुक्या किती झाल्या, ते सांगवत नाही. कानामात्रा, अनुस्वार, यांच्या फार चुक्या आढळतात. याप्रकारे पुष्कळ अक्षरे घायाळ झाली आहेत. कित्येक अक्षरे गैरहाजीर आहेत. पोटकलमे टाकताना खूप गोंधळ झाला. चुक्या क्षुल्लक असल्या, तरी एवढ्या चुक्या असणे बरे नाही. इंग्रजी ग्रंथात चुक्या नसतात. मग मराठीत का बरे असाव्यात? 'आत्मारामपंत आणि मृत्युशिपाई' हा ग्रंथ बाबांनीच लिहिला. मनुष्याला ईश्वराविषयी आणि आपणाविषयी समजणे आवश्यक आहे. भीरू व सद्गुणी लोकांना रोग असतोच, हे बाबा पदमनजींचे मत चूक आहे. नीतिमानास सुख व अनीतिमानास दुःख मिळाल्यामुळेच ईश्वरी न्याय सिद्ध होतो, हे बोलणेही बरोबर नाही. साध्वी स्त्रियांच्या अंगावर चिंध्याच असतात, असा कोठेही अनुभव येणार नाही. लेखकाने एवढी अत्युक्ती करण्याचे काही कारण नव्हते.

**३४१ अ** (इंम : २४३–२४४)

**३४२** (१७ : १६, १५ ऑगस्ट ५८, २४४–२४६)

'एक नगरकर' ज्ञानप्रकाश पत्रांत लिहितो की : ब्राह्मणांना जातीचा अभिमान इतका वाटतो की, केवळ स्पर्शाच्या भयास्तव त्यांनी विद्येच्या अनंत लाभांना लाथ मारली. सरकारने लाखो रुपये खर्चून शिक्षण सुरू केले. पण हे लोक अल्पस्वल्प कारणावरून आपले अनहित करून घेतात. हेच लोक कचेरीत कोणाशीही व्यवहार करतात. शिक्षण फुकट असते, तर त्यांनी असे केले नसते. शिवाय या शाळेचा ब्राह्मण शिक्षक काही राजीनामा देत नाही! मुसलमानांच्या बाबतीत ते अन्नादि व्यवहार सोडून बाकी सर्व व्यवहार करतात. ब्राह्मणलोकांचा हा आपलपोटेपणाच नव्हे काय? महारांना मात्र ते अमंगल, हलके व मूढ समजतात. निःपक्षपाती इंग्रजांच्या राज्यात असा वेडेपणा चालणार नाही. यानेच आपला देश निकृष्टावस्थेस गेला, परदेशी लोक तर आपणांस हसतात. महारादि उपेक्षितांविषयी स्नेहभाव बाळगणे आवश्यक आहे. सरकारचे कायदे कल्याणकारक, सुज्ञ, ईश्वरमान्य असावेत. अस्पृश्यांना शाळेत प्रवेश देण्याचा ठराव सरकारने निर्भयपणाने चालू ठेवावा. लोकांच्या मूर्ख चाली मनावर घेऊ नयेत.

यावर ज्ञानप्रकाशकाराचा अभिप्राय : 'हे पत्र विचार करण्याजोगे आहे. चांगले योजून लिहिले आहे. क्वचित वाक्बाण वाजवीपेक्षा जासती झाले आहेत.'

यावर ज्ञानोदयकर्त्यांचे लेखन : 'ज्ञानप्रकाशकर्ता व पत्रलेखक नगरकर दोघेही हिंदु आहेत. उभयतांच्या मनांत गरीब बिचाऱ्या महारादि उपेक्षित लोकांविषयी स्नेहभाव आहे, हे पाहून आम्हांला फार आनंद वाटतो.

**३४२ अ** (इंम : २४६–२४८)

**३४३** (१७ : १६, १६ ऑगस्त ५८, २४८–२५०)

'ज्ञानोदय वाचणारा एक' लिहितो की : श्रावणी शुक्रवारास संपत शुक्रवार असे नाव आहे. स्त्रिया जिवत्यांची चित्रे काढून त्यांची पूजा करतात. नंतर कणकीचे दिवे लावतात. आपल्या मुलांबाळांवर संकट येऊ नये, म्हणून ही पूजा असते. पुरुषमंडळी व्यंकोबाची पूजा करतात. षोडशोपचार पूजा झाल्यावर आरती होते व नैवेद्य असतो. देवाचा प्रसाद घेतला की, घरात लक्ष्मी येते, असे मत आहे. व्यंकोबा हा गिरी बालाजीचे लहान रूप होय. बालाजीच्या पूजेसाठी रोखा लिहून घेऊन कर्ज देणारे सावकारही आहेत. गिरीला भाताच्या प्रसादाची विक्री होते. तेथे शेकडो रुपयांची दक्षिणा देवासमोर ठेवली जाते. डोळे असून पाहू न शकणाऱ्या मूर्ती पुजणे, हा भोळेपणाच नव्हे काय ? खऱ्या ईश्वरापासून ते दूर जातात. ज्यांचे ज्ञानचक्षु जागे आहेत, त्यांनाच हे समजते.

**३४४** (१७ : १६, १६ ऑगस्त ५८, २५०–२५२)

रा. गोविंद नारायण यांनी 'नीतिसंवाद' हे पुस्तक लिहिले. त्यात दीना व रामचंद्र यांचे संभाषण आहे. त्याचा मथितार्थ असा की : चोरी, असत्य, फसवणूक, लाच, ही अनीतीची वागणूक आहे. अभद्र, अपशब्द बोलून दुसऱ्याचे अंतःकरण दुखवणे ही देखील अनीती आहे. आपल्या मनात ईश्वराने नीतिदर्शक शक्ती ठेवली आहे, ती विवेकास जागे करून आपले मन ताळ्यावर ठेवते. विनाकारण दुसऱ्याच्या अब्रूस धक्का लावणे हेही पापच समजले जाते. नीतिमान लोक मस्करीतही असत्य भाषण करीत नाहीत. आळशीपणा हेदेखील पाप आहे. कारण ईश्वरास श्रम करणारे लोक आवडतात. निरुद्योगी माणसे दुराचरणी बनतात. कोणताच धंदा मुळात वाईट नाही. पण धंद्यात लबाडी करणे, हे मात्र पाप आहे. कुवासनेने वागले, तर व्यवसायाला बट्टा लागतो.

३४५ (१७ : १६, १६ ऑगस्त ५८, २५२)
अहमदनगर जिल्ह्यातील चिखली गावच्या एका गृहस्थाने आपल्या मुलीचे लग्न ११५ रुपये हुंडा घेऊन करून दिल्हे. नंतर द्रव्याची पैदास करण्यासाठी त्याच मुलीचे लग्न पाथर्डी येथील एका गृहस्थाशी लावून दिल्हे. त्याबद्दल ३१५ रुपयेही घेतले. हे प्रकरण शेवगाव येथील कोर्टात गेले आहे. (ज्ञानप्रकाशवरून)

३४६ (१७ : १६, १६ ऑगस्त ५८, २५२–२५३)
बंडकाळात पराक्रम गाजविणारे सर ह्यू रोज पुण्यास आले आहेत.

३४७ (१७ : १६, १६ ऑगस्त ५८, २५२–२५३)
शाळांना निम्मे अनुदान देण्याची योजना राबविण्यासाठी मद्रासकडे ६५ हजार रुपये मंजूर झाले. नगर जिल्ह्यात आणखी २० नवीन शाळा सुरू होणार आहेत.

३४८ (१७ : १६, १६ ऑगस्त ५८, २५२–२५३)
बंडाच्या वेळी ग्वाल्हेर परत जिंकून पुन्हा राज्यावर बसविल्याबद्दल शिंदे महाराज सर ह्यू रोजच्या सैनिकांना चांदीची पदके देणार आहेत. राज्यांत मोठ्या कामावर, लष्करांतही गोरे लोकच ठेवणार आहेत.

३४९ (१७ : १६, १६ ऑगस्त ५८, २५२–२५३)
काल्पीस ग्वाल्हेर येथे गेलेले मुंबईचे लष्कर परत येणार आहे आणि महूच्या छावणीवर राहील.

३५० (१७ : १६, १६ ऑगस्त ५८, २५२–२५३)
हिंदुस्थानाचे मुख्य सेनापती क्यांबेल यांस साली‍ना २० हजारांचे वर्षासन मंजूर झाले. सर जेम्स औटराम यांना रु. १० हजार वर्षासन मंजूर झाले.

**३५१** (१७ : १६, १६ ऑगस्ट ५८, २५२–२५३)

विलायत सरकार धारचे संस्थान खालसा करणार नाही. सध्याचा अंग्रेजी अंमल अल्पकाळाचा समजावा.

**३५२** (१७ : १६, १६ ऑगस्ट ५८, २५२–२५३)

इतालीमधील वेसुवियस हा ज्वालामुखी जागृत झाला असून त्याच्या लाव्हारसाने शेते जळून नष्ट होत आहेत.

**३५३** (१७ : १६, १६ ऑगस्ट ५८, २५२–२५३)

मद्रास मिशनच्या इमारतीत घुसून काही दंगेखोरांनी फार नासाडी केली. मिशनरी बोस्लयन यांनी पळून जाऊन जीव वाचविला. पोलिसांनी अजिबात मदत केली नाही. रे. जेन्किन्स यांनी खरे तर आधीच मदत मागितली होती.

**३५४** (१७ : १६, १६ ऑगस्ट ५८, २५३–२५५)

गेल्या वर्षी लोकांना असे वाटले की, इंग्रजाचे राज्य खचित जाईल, म्हणून त्यांनी बँकेच्या नोटा विकून टाकल्या. लोभी सावकारांनी त्या अगदी कमी दराने घेतल्या. व्यापारी लोकांचे धाडस कौतुक करण्याजोगे आहे.

**३५५** (१७ : १६, १६ ऑगस्ट ५८, २५३–२५५)

डाकेतून मोलवान जिन्नस व दस्तऐवज पाठवावयाचे असतील, तर पाकीट डिंकाने बंद करू नये, अशी सूचना पोस्ट खात्याने दिलही आहे. कारण बंद पाकिटातील कागद तपासता येत नाहीत. लाख वापरली तर मात्र चालेल.

**३५६** (१७ : १६, १६ ऑगस्ट ५८, २५३–२५५)

बंडवाले शरण आले, तर त्यांस माफी मिळेल, ही बातमी खोटी निघाली. सरकार अपराध्यांना शोधून काढून खटले भरणार आहे. कलकत्ता सेक्रेटरीने असे कळविले आहे.

३५७ (१७ : १६, १६ ऑगस्त ५८, २५३–२५५)
भडोचच्या देहेज तालुक्यातील पोस्टातील एका अफीमबाज नोकराने दगाबाजी करून लोकांच्या टपालातील कागदपत्र दाबून ठेवल्यामुळे त्यास शिक्षा होणार आहे.

३५८ (१७ : १६, १६ ऑगस्त ५८, २५३–२५५)
कलकत्त्याच्या खजिन्यातून ७० हजारांचे चलन इकडे आले.

३५९ (१७ : १६, १६ ऑगस्त ५८, २५३–२५५)
माधोपूरला १८ व गुरुदासपूर येथे २४ बंडखोरांना फाशी देण्यात आले.

३६० (१७ : १६, १६ ऑगस्त ५८, २५३–२५५)
बांडा गावी एका शिपायाला नऊ कोटींचा ऐवज सापडला.

३६१ (१७ : १६, १६ ऑगस्त ५८, २५३–२५५)
सर जमशेटजी जिजीभॉय यांचा पुतळा मुंबईत टौनहालात बसविला जाईल.

३६२ (१७ : १६, १६ ऑगस्त ५८, २५५)
अयोध्येच्या नबाबजाद्याने राणा जंगबहादूर यांना नेपाळला पत्र पाठविले की : 'इंग्रजांनी नेटिवांचा धर्म बुडविला. राजेरजवाड्यांशी दगाबाजी केली. धर्माचे संरक्षण व्हावे, म्हणून हिंदु-मुसलमानांनी त्यांचा निःपात करणे जरूरीचे आहे. तरी आम्हांला मदत करा.' यास राणा जंगबहादूराने उत्तर दिल्हे की : 'गेल्या १०० वर्षांत इंग्रज सरकारने कोणाच्याही धर्मात हात घातल्याबद्दल एकही उदाहरण नाही. आमचे लोक हरामीपणाने व घातकीपणाने वागत आहेत. ब्रिटिश लोक शहाणे, विश्वासु, प्रामाणिक, निष्कपटी असून पृथ्वीवर ते सूर्यासारखे प्रकाशतात. एखादा राजा आभाळाएवढा उंच असला, तरी त्याच्याशी हात मिळवणी करून आम्ही इंग्रजांशी युद्ध करणार नाही. बंडवाले शस्त्रे परत करून माफी मागतील, तर अजूनही त्यांचा जीव वाचेल. पृथ्वीतील कोणताही राजा तुम्हांला सामील होणार नाही.'

३६३ (१७ : १६, १६ ऑगस्त ५८, २५५–२५६)
जनरल व्हैटलाकच्या सैन्याला ९ कोटींचे जवाहीर बंडवाल्यांकडून मिळाले. हा ऐवज बाजीराव पेशव्यांचा होता, असे सांगतात. (वृत्तसारवरून)

३६४ (१७ : १६, १६ ऑगस्त ५८, २५५–२५६)
भाषांतरकर्त्यांच्या २० जागांकरिता १७ ऑगस्ट रोजी परीक्षा होईल, असे रजिष्ट्रार मिस्तर काक्सन कळवितात. (ज्ञानप्रकाशवरून)

३६५ (१७ : १६, १६ ऑगस्त ५८, २५५–२५६)
अथन नावाच्या आगबोटीसाठी ८० लाख ४५ हजार रुपये खर्च आला. (वृत्तसारवरून)

**३६६** (१७ : १६, १६ ऑगस्त ५८, २५५–२५६)
सकसेस या बोटीवरून २४ ज्वान गुलाम आले आहेत.
(वृत्तसारवरून)

**३६७** (१७ : १६, १६ ऑगस्त ५८, २५५–२५६)
माजी गवर्नर लार्ड फाकलंड यांच्या पत्नी वारल्या. (धूमकेतूवरून)

**३६८** (१७ : १६, १६ ऑगस्त ५८, २५५–२५६)
रोडंडा बेटावरील एक घड्याळ ४० वर्षें किल्ली दिल्यावाचून चालले आहे. (वृत्तसारवरून)

**३६९** (१७ : १६, १६ ऑगस्त ५८, २५५–२५६)
जालन्धास मार्निंग पोस्ट हे वृत्तपत्र सुरू झाले. (वृत्तसारवरून)

**३७०** (१७ : १६, १६ ऑगस्त ५८, २५५–२५६)
मिस्तर आहेर हे सुपरिंटेंडेंट ऑफ दि पेर्स निधन पावले. (वृत्तसारवरून)

**३७१** (१७ : १६, १६ ऑगस्त ५८, २५५–२५६)
मीरत व आग्रा विभागांतील लष्करी कायदा तहकूब झाला.
(ज्ञानप्रकाशवरून)

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**३७२** (१७ : १७, १ सप्टेंबर ५८, २५७–२५९)

'निःशास्त्रवाद परीक्षा'–ग्रंथावरून नास्तिकांची खात्री होईल की, त्यांचे मत अगदी निराधार आहे. सृष्टीवरून सारे कार्य घडते, असे मानले, तर सगळा इतिहास ही भाकडकथा ठरेल. या मताची फळेच दुःखकारक आहेत. वाईट वर्तणुकीचे लोक ईश्वरास मानीत नाहीत. सुधारणेचे व देशभिमानाचे ज्यांना प्रेम आहे, त्यांनी ख्रिस्ती धर्माच्या प्रमाणांचा शोध घ्यावा. इतर धर्मांची वृद्धी होते व क्षयही होतो. पण ख्रिस्ती धर्म मात्र सतत वाढत चाललेला दिसतो. अवघ्या हिंदुस्थानला तो समग्र ग्रासून टाकील. पण त्यानेच देशाचे मोठे कल्याण होणार आहे. ईश्वराने स्थापिलेल्या ख्रिस्ती धर्मावरच विश्वास ठेविला पाहिजे. जो धर्म खोटा असेल, तो सगळ्या भूमंडळावरून समूळ नष्ट झाला पाहिजे. निःशास्त्रवादी लोक म्हणत असतात की, प्रत्येक धर्मातील चांगल्या गोष्टी घ्याव्यात. पण ख्रिस्ती धर्म सोडला, तर इतर धर्मांमध्ये चांगले काहीच नाही. शुष्क ब्रह्मज्ञान सांगून याचा निर्णय लागणार नाही. मतलबी लोकांच्या बोलण्याला फसू नये. ज्यांनी चांगला अभ्यास केला आहे, त्यांची मते विचारात घ्यावीत. सर्वच धर्मांत भोळवटपणा आहे, हे नास्तिकांचे मतसुद्धा अगदी चुकीचे आहे. त्यांच्या मतास नक्की दिशा नसल्यामुळे ते स्वतःच भोळवटांचे शिरोमणी व पढत वेडगळ आहेत, असे समजावयास हवे.

**३७२ अ** (इंग्र : २५९–२६१)

**३७३** (१७ : १७, १ सप्टेंबर ५८, २६१–२६४)

दिनवृत्ताचा लेखक आपल्या मित्राकडे गेला. तो मित्र म्हणाला : 'आमचे लोक फार अज्ञानी आहेत. जनावराप्रमाणे फक्त पोट भरतात. खरे-खोटे, धर्म-अधर्म त्यांना कळत नाही. ब्राह्मणही समाजाच्या खऱ्या कल्याणाचा विचार करीत नाहीत. कोणी टीका केली, तर त्यास शिव्या मात्र देतात. जातिभेदाने आमच्या सुंदर देशाची नासाडी झाली. सुशिक्षित काही सुधारणा करतील म्हणावे, तर त्यांस धैर्य नाही. काही काळाने नव्या मताचे लोक वाढले, म्हणजेच खरी सुधारणा होईल. प्रसिद्धपणे चळवळ करण्यास कोणीच तयार नाही. विद्वान म्हणविणारे लोकही वेड्या चाली पाळतात. लोकांच्या भीतीने गप्प बसतात.' हा मित्र स्वतः शिक्षित असूनही मुलीचे लग्न थाटामाटाने करणार आहे. तोही सर्व चालीरीती पाळतो. दुसऱ्या गावी मंडळीच्या सभेत प्रार्थना झाली. 'येशू ख्रिस्ताने आमच्यासाठी आपला मोलवान प्राण दिल्हा. तो मोलवान मोती होता. माझे सर्व काही मी देवास दिल्हे. मोलमजुरीचे पैसेही धर्माच्या कामाकरिता देईन.' अशी प्रतिज्ञा आमच्या बांधवांनी केली. वर उल्लेखिलेला मित्र आणि ख्रिस्ती लोक यांच्या वागण्यात एवढे अंतर आहे.

**३७३ अ** (इंग्रजी : २६४–२६५)

**३७४** (१७ : १७, १ सप्तेंबर ५८, २६५–२६८)

'एक वाचणारा' पत्रात म्हणतो की : श्रावणातला पहिला शनिवार हा संपत शनिवार असतो. या दिवशी नरसोबाच्या चित्राची पूजा करून त्यास अघाड्याची माळ घालतात आणि भाताचा नैवेद्य दाखवितात. तसेच मारुतीच्या देवळात जाऊन त्याला रुईची माळ घालतात. महारूद्राचे मंत्र म्हणून त्यास अभिषेक करतात. समर्थ रामदासाने म्हटले आहे : तेथे देव कैचा मूर्खा। भ्रांति पडली। संत तुकारामांनी सांगितले की : शेंदुर लाविला धोंडा। पाया पडती पोरे रांडा। कबीराचे मत असे आहे की, 'फत्तर पुजे सो चुतिया'. असे संतांचे मत असतानाही आमचे लोक पूजा करीतच राहातात. खऱ्या परमेश्वराच्या ओळखीपासून माणसे बहकली आहेत. जे कोरीव मूर्ती घडवितात, ते सर्व शून्यातच आहेत. मंत्र म्हणणाऱ्याच्या स्वधीन देव आहे, असे सांगून लोकांना बहकवण्याचे काम उंच जातीचे लोक करतात. जो आपणांस उंच मानतो, तो गर्विष्ठ असल्यामुळे नीच पदास जातो. अभिमान टाकून निःपक्षपातीपणाने पहाल, तर हे तुम्हांस पटेल. क्रोधापासून दूर जाऊन प्रभूला शरण जा. आत्म्याचे खरे तारण साधून घ्या.

**३७५** (१७ : १७, १ सप्टेंबर ५८, २६८–२७०)

चीन देशात तिपरताला नावाच्या प्रांतामध्ये एक बलाढ्य संस्थान होते. तेथील प्रधानाचे नाव ताकुपी होते. त्याच्या कारकीर्दीत विद्या, कला व उद्योग यांस फार प्रोत्साहन मिळाले. सर्व देश परशत्रूपासून निर्भय राहिला. परंतु सुखाची मात्रा वाढली की, लोकांना दुर्बुद्धी होते, त्याप्रमाणे काही लोकांनी खोडसाळ तक्रारी काढून राणीकडे अर्जी केली. एका कोळ्याने राणीस निवेदन दिले की, घोड्याच्या पाठीवर एका बाजूस मासे व दुसरीकडे दगड नेण्याची पूर्वापार पद्धत ताकुपीने मोडली आणि दोन्ही बाजूस मासे नेण्याची तो सक्ती करतो. दुसरा मनुष्य म्हणाला की, एखादी इमारत पडली, तर ताकुपी ती पायासकट उखडून काढतो व पूर्वजांचे शिल्पविषयक अज्ञान जगजाहीर करतो. तिसरी फिर्यादी स्त्री होती. ती म्हणाली की, याने मला पतीसह सती जाऊ दिले नाही. तेव्हा राणी फार रागावली व तिने ताकुपीस नोकरीवरून काढून टाकले. ताकुपीने विनंती केली की, 'मला एखाद्या ओसाड खेड्यात राहाण्याची परवानगी द्या.' मग राणीने शोध केला, तेव्हा असे आढळले की, सगळ्या राज्यात एकही ओसाड खेडे नाही. ताकुपीची कर्तबगारी राणीच्या लक्षात आली व तिने त्याची शिक्षा रद्द केली. (मराठी ज्ञानप्रसारकावरून)

**३७६** (१७ : १७, १ सप्टेंबर ५८, २७०–२७१)

मक्केजवळ जेद्दा या ठिकाणी अरब लोकांनी दंगा करून दोन साहेब व एक मडम यांना ठार मारले. तुर्कस्थानातून मक्केकडे ५०० शिपाई रवाना झाले आहेत.

**३७७** (१७ : १७, १ सप्टेंबर ५८, २७०–२७१)

सातार्‍याची वडील राणी कराचीत मृत्यू पावली.

**३७८** (१७ : १७, १ सप्टेंबर ५८, २७०–२७१)

नानासाहेब अयोध्येच्या बंडखोर बेगमेच्या लष्कराबरोबर आहे, असे वर्तमान आहे.

**३७९** (१७ : १७, १ सप्टेंबर ५८, २७०–२७१)

अलाहाबादेकडील सुरानन किल्ल्यावर इंग्रज फौजेने हल्ला केला व ६९९ बंडखोर मारून किल्ला जमीनदोस्त केला.

**३८०** (१७ : १७, १ सप्टेंबर ५८, २७०–२७१)

एका पंतोजीने पारशी विद्यार्थ्यास लाथ मारल्याबद्दल त्याला ५ रु. दंड झाला.

**३८१** (१७ : १७, १ सप्टेंबर ५८, २७०–२७१)

भडोच जिल्ह्यातील मौजे भार्वा या गावी शाळा स्थापन करण्याच्या कार्यात अडथळा आणल्याबद्दल बापू भाटेजी हा एक सरकारी कामदार बडतर्फ झाला. लॉर्ड एल्फिस्तनसाहेबाच्या हुकुमानुसार जातीच्या कारणावरून मुलांना प्रवेश नाकारला, तर सरकारी मदत मिळणार नाही, असे जाहीर झाले.

**३८२** (१७ : १७, १ सप्टेंबर ५८, २७०–२७१)

विलायतेत एक विशाल व चमत्कारिक बिलोरी झुंबर तयार झाले. त्यात १ लाख २० हजार दिवे असून त्याची उंची १८ फूट आहे. एकंदर ३ टन बिलोर यासाठी वापरण्यात आली.

**३८३** (१७ : १७, १ सप्टेंबर ५८, २७०–२७१)

मुंबईचे गवरनर लॉर्ड एल्फिन्स्टन यांनी तीन दिवस नगरला मुक्काम केला.

**३८४** (१७ : १७, १ सप्टेंबर ५८, २७०–२७१)

गवरनर जनरल यांना आणखी ६ महिने अलाहाबादेत राहण्याची परवानगी मिळाली.

**३८५** (१७ : १७, १ सप्टेंबर ५८, २७०–२७१)
होड बेटातील भूमिकंपामुळे पाण्याचे दरोबस्त झरे आटून गेले.

**३८६** (१७ : १७, १ सप्टेंबर ५८, २७०–२७१)
लार्ड कार्लिंगटन याने मनुष्यास हवेत उडता येईल, असे एक यंत्र तयार केले असून त्याचा चमत्कार बेलफयास्त येथे दाखविण्यात येईल.

**३८७** (१७ : १७, १ सप्टेंबर ५८, २७१–२७२)
युरोपात २८ लाख सैनिक असून त्यांचा सालीना खर्च ८० कोटी रुपये आहे. लष्कराकरिता सात अर्ब साठ कोटी रुपयांची जमीन वापरात आहे. त्याचे व्याजच ३० कोटी झाले असते. हे सैनिक काही दुसरे काम करीत असते, तर त्यांचे उत्पन्न ३१ कोटी २० लक्ष झाले असते. व्यापारी व शेतकरी यांनी दिलेला हा अप्रत्यक्ष करच समजावा लागेल.

**३८८** (१७ : १७, १ सप्टेंबर ५८, २७१–२७२)
युरोपमध्ये द्वंद्वयुद्धाची क्रूर चाल आहे. दोघे वीर पिस्तुलांचा उपयोग करून एकमेकांस जिवे मारतात. पण ससा किंवा कोंबडा मेल्यामुळे जेवढा उपयोग आहे, तेवढाही माणसाचा नाही, असे एक अमेरिकन इंडियन म्हणाला.

**३८९** (१७ : १७, १ सप्टेंबर ५८, २७१–२७२)
कर्नल माल्कमच्या हुकमाखाली १५० घोडेस्वारांची खास पलटण तयार होईल. (वृत्त)

**३९०** (१७ : १७, १ सप्टेंबर ५८, २७१–२७२)
ग्वाल्हेर महाराजांच्या खजानबीस बंडखोरीबद्दल फाशी देण्यात आले. (वृत्त)

**३९१** (१७ : १७, १ सप्टेंबर ५८, २७१–२७२)

सिंधु नदीवर ओरिएंटल स्टीम कंपनीच्या आगबोटी जानेवारीपासून सुरू होणार. (वृत्तसारवरून)

**३९२** (१७ : १७, १ सप्टेंबर ५८, २७१–२७२)

अहमदनगरचे असि. कलेक्टर मि. थेलवाल घोड्यावरून पडून मृत्यू पावले. (ज्ञानप्रकाशवरून)

**३९३** (१७ : १७, १ सप्टेंबर ५८, २७१–२७२)

बंडकाळात शिपायांनी ग्वाल्हेर तिजोरीतून ६८ लाख रुपये व जवाहीर लुटून नेले. (ज्ञानप्रकाशवरून)

**३९४** (१७ : १७, १ सप्टेंबर ५८, २७१–२७२)

यंदा विलायतेच्या निर्यात व्यापारात १ कोटी ११ लाख ७५ हजार रुपयांची तूट आली. (ज्ञानप्रकाशवरून)

**३९५** (१७ : १७, १ सप्टेंबर ५८, २७१–२७२)

कराचीच्या कस्टम खात्यास सालगुदस्तपेक्षा ४,३९० रुपयांचे जास्त उत्पन्न आले. (ज्ञानप्रकाशवरून)

**३९६** (१७ : १७, १ सप्टेंबर ५८, २७१–२७२)

रेल्वे कंपनीस गेल्या वर्षीपेक्षा ६,८८० रुपये अधिक मिळाले. (ज्ञानप्रकाशवरून)

**३९७** (१७ : १७, १ सप्टेंबर ५८, २७२)

सन १८४६ ते ५६ या दशकात ब्रिटन व ऐरलंड येथील २८ लाख लोक मुशाफरीसाठी दुसऱ्या देशात गेले होते. गेल्या तीनशे वर्षांत कोणत्याही देशातील इतके लोक परदेशी गेले नव्हते.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

---

## ज्ञानोदय, पुस्तक १७, अंक १८, मुंबई, २२ सप्टेंबर १८५८

---

**३९८** (१७ : १८, २२ सप्टेंबर ५८, २७३–२७६)

'स्वदेशाचा खरा हितेच्छु' लिहितो की : एखाद्या परदेशस्थ माणसाने काही वर्षांमागची वर्तमानपत्रे वाचली, तर त्यास वाटेल की, येथील सुशिक्षित तरुण वेडगळ चालीवर धैर्याने टीका करीत होते. मग या देशाचा उर्जित काळ जवळ आला असेल. चालीरीतीत हितावह असे फेरफार झाले असतील. पण हे 'सुधारक' हिंदू झोपी गेलेले आहेत. सन ४९–५० मध्ये लोकहितवादीने १०० पत्रे लिहिली. पण त्याचा निर्भयपणा व निःपक्षपातीपणा म्हणजे केवळ शब्दभांडण टरलेले आहे. सनातनी पंडितांना तो ग्रामकंटक, देशकंटक, मनुष्यांचे वैरी म्हणत असे. पण कृतीचा पत्ताच नाही. २८ जुलै १८५० च्या प्रभाकरात त्याने विधवांचे दुःख कळवळून वर्णन केले. हे शहाणे विद्वान आता मारल्याच्या पुढे आणि पळल्याच्या मागे जातील व सुधारणेचे पाऊल पुढे पडेल, असे वाटले होते. परंतु एकाही सुशिक्षिताने आपल्या विधवा कन्येचा विवाह केला नाही. किंवा आपण स्वतः एखाद्या विधवेशी लग्न लावले नाही. त्यांच्या उपहासास्पद वागणुकीवरून फार दुःख होते. त्यांचे बोलणे व करणे असंगत आहे पहा!

**३९८ अ** (इंग्र : २७६–२७७)

**३९९** (१७ : १८, २२ सप्टेंबर ५८, २७८–२७९)

'एक मित्र' लिहितो की : पंढरपूरच्या यात्रेत शुभवर्तमान सांगण्याकरिता मी गेलो. पुंडलीक वरदाचा गजर करणारे वारकरी हातात पताका घेऊन नाचत होते. गावप्रदक्षिणेच्या रस्त्यावर नेहमीसारखी झिंबड मात्र नव्हती. विठोबाच्या देवळात पहिली पायरी नामदेवाची आहे, तर समोरच चोखामेळ्याचा पार आहे. चोख्याला रावळात जाण्याची मोकळीक मिळत नव्हती. देवळातल्या गर्दीत लोक चिरडले जात होते. 'मेलो', 'चिरडलो' चे उद्गार ऐकू येत होते. काहींची डोकी फुटून रक्तबंबाळ झाली. पहा हे लोक अज्ञान-समजुतीने कसे शरीरास इजा करून घेतात. अंगाला घाम आला तर सजीवपणाच्या साक्षात्काराची खूण मानतात. विठ्ठलास सालीना २॥ हजारांचे वेतन असून एकूण उत्पन्न ३० हजारांचे आहे. शिवाय बडव्यांचे उत्पन्न वेगळे. गोपाळपुऱ्यांत इतकी रेटारेटी झाली की, पुलावरून पडून एक मुलगी मृतप्राय झाली. लहान रस्ते, महाग जिन्नस व जागोजाग दुर्गंधी, असे या गावाचे स्वरूप आहे. सरकारी वर्षासन बंद झाले, तरी बडव्यांचे काही अडणार नाही. सरकारी कामदारांचे पगार मात्र कमी झाले आहेत. सरकारास ही मोठी लज्जेची गोष्ट आहे. यावर ज्ञानोदयकर्त्यांचे लेखन : मूर्तिपूजेला आश्रय देणे, हेच मुळी सरकारास अश्लाघ्य आहे. पंढरपूरच्या देवस्थानाला लोकांकडून वर्षाकाठी उत्पन्न आहे. शिवाय दरसाल सरकार २५०० रु. देते. कामदारांच्या पगारांत मात्र सरकार ५।१० असे कमी करते. मूर्तिपूजा, यात्रेची गर्दी, त्या काळातील पंढरपुरातील दुर्गन्धी, रोग, वगैरे पाहाता ख्रिस्ती सरकारने पंढरपूरच्या देवस्थानास सालीना मदत देणे, ही मोठी लज्जास्पद गोष्ट आहे.

**३९९ अ** (इंम : २८०–२८१)

**४००** (१७ : १८, २२ सप्टेंबर ५८, २८१)

सन १८२१ ते ५६ या काळात कामन्स सभेत १०,२१८ अर्ज आले. त्यावर दरवर्षी १६,८७,९३३ लोकांच्या सह्या होत्या. चोवीस वर्षांत एकंदर २,९६,९४२ अर्ज आले. त्यावर ७,२१,०७,३२२ जणांच्या स्वाक्षऱ्या होत्या.

**४०१** (१७ : १८, २२ सप्टेंबर ५८, २८२–२८३)

'एक मित्र' लिहितो की : देवाची पूजा केल्यामुळे तो प्रसन्न होतो, अशी समजूत आहे. रावणाने सर्व देव बंदीत घातले. जे देवांना राबवितात त्यांनाही देव म्हणण्याची यांची चाल आहे. काही देव साळ्या कोष्ट्याच्या घरीही राबतात. नळ, नीळ, जांबुवंत, हेही देवच आहेत. शिवाय पीर, ताबुत, झाडे, चतुष्पाद, हेही देवच होत. साती सटवाया, भवान्या, कुंड मावलाया, या सर्वांनाही देव मानतात. ही मोठीच गर्दी व पलपलाट आहे. एवढ्या देवांची पूजा करण्यास कित्येक पखाली पाणी लागेल. त्यांच्या नैवेद्यातही चमत्कार आहे. कारण काही देवांना मांसाचा नैवेद्य चालत असतो. सर्वांचे नामस्मरण करावे म्हटले, तर २ वर्षे १ महिना १३ दिवस ३ तास ३३ मिनिटे व २ सेकंद लागतील!

४०२ (१७ : १८, २२ सप्टेंबर ५८, २८३–२८५)

इंग्रजी भाषा शिकल्यामुळे उदरनिर्वाह होतो. म्हणून लोक स्वभाषेविषयी अनास्था बाळगतात व इंग्रजीच शिकतात. मातृभाषा शिकून स्वदेशाचे कल्याण करण्याचे कोणी मनास आणीत नाही. इंग्रजी भाषा त्यांस गहन वाटती व तिचे ज्ञान संपादन केले की, पृथ्वीवर जन्मल्याचे सार्थक झाले, असे ते समजतात. ज्ञानाची व ग्रंथांची भर टाकून स्वभाषेचे वैभव वाढवावे, असे कोणास वाटत नाही. उलट परभाषेतील हजारो शब्द अपभ्रष्ट होऊन स्वभाषेत येत आहेत. काही लोक इंग्रजीत लांबलांब भाषणे करतात. पण स्वभाषेत चार शब्दही बोलू शकत नाहीत. स्वभाषेचा त्यांस तिरस्कारच असतो. मराठी सभेस ते जात नाहीत. नाबेल्स वाचतात किंवा स्वस्थ झोपतात. मराठीचे नाव घेताच त्यांच्या भोवयास आठ्या पडतात. मुलांना इंग्रजी शाळेत घालतात. इंग्रजीतून अभिवादन करण्यास शिकवितात. त्यातून मुलाचे स्वभाषेचे ज्ञान फार कच्चे राहाते. घरात धेडगुजरी भाषेतूनच बोलत असतात. स्वभाषेचे नीट ज्ञान करून घेऊन मगच परभाषेच्या संपादनाकरिता झटले पाहिजे. सध्या उलटा प्रघात दृष्टीस पडतो. इंग्रजी व्याकरण पोपटासारखे पाठ करण्याऐवजी आधी मराठी व्याकरण समजून घेतले, तर इंग्रजी लवकर येईल. (ज्ञानप्रकाशवरून)

४०३ (१७ : १८, २२ सप्टेंबर ५८, २८५–२८७)

शिंद्यांच्या भिंड येथील सुभेदाराने तात्या टोपाच्या कुटुंबातील १२ आप्तांना कैद करून ग्वाल्हेरीस पाठवून दिले.

४०४ (१७ : १८, २२ सप्टेंबर ५८, २८५–२८७)

लाला ज्योतिप्रसाद या हिंदु सावकाराने बंडाच्या धामधुमीत सरकारला अन्नसामुग्री पुरविली, म्हणून त्यास २४ हजार रुपये उत्पन्नाची १९ गावांची जहागीरी देण्यात आली.

४०५ (१७ : १८, २२ सप्टेंबर ५८, २८५–२८७)

बंडाच्या लुटीतून जनरल व्हिटलॉक साहेबांच्या वाट्याला ८ लाख रुपये आले.

४०६ (१७ : १८, २२ सप्टेंबर ५८, २८५–२८७)

काळ्या पाण्याची शिक्षा झालेले ३०० कैदी बंडखोर मुंबईकडे रवाना झाले.

४०७ (१७ : १८, २२ सप्टेंबर ५८, २८५–२८७)

ग्वाल्हेरनजीक पौरी किल्ल्यात इंग्रजांनी बंडखोरांचा पराभव करून त्यांस पळवून लावले.

४०८ (१७ : १८, २२ सप्टेंबर ५८, २८५–२८७)

द्वारकेजवळ मोहरमच्या वेळी दंगल होऊन सहाजण जखमी झाले. ८० हजारांचा ऐवज लुटला गेला.

४०९ (१७ : १८, २२ सप्टेंबर ५८, २८५–२८७)

तुर्कस्थानात दुष्काळाचे संकट नाहीसे व्हावे, म्हणून लोकांचे बळी देण्याची प्रथा आहे. एकाने थडग्यात पुरलेले प्रेत उकरून काढून शिरच्छेद केला. कारण काझी बळीस परवानगी देईना.

४१० (१७ : १८, २२ सप्टेंबर ५८, २८५–२८७)

ग्वाल्हेरमध्ये बंडखोर पुन्हा जमाव करू लागले आहेत.

४११ (१७ : १८, २२ सप्टेंबर ५८, २८५–२८७)

जगन्नाथ शंकरशेट यांनी सरकारी पदार्थसंग्रहालयास ५०० रुपयांची मातीची चित्रे दिली.

**४१२** (१७ : १८, २२ सप्तेंबर ५८, २८५–२८७)

मुंबईतील सुशिक्षित पारशांनी एक मंडळ स्थापले असून तेथे प्रत्येकाने पत्नीसह यावे, असा नियम केला आहे. यातून स्त्रियांची छळणूक व दुःख कमी होईल.

**४१३** (१७ : १८, २२ सप्तेंबर ५८, २८७)

हिंदुस्थानचा कारभार ईस्ट इंडिया कंपनीकडून नामदार व्हिक्टोरिया राणीसाहेबांच्या हाती गेलेला आहे. त्या स्वतः १५ जणांचे इंडिया कौन्सिल नेमणार आहेत.

**४१४** (१७ : १८, २२ सप्तेंबर ५८, २८७–२८८)

चीन देशात परकीयांना कोठेही फिरण्याची मोकळीक मिळाली आहे.

**४१५** (१७ : १८, २२ सप्तेंबर ५८, २८७–२८८)

मुंबईत एका हिंदूने मुस्लीम धर्म स्वीकारला.

**४१६** (१७ : १८, २२ सप्तेंबर ५८, २८७–२८८)

ऐरलंडमध्ये डब्लिन शहरात दर हजारी ३८५ बालमृत्यू होत असत. म्हणून तेथील वैद्यांनी खराब वायू खोल्यांतून निघून जाण्याची व्यवस्था केली. हवेशीर खोल्यांमुळे मृत्यूचे प्रमाण हजारी ३९ एवढे खाली आले. आमच्या देशात मात्र अंधाऱ्या व बंद खोलीत शेगड्या जाळतात.

**४१७** (१७ : १८, २२ सप्तेंबर ५८, २८७–२८८)

ऐरलंड व न्यू फौंडलंड यांच्यामध्ये तारायंत्र सुरू झाले.

**४१८** (१७ : १८, २२ सप्तेंबर ५८, २८७–२८८)

कोळशाची दारूमिश्र भुकटी तोफखान्यात ठेवून फ्रेंच सेनापतीने कोठाराच्या आगीस प्रतिबंध केला.

**४१९** (१७ : १८, २२ सप्टेंबर ५८, २८७–२८८)

नामदार राणीच्या फ्रेंच दौऱ्याच्या वेळी ५० हजारांचा खर्च करून तोफांची सरबत्ती करून तिचा सन्मान केला. (बा. दा. वरून)

**४२०** (१७ : १८, २२ सप्टेंबर ५८, २८७–२८८)

वाई, जिल्हा सातारा, या ठिकाणी पोस्त ऑफिस सुरू झाले. (ज्ञानप्रकाशवरून)

**४२१** (१७ : १८, २२ सप्टेंबर ५८, २८७–२८८)

बडोद्यात हत्यारे जप्त करण्याचे काम जारीने चालू आहे. (ज्ञानप्रकाशवरून)

**४२२** (१७ : १८, २२ सप्टेंबर ५८, २८७–२८८)

कानपूरच्या किल्ल्याजवळ पाऱ्याची खाण सापडली. (ज्ञानप्रकाशवरून)

**४२३** (१७ : १८, २२ सप्टेंबर ५८, २८७–२८८)

पुण्यात संगमाजवळ व साताऱ्यास शिपाई लैनीजवळ असे दोन किल्ले इंग्रज सरकार बांधणार आहे. (ज्ञानप्रकाशवरून)

**४२४** (१७ : १८, २२ सप्टेंबर ५८, २८८)

लंडन शहरामध्ये ४९१ धर्मखाती आहेत. त्यांचा सालीना खर्च दोन कोटी रुपये आहे. इंग्रज लोक किती मायाळू व परमार्थी आहेत ते यावरून दिसते. (बा. दा. वरून)

**४२५** (१७ : १८, २२ सप्टेंबर ५८, २८८)

सन १८५५ मध्ये ग्रेट ब्रिटनाच्या खाणीतून ज्या वस्तू काढल्या, त्यांची किंमत ३२ कोटी रुपये. या वस्तू साफ केल्यावर त्यांची विक्रीची किंमत ४० अर्ब रुपये झाले.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १७, अंक १९, मुंबई, १ अक्टोबर १८५८

**४२६** (१७ : १९, १ अक्टोबर ५८, २८९-२९१)

'स्वदेशाचा खरा हितवादी' लिहितो की : सुधारकांनी बालविवाह, विवाहाचा खर्च, नाचबैठका, या रीती कधी सोडल्या काय ? वाईट चालरीतींमुळे देश खराबीस आला, अशी यांची खातरी झाली आहे. पण हे महारास पंक्तीत घेतील काय ? लोकहितवादीने ढोंगी साधूंवर कडक टीका केली. त्याला विधवांची कीव आली, तरी त्याने एखादी मंडळी त्यासाठी स्थापिली काय ? नाही. कारण त्यास वास्तविक काळजी नाही. नुसते बोलावे, पण करू नये, असे लोक फार आहेत. अतिशूद्रांच्या शाळेसाठी ३९ जणांनी देणग्या देण्याचे कबूल केले. पण १६ जणांनी तो उपक्रम बंद केला. आता फक्त २४ रु. जमतात. सरकारी कामदारसुद्धा वर्गणी देत नाहीत. एकट्या पुणे शहरात फक्त ३९ सुधारक आहेत व त्यांनाही खरा कळवळा नाही. रांडेने नाच केला, तर ५ रु. बिदागी देतात मात्र ! बुके व अतिशूद्र यांच्याकरिता देणगी देणे त्यांच्या जिवावर येते. ज्ञान आहे, पण त्याप्रमाणे वर्तण्याचे धैर्यच त्यांच्यात आढळत नाही. महारमांगांना मदत केली, तर मुलांची सोयरीक होणार नाही, या भीतीने ते गप्प बसतात. आपण स्वतः दुःख सोसून आपल्या लोकांचे हित करावे, हे त्यांच्याने होत नाही.

**४२६ अ** (इंम : २९२-२९३)

**४२७** (१७ : १९, १ अक्टोबर ५८, २९५–२९९)

'एक फिरस्ता' लिहितो की, शाळेत ख्रिस्ती शास्त्र शिकविण्याने मुलांची बुद्धी प्रकाशित होते. हेंदेत व धुरात वाढणारी मुले रोगट असतात. तशी शास्त्र न वाचणारांची दयनीय अवस्था आहे. आपण ज्यावर विश्वास ठेवतो, तोच खरा धर्म, अशी यांची लाडकी समजूत आहे. वडलोपार्जित मतांना आड येणारा अयुक्तिकपणा ते एकीकडेच गुंडाळून ठेवतात. त्यातून विद्यार्थ्यांच्या सुधारणेस विघ्न येते. एखादे मत पारंपरिक आहे, एवढ्याच कारणाने पुढे चालविले, तर ज्ञानाची वृद्धी कशी होणार? खोटेपणा, मुलथापा, दुराग्रह, यांचा काही उपयोग नाही. सत्य हे सर्व देशांत सारखेच असते. एखादे मत विपरीत भासले, तरी ते वास्तविक सत्य असते. पूर्वग्रह सोडल्याशिवाय शास्त्रीय विषयाचे ज्ञान होणार नाही. रुप्यापेक्षा बोध व सोन्यापेक्षा ज्ञान मौल्यवान आहेत. सगळी विद्या काय ती पोट भरण्याचीच असते, हा आणखी एक गैरसमज आहे. राख फासून भीक मागूनही पोट भरते. ख्रिस्ती शास्त्र सांगते की, काळ हे अमोलिक धन आहे, म्हणून सद्गुण वाढवावेत. आळस, मौज, द्वाडपणा करू नयेत, ईश्वरदत्त देणग्या उधळून टाकण्याचा कोणालाही अधिकार नाही. सत्यप्रीती व सत्याचा अंगीकार करण्याचे धैर्य मानवाच्या मनात असावे लागते. जातीचे गुलाम झालेले लोक आप्तांच्या आज्ञेत वागतात. गुरूची मूर्ख मतेही स्वीकारतात. लोकविरोध व मरणाचे भय यांस न जुमानता सत्याचा स्वीकार करा. जे मनाला पटले, ते बोलण्याचे धैर्यसुद्धा भेकडांच्या अंगात नसते. स्वार्थाची दृष्टी अजिबात सोडावी. ख्रिस्ती शास्त्राने नास्तिकांचा तिरस्कारसुद्धा जिंकला. तरी पवित्र शास्त्राचे काही सोपे भाग शाळेत शिकविण्यास सुरुवात करावी.

**४२७अ** (इंग्र : २९३–२९५)

**४२८** (१७ : १९, १ अक्टोबर ५८, २९९)

उत्तर अमेरिकेत ५ मोठी सरोवरे आहेत. त्यांनी ९० हजार चौरस मैलांची जागा व्यापली असून त्यांची लांबी १५३४ मैल आहे.

४२९ (१७ : १९, १ अकटोबर ५८, ३००–३०१)

अहमदनगरमधील बांबोरांचा पंतोजी लिहितो की : लोणी गावी तीनशे वारकऱ्यांचा समुदाय जमला होता. त्यांना शुभवर्तमान सांगितले. पूजा हे पाप असून ईश्वराविरूद्ध बंड आहे. एक प्रकारचा व्यभिचार आहे. प्रतिमापूजा निषेधार्ह आहे. ईश्वर हा प्रभूंचा प्रभू असल्यामुळे त्याची कोणतीही आज्ञा मोडू नये. पंढरीस गेले असता लुबाडणाऱ्या पुजाऱ्यांशी मात्र गाठ पडते. द्रव्याची हानी व शरिरास इजा, एवढाच लाभ होतो. कुटुंबात राहून खऱ्या आत्म्याने व भक्तीने प्रार्थना करावी, असा उपदेश त्यांना केला. धर्मसंबंधी पुस्तके वाटल्यावर दोघांनी बीजमंत्र मागितला. एतद्देशीयांचा धर्मरूप कुजट वृक्ष लवकरच कोसळून पडेल व खिस्ताचे राज्य गाजेल, यात शंका नाही.

४३० (१७ : १९, १ अकटोबर ५८, ३०१)

उत्तर हिंदुस्थानात गेल्या वर्षी चपात्या वाटल्या जात होत्या. यंदा निजामाच्या राज्यात लाडू वाटण्याचा नूतन उपक्रम सुरू झाला आहे. बुलढाण्याच्या कमिशनरने असे ४० लाडू पकडले. हे लाडू कुत्र्यांस खाऊ घाला, अशी सांकेतिक चिठ्ठी त्याबरोबर होती. चपात्यांबरोबर असाच निरोप येत असे. 'फिरंगी लोकांचा संहार करा' असाच मतलब असावा. आता हैदराबादेतील फौज बुलढाण्यास गेली असून बंदोबस्त व्यवस्थित झाला आहे. कोणीतरी दुसऱ्याचे घर दाखवून स्वतः चोरापासून अलख राहाण्याचा प्रयत्न करीत आहे, म्हणूनच हे लाडू मुंबईस जात आहेत, असाही देखावा करण्यात आला. (ज्ञानप्रकाशवरून)

**४३१** (१७ : १९, १ अकटोबर ५८, ३०१–३०२)

सिंगापूर हे बेट इंग्रजांच्या ताब्यात आहे. काळ्या पाण्याची शिक्षा झालेले कैदी तेथे ठेविले जातात. गतवर्षी १६ हजार कैदी तिकडे रवाना करण्यात आले, तर ५०० जण शिक्षेची मुदत संपल्यामुळे मुक्त झाले. या कैद्यांना सक्तमजुरी करावी लागते. तरी त्यांना मोकळे फिरण्याची परवानगी असते. ते स्वतः धंदा करू शकतात. त्यांस बेड्या घातल्या जात नाहीत. चिनी गलबतांची तेथे आवक असल्यामुळे चिनी कैद्यांना मात्र बाहेर सोडीत नाहीत. (ज्ञानप्रकाशवरून)

**४३२** (१७ : १९, १ अकटोबर ५८, ३०२–३०३)

१४ आगस्त रोजी राबर्टसाहेबाने ग्वाल्हेरच्या बंडखोरांचा पराभव केल्यानंतर ते मध्यहिंदुस्थानकडे वळले. ब्रिगेडियर पामर्सच्या सैन्याला भिऊन जलरापट्टणकडे वळले. तेथील राजा इंग्रजांना शरण आला म्हणून बंडखोरांनी नीमचला जाऊन ४० तोफा हस्तगत केल्या. त्यांत तात्या टोपेही असावा, असा अंदाज आहे. इंग्रज लष्कराने महूस छावणी उभारली असून सर ह्यू रोज सैन्य घेऊन तिकडे जाईल.

**४३३** (१७ : १९, १ अकटोबर ५८, ३०२–३०३)

ग्वाल्हेरीस नानासाहेबाचे ४ हस्तक पकडण्यात आले. ग्वाल्हेरचे सहा हजार लोक नानाला मदत करतील, अशी वल्गनाही बंडखोर करीत आहेत. इंग्रज लष्कराने ६० दंगलखोरांना पकडून त्यांस जागेवरच तोफेच्या तोंडी दिले. शिंदेसरकार मात्र मनापासून इंग्रजांना मदत करीत आहेत. पण आपल्या राज्यातील फितुरांचा शोध त्यांनी घेऊ नये, याचे आश्चर्य वाटते.

**४३४** (१७ : १९, १ अकटोबर ५८, ३०२–३०३)

गुणा नदीच्या आग्नेय दिशेकडील काठावर रॉबर्टसनने आपल्या सैन्यासह बंडखोरांवर हल्ला करून ५०० बंडखोर ठार मारले. प्रेतांचा ढीग पडला होता.

४३५ (१७ : १९, १ अकटोबर ५८, ३०३–३०४)
तिबेटात याक किंवा बनगाय हे उपयुक्त जनावर आढळते. फ्रेंच वकिलाने अशी ११ पिले स्वदेशास नेली. ती आता विस्तीर्ण बागेत ठेवली जातील.

४३६ (१७ : १९, १ अकटोबर ५८, ३०३–३०४)
रेलवे कंपनीने दुसऱ्या प्रतीचें गाडीचे भाडे निम्म्याने कमी केले.

४३७ (१७ : १९, १ अकटोबर ५८, ३०३–३०४)
मुलतानच्या दंगलीत गोऱ्या पलटणींनी अनेक दंडखोर मारले.

४३८ (१७ : १९, १ अकटोबर ५८, ३०३–३०४)
इंग्रज-फ्रेंचांनी दंगलखोर अरबांच्या मक्का येथील जहाजावर गोळ्यांचा भडिमार करून त्यांचा अगदी नाश केला.

४३९ (१७ : १९, १ अकटोबर ५८, ३०३–३०४)
इंग्रजसरकार आपल्या पराक्रमी सैनिकांना २८ लाख रुपयांची बक्षिसे वाटणार आहे.

४४० (१७ : १९, १ अकटोबर ५८, ३०३–३०४)
लखनौमध्ये मोहरम शांततेने पार पडला.

४४१ (१७ : १९, १ अकटोबर ५८, ३०३–३०४)
हिंदुस्थानचे मुख्य सेनापती सर कुलिन कांबेल यांना राणीने ब्यारन वलैद हा किताब दिला.

४४२ (१७ : १९, १ अकटोबर ५८, ३०३–३०४)

एका खिस्ती भजनगृहाजवळ महादेव, मारुती, नंदी, अशा तीन मूर्ती सापडल्या. काही पोटबाबू लगेच त्यांचे पुजारी झाले. देवांच्या दर्शनासाठी एवढी गर्दी जमली की, पोलीस बोलावणे भाग झाले. या मूर्ती अकस्मात् तेथे कशा आल्या, याची चौकशी पोलीस करीत आहेत. रात्री कोणीतरी मूर्ती उचलून नेल्या. भोळे लोक तोंडघशी पडले.

४४३ (१७ : १९, १ अकटोबर ५८, ३०४)

अटलांटिक महासागराच्या तळाशी तार टाकून तारायंत्र झाले, तेव्हा जो संदेश पाठविला गेला, त्यात 'परम उंचामध्ये देवाला गौरव आणि पृथ्वीवर शांति, माणसावर कृपा' हे शास्त्रातले वाक्य होते. ३१ शब्दांचा निरोप ३५ मिनिटांत पोहोचला. तारेचे काम यथास्थित चालू आहे. त्यात चूक नाही.

४४४ (१७ : १९, १ अकटोबर ५८, ३०४)

सिंध देशात नौशेरा तालुक्यात एका लाकूडतोड्यास नाग डसला, तेव्हा त्याने कुऱ्हाडीच्या एकाच घावात नागाचे दोन तुकडे केले. दुसऱ्या घावाने हाताच्या ज्या बोटास नागाने दंश केला होता, ते बोटही तोडले. काही दिवस हास्पितळात राहिल्यावर तो बरा झाला.

४४५ (१७ : १९, १ अकटोबर ५८, ३०४)

आताशी संध्याकाळी ७ वाजेपर्यंत आकाशात शेंडे नक्षत्र दिसते. ते पश्चिमेकडून पूर्वेकडे दररोज ५ मैल चालते.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**४४६** (१७ : २०, १५ अकटोबर ५८, ३०७–३११)

विजागपट्टनच्या मिस्तर पी. जगन्नाथ यांना ख्रिस्ती उपदेशकाची दीक्षा देण्यात आली. १८४० मध्ये ते विद्यार्थी असताना रे. हेय हे मुख्याध्यापक होते. संपत्ती व अन्न हाच शिक्षणाचा उद्देश मानल्यामुळे ते धर्माबद्दल विचार करीत नसत. वैष्णवपंथी जगन्नाथास कोणी देवावर टीका केली, तर फार राग येई. ते कर्मठ ब्राह्मण होते. मि. गार्डनसाहेबाजवळ ते इंग्रजी शिकले. त्याच शाळेत शिक्षक झाल्यावर ख्रिस्ती शास्त्राच्या वर्गात बसू लागले. जगात पाप आहे की नाही, यावरून वाद घालू लागले. हेय म्हणत असतात की, पाप आहे व तारणाराची फार गरज आहे. वेदांताने योग्यायोग्य काय, ते समजत नाही. अंतःकरण कष्टी व व्याकुळ झाले. नातेवाईकांना सोडून देऊन ते ख्रिस्ती झाले. गायत्री मंत्र म्हणणाऱ्या जगन्नाथास काही दिवस द्विविध वागणूकही करावी लागली. बागेमध्ये जाऊन ते 'यात्रिकक्रमण' वाचीत. मृताचे क्रियाकर्मांतर व लग्नविधी पाहून मन विटले. आपले 'खरे वतन' शोधण्यासाठी ते ख्रिस्ती झाले. पालकांचा धाकदपटशा व मित्रांची टिंगल, यांची पर्वा न करता ख्रिस्तास शरण गेले. तारणारा हा मोठ्या मोलाचा मोती आहे. त्यानेच आता धर्मप्रसाराचे कार्यही त्यांच्यावर सोपविले आहे. सैतानाच्या विघ्नांना दाद न देता प्रभूचे कार्य करावयाचे आहे.

**४४६ अ** (इंम : ३०५–३०७)

**४४७** (१७ : २०, १५ अक्टोबर ५८, ३१२-३१३)

शेक वली महमदाची हकीगत सांगताना 'एक ख्रिस्ती' लिहितो की : तो सुरतेचा राहणारा असून त्याचे शिक्षण गुजरातीत झाले. कर्नल सिंक्लेयर साहेबाकडे तो चाकरीस राहिला. साहेबाच्या सांगण्याप्रमाणे तो हुशार, मेहनती व प्रामाणिक आहे. रेवरंडचा उपदेश ऐकल्यावर ख्रिस्ती धर्माच्या खरेपणाविषयी त्याची खातरी पटली. एका मौलवीने त्याचा पाठलाग व छळ करून त्याचा घात करण्याचा प्रयत्न केला. अशा संकटांनी त्याचा निश्चय अधिकच बळावला. रात्रंदिवस तो पवित्र शास्त्र वाचीत बसे. आपले उर्वरित जीवन सफल व्हावे, म्हणून त्याने ख्रिस्ती धर्माची दीक्षा घेतली. ख्रिस्तावर त्याचा मनापासून विश्वास आहे.

**४४७ अ** (इंग्र : ३११-३१२)

**४४८** (१७ : २०, १५ अक्टोबर ५८, ३१३-३१५)

महारमांगाविषयी 'कळवळा बाळगणारा' लिहितो की : पेशवाईत अस्पृश्यांना फार नीच मानीत असत. त्यांना गळ्यात काळा दोरा बांधावा लागे. घर बांधणे, उंची पांघरूणे घेणे, धोतर-पागोटे वापरणे, हे त्यास मना होते. विद्या शिकण्याचीही मनाई होती. इंग्रेजी राज्यात त्यांचे दैव उघडले. जुलूम बंद झाला. पलटणीत तर साहेबाच्या अद्यास आदे लावून राहातात. सरकारी शाळेत शिक्षण मिळते. महारांना मोठे हुद्दे मिळतात. काही महार संस्कृत शिकून ग्रंथ वाचतात. पण महारमांगांची वाईट चाल कमी होत नाही. शास्त्र वाचावे, रंडीबाजी टाकावी, गुरांना विष घालून मारू नये, दारू पिणे सोडावे, मुलींना मुरळ्या बनवू नये, अनेक लग्ने करू नयेत, भांगगांज्यापासून दूर राहावे, कारण असले उद्योग केले, तर माणूस भिकारीच राहातो. म्हणून दारू व शिंदळकी त्यांनी सोडून द्यावी. अहो महारमांग लोकहो, तुम्ही सुधारावे. सुधारला नाही, तर तुमची कशी अवस्था होईल, याचा विचार करून प्रभु येशूकडे वळा.

४४९ (१७ : २०, १५ अक्टोबर ५८, ३१५–३१६)

सगळे अशी ओरड करतात की, हा देश भिकारी झाला. पण दरिद्र आले तरी कशाने? कोणी म्हणतात जाती मोडल्या, शास्त्र सोडले, मूर्खपण वाढले, म्हणून देशास वाईट अवस्था आली. पण मिशनरी लोकांनी या देशास शहाणे करण्याचा उद्योग चालविला आहे. काही सुशिक्षितांनीही सुधारणेचा उद्योग सुरू ठेवला आहे. एकूण लोकसंख्येत श्रीमंत किती व भिकारी किती, याचा निवाडा नीट केला पाहिजे. या देशात भिक्षेकऱ्यांची संख्या फारच मोठी आहे. याचना करून पोट भरणे, यासारखे लाजिरवाणे व हलके काम दुसरे नाही. पण भिक्षा मागणे, हा प्रतिष्ठेचा धंदाच होऊन बसला. अंध, अशक्त व पंगू यांनी भिक्षा मागितली, तर ते योग्य आहे. प्रतिष्ठितपणे भिक्षा मागणे व दांडगेपणा करून भिक्षा मिळविणे, असे दोन प्रकार आढळतात. संस्कृत श्लोक म्हणून किंवा संतांच्या अभंगांतल्या ओळी गाऊन भीक मागणारे अनेकजण दिसतात. भीक मागणारे असा आव आणतात की, जगातले सर्व धंदे त्यांच्यापुढे निर्माल्यवत् आहेत. (ज्ञानप्रकाशवरून).

४५० (१७ : २०, १५ अक्टोबर ५८, ३१७–३१८)

एका शहरात कापसाची सतत चोरी होत असे. तेव्हा व्यापाऱ्याने आपल्या सर्व कामदारांना बोलावून म्हटले की, ज्याने कापूस चोरला त्याच्या दाढीला कापूस लागलेला आहे. यावर जो खरा चोर होता त्याने नकळतच दाढीस हात लावला. अशा रीतीने चोर पकडला गेला. अमेरिकेत वेबस्तर या गृहस्थानेही अशीच युक्ती योजिली होती. एका धर्मशाळेत एका वाटसरूचे बड्याळ चोरीस गेले होते. त्यावेळी २० वाटसरू मुक्काम करून होते. वेबस्तरने सर्वांना एकत्र करून सांगितले की, एका अंधाऱ्या खोलीत एक किटली ठेवलेली असून तिच्यात पक्षी आहे. प्रत्येकाने किटलीस हात लावला पाहिजे. चोराने हात लावला की पक्षी बोलेल! सर्वांनी आपापली पाळी पूर्ण केली, तेव्हा वेबस्तरने त्यांचे हात पाहिले. १९ जणांच्या हातास काळे लागले होते. ज्याचे हात स्वच्छ होते तोच चोर ठरला. कारण पक्षी बोलेल, या भीतीने त्याने किटलीस हात लावलाच नाही !

४८१ (१७ : २०, १५ अकटोबर ५८, ३१८–३१९)

बंगाल्यात बहुत ब्राह्मणी विधवांचे पुनर्विवाह झाले. मुंबई इलाख्यात अजून काहीही झाले नाही. अहमदनगरची एक ब्राह्मण विधवा गरोदर झाल्यामुळे गाव सोडून निघून गेली.

४८२ (१७ : २०, १५ अकटोबर ५८, ३१८–३१९)

न्यू कोलंबियात सोन्याच्या खाणी सापडल्यामुळे तिकडे वस्ती करण्यासाठी बरेच लोक जात आहेत.

४८३ (१७ : २०, १५ अकटोबर ५८, ३१८–३१९)

एका डच गलबतास केप आव गुड होपजवळ ९० फूट लांबीचा जलचर दिसला. तो नऊ दिवस तारवाच्या जोडीने चालला होता. बंदुकीच्या १०० गोळ्या खाल्ल्यावर रक्तबंबाळ होऊन तो निघून गेला.

४८४ (१७ : २०, १५ अकटोबर ५८, ३१८–३१९)

मागच्या अंकात निर्देश केलेल्या लाडूप्रकरणाचा शोध पूर्ण झाला. एका मारवाडी गृहस्थाने आजारातून बरे होण्यासाठी नवस केला होता व लाडू वाटून त्याने नवस पुरा केला, असे म्हणतात.

४८५ (१७ : २०, १५ अकटोबर ५८, ३१८–३१९)

मुलतानला १४३१ लोकांनी बंड केले. त्यांपैकी पुष्कळ जणांना ठार करण्यात आले. बाकीचेही मारले गेले असावेत. ७५ जणांना फाशी दिल्हे.

४८६ (१७ : २०, १५ अकटोबर ५८, ३१८–३१९)

आयोध्येत ६८२०० तर आग्र्यात ५० हजार बंडवाले असून ते सर्व गवताप्रमाणे नाश पावतील.

**४५७** (१७ : २०, १५ अक्टोबर ५८, ३१८–३१९)

तात्या टोपे भोपाळला जाणार होता. पण इंग्रजांच्या भयाने सेरोंजच्या किल्ल्यात लपून बसला.

**४५८** (१७ : २०, १५ अक्टोबर ५८, ३१८–३१९)

खानदेशच्या सरहद्दीवर १ हजार भिल्ल पुन्हा जमा झाले. इंग्रज सैन्य तिकडे जाणार आहे.

**४५९** (१७ : २०, १५ अक्टोबर ५८, ३१८–३१९)

नाशकात एका फकिराने साहेबाचे मूल मारण्याचा प्रयत्न केला. कारण पूर्वी हायलँडरसाहेबाने त्यास जमिनीवर आपटून जखमी केले होते. फकिराची शिक्षा आता चुकणार नाही.

**४६०** (१७ : २०, १५ अक्टोबर ५८, ३१८–३१९)

मुंबईमध्येही एका मुसलमाने साहेबास जबरदस्त इजा केली. तो आता कैदेत आहे. आपण हे कृत्य ईश्वरासाठी केले, असा जबाब त्याने दिल्हा आहे.

**४६१** (१७ : २०, १५ अक्टोबर ५८, ३१९–३२०)

ठाण्याहून रेल्वेने मुंबईमध्ये १५० कैदी आले. त्यांना काळ्या पाण्यावर धाडले जाईल.

**४६२** (१७ : २०, १५ अक्टोबर ५८, ३१९–३२०)

बाळारत येथे मिस्तर तामसन्साहेबाने सेकंदास दोन गोळ्या सोडणाऱ्या बंदुकीचा शोध लावला.

**४६३** (१७ : २०, १५ अक्टोबर ५८, ३१९–३२०)

बंडवाल्यांचा बीमोड करण्यासाठी इंग्लंडहून नवीन लष्कर आले आहे.

४६४ (१७ : २०, १५ अकटोबर ५८, ३१९–३२०)
अयोध्येची बेगम व नानासाहेब यांचा काही वाद झाल्यामुळे बेगमेने इंग्रजांना निरोप दिला की, मला क्षमा कराल, तर मी नानास इंग्रजांच्या स्वाधीन करीन. सरकारने मान्य करावे, असे ज्ञानोदयकाराचे मत.

४६५ (१७ : २०, १५ अकटोबर ५८, ३१९–३२०)
इराणी फौजेस कवायतीचे शिक्षण देण्याकरिता १६ फ्रेंच अधिकारी तेहराण येथे गेले.

४६६ (१७ : २०, १५ अकटोबर ५८, ३१९–३२०)
कालिंग्टनप्रमाणेच एका फ्रेंच शिपायाने विमान तयार केले, त्यास ५० हजारांचे बक्षिस मिळाले. महामत्स्याच्या हाडाचा चौरंग करून त्यास पंख जोडलेले आहेत.

४६७ (१७ : २०, १५ अकटोबर ५८, ३१९–३२०)
मुंबईटापूत यंदा ६० इंच पाऊस पडला.

४६८ (१७ : २०, १५ अकटोबर ५८, ३१९–३२०)
सर जमशेदजी जिजीभाय यांनी आतापर्यंत धर्मकृत्यांस २२ लाख १९ हजारांची देणगी दिल्ही.

४६९ (१७ : २०, १५ अकटोबर ५८, ३१९–३२०)
रे. डाक्तर स्टिव्हिन्सन यांचा स्काटलंडमध्ये मृत्यु झाला. ते इंग्रजी संस्कृत व मराठी, यांत प्रवीण होते. सामवेदाचे भाषांतर व इंग्रजी-मराठी व्याकरण, हे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. (ज्ञानप्रकाशवरून)

**४७०** (१७ : २०, १५ अकटोबर ५८, ३१९–३२०)

रेल्वे कंपनी बोरघाट ते पेण असा रस्ता बांधणार आहे. त्यामुळे मिठाची नेआण सोपी होईल.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

---

## ज्ञानोदय, पुस्तक १७, अंक २१, मुंबई, १ नोव्हेंबर १८५८

---

**४७१** (१७ : २१, १ नोव्हेंबर ५८, ३२१–३२२)

रे. डॉ. स्तिवन्सन् साहेबांनी या देशात अनेक वर्षे मिशनरीचे काम केले. ते आमच्या अनेक वाचकांना परिचित होते. त्यांच्या मरणाने अनेकांना दुःख झाले. एका गावी उपदेश करून घोड्यावरून परत येत असताना अपघात होऊन त्यांचा मृत्यु झाला. ख्रिस्ताचा शिपाई आपले कवच ल्यालेला असताना पडला व आकाशात गेला.
सन १८२४ मध्ये ते प्रथम भारतात आले. सहा वर्षे स्कॉटिश मिशनात व नंतर पाच वर्षे दक्षिण कोकणात त्यांनी मिशनऱ्याचे काम केले. १८५४ मध्ये ते स्वदेशी परत गेले. "पुण्यातील संभाषणे" व "भगवान कसा ओळखावा" काल्पनिक विज्ञानाविषयी कथन, मत्स्यपुराण व इब्री शास्त्राची तुलना, पुराणोक्त भूगोल व वास्तविक भूगोलविद्या, बौध्य लोक आणि त्यांचा धर्म, हिंदु धर्माच्या व्याख्या, वीरपूजा, ब्राह्मणापूर्वीची दक्षिणेतील उपासना, इत्यादी अनेक लेख व पुस्तके त्यांनी लिहिली. सामवेद व ऋग्वेद यांची भाषांतरे केली. शुभवर्तमान सांगण्याची त्यांना फार आवड होती. आमचा एक मित्र आता कायमचा विसाव्यात गेला.

**४७१ अ** (इंम : ३२१)

**४७२** (१७ : २१, १ नोवेंबर ५८, ३२३)

ब्रह्मदेशातील कारेन लोकांनी पेग्र प्रांतात वसती करावी, म्हणून इंग्रज अधिकारी प्रयत्नशील आहेत. ब्रह्मदेशाच्या पूर्व सरहद्दीवर कारेन लोक राहातात. त्यांनी सरकारकडे ख्रिस्ती धर्म आणि आश्रय मागितले. स्थानकाला हा सुवार्तिक आता त्यांच्यात राहातो. उपदेशकाच्या प्रयत्नाविषयी कारेनींना इतके अगत्य वाटते की, ख्रिस्ती लोकांच्या सहवासात राहाण्यास फार उत्सुक आहेत. हा धर्मप्रसार इंग्लिश सरकारासही लाभदायक ठरणार आहे.

**४७२ अ** (इंम : ३२२)

**४७३** (१७ : २१, १ नोव्हेंबर ५८, ३२५–३२८)

शंभर वर्षांपूर्वी फ्रेंचांचा नास्तिक पुढारी वाल्तेर जिनीवा शहरात राहात होता. त्याने भविष्य केले होते की १९ व्या शतकाच्या प्रथम चरणातच ख्रिस्ती धर्म या भूमंडळातून समूळ नाहीसा होईल. पण ज्या घरात हे भविष्य वर्तविले, त्या घरातच आता पवित्रशास्त्र विक्रीचे दुकान आहे. ख्रिस्ती धर्माचा प्रसार करणाऱ्या शेकडो मंडळ्या आहेत व प्रत्येकीने निदान ७५ हजार जणांना बाप्तिस्मा दिल्हा. भारतात एक लाख ख्रिस्ती आहेत. जगातील ३॥ लाख नास्तिकांनी ख्रिस्ती धर्माची दीक्षा घेतली. ही हकीगत छापण्यास वृत्तपत्रांची कित्येक हजार पाने खर्ची पडतील. कारण मिशनरी नेटिवांच्या रीतीभाती समजून घेऊन प्रेमाने मने जिंकतात. जगातील १४८ भाषांत बायबलची भाषांतरे झाली. गेल्या वर्षी १५ लाख १७ हजार प्रती विकल्या गेल्या. नीतिमान व सदाचारी लोकांना बायबल आवडते. नास्तिकांना असे वाटते की, जिनेवा आणि यरुशालेम यांच्या अवशेषात ख्रिस्ती धर्माविरुद्ध काही पुरावा सापडेल. पण तसे काहीच झाले नाही. तुर्कस्थान व अफ्रिका खंड, याठिकाणी अनेक मिशनांना परवानगी मिळाली. हिंदुस्थानात बंडखोरांनी गेल्यावर्षी शास्त्राच्या अनेक प्रती जाळल्या. पण एका खेड्यात बायबल वाचून पाऊणशे जणांनी दीक्षा मागितली. मिशनरी कोणास जुलमाने बाटवितात, हा आरोप तर खोटाच ठरला. वोलतेराचे भविष्य कधीही खरे ठरणार नाही. देवाने आम्हांस जगाचे वतन दिले आहे. सर्व राष्ट्रे परमेश्वरासी जडतील. राजे पाया पडतील आणि राण्या दाया होतील. ख्रिस्ताचे राज्य मात्र सर्वकाळपर्यंत टिकेल.

**४७३ अ** (इंम : ३२३–३२५)

४७४ (१७ : २१, १ नोव्हेंबर ५८, ३२८–३३०)

अहमदनगर जिल्ह्यातील निमुने गावी जाऊन आलेला 'एक मुसाफिर' लिहितो की : हे एक मध्यम गाव आहे. या गरीब वस्तीच्या कुग्रामात बाबा काळे पाटलाने मात्र कीर्ती होण्याजोगती कामे केली आहेत. तेथील मोडकी निरुपयोगी बारव त्याने खणून काढली. दगडी चिऱ्यांनी बांधली. गुरांसाठी स्वतंत्र कुंडे तयार केली. तळ्याभोवती वडांची राई तयार केली. जुनाट चावडी मोडून ३२ खणी नवी इमारत बांधली. सरकारी अंमलदारांकरिता स्वयंपाक करण्याची सोय केली आहे. जवळच्या बखळीत त्यांच्या गाडीघोड्यासाठी राखीव जागा ठेवली. हे सारे उपयुक्त काम करण्याकरिता त्याने गावकऱ्यांकडून वर्गणीही मिळविली. जे अमान्य होते, त्यांचे मन वळविले. हा पाटील परलोकवासी झाला, तरी त्याची कामेच त्याची आठवण सांगतात. उंच जातीच्या लोकांनी पुनर्विवाहादी सुधारणा केल्या, तर बालहत्या व जारकर्मादि पापांपासून समाज मुक्त होईल.

४७५ (१७ : २१, १ नोवेंबर ५८, ३३०–३३३)

सध्या आकाशात शेंडेनक्षत्र दिसते. पृथ्वीचा गमनमार्ग व शेंडे नक्षत्राचा गमनमार्ग यांचा छेद जाईल, हे मत मात्र चुकीचे ठरले. सन १५५६ मध्ये अकबराच्या काळात एंख नावाचे शेंडेनक्षत्र दिसले होते, ते हेच आहे. यानंतर सन २१६० मध्ये ते दिसेल. ऑक्टोबरमध्ये हे नक्षत्र पृथ्वीपासून ३ कोटी कोसांवर होते. ते लघिष्ठ व फुसफुशीत द्रव्याचे असते. त्याच्या वेगाने उपग्रहांच्या गतीतही काही बदल होणार नाही. १७७० मध्ये लेक्षल नावाचा धूमकेतू दिसला होता. धूमकेतू ग्रहापेक्षा लहान असतो. पण सूर्याभोवती प्रदक्षिणा करतो. १५० वर्षांपूर्वी हाली साहेबाने त्याचा शोध लावला. १८३५ मध्ये एक धूमकेतू दिसला. त्याचे सूर्यापासून अंतर ५ कोटी २१ लाख मैलांचे होते. एंख या धूमकेतूची १ फेरी ३॥ वर्षांत पूर्ण होते. ५० वर्षांत एक फेरी पूर्ण करणारे धूमकेतूही असतात. येशू ख्रिस्ताच्या जन्मकाळी असाच धूमकेतू दिसला होता. त्याचा आकार एवढा मोठा होता की, तो दिवसाही दिसत असे. १६८० मध्ये दिसलेला धूमकेतू १२ कोटी ३० लाख मैलांवर विस्तारलेला दिसला. पूर्वी शेंडेनक्षत्रावरून रोग, लढाया व अनर्थ यांचे भविष्य केले जाई. पण ज्याला खगोलाचे शास्त्र समजते, त्याला काहीच भय वाटत नाही. (सचित्र)

४७६ (१७ : २१, १ नोवेंबर ५८, ३३३–३३४)

तात्या टोप्याने सिरोंजचा आश्रय सोडला. दहा हजारांच्या सैन्यासह तो पचोरमार्गे अयोध्येस जाऊन नानासाहेबास मिळेल, असा अंदाज चालतो. चंदेरीच्या लढाईत त्याचे अनेक सैनिक मरण पावले.

४७७ (१७ : २१, १ नोवेंबर ५८, ३३३–३३४)

कप्तान किलीने भिल्लांचा पुढारी शिताराम याला १५ सहकाऱ्यांसहित ठार मारले.

४७८ (१७ : २१, १ नोवेंबर ५८, ३३३–३३४)

ग्वाल्हेरकडील शहागडचा राजा ब्रिगेडियर स्तुबर्टला शरण आला. आता तो इंग्रजांच्या कैदेत आहे.

४७९ (१७ : २१, १ नोवेंबर ५८, ३३३–३३४)

बरोझमडमेस ठार मारणारा बंडखोर दौलतखान यास फाशी झाली.

४८० (१७ : २१, १ नोवेंबर ५८, ३३३–३३४)

कोल्हापूरात तिघांना बंडखोरीबद्दल फाशी देण्यात आले.

४८१ (१७ : २१, १ नोवेंबर ५८, ३३३–३३४)

बादशाही फौजेच्या लष्कराने आरा नावाच्या शिपायाची कातडी सोलून त्यास मारले.

४८२ (१७ : २१, १ नोवेंबर ५८, ३३३–३३४)

जनरल मिचलने बांद्याच्या नबाबाचे १५० शिपाई मारले. इंग्रजांचा मात्र एकही सैनिक मेला नाही, ही गोष्ट नेटिवांना खोटी वाटती, पण ती सत्य आहे.

४८३ (१७ : २१, १ नोवेंबर ५८, ३३३–३३४)

दिल्लीच्या कैदी बादशहास, पट्टराणी जिनतमहाल व पुत्र जमा बखत यांसह कडक बंदोबस्तात कलकत्यास नेण्यास आले. जाताना त्याने राजधानीस शेवटचा सलाम केला.

४८४ (१७ : २१, १ नोवेंबर ५८, ३३३–३३४)

दिल्लीच्या बादशहाच्या भाच्यास मुंबईमध्ये अटक झाली. तो मक्केच्या यात्रेहून आला होता.

**४८५** (१७ : २१, १ नोव्हेंबर ५८, ३३३–३३४)

एलामचा जंगबहादूर बंडाची तयारी करीत असल्याबद्दल बातमी खोटी ठरली. तो काही इतका वेडा नाही की, इंग्रजांशी भांडेल.

**४८६** (१७ : २१, १ नोव्हेंबर ५८, ३३४–३३६)

जुन्नर येथे एक शिपाई मामलेदारकचेरीत जाऊन म्हणाला की, बंडखोरांची फौज येणार आहे. मामलेदार युरोपियन अधिकाऱ्याचा सल्ला घेण्याकरिता गेला, तेवढ्यात तो शिपाई पळून गेला. पण ही बातमी खोटी होती, असे कळते.

**४८७** (१७ : २१, १ नोव्हेंबर ५८, ३३४–३३६)

पुनर्विवाहाच्या कायद्यानुसार सुरतेत पुनर्विवाह करणाऱ्या वाण्याचा लोकांनी इतका पाठलाग केला की, त्याची पत्नी दुसऱ्याकडे निघून गेली. मग मात्र कोणीच काही बोलले नाही.

**४८८** (१७ : २१, १ नोव्हेंबर ५८, ३३४–३३६)

मुंबईत नारळीपौर्णिमेच्या मिरवणुकीवेळी रुस्तमजी पारशाच्या बगीचा घोडा उधळून पारशी जखमी झाला. सरकारने काही कायदा करून या मिरवणुका व कर्कश वाद्यांचा गोंगाट बंद करावा.

**४८९** (१७ : २१, १ नोव्हेंबर ५८, ३३४–३३६)

उंबरूळ गावाजवळच्या अरण्यात गुडीसाहेब फिरत असताना ७ फूट लांबीचा वाघ त्याच्यावर धावून आला. साहेबाने त्याच्या तोंडात हात घातला. त्याचा हात दुखावला आहे. बरोबरच्या लोकांनी मेलेल्या वाघाचे धूड गावात आणले.

**४९०** (१७ : २१, १ नोव्हेंबर ५८, ३३४–३३६)

खोल विहिरीच्या तळाशी उभे राहिले, तर दिवसाही तारे दिसतात. अभ्र मात्र नसावे.

**४९१** (१७ : २१, १ नोव्हेंबर ५८, ३३४–३३६)

निजामाचा अल्पवयीन पुत्र मृत्यु पावला.

**४९२** (१७ : २१, १ नोव्हेंबर ५८, ३३४–३३६)

निजामाने नवीन नाणे पाडले असून त्यावरती दिल्लीच्या बादशहाचे नाव न घालता ब्रिटिशसरकारचे नाव घातले.

**४९३** (१७ : २१, १ नोव्हेंबर ५८, ३३६)

मुंबईजवळ चिंचपुग्ली या ठिकाणी गोऱ्या लोकांच्या सोयीसाठी गाव वसविले जाईल. तेथे बागायती जमीन असून हवापाणी उत्तम आहे. निसर्गसौंदर्यसुद्धा चांगले आहे.

**४९४** (१७ : २१, १ नोव्हेंबर ५८, ३३६)

हिंदुस्थानातील मुस्लिमांनी बंडखोरांशी मिळून अनेक अघोर कर्मे केली. मिसरमध्ये युरोपियनांना मारण्याचा कट झाला, तोही उघडकीस आला. तुर्कस्थान व अरब देशांत त्यांच्याकडून शस्त्रे व पिस्तुले हस्तगत करण्यात आली. स्तांबूल येथेही सुलतानास पदच्युत करण्याचा कट निदर्शनास आला आहे.

**४९५** (१७ : २१, १ नोव्हेंबर ५८, –३३६)

अटलांटिक सागरावरील तार बिघडली आहे. ती जर नीट झाली नाही, तर दुसरी तार टाकतील.

**४९६** (१७ : २१, १ नोवेंबर ५८, ३३६)

मुंबईतील त्राक्ट आणि बुक सोसायटीद्वारे जाहीर खबर देण्यात येते की, 'नवा करार ईश्वरदत्त आहे' या विषयावरील रे. डी. वोग यांनी इंग्रजीत लिहिलेल्या ग्रंथाचे मराठीत चांगले भाषांतर करणारास रुपये २०० चे बक्षिस देण्यात येईल.

**४९६ अ** (इंम : ३३६)

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

४९७ (१७ : २२, १५ नोव्हेंबर ५८, ३३७–३४०)

हिंदुस्थानातील राजेरजवाडे, सरदार व इतर लोक यांस मलिका माआझमा व्हिक्टोरिया राणी यांजकडून कळविणेत येते की, आनराबल ईस्ट इंडिया कंपनीकडून हिंदुस्थानचा राज्यकारभार राणीसाहेबांनी स्वतःकडे घेतला आहे. पार्लमेंटाने तसा सल्ला दिला होता. राणीने नेमलेल्या अधिकाऱ्यांचे हुकूम सर्वांनी पाळावे. नामदार क्यानिंग यांची व्हाईसराय म्हणून नेमणूक केलेली आहे. शिवाय स्टेट सेक्रेटरी हा अधिकारी इंग्लंडमध्ये राहील. कंपनीचे जुने अधिकारी कायम केले आहेत. कंपनीने केलेले करार आम्ही लक्षपूर्वक पाळू. आमच्या राजाधिकारास कोणीही धक्का लावण्याचा प्रयत्न केला, तर त्यास शिक्षा होईल. राजे लोकांचा मर्तबा आम्ही अवश्य राखू. आमचे धर्मासंबंधी विचार स्वीकारण्याची सक्ती करण्याची आमची इच्छा नाही. तशी सक्ती कोणावरही केली जाणार नाही. कायद्याचा आश्रय सर्वांना समान व निःपक्षपाती रीतीने मिळेल. अशी आमची आज्ञा आहे. लायक नेटिवांना धर्माचा विचार न करता नोकऱ्या दिल्या जातील. सर्वांचे प्राचीन हक्क व वहिवाटी सुरक्षित राहातील. दंगेखोर जर आज्ञा पाळतील, तर त्यांना क्षमा केली जाईल. खुनी दंगलखोरांना कायद्याप्रमाणे शिक्षा होईल. केवळ अविचाराने अफवा पसरवून घबराट उडविणारांनाही सबुरीने वागविले जाईल. व्यापार व लोककल्याणाची कामे यांची वृद्धी व्हावी, अशा रीतीने राज्यकारभार चालविला जाईल. परमेश्वर आम्हांस सामर्थ्य देतो. राणीचा हा जाहीरनामा दि. १–११–१८५८ चा आहे.

**४९८** (१७ : २२, १५ नोव्हेंबर ५८, ३४०)

हिंदुस्थानचे गवरनर जनरल व वैसराय लार्ड जान बैंकोट क्यानिंग जाहीर करतात की : हिंदुस्थानचा राज्यकारभार यापुढे मलिका माआझमा राणीच्या नावे चालेल. सर्व रयत येथून पुढे राणीची ताबेदार झाली आहे. लोकांनी आपल्या योग्यतेप्रमाणे व शक्तीनुसार अधिकाऱ्यांना मदत करावी. राणीच्या कल्याणसूचक व कृपाभरित आज्ञेप्रमाणे वागावे. मलिका-माअझमा म्हणजेच व्हिक्टोरिया राणी यांनी ठराव केल्यावरून वैसरय व गवरनर जनरल यांचा हा जाहीरनामा दि. १–११–५८ चा आहे.

**४९९** (१७ : २२, १५ नोव्हेंबर ५८, ३४०–३४१)

ग्रेट ब्रिटनची स्वामिनी राणी विक्टोरिया यांनी हिंदुस्थानचा कारभार स्वतःकडे घेतल्यामुळे लोकांना फार आनंद झाला. मुंबईत टौनहालाजवळ फार मोठी सभा भरली होती. लष्कराने बंदोबस्त उत्तम ठेवला. गवरनरचे सेक्रेटरी यंगसाहेब यांनी जाहीरनामा वाचून दाखविला. सरकारचे ओरिएंटल ट्रान्सलेत्तर विनायक वासुदेव यांनी त्याचा मराठी तर्जुमा वाचला. नंतर 'गाड सेव दी क्वीन' (देवा, राणीला सुखरूप राख) हे गाणे बँडवर वाजविण्यात आले. गावात मोठी आराश व रोषनाई झाली. विक्तोरिया व प्रिन्स अल्बर्ट यांच्या नावांचा सर्वत्र जयजयकार होत होता. देवळे, आगाऱ्या, मशिदी, बागा, आगबोटी, यांवर असंख्य दिवे चमचमत होते. शेकडो रुपयांची शोभेची दारू उडविण्यात आली. लोकांचे मुखचंद्र आनंदभरित दिसत होते. सर्व हपिसांना एक दिवसाची सरकारी सुटी देण्यात आली. राणीच्या राज्यापासून लोकांचे महत्कल्याण व्हावे, म्हणून आम्हीही प्रार्थना करतो.

**७००** (१७ : २२, १५ नोव्हेंबर ५८, ३४२–३४३)

"राज्यनिष्ठ ख्रिस्ती" लिहितो की : नगरमध्ये किल्ल्याजवळ भरलेल्या सभेत राणीचा जाहीरनामा वाचून दाखविण्यात आला. लष्कर, मुलकी अमलदार व संभावित प्रतिष्ठित यांचा मोठा जमाव आला होता. कलेक्टर उडकाक यांनी राणीचा व वैसरायचा असे दोन्ही जाहीरनामे वाचले. किल्याच्या बुरजावरून १०१ तोफांची सरबत्ती झाली. नळे व चंद्रायीनी लावून शोभेची दारू उडविण्यात आली. काही लोकांना वाटते की, उत्तरेस बंडवाल्यांचा जोर वाढत आहे, म्हणून तोफा सोडून जाहीरनाम्याचे ढोंग केले जात आहे. वास्तविक कुंपणी व इंग्लंडची राणी यांच्यात काहीच फरक नाही. शेंडे नक्षत्र दिसल्यामुळे राज्याची उलटापालट झाली, असेही भाबड्या लोकांना वाटते. राणीच्या जाहीरनाम्यातील आश्वासन ख्रिस्ती धर्मप्रसारास प्रतिकूल आहे व पाद्री लोक जुलूम करू शकणार नाहीत, असेही लोक बोलत होते. राणीचा अंमल बहुत काळ राहावा अशी प्रार्थना आहे.

**७०० अ** (इम : ३४३–३४४)

७०१ (१७ : २२, १५ नोव्हेंबर ५८, ३४४–३४८)

एक मौलवी व शास्त्री एका साहेबास भेटण्यास गेले. मौलवीचे मत असे होते की : आमचे लोक धर्महीन बनत आहेत. शास्त्राच्या आज्ञा पाळीत नाहीत. पण त्यांना शिक्षा देण्याचा काझीस अधिकार नाही. सरकार कोणत्याच धर्माचे शिक्षण देत नाही. गणित व भूगोल मात्र शिकविते. शास्त्रीजींना वाटते की : ब्राह्मणांचे महत्त्व गेले. पूर्वीचे जहागिरदार आता अन्नाला महाग झाले. शूद्रांना शाळेत घेणे हे धर्मात हात घालण्यासारखे नाही काय? शिक्षणाने आमची मुले नास्तिक होतात. पुनर्विवाहाविषयी प्रसिद्धपणे बोलून धर्माबद्दल अनादर निर्माण केला जातो. पण जनतेच्या सुधारणेचे प्रयत्न सोडून देणे अयोग्य आहे. ज्ञान आणि अज्ञान यांची लढाई सुरू झाली, तर आपण शुक्लपक्षाकडेच राहिले पाहिजे. लोकांना विद्या व ज्ञान दिलेच पाहिजे. शाळांची संख्या वाढली पाहिजे. खरी विद्या व खरी नीती लोकांना समजली पाहिजे. अज्ञानाच्या अंधःकाराने या देशाची खराबी झाली. थोड्या लोकांना विद्या देऊन त्यांना अज्ञानी व मूढ रयतेवर धनीपण चालविण्याची परवानगी देता येणार नाही. तुमची योग्यता वाढविण्याकरिता जे सतत प्रयत्न करितात, तेच तुमचे खरे मित्र नाहीत काय? (ज्ञानोदयाद्वारे लॉर्ड एल्लिनबरो यांस ज्ञानोदयवाचकाची सूचना)

यावर ज्ञानोदयकर्त्याचा अभिप्राय–या पत्रात धर्मावर टोला आहे. या देशातील लोकांस सुधारण्याचे प्रयत्न करावेत किंवा त्यांस तसेच शेकडो वर्षांच्या अज्ञानांधकाराने आलेल्या निकृष्ट अवस्थेत राहू द्यावे, असे दोनच मार्ग समोर आहेत. एत्तद्देशीय लोकांस एवढेच सांगणे की, त्यांच्या धर्मात हात न घालता, त्यांची सुधारणा व कल्याण, यांसाठीच प्रयत्न केले जातील.

७०१ अ (इंम : ३४८–३५०)

**८०२** (१७ : २२, १५ नोव्हेंबर ५८, ३५०–३५१)

विहिरींत व आडांत एक प्रकारचा विषारी वायू असतो. उपसा नसलेल्या विहिरींत कोणी उतरले, तर त्याच्या फुप्फुसात हा वायू भरतो व तो मरण पावतो. अशा विहिरींमध्ये उतरणे असेल, तर आधी तेलात बुडविलेल्या चिंध्या पेटवून आत टाकाव्या. ज्वाला जर विझली नाही, तर समजावे की, विहिरीत विषारी वायू नाही. ज्योत विझली तर बाहेरून पाणी टाकावे. म्हणजे विषारी वायू नाहीसा होईल. मग विहिरीत उतरावे.

**८०३** (१७ : २२, १५ नोव्हेंबर ५८, ३५१)

मद्रासच्या तिनावली प्रांतात एक जोशी राहातो. ज्योतिषविद्या हा त्याचा पिढ्यानुपिढ्यांचा धंदा होता. त्याला प्राप्तीही चांगली होई. तीन-चार वर्षांपूर्वी ख्रिस्ती धर्मच खरा आहे, अशी त्याची खातरी झाली. मूर्तिपूजेच्या स्थितीतून सुटावे, म्हणून त्याचा प्रयत्न सुरू झाला. मेव्हण्याच्या घरी राहून आश्रिताप्रमाणे भाकरी खाणेही त्यास आवडेना. रेवरंड परमानंद यांजकडे त्याने खिस्ती धर्माची पूर्ण माहिती मिळविली व जन्मपत्रिका पाहण्याचे कामही सोडले. दीड कोस चालत जाऊन तो प्रार्थनामंदिरात भजन करतो. नियमित प्रार्थना करतो. तो आता खिस्ती झाला असेल किंवा होईल.

**८०४** (१७ : २२, १५ नोव्हेंबर ५८, ३५१)

जे कोणी आपली सर्व कामे श्रमाने करितात, त्यांस परमेश्वर चांगले फळ देतो.

**८०५** (१७ : २२, १५ नोव्हेंबर ५८, ३५२)

तीन हजार बंडखोरांनी कुराई येथे मिचलच्या सैन्याशी युद्ध केले. त्यात ३०० बंडखोर ठार झाले. इंग्लिश सैनिक मात्र एकही मेला नाही. लोकांस खरे वाटत नसले, तरी ही गोष्ट खचित झाली.

६०६ (१७ : २२, १५ नोव्हेंबर ५८, ३५२)

पॅरिस शहरात १७९० फूट खोल विहीर आहे, तर अमेरिकेत १९०० फुटी विहीर सापडली.

६०७ (१७ : २२, १५ नोव्हेंबर ५८, ३५२)

खोट्या दुराभिमानी माणसाचे मन डोळ्यातील बाहुलीप्रमाणे जास्त प्रकाश पडला की आकुंचित होते.

६०८ (१७ : २२, १५ नोव्हेंबर ५८, ३५२)

मद्रासजवळ मंगलोर येथून १० कोसांवरील मुल्किी गावात एका धीवराने समुद्रात शिरून पोहणारा वाघ मारला. तो स्वतःही मृत्यु पावला.

६०९ (१७ : २२, १५ नोव्हेंबर ५८, ३५२)

हिंदु पंच नावाचे गुजराथी वर्तमानपत्र सुरू झाले. वार्षिक वर्गणी ६ रुपये आहे.

६१० (१७ : २२, १५ नोव्हेंबर ५८, ३५२)

लक्ष्मण हरिश्चंद्र उर्फ भाऊ रसोल यांचा २० तारखेस मुंबईत मृत्यु झाला. या दानशूर परभूने चिंचबंदरावर धक्का बांधला. त्यास भाऊचा धक्का म्हणतात.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**५११** (१७ : २३, १ डिसेंबर ५८, ३५३)

हे दयाळू ईश्वरा, तू परात्पर वंदनीय आहेस. दंग्यांनी देश दुभंगला, म्हणून तू आम्हांस राणीकडे सोपविलेस. तिचा अधिकार वाढवून अनेक वर्षे चालू दे. शत्रूस भय वाटो. सर्वांना व्यापणारा अंधकार घालव. सर्वांना सुज्ञान मिळून ते बुद्धिमान होवोत. खोट्या धर्मांचा नाश होऊन सुप्रकाश पसरावा, दीनांचा उद्धार होऊन विघ्न निवारावे, म्हणून राणीस वाचीव. सामर्थ्यवान अशा तू सन्मान स्वीकारून शक्ती दाखवावी. प्रतापमय राणीचा जयजयकार करावा. या कवितेचे नांव 'देवा राणी वाचव' (कवीचे नाव मुळातच दिलेले नाही).

**५११ अ** (इंग : ३५४)

**५१२** (१७ : २३, १ डिसेंबर ५८, ३५४–३५५)

मुंबई येथील अमेरिकन मिशनात अनंदजी खेतसी या भाट्याने बाप्तिस्मा घेतला. तो सधन कुटुंबातील असून दौलत, आप्त, मित्र, पापिष्ट चाली व विषयभोग यांचा त्याने अगदी त्याग केला आहे. सत्यधर्माची प्रेरणा त्यास मिळाली. पापाचा पश्चात्ताप व तारणावर विश्वास त्याच्या मनात उत्पन्न झाले. गेले ७-८ महिने तो या धर्माची माहिती मिळवीत होता. आपले कर्तव्य काय, ते समजावून घेत होता. ज्ञान व सद्गुण यांत तो दृढावत गेला. सार्वकालिक जीवनात तो टिकेल अशी खात्री वाटते. धर्मसंबंधी अज्ञानांधकारात राहणाऱ्या बंधूंना त्याच्या उदाहरणावरून खरेपणाची ओळख पटेल.

**५१२ अ** (इंग : ३५४)

९१३ (१७ : २३, १ दिसेंबर ५८, ३५५–३५८)

शेंडेनक्षत्राविषयी महाभारतात अशी कथा आहे की : वसिष्ठ आणि विश्वामित्र यांचे पटत नसे. त्रिशंकु नामे राजाने यज्ञात काही चूक केली, म्हणून वसिष्ठाने त्यास शाप दिल्हा की, तू अंत्यज होशील. तेव्हा तो राजा विश्वामित्राला शरण गेला. विश्वामित्राच्या सल्ल्यावरून त्याने पुन्हा यज्ञ केला. मंत्रबळाच्या जोरावर तो स्वर्गाकडे निघाला, पण देवांनी तो अंत्यज आहे, म्हणून त्यास अडथळा केला. मग विश्वामित्राने दर्भाचा आधार देऊन त्यास अधांतरी ठेवले. तोच हे शेंडेनक्षत्र होय. ही कथा अगदी असंगत आहे. कारण धूमकेतू हे मोठे भूगोल आहेत. शंकू नाहीत. आणि एकच धूमकेतू नसून शेकडो आहेत. त्याच्या खाली दर्भ नसून काही विरळ पदार्थ आहे. ही शेंडीही कधीकधी लहान किंवा मोठी दिसते. म्हणजेच, पुराणात भाकडकथा जास्त आहेत. धूमकेतू दिसला की, देशाच्या प्रजेवर संकट येते, अशीही समजूत आहे. पूर्वी युरोपियन लोकांमध्येही असे भ्रम प्रचलित होते. परंतु निसर्गाचा चमत्कार यापलीकडे त्यांस महत्त्व नाही. शिवाय ब्रिटिश सरकारला सध्या किती लाभ व विजय प्राप्त झाले आहेत ! बंडाचा बीमोड झाला, चीनशी व अमेरिकेशी सुसंवाद आणि तहही झाला ! भारताचा कारभार मक्तेदार बनियांच्या हातून राणी सरकाराकडे गेला.

**५१४** (१७ : २३, १ डिसेंबर ५८, ३५९-३६२)

ईश्वरविद्या – हे पुस्तक अहमदनगर मिशनाने छापले. ५६-५७ मध्ये ज्ञानोदयातून ते क्रमशः प्रसिद्ध झाले होते. यातील ३२ विषय वाचल्यावर शास्त्राविषयी कसलाही संदेह राहात नाही. रे. रामकृष्ण विनायक मोडक यांनी हे भाषांतरित पुस्तक रचले. त्यांची भाषाशैली विषयास लायक असून योग्य तेथे पदरचा मजकूरही त्यांनी घातला आहे. शुभवर्तमानातील महत्‌सिद्धांताचा असा सारसंग्रह मराठीत तरी दुसरा नाही. ख्रिस्ती धर्माचा द्वेष करणारांना त्याचे वास्तविक स्वरूप समजेल. आता त्यांनी स्वतः शोध करावा. पृष्ठे २५७ (इंग्रजीवरून भाषांतरित)

मात्थीने केलेले शुभवर्तमान यावरील टीका– मुंबईतील पुस्तक–मंडळीने छापले असून ३०५ पृष्ठे आहेत. रे. आर. जी. वेल्डर यांनी ही टीका लिहिली. भाषा अतिशय सोपी असून मात्थीचा ग्रंथ समजून घेण्यास अत्यंत उपयुक्त ठरेल. अर्थविषयी विचार व ठराव करण्यास पूर्ण मोकळीक आहे.

जगाचा तारणारा – महीकाठा मिशनचे रे. क्लार्कसन यांनी लिहिलेल्या पुस्तकाचा रे. बिसेल यांनी केलेला हा तर्जमा आहे. हिंदू गुरू व ख्रिस्ती उपदेशक यांचा संवाद यात आहे. तो पूर्वी ज्ञानोदयातून प्रसिद्ध झाला होता. पृष्ठे १६७ आहेत.

ख्रिस्ती धर्माचा प्रसार होण्याविषयीच्या भविष्यवचनांची पूर्णता–नगरचे शेख दाऊद महमद यांनी हे पुस्तक लिहिले. पृष्ठे ९१ आहेत. ईश्वराच्या आशीर्वादाने मिशनऱ्यांच्या उद्योगास व श्रमांना कसे फळ आले ते यातून कळेल.

**५१४ अ** (इंग : ३५८–३५९)

**५१५** (१७ : २३, १ डिसेंबर ५८, ३६२–३६४)

आम्हांस जीवनाचा मार्ग दाखविण्याकरिता ईश्वराने पवित्र शास्त्र दिल्हे आहे. हरएक मानवी बोधापेक्षा त्यात उत्तम बोध आहे. देवाच्या प्रेरणेने शास्त्र तयार झाले. देवाचे ध्यान केले की, सुधारणूक होऊन दुर्वासनांचा क्षय होतो. प्रेषितांची उदाहरणे ही आमचा आदर्शच झाली आहेत. दररोज शास्त्राचे थोडे थोडे मनन करावे. शास्त्राच्या पठनावाचून एकही दिवस वाया जाता कामा नये. अद्भुत कादंबरीप्रमाणे ते घाईने वाचू नये. अरळ तरळ वाचनाने काहीच लाभ होत नसतो. एका वर्षात शास्त्र वाचून व्हावे, म्हणून आम्ही एक योजना काढली आहे. उत्पत्ती व इयोबा गीते १६० दिवस वाचा. नीति मलाखी व मात्थी १५० दिवस. उरलेला नवा करार ५५ दिवसांत पूर्ण करावा. लक्षपूर्वक सगळे शास्त्र वाचावे.

**५१५ अ** (इंम : ३६२)

**५१६** (१७ : २३, १ डिसेंबर ५८, ३६४–३६६)

'गोंधळ्याचा एक ओळखी' आपल्या पत्रात म्हणतो की : दुसऱ्याचे आपण थोडे जरी वाईट केले, तरी ईश्वराजवळ त्याची झडती द्यावी लागते. पारनेरचा एक गोंधळी बायकोला माहेरी ठेवून दुसऱ्या गावी गेला. तेथे मित्रपत्नीशी संधान बांधून तिला कोकणात घेऊन गेला. पहिल्या पत्नीशी फारकत घेऊन त्याने दुसरीशी मोहतूर लावला. पण पहिलीसही त्याने आपल्याजवळ ठेवून घेतले. पुढे तो परगावी दुखणाईत झाल्यावर त्याची घटस्फोटित पत्नी भावाकडे निघून आली व तिने दुसरे लग्न केले. दुसऱ्याचे नुकसान करून आपला लाभ करून घेणे कधीही हितावह होत नसते. पाप करताना गोड लागते. पण पाप्यास नरकाशिवाय जागा नाही. व्यभिचारी व शिंदळ वृत्तीच्या लोकांनी यावरून तरी बोध घ्यावा. परक्याच्या स्त्रीचा मोह धरू नये.

**६१७** (१७ : २३, १ डिसेंबर ५८, ३६६–३६८)

तात्या टोपे नर्मदा उतरून धुळे मार्गे पुण्यास येणार, अशी वंदता उठलेली आहे. एकदा मिचलच्या फौजेशी त्याची गाठ पडून त्याचे अनेक सैनिक मेले. भोपाळची राणी तात्यास मदत देण्यास तयार आहे. पण इंग्रज सेनेसमोर त्याचा निभाव लागणे कठिण आहे. मध्यंतरी त्याने केरसाहेबाशी तहाचे बोलणे लावले होते. केरने त्यास जिवंत ठेवण्याचे वचन दिल्हे. ह्यू रोजनेही त्याची खोडकी मोडली. तेव्हा तो पुण्यास आला, तर लगेच चतुर्भुज होईल.

**६१८** (१७ : २३, १ डिसेंबर ५८, ३६६–३६८)

जालन्याकडे २०० रोहिले खेडी लुटीत आहेत. तिकडे लष्कर रवाना झाले.

**६१९** (१७ : २३, १ डिसेंबर ५८, ३६६–३६८)

अयोध्येकडील आमेतीचा लाल माधूसिंग युद्धाच्या तयारीत होता. पण ग्रांटसाहेबाने त्याला राणीचा जाहीरनामा दाखविल्यावर तो इंग्रजांच्या मेजर बानर यांच्या स्वाधीन झाला.

**६२०** (१७ : २३, १ डिसेंबर ५८, ३६६–३६८)

दिल्लीत कायमचे लष्कर ठेवण्याची योजना आहे. बादशहाच्या राजमंदिरात बारूदखाना होईल.

**६२१** (१७ : २३, १ डिसेंबर ५८, ३६६–३६८)

दिल्लीच्या बादशहास कानपूरहून कलकत्यास नेत असताना राणी सरकारच्या सन्मानार्थ तोफा झाल्या. लोकांना मात्र वाटले की, हा बादशहाचाच सन्मान होतो आहे.

५२२ (१७ : २३, १ दिसेंबर ५८, ३६६–३६८)
बुंदेलखंडातील बंडखोर गावकऱ्यांना लुटून गव्हावरोबर किडेही रगडीत आहेत.

५२३ (१७ : २३, १ दिसेंबर ५८, ३६६–३६८)
नागपुरजवळील चंदाचा जमीनदार बापूराव यास फितुरीवरून इंग्रजांनी फाशी दिल्हे.

५२४ (१७ : २३, १ दिसेंबर ५८, ३६६–३६८)
ईस्ट इंडिया कंपनीचा कारभार संपविल्याबद्दल सर जमशेदजी जिजिभाई, जगन्नाथ शंकरशेट, इ. यांनी ३००० सह्या गोळा करून राणीसाहेबांना बहुमानपत्र पाठविले आहे.

५२५ (१७ : २३, १ दिसेंबर ५८, ३६६–३६८)
कलकत्त्याजवळ दोन आगगाड्यांची टक्कर होऊन ५ माणसे ठार झाली. पुष्कळ नुकसान झाले.

५२६ (१७ : २३, १ दिसेंबर ५८, ३६८)
मक्का शहरात पटकीच्या साथीने ३० हजार माणसांचा मृत्यु झाला.

५२७ (१७ : २३, १ दिसेंबर ५८, ३६८)
गेल्या २० वर्षांत इंग्लंडमध्ये ९५०० मैल लोखंडी रस्ता तयार झाला. सर्व रेल्वेगाड्या दररोज ३ लाख ८० हजार मैल धावतात.

५२८ (१७ : २३, १ दिसेंबर ५८, ३६८)
फोटोग्राफीच्या यंत्राने चित्र काढणारे युरोपियन भारतात येणार आहेत.

**५२९** (१७ : २३, १ डिसेंबर ५८, ३६८)

शेंडेनक्षत्राची लांबी ३६ हजार मैल असावी असे सिद्ध झाले.

**५३०** (१७ : २३, १ डिसेंबर ५८, ३६८)

अटलांटिक महासागरातील तारायंत्रातील दोष अद्याप सापडला नाही.

**५३१** (१७ : २३, १ डिसेंबर ५८, ३६८)

प्रत्येक प्रांतातील पोलीस कुत्र्यांचा संहार करीत आहेत. मद्रासमध्ये १८५६ पासून १० हजार, तर नगर जिल्ह्यातही दहा हजार कुत्री मारली गेली. कुत्री पाळणारावर कर बसवला पाहिजे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १७, अंक २४, मुंबई, १५ डिसेंबर १८५८

**५३२** (१७ : २४, १५ डिसेंबर ५८, ३६९)

गॉड सेव्ह द क्वीन–इंग्रजी कविता. नोंद क्र. ५११ यांतील मराठी कवितेचे इंग्रजी भाषांतर. (कवीचे नाव मुळातच दिलेले नाही.)

**५३२अ** (इंग : ३६९)

**६३३** (१७ : २४, १५ डिसेंबर ५८, ३७१–३७४)

लार्ड एलेन्बरो व ज्यार्ज क्लार्क यांचे मत असे आहे की : ख्रिस्ती शाळांना सरकारने कसलीही मदत करू नये. सरकारी नोकरांनी धर्मप्रसार करण्याच्या बाबीत लक्ष घालू नये. नेटिवांना कसलीही भीती किंवा संशय वाटता कामा नये. मि. एच कार टकर म्हणतात की : हे काम ज्याच्या त्याच्या विचारावर सोपवावे. कैसराचे कैसराला व देवाचे देवाला देण्याची वृत्ती असावी. बंडाचा बीमोड करणारे सेनापती हे खरे ख्रिस्तीच होते. प्रजा भयभीत होईल, या विधानात काही अर्थ नाही. काडतुसाला चरबी लावली जाते, ही अफवा अज्ञानानेच पसरविली गेली. एकदा तर एका लुच्चड माणसाने अशी वदंता सोडली की, गवरनर जनरलला खाण्यासाठी गबदुली मुले पुरविली जातात. असल्या अवयांना भिण्यात काही अर्थ आहे काय? प्रत्येक माणसास आपल्या विवेकाप्रमाणे वागण्याची मोकळीक सरकारने दिल्ही आहे. कित्येक ठिकाणी नेटिवांनी मिशनऱ्यांचा गौरव करून त्यांना हजारो रुपयांच्या थैल्या दिल्या आहेत. ख्रिस्ती म्हणविणाऱ्या राज्यकर्त्यांनी त्याला योग्य असाच पक्ष घ्यावा, हे नीट आहे. लोकांना फुशारकीची वचने कधीही देऊ नयेत. सरकारने सर्वांना समान लेखावे, मग तो कोणीही असो. खऱ्यास काही मरण नाही. ईश्वराचे सामर्थ्य अगाध आहे. तो आपला धर्म सर्व पृथ्वीत स्थापीलच स्थापील. सर हेनरी लॉरेन्स, सर जान लॅरेन्स, हावलाक, हेर्बर्ट एडवर्डस, मातंगमरी, यासारिखे जे ख्रिस्ती, ते इमारतीच्या मजबूत खांबाप्रमाणे देशाला आधारभूत झाले. टॉमसनसाहेब व कालविनसाहेब यांनी ख्रिस्ती धर्मप्रीत्यर्थ होतील तितके श्रम केले, पण त्याजसमोर गेल्यावर ते आपणास बाटवितील, अशी लोकांस भीती वाटली नाही. ईश्वर पृथ्वीवर आपला खरा धर्म स्थापीलच.

**६३३ अ** (इंम : ३७०–३७१)

**६३४** (१७ : २४, १५ डिसेंबर ५८, ३७५–३७६)

धारगाव (नगर) येथील एक तरुण तीन वर्षांमागे मूर्तिपूजक होता. आता तो देशबांधवांना अमोल्य असा तारणाचा मार्ग सांगत हिंडतो. शुभवर्तमान हाच सुधारणुकीचा उपाय आहे. याविषयी त्याची खात्री पटली. आपल्यासारख्या अज्ञानी व अयोग्य माणसास दयाळू तारणाऱ्याने बोलावले, याबद्दल त्याला मनात धन्यता वाटते. उपदेश केल्यावर त्याचे मन शांतीने व आनंदाने कसे उचंबळून येत असते ! 'मला तू आपल्यासारखे कर' म्हणून तो प्रार्थना करीत असतो. खेड्याजवळच्या वाड्यामधून लोक आनंदाने शास्त्र ऐकतात. लवकरच इतर नास्तिक लोकसुद्धा प्रभूच्या कृपेमुळे उत्साहित होऊन शास्त्र ऐकतील, अशी त्याला खात्री वाटते. दक्षिणेकडच्या शेतामधील अंधार दूर करण्याचा तो मनापासून प्रयत्न करतो. ईश्वर त्याजवर आपला आत्मा ओतील.

**६३४ अ** (इंग : ३७४)

**६३५** (१७ : २४, १५ डिसेंबर ५८, ३७७–३७९)

मुंबईतील सुशिक्षित हिंदु तरुणांविषयी व्याख्यान–रा. भवानी विश्वनाथ कानविंदे यांनी रचिले. ते लिहितात की : इंग्रेजांनी आम्हांस अज्ञानाच्या सागरातून वर काढले. ठिकठिकाणी शाळा स्थापून विद्येचा प्रसार केला. विद्या, नीति व धर्म, हे तिन्ही विषय त्यांनी हाताळले. नुसत्या मतांतराने धर्मांतर होत असते काय ? अंतःकरणात पालट व्हावयास हवा. नेटिव हिंदूंनी सर्व ग्रंथ वाचून नीट विचार करावा. संकटे सोसण्यास तयार राहावे. निष्पापी तारणाऱ्याची ओळख करून घ्यावी. मनापासून जर प्रार्थना केली, तर ईश्वराचे साहाय्य मिळते. कोणताही धर्म बाह्य प्रमाणांवर स्थापिला जात नाही, तर शुद्धतेवर स्थापिला जातो. आज जी न्यूनता आहे, ती धैर्याचीच आहे.

**६३५ अ** (इंग : ३७६–३७७)

**५३६** (१७ : २४, १५ डिसेंबर ५८, ३७९–३८२)

अहमदनगरचा 'एक राज्यनिष्ठ ख्रिस्ती' लिहितो की : राणीच्या जाहीरनाम्याबद्दल आनंदाचा जल्लोष करण्याकरिता नगरमध्ये २५० रुपये वर्गणी जमली. मोठ्या शामियान्यात लखलखाट केलेला दिसला. आमंत्रणे नसणारे लोकही मुलांबाळांसह आले. मांडव पूर्ण भरला होता. फौजदाराने वारंवार गर्दी हटविली. संयोजकांनी कलावंतिणींचे दोन ताफे आणले होते. त्यांचा नाच सुरुवातीला व नंतरही झाला. हुजूर डेप्युटी दुगल यांनी यास विरोध केला, तरीही त्यांचे कोणी ऐकले नाही. इंग्लंड हा तर जगात सुधारलेला देश आहे. तेथील राणीच्या सन्मानासाठी असल्या दुष्ट स्त्रियांचा नाच व्हावा, हे किती अयोग्य आहे पाहा! पूर्वीच्या राजवटीत हा अश्लाघ्य प्रकार शोभला असता. मंडपात जमलेल्या युरोपियनांना या कसबिणी आहेत, हे कळले नाही. स्त्रियांना मरदानी पोषाक देऊन नाच करण्याचा प्रयोगही नंतर झाला. निदान सुशिक्षितांना हा प्रकार आवडला नाही, हे तरी बरे लक्षण म्हणावे लागेल. मडमांना खरी हकीगत समजली असती, तर त्याही तेथे थांबल्या नसल्या. यावर ज्ञानोदकर्त्यांचा अभिप्राय–'सदरहू पत्रावरून आम्हांस आनंद वाटतो की, अहमदनगरांतील सुशिक्षित नेटिवास वेश्यांचा नाचाचा कंटाळा वाटतो. मंडपात जमलेल्या मडमांना नाच करणाऱ्या स्त्रिया कसबिणी आहेत, हे माहीत नव्हते. तरीही त्यांनी या दुष्ट स्त्रियांचे नाच खुशाल पहात बसावे, ही फार विलक्षण गोष्ट झाली. आमची अशी इच्छा आहे की, मडमलोकांची वर्तणूक असी असावी की, तेणेकरून ख्रिस्ती स्त्रिया फार सद्गुणी आहेत, हे एतद्देशीय लोकांच्या मनात चांगले ठसून द्यावे.'

**५३७** (१७ : २४, १५ डिसेंबर ५८, ३८२–३८४)

तात्या टोप्या पुन्हा उत्तरेकडे वळला. इंग्रजांची फौज त्याचा पाठलाग करीत असून त्याच्या सैन्यातील निदान ५०० जण रोज मरत आहेत. टोपेराव आता बडोद्याकडे चालला असून गरीब रयतेची लूटमार करीत आहे.

**६३८** (१७ : २४, १५ दिसेंबर ५८, ३८२–३८४)

मिथौलीचा राजा लोणीशिंग पराभव झाल्यामुळे पळून गेला. मिथौलीचा किल्ला इंग्रजांनी पाडून टाकला. अयोध्येचा बेनीमाधव तहास तयार आहे. पण शिपाई मात्र शरण येण्यास तयार होत नाहीत. सावंतवाडीचे बंडखोर गोव्याकडे पळाले. अमेथीचा राजा माधोशिंग इंग्रजांच्या स्वाधीन झाला.

**६३९** (१७ : २४, १५ दिसेंबर ५८, ३८२–३८४)

अयोध्येत जाहीरनाम्याविषयी उत्सव झाला, तेव्हा उपस्थितांना गाईचे व डुकराचे मांस खाऊ घातल्याबद्दल अफवा उठत आहेत. राणी सरकारवर हिकमत केल्याचा आरोप केला जातो.

**६४०** (१७ : २४, १५ दिसेंबर ५८, ३८२–३८४)

मद्रासेत तिघा हिंदूंनी ख्रिस्ती धर्माची दीक्षा घेतली.

**६४१** (१७ : २४, १५ दिसेंबर ५८, ३८२–३८४)

काही दिवसांपूर्वी आकाशात सहा ग्रह एकदम साध्या डोळ्यांनी दिसत होते.

**६४२** (१७ : २४, १५ दिसेंबर ५८, ३८२–३८४)

अटलांटिकची तार एकदा चालू झाली व पुन्हा बंद पडली.
मि. व्हैट हौस याने तार नीट करण्याची जोखीम घेतली आहे.

**६४३** (१७ : २४, १५ दिसेंबर ५८, ३८२–३८४)

पंजाबचा निराळा इलाखा करावा, असा विचार विलायतेत चालू आहे.

**५४४** (१७ : २४, १५ दिसेंबर ५८, ३८३–३८४)

न्यू हॉलंड बेटात एका स्त्रीस एका वेळी २ मुली व २ मुलगे झाले. याच बेटावर एका ९ वर्षांच्या मुलाचे वजन ११४ शेर आहे.

**५४५** (१७ : २४, १५ दिसेंबर ५८, ३८४)

गेल्या सहा वर्षांत पृथ्वीवरील खाणीतून १ अब्ज २१ कोटी ६० लाखांचे सोने निघाले.

**५४६** (१७ : २४, १५ दिसेंबर ५८, ३८४)

एक श्रद्धाळू गृहस्थ मांजर आडवी आली म्हणून काम सोडून घरी परत आला, तेव्हा त्याची पत्नी म्हणाली की : दक्षिणेचा वारा सुटल्यामुळे चुली बंद ठेवता येत नाहीत. त्याप्रमाणे मांजर आडवे आले म्हणून काम बंद ठेवता येत नाही.

**५४७** (१७ : २४, १५ दिसेंबर ५८, ३८४)

लक्ष्मण बापू नावाचा गृहस्थ दारूतून विष घेऊन मरण पावला.

**५४८** (१७ : २४, १५ दिसेंबर ५८, ३८४)

डाक्तर भाऊ दाजींनी जुवेनाइल वाचनालयास अनेक अमोलिक पुस्तके नजर केली.

**५४९** (१७ : २४, १५ दिसेंबर ५८, ३८४)

जुगार खेळल्याबद्दल सहा पुरुष व एक स्त्री यांना दंड झाला.

**५५०** (१७ : २४, १५ दिसेंबर ५८, ३८४)

स्मालकाझ कोर्टाचे जज माणिकजी खरशेटजी यांना द. म. ५०० ऐवजी ७५० रु. पगार मिळेल.

**५५१** (१७ : २४, १५ डिसेंबर ५८, ३८४)

रामपूरच्या नबाबानें राणीच्या जाहीरनाम्यानिमित्त राजवाड्यावर रोषणाई केली.

**५५२** (१७ : २४, १५ डिसेंबर ५८, ३८४)

ब्रिटन देशातील समुद्रकिनाऱ्यावर सन १८५६ मध्ये ११५१ जहाजे फुटली, व नुकसान झालें, असें वर्तमान आहे.

**५५३** (१७ : २४, १५ डिसेंबर ५८, ३८४)

सन १८०१ मध्ये लंडन शहरात ९ लाख ५८ हजार ८९३ माणसें राहात होती. १८५७ मध्ये ही वस्ती २६ लाख २५ हजाराबर गेली आहे. ५६ वर्षांत सुमारें १६ लाख ६२ हजारांची वस्ती जास्त झाली.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १८, अंक १, मुंबई, १ ज्यानुएरी १८५९

**५५४** (१८ : १, १ ज्यानुएरी ५९, २–४)

ज्ञानोदयाच्या १८ व्या पुस्तकाचा आरंभ करताना आम्हांपुढे पुढील काळाविषयी जशा आशा व सुचिन्हे आहेत, तशी आतापर्यंत कधीच नव्हती. हा देश आता खुद्द राणी सरकारच्या अधिकाराखाली गेला. इंग्लंडशी याचा अतिनिकट संबंध तयार झाला. अज्ञान व दुरवस्था यांत बुडालेल्या लोकांची मानसिक सुधारणा करावी, म्हणून सरकार काळजी बाळगील. लेकरांस सुशिक्षा देणाऱ्या आईबापांप्रमाणे प्रतिपाळ करील. अज्ञानी रयतेस सत्यज्ञानाचा प्रकाश प्राप्त व्हावा, म्हणून कोणच्याही धर्मसंबंधी स्वतंत्रतेस बाधा आणली जाणार नाही. कोणावरही जुलूम होणार नाही व ख्रिस्ती झाला म्हणून कोणास देणग्या मिळणार नाहीत. प्रापंचिक लाभाची लालूच दाखवली, तर कॉन्सटन्टाईन बादशहाच्या कारकीर्दीप्रमाणे अघोरपणा घडेल. ईस्त इंडिया कंपनीच्या काही कृत्यांबद्दल पार्लमेंटच्या सभासदांना लज्जा उत्पन्न झाली. १८१३ च्या आधी कंपनीने एकाही मिशनऱ्यास इकडे येऊ दिले नव्हते. पण १८१३ पासून मिशनऱ्यांना येथे मुक्तद्वार मिळाले. परंतु शिपायांना उपदेश करण्यास मनाई झाली. गेल्या ५० वर्षांत अनेक प्रकारच्या विरोधांना तोंड देऊन धर्मप्रसारकांनी येथे प्रकाश आणला. आमची आशा सर्वशक्तिमान परमेश्वराच्या पराक्रमी बाहूंवर आहे. तैमूरच्या वंशजास काळ्या पाण्यावर जावे लागले. आता सर्वत्र स्वस्थता व आनंदीआनंद होईल.

**५५४ अ** (इंम : १–२)

**५५५** (१८ : १, १ ज्यानुएरी ५९, २)

१८५९ या वर्षाचे मराठी पंचांग थोड्या दिवसांनी तयार होईल.

**५५६** (१८ : १, १ ज्यानुएरी ५९, ५)

नेवासा तालुक्यात पाचेगव येथे ख्रिस्ती मंडळी स्थापन झाली. रे. बारकार, आबट व फेरब्यांकसाहेब तेथे गेले होते. दोघाजणांनी दीक्षा घेतली. भोवतालच्या गावातूनही उपमंडळ्या तयार होत आहेत.

**५५६ अ** (इंम : ४)

**५५७** (१८ : १, १ ज्यानुएरी ५९, ५–६)

फ्रीचर्च मिशनाचे हिसलपसाहेब सहकुटुंब स्वदेशास गेले. हे साहेब १८४४ पासून नागपूरमध्ये उपदेशकाचे काम करीत होते. दोन वेळा ते प्राणसंकटातून बचावले, म्हणून विश्रांतीसाठी ते विलायतेस गेले. आता रे. व्हैट नागपूर मिशनात राहातील.

**५५७ अ** (इंम : ५)

**५५८** (१८ : १, १ ज्यानुएरी ५९, ६)

ज्या ईस्त इंडिया कंपनीचा व मोगलांच्या कुळाचा उत्कर्षापकर्षांमध्ये अपूर्व संबंध होता, त्या कंपनीचा शेवट झाल्यावर ३३ दिवसांनी दिल्लीचा बादशहा सहकुटुंब काळ्या पाण्यावर गेला. त्यात त्याचा बुद्धिमान तरुण मुलगा होता अशा प्रकारे तैमुरकुलाच्या व इतिहासाच्या मोठ्या भागाचा शेवट झाला. जगाच्या पंचमांश भागावर ८०० वर्षे बेबंद राज्य केल्यावर, १०० वर्षे बादशाही राशद भोगल्यावर आणि शिपायांच्या बंडात अल्पकालिक अधिकार भोगल्यावर एका राजघराण्याचा अंत झाला. हे कुळ केवळ जयाच्या उदरी जन्मले आणि अन्यायरूप पालखामध्ये त्याचे लालन झाले. त्याचा प्राणायामही तसाच झाला. मानवी अधिकार किती अशाश्वत असतो, याचा नव्या सरकारनेही विचार करावा. शेवटी माणसाला औट हात जागेचाच अधिकार असतो.

**५५८ अ** (इंम : ६)

**५५९** (१८ : १, १ ज्यानुएरी ५९, ७–१०)

नयनसुख हा श्रीमंत ब्राह्मणपुत्र जयपुर संस्थानामधील एका गावी १७९९ मध्ये जन्मला. दोनदा त्याची ठगांशी गाठ पडली होती. नेटिवांतील मिथ्याचाराचा तो तिरस्कार करी. नयनसुखचे आईवडील व भाऊबहीण जगन्नाथपुरीच्या यात्रेस निघाली असता त्याची बहीण वारली. सर्व कुटुंबाची वाताहात झाली. दिनापूर येथे रेव. मूर व रोवसाहेब यांशी त्याची गाठ पडली व त्यास ख्रिस्ती धर्माची गोडी लागली. करीम नावाच्या धर्मोपदेशकाने त्याला खऱ्या जगन्नाथाची माहिती दिली. पुरीच्या यात्रेतील प्रकार पाहून त्याचे मन सर्वस्वी विटून गेले. भिक्षुकांच्या अनीतीची चीड आली. आईचा विरोध असतानाही तो पवित्र शास्त्र ऐकत बसे. त्याचे वडील वारले, म्हणून सगळे गयेस गेले. पण नयनसुखने दिनापूर सोडून जाण्यास नकार दिला. मग त्याची आई दिनापुरासच राहिली. हळूहळू तिचाही मुलावर विश्वास बसला आणि तीही ख्रिस्ती झाली. गौरवामध्ये जाण्याच्या आशेने ती सुखाने मरण पावली. मोंघीर येथे रे. चाबरलेनसाहेबाने नयनसुख यास १८१८ मध्ये बाप्तिस्मा दिल्हा.

ज्ञानोदयकर्त्यांची टीप : प्रारंभी -नयनसुखची गोष्ट 'कलकत्ता ख्रिश्चन ऑब्जर्व्हर' वरून घेतली आहे. ज्ञान व खरेपणा यांसाठी प्रभूजवळ जाण्यात नयनसुखने दाखवलेले धैर्य वाखाणण्यासारखे आहे. आता तो उच्चवर्णीय हिंदूंमध्ये उपदेश करतो. ते त्याचे धैर्यसुद्धा कौतुकास्पद आहे

५६० (१८ : १, १ ज्यानुएरी ५९, १०–११)

'एक मित्र, पण तत्त्वज्ञानी नव्हे' याने लिहिले आहे की : ज्ञानप्रसारक मासिकात राम मोहन राय या नामांकित सुधारकाची माहिती आली आहे. त्याची विद्वत्ता आणि सुप्रकाशित बुद्धी यांचा गौरव केला आहे. लेखक सांगतो की : 'पुरातन तत्त्वज्ञानाप्रमाणे त्याचा सृष्टधर्म होता. सर्व धर्मामधील चांगली आणि उपयुक्त तत्त्वे तो ग्रहण करी. धर्मावांचून माणसाचे कल्याण होत नाही. धर्म ही आवश्यक बाब आहे. असेही तो म्हणे. वेदांतावरून त्याने एक नवे दैविक मत तयार केले. पण तो स्वतः तर वेदांत मानीत नव्हता. मग त्याला दुसरे लोक कसे मानतील ? यातून फक्त एक खोटे मत तयार होईल. आपले जहाज कोणत्या बंदरावर पोहोचले, हे या ज्ञानी माणसाला ठाऊक नव्हते. ईश्वरदत्त असा कोणताही धर्म त्यास मान्य नव्हता. मरणानंतर अक्षय सुख प्राप्त होण्यासाठी त्याने कोणते मत निवडले ? आणि सुखाची खात्री कशी दिली ? एकंदरीत हा विचारशील माणूस स्वतःच संशययुक्त स्थितीत राहिला. तात्पर्य : असल्या मूर्खपणापासून काही लाभ होईल असे वाटत नाही. काही निर्धारयुक्त माहिती असेल, तरच फायदा होणार आहे.

५६० अ (इंग : ११–१२)

**९६१** (१८ : १, १ ज्यानुएरी ५९, १२–१४)

जे मिशनरी शाळेत शिकले व खिस्ती धर्माचे माहीतगार झाले, त्यांना तो धर्म खराच वाटतो. औषध घेतल्याबरोबर कोणी निरोगी होत नाही किंवा बी पेरताच कोणी फळ पावत नाही. पण माणसे हळूहळू सुधारतात. काही लोक जगाचे भय मनात बाळगून आपले खरे मत बोलून दाखवीत नाहीत. दुसरे नाव ठेवतात, म्हणून आपले मन कुचंबून ठेवू नये. लोक काय, बऱ्यालाही वाईट म्हणतात. म्हातारा आणि त्याचा बैल कथेची आठवण करावी. जगास फक्त नावे ठेवणेच आवडते. म्हणून म्हणच आहे की, सबकी सुनना पर दिलकी करणा. जगाच्या नावे ठेवण्यास भिऊ नका. ज्याची खात्री झाली, त्याचा अंगीकार करावा. आपल्या अमोल्य आशेचा नाश करू नका. ईश्वर तुम्हांस पवित्र आत्मा देईल.

**९६२** (१८ : १, १ ज्यानुएरी ५९, १४–१५)

तात्या टोप्याविषयी कोणी फारसे बोलत नाही. उदेपूर येथे तात्याच्या सैन्यावर इंग्रजांनी हल्ला करून त्याचे ३०० लोक मारले. त्याच्याबरोबर अवघे ३ हजार बंडखोर शिल्लक आहेत. आपले जवाहीर त्याने कोठेतरी जमिनीत दडविले. कर्नल सामरसेट त्याच्यामागे लागल्यामुळे तो विश्रांती न घेता उदेपुराहून पळाला. मनोरंजनासाठी त्याने कलावंतिणीचा ताफा ठेवला आहे. एक रावसाहेब नावाचा इसम त्याजबरोबर असून तो स्वतःला पेशवा म्हणवितो. एका जाहीरनाम्यात तर तात्यालाच पेशव्याची पदवी देण्यात आली होती.

**९६३** (१८ : १, १ ज्यानुएरी ५९, १५–१६)

नानासाहेब पेशवा १५ हजार सैन्यासह दक्षिणेवर चाल करून येत असल्याबद्दल बातमी आहे. कानपूरला साहेबलोकांची व मडमांची जी कत्तल झाली, तीत आपला काहीच हात नव्हता, असे तो सांगतो, पण इंग्रज सरकार आपणांला क्षमा करील, अशी त्याला आशा वाटत नाही. त्याच्या सावत्र आयाही त्याच्याबरोबर आहेत. या स्त्रियांनी मागे नानावर संपत्तीकरिता दावा केला होता. पण तो बुडाला.

६६४ (१८ : १, १ ज्यानुएरी ५९, १६)

बंडखोर वेणीमाधव ७ हजार बंडवाल्यांसह जात असताना लार्ड क्लैड याने त्याजवर हल्ला करून त्याचे ५०० सैनिक मारले. बरेच नदीमधून जात असताना बुडून मेले, असे म्हणतात. अजिमगडाहून शहाजानपुरापर्यंत आता शांतता आहे.

६६५ (१८ : १, १ ज्यानुएरी ५९, १६)

रेल्वे इंजिनियर बायल यांनी आरा येथे गोऱ्यांच्या संरक्षणात सरकारला फार मदत केली, म्हणून त्यांना १० हजारांची जहागिरी दिली जाईल.

६६६ (१८ : १, १ ज्यानुएरी ५९, १६)

दोन हजार बंडखोरांनी दुबाबामध्ये बेला हे गाव लुटले. फुपौंड या ठिकाणी इंग्रज सैन्याशी त्यांची गाठ पडली. पण तलवारीशिवाय शस्त्र नसल्यामुळे इंग्रजांचे १५–२० स्वार पडले. बंडखोरांनी चंदपूर किल्ला घेतला. इंग्रजांस माघार घ्यावी लागली.

६६७ (१८ : १, १ ज्यानुएरी ५९, १६)

अहमदनगरमध्ये राणीच्या राज्यावरून झालेल्या समारंभात घोड्यांनी लोकांना लाथा मारल्या. पण कोणी जखमी झाले नाही.

६६८ (१८ : १, १ ज्यानुएरी ५९, १६)

बाप्तिस्मा घेतलेले एक भाट्या व एक मुस्लीम हे दोघे परत आपल्या धर्मात गेले.

६६९ (१८ : १, १ ज्यानुएरी ५९, १६)

मद्रासमध्ये दोघा हिंदू तरुणांचा बाप्तिस्मा झाला.

६७० (१८ : १, १ ज्यानुएरी ५९, १६)

व्हिक्टोरिया राणीचा पुत्र प्रिन्स ऑफ वेल्स हा कर्नल झाला.

**६७१** (१८ : १, १ ज्यानुएरी ५९, १६)

गुलामांचा व्यापार उघड किंवा छपून करू नये, असा सरकारने इशारा दिला आहे.

**६७२** (१८ : १, १ ज्यानुएरी ५९, १६)

पुणे ते नगर आणि नागपूरपर्यंत तारायंत्राची सोय होणार.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १८, अंक २, मुंबई, १५ ज्यानुएरी १८५९

**६७३** (१८ : २, १५ ज्यानुएरी ५९, १७-१८)

आस्ट्रिया नावाच्या बोटीस आग लागली. ५२३ माणसांपैकी अवघी ९० वाचली. त्यावेळी नास्तिक व ईश्वरभक्त यांच्यातील अंतर स्पष्ट झाले. नास्तिकास मरणसमयी फार दुःख व खेद होतो. कर्कश किंकाळ्या व मानसिक तळमळ, हे त्याचे विशेष वाटतात. आदल्याच दिवशी नास्तिकांनी प्रभूची पुस्तके फाडली होती. पण हे पटाईत सिंह संकट समोर पाहून घाबरतात. आपल्या वेडेपणाचा त्यांना फार पश्चात्ताप होतो. मरणापासून सोडविणारा कोणी नाही, म्हणून ते रडतात. धार्मिक माणूस मात्र अगदी शांत असतो. इतरांना प्रार्थना करण्यास लावून स्वतः प्रार्थना करतो. येशू हे एक अमोल रत्न आहे, अशी त्याची खात्री असते. आपला तारणारा आपल्याजवळच आहे, याबद्दल त्यांना विश्वास असतो. मृत्यूचे भयानक रूप आम्हांस भिववू शकणार नाही. कॅथॉलिकांच्या कर्कश आरोळ्या आणि इस्रायलींचे गुडघे टेकणे, यांपेक्षा आम्हा प्रातेस्तंताचे धैर्य वाखाणण्याजोगे आहे. जन्मभर ईश्वराची सेवा केली, तर मरणारास घाबरण्याचे कारण नाही. आग वाढू लागल्यावर आम्ही शांतपणे समुद्रात उड्या टाकल्या. तात्पर्य, आत्म्यास आधार देण्याची शक्ती खऱ्या भक्तामध्येच असते.

**५७३ अ** (इंम : १७–१८)

**५७४** (१८ : २, १५ ज्यानुएरी ५९, २२–२३)

पाचेगावच्या मिशनात कित्येक मिशनरी जमले. इंग्रेजी राज्याचा पाया मुस्तकिम व्हावा म्हणून त्यांनी देवा, राणी वाचीव हे गाणे गाईले. मंडळीतील खिस्ती लोकांची भक्ती पाहून गावकरीही आश्चर्यचकित झाले. एवढे लोक एकत्र प्रार्थना करतात, त्याअर्थी राणीच्या राज्याचा कधी बिमोड होणार नाही, असे त्यांना वाटले. नेटिवांना समजून येईल की, इंग्रेजी राज्यास मांसमय बाहूंचे नाही, तर सामर्थ्यवान ईश्वराच्या बाहूंचे बळ आहे.

**५७४ अ** (इंम : २२)

**५७५** (१८ : २, १५ ज्यानुएरी ५९, २३–२६)

(पुढे चालू) बाप्तिस्मा घेतल्यावर नयनसुखाने शुभवार्तिक होण्याची तयारी चालविली. चांबरलेनसाहेबाबरोबर राहून तो चव्हाठ्यावर उपदेश करी. एका मडमेबरोबर तो आगऱ्यासही गेला होता. नदीकाठावर उभा राहून तो खांबी दिल्हेला खिस्त गाजवीत असे. काळ्या पलटणीसही उपदेश करी. प्रथम त्यास अधिकारी रागावले. पण नंतर त्याच्या प्रवचनांवर खूष झाले. एका दुष्ट गोसाव्याने त्यास चिमटा मारून बेशुद्ध केले व नदीत बुडविण्याचा प्रयत्न केला. पण ईश्वराने त्यास मरणाच्या दाढेतून जिवंत राखले. भरतपूर संस्थानातही तो गेला, पण एकदा भयंकर स्वप्न पडल्यामुळे परत आला. त्यास मारण्याचे बेत भरतपुरात चालले होते. ग्वाल्हेरच्या शिंदे राजांनी तर त्याला राजवाड्यात बोलावून त्याची उत्तम सोय केली होती. विद्वान व अविद्वान सर्वांनाच तो शुभवर्तमान सांगे. चांबरलेनसाहेबाबद्दल तो अत्यंत सन्मानाने व प्रीतीने बोले. भागलपूरच्या पहाडी भागात उपदेशासाठी गेल्यावर त्याला अरण्यज्वर लागला, म्हणून तो विश्रांतीसाठी आगऱ्यास परत आला. बरा झाल्यावर जादा वेतनाची पर्वा न करता तो मोंघीरला गेला.

५७६ (१८ : २, १५ ज्यानुएरी ५९, २६–२९)

नव्या करारातील भविष्यवचने सतत खरी ठरतात. 'लोक तुमच्याविरुद्ध लबाडीने बोलतील' हे वचन वर्तमानदीपिकेने सिद्ध केले. दीपिकाकर्ता म्हणतो की, पाद्री लोक लहान मुलांना फसवून बाटवितात. त्याला कागदोपत्री पुरावा सापडला व तो म्हणजे मिस्तर दुमिंग व हरिश्चंद्र गोपाळजी यांचा पत्रव्यवहार होय. तरीही दुमिंगने हरिश्चंद्रजीला कोणते तरी प्रलोभन दाखविले, असे त्या पत्रावरून सिद्ध होत नाही. लेखी साक्ष उपयोगी पडणार नाही, म्हणून दीपिकेने हरिश्चंद्राचे बोलणे छापले आहे. तो म्हणतो की, पाद्री लोक आपला भाग्योदय करतील, असे दुमिंग म्हणाले होते. हरिश्चंद्राचे वय १६ हून जास्त आहे. नानजी गोकुळही अज्ञानी आहे, अशी बाजू दीपिकेने मांडली. पण तो कोर्टात सज्ञानी ठरला. सत्य–मिथ्या निवडण्याकरिता खाजगी पत्रांचा उपयोग करू नये, ही साधी व्यवहारनीती आहे. ख्रिस्ती लोकांचा हेतू शुद्ध व निष्कपटी आहे. आत्म्याच्या तारणाकरिता ते सतत प्रयत्न करतात. हरिश्चंद्रजीनेच आपला मतलब साधण्याकरिता आपण ख्रिस्ती होऊ, असा दुमिंगचा समज करून दिला नसेल कशावरून ? कुसंगतीच्या वाऱ्याने त्याच्या मनातील दिव्य ज्योत विझून गेली असेल. हरिश्चंद्रजी ख्रिस्तीधर्मविषयक पुस्तके आपल्या मित्रांना वाचावयास देत असे, असे खुलासेवार पत्र एक 'शुभचिंतक' याने लिहिले आहे.

८७७ (१८ : ३, १५ ज्यानुएरी ५९, २९–३१)

रा. गोविंद नारायण यांनी एका भाषणात सांगितले की : कित्येक तरुण विद्यार्थी इंग्रजी भाषेचे मर्मज्ञ होण्याची इच्छा बाळगतात व दुसरीकडे लक्ष देत नाहीत. मजूर जसा हेलाच्या खेपा करतो, त्याप्रमाणे ते मिळतील तेवढी इंग्रजी पुस्तके वाचण्याचा सपाटा लावतात. वाचनाबद्दल फुशारकीही मिरवितात. विद्वत्तेचा आव आणतात. पुस्तकालयांचाही जिकडे तिकडे सुकाळ झाला आहे. केवळ खाण्याने माणूस बळकट होत नसतो. त्याप्रमाणे नुसत्या वाचनाने माणूस विद्वान होत नाही. थोडे वाचून विचार केला व ते स्वभाषेत प्रगट केले, म्हणजेच ज्ञान बळकट होते. अडाणी सैनिकास शस्त्रे दिली, तर त्याला त्यांचा भार मात्र होतो. म्हणून थोडेच वाचावे आणि पुष्कळ ल्याहावे. मोठा तत्त्ववेत्ता आणि ज्ञानी होण्यास इंग्रजी भाषाच पाहिजे, अशी समजूत झालेली आहे. ज्ञान हे बुद्धी व परिश्रम यांवर अवलंबून असते, भाषेवर नव्हे. अनेक ग्रंथ लिहिले गेल्यामुळेच संस्कृत भाषेस प्रौढत्व प्राप्त झाले. बेटी नावाचा तत्त्वज्ञ म्हणत असे की, तुम्ही कितीही भाषा शिकलात, तरी जोपर्यंत तुम्हांस स्वभाषा चांगली येणार नाही, तोपर्यंत तुम्ही खरे विद्वान ठरणार नाही. आडिसन दर रविवारी एक निबंध लिहीत असे. त्याचे प्रौढ व रसिक निबंध पाहून खात्री पटते की, स्वभाषेतही विद्वान व तत्त्ववेत्ता होणे अशक्य नाही. स्पॅनिश लोकांना मातृभाषेचा तिटकारा वाटत असे. १६०४ मध्ये लिहिलेल्या 'डॉन क्यु झोट' नाटकात त्यांच्यावर टीका केलेली आहे. इतालीमधील दांती व पित्रार्क, मराठीत बाळ गंगाधर (जांभेकर) किंवा तुकाराम यांच्या उदाहरणांवरून हे आपल्या लक्षात येईल. (ज्ञानप्रसारक जाने : १८५८).

**९७८** (१८ : २, १५ ज्यानुएरी ५९, ३१–३२)

तात्या टोप्या पळून जाताना गावेच्या गावे जाळीत आहे. लूटालूट करीत आहे. मैसदे नावाचे नांदते गाव त्याने जाळले. तेथील लोक अन्नपाण्याला मोताद झाले. प्रतापगडपर्यंत मेजर सिंपसन व पोलटन यांनी त्याचा पाठलाग करून त्याचे शेकडो सैनिक ठार मारले. मानसिंगला जाऊन मिळावे म्हणून तो मंदेसरमार्गे चंबळ उतरून गेला. पण कर्नल बेन्सनने त्यास गाठले. तात्याचा पराभव झाला व तो पुन्हा पळाला. उत्तरेस मनोहार गावच्या लोकांनी वेशी बंद केल्यामुळे तो वायव्येकडे वळला.

**९७९** (१८ : २, १५ ज्यानुएरी ५९, ३१–३२)

राधागोविंद नावाचा नवीनच बंडखोर हजार-दीड हजार सेनेसह इंग्रजांना त्रास देत आहे. नारायणरावाच्या वाड्यातील गोऱ्या सैनिकांना अडकावण्यासाठी त्याने वाड्यास वेढा घातला आहे. त्याचे बरेचसे सैनिक दुखणाईत आहेत.

**९८०** (१८ : २, १५ ज्यानुएरी ५९, ३१–३२)

सरसेनापती लार्ड क्लैद यांनी अयोध्येच्या बेगमेस बरैच्छा येथे ताब्यात घेतले.

**९८१** (१८ : २, १५ ज्यानुएरी ५९, ३१–३२)

नानासाहेब पळून जाऊन चूडीच्या जंगली किल्ल्यात आश्रयास राहिला.

**९८२** (१८ : २, १५ ज्यानुएरी ५९, ३१–३२)

अयोध्येच्या बेगमेस कैद झाल्यामुळे तिचे सैनिक नेपाळकडे पळाले.

६८३ (१८ : २, १५ ज्यानुएरी ५९, ३१-३२)

बडोद्याजवळच्या दाट जंगलात कित्येक बंडखोर लपले होते. त्यांजवर हल्ला करून इंग्रज सेनेने मोठा विजय मिळविला. एकही इंग्रज सैनिक मेला नाही.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय पुस्तक १८, अंक ३, मुंबई, १ फेब्रुवारी १८५९

६८४ (१८ : ३, १ फेब्रुवारी ५९, ३५-३८)

एका खिस्ती माणसाच्या अंत्ययात्रेवरून तिनीवेलीत मोठा दंगा झाला. या गावामध्ये सुमारे ५० हजार खिस्ती आहेत. १८४५ मध्ये ३ हजारांपेक्षा जास्त हिंदू एकत्र जमले व त्यांनी खिस्ती लोकांना क्रूरपणाने मारहाण केली. काही उंच जातींच्या हिंदूंनी आपल्या दारावरून खिस्ती प्रेतयात्रा नेण्यास विरोध दर्शविला. म्हणून भाताच्या शेतातुन शवयात्रा जाई. पण शेताचे नुकसान झाल्यामुळे मळेकऱ्यास भरपाई द्यावी लागे. १० दिसेंबरला एक खिस्ती मरण पावला, तेव्हा रे. सार्जंट यांनी मुख्य रस्त्यावरून अंत्ययात्रा नेण्याचा परवाना जज्जाकडून मिळविला. पण हजारो हिंदूंनी विरोध केल्यामुळे उत्तरक्रिया लगबगीने करावी लागली. दुसऱ्या एका अंत्ययात्रेच्या वेळेस नवीन माजिस्त्रेताने मुख्य रस्त्याने जाण्याची मुभा दिली. परंतु लोक विरोधासाठी उभे राहिले. त्यांनी लष्करावर दगडफेक केल्यामुळे गोळीबार करावा लागला. सरकारी अंमलदार दरवेळी नवीन हुकूम देतात. पण खिस्ती लोकांना अन्याय व पाठलाग याची सवय आहे. राणीसरकारचे हमरस्ते सर्वांनाच मोकळे आहेत. पण जाहीरनाम्यातील कलमांचा विक्षिप्त अर्थ काढून खिस्ती लोकांना त्रास देण्याचा उद्योग चालतो. निःपक्षपाती न्याय व समानता ही तत्त्वे ध्यानात ठेवून सर्वांनी वागावे. सरकार खिस्ती रयतेवरही जुलूम होऊ देणार नाही.

**५८४ अ** (इंम : ३३–३४)

**५८५** (१८ : ३, १ फेब्रुवारी ५९, ३८–३९)

पारशी स्त्रियांकरिता स्त्रीज्ञानमाला हे गुजराथी पुस्तक तयार झाले. त्यात नीती व परस्पर व्यवहार यांबद्दल निबंध आहेत. शिमगा, पिशाचभक्ती, विवाह, स्त्रीशिक्षण, वगैरे अनेक विषय त्यात हाताळले आहेत. पारशी लोक मिथ्याचाराच्या दास्यातून स्त्रियांना मुक्त करण्यास सिद्ध आहेत. म्हणून आनंदच वाटतो. ते जी सुधारणा करू पाहातात ती लोकांच्या विरोधावाचून होणार नाही. यात संशय नाही. सुधारणेची इच्छा असणे, हेच एक मोठे सुचिन्ह होय. वेडगळ चाली बंद व्हाव्या, निदान कमी व्हाव्यात. हिंदू स्त्रियांसाठीही असा ग्रंथ करावा.

**५८५ अ** (इंम : ३८)

**५८६** (१८ : ३, १ फेब्रुवारी ५९, ३९–४१)

बापू नावाच्या मुलाचे असे मत झाले की : शाळा शिकण्यापेक्षा ईश्वराचे काहीतरी काम करावे. शिक्षणात काही फळ नाही. त्याचा मित्र हरी यास असे वाटते की : स्वदेशीय लोकांना उपदेश करावयाचा असल्यामुळे जन्मभाषेकडे जास्त लक्ष द्यावे. ईश्वराचा आशीर्वाद मागून काम करावे. इंग्रजी शिक्षणास एवढे महत्त्व देण्याचे कारण नाही. इंग्रजी शिकण्यात वेळ घालविण्यापेक्षा स्वभाषेचा लक्षपूर्वक अभ्यास करा. लक्षावधी लोकांना त्याचा उपयोग होईल. बरे करताना थकू नका. यथाकाळी तुम्ही योग्य फळ पावाल. सहनशीलता व विश्वास मात्र हवा. अनुपकारी व अल्पविश्वासी लोकांच्या नादी लागू नका. आमचे प्रारंभीचे मिशनरी केवळ नांगरणारे व बी पेरणारे होते. फळ दिसले नाही, तरी त्यांनी अखंड प्रयत्न चालू ठेवले. लोकांचे दुर्गुण दूर करून त्यांच्यामध्ये विश्वास व प्रीत निर्माण करावी. विशेषतः लहान मुलांच्या कोमल अंतःकरणात भक्तीचे बी पेरावे. हजारो लोकांना ते सुखदायक ठरेल. मुलांची नेहमी काळजी वाहावी. त्यांच्या सुखासाठी नेहमी प्रार्थना करावी. ईश्वर यश देईल.

५८७ (१८ : ३, १ फेब्रुवारी ५९, ४१–४५)

(पुढे चालू) सत्याच्या शोधाचे अगत्य वाटले की, माणूस तारणाचा उपाय शोधतो. एका सरदाराला नयनसुखच्या उपदेशावरून पश्चात्ताप झाला. पण नयनसुखाने त्यास सांगितले की : 'आधी तू आपल्या धन्याबरोबरचा करार पूर्ण करून नातेबाईकांचा निरोप घेऊन ये.' पण हा माणूस पुन्हा आलाच नाही. मेकंबीसाहेबाबरोबर शुभवर्तमानाचा प्रसार करीत असताना नयनसुखाने जिवापाड परिश्रम केले. तो रोगी झाला. विसाव्याची वेळ जवळ आली. मरणाच्या कठीण झुंजीतून आकाशलोकींच्या अक्षय सुखात जाण्यासाठी तो फार उत्सुक झाला. आपल्या कळपातील अशक्त कोकरांचा सांभाळ करा, असा संदेश त्याने मित्रांना दिल्हा. आपल्या अपराधांची क्षमा मागितली. सतत विवेकबुद्धीने वागल्यामुळे तो अतिशय शांत होता. तो नम्र, सभ्य व परोपकारी होता. एका गोसाव्याने बाप्तिस्मा घेऊन त्याला आपला आत्मिक बाप म्हटले होते. दंभ, आढ्यता व डौल, यांपासून तो नेहमी दूर राही. तो देवाचे चरित्र सांगू लागला की, ऐकणाऱ्यांचे चित्त द्रवून जाई. आजारी व दुःखितांचा समाचार घेण्यास तो जाई. शेवटपर्यंत त्याची आशा व विश्वास वाढतच गेले. विद्येचे बळ नसतानाही त्याने आपले काम भक्तीने केले.

५८८ (१८ : ३, १ फेब्रुवारी ५९, ४५–४७)

'एतद्देशीय ख्रिस्ती' लिहितो की : पुष्कळ ख्रिस्ती लोकांचे जुने नातेबाईक असतात. त्या अपश्चात्तापी लोकांशी बोलणे अजिबात बंद करू नये. काही मनोरंजक विषयाने सुरुवात करून त्यांच्याशी धर्मसंबंधी बोलावे. द्रव्यादि सुखे जगिक आहेत. एकांतातील उदासी नष्ट करण्याचा उपाय धर्म हाच आहे. राजेरजवाडे नाचतमाशासारख्या मूर्ख व नाशकारक उद्योगात वेळ घालवितात. पण मनाला खरे समाधान धर्माने वाटते. खाण्यापिण्यात खरे सुख नाही, तर गरीब गरजवंतांना मदत करण्यात खरा आनंद आहे. परोपकारिक कृत्यांत बहुत दुःखे भोगावी लागतात. तरी त्यात समाधान असते. ईश्वर प्रीतिरूप आहे. मनुष्यमात्राचे कल्याण करण्यामध्ये काळ घालवावा. म्हणून इतरांना धर्मसंबंधी बोध करावा.

**६८९** (१८ : ३, १ फेब्रुवारी ५९, ४७–४८)

अयोध्येची बेगम इंग्रजांच्या ताब्यात आली ही बातमी खोटी ठरली.

**६९०** (१८ : ३, १ फेब्रुवारी ५९, ४७–४८)

राधेगोविंदावर मि. व्हिटलाकने हल्ला करून त्याचे ३०० सैनिक मारले. इंग्लिशांतील मात्र कोणीही मेले नाही.

**६९१** (१८ : ३, १ फेब्रुवारी ५९, ४७–४८)

तात्या टोपे शहाबादच्या किल्ल्यात आश्रयासाठी राहणार आहे. माधवराव व फिरोझशहा यांनी तात्याशी हातमिळवणी केली.

**६९२** (१८ : ३, १ फेब्रुवारी ५९, ४७–४८)

नानासाहेब नेपाळात पळाला. त्याचबरोबर १५ हजार सैन्य आहे.

**६९३** (१८ : ३, १ फेब्रुवारी ५९, ४७–४८)

भगवंतपुरात ब्रिटिश फौजेवर हल्ला करून बंडखोरांनी एक सोजीर मारला.

**६९४** (१८ : ३, १ फेब्रुवारी ५९, ४७–४८)

२४ व्या काळ्या पलटणीतील दोन शिपायांनी बाप्तिस्मा घेतला. ख्रिस्ती धर्माने सैनिक बिघडतात, हे कंपनीचे मत किती चूक होते, ते आता कळेल.

**६९५** (१८ : ३, १ फेब्रुवारी ५९, ४७–४८)

अहमदनगरला विलायती डाकही तारायंत्राने येते.

**५९६** (१८ : ३, १ फेब्रुवारी ५९, ४७–४८)

खानदेशालगतच्या मोगल हद्दीत रोहिल्यांनी लुटालूट करून एक लाख रुपये नेले व पुष्कळ स्त्रियांना पळवून नेले.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १८, अंक ४, मुंबई, १५ फेब्रुवारी १८५९

**५९७** (१८ : ४, १५ फेब्रुवारी ५९, ५०–५४)

वाटरलू येथे जय मिळाल्यावर मेजर नाक्स म्हणाला होता की : आमचा विजय ही ईश्वराची कृपा होय. ईश्वर आपल्या अगाध ज्ञानाचे हेतू सिद्धीस नेण्यासाठी लढाया उद्भवू देतो व विझवतो. राष्ट्रांचे उदय आणि अस्त त्याने ठरविले आहेत. ज्यास हे कळत नाही, तो अंधळा व मूर्ख समजावा. १८५७ च्या मे महिन्यात बंड सुरू झाले, तेव्हा इंग्रज फौजेच्या दसपट बंडवाल्यांची संख्या होती. कलकत्त्यापासून पेशावरपर्यंत बंड सुरू झाले. पण इंग्रज व फ्रेंच यांची मैत्री असल्यामुळे इंग्रज सरकारास लगेच मोठी मदत मिळाली. रशियाशी व इराणशी तह झाल्यामुळे तिकडची फौजही हिंदुस्थानमध्ये आली. चीनमधील लढाई थांबवून तिकडची कुमकही इकडे आणली. स्वतःला बादशहा म्हणविणाऱ्या पेशावरच्या एका मौलवीचा ताबडतोब पराभव झाला. बंडवाल्यांनी १५ मे रोजी बंड करावे, असे ठरविले होते. पण काहींनी ९ व्या तारखेसच गडबड सुरू केली. त्यामुळे डाव त्यांच्यावर उलटला. तरी दिल्लीच्या रस्त्यामधून खिस्ती लोकांच्या रक्ताचे पूर वाहिले. तारायंत्राच्या सोयीमुळे बंडाची बातमी गावोगावच्या लष्करी अधिकाऱ्यांना समजली व बंड आटोक्यात आले. तारायंत्राने आम्हांस वाचविले. नाहीतर आम्ही सर्व मेलो असतो, असे ते सांगतात. सुरुवातीला बंडवाल्यांना फार कडक शिक्षा झाल्यामुळे बंड जास्त पेटले व फितुरांची सुडबुद्धी वाढली, असेही काहींचे मत आहे.

६९७अ (इंग : ४९–५०)

६९८ (१८ : ४, १५ फेब्रुवारी ५९, ५४–५५)

फ्रेंड आफ इंडियाचा कर्ता म्हणतो की : तिनीविलीच्या माजिस्त्रेताने लष्कर बोलावले, हे योग्य नाही, असे लोकांना वाटते. पण रयतेचे आरोग्य व शांतता यांच्या दृष्टीने ही कृती अगदी योग्य ठरली. बादशाही रस्त्यावरच दंगल चालू होती. एखादी शांततापूर्ण शवयात्रा चालली असताना कोणी उपद्रव करावा, हे ठीक नाही. गर्दी झाली की, बेसुमार गप्पाघोळ होतो. अशावेळी गोळीबार करण्याशिवाय मार्ग राहात नाही. ख्रिस्ती लोकांना काही जादा अधिकार आहेत, असे कोणी म्हणत नाही. प्रश्न रस्त्याने जाण्याविषयी मोकळीक आहे किंवा नाही, याचा आहे. कोणीही हुऱ्यो करून धोंडमार करावी, हे बरोबर नाही. सक्तीच्या तजविजीमुळे ६ माणसे मेली. पण दंगेखोरांनी कायद्यास प्रतिबंध करून कायदा हातात घेतल्यामुळेच हा अनर्थ घडून आला. ख्रिस्ती लोकांस आपल्या बचावाचा हक्क आहे. लोकांमध्ये शांतता राखून सरकारने शुभवर्तमानाला खुला रस्ता मिळवून द्यावा. वेळ पडली, तर तरवारीच्या जोरावर शांतता राखावी.

६९८अ (इंग : ५४)

**५९९** (१८ : ४, १५ फेब्रुवारी ५९, ५६–५७)

त्रावणकोरमध्ये नायर या उंच जातींच्या लोकांनी शानार या ख्रिस्ती लोकांवर हल्ला केला. शानार हे दक्षिणेकडचे अस्पृश्य असून त्यांच्या स्त्रियांनी कमरेपासून वर कुठलेही वस्त्र घालू नये, अशी जुनी चाल आहे. हे लोक ख्रिस्ती झाल्यामुळे सुशिक्षित स्त्रिया अंगावर वस्त्र घेऊ लागल्या. पण या स्त्रियांनी अंग झाकल्यामुळे आमची अमर्यादा होते, अशी ओरड करून नायर लोकांनी त्यांची मालमत्ता जाळली. एका विचित्र व लाजिरवाण्या चालीचे पुनरुज्जीवन करण्याचा हा हट्ट चमत्कारिक नाही काय? नायरांनी प्रॉटेस्टंट देवळेही जाळली. स्त्रियांना वस्त्रप्रावरण परिधान करण्याचा हक्क ईश्वराने दिल्हा आहे. तो हिरावून घेणे अयोग्य आहे. असल्या चालीरीतींची कोणालाही ओकारीच येईल. मद्रास सरकारने दंगेखोरांना शिक्षा करून दहशतीचे वातावरण कमी केले पाहिजे.

**५९९ अ** (इंग : ५५–५६)

**६००** (१८ : ४, १५ फेब्रुवारी ५९, ५७–५८)

अयोध्येमधील लढाई अगदी बंद झाली. तेथील बंडखोर पर्वतांच्या प्रदेशामध्ये निघून गेले. एक लक्ष बंडखोरांनी सहाशे किल्ले ताब्यात ठेवले होते. पण इंग्रज सैन्याने जागोजाग मारा करून ४८३ किल्ले जमीनदोस्त केले. नेपाळच्या जंगबहादुराने आश्वासन दिल्हे की, कोणत्याही बंडखोराला इंग्रज मुलखात येऊ देणार नाही. त्याच्या फौजेपुढे बंडवालेही निष्प्रभ ठरतील. या प्रांतातील धामधूम संपली आहे. इतर ठिकाणीही लवकरच शांतता होईल.

**६०० अ** (इंग : ५७)

**६०१** (१८ : ४, १५ फेब्रुवारी ५९, ५८)

'क्यांडीकृत इंग्लिश व मराठी कोशाचा संक्षेप' : या कोशात बावीस हजारांहून अधिक शब्द आहेत. ते मूळ ग्रंथाच्या एक अष्टमांश मात्र आहेत. इंग्लिश शब्दांचे अर्थ मराठीत आहेत. मराठी उपशब्द किंवा पर्याय उपयोगी पडण्याजोगे निवडले आहेत. आगाऊ पैसे दिले, तर ३॥ रु. व नंतर ४ रुपये पडतील.

**६०२** (१८ : ४, १५ फेब्रुवारी ५९, ५८–५९)

'इस्राएल लोकांच्या सद्गुणशोधक' : मंडळीची दुसरी वार्षिक सभा रे. डाक्तर विल्सन यांच्या अध्यक्षतेखाली भरली होती. इयोबाच्या २८ व्या अध्यायाचे वाचन होऊन प्रार्थना झाली. मोरोबा विनोबांनी सद्गुण अंगीकारणे व वर्तणे यांवर भाषण दिल्हे. योसेफ राजपुरकरने सभासदांचे गुण सांगितले. शार्टरीडसाहेबांनी स्त्रीविद्याभ्यासाचे महत्त्व वर्णन केले अध्यक्षांनी सभेच्या कामाबद्दल आनंद प्रकट केला.

**६०३** (१८ : ४, १५ फेब्रुवारी ५९. ५९–६१)

गेल्या दीड वर्षात (इस्राएल लोकांच्या सद्गुणशोधक मंडळी) या सभेचे काम व्यवस्थित चालू आहे. सभासदांची संख्या ५० वर गेली. अनहितकारक चाली काढून टाकण्यास पंचांनी लक्ष घालावे, अशी विनंती केली आहे. 'प्रायश्चित्ताविषयी पापाबद्दल कबुली' हा छोटा ग्रंथ प्रसिद्ध झाला. बालविवाह, विद्यावृद्धी, गर्व, दारिद्र्याची कारणे, मैत्री, परोपकार, मनुष्यदेहाची रचना, या विषयांवर निबंधवाचन झाले. वडलांची नीती व पापासाठी क्षमा, ही पुस्तके प्रकाशित होणार आहेत. आर्थिक मदतीची गरज आहे. बुक सोसायटीने ग्रंथालयास काही पुस्तके दिल्ही.

**६०४** (१८ : ४, १५ फेब्रुवारी ५९, ६१–६४)

रोहिल्यांनी रिसोर गाव लुटले, तेव्हा इंग्लिश फौजेने त्यांजवर हल्ला केला. इंग्लिश सेनेतील कित्येक मेले व जखमी झाले. सर ह्यू रोजने त्या सेनेस पळवून लावले. बुलढाण्याच्या तुरुंगातून पळून जाणारे २० कैदी मारले गेले. रोहिले एका गढीत लपले आहेत. इंग्रजांचा स्नेही नबाब सालारजंग याचा ते द्वेष करतात. निजाम बंड करील, अशा खोट्या बातम्या उठवितात.

**६०५** (१८ : ४, १५ फेब्रुवारी ५९, ६१–६४)

तात्या टोप्या उदेपूरमार्गे दिल्लीकडे निघाला अशी बातमी आहे. त्याच्याजवळ ५० हजार फौज आहे, पण तोफा नाहीत. बिकनिर व हिस्सारमधील मडमा पळून जात आहेत. तात्यास पकडणाऱ्यास दहा हजारांचे बक्षिस जाहीर झाले.

**६०६** (१८ : ४, १५ फेब्रुवारी ५९, ६१–६४)

अयोध्येत बंडाचा पूर्ण बीमोड झाला. जमीनसाऱ्याचे नवे कायदे रयतेस हर्षकारक वाटतात. बेगम आपल्या कुटुंबकबिल्यासह पळून गेली. १८०० बंडखोर शरण आले.

**६०७** (१८ : ४, १५ फेब्रुवारी ५९ ६१–६४)

राधेगोविंद, नरपतसिंग व त्यांचे भाऊ हे बंडखोर लढाईत मारले गेले.

**६०८** (१८ : ४, १५ फेब्रुवारी ५९, ६१–६४)

खंडाळा घाटात लोखंडी रस्त्याचे काम चालू आहे. तेथील मक्तेगार लबाडी करतात. रोजमुरा कमी देतात, म्हणून मजुरांनी गडबड केली. एका साहेबास भाल्याने भोसकून ठार मारले. ही गडबड केवळ मजुरांच्या उपासमारीतून उद्भवली.

६०९ (१८ : ४, १५ फेब्रुवारी ५९, ६१–६४)

कमांडर इन चीफ लॉर्ड क्लैद घोड्यावरून पडून जखमी झाला. आजारी असतानाही त्याने बेनीमाधवच्या मेजिर्दिया किल्ल्यावर हल्ला करून बंडखोरांना पळवून लावले. आक्तोबर अखेर ७१२ बंडखोर आंदामान बेटावर रवाना झाले.

६१० (१८ : ४, १५ फेब्रुवारी ५९, ६१–६४)

हरकारू पत्रावरून असे समजते की, मागील आठवड्यात १ हजार बंडखोर शरण आले.

६११ (१८ : ४, १५ फेब्रुवारी ५९, ६१–६४)

राणीने बंडखोरांना शरण येण्याची मुदत १ जानेवारीपर्यंत दिली होती. ती वाढविली जाईल.

६१२ (१८ : ४, १५ फेब्रुवारी ५९, ६१–६४)

दिल्लीचा बादशहा फार आजारी असून तो जगेल याचा भरवसा नाही.

६१३ (१८ : ४, १५ फेब्रुवारी ५९, ६१–६४)

लॉर्ड क्लैद याचा बाप म्हातारा होऊन मरण पावला.

६१४ (१८ : ४, १५ फेब्रुवारी ५९, ६१–६४)

दिल्लीचा बादशहा रंगून येथे कैदेत आहे. त्याचा ज्येष्ठ पुत्र जमाखत रोज दारू पिऊन येतो व आईवर आरोप करतो की, तिने जडावाचे दागिने चोरले. ही कटकट रोजच चालते.

६१५ (१८ : ४, १५ फेब्रुवारी ५९, ६१–६४)

एका भाट्याने चाबूक या गुजराथी पत्रावर अब्रुनुकसानीची फिर्याद केली. कोर्टाने ६०० रुपये देऊन शिवाय दाव्याचा खर्च वादीस दिल्हा.

**६१६** (१८ : ४, १५ फेब्रुवारी ५९, ६१–६४)

मुंबईत १८५७ साली १७,२१० तर १८५८ मध्ये १४,१३५ माणसे मेली. दहा वर्षांची सरासरी १४,७१५ आहे. मुंबईची हवा उत्तरोत्तर निरोगी होत आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १८, अंक ५, मुंबई, १ मार्च १८५९

**६१७** (१८ : ५, १ मार्च ५९, ६६–७०)

ईश्वर नेहमी जपतो की, आपल्या भक्तांचा घात होऊ नये. १० मे १८५७ रोजी अंबाला छावणीतले सैनिक बिथरले होते. पण काही वेळाने ते स्वतःच शांत झाले. अंबाल्यास भजनस्थान नव्हते. म्हणून सर्व ख्रिस्ती लोक एका बंगल्यात प्रार्थना करीत असत. नवीन इमारत बांधून पूर्ण होत होती. मद्रासच्या बिशपाचे स्वागत करण्यासाठी नव्या बंगल्यात प्रार्थना करण्याचेही ठरले होते. पण आदल्या दिवशी हुकुम आला की, नव्या देवळात जाऊ नका. नवीन मंदिरावर हल्ला करावा, असा बंडवाल्यांचा बेत होता. पण ईश्वरानेच ख्रिस्ती लोकांना वाचविले. पंजाबातले युद्धसाहित्य सिंधू नदीतून पार केल्यावर तेथील पूल मोडला. सतलज नदीचा पूलसुद्धा तोफा व सैन्य उतरून गेल्यावर पडला. ही ईश्वराची केवढी कृपा. रोटकला तर एका काळ्या सेवकाने साहेब लोकांना अगोदर सावध केले व वाचविले. दिल्लीत यमुनेकाठी जी पलटण होती, तिच्यावर बंडवाले दुप्पट हल्ले करीत असत, तरी तिचे नुकसान झाले नाही. जेलम सियालकोट येथे अनर्थ झाल्यावर तेथील फौज दिल्ली येथे गेली. ईश्वराचे सामर्थ्य आश्चर्यकारक रीतीने प्रगट झाले. जर परमेश्वर आमच्या बाजूस नसता, तर आम्ही असे मृत्यूच्या मुखामधून बचावलो नसतो. देवास जे बरे वाटत होते, तेच त्याने घडविले.

६१७अ (इंम : ६५–६६)

६१८ (१८ : ५, १ मार्च ५९, ७०–७२)

मिशनऱ्यांना यातना देऊन त्यांना समुद्रमार्गे घालवून देण्याचा उद्देश त्रावणकोरचे ब्राह्मण उघडपणे बोलून दाखवितात. मिशनेऱ्यांची ६ भजनस्थाने त्यांनी जाळली. ७० हजार शानारांवर जुलूम सुरू केला. शानार लोक मूळचे लंकेतील असून ते जाफनाहून त्रावणकोरात आले. ते ताडीची लागवड करतात. ते सधन आहेत व अतिशूद्र नाहीत. पण उच्चवर्णीयांनी त्यांच्या स्त्रियांचा पोषाक ठरवून दिल्हा. इंग्रेजी अंमलात स्त्रिया चांगला पोषाक घालतात, म्हणून ते रागावले. राणीच्या जाहीरनाम्याचा मतलबी अर्थ कोणीतरी लावल्यामुळे शानारांवर पुन्हा जुलूम सुरू झाला. शानार स्त्रिया अत्यंत चतुर असून काही तर शिकलेल्या आहेत. पण स्त्रियांची वस्त्रे फाडणे व त्यांना मारहाण करणे, हे सत्र आता चालू आहे. खिस्ती उपदेशकांना अटक करण्याचे सत्र सुरू झाले. बनावट हुकूम तयार करून खिस्ती लोकांना मारतात. स्त्रियांना नग्न करून मारहाण करतात. शिपाई अशा दंगेखोरांना अटक न करता मिठाई खाऊ घालतात.

६१८अ (इंम : ७०)

६१९ (१८ : ५, १ मार्च ५९, ७२-७७)

रे. ल्युपोल्नसाहेब कलकत्त्याच्या भाषणात म्हणाले की : १८५७ मध्ये ख्रिस्ती लोकांना अनेक संकटांना तोंड द्यावे लागले. पण ख्रिस्ती लोकांनी धैर्याने सारे सहन केले. एतद्देशीय लोकांवर पवित्र आत्म्याची वृष्टी व्हावी, म्हणून प्रार्थना केली पाहिजे. बंडाच्या ऐन धामधुमीतही काशीला शुभवर्तमानाचे काम व्यवस्थित चालू होते. लखनौ शहरात तर मिशन स्थापण्यासाठी ५० हजार रुपये वर्गणी गोळा झाली. ईश्वरानेच जमीन नांगरून ठेवली. शेकडो लोकांनी उपदेश ऐकला. बंडवाल्यांनी लुटालूट करून लखनौ शहरास गरीब करून टाकले. सावकारांवर खोटे आळ घेऊन त्यांना ठार मारले. फिरंगी लोकांचा शोध घेण्याचे निमित्त करून जिनगी लुटली, स्त्रिया भ्रष्ट केल्या. म्हणून नागरिक ख्रिस्तासमोर लीन व नम्र झाले. काही लोक अशा अफवा उठवितात की, ख्रिस्ती होणाऱ्या लोकांना जन्माचे पेनशन व एक गोरी मडम बायको करून देण्याचे प्रलोभन दाखवितात. पण एक अमीर मनापासून ख्रिस्ताच्या स्वीकारास तयार आहे. त्याची तीन मुलेही ख्रिस्ती होणार आहेत. लखनौमध्ये मिशनची कचेरी झाली, तर आणखी लोक येतील. अयोध्येतही मोठे पीक आलेले आहे. ईश्वर आम्हांवर आशीर्वाद पाठवील.

**६२०** (१८ : ५, १ मार्च ५९, ७७)

हर एक गोष्टीत मनःकल्पित कारण लावणे, विलक्षण समजूत करून नाही त्या गप्पा उठविणे, यांत नेटिव हिंदू प्रवीण आहेत. राणीचा जाहीरनामा आल्यावर 'हा केवळ लोकांना भीति दाखविण्याचा उद्योग आहे,' अशा गप्पा उठल्या. काहीजण असेही म्हणतात की, देवीने राणीच्या स्वप्नात येऊन सांगितले की, येशू हा मेंढक्याचा पुत्र होता, त्यास कोणीही भजू नये, म्हणून राणीने कुंपणीच्या हातचा कारभार हिनावून घेतला. पाद्र्यांस हाकलून द्यावे, ख्रिस्ती धर्मप्रसार थांबवावा, असा हुकूम झाल्याबद्दलही वदंता निघाल्या. "कंपनी गेली, राणी गेली, आता 'मलिका मा आझमा' गादीवर बसली," असेही अडाणी लोक म्हणतात. यात्रेमध्ये बगाड पुन्हा सुरू होईल, अशा आशेने कोल्हार येथे शेकडो यात्रेकरू जमा झाले. त्यांची फार निराशा झाली. ज्या साहेबाने बगाड बंद केले, त्याच्यावर देवीची अवकृपा होऊन त्याला मोठा रोग झाला, असेही ते बोलतात.

**६२० अ** (इंग : ७७–७८)

**६२१** (१८ : ५, १ मार्च ५९, ७८–८०)

'एक फिरस्ता' लिहितो कीः मानभाव काळे कपडे वापरतात. त्यांचा भगवद्गीतेवरती फार विश्वास आहे. श्रीकृष्ण हा निराकार परमात्मा आहे, असे ते सांगतात. ते अहिंसापालन करतात. ढेकूणही मारीत नाहीत. श्रीकृष्ण काळा होता, म्हणून काळ्या रंगाची वस्त्रे वापरतात. जातिभेद मानीत नाहीत. कोणाच्याही हातचे खातात. इतरधर्मी लोकांना पंथात घेत नाहीत. दुष्टांचा नाश करण्यासाठी श्रीकृष्णाचा अवतार झाला, अशी त्यांची श्रद्धा आहे. त्यांच्या सरदारास महंत असे नांव आहे, पण आमचा सेनापती ख्रिस्त आहे.

**६२२** (१८ : ५, १ मार्च ५९, ८०)

ताल्या व नानासाहेब एकच आहेत, ही अफवा चुकीची ठरली. ताल्या हा कराडा ब्राह्मण असून महोबाजवळ श्रीनगर येथे त्याने खुद्याचे दुकान मांडले होते. ताल्या भावलपुरकडे निघाला असता चेंबरलेनने त्याजवर हल्ला करून त्यास पळवून लावले.

**६२३** (१८ : ५, १ मार्च ५९, ८०)

रोहिल्यांनी तीन गावें जाळून निजामाचा खजिना लुटला. आता ते पुसद गावात मुक्कामास आहेत. सर ह्यू रोजची फौज तिकडे जाईल.

**६२४** (१८ : ५, १ मार्च ५९, ८०)

बंडवाल्यांचे ६०० शिपाई, ७ अधिकारी बिकानेरच्या राज्याच्या स्वाधीन झाले.

**६२५** (१८ : ५, १ मार्च ५९, ८०)

गवरनर जनरलसाहेबांचा मुक्काम अलाहाबादेस असताना बंडवाल्यांचे माफीबद्दल ९३०० अर्ज आले.

**६२६** (१८ : ५, १ मार्च ५९, ८०)

कलकत्ता मिशनात एका हिंदू जमादाराने खिस्ती धर्माची दीक्षा घेतली. तो मि. यंगच्या तैनातीत होता. कित्येक साहेब व मडमा यावेळी उपस्थित होत्या.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**६२७** (१८ : ६, १५ मार्च ५९, ८२-८५)

लंडन मिशनचा चिटणीस मि. एलिस तीन वेळा मादाग्यास्कर बेटावर जाऊन आला. चाळीस वर्षांपूर्वी स्थापन झालेल्या मिशनाचे नवे स्वरूप तेथे दिसते. बीस वर्षांपूर्वी मिशनरी लोकांची हकालपट्टी झाली. पाठलाग व छळणूक झाली. मिशनरी गेल्यावरही अनेक लोकांनी ख्रिस्ती धर्म स्वीकारला. तेथील राजपुत्र ख्रिस्ताबद्दल अनुकूल बोले, म्हणून दरबारी लोकांनी त्यास ठार मारण्याचा प्रयत्न केला. पण राजपुत्र सौम्य व न्यायी आहे. १८४९ मध्ये ख्रिस्ती लोकांची चौकशी झाली. राणीने त्यांना फार छळले. पण ते सांगत असत की, चंद्र सूर्य, पर्वत किंवा मूर्ती, अगर पूर्वज यांची प्रार्थना करू नये. माणसे किंवा वस्तू देव होऊ शकत नाहीत. त्यांना मुसक्या बांधून कोठडीत टाकले, तरी ते शरण गेले नाहीत. यहोवाऐवजी रोबोदा राणीस देव म्हणा, असा जुलूम त्यांच्यावर झाला. चार लोकांना जिवंत जाळले, अठरा लोकांना कडेलोट करून ठार मारले, तरीही ते मृत्यूसमोर दिसत असताना ख्रिस्ताची प्रार्थनागीते गात होते. त्यांचे धैर्य अलौकिक होते. लवकरच हे बेट ख्रिस्ताच्या राज्यात तेजःपुंज रत्नासारखे प्रकाशू लागेल.

**६२७ अ** (इंग : ८१-८२)

**६२८** (१८ : ६, १५ मार्च ५९, ८६–८७)

(पुस्तके व निबंध प्रसिद्ध करणारी मंडळी) :
या सभेच्या अहवालावरून असे दिसते की : तिगस्तापेक्षा गुदस्ता ५ हजार पुस्तके जास्त खपली. गेल्या वर्षी २० हजार पुस्तके कमी छापली गेली. कारण पैशांचा पुरवठा होत नाही. शुभचिंतकांनी सतत आश्रय दिला पाहिजे. 'फुलमुनी आणि करुणा' या पुस्तकाकरितां मात्र ११०० रुपये जमा झाले. मुंबईत सात दुकाने असून सतत विक्री चालते. स्वयोजित ग्रंथ आणि भाषांतरे रचण्यात बाबा पद्मनजी, धनजीभाई नौरोजी, नारायण शेषाद्री, व शेख दाऊद, हे मुख्य आहेत. आणखीही काही लोक ग्रंथ रचतील. धर्मप्रसाराकरिता अनेक पुस्तके लिहिण्याची आवश्यकता आहे, असे रे. रामकृष्णपंत मोडक म्हणाले.

**६२८अ** (इंम : ८५–८६)

**६२९** (१८ : ६, १५ मार्च ५९, ८७–९०)

'एक नेटिव' पत्रात म्हणतो की : रेल्वेचा अवाढव्य कारखाना, भव्य गाड्या व हजारो कामगार पाहून माणूस गरक होतो. दुसऱ्या प्रतीच्या गाड्या तर राजमंदिराप्रमाणे सुशोभित आणि हवाशीर आहेत. एका गाडीस जास्तीत जास्त ५०–६० गाड्या (डबे) जोडतात. गाडी सुरू झाली की, फार अचंबा वाटतो. वेगही इतका माफक असतो की, भांड्यातले दूधही सांडत नाही. प्रत्येक स्टेशनावर स्वच्छ पाणी पिण्यास मिळते. खोपोलीच्या घाटात मात्र मनस्वी उकाडा होतो. उदास व त्रासदायक वाटत असते. पुराणात पांडवकृत्ये व राक्षसी मायेच्या कथा आहेत. त्यांपेक्षाही रेल्वे हा अद्‌भुत चमत्कार आहे. पुराणातील पृथ्वीच्या लांबीची वर्णने अगदी काल्पनिक आहेत. प्रवासाची साधने नसल्यामुळे जे सुचेल ते लिहिले. देवांच्या घरी सर्व सुखसोयी होत्या म्हणतात. पण इंग्रजांच्या घरात तर पंचमहाभूते राबत आहेत. रेल्वेने रोजगार बुडविला नाही, तर अधिक रोजगार पिकविला. धनवानांचा पैका त्यांच्या संदुकातून काढून गरिबांना वाटला.

६३० (१८ : ६, १५ मार्च ५९, ९०–९४)

माणसांच्या अकालमृत्यूची चौकशी खानेसुमारीच्या द्वारे सुधारलेल्या देशाची सरकारे करतात. ज्ञानी व प्रजेचे कल्याण इच्छिणारे सरकार रोगराईवर सतत उपाय करते. घाणीने महामारीसारखे दुर्धर रोग निर्माण होतात. रस्ते साफ करून डबकी कमी करण्याची सक्त तजवीज चाललेली आहे. लक्षावधी रुपये खर्च करून कुत्री मारली जातात. कुत्री चावण्याने मरणारांची संख्याही मोठी असते. अज्ञानी व विचारशत्रू लोकांना हा उपायही अयोग्य वाटतो. अहिंसक लोक मनुष्यघातकी जनावरांचा नाश करू देत नाहीत. अहमदाबादच्या नागरिकांनी कुत्री मारण्याविरुद्ध अर्ज दिल्हा. राणीच्या जाहीरनाम्याची आठवण करून दिली. एवढे जर हे दयाळू आहेत, तर कुत्री घरात बांधण्याऐवजी त्यांना बाहेर सोडून रस्त्याचा कुत्राखाना कशास बनवितात? लोकांच्या प्राणांना जे बाधक ठरते, त्याचा नाश करणेच योग्य आहे. हे व्याजखाऊ व्यापारी मांस खात नाहीत, बकरी, मारू देत नाहीत, मासे धरू देत नाहीत. व्याजापायी कुणब्याच्या घरादारांचा उन्हाळा मात्र करितात. त्यांच्या चिलापिलांस अन्नान्नदशा करून मरणाच्या तोंडी देतात. कुत्रा हा निरुपद्रिक प्राणी आहे, असे ते म्हणतात. पण तो पिसाळला की, घातक असतो. एकेक कुत्रा ८–१० जणांचे जीव घेऊ शकतो. असली वेडी दया लोकांना घातक ठरते. मूर्ख चालीचे कडू जहर फार त्रासदायक असते. म्हणून सरकारास कुत्री ठार मारण्याचे काम शांतपणे करू द्यावे.

६३१ (१८ : ६, १५ मार्च ५९, ९४–९६)

अयोध्येचे ५ हजार बंडखोर १५ तोफा घेऊन नेपाळी मुलखाकडे पळाले. त्यात नानासाहेब पेशवा, अयोध्येची बेगम, अब्दुल वली, खुदाबक्ष व बेनीमाधव सिंग आहेत. नेपाळचा राजा इंग्रजांचा मित्र असून त्याने आश्रय देण्याचे नाकारल्यामुळे ते लखनौकडे जाणार आहेत.

**६३२** (१८ : ६, १५ मार्च ५९, ९४–९६)

बिकान्यरजवळ तात्यास व फिरोजशहास इंग्रज सेनेने गाठले. ७०० बंडखोर शरण आले आहेत. काही पळाले, पण ३०० मेले.

**६३३** (१८ : ६, १५ मार्च ५९, ९४–९६)

पीर झूर अली ३०० घोडेस्वारांसह मिचलसाहेबास शरण आला.

**६३४** (१८ : ६, १५ मार्च ५९, ९४–९६)

तुळसीपूरच्या राणीने इंग्रजाकडे माफीचा अर्ज पाठविला. अपराधाची क्षमा मागितली.

**६३५** (१८ : ६, १५ मार्च ५९, ९४–९६)

रूपा व केवाळ या भील नायकांनी हजार लोक जमा करून बडोद्याजवळ बंड केले. इंग्रज लष्कर तिकडे गेले आहे.

**६३६** (१८ : ६, १५ मार्च ५९, ९४–९६)

निजामहद्दीत अरबांनी मावळा गाव लुटून ४० हजारांची रोकड नेली.

**६३७** (१८ : ६, १५ मार्च ५९, ९४–९६)

तिनीविलीच्या दंग्यातील सात आरोपींना ५ वर्षे सक्तमजुरीची शिक्षा झाली.

**६३८** (१८ : ६, १५ मार्च ५९, ९४–९६)

त्रावणकोरात शानारांवर जुलूम चालू आहे. पूर्ण पोषाक केला, म्हणून स्त्रियांना तुरुंगात टाकले आहे.

६३९ (१८ : ६, १५ मार्च ५९, ९४-९६)
युरोपियन सैनिकांच्या रहदारीच्या रस्त्यावरील दारूची दुकाने बंद करावीत, असा हुकूम झाला.

६४० (१८ : ६, १५ मार्च ५९, ९४-९६)
एका कलावंतिणीने पैशाचा मोह दाखवून ४ जणांना महंमदी धर्माची दीक्षा दिल्ही.

६४१ (१८ : ६, १५ मार्च ५९, ९४-९६)
दक्षिण महाराष्ट्र देशातील किल्ले जमीनदोस्त करावेत किंवा मोडतोड करून निरुपयोगी करून टाकावेत, असा सरकारचा इरादा आहे.

६४२ (१८ : ६, १५ मार्च ५९, ९४-९६)
पैंच्याकडून भरून मिनुटात दाहा बार होणारी तोफ इंग्लंडमध्ये तयार झाली.

६४३ (१८ : ६, १५ मार्च ५९, ९४-९६)
नगरला सोजिरांच्या दोन पलटणींत मारामारी झाली.

६४४ (१८ : ६, १५ मार्च ५९, ९४-९६)
जार्ज वॉशिंग्टनच्या जन्मदिवशीच्या अमेरिकन व इंग्रज तारवांनी स्वतंत्रतेचे बाहुटे उभारले.

६४५ (१८ : ६, १५ मार्च ५९, ९४-९६)
अयोध्या प्रांतात ३७८ तोफा व ९ लाख ७६ हजार हत्यारे हस्तगत करून २५६ किल्ले पाडण्यात आले.

६४६ (१८ : ६, १५ मार्च ५९, ९४–९६)
जनरल असेंब्ली विद्यालयात रे. शेरीफच्या जागेवर ग्रांतसाहेब आले आहेत.

६४७ (१८ : ६, १५ मार्च ५९, ९४–९६)
कूर्गच्या राजकन्येने इंग्लंडमध्ये शिकत असताना खिस्ती धर्म स्वीकारला. तिचे नवे नाव विक्टोरिया गौरीमिना आहे. तिचा विवाह महाराजा दुल्लपसिंगाशी होणार आहे.

६४८ (१८ : ६, १५ मार्च ५९, ९४–९६)
मि. फार्जेटने एक वाघ मारला. त्याचे कातडे पदार्थसंग्रहालयात ठेवले जाईल.

६४९ (१८ : ६, १५ मार्च ५९, ९४–९६)
डाक्तर डफ रंगूण येथे मिशनाची शाखा सुरू करतील.

६५० (१८ : ६, १५ मार्च ५९, ९४–९६)
रोहिला सरदार तुराबाज खान यास पकडण्यासाठी निजामाने ५ हजारांचे इनाम लावले होते. काही स्वारांनी त्यास ठार मारून त्याचे प्रेत हैदराबादला नेले.

६५१ (१८ : ६, १५ मार्च ५९, ९४–९६)
यापुढे अयोध्येत २० पायदळ पलटणी, ८ घोडेस्वार कंपनी, १७ तोफखाने राहतील.

६५२ (१८ :६, १५ मार्च ५९, ९४–९६)
भागुजी नायकाभोवती आणखी भिल्ल बंडखोर गोळा झाले.

**६५३** (१८ : ६, १५ मार्च ५९, ९४–९६)

फारूकाबादचा नबाब मेजर ब्रूसच्या स्वाधीन झाला. त्याच्यावर बंडाचे पुढारीपण करून २७ ख्रिस्ती लोक मारले, असा आरोप आहे.

**६५४** (१८ : ६, १५ मार्च ५९, ९४–९६)

जंगबहादुरच्या मदतीसाठी मि. हार्सफर्ड मोठी फौज घेऊन नेपाळकडे गेला आहे.

**६५५** (१८ : ६, १५ मार्च ५९, ९४–९६)

मद्रासचा गवर्णर लार्ड हारीस विलायतेत जाणार असून त्याच्या जागेवर चार्लस त्रिवेलिअन येईल. हा साहेब फार चांगला व लोकांचे कल्याण इच्छिणारा आहे.

**६५६** (१८ : ६, १५ मार्च ५९, ९४–९६)

'पंजाबी' पत्रावरून असे कळते की, हुगळी मिशन शाळेच्या एका पंतोजीने प्रसिद्धपणे ख्रिस्ती धर्म स्वीकारला. तो उंच जातीचा बंगाली ब्राह्मण असल्यामुळे या घटनेचा फार मोठा गवगवा झाला.

**६५७** (१८ : ६, १५ मार्च ५९, ९४–९६)

महाराणी विक्टोरियाचा ज्येष्ठ पुत्र रोमला विश्रांतीसाठी गेला.

**६५८** (१८ : ६, १५ मार्च ५९, ९४–९६)

खपोली येथे एका युरोपियनाने पारशाच्या बिस्तवावर चिरूट पेटविला, तेव्हा त्या पारशाने ३०० कोळी आणून दंगल केली व युरोपियनास झोपेतच ठार मारले.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**६५९** (१८ : ७, १ एप्रिल ५९, ९९-१०३)

चार नेटिव ख्रिस्त्यांना उपदेशकांचा दर्जा मिळाला. त्यांपैकी जग्र शील हा कटकजवळच्या गावी राहणारा होता. त्याच्या मनात पालट झाला. त्याच्या सहवासाने त्याचा बाप रघू हाही धर्मपुस्तके वाची. शेजारी त्याचा द्वेष करीत असत. त्याची बायको व लेकरेही लोकांनी लपवून ठेवली होती. माजिस्त्रेतासमोर त्याचे नाते सर्वांनी नाकबूल केले. पुढे त्याचा दृढनिश्चय पाहून बायको घरी परत आली. रक्तप्रीतीप्रमाणे पाप आपल्या अंगावर पसरले, अशी खात्री होऊन तीसुद्धा ख्रिस्ती झाली. दुसरा गृहस्थ पौल यास मिशनऱ्यांनी खोंडाच्या मनुष्यबळीतून बाचविले होते. विद्याभ्यास पूर्ण झाल्यावर सत्याने व खऱ्या आत्म्याने तो ख्रिस्ती झाला. मनाची साक्ष तो खरी मानतो. आपण पंडित नाही, मग आपण उपदेशकाचे काम कसे करू, असा नम्र प्रश्न त्याने विचारला. येशूने अशांना पापरूप अरण्यातून सोडवून स्वाभाविक जंगलात आणले होते. तिसरा जगन्नाथ गांजमचा राहणारा असून कट्टर मूर्तिपूजक होता. दिव्य आत्म्याचा वर्षाव झाल्यामुळे तो ख्रिस्ती झाला. पापाच्या क्षमेसाठी ख्रिस्ताची कृपा त्याने मिळविली. देवाच्या दयासनासमोर तो दंडवत पडला. या सर्वांची मने मिशनच्या शाळेत प्रकाशित झाली. पवित्र शास्त्रामधून त्यांना बोध मिळाला. न थकता त्यांनी काम केले, तर यथाकाळी पीक पावतील. कलकत्यात तुलसीपाल, देवीदमोहन, देवी सालेमान यांनाही उपदेशकाचे काम दिलेले आहे. अशा विश्वासू नेटिव पालकांची संख्या वाढली पाहिजे.

**६५९ अ** (इंम : ९७-९९)

**६६०** (१८ : ७, १ एप्रिल ५९, १०४–१०५)

दिलावरखान हा बाटाड्यांच्या पलटणीत होता. गेंड कौरमध्ये या अफगाणाने शास्त्र वाचले. वाटमारीचा धंदा करीत असताना कर्नल व्हीलरकडून त्याने उपदेश ऐकला एकदा 'सत्याची तागडा' पुस्तक त्याने वाचले व ख्रिस्ती धर्मच खरा, अशी त्याची खातरी झाली. पवित्र आत्म्याचे दर्शन झाल्यावर लुटीची चट त्याने सोडली. तो निर्भयपणाने ख्रिस्ताची स्तुती करतो. बंडाचा बीमोड झाल्यापासून मिशनास मोठा जय मिळत आहे. बंडवाल्यांचा लोकांना तिरस्कार वाटतो. कारण ते अघोरकर्मी होते. लोक इंग्रज सरकारशी एकनिष्ठ राहून प्रजाधर्म नीट पाळतात. सरकारने शिपायांचे लाड करून जातिभेद मात्र पोसला. येशूचे शुभवर्तमान गाजले आणि सिंहाची हरणे व शत्रूचे मित्र झाले. सरकारने जुनी खुराटी वर्तणूक सोडून शिपायांना ख्रिस्ती धर्माचे ज्ञान घेऊ द्यावे.

**६६० अ** (इंम : १०३–१०४)

**६६१** (१८ : ७, १ एप्रिल ५९, १०६–१०७)

'बगणारा' लिहितो की : शिमग्यात अभद्र भाषणे व बदफैलीपणा यांचा कळस होत असतो. लज्जेची बंधारणे सोडून लोक भ्रष्ट मनाची वृत्ती करून घेतात. पण ख्रिस्ती धर्माची शुद्ध नीती प्रकाशू लागल्यापासून त्यांची नीच व पशुतुल्य कर्मे उघडपणाने होत नाहीत. तरीही दुष्ट चालींना रूढीचा आधार असल्यामुळे नीच व लाजीरवाणी कामे चालूच राहातात. घोडनदीमध्ये काही अनीतीभोक्त्या माणसांनी नाथुरामाचा पुतळा रस्त्यावर बसविला. हा कुत्सित पुतळा करून उघडा टाकल्यावरून माजिस्त्रेताने एकाला १०० रु. व दुसऱ्याला २५ रु. असा दंड केला. ही शिक्षा त्याने रोकडारोकड केली, हे फार चांगले झाले. ताबडतोब तजवीज होणे अगत्याचे असते. हे दुष्ट कृत्य करणारे दोघेही धनवान व संभावीत गृहस्थ होते, ही मोठी आश्चर्याची व दुःखाची गोष्ट आहे. त्यांना आब्रूची व नीतीची चाड नाही. विचारवंत व प्रतिष्ठित लोकांना असे प्रकार आवडणार नाहीत.

६६१ अ (इंम : १०५)

६६२ (१८ : ७, १ एप्रिल ५९, १०७–१११)

रे. लैनमान आपल्या अहवालात म्हणतात की : न्यू हालंडजवळील सिलेबीत बेटामध्ये शुभवर्तमानाचा द्वेष कमी झाला. समुद्र आणि वारा अनुकूल असला की, तारवाची प्रगती होते. प्रत्येक सप्तकात एकेका खेड्यात जाऊन ते उपदेश करतात. हेहानोएसा या शिक्षकास दीक्षा देऊन त्यांनी त्याची मदत घेतली. खेड्यांमध्ये लोक गर्दी करून उपदेश ऐकतात. वेड्या चाली टाकून देऊन खऱ्या धर्माकडे वळतात. कैमान या कट्टर सनातनी गावातही अनेकांनी दहा आज्ञा तोंडपाठ केल्या. सावांगन गावच्या उपाध्याने पूजा सोडून खिस्ती धर्म स्वीकारला. भजनगृहात शेकडो लोक गोळा करून लैनमानसाहेबाकडून उपदेश ऐकला. सैतानाचाही मनःपालट झाला. त्यांची अंतःकरणे उपकारस्तुतीने भारली गेली. निर्जीव वस्तूंना देवपण नसते, अशी मनःसाक्ष त्यांना मिळाली. खोट्या धर्मापासून ते लवकरात लवकर मुक्त होणार आहेत. त्यांची मुलेही शाळेत शिकून चांगले ज्ञान मिळवितात. १९७ जणांनी धर्माची दीक्षा घेतली. गावकरी जमावाने येऊन दीक्षा घेत आहेत. हे प्रभूचेच काम आहे व त्याची कृपा अगाध आहे. मी फक्त साधनीभूत आहे. एका वर्षात दहा हजार जणांनी मूर्तिपूजेचा त्याग केला.

६६३ (१८ : ७, १ एप्रिल ५९, १११–११२)

बंडाचा बीमोड करण्यात मनस्वी खर्च होऊन सरकारला २१ कोटींचे कर्ज झाले. म्हणून सर्व वस्तूंवर जकात वाढविली आहे. कापूस, चहा, मसाल्याचे सामान, डागिणे, यांवर शेकडा २० टक्के जकात वाढविली. इतर पदार्थांवर शेकडा १० टक्के जकात आहे. नीळेवर व लाखेवरही कर बसला. अफूच्या दर पेटीस ५०० रु. जादा कर बसला आहे. हे सर्व बंडामुळे झाले. सरकारचा त्यात दोष नाही.

**६६४** (१८ : ७, १ एप्रिल ५९, ११२)

१८५६ पासून चालू असलेले 'उदयप्रभा' दोन वर्षे चालले. नंतर मोडकळीस आले. त्याचा छापणारा हिंदू होता. त्याने हे खिस्ती पत्र छापण्याचे बंद केले. पण काही उदार मनाच्या नेटिव खिस्ती लोकांनी 'प्रभोदय' या नावाने ते पुन्हा सुरू केले. त्यास ईश्वराचा आशीर्वाद व्हावा, अशी आमची इच्छा आहे.

**६६५** (१८ : ७, १ एप्रिल ५९, ११२)

बंडवाल्यांचा जोर नाहीसा होत चालला आहे. थोड्याशा फुणग्या राहिल्या आहेत. विलायती सैन्याच्या लोटाने त्याही लवकरच विझून जातील. रावसाहेब व आदिल अहमद शनसाबाद गाव लुटून जंगलात गेले. कर्नल रिचचे सैन्य त्यांच्या मागे लागल्यामुळे ते बियोराकडे पळाले. रावसाहेबाने मिचलला निरोप पाठवून शरण येण्याची इच्छा प्रकट केली. तात्या मात्र पटनाकडे गेला आहे.

**६६६** (१८ : ७, १ एप्रिल ५९, ११२)

बाबा पदमनजी कळवितात की : बर्यांडीकृत इंग्रजी–मराठी कोशाची सवलतीची किंमत एप्रिलअखेरपर्यंत स्वीकारली जाईल. नंतर मात्र चार रुपये पडतील.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**६६७** (१८ : ८, १५ एप्रिल ५९, ११३–११४)

सन १८५७ मध्ये रे. न्याहारी सिंग यांनी एक मौलवी आणि डाक्तर इफसाहेब यांची भेट घडविली. हा मौलवी कलकत्त्यातील मशिदीचा तक्षिमदार असून त्यास फारशी भाषा उत्तम येते. तो फार नम्र व सौम्य वृत्तीचा आहे. शुभवर्तमान वाचून त्याची खात्री पटली की, ख्रिस्ती धर्म ईश्वरापासून आला. तो प्रसिद्धपणे ख्रिस्ती झाला. खांची खिळलेल्या येशूप्रमाणे दुःख व त्रास सोसण्यास तो तयार आहे. ईश्वराची दया, हे तत्त्व पुरेसे नाही, तर माणसाला आपल्या पापाची पूर्ण जाणीव झाली पाहिजे. ईश्वराचा न्याय भरून देण्याकरिता येशू ख्रिस्ताचे प्रायश्चित्त हा एकच उपाय आहे. म्हणून गार्डिनरने त्यास दीक्षा दिल्ही.

**६६७अ** (क्रम : ११३)

**६६८** (१८ : ८, १५ एप्रिल ५९, ११५–११७)

लुदियाना या मिशनाची १६ ठाणी असून गतवर्षी अर्ध्या लाखाहून जास्त खर्च झाला आहे. गोलकनाथ व कादरबक्ष यांची मुले उपदेशाचे काम करतात. दाऊद मह्कमसुद्धा मगदी उत्साहाने कार्य करतो. बंडाच्या धामधुमीत अंगाला राख फासून तीर्थक्षेत्रावर उलटा उभा राहिलेला एक गोसावीही ख्रिस्ती झाला. तीर्थयात्रेत लबाड व ठक लोक भेटतात. ख्रिस्ती लोक मात्र निर्मळपणाने पुण्याचा मार्ग दाखवितात. हा गोसावी आता नियमाने नवा करार वाचतो. एका कृष्णाइतास सावकाराने छळले, तेव्हा आपला चार महिन्यांचा पगार देऊन त्याने हे कर्ज देऊन टाकले. ईश्वरच त्याच्या संगतीत राहून लोकांना तारणाऱ्याकडे वळवील. पंजाबात आमचे बंधू हे थोर कार्य करीत आहेत.

६६९ (१८ : ८, १५ एप्रिल ५९, ११६–१२१)

भरतखंडावर मोठाच सुदिन उगवला. कारण आता लागवड करणारे जमिनीचे मालक होतील. पूर्वी मिसर देशात असा कायदा होता. राजाने जमीन वाटून दिली होती. वंशपरंपरेने मालकी मिळे. सावकार लोक मात्र कर्जापायी कुळांच्या जमिनी घेत. कष्ट करूनही कुळास फायदा होत नसे. गोऱ्या लोकांनाही जमिनी विकत घेण्यास सरकारने परवानगी दिली. सुंदरबन व नीलगिरी येथे अशा पडीक जमिनी आहेत. तेथे युरोपियनांची वसाहत होईल. रयतेस इंग्रजी राज्य आवडू लागेल. जमिनीची विक्री करून सरकार बंडाचे कर्ज फेडील. अशा जमिनीवर शेतसारा नाममात्रच राहील. त्यातून लोकांना मेहनत व उद्योग करण्यास प्रोत्साहन, उत्तेजन मिळेल. इंग्रजांचे राज्य आता कायम राहणार आहे. लोकांत त्यांचा दबदबा वाढला आहे. होळकरांच्या ज्योतिषाने सांगितले होते की, एक इंग्रज जिवंत राहिला, तरी तो सगळे राज्य परत मिळवील. म्हणून होळकराने इंग्रजांची मैत्री सोडली नाही. सरकारने वाजवी किंमत घ्यावी. म्हणजे शेतकरीही आपला प्रजाधर्म नीट पाळतील.

६६९ अ (इंम : ११८–११९)

६७० (१८ : ८, १५ एप्रिल ५९, १२२–१२३)

पदार्थमात्राच्या सांसिद्धिक धर्मामुळे त्याचे तुकडे होतात. तो प्रवाही पदार्थात मिसळतो आणि हवेत चढतो. पदार्थाचे हजार तुकडे केले, तरी आणखी तुकडे होऊ शकतात. हंडाभर पाणी घेऊन चमचाभर दूध त्यात टाकले, तरी ते चटकन मिळते. त्यात अळित्याचा रंग टाकला, तर ते सर्व लाल होते. अत्तर व फुले यांचा सुगंध हवेत सर्वत्र पसरतो. फुलांच्या गजऱ्याचा सुगंध वायूबरोबर पसरतो. लहानलहान पिरावर फुले वाहून लोक उद जाळतात. मध्यरात्री त्या फुलांचा व उदाचा वास घराघरांतून पसरतो. त्यास लोक पिराची स्वारी असे नाव देतात. ईश्वराने मानवाच्या सुखासाठी सुगंधी द्रव्ये निर्माण केली. लोक मात्र अज्ञानाने भय पावतात. ज्यास पदार्थाचा धर्म कळतो, अशा ज्ञानी माणसाला मात्र कसलीच पीडा होत नाही.

६७१ (१८ : ८, १५ एप्रिल ५९, १२३–१२५)

बायबलच्या जुन्या करारात प्राचीन मिसर देशाचे वर्णन आढळते. त्यातील कित्येक गावे अगदी नाहीशी झाली. असुरी लोकांनी निनवे हे सुंदर शहर बांधले होते. तीन दिवस चालून त्याचा विस्तार पहावा लागे. तेथे सवा लाख बालके होती. लेयर्ड नावाच्या साहेबाने निनवेचे अवशेष उकरले. त्यात दगडी शिळा, मूर्ती व चित्रे सापडली. जुन्या करारात म्हटले आहे की : या कुत्सित लोकांची कबर बांधली जाईल. डौलाने राहाणाऱ्या व्यभिचारी लोकांचा नाश होईल. फौजेचे अधिकारी, ढालवाहक, यांची चित्रे तेथे आहेत. झळकती तलवार व चमचमणारे भाले त्यांच्या हातात असत. शत्रूच्या नगरास वेढा घालून मोरचे बांधण्यात ते अतिशय प्रवीण असत. गोफणीचा मारा करून ते शत्रूला भंडावून सोडीत. शत्रूच्या मानेवर पाय देऊन उभ्या असलेल्या अनेक वीरांची चित्रे तेथे दिसतात. शत्रूंची शिरे कापून वेशीमध्ये त्यांचे ढीग लावीत व टोपल्यांत भरून राजास नजर करीत असत. या चित्रांवरून जुन्या कराराच्या प्राचीनपणाविषयी सर्वांची खात्री पटते. यावरून खरा इतिहास समजतो. नेटिवांच्या पुराणात विलक्षण कथा आहेत. पण त्यांस प्रमाण मात्र मिळत नाही.

६७२ (१८ : ८, १५ एप्रिल ५९, १२५–१२६)

फत्तेगडच्या कोडतात तीन जज्जांनी चौकसनीस म्हणून फराक्काबादच्या नबाबाची चौकशी केली. नबाब हुसेन खान तुफझल याने इंग्रजांशी वैर पत्करून बंड केले. ६२ लोक ठार मारले. कालेखानास व दोन इमानी शिखांना मारले. एका हुषार बालिष्टरने नबाबाची बाजू मांडली. पण कमिशनने नबाबास दोषी ठरवून फाशीची शिक्षा सुनावली.

६७३ (१८ : ८, १५ एप्रिल ५९, १२६)

मेजर मीद याने ७ एप्रिल १८५९ रोजी तात्यास महुदरा येथे कैद केले. मानसिंग, रावसाहेब व फिरोज, यांच्या सैनिकांसह तात्या चालला होता. कित्येक सैनिक मारले गेले. बाकीचे पळून गेले.

**६७४** (१८ : ८, १५ एप्रिल ५९, १२६–१२८)
अरबांनी व रोहिल्यांनी निजामहद्दीतील चौऱ्यायैंशी हे गाव लुटले.

**६७५** (१८ : ८, १५ एप्रिल ५९, १२६–१२८)
दिल्ली शहराची तटबंदी व राजवाडा पाडून टाकण्याचा ठराव झाला.

**६७६** (१८ : ८, १५ एप्रिल ५९, १२६–१२८)
बंडाच्या काळात ३८६ लोकांना फाशी झाली. १९९८ बंदुकीच्या गोळीने मेले. १४७१ जणांना जन्मठेप झाली. १५०१ ना फटके मारले, तर २७२ ना दंड झाला.

**६७७** (१८ : ८, १५ एप्रिल ५९, १२६–१२८)
बरद्वान जिल्ह्यात १० पुनर्विवाह झाले. त्यांत २ ब्राह्मण विधवा होत्या.

**६७८** १८ : ८, १५ एप्रिल ५९, १२६–१२८)
एका पारशी स्त्रीने मुलींच्या स्कालरशिपकरिता दोन हजारांची देणगी दिल्ही.

**६७९** (१८ : ८, १५ एप्रिल ५९, १२६–१२८)
लखनौमध्ये एका पारशाची डेप्युटी सुपरिंटेंडेंट आफ पोलीस म्हणून नेमणूक झाली.

**६८०** (१८ : ८, १५ एप्रिल ५९, १२६–१२८)
शेंडेनक्षत्र दिसले की, वर्षभर बहिणीची भेट होत नाही, अशी लोकांची समजूत असल्यामुळे अनेक लोक आपल्या बहिणींना चोळीबांगडीची भेट पाठवित आहेत.

**६८१** (१८ : ८, १५ एप्रिल ५९, १२६-१२८)

नगरच्या मुनसफाने मुलाच्या मुंजीत नाच करविला. रावबहादुर दुगल यांनी मात्र मुलाच्या लग्नाला या कार्यक्रमास फाटा दिला.

**६८२** (१८ : ८, १५ एप्रिल ५९, १२६-१२८)

जगात २८७३ भाषा बोलल्या जातात.

**६८३** (१८ : ८, १५ एप्रिल ५९, १२६-१२८)

इंग्लंडमध्ये टपालाचा वसूल गेल्या शंभर वर्षांत १४ अब्जांवरून २५ अब्ज रुपयांवर गेला.

**६८४** (१८ : ८, १५ एप्रिल ५९, १२६-१२८)

आगगाडीत कापूस जळून १३०० रुपयांचे नुकसान झाले.

**६८५** (१८ : ८, १५ एप्रिल ५९, १२६-१२८)

सुरापूरच्या राण्यांना २ लाख ६८ हजारांचे पेन्शन मंजूर झाले.

**६८६** (१८ : ८, १५ एप्रिल ५९, १२६-१२८)

आस्ट्रिया देशात शांतताकाळात ४ लाख, तर लढाईच्या दिवसांत ७ लाख खडे सैन्य असते.

**६८७** (१८ : ८, १५ एप्रिल ५९, १२६-१२८)

बंडकाळात जप्त केलेल्या रोकड ऐवजापैकी दोन तृतीयांश रक्कम बक्षिसांच्या रूपाने इमानदार सेवकांना वाटण्यात आली.

**६८८** (१८ : ८, १५ एप्रिल ५९, १२६-१२८)

जावळाचा नबाब सातरखान इंग्रेजांस शरण आला.

**६८९** (१८ : ८, १५ एप्रिल ५१, १२६-१२८)
फराकाबादच्या नवाबाची काशी हिंदुस्थान सरकारच्या मंजुरीवर अवलंबून आहे.

**६९०** (१८ : ८, १५ एप्रिल ५१, १२६-१२८)
दिल्ली प्रांतात गतवर्षापेक्षा ७२,७०२ रुपये जादा जकात वसूल झाली.

**६९१** (१८ : ८, १५ एप्रिल ५१, १२६-१२८)
अयोध्येचा दिवाण नकीरखान कैदेत आहे. त्याला घरी जाण्याची परवानगी दिली होती. पण त्याने ही सवलत नाकारली. पत्रव्यवहाराचीही परवानगी देण्यात आली.

**६९२** (१८ : ८, १५ एप्रिल ५१, १२६-१२८)
पब्लिक वर्क्स खात्यास ६२ लाख रुपये देण्यात आले. त्यांपैकी ८ लाख लष्कराच्या कामाकडे खर्च झाले.

**६९३** (१८ : ८, १५ एप्रिल ५१, १२६-१२८)
मागील अंकात 'क्यांडीकृत कोशा'ची जाहिरात आहे. त्यात 'कोशाचा संक्षेपग्रंथ' हे शब्द छापावयाचे चुकून राहून गेले.

**६९४** (१८ : ८, १५ एप्रिल ५१, १२६-१२८)
पब्लिक वर्क्स खात्यातून ३५ लाख रुपये पूल व कालवा यांसाठी खर्च करण्यात येतील.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १८, अंक ९, मुंबई, २ मे १८५९

**६९८** (१८ : ९, २ मे ५९, १३०–१३१)

अहमदनगर विभागात एकूण ११ मंडळ्या काम करतात. बहुत लोक ख्रिस्ती धर्माचा शोध करण्याचे अगत्य धरू लागले आहेत. मंडळीत ३१९ ख्रिस्ती आहेत. २५१ लेकरांना बाप्तिस्मा देण्यात आला. नगर मिशनची स्थापना १८३१ मध्ये झाली. ईश्वर आपल्या भक्तांच्या कुटुंबावर आशीर्वाद पाठवीत असतो. सभ्यांच्या सभासदांपैकी एक पंचमांशाचा बाप्तिस्मा लहानपणीच झालेला होता. उंच जातीचे म्हणविणारे १९ लोक मंडळीत आले. बाकी बहुतेक लोक हलक्या जातीतले आहेत. २७ वर्षांत ६३ लग्ने ख्रिस्ती धर्मप्रमाणे झाली.

**६९८ अ** (इंग : १२९)

**६९६** (१८ : ९, ३ मे ५९, १३२-१३३)

सर जमशेटजी जिजीभाई यांचा १५ एप्रिल रोजी मृत्यु झाला. शहरातील तमाम कामकाज बंद राहिले. जमशेदजी १७८३ मध्ये गरीब कुळात जन्मले व मोठ्या योग्यतेस चढले. अवघ्या १२० रुपये भांडवलावर त्यांनी चीन देशाशी व्यापार सुरू केला. ५ वेळा ते जलमार्गाने चीनला गेले होते. विलायतेशीही त्यांचा व्यापार चाले. ते निश्चयी असून सर्व कामावर स्वतः देखरेख करीत. त्यांची कीर्ती झाली ती त्यांच्या परोपकारी कामामुळे झाली. हसपिताल, सूतिकागृह, माहीमचा पूल, धर्मशाळा, उद्योगशाळा, पंचायत विद्यालय, ग्रांट वैद्य पाठशाळा, या सर्व संस्थांना त्यांनी दिलेल्या देणग्यांची रक्कम ११ लाख रुपये आहे. म्हणून त्यांना बोरोनेट व नैट हे किताब देण्यात आले. राणीने त्यांचा सन्मान केल्यामुळे त्यांची कीर्ती जगात पसरली. नार्थ अमेरिकन रिव्यू या त्रैमासिकाने त्यांचा सविस्तर परिचय छापला होता. कित्येक लोक मूर्खपणाने द्रव्याचा फक्त संचय करतात, परंतु परोपकारार्थ आपल्या दौलतीचा व्यय करण्यात विषयसुखाहून अधिक संतोष असतो. त्यांच्यामागून सर खरशेटजी बोरोनेट होत आहेत. तेही जमशेटजींची परंपरा पुढे चालवितील अशी आशा वाटते.

**६९६ अ** (इंम : १३१-१३२)

६९७ (१८ : ९, २ मे ५९, १३३–१३५)

डॉ. भाऊ दाजी आपल्या भाषणात म्हणाले की : 'हिंदू लोकांत जुलमी जातिभेद सुरू होण्यापूर्वी लोक दूरदूरच्या बेटांत जात असत. व्यापारासाठी व राजकीय कामासाठी ते मसाल्याच्या बेटांतही जात. राममोहन रायप्रमाणे किंवा आमच्या परदेशी जाणाऱ्या वैद्यकीय विद्यार्थ्यांप्रमाणे विद्या किंवा सृष्टीचे चमत्कार यांसाठी कोणी गेले नव्हते. संस्कृत भाषेचा अभ्यास युरोपियन लोकही उत्साहाने करतात. ज्ञानाच्या योगाने आमचे वडील भाऊ इंग्लिश लोक मोठ्या योग्यतेस चढले व लहानशा बेटात जाऊन त्यांनी राज्य मिळविले. गरम हवेच्या योगाने आमचे लोक दुर्बळ, आळशी, अज्ञानी व भ्रष्ट होत आहेत. वेदलेखनानंतर त्यांस निकृष्टावस्था प्राप्त झाली. युरोपियन लोक बळकट, उद्योगी, ज्ञानी व सदाचारी आहेत. थंड हवेमुळे सतत उद्योग करणाऱ्या लोकांच्या हातात ईश्वराने हा देश आता दिलेला आहे. तरी त्यांस वडील भाऊ मानावे. खरेपणाने वागावे. दुसऱ्याशी लबाडी म्हणजे स्वतःस फसविणे होय.'

६९८ (१८ : ९, २ मे ५९, १३५)

गोविंद विष्णु हा फणसवाडीतील ब्राह्मणाचा मुलगा मिस्तर टकरबरोबर विलायतेस गेला. विद्याभ्यास करून तो मोठ्या हुद्यावर जाईल. हे एक अत्यंत स्तुत्य असे उदाहरण आहे. गोविंदाचा नंबर वर्गात सतत वर असे. त्याचे आईबाप जरी मागील चालीचे आहेत, तरी त्यांनी हे उदाहरण इतर सुधारलेल्या मनुष्यांपेक्षा चांगले करून दाखविले. रा. रामचंद्रजी दप्तरदार यांनी विलायतेस जाण्याच्या वेळी त्याची चांगली बरदास्त ठेवली. मि. अरस्कीन यांनीही मुलाला मदत केली. नेटिवांची मुले हुशार झाली, म्हणजे नेटिवांचा मेंदू इंग्लिश लोकांपेक्षा विद्याग्रहण करण्यास कमी प्रतीचा आहे, ही कल्पनाही नाहीशी होईल.

६९८ अ (इंग : १३५)

६९९ (१८ : ९, २ मे ५९, १३५-१३९)

लोकांच्या स्वतंत्र उद्योगात सरकारने कायद्याच्या योगाने हात घालावा, हे देशव्यवहारव्यवस्था-शास्त्राच्या नियमाप्रमाणे गैरशिस्त आहे. प्रत्येक मनुष्याला स्वेच्छेप्रमाणे हवे ते काम, हव्या त्या रीतीने करता यावे आणि कराराप्रमाणे मजुरी घेण्याची मोकळीक असावी. तथापि काही वेळा अशी अडचण येऊन पडते की, सरकारने लोकांच्या उद्योगात हात न घातला, तर देशाच्या आबादानीस व नीतीस धक्का पोहोचेल. अज्ञानामुळे नेटिवांना आपले हित कळत नाही. विषकारक व अंमलकारक पदार्थांस बंदी करण्याचा कायदा करणे सरकारला भाग पडले. कारण त्याने समस्त लोकांची बिघडणूक थांबली. गुलामांचा व्यापार, बीभत्स चित्रांची विक्रीही, ही बंद करावी लागली. सगळे लोक सुशिक्षित होईपर्यंत मोठा काळ जाणार आहे. हे काम एका वर्षात किंवा एका पिढीत होणार नाही. दगाबाजी करण्यासच धर्म मानणारे लबाड लोक या देशात आहेत. निरुद्योग किंवा आळस हे तर सर्व वाइटाचे मूळ आहे. लोकांच्या कष्टावर आपण ऐतेपणाने उपभोग घेणे वाईट असते. यास गुन्हेगारीच म्हणावी लागेल. परोपकारी बुद्धीने दिलेली भिक्षा अपंग माणसाने घ्यावी. धष्टपुष्ट व निरोगी माणूस त्याला अपात्र आहे. भिकाऱ्यांच्या पोटावर मात्र त्याने पाय पडतो. शिव्या व शाप देऊन भिक्षा मिळविणे म्हणजे तरवार किंवा बंदुकी यांच्या सहाय्याने इतरांना लुटण्यासारखेच आहे. भट्ट, संन्यासी, गोसावी, बैरागी, फकीर, असले ढोंगी आश्रित दुसऱ्या कुठल्याही देशात एवढे नसतील. त्यांनी रोजंदारीने काम करावे. भीकमाग्यांच्या झुंडी कमी झाल्या पाहिजेत. असले भिकारीच फितुरांचे पत्र वाहून नेतात. कित्येकांना फाशी दिल्हे, तरी ते मऊ आले नाहींत : असल्या निरुद्योगी लोकांकडून खून, चोऱ्या, वगैरे अघोर कर्मे झाली आहेत. हे समग्र प्रजेस पीडाकारक आहेत. सरकारने कायदा करून अशा भिकाऱ्यांना सक्तीने कामावर पाठवावे. नग्न भिकाऱ्यांना कपडे घालण्याची सक्ती करावी. कायदा मोडला, तर खांबाशी बांधून फटके मारावेत. सुज्ञ व शहाणे लोक यास विरोध करणार नाहीत.
(दि. ग्या. वरून)

७०० (१८ : ९, २ मे ५९, १३९–१४०).

'एक मित्र ' लिहितो की : पाडव्यास अशा अफवा उठल्या होत्या की, शेंडे नक्षत्र दिसल्यामुळे इंग्रजांचे राज्य नाहीसे होईल. बहिणीस चोळीबांगडी करण्याची जी साथ आली होती, तीसुद्धा अशा खोट्या कांक्षेतूनच आली. तीन वर्षे बहिणीस भेटू नये. भेटले तर मृत्यू येतो. अशा अफवाही पसरल्या. निर्बुद्ध व भोळसट लोक त्यावर विश्वास ठेवतात. वास्तविक तारणे-मारणे ईश्वराच्या स्वाधीन असते. सती गेलेली बाई जिवंत झाली व नंतर भावाची चोळीबांगडी घेतल्यावर पुन्हा मेली, अशा अफवांवरही हे लोक विश्वास ठेवतात. सतीबंदीचा कायदा जारी असताना कोणी सती जाणे शक्यच नाही. खिस्ती म्हणविणारांनी असले अज्ञान दूर करावे. अंधारात ठेचकाळणाऱ्या बांधवांना ईश्वराचे कृपादान मिळावे यासाठी प्रयत्न करावेत. प्रभूचा आशीर्वाद मागावा.

७०१ (१८ : ९, २ मे ५९, १४०–१४१)

राजा मानसिंगाने तात्याजवळ असा बहाणा केला की, मी फलाण्या गावामध्ये जाऊन शिपाई जमवितो. तो सरळ इंग्रजी छावणीत आला. तात्याच्या राहण्याचे ठिकाण त्यांना कळविले. ९ व्या पलटणीने अचानक वेढा घालून तात्यास कैद केले. तात्या ५ फूट ७ तसू इंच उंच असून चेहऱ्यावरून निश्चयी वाटतो. त्याची उमर ४०–४५ असावी. शरिराने तो अगदी पुष्ट आहे. सिप्री मुक्कामी तात्याची चौकशी करून त्यास लगेच फाशी देण्यात आले. बंडवाल्यांची एक मोठीच बाजू ढासळली.

**७०२** (१८ : ९, २ मे ५९, १४१–१४४)

तात्या टोपी याला १८ एप्रिल रोजी ५ वाजता अस्तमानी फाशी झाली. सारी रात्र त्यास फाशीवर लटकत ठेवले. दुसऱ्या दिवशी त्याच्या मुडद्याचे तुकडे करण्यात आले. एका डॉक्टराने त्याचे मस्तक संशोधनासाठी मागून घेतले. तात्यास अटक झाली, तेव्हा त्याची फौज काय करीत होती, ते कळले नाही. कारण कसलाच प्रतिकार झाला नाही. तात्या हा देशस्थ ब्राह्मण असून येवल्याजवळच्या गावी राहाणारा होता. त्यास एक सख्खा भाऊही आहे.

**७०३** (१८ : ९, २ मे ५९, १४१–१४४)

मानसिंग सहा फूट उंच असून चपळ आहे. त्याचे डोळे बारीक आहेत. तो सतत पितळी पिस्तुले, तलवारी व दुबारी बंदुका जवळ ठेवतो. २० लोकांसह तो शरण आला.

**७०४** (१८ : ९, २ मे ५९, १४१–१४४)

गुंडच्या राजाची मालमत्ता जप्त करण्याचा हुकूम झाला.

**७०५** (१८ : ९, २ मे ५९, १४१–१४४)

तेराईकडून आलेला बंडखोरांचा जमाव अयोध्येत लुटालूट करीत आहे.

**७०६** (१८ : ९, २ मे ५९, १४१–१४४)

रतनपूरजवळ कोणीही बंडखोर नाही, असे लखनौ हेरल्ड म्हणतो. बंडखोरांची हत्यारे मात्र झाडीत इतस्ततः पडली आहेत.

**७०७** (१८ : ९, २ मे ५९, १४१–१४४)

गोंडाची राणी १४० सैनिक व ५० स्त्रिया यांसह कॅप्टन ज्याकसनच्या स्वाधीन झाली.

७०८ (१८ : ९, २ मे ५९, १४१–१४४)

दिल्लीमध्ये मुसलमानांना प्रवेश देऊ नये, असा हुकूम नामदार व्हाईसराय यांनी काढला.

७०९ (१८ : ९, २ मे ५९, १४१–१४४)

बंडकाळात ज्यांनी मदत केली, त्यांच्या आभाराचा ठराव पार्लमेंटमध्ये मंजूर होणार आहे.

७१० (१८ : ९, २ मे ५९, १४१–१४४)

अयोध्या प्रांतातील रयतेकडून ४७३ तोफा, १ लाख २८ हजार ४४४ बंदुका व पिस्तोली आणि ४ लाख तरवारी जप्त करण्यात आल्या.

७११ (१८ : ९, २ मे ५९, १४२–१४४)

फ्रेंड आफ इंडियाची बातमी आहे की, नेपाळच्या डोंगरात लपलेले बंडखोर इंग्रजांना पाहून पळाले आणि नानाच्या व बेगमेच्या सैन्याकडे गेले. २५ मार्चच्या लढाईत ४०० बंडवाले मेले. गोरखपुरचा महमद हुसेन इंग्रजांच्या स्वाधीन झाला. इतरही कित्येकजण शरण आले.

७१२ (१८ : ९, २ मे ५९, १४२–१४४)

नगरात एका भटाच्या सुनेने विहिरीत जीव दिला. सासुरवासाचे हे दुष्परिणाम आहेत.

७१३ (१८ : ९, २ मे ५९, १४२–१४४)

नगर मिशनात एक उत्तर हिंदुस्थानी माणूस दीक्षा घेण्याच्या मिषाने आला. तो ढोंगी, चोर व व्यसनी आहे. विद्याशरण नाव सांगणाऱ्या या माणसास ६ महिन्यांची कैद झाली.

**७१४** (१८ : ९, २ मे ५९, १४२–१४४)

अमेरिकन खजिन्याच्या चिटणीसाने अशी सूचना केली की, सर्व जगामध्ये एकच नाणे, एकच वजन-माप व एकच हिशेबाची पद्धती असावी. भरतखंडातही असेच झाले पाहिजे.

**७१५** (१८ : ९, २ मे ५९, १४२–१४४)

सन १८५८ मध्ये अटलांटिक महासागरातून ४० आगबोटींनी २८१ पर्यटने केली. एकूण सफर ५० हजार कोस झाली. ३।। लाख खंडी कोळसा जळाला. ५० हजार उतारू होते. उत्पन्न ८ लाख रुपये झाले.

**७१६** (१८ : ९, २ मे ५९, १४२–१४४)

लंकेमध्ये १९ लाख २० हजार लोक असून त्यांपैकी २ हजार गोरे व १,८०,००० ख्रिस्ती आहेत.

**७१७** (१८ : ९, २ मे ५९, १४२–१४४)

गतवर्षी लिवरपूल येथे दर आठवड्यास सरासरी ४४,००० कापसाचे गठ्ठे तयार झाले.

**७१८** (१८ : ९, २ मे ५९, १४२–१४४)

सर जंग बहादुरास त्याच्या पुतण्याने ठार मारले, असे वृत्त आले आहे. ते खोटे असेल असे वाटते.

**७१९** (१८ : ९, २ मे ५९, १४२–१४४)

मुंबई बेट १६६१ मध्ये पार्तुगालच्या राजाने इंग्लंडच्या दुसऱ्या चार्लसला आंदण दिल्हे. त्यावेळी मुंबईची करवसुली १०० होती. सध्या ती ४ लक्ष असून १४ कोटी रुपयांचा व्यापार चालतो.

७२० (१८ : ९, २ मे ५९, १४२–१४४)
साथल परगण्यात बंडवाले घुसले आहेत.

७२१ (१८ : ९, २ मे ५९, १४२–१४४)
गतवर्षी ग्रेट इंडियन रेल्वेस खर्च वजा जाता ७८ लाखांचा नफा झाला भांडवल ८ कोटी आहे.

७२२ (१८ : ९, २ मे ५९, १४२–१४४)
काशीच्या चौकातील कापडबाजारास आग लागून २ लाखांचे नुकसान झाले. ९ जण जळून मेले.

७२३ (१८ : ९, २ मे ५९, १४२–१४४)
हरकारू पत्रावरून असे समजते की, फैजाबादच्या नवाब, लखनऊची एक बेगम, दोन सरदार, ही माजिस्ट्रेट रा. शेख खैरुद्दीन यांच्यासमोर शरण आले.

७२४ (१८ : ९, २ मे ५९, १४२–१४४)
बंडखोर शिपायांचा एक मजबूद जमाव शर्पता नदी उतरून बलरामपुरकडे गेला आहे. काही बंडखोर गाजीपुरात दिसले, अशी बातमी आहे. मि. म्याकरथीची फौज तिकडे रवाना झाली आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १८, अंक १०, मुंबई, १६ मे १८५९

**७२८** (१८ : १०, १६ मे ५९, १४७–१५१)

आमचा प्रिय भाऊ येसुबास ईश्वराने आपणाकडे नेले. त्यांच्याचे मिशन तो चालवीत होता. देहगाव येथे शाखा सुरू करणारा आमचा जरीपटक्याचा हत्तीच जणू पडला. तो पिंपळगावचा महार असून ढोरांच्या विक्रीमध्ये त्यास मोठी बरकत झाली. लाखीरामच्या सूचनेवरून त्याने शाळा सुरू केली. प्रार्थना नीट व्हावी म्हणून बाळकीचा बाजारही सोडला. बालेंटेन साहेबाचा उपदेश तो ऐकत असे. रे. वेल्डर यांनी त्यास दीक्षा दिल्ही. गावकऱ्यांनी त्याचा छळ केला. त्याची जनावरे विष घालून मारली. तो उद्योगी व बुद्धिवान होता. धर्मासंबंधी त्यास आस्था होती. पाहुण्यांचे आदरातिथ्य तो करीत असे. तो ख्रिस्ताचा विश्वासू सेवक होता. मंडळीतही तो निगर्वीपणाने वागत असे. दररोज प्रार्थना करीत असे. हिवतापाच्या बरळण्यातही तो प्रभूबद्दलच बोलत असे. शैल्य झाले, तरी त्याने प्रभूचे गीतच गायिले. संपत्ती गेली, तरी आकाशाचे वतन आपण जिंकले, म्हणून त्याला आनंद वाटे. शुभवर्तमानासाठी दरमहा एक रुपयाची देणगी देण्याबद्दल मुलास बजावून तो ख्रिस्ताकडे गेला. तो गेला, तरी त्याचा कित्ता कायमच आहे.

**७२८ अ** (इंम : १४५–१४६)

७२६ (१८ : १०, १६ मे ५९, १५१-१५३)

लंडन मिशनचे अनेक उपदेशक बेळगाव, बल्लारी आणि बंगलोर येथील मिशनांमध्ये कामे करतात. बंगलोरला इंग्रजी शाळा आणि ईश्वरविद्येची शाळा चालवितात. बेळगावला गतवर्षी पाचजणांचा बप्तिस्मा झाला. त्यामध्ये एक साळी होता. या सघन व बुद्धिमान माणसाला मिशन शाळेत शिक्षण मिळाले. सध्या तो पुस्तके विकतो. एक घोडेवाला महार व त्याची बायको ही ख्रिस्ती झाली. एक लिंगाईत तर बायकोमुलांसह ख्रिस्ती झाला. मिशनरी जेव्हा दीक्षा देतात, तेव्हा अंड्याचे बिल खाण्याला देतात, अशी या गावकऱ्यांची समजूत होती. शेकडो लोक या प्रसंगी जमले व त्यांनी उपदेश ऐकला. सध्या मंडळीत १११ लोक आहेत. शुभवर्तमान गाजविण्यासाठी ते अव्याहत परिश्रम करीत आहेत

**७२७** (१८ : १०, १६ मे ५९, १५३–१५५)

दक्षिण आफ्रिकेत गीड नामे साहेब धर्मप्रसारासाठी गेला. तेथील लोक कोंबड्याच्या झापाप्रमाणे छोटे घर बांधून राहात. त्यांना शेपटे होती. अंगावर लव, लोहकर व वाघासारखे पट्टेही आढळले. ते कातडे नेसत असत. त्यांना तोंड धुणेही ठाऊक नव्हते. पशूसारख्या अज्ञानी लोकांना या मिशनऱ्यांनी वार्तिकाचा उपदेश केला. हे जंगली लोक पशूच वाटतात. रामायणात वर्णन आहे की, दंडकारण्यात वानर व अस्वल राहात होते. ते भिल्लांचे पूर्वज असावेत. नळ, नीळ, जांबुवंत, यांच्याजवळ सैन्यदेखील असे. कातडी नेसणाऱ्या या लोकांचा हनुमंत हा नायक होता. त्यांना बोलके पशु असे नाव देता येईल. कां तर, ते मानवी भाषा बोलत होते. हनुमंताने सीतेशी केलेले बोलणे व अंगदशिष्टाई, यांवरून हे सिद्ध होते. जनक राजाच्या घरी मेजवानी झाली, तेव्हा त्यांना शिजवलेले पदार्थ खाता आले नाहीत. कारण की, ते झाडपाला व वनफळे खात. त्यांच्या स्त्रिया नीती-अनीती जाणीत. सुग्रीवाची राणी तारा मोठी पतिव्रता होती. श्रीकृष्ण व जांबुवंती यांच्या विवाहावरून असे दिसते की, त्यांच्या मानवांशी सोयरिकी होत असाव्यात. या लग्नात गायन झाले. यावरून सिद्ध होते की, ते गायनातही प्रवीण असावेत. यावरून स्पष्ट दिसते की, रामाचे सैन्य पशूंचे नसून मानवांचेच असावे. कवींनी आपले कौशल्य वापरून अनेक असंभाव्य गोष्टी त्यात मिसळल्या.

७२८ (१८ : १०, १६ मे ५९, १५५–१५६)

सोळाव्या शतकाच्या अखेरीस एक विद्वान पाद्री चीनमध्ये गेला. त्याच्या ज्योतिषज्ञानाची परीक्षा पाहण्याकरिता राजाने दरबार भरविला. सरकारी ज्योतिषी म्हणाले की : याचे ज्ञान बरबरचे आहे. हा आमच्या तुळणेस येणार नाही. तेव्हा पाद्री याने चंद्रग्रहणाची नक्की वेळ सांगून त्याचा अनुभवरूप प्रत्यय देण्याची तयारी दर्शविली. दरबारी जोशी म्हणाले की : 'हा जंगली व नखाशिवाय मनुष्य आहे. आम्ही आपले जन्म अभ्यासात घालवून वीथ वीथ नखे का वाढविली ? हा काय आमची बरोबरी करणार?' पुढे ग्रहणाच्या वेळी दरबारी ज्योतिषांचे निर्णय पंधरा मिनिटांनी चुकले. पाद्री याने दिलेली वेळच अगदी बरोबर ठरली. दरबारी लोक म्हणाले की, परदेशाने चंद्र मोहित केला असावा. राजा त्यांच्या मूर्खपणास हसून म्हणाला : 'तुम्ही चंद्राचे दास आहात ! चंद्रावर हुकमत करणाऱ्या माणसाला मी वरचा दर्जा देतो !'
(ज्ञानप्रसारकवरून)

७२९ (१८ : १०, १६ मे ५९, १५६–१६०)

तात्यास फाशी दिले, यावर कोणाचाच विश्वास बसत नाही. अज्ञानी लोक वाटेल त्या कल्पना करतात. दगाबाज मानसिंघाला सरकारने आपल्याजवळ ठेवू नये, अशाही सूचना सरकारास करतात. पण आरोपीस धरून देणाराला दगाबाज म्हणता येणार नाही. हजारो मनुष्यांच्या जिवाचा संहार करणाऱ्याला धरावे, हेच योग्य आहे. मानसिंगालाही शरण येण्यावाचून मार्ग न नव्हता.

७३० (१८ : १०, १६ मे ५९, १५६–१६०)

डिकसळपलिकडे आगगाडीचा धक्का बसून बैलगाडी उलटली. ६ माणसे ठार व १२ घायाळ झाली. पुण्याजवळ पूल कोसळून तीन गाड्या पडल्या. काही वेळा सुधारणेकडून नाश होतो, परंतु त्यापेक्षा मिळणारे सुख कितीतरी पटीने जास्त आहे. अपघात हे मनुष्याच्या चुकीचे फळ आहे.

७३१ (१८ : १०, १६ मे ५९, १५६–१६०)

कुर्ग मिशनात २० कुटुंबातील ४१ मनुष्ये रे. मॅगलिंगकडून बाप्तिस्मा घेणार आहेत. ईश्वराने हा अवघा देशच जिंकून घ्यावा, अशी आमची प्रार्थना आहे.

७३२ (१८ : १०, १६ मे ५९, १५६–१६०)

लंकेजवळील समुद्रातून ४ लाख ८० हजारांचे मोती काढण्यात आले.

७३३ (१८ : १०, १६ मे ५९, १५६–१६०)

७८ व्या हैलंडर पलटणीस मोठा खाना देण्यात आला. लार्ड क्लैदला त्यांनी फार मदत केली होती.

७३४ (१८ : १०, १६ मे ५९, १५६–१६०)

सुताच्या कारखान्यासाठी 'विक्टोरिया स्पिनिंग कंपनी' मुंबईत स्थापन झाली.

७३५ (१८ : १०, १६ मे ५९, १५६–१६०)

एल्फिन्स्टन् विद्यालयाची परीक्षा डॉ. हेन्स, डॉ. बर्ड, न्यूनहाम व मेलविल, शेठ कावसजी आणि विश्वनाथ नारायण, यांची कमिटी घेईल.

७३६ (१८ : १०, १६ मे ५९, १५६–१६०)

विलायतेत कप्तान बोक्सर याने तोफखान्यासाठी शार्पनेल शेल हा गोळा तयार केला आहे.

७३७ (१८ : १०, १६ मे ५९, १५६–१६०)

सिंधमध्ये नगरपार्कर गावावर १०० बंडखोरांनी हल्ला केला. पण साहेब लोक बचावले.

७३८ (१८ : १०, १६ मे ५९, १५६–१६०)

अयोध्येची बेगम व नानासाहेब बैठक येथील किल्ल्यात आहेत. उमर सिंघ व आली करीम चोहोकडे फिरतात. बाळाराम २००० लोकांनिशी रहीमपुराकडे गेला. सिंधसिंघ तोड्या येथे गेला आहे. अजून बंड विझले नाही. बंडखोरांचे मोठे जमाव शहरांची अवस्था कठीण करीत आहेत. काहीजण नर्मदा उतरून आले.

७३९ (१८ : १०, १६ मे ५९, १५६–१६०)

एका चिनी कैद्याने नेटिव शिपायाच्या डोक्यात धोंडा घालून त्याचा खून केला.

७४० (१८ : १०, १६ मे ५९, १५६–१६०)

पब्लिक वर्क्स खात्याचे आफिस पुन्हा गुजराथेत जाणार.

७४१ (१८ : १०, १६ मे ५९, १५६–१६०)

सदर अदालतीचे जज्ज लारकीन स्वदेशी गेले. त्यांच्या जागेवर मि. कीजची नेमणूक झाली. मि. क्राफर्ड यांच्या जागेवर अकौंटंट म्हणून आरस्कीनची नेमणूक होणार.

७४२ (१८ : १०, १६ मे ५९, १५६–१६०)

स्वतःला सातारच्या राजा म्हणविणाऱ्या बंडखोरास मरेसाहेबाने पकडला.

७४३ (१८ : १०, १६ मे ५९, १५६–१६०)

दक्षिणेत भिलांची गडबड वाढत आहे. खानदेशात सरकारी तिजोरी लुटून त्यांनी सिकंदराबाद येथे बखेडा माजविला. पुण्याहून जर्मन लिजनचे लोक तिकडे रवाना झाले.

७४४ (१८ : १०, १६ मे ५९, १५६–१६०)
काशीच्या नवी गुलदडी या कापडबाजारास आग लागून ८-९ लक्षांचे विलायती कापड जळाले.

७४५ (१८ : १०, १६ मे ५९, १५६–१६०)
सुएझ ते आदान तारायंत्र सुरू होणार.

७४६ (१८ : १०, १६ मे ५९, १५६–१६०)
तुळशीपुरच्या राणीची चौकशी होणार आहे.

७४७ (१८ : १०, १६ मे ५९, १५६–१६०)
स्वभाषेची अनास्था करण्याचे फळ शाळा खात्याच्या रपोटावरून दिसते. विद्यार्थ्यांचे स्वभाषेचे ज्ञान फार कच्चे असते. लहान वयात इंग्रजी शिकवून इंग्रजीचे टफ आले की, त्यास प्रोफेसराच्या हाताखाली मोठे विषय शिकण्यास पाठवतात. धड ना मराठी ना इंग्रेजी, अशी त्या पोरांची अवस्था होती. ज्याला स्वभाषा चांगली येत नाही, त्याला बहुतकरून कोणतीही परभाषा चांगली येणार नाही.

७४८ (१८ : १०, १६ मे ५९, १५६–१६०)
बहुतेक सुधारलेल्या देशांत लाइफ आशुरन्स कंपन्या असतात. एखाद्याला अचानक मरण आले, तर कंपनीचा तोटा होतो, म्हणून त्याच्या प्रकृतीची परीक्षा केली जाते. पण कैफी माणसाचा कोणीही पतकर घेत नाही. त्याने हप्त्याचा दर कितीही वाढविला, तरी विमा उतरवीत नाहीत. कैफाने शक्ती नष्ट होऊन माणसाला अनेक रोग लागतात. अकालमृत्यु, होऊन भूमीचा भार कमी होतो. अशांचा विमा कोणी घेत नाही.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई; टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १८, अंक ११, मुंबई, १ ज्यून १८५९

**७४९** (१८ : ११, १ ज्यून ५९, १६३–१६६)

दक्षिण हिंदुस्थानातील मिशनरी रागलंदसाहेब मृत्यु पावला. सन १८१५ मध्ये जिब्राल्टर येथे तो लष्करी सरदाराच्या घराण्यात जन्मला. केंब्रिज विद्यालयात तो सतत पहिला येत असे. विद्यालयाचा फेलो झाल्यावर तो उपदेशक बनला. मूर्तिपूजकांच्या देशात शुभवर्तमान गाजवावे, अशी त्याला सूचना करण्यात आली, तेव्हा कोता आवाज व हिंदुस्थानातील भाषांचे अज्ञान ही कारणे देऊन तो हे काम टाळीत होता. पण ईश्वरी प्रेरणेने हिंदुस्थानात येऊन मद्रास मिशनाचा चिटणीस झाला. प्रकृती बिघडल्यामुळे त्यास काही काळ स्वदेशी राहावे लागले. केंब्रिज विद्यालय त्याचा सर्व खर्च चालवीत असे. प्रार्थना आणि बोध यांमध्ये त्याचे मन रमून जात असे. अगदी पहिल्या वर्षी ७०० गावे तो हिंडला. तिनीविली मिशनासाठी पैसा जमवून त्याने अनेकांना दीक्षा दिल्ही. यात श्रम फार व फळ थोडे असले, तरी ते ईश्वराचे काम आहे. रागलंदसाहेबाचा अचानक मृत्यु झाला. मृत्यूच्या वेळीसुद्धा रागलंद हास्यवदन दिसत होता. येशूचा उत्तम सखा मरणास कधीही भिणार नाही, तो स्वतःला नाकारून देवाची सेवा करतो. रागलंदने श्रमाबद्दल एक पैसाही घेतला नाही. खरा मिशनेरी अज्ञानी लोकांस सत्यधर्म दाखविण्यासाठी हानि सोसतो.

**७४९ अ** (इंम : १६१–१६२)

७५० (१८ : ११, १ ज्यून ५९, १६६–१६७)

आफ्रिका खंडात ग्रिका या ठिकाणी एक मिशनरी प्रार्थना करीत असे. त्या प्रार्थनेस अमाकोसा काफरी नावाचे लोक १२५ कोस चालून आले होते. एका गैदी टेंगण्या म्हाताऱ्याने त्यांच्या मनामध्ये शुभवर्तमानाविषयी उत्सुकता निर्माण केली. हा म्हातारा कुटुंबामध्ये प्रार्थनेची गीते म्हणत असे. स्वतःला समजणारी गीते त्यांना सोप्या भाषेमध्ये समजावून सांगत असे. आणखी माहिती मिळविण्यासाठी ते मिशनऱ्याकडे आले. आमचे नेटिव्ह लोक यात्रेसाठी पायी चालतात, पण त्यास खरे ज्ञान मिळत नाही. त्यांनी सत्याचा शोध करावा.

७५१ (१८ : ११, १ ज्यून ५९, १६७–१६८)

परमेश्वर जो आमचा कनवाळू बाप त्याने आमच्या सुधारणुकीसाठी दुःख लावून दिले आहे. अर्थात दुःख कोणालाही आवडत नाही. दुष्टांना ईश्वराचे हेतु कळत नाहीत. म्हणून ते कुरकुर करतात. परंतु दुःखापासून अनेक लाभ होतात. आपणांवर जुलूम व अपाय होऊ नये, ज्ञान व चातुर्य मिळावे, पशूवर अधिकार गाजवून त्यांस आज्ञांकित करावे, आरोग्य व आराम यांचे महत्त्व कळावे, धैर्य, सहनादि गुण मिळावेत, दया व कळवळा उत्पन्न व्हावा, यांकरिता दुःख आहे. दुःखाने धनवानाचा गर्व हरतो, तो गरिबांना साहाय्य करतो, मरणाची जाणीव राहाते, शरीरावरचे प्रेम कमी होते, नरकदंड म्हणजे काय ते कळते. ईश्वराच्या पुत्राने आम्हांसाठी दुःख सोसले, याची जाणीव राहून आपण नम्रतेने व मान्य बुद्धीने दुःख सहन करतो.

७५२ (१८ : ११, १ जून ५९, १६८–१७१)

एका विशिष्ट जातीच्या किड्यामुळे हिरव्या पानांचा नाश होऊन झाडांना कीड लागते. वाळलेल्या झाडांची लाकडे एकमेकांवर घासली गेली की, रानात वणव्याचा प्रलय सुरू होतो. विल्सन नावाचा साहेब सहकुटुंब अरण्यात राहात असे. एका काळरात्री रानात वणवा पेटला. भयंकर ज्वाळा त्याच्या घराच्या रोखाने येऊ लागल्या. तेव्हा बायकोस व मुलीस घोड्यावर घेऊन तो बाहेर पडला. थोड्याच वेळात त्याचे घर भस्मसात झाले. ते सर्वजण सरोवराच्या काठाने जात असताना वणवा मागेमागे येतच होता. शेवटी पाण्यात बसून त्यांनी एक दिवस घालविला. अन्नपाण्यावाचून थंडीने कुडकुडणे व भोवताली आगीचा उबारा, अशी विचित्र स्थिती झाली. दोन दिवस चालल्यानंतर ते एका सुरक्षित ठिकाणी पोहोचले. संसार हा एक वणवा आहे. ख्रिस्त हे सरोवर होय. खोट्याचा आश्रय सोडून त्याच्याकडे जावे. तो तान्हेल्याचे पाणी आहे. पैक्यावाचून व मोलावाचून तो द्राक्षारस व दूध देतो.

७५३ (१८ : ११, १ जून ५९, १७१)

दिल्लीच्या नामधारी बादशहास इंग्रजांनी काळ्या पाण्यावर पाठविले, यावर प्रजेचा विश्वास बसत नाही. दिल्ली शहर बंडवाल्यांकडून घेण्यात सरकारला अजूनही यश आले नाही, म्हणून वर्तमानपत्राच्या आजोबात जरी असल्या बातम्या आल्या, तरी ते विश्वास ठेवणार नाहीत. एका वजनदार मौलव्याने मात्र ईदीचा खुदबा बादशहाच्या नावाने न म्हणता निजामउल्मुल्क आसफजहा याच्या नावाने म्हटला. कारण बादशहाचे देवासमान नाव बुडाले, अशी त्याची खातरी झाली व एक व्यर्थ वृद्धाचारही मोडला.

७५४ (१८ : ११, १ ज्यून ५९, १७१–१७२)

'एक शोधक' पत्रात लिहितो की : एका ब्राह्मणाने लिहिलेला जुना कागद सापडला आहे. त्यातला मजकूर असा आहे की, हलक्या मनाच्या माणसांना लवकर क्रोध येतो. इंग्रजांचा न्याय रास्त असल्यामुळे ते चुरमुऱ्याचे लाडू खात बसतात, पण विद्यमान युग प्राचीन युगापेक्षा सहस्र वाट्यांनी चांगले आहे. पेशवाईत व मोगलाईत थोराविषयी अवाक्षर बोलले, तरी जिवास मुकावे लागे. सारीपाट, गंजिफा, बुदबळे, या खेळांत थोरावर बाजू देता येत नव्हती. स्वतःचा अभिप्राय सांगून थोराचे मत मोडून काढले किंवा त्याने सोपविलेली कामगिरी विपरीत मानली अथवा थोरांचा एखाद्या स्त्रीवर डोळा असला तर त्याबद्दल नापसंत दर्शविले, फार काय त्यांना नमस्कार जरी केला नाही, तरी घरदार खणले जाई. बायकामुलांच्या जिवाचा घात होई. नाना फडणविसांच्याबद्दल वृद्ध ब्राह्मणांच्या तोंडून असल्याच कथा ऐकावयास मिळतात.

७५४ अ (इंम : १७२)

७५५ (१८ : ११, १ ज्यून ५९, १७२–१७६)

कर्नल इव्वान्सने नगरपार्कर ताब्यात घेऊन बंडवाल्यांना पळवून लावले.

७५६ (१८ : ११, १ ज्यून ५९, १७२–१७६)

बंगाल प्रांतात एका गोऱ्या पलटणीने बंड केले, बिगूल होऊनही ते कवायतीस आले नाहीत. तोफा उभ्या करून इशारा दिल्यावर त्यांची मस्ती थांबली.

७५७ (१८ : ११, १ ज्यून ५९, १७२–१७६)

आपली मालमत्ता सुरक्षित ठेवण्याच्या अटीवर अयोध्येचा राजा हरिदत्त सिंध शरण येण्यास तयार आहे.

**७५८** (१८ : ११, १ ज्यून ५९, १७२–१७६)

मितौलीचा राजा, मौलवी फजलहक आणि सिंध यांना काळया पाण्याची शिक्षा झाली.

**७५९** (१८ : ११, १ ज्यून ५९, १७२–१७६)

नेपाळी सैन्याने अयोध्येची बेगम व नाना यांना ३०० सैनिकांसह नियाकोट येथील किल्ल्यात कैद करून ठेवले.

**७६०** (१८ : ११, १ ज्यून ५९, १७२–१७६)

नेपाळचा जंगबहादूर ठार झाला वार्ता खोटी ठरली. काठमांडूच्या काही भागास आग लागली, त्याच दिवशी तो शिकारीसाठी बाहेर गेला.

**७६१** (१८ : ११, १ ज्यून ५९, १७२–१७६)

तात्या टोप्या मरताना असे म्हणाला की, कानपूरचे कसाबी कृत्य माझ्याच हातून झाले. तेव्हापासून नानासाहेबाने त्याचे मुखावलोकन करण्यासही नकार दिल्हा.

**७६२** (१८ : ११, १ ज्यून ५९, १७२–१७६)

कराचीमध्ये एका इंग्रजास अपराधावरून कैद झाली.

**७६३** (१८ : ११, १ ज्यून ५९, १७२–१७६)

७८ व ६४ क्रमांकाच्या पलटणीतील कित्येक गोऱ्या सोजिरांच्या मरणाची वार्ता खोटी ठरली. दरम्यान कित्येक स्त्रियांनी दुसरी लग्ने केली. पुढे त्यांचे नवरे आले, परंतु त्या नव्या नवऱ्यांना सोडण्यास तयार नाहीत.

**७६४** (१८ : ११, १ ज्यून ५९, १७२–१७६)

मसाल्याच्या बेटांत जायफळावर रोग पडून १५ हजार झाडे जळून मेली.

७६५ (१८ : ११, १ ज्यून ५९, १७२–१७६)

न्यूयॉर्कचा एक प्रख्यात वकील लाखो रुपयांचा व्यवसाय सोडून मिशनरी होणार आहे.

७६६ (१८ : ११, १ ज्यून ५९, १७२–१७६)

कांहीं महिन्यांमागे दिसलेला धूमकेतू ८०० वर्षांत सूर्याभोवती एक प्रदक्षिणा करतो.

७६७ (१८ : ११, १ ज्यून ५९, १७२–१७६)

दक्षिण महाराष्ट्रात पटकीचा मोठा सपाटा चालला असून ४०० माणसे दगावली.

७६८ (१८ : ११, १ ज्यून ५९, १७२–१७६)

एका शतकापूर्वी सर्व सामर्थ्यांत आस्त्रियाचा नंबर सर्व जगात पहिला मानला जाई. सध्या तो इंग्लंडचा आहे.

७६९ (१८ : ११, १ ज्यून ५९, १७२–१७६)

काही विद्वान लोक नील नदीच्या उगमाचा शोध घेणार आहेत.

७७० (१८ : ११, १ ज्यून ५९, १७२–१७६)

ब्रिटिश पार्लमेंटने बंड मोडून काढणाऱ्या मुलकी व लष्करी अधिकाऱ्यांचे आभार मानले.

७७१ (१८ : ११, १ ज्यून ५९, १७२–१७६)

मुंबईचे गवर्नर लॉर्ड एलफिन्स्तन यांना राणीकडून बारोनचा किताब मिळणार आहे.

**७७२** (१८ : ११, १ ज्यून ५९, १७२–१७६)

दोन शीख शिपायांनी ख्रिस्ती धर्माची दीक्षा घेतली.

**७७३** (१८ : ११, १ ज्यून ५९, १७२–१७६)

एक लष्कराचा अधिकारी तंबू घेऊन चालला असताना त्यास बंडवाले भेटले, तेव्हा त्यांना तंबूचा उपयोग होऊ नये, म्हणून त्याने तंबूचे तुकडे केले.

**७७४** (१८ : ११, १ ज्यून ५९, १७२–१७६)

पन्ना शहरातील जुगलकिशोर या देवीच्या कपाळावर कोहिनूरच्या तोलाचा हिरा आहे. या मौल्यवान हिऱ्याला कोणीही खरेदीदार भेटत नाही. देवीचे सर्व अलंकार हिऱ्यांचे आहेत. मूर्तिपूजेच्या भ्रमाने नेटिव लोक देवास दागिने घालतात. कोणी चोर आला, तर त्यांच्या हातून त्याचा प्रतिकारसुद्धा होणार नाही.

**७७५** (१८ : ११, १ ज्यून ५९, १७२–१७६)

हैदराबादेस पीरजादा व मुल्ला यांच्यावर नवाब सालारजंगने खटला भरला. त्यांचा आरोप सिद्ध झाला. पण त्यांना शिक्षा सुनावण्यास न्यायाधीशाने नकार दिल्हा. कारण, धर्मगुरू नेहमीच आदरणीय असतात. शास्त्रार्थाच्या आडून असा दुष्टपणा करू नये.

**७७६** (१८ : ११, १ ज्यून ५९, १७२–१७६)

स्काट नावाच्या साहेबाने बोलण्यातले स्वर नोंदविण्याची युक्ती शोधून काढली. यापुढे भाषणांचे अहवाल लिहिण्यास रिपोर्टरची गरज पडणार नाही.

**७७७** (१८ : ११, १ ज्यून ५९, १७२–१७६)

तात्या टोप्याने जी गावे लुटली, त्यांची फार खराबी झाल्यामुळे त्यांना सारामाफी मिळेल.

**७७८** (१८ : ११, १ ज्यून ५९, १७२–१७६)

सरकारच्या कर्जामुळे सरकारी नोकरांचे पगार कमी करण्याचे सरकारने ठरविले आहे. मि. मनीसाहेबाने अर्ज करून या कृतीस विरोध दर्शविला.

**७७९** (१८ : ११, १ ज्यून ५९, १७२–१७६)

जालन प्रांतात ल्हार मुक्कामी १ हजार बंडवाल्यांनी गडबड केली. मि. स्विना यांच्या सैन्याने त्यांचा पूर्ण पराभव केला. ५ तास लढाई चालली. पुष्कळ बंडखोर मेले.

**७८०** (१८ : ११, १ ज्यून ५९, १७२–१७६)

डाकेमधील लखोटे चोरल्याबद्दल पुण्याच्या ४ शिपायांवर सेशनमध्ये खटला सुरू आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई; टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**७८१** (१८ : १२, १५ ज्यून ५९, १७८–१७९)

रा. नारायण रघुनाथांनी 'भरतखंडाची प्राचीन स्थिति व हालींची स्थिति' या विषयावर इंग्रजीत व्याख्यान दिल्हे. ते मराठीत दिले असते, तर फार बरें झाले असते. कारण इंग्लिश वाक्यरचना फार अनियमित व दोषयुक्त आहे. काही देवळे कोरीव दगडांची असतात, पण दर्शनी भाग विटांचा असतो. तसे इंग्रजीचे भाषांतर करताना सौंदर्य व शोभा याची आब जाते. म्हणून जन्मभाषेतून लोकांना उपदेश केलेला बरा. मि. नारायण म्हणाले की : प्राचीन काळी रानटी असणारे युरोपियन आता सर्वांत विद्वान झाले आहेत. वडिलोपार्जित नीच धर्म, हेच हिंदूंच्या मात्र बिघाडणुकीचे कारण आहे. तरी केवळ विद्येने काही अज्ञानावस्था दूर होत नसते. पवित्र आणि ईश्वरप्रेरित धर्मामुळे इंग्रज मोठ्या योग्यतेस चढले. ख्रिस्ती धर्मासारख्या गुणकारक धर्माने या देशात सर्वत्र पालट दिसेल. जंगलदेखील गुलाबासारिखे फुलेल आणि अति मनोरम होईल.

**७८१ अ** (इंग : १७७–१७८)

**७८२** (१८ : १२, १५ ज्यून ५९, १८०–१८३)

अमेरिकन मिशनरी स्काफलर लिहितात की : कान्स्तन्तिनोपल येथे विहेतेल मडमेच्या शाळेत त्यांनी धर्मविषयक व्याख्यान दिल्हे. देवाचा आशीर्वाद व पवित्र आत्म्याची वृष्टी, यांबद्दल एका मुलीने ऐकिले व ती एकांतात गेली. तिने पापांची क्षमा मागून आशीर्वादाची अपेक्षा केली. 'माणसाचा खरा विसावा प्रभू हाच आहे. माझा प्रिय तारणारा फार मोलवान आहे.' अशा मठ्ठ मुलीसही त्या प्रवचनाने लाभ झाला. आपल्या शाळगडणीशी ती याच एका विषयावर बोले. अनेक मुली रात्ररात्र प्रार्थना करून गीते म्हणत. विक्टोरिया या मुलीने ८ जणींसह दीक्षा घेतली. एका श्रीमंत पण पोरक्या मुलीस आश्रमातील मुली झोपल्या की, त्यांना चिमकुटे काढण्याची, तसेच डसण्याची सवय होती. या द्वाड मुलीमध्ये आता मोठा पालट झाला. विक्टोरियाचा भाऊ पहिल्यांदा खिस्ताविषयी दुर्भाषण करी. पण आता तोही खिस्ताकडे फिरला. जे जगावर व द्रव्यप्राप्तीवरती विश्वास ठेवणारे असतात, त्यांना भक्ती आवडत नाही. पवित्र आत्म्याची फळे चांगलीच असतात.

**७८२ अ** (इंम १७९–१८०)

**७८३** (१८ : १२, १५ ज्यून ५९, १८३–१८४)

लखनौ येथे सप्टेंबर १८५८ मध्ये मिशनरी दाखल झाले. चांगली इमारत बांधून शुभवर्तमानाचा प्रसार सुरू झाला. विश्रामवारी प्रार्थनेस ३० मुले येतात. मिशनाच्या ३ शाळा असून १०० मुले शिकतात. बाजारात नेहमी ५०० पर्यंत लोक उपदेश ऐकतात. सहा महिन्यांपासून रस्त्यावर उपदेश चालू आहे, तरी कोणीही गडबड केली नाही किंवा अपशब्द उच्चारला नाही.

७८४ (१८ : १२, १५ ज्यून ५९, १८३-१८४)

मुंबईचे कमिशनर फोर्जिट विलायतेस जाणार, म्हणून सर खरसेठजी यांच्या अध्यक्षतेखाली सभा होऊन त्यांना मानपत्र देण्याचा ठराव झाला. मानपत्राचा खर्डा तयार झाला. दहा हजार रुपये वर्गणी जमा झाली. या रकमेतून विलायती चांदीचे तबक त्यास नजर केले जाईल.

७८५ (१८ : १२, १५ ज्यून ५९, १८३-१८४)

बंगालमधील मिशनऱ्यांनी व्हाईसरॉय मार्फत दोन अर्ज्या पाठविल्या होत्या. त्यावर ब्रिटनचे पंतप्रधान लार्ड स्टानली यांनी आपला अभिप्राय दिला आहे. सन १८१० व १७ च्या कायद्यांप्रमाणे सरकारने हिंदू व मुसलमान देवळांचा खर्च चालवून त्यांवर देखरेख करावी, असे ठरले होते. परंतु हे कायदे आता रद्द करावे, असे मिशनऱ्यांचे मत आहे. १८४६ च्या सरकारी रिपोर्टात म्हटले होते की, बहुतेक ठिकाणी ही व्यवस्था गावकऱ्यांच्याकडे दिली आहे. राणीच्या जाहीरनाम्यानंतर परिस्थिती बदलल्यामुळे हे कायदे रद्द करावे, असे इंग्रज सरकारलाही वाटते. देवस्थानच्या पैशाचे तंटे देखील न्यायकोर्टात इतर खटल्यांप्रमाणे चालावेत. दुसऱ्या अर्जात म्हटले होते की, बंगालमधील अघोरी व क्रूर अशी चरकपूजा कायद्याने बंद करावी. विद्येचा प्रसार झाला की, वाईट चाली बंद होतील, अशी कंपनीला आशा वाटत होती. परंतु चरकपूजा चालूच आहे. मुंबई इलाख्यातील बगाडाची चाल कायदा केला, तेव्हाच बंद झाली. क्रूर आणि अनीतिजनक चाली बंद करणे आवश्यक आहे. सामोपचाराने होत नसेल, तर सक्त तजवीज करणे भाग आहे.

७८६ (१८ : १२, १५ ज्यून ५९, १८६–१९०)

आत्मिक हानीपेक्षा कोणतीही हानि मोठी नाही. पारमार्थिक लाभापेक्षा मोठा लाभ नाही. म्हणून रा. नानजकर आपल्या मित्रांना सांगतात की : ख्रिस्तच पापापासून आपले तारण करू शकेल. तारणाने मुक्ती मिळते. ख्रिस्ती धर्म ईश्वरदत्त आहे. इतर धर्म ईश्वरप्रणीत नाहीत. हिंदू धर्मात ब्राह्मणाचे श्रेष्ठत्व वर्णन केले, त्य अर्थी तो ब्राह्मणकृत धर्म होय. ख्रिस्ती शास्त्राचे नियम पाळून आम्ही पुण्यवान होऊ. येशूच्या प्रायश्चित्ताने दंड चुकवून सनातन जीवनाचे विभागी होऊ. खोटा अभिमान तोंडघशी पाडीत असतो. पवित्रपणा, प्रीत व कल्याण मात्र येशूच्या धर्मातच आहे. ख्रिस्ती लोक लाच खात नाहीत. दुष्टाईच्या पायरीवरही कधी जाणार नाहीत. नातलगांशी चांगले वागून शत्रूवरही तो प्रेम करतो. ईश्वराच्या प्रीतीचा व आज्ञेचा पक्का कोट त्याच्याभोवती असतो. मायामोहाचे मेघडंबर वितळवून तो ख्रिस्तास शरण जातो. इतर धर्मीय मात्र नवऱ्याने धर्मांतर केले, तर त्याच्या पत्नीस त्याजकडे जाण्यास अडथळा करतात.

७८७ (१८ : १२, १५ ज्यून ५९, १९०–१९२)

फारुकाबादेचा नवाब तुफज्जल हुसेन यास फाशी देण्याचा हुकूम झाला होता. परंतु मेजर बारोने त्याजविषयी रदबदली करून व्हाइसरायकडून त्याची फाशी रद्द करविली आहे. नबाबाच्या हुकमावरून अनेक लोक मारले गेले. असे असताना त्यास जीवदान कशासाठी दिले, ते कळत नाही. हा 'धर्मात्मा' आता मक्केस जाऊन पवित्र क्षेत्री राहणार आहे.

७८८ (१८ : १२, १५ ज्यून ५९, १९०–१९२)

२१ मे रोजी ग्रांत होपच्या सेनेशी नानाच्या व बाळारावच्या सैन्याची गाठ पडली होती. परंतु दाट झाडीचा फायदा घेऊन दोघेही बंडखोर पळून गेले. सोहाजपुरातील झाडीत अद्यापही बंडखोरांचा मोठा जमाव आहे.

**७८९** (१८ : १२, १५ ज्यून ५९, १९०–१९२)
काझी रमजान अली व त्याचा सहकारी, यांची शिक्षा सरकारने रद्द केली.

**७९०** (१८ : १२, १५ ज्यून ५९, १९०–१९२)
हैदराबादेत व सिकंदराबादेत नेहमी अशांतात राहाते, म्हणून तेथे ६ गोऱ्या पलटणी राहातील.

**७९१** (१८ : १२, १५ ज्यून ५९, १९०–१९२)
दक्षिण महाराष्ट्रातील बंडाचा बीमोड केल्याबद्दल फौजदार मुतुकुमार ऐया यांना ५० रुपयांची तरवार बक्षिस दिली जाईल. ख्रिस्ती लोक आपले हुद्दे जबाबदारीने सांभाळतात, हे यावरून सिद्ध झाले आहे.

**७९२** (१८ : १२, १५ ज्यून ५९, १९०–१९२)
दरजीलिंगच्या जमिनीची एकरास १० रुपये प्रमाणे विक्री होणार आहे. खरेदीची रक्कम दरसाल हप्त्याने भरण्याची सवलतही मिळेल.

**७९३** (१८ : १२, १५ ज्यून ५९, १९०–१९२)
एका वानराने लोहार चाळीत येऊन २६ मनुष्यांना दुखापत केली. एका परोपकारी गृहस्थाने त्यास गोळी घालून ठार केले. अशा जनावरास जिवंत ठेवणे, ही वेडी दया ठरली असती.

**७९४** (१८ : १२, १५ ज्यून ५९, १९०–१९२)
जबलपुराजवळ काही युरोपियन लोक होडीत बसून नर्मदा नदीतले पारवे मारीत होते. बंदुकींच्या बाराने रानातील गांधीलमाश्या त्यांच्यावर तुटून पडल्या. एका साहेबाने नदीत उडी टाकली व तो मेला. बाकीचे इतके जखमी झाले की, त्यांस डोळ्यांनी काही दिसत नाही.

**७९५** (१८ : १२, १५ ज्यून ५९, १९०–१९२)

पंजाबमध्ये १८५६ सालात जंगली पशूंनी २९९ माणसे मारली. त्यात सहा मुले होती. लष्कराने ८३४ जनावरे मारली. पैकी ५४६ लांडगे होते.

**७९६** (१८ : १२, १५ ज्यून ५९, १९०–१९२)

पोस्ट खात्याने नियम केला आहे की, दोन वर्तमानपत्रे एकाच टपालात पाठवू नयेत.

**७९७** (१८ : १२, १५ ज्यून ५९, १९०–१९२)

मद्रास इलाख्यात काही ठिकाणी अशी चाल आहे की, नवीन जन्मलेल्या बालकास वानरीचे दूध पाजतात किंवा शेराचा चीक पातळ करून देतात. याने अनेक बालमृत्यु झाले आहेत. म्हणून सरकारने तद्देशीय भाषेत जाहीरनामे काढून या चालीतील वेडेपणा लोकांच्या ध्यानात आणून दिला पाहिजे.

**७९८** (१८ : १२, १५ ज्यून ५९, १९०–१९२)

मुंबई इलाख्यातील रेल्वे कंपनीस एका आठवड्यात ४० हजार ३५९ रुपये उत्पन्न झाले.

**७९९** (१८ : १२, १५ ज्यून ५९, १९०–१९२)

मुंबईत खुर्दा महाग झाला असून त्याचा दर शेकडा १६ झाला. लोकांचे नुकसान होऊन नये, म्हणून कलकत्त्याहून पुष्कळ खुर्दा येणार आहे.

**८००** (१८ : १२, १५ ज्यून ५९, १९०–१९२)

स्वेज ते अदनपर्यंत तारायंत्र पुरे होऊन ते चालू झाले.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १८, अंक १३, मुंबई, १ ज्युलै १८५९

**८०१** (१८ : १३, १ ज्युलै ५९, १९३-१९५)

एक ख्रिस्ती उपदेशक स्त्री नगरजवळच्या एका गावात गेली व तिने गावकरी स्त्रियांना सांगितले की : आमचा धर्म खाण्यापिण्यात व लेण्यानेसण्यात नाही. म्हणून काकणे किंवा गरसोळ्या यांना ख्रिस्ती धर्मात महत्त्व नाही. नाशवंत गोष्टींनी शरीराची शोभा करण्यात काही फायदा नाही. एक १५ वर्षांची तरुण सुवासिनी आपल्या ८० वर्षांच्या नवऱ्याची तिसरी बायको होती. तिच्या अंगावर दागदागिने असूनही ती दुःखी दिसली. तेव्हा खऱ्या ख्रिस्त्यांनी खांबी जाणे, निर्वासित होणे, यांसारखे अत्याचार सहन करावे लागले, त्याची हकीगत स्त्रियांना समजून सांगितली. आमच्या प्रभूने इतके सोसले. मग आम्हांस थोडे सोसावे लागले, तरी काय हरकत आहे ? त्यानेच आकाशात सर्वकाळचे सुख मिळेल. गावात काही धर्मांतर झाले की, नातेवाईक त्या त्या व्यक्तींचा छळ व पाठलाग करतात. खोलीत कोंडून उपाशी ठेवतात. त्यांच्या बायकाही सूटपत्र घेतात. जगिक सुख ही दुपारची सावली आहे. याची जाणीव ठेवावी. आळशी बसण्याने रोग लागतो. म्हणून सतत धर्माचे काम करावे. ख्रिस्ताचा तारणोपाय अंगीकारून अमोल्य आत्म्याचा उद्धार साधावा. एखादी स्त्री श्रीमंतीत असूनही तिच्या आत्म्याची जर कुचंबणा होत असेल, तर फायदा नाही. जाच व सासुरवास झाल्यामुळे कित्येक स्त्रिया जीवही देतात. म्हणून आत्म्याचे खरे कल्याण साधावे.

**८०१ अ** (इंम : १९३-१९५)

**८०२** (१८ : १३, १ ज्युलै ५९, १९९–२०२)

काशीमध्ये वजीर सिंध या शिखाचा बाप्तिस्मा झाला. लहानपणी नानकपंथाचा अभिमानी होता. सात वर्षे लष्करात नोकरी केल्यावर शहराणपुरात त्याने एका मिशनऱ्याचे प्रवचन ऐकले. बदौनी येथे एडवर्ड या माजिस्त्रेताच्या सहवासात त्याची जिज्ञासा वाढली व साहेबाच्या मदतीने त्याने लष्करातून सुटका करून घेतली. ख्रिस्ती धर्माचे सिद्धांत समजावून घेऊन त्याने दीक्षेची परवानगी मागितली. १८५७ च्या बंडापासून नेटिव लोक ख्रिस्ती लोकांना चाकऱ्या देण्यास राजी खुषी असतात. लायक व चांगली वर्तणूक असली, तरच नोकरी मिळते. बाहेरचे लोकही आता हा धर्म मनापासून 'आदराचा विषय' मानतात. विधर्मी लोकांमध्ये धर्मप्रसार होण्यास हा काळ अत्यंत अनुकूल आहे. सरकारने १८५७ चे बंड आपल्या पायाखाली खुंदळून टाकले, या गोष्टीचा मुस्तकिम ठसा लोकांच्या मनावर उमटला. मुसलमानांचे राज्य या देशावर अनेक शतके होते. तरीही या लोकांच्या श्रद्धा बदलल्या नाहीत. पण इंग्रज लोकांच्या प्रतापास ईश्वराचे आशीर्वाद आहेत. ते जे काही आरंभतील ते नक्कीच सिद्धिस जाईल. वादळात, दहनात आणि भूमिकंपातही ईश्वर आमचे रक्षण करतो. पवित्र आत्मा मंजुळ वाणीने बोलतो. म्हणून सर्वजण त्याची भक्ती करतात.

**८०२ अ** (इंग : १९८–१९९)

**८०३** (१८ : १३, १ ज्युलै ५९, २०२)

मुंबई मुकामी पंधरा दिवसांत पाऊस पडला नाही. शेते सुकत चालली आहेत. आर्द्रा नक्षत्र सर्व कोरडे गेले.

८०४ (१८ : १३, १ ज्युलै ५९, २०३–२०५)

'वाचणारा एक' पत्रात लिहितो की, वेषधारी (विष्णुबावा) ब्रह्मचारी बावाने 'वेदोक्त धर्मप्रकाश' या नावाच्या पडद्याखाली सोंग आणले आहे. या सोंगाचा शृंगार करण्यास दोन वर्षे लागली. ताबुताच्या सणातील चित्रविचित्र सोंगाप्रमाणेच हे सोंग आहे. जो लक्ष देऊन निःपक्षपातीपणाने पाहील, त्यास हाच अनुभव येईल. बावा वरवर वेदोक्ताचे सोंग करतात. पण ते केवळ बहुरूपी आहेत. स्वतःला वेदान्ती म्हणविणारा बावा वेदविरुद्ध उपदेश करतो. न्यायाधीशाने ब्राह्मण व महार यांना समसमान न्याय द्यावा. महारास बाहेर उभे करू नये, असे बावा म्हणतात. परंतु शास्त्र सांगते की, ब्राह्मणाने कसलाही गुन्हा केला, तरी त्यास शिक्षा देऊ नये. शूद्रांना मात्र लहानशा गुन्ह्यासाठी क्रूर शिक्षा मनूने सांगितली आहे. बावा म्हणतात, परमार्थ साधायास बहुत काळ पाहिजे. पण भागवत म्हणते की, एका क्षणात परमार्थ मिळतो. बावा सांगतात की, पशूंना मारणारा नरकपात्र आहे. पण मनुस्मृती म्हणते की, पाहुण्यांच्या मधुपर्काकरिता गुरे कापावीत. मग नक्की 'सशास्त्र' कोणते? यज्ञात पशुवध करावा, अशी शास्त्राची आज्ञा आहे. वेदाच्या भाषांतरावरून कळते की, पूर्वीचे ब्राह्मण गोमांस खात होते. महारांनी मांस खाणे सोडून दिले, तर त्यांना देवळात येऊ देण्यास बावा तयार आहेत. या गोष्टीस बावाजवळ शास्त्राधार आहे काय? बावांची मते हिंदुधर्मानुसारी नाहीत, तर धर्माच्या विरुद्ध आहेत.

८०५ (१८ : १३, १ ज्युलै ५९, २०५–२०८)

बांद्याच्या माजिस्त्रेताने पटकीचा फैलाव टाळण्यासाठी कलिंगड व खरबूज यांच्या विक्रीस बंदी केली.

८०६ (१८ : १३, १ ज्युलै ५९, २०५–२०८)

एका पारशाने बडोद्याच्या महाराजांना फोटोग्राफिक चित्रे काढण्याची विद्या शिकविली, म्हणून त्यास बक्षिसे देऊन त्याचा पगारही वाढविण्यात आला.

८०७ (१८ : १३, १ ज्युलै ५९, २०५–२०८)

विलायतेस हिंदुस्थान सरकारने अशी शिफारस केली आहे की : ५०० चे वर पगार असणारांच्या वेतनात २० टक्के कपात करावी. इतरांचे पगार १० टक्के कमी करावे.

८०८ (१८ : १३, १ ज्युलै ५९, २०५–२०८)

मि. फोर्जिटने मारलेल्या वाघाचे कातडे सरकारी पदार्थसंग्रहालयास देण्यात आले.

८०९ (१८ : १३, १ ज्युलै ५९, २०५–२०८)

मरिन बटालियनच्या जुन्या बराकीच्या जागी एक सरकारी पदार्थसंग्रहालय व एलफिन्स्तन विद्यालयाची इमारतही बांधली जातील.

८१० (१८ : १३, १ ज्युलै ५९, २०५–२०८)

४ जूनपासून मुंबईत पाऊस सुरू झाला. तारवे उलथून कापसाचे पुष्कळ गठ्ठे समुद्रात पडले.

८११ (१८ : १३, १ ज्युलै ५९, २०५–२०८)

गवर्णर लार्ड एल्फिन्स्तन पर्जन्यकाळात अहमदनगरला मुक्काम करतील.

८१२ (१८ : १३, १ ज्युलै ५९, २०५–२०८)

नेपाळात ६ हजारांहून जादा बंडखोर आहेत. लूट करण्यास सवड नाही, म्हणून ते अन्नास मोताद झाले आहेत. जेनराल ग्रांतच्या सैन्यास शेकडो दुखणाई व जखमी बंडखोर आढळले. त्यांच्या बायका मुलांना अन्नही मिळत नाही. नाना व बेगम जरी व्यवस्थित राहात असले, तरी त्यांचे अनुयायी बुऱ्या हालांना तोंड देत आहेत. निमकहरामीचे फळ असेच असते.

८१३ (१८ : १३, १ ज्युलै ५९, २०५–२०८)
हैद्राबादेत रेसिडेंटाच्या छावणीवर हल्ला केल्याबद्दल एका मैलव्यास अटक झाली.

८१४ (१८ : १३, १ ज्युलै ५९, २०५–२०८)
काश्मीर राजवाड्यातील कलह इंग्लिश सरकारच्या मध्यस्थीमुळे मिटला.

८१५ (१८ : १३, १ ज्युलै ५९, २०५–२०८)
सावकाराच्या जबर व्याजापायी जेरीस आलेले सांथळ लोक बंगालमध्ये बंड माजवीत आहेत. कित्येकांना कर्जफेडीपायी तीन पिढ्या सावकाराकडे गुलामगिरी करावी लागते. मिस्तर राबिन्सन याने सावकारी नियंत्रण बसविले आहे.

८१६ (१८ : १३, १ ज्युलै ५९, २०५–२०८)
यंदा हिंदुस्थान सरकारला १२ अब्ज रुपये जमेपेक्षा जास्त खर्च येईल. एकंदर कर्जाची रक्कम १८ अब्जांवर जाईल.

८१७ (१८ : १३, १ ज्युलै ५९, २०५–२०८)
मुंबईत दररोज ४० माणसे पटकीने मरत आहेत. दुधात व लोण्यात जापालाचा रस मिश्रित करतात, त्याने हा रोग होतो. पटकीची साथ इतर गावातही वाढत आहे.

८१८ (१८ : १३, १ ज्युलै ५९, २०५–२२८)
खोंड लोकांतील नरमेधाची चाल कायद्याने बंद केली, पण चोरून मनुष्यबळी दिला जातो. म्हणून सरकारने त्यांना टोणगे मारण्यास मुभा दिल्ही आहे.

८१९ (१८ : १३, १ ज्युलै ५९, २०५–२०८)
उपजताच मुलीस मारण्याची चालही कमी होत आहे. कारण आता रस्त्याने तरण्या स्त्रिया हिंडताना दिसतात, तेवढ्या पूर्वी दिसत नसत.

८२० (१८ : १३, १ ज्युलै ५९, २०५–२०८)
त्रावणकोरातील राजाने खास हुकूम काढून शानार स्त्रियांना मर्जीप्रमाणे पोषाख करण्यास परवानगी दिल्ही. मद्रास सरकारनेही या ठरावास संमति दिल्ही.

८२१ (१८ : १३, १ जुलै ५९, २०५–२०८)
कंपनीच्या शिक्क्याऐवजी राणीच्या नावाचे नवे नाणे सुरू होणार.

८२२ (१८ : १३, १ ज्युलै ५९, २०५–२०८)
गावात दंगल केल्याबद्दल गायकवाड सरकारचे काही घोडेस्वारांची बदली झाली. (ज्ञानप्रकाशवरून)

८२३ (१८ : १३, १ ज्युलै ५९, २०५–२०८)
रा. मुदुकुमार ऐया यांना समारंभपूर्वक ५२५ रुपयांची चांदीची तरवार भेट देण्यात आली. बंडकाळात विश्वासाने चाकरी निभावल्याबद्दल ५०० रुपयांचा गावही इनाम दिल्हा. (धूमकेतूवरून)

८२४ (१८ : १३, १ ज्युलै ५९, २०५–२०८)
आगगाडीच्या चाकारीवर मोठा धोंडा ठेवल्याबद्दल एका मुसलमानास काळ्या पाण्याची शिक्षा झाली. या दुष्टाने शेकडोंचा संहार करण्याचे योजिले होते.

८२५ (१८ : १३, १ ज्युलै ५९, २०५–२०८)
पोलिस कमिशनर वेटिंग्टन यांनी सरकारकडे अर्जी केली आहे की, तिसऱ्या प्रतीच्या रेल्वे डब्यात ५० हून जास्त माणसे बसू देऊ नयेत.

८२६ (१८ : १३, १ ज्युलै ५९, २०५–२०८)
नानासाहेब व झाशीची राणी यांची स्थावर मिळकत सरकारने जप्त केली.

८२७ (१८ : १३, १ ज्युलै ५९, २०५–२०८)
इंदूरच्या बंडखोरांनी सरकारी जामदारखाना लुटून १२ लाखांचा ऐवज चोरला होता. त्यापैकी ४ लाख ७० हजार रुपये परत मिळाले आहे. (ज्ञानप्रकाशवरून)

८२८ (१८ : १३, १ ज्युलै ५९, २०५–२०८)
बंडामुळे झालेले नुकसान भरून काढण्यासाठी कानपूरच्या लोकांकडून तीन लक्षांची भरपाई करून घेतली जाईल. (ज्ञानप्रकाशवरून)

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

---

## ज्ञानोदय, पुस्तक १८, अंक १४, मुंबई, १५ ज्युलै १८५९

---

८२९ (१८ : १४, १५ ज्युलै ५९, २०९–२१०)
हिंदुस्थान सरकारचे सेक्रतारी ग्रे यांनी राणी सरकारच्या मुलखात शांतता झाली, म्हणून आनंद व्यक्त केला आहे. ईश्वराची उपकारस्तुती करण्याकरिता नामदार गवर्नर एक दिवस नेमून देतील. शस्त्रास्त्रांचा खणखणाट आता थांबला आहे व रणभूमीवर मोठाली सैन्ये ठेवण्याची आता गरज नाही. २८ जुलै रोजी सर्व इमानी प्रजाजनांनी आपले काम बंद ठेवून ईश्वराची स्तुती करावी. सर्व ख्रिस्ती जनतेने भजनालयात जमून प्रार्थना करावी.

८२९ अ (इंम : २०९)

८३० (१८ : १४, १५ ज्युलै ५९, २१२–२१६)

अफ्रिकेतील कीकटौनचा राजा इयो आनेस्ती याचा नुकताच मृत्यु झाला. त्याच्या कारकीर्दीत मिशनऱ्यांनी धर्मप्रसाराकरिता बहुत श्रम केले. या राज्यात अशी क्रूर चाल होती की, राजा मयत झाल्यावर शे-दोनशे गुलामांना, राजाच्या वडील बायकांना व शत्रूंना ठार मारीत असत. १८४६ मध्ये स्कॉटिश मिशनरी आले, तोपर्यंत ही रीत बेधडकपणे चालू होती. मिशनऱ्यांच्या सल्ल्यावरून आनेस्ती राजाने ही चाल बंद केली. मरणापूर्वी या राजाने प्रार्थना केली. आजारामुळे तो प्रार्थनामंदिरात जाऊ शकला नाही. राजा अकस्मात् मेल्यावर त्याचे चाकर मरणाच्या भयाने अरण्यात पळाले. स्त्रियाही लपून बसल्या. राजाचा वारस ज्येष्ठ पुत्र याने सर्वांस धीर देऊन परत आणले. राजाची कबर रक्ताने भिजली नाही. तरी गुलामांनी लढण्याची तयारी केली. मिशनऱ्यांनी त्यांची समजूत घालून दंगलीचे संकट निवारले. एवढे होऊनही स्त्रियांना मारल्याबद्दल अफवा गावात उठत होत्या. नवा राजा टाम ह्यो याने जुनी क्रूर चाल मोडली व दुसऱ्याचे रक्त चाखण्याची भयंकर रीत धैर्याने बंद केली. दयाळूपणाने वागण्याचा त्याने ईश्वराशी करार केला. मूर्तिपूजक दासही संतुष्ट झाले. ज्या रानटी चालीने पूर्वी शेकडो लोक हकनाक जिवास मुकत असत, ती चाल अशा रीतीने बंद झाली. ख्रिस्ती धर्माचा प्रसार असा उपकारक ठरतो.

८३० अ (इंम : २१०–२१२)

**८३१** (१८ : १४, १५ ज्युलै ५९, २१७–२१८)

बंडाची धामधूम संपली. मिशनांची स्थिती अगदी पहिल्याप्रमाणे व्यवस्थित होत आहे. जुन्या खऱ्या धर्माच्या घातक बंधनांपेक्षा लोकांना शुद्ध प्रीतिपात्र शुभवर्तमान फार आवडते. भगवानदास सिंघ हा ब्राम्हण मिशनाकडे आला. सध्या १०३ लोक आहेत. मिशनच्या शाळेत ४७५ विद्यार्थी आहेत. शेरींगसाहेब मडमेसह चांगले कार्य करतात.

**८३१ अ** (इंग : २१७)

**८३२** (१८ : १४, १५ ज्युलै ५९, २१८–२१९)

मि. सिदुजी बापूजी मिसाळ यांना उपदेशकाची दीक्षा देऊन शिरूर येथे नेमले. रे. दीन, बाकर व बिसलसाहेब यांनी शास्त्र वाचून प्रार्थना केली. रे. मिसाळांनी ईश्वराचा आशीर्वाद मिळविला आहे. ईश्वराच्या भागीपणाचा उजवा हातच जणू काही मदतीस आला. सर्वांची वृद्धी ईश्वरी कृपेत व उपयुक्तपणात व्हावी, अशी प्रार्थना आहे.

**८३२ अ** (इंग : २१८)

**८३३** (१८ : १४, १५ ज्युलै ५९, २१९–२२०)

तुर्कस्थानातील एक मुल्लाजी मशिदीत नियमित उपदेश करी. अतिपवित्र अशा ठिकाणी उपदेश करीत असताना एकाएकी त्याच्या मनात काही उद्गार आले व तो म्हणाला की, 'हे सर्व खोटे आहे.' या गोष्टीचा गवगवा होऊन त्यास काझीपणावरून कमी करण्यात आले. त्याने सुलतानास सांगितले की : 'हे माझे प्रामाणिक मत आहे. यात लालूच किंवा बहकावणे नाही. मी इंजिलीवरच (ख्रिस्ती शास्त्रावर) फक्त विश्वास ठेवीत असतो.' दुसराही एक उपदेशक काम सोडून गेला. त्यास लोकांनी पाखंडी ठरविले, त्याचा छळ केला, पण त्याचे मत बदलले नाही. तो मनाची साक्ष महत्त्वाची मानतो.

८३३ अ (इंम : २१९)

८३४ (१८ : १४, १५ ज्युलै ५९, २२०–२२१)

'तुमचा मित्र' पत्रात लिहिले की : सृष्टीच्या उत्पत्तीस ६ हजारांवर वर्षे पूर्ण झाली. स्वयंभू राजा ईश्वर याची दवंडी सर्वत्र पिटत आहे. जगिक राजाचा हुकूम सर्वजण मानतात. फितुरीचा व बंडाळीचा तो निःपात करतो. राजाची इतराजी होणारास मृत्यु पतकरावा लागतो, किंवा निदान काही दिवसांचा ठेप होते. परंतु ईश्वर हा खरा सार्वभौम राजा आहे. त्याच्या जाहीरनाम्यात म्हटले आहे की, मरणानंतर क्षमा मिळणार नाही. म्हणून जिवंतपणीच पुण्य करून क्षमा मिळवावी. दंडपात्र लोकांना कर्दमाचे वतन मिळेल. हे वाचल्यावर अंगावर आनंदाचे रोमांच उभे राहातात.

८३५ (१८ : १४, १५ ज्युलै ५९, २२१–२२२)

मुंगी शरिराने लहान असली, तरी उद्योग, चातुर्य व श्रम, यांत श्रेष्ठ आहे. मधमाशीपेक्षा तिचे श्रम जास्त असतात. मुंग्यांची राहण्याची जागा विस्तीर्ण शहराप्रमाणे बनविलेली असते. त्यात दुतर्फा घरे असतात. मुंग्या मध गोळा करतात. मांस व मांसकण खातात. भक्ष्याची तरतूद अगोदरच बंदोबस्ताने करून ठेवतात. किड्यांची अंडी आपल्या पिलांना खाऊ घालतात. कोणी शत्रू हल्ला करील, असे वाटले, तर कडेकोट बंदोबस्त ठेवतात. वारुळावर तर एकाच मुंगीचे स्वामित्व असते. अतिथंडीच्या प्रदेशात त्या वारुळाच्या बाहेर येत नाहीत. थंडीने अंग बधिर झाले, तर भक्ष्याचा साठा वाढवून ठेवतात. हा गुण मुंगीमध्ये सृष्टिकर्त्यानेच निर्माण केल्यामुळे मुंग्या कधीही उपाशी मरत नाहीत.

८३६ (१८ : १४, १५ ज्युलै ५९, २२३–२२४)

कोळी बंडखोरांनी नगर पार्करवर (सिंध) हल्ला केला, तेव्हा इंग्रज सैन्याने २० बंडखोर ठार मारले.

८३७ (१८ : १४, १५ ज्युलै ५९, २२२–२२४)

बाबू शिवरंदन सिंध यांना एकनिष्ठ चाकरीबद्दल 'राजा बहादूर' ही पदवी देण्यात आली. (धूमकेतूवरून)

८३८ (१८ : १४, १५ ज्युलै ५९, २२२–२२४)

राणाच्या राज्यारोहणाच्या वाढदिवशी, म्ह. २७ जून रोजी मुंबईत तोफांची सरबत्ती झाली.

८३९ (१८ : १४, १५ ज्युलै ५९, २२२–२२४)

सिक्कीमच्या राजाने आपला मुलुख इंग्रजांनी परत द्यावा किंवा सालीना १२ हजारांचे वेतन द्यावे, अशी मागणी केली. हे मागणे उद्धत व बेअदबीचे आहे.

८४० (१८ : १४, १५ ज्युलै ५९, २२२–२२४)

लाहोरचा सर्जन बाबू रामचरण बोज याने खिस्ती धर्माची दीक्षा घेतली. खिस्ती धर्मच खरा आहे व त्यातच तारण आहे, अशी त्याची खातरी पटली.

८४१ (१८ : १४, १५ ज्युलै ५९, २२२–२२४)

वायव्य प्रांतात तुरुंगावर दरोगा म्हणून नेटिव खिस्त्यांचीच नेमणूक व्हावी, असा ठराव झाला. (धूमकेतूवरून)

८४२ (१८ : १४, १५ ज्युलै ५९, २२२–२२४)

युरोपात सार्डिनिया व आस्त्रिया यांच्यात घनघोर रणसंग्राम चालू आहे. फ्रान्स सार्डिनियास मदत करीत असून त्यांच्या संयुक्त सैन्याने आस्त्रियाचा दोन वेळा पराभव केला. रोमन कॅथॉलिक पंथाचे काही नियम आस्त्रियाने बदलले, म्हणून हे युद्ध सुरू झाले.

८४३ (१८ : १४, १५ ज्युलै ५९, २२३–२२४)

तुर्कस्थान आणि इराण यांच्यात सीमातंट्यावरून पुन्हा युद्ध होण्याची शक्यता आहे. इराणच्या शहाने ६० हजार सैन्याची फौज जमा केली. सरहद्दीवर मोठ्या पलटणी जमा झाल्यामुळे केव्हाही युद्धास तोंड लागेल.

८४४ (१८ : १४, १५ ज्युलै ५९, २२४)

११ जून रोजी स्वेजकडे जाणारी आल्मा नामक प्रचंड आगबोट मोखाजवळ खडकावर आदळून फुटली. उतारूंमध्ये मुख्यतः मडमा व लेकरे यांचे प्रमाणच ज्यास्त होते. जहाजाची एक बाजू पाण्यात बुडाल्यावर नेटिव खलाशी जीव वाचवून पळाले व लूट करू लागले. साहेबलोकांनी त्वरा करून सर्वच्या सर्व, म्हणजे १५० गोऱ्या उतारूंना सुरक्षित खडकावर उतरविले. तरी एक साहेब ऊन लागून मेला.

८४५ (१८ : १४, १५ ज्युलै ५९, २२४)

इंग्लीशम्यान पत्रावरून कळते की : मेरिया नामे बळी देण्यावरून बीरसामलीक व दासू अमलीक यांची दहा वर्षांची ठेप सरकारने काईम केली. मनुष्यबळी देणारे व त्यासाठी माणसे पळविणारे, अशा सहा आसामींस प्रत्येकी ७ वर्षांची ठेप झाली. (ब. दी. वरून)

८४६ (१८ : १४, १५ ज्युलै ५९, २२४)

सालमजकुरी पाऊस कमी असल्यामुळे उष्णता फार होती. सर्व प्रकारच्या वस्तू महाग झाल्या. बाखयाचा उपद्रवही वाढत आहे.

८४७ (१८ : १४, १५ ज्युलै ५९, २२४)

रा. बाबा पदमनजी कळवितात की, 'क्यांडीकृत इंग्लीश व मराठी कोशाचा संक्षेप' या पुस्तकाच्या प्रती वर्गणीदारांना ऑगस्टच्या आतबाहेर मिळतील.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**८४८** (१८ : १५, १ आगस्त ५९, २२५)

लांगडनसाहेब आपल्या हातेच मरण पावला. देशी ख्रिस्ती लोकांस फार दुःख झाले. तो सरकारी छापखान्यावर चौकसनीस होता. अतिविशेष श्रमांनी त्याचे मस्तक फिरून गेले आणि त्याने आपलाच जीव घेतला, असे म्हणतात. अक्षरांचे ठसे करण्याच्या या कारखान्यात ५०० ख्रिस्ती लोक चाकरीच आहेत.

**८४८ अ** (इंम : २२५)

**८४९** (१८ : १५, १ आगस्त ५९, २२७–२२९)

रामचंद्रायाने आपला शालक आनंदाया यास लिहिले आहे की : बुद्धिवाद करून नातेवाईकांची मते अनुकूल करून घ्यावीत. पण आपले नातलग साध्या गोष्टीचा मोठा बभ्रा करतात. उजेड आणि अंधार यांची अखंड झुंज चालत असते. आपली आईबापे आणि आवडती लेकरे यांना दुःखात पाहवत नाही. बाजारात मिशनारीचा उपदेश ऐकल्यापासून आमच्या मनामध्ये खळबळ सुरू झाली. आपण पापी असून येशूकडून क्षमा मिळवावी, असे प्रत्येकास वाटते. सर्वसाधारण माणूस नातलगावर भरवसा ठेवतो. खोटेपणा व लबाडी करीत नाही. तरीही आकाशातले श्रेष्ठ वेतन पावण्याकरिता क्षेमाचा मार्ग शोधावा लागतो. गंभीरपणाने विचार करून निर्णय घेतला पाहिजे.

**८४९ अ** (इंम : २२५–२२७)

८९० (१८ : १५, १ आगस्त ५९, २२९–२३४)

रे. सिदोबा बापूजी मिसाळास पाळकाची दीक्षा देताना सांगण्यात आले की : 'प्रभूने आपले अमोलिक रक्त देऊन ही मंडळी विकत घेतली. तिचे पाळण व व्यवस्था तू करीत जा. शास्त्रवचनरूपी अन्नोदक देत जावे. मेंढरांना हिरव्या कुरणात व स्वच्छ पाण्यावर बसवावे. लोकांना जीवंत धोंड्यासारखे बनवून आत्मिक मंदिर बांधावे. ख्रिस्ताच्या कळवळ्याने लोकांच्या दुर्दशेविषयी कळवळा धरावा. अपश्चात्तापयास गाढ निद्रेतून जागे करावे. मेलेली प्रेते उठवावीत. वाळलेल्यांच्या हाडांचे सैन्य उभे करावे. शास्त्रवचनरूपी भांडाराचे तुम्ही खजिनदार आहात. रक्तपाण्याने देवाचा बाग फुलवावा. गवत – धसकट जाळून टाकावे. रचनाकार करावा. मेंढवाड्यावर जागता पहारा ठेवावा. फितुरी धुंडाळून काढावी. सहनतेचे उदाहरण तयार करावे. आत्मरूप शस्त्र हातामध्ये घेऊन मंदिर कळसास न्यावे. खरेपणाने वाग. अयोग्य कामाचा निषेध करून सुवार्तारूप पाण्याचा वर्षाव करावा. क्लेश व निराशा सोसण्याची तयारी ठेव. पाळकपणापेक्षा जगात दुसरी श्रेष्ठ अशी पदवी नाही. या उपगुरूने इंद्रियदमन करावयाचे असते. त्यास संग्रहापेक्षा स्वतःची गांजणूक हेच मोठे धन आहे. ते मोलवान व गौरवी पद आहे. येशूच्या राज्याचा व गौरवाचा तू वतनदार आहेस. राज्यपददेखील यापुढे हलके असते. मंडळीने तुला भागीपणाचा उजवा हात दिलेला आहे. ख्रिस्ती विजेचे तारायंत्र जगभर पसरले आहे. त्यातून तू आपले सलाम पोहोचवीत जा. प्रभूने योहानाच्या शिरी हात ठेवून अभयवचन दिले. तो पवित्र आत्मा तुजवर यावा. त्याचा गौरव व पराक्रम सदासर्वकाळ राहावा.

८५१ (१८ : १५, १ आगस्त ५९, २३४-२३५)

गेल्या एप्रिल महिन्याच्या प्रारंभी वेनिस येथे टेंपल या शोधकाने एका धूमकेतूचा शोध लावला. जूनमध्ये तो सूर्यापासून १ कोटी २० लाख कोस अंतरावर होता. दर सेकंदास ३२ कोसांप्रमाणे तो सूर्यापासून दूर जातो. गोळ्याच्या २०० पट त्याचा वेग आहे. ३० जून रोजी तो ७॥ कोटी कोस अंतरावर होता.

८५२ (१८ : १५, १ आगस्त ५९, २३५-२३७)

'वाचणारा एक' लिहितो की : (विष्णुबावा) ब्रम्हचारी बावाची योग्यता काय आहे, हे लोकांच्या दिसण्यात आलेच आहे. बावांची मते हिंदु धर्माविरूद्ध तर आहेतच, पण त्यांच्या स्वतःच्याच मताविपरोत आहेत. वेदप्रतिपाद्य धर्माच्या पोथी पृ. ४२३ वर कोकशास्त्राचे विवेचन बावाने केले आहे. मूर्तीची पूजा व ध्यान हे वेदाच्या विरूद्ध नाही काय? गोंधळ्याची देवी, राम, शंकर, यांची स्तुती यांबरोबर व साक्षात्कारवर्णनही त्यात आले आहे. वेदोक्त धर्म म्हणजे मूर्तिपूजाधर्म नव्हे. बावाने इंद्रवरुणादिकांच्या प्रार्थनेबरोबर 'उदय उदय' व पुंडलीकवरदाही आणले. क्षमा, शांतिदंड, यांसारखे शब्द तरी बावांच्या अध्यात्मविचारात कसे काय येतात? धूमकेतू वगैरे पत्रांनी त्यांच्या विचारामधील मतविरोध स्पष्ट दाखविला होता. बावांना विषयाची पुरती माहिती नाही. त्याप्रमाणे ते चालतही नाहीत. काशीपासून रामेश्वरापर्यंत फिरले, तरी वेदाची अखंड व पूर्ण प्रत मिळत नाही. मग ती बावांना कुठून मिळाली? वेदाचा खरा अर्थ कळणेही कठीण. कारण ब्राम्हणात अर्थ करण्याची शक्तीच नाही. सध्याचा आचरणातला हिंदुधर्म वेदांपेक्षा अगदी निराळा आहे. खरे वेदाचरण हवे असेल, तर पूजा सोडा, पुराणांना हरताळ लावा, जातिभेद सोडा. वेदोक्त धर्माचे पालन खरेखुरे हवे असेल, तर एखादा अरबी, काठेवाडी घोडा आणा व यज्ञ करून त्याचे मांस शिष्यासह खा.

८५३ (१८ : १५, १ आगस्त ५९, २३७-२३९)

'एक शुभचिंतक' लिहितो की : विलायतेतील लोहार व सुतार नेहमी काही नवीन युक्त्या शोधतात. या देशातील कारागीर २ हजार वर्षांत बदलले नाहीत. अर्थात् ते निर्बुद्ध नाहीत. बुद्धीचा उपयोग मात्र करीत नाहीत. ते नवीन युक्ती शोधून काढतील, असा काहीतरी उपाय करावा. याकरिता श्रीमंत लोकांनी १०-२० हजारांचे भांडवल गोळा करून विश्वासू लोकांकडे सोपवावे. नवीन यंत्रे करणारास बक्षिसे द्यावीत. यंत्र करणारा देशी माणूस असला पाहिजे. यंत्राच्या दुरुस्तीची हमी त्याने घेतली पाहिजे. कमिटीने त्या यंत्राचे हक्क शोधकाकडून विकत घ्यावेत. संपादक लिहितात की, ही सूचना फार सुज्ञपणाची व उपयुक्त आहे. इंग्रज सरकारने पेटंट आक्ट चालू केला असून त्यानुसार यंत्र तयार करणारास उत्तेजन मिळू शकते. घोडनदीचा तुकाराम नावाचा एक लोहार फण्या करण्याचे यंत्र तयार करीत आहे आणि त्या यंत्राने दररोज लक्षावधी फण्या तयार होऊ शकतील.

८५४ (१८ : १५, १ आगस्त ५९, २३९-२४०)

अग्न्यास्त्राची सुधारणूक होत आहे. सहानळी पिस्तुलातून रैफल ही बंदूक तयार झाली. आता अमेरिकेत नवीन प्रकारची बंदूक तयार झाली असून तिचे एका मिनिटामध्ये ३० बार होतात. लढायात मनुष्यांचा फार मोठा संहार होणार आहे. या लढाया कधी न होतील तर किती बरे होईल !

८५५ (१८ : १५, १ आगस्त ५९, २३९-२४०)

एप्रिल महिन्यात बंगालमध्ये २९ लाखांचे, तर मुंबईत ३८ लाखांचे रुपयाचे नाणे पाडण्यात आले.

८५६ (१८ : १५, १ आगस्त ५९, २३९-२४०)

सार्डिनिया व फ्रान्स यांच्या संयुक्त सेनेने आस्ट्रियन सेनेचा पराभव करून बहुतेक सैनिक मारले.

८५७ (१८ : १५, १ आगस्त ५९, २३९–२४०)

साहेब व मडम यांना मारल्याबद्दल नानाच्या ५ सहकाऱ्यांना फाशी व पाचांना जन्मठेप झाली.

८५८ (१८ : १५, १ आगस्त ५९, २३९–२४०)

कराचीच्या तुरुंगातील १६८ कैदी शिपायांना तुरुंगातून सोडून द्यावे व त्यांना पुन्हा पलटणीत जाऊ द्यावे, असा हुकूम व्हाईसरायसाहेबांनी दिल्हा.

८५९ (१८ : १५, १ आगस्त ५९, २३९–२४०)

एझेरूम या गावी १५ सेकंद धरणीकंप झाला. त्या अवधीत १५०० मनुष्ये मरण पावली.

८६० (१८ : १५, १ आगस्त ५९, २३९–२४०)

गव्हर्नर लार्ड एल्फिन्स्तन २२ जुलै रोजी नगरला आले. पावसाळ्यात ते येथे राहातील.

८६१ (१८ : १५, १ आगस्त ५९, २४०)

एका नेटिव डाक्तराने प्रसिद्धपणे ख्रिस्ती धर्माचा अंगीकार केला. आग्रा येथे लष्करी छावणीत तो काम करतो. त्याला कुराणाचे उत्कृष्ट ज्ञान आहे. वादविवाद करण्यातही तो मोठा हुषार आहे. वादात प्रवीण होण्याकरिता त्याने पवित्र शास्त्राचा अभ्यास सुरू केला. पण त्याची शेखी नाहीशी होऊन त्याला ख्रिस्ती धर्माचीच तत्त्वे आवडू लागली. आता सर्व मौलवी भयाने व आश्चर्याने गडबडून गेले आहेत.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर



H-1—16

**८६२** (१८ : १६, १५ आगस्त ५९, २४३–२४८)

ओडिसा मिशन शुभवर्तमानाचा प्रसार चांगल्या तऱ्हेने करीत आहे. लोकांचा विरोध अगदी कमी झाला आहे. लोकांच्या शिव्यागाळीही कमी झाल्या. मिशनऱ्यांनी जास्त दिवस एकेका गावी राहावे, म्हणून त्यांना आग्रह होतो. तरुण लोकांचा देवतांवरचा विश्वास कमी होत आहे. गांजम, पुरुषोत्तमपुरा आणि धाराकोटा येथे लोक उत्सुकतेने पापक्षमेबद्दल माहिती विचारतात. राणीसाहेबाच्या जाहीरनाम्याचा अर्थ मात्र प्रत्येकजण सोयीने लावतो. सुरींगा व चिकिती गावांत मूर्तिपूजेवरून उपदेशकांनी लोकांशी वाद घालून यात्रेस जाणाऱ्या लोकांना यात्रेपासून परावृत्त केले. वृंदावनाच्या यात्रेस जाणाऱ्या ब्राम्हणाने शुभवर्तमान ऐकले, तेव्हा त्याची चर्या राजाज्ञेचा मरणदंड ऐकणाऱ्या माणसाप्रमाणे झाली होती. रानटी व पशुशील लोकांच्या वसतीत ख्रिस्ताचा प्रकाश वाढत आहे. पुराण ऐकणाऱ्या लोकांचा प्रथम ' पुन्हा उठवण्या'वर विश्वास बसत नव्हता. मूर्तिपूजेवर पोटे भरणारे लोक नव्या तत्त्वास विरोध करतात. वेदाचे इतर भाषांत भाषांतर झाले नाही, पण पवित्र शास्त्राचा अनुवाद अनेक भाषांत झाला, ही गोष्ट त्यांना नवलपूर्ण वाटते. राणीच्या जाहीरनाम्यामुळे ख्रिस्ती धर्माची पुस्तके वाटण्यास बंदी झाली, अशीही त्यांची समजूत आहे. मिशनरी वितंडवाद, कलह, अपशब्द, यांपासून नेहमीच दूर राहातात. लोक मिशनऱ्यांना आपले खरे वाटाडी समजतात. मनाची साक्ष सर्वांना पटते आहे.

**८६२ अ** (हंम : २४१–२४३)

**८६३** (१८ : १६, १५ आगस्त ५१, २४८–२४९)

नामदार गवर्नर लॉर्ड एल्फिस्तनसाहेबांनी अहमदनगर अमेरिकन मिशनच्या शाळेस भेट दिल्ही. त्यांच्याबरोबर अनेक गोरे लोकही होते. मिशनाच्या थोरल्या देवळात अनेक नेटिव ख्रिस्ती लोक आले होते. साहेबमजकुरांनी अनेक विषयांची परीक्षा घेतली. मुलांचा अभ्यास पाहून मोठा संतोष प्रगट केला. मिशनऱ्यांचे श्रम पाहून त्यांना फार समाधान वाटले. मराठी भाषेच्या द्वारे सर्व विषयांचे ज्ञान दिले जाते, हे पाहून ते फार खूष झाले. साहेब नेटिव ख्रिस्ती लोकांशी फारच ममतेने बोलले.

**८६३ अ** (इंम : २४८)

**८६४** (१८ : १६, १५ आगस्त ५१, २५०–२५२)

आनंदअय्याने रामचंद्रआयास लिहिले आहे की, माझे ख्रिस्ती मत कोणाच्या मथावण्यावरून धरलेले नाही. ईश्वराचा पवित्र आत्माच मनुष्यांची अंतःकरणे स्वतःकडे फिरवितो. मी चळलो नाही, तर शुद्धीवर आलो. जिवंत व प्रीत करणाऱ्या ईश्वराविरुद्ध केलेले पाप आता मला समजले. येशूने आपला प्राण बलिरूपे अर्पिला. दृष्टी पावलेल्या आंधळ्याप्रमाणे मला आता सत्य कळून आले. मी ईश्वरावर आणि धर्मबंधूंवरही प्रीत करतो. निरर्थक विधी व पूजा यांत मी कंटाळवाणे जीवन जगत होतो. त्या अज्ञानकाळात मी असंख्य पापे केली. तूदेखील हा बोध स्वीकारला पाहिजे आहे. दुःखाऐवजी आनंद व संशयाऐवजी खातरी मिळवावी. सार्वकालिक जीवनाचा प्रकाश मिळवावा. माझी मैत्री तू सोडून दिलीस आणि तू दुष्कर्मांचा साथीदार झालास. आठच दिवसांनी मी ईश्वराच्या मंडळीस मिळणार आहे. जगाला आणि पापाला मी मेलेला होईन. मला शांतीचा मार्ग दिसेल.

**८६४ अ** (इंम : २४९–२५०)

८६५ (१८ : १६, १५ आगस्त ५९, २५२–२५४)

'उत्तराची वाट पहाणारा' पत्रात म्हणतो की : पंचगव्याने पापाचे मोचन होत नसते, उंची कस्तुरीने अथवा बावनकशी सोने उगाळून प्याले, तरी पाप जाणार नाही. पंचगव्य याचा अर्थ गाईचे पाच उपज असा होतो. दही व तूप हे काही तिचे उपज नाहीत. शेण, मूत्र व दूध मात्र उपजच आहेत. म्हणून विष्ठा व मूत्र यांऐवजी साय व लोणी यांची योजना करावी. वेदकाळात जर गोमेधयज्ञ होई, तर मग गोमांस व गोरक्त यांना पंचगव्यात स्थान का मिळू नये ? हल्लीचेही शक्ति–उपासक मांस वपा आणि अंडी खातात. म्हणूनच यांचा धर्म थट्टा करण्याजोगा झाला आहे. त्यांच्या सर्व समजुती उलट्या व हेंगाड्या आहेत. असल्या पोकळ धर्मविषयी त्यांना जर लाज वाटली, तर त्यात आश्चर्य काहीच नाही. कोरीव मूर्तींची सेवा करणारे लज्जित होतातच.

८६६ (१८ : १६, १५ आगस्त ५९, २५४–२५६)

कराचीच्या टपालातील पत्रे विहिरीत टाकल्याबद्दल पोस्टमनला ४ वर्षांची ठेप दिल्ही.

८६७ (१८ : १६, १५ आगस्त ५९, २५४–२५६)

फरूकाबादच्या नबाबास आदेन येथे पोहोचल्यावर मोकळे सोडण्यात येईल. मात्र तो पुन्हा हिंदुस्थानात आला, तर त्यास फाशीची शिक्षा होईल.

८६८ (१८ : १६, १५ आगस्त ५९, २५४–२५६)

अयोध्येचा राजा व त्याचे काही सेवक, यांची निर्दोष सुटका झाली.

८६९ (१८ : १६, १५ आगस्त ५९, २५४–२५६)

इंग्लंडचे प्रधान लार्ड स्तानली यांच्याऐवजी सर चार्लस वुड यांच्याकडे हिंदुस्थानचा कारभार दिला आहे.

८७० (१८ : १६, १५ आगस्त ५९, २५४–२५६)

सतीबंदीचा कायदा झाला यास २७ वर्षे झाली, तरी काही संस्थानात सतीचे प्रकार घडत आहेत. राणीने हा कायदा रद्द केला, अशी गैरसमजूतही दिसते. पण इंग्रेज सरकार अशा अघोरी चाली कधीही चालू देणार नाही.

८७१ (१८ : १६, १५ आगस्त ५९, २५४–२५६)

तिनिवेलीच्या दंगेखोरांना दिलेली शिक्षा राणीच्या जाहीरनाम्याच्या दिवसापासून माफ झाली. मात्र मामलेदार व मुनसफ यांना पुन्हा नोकऱ्या मिळणार नाहीत.

८७२ (१८ : १६, १५ आगस्त ५९, २५४–२५६)

लंकेमधील गाल बंदरात जागारारो जमातीचे लोक केसात शोभेसाठी फण्या घालतात, म्हणून वेलारी व धीवर लोक दंगल करीत आहेत. हा त्रावणकोरातील शानारावरील जुलमासारखाच प्रकार दिसतो.

८७३ (१८ : १६, १५ आगस्त ५९, २५४–२५६)

ख्रिस्ती शास्त्राचे जगातील १९० भाषांत भाषांतर झाले. ८० कोटी लोक हे शास्त्र वाचतात.

८७४ (१८ : १६, १५ आगस्त ५९, २५४–२५६)

ग्रेट ब्रिटनच्या सरकारास ७ अब्ज ७५ कोटीचे कर्ज आहे.

८७५ (१८ : १६, १५ आगस्त ५९, २५४–२५६)

लंकेमध्ये दहा दिवसांत १ लाख ७६ हजार ७६० रुपयांचे मोती काढण्यात आले.

८७६ (१८ : १६, १५ आगस्त ५९, २५४–२५६)

सन १८५८ मध्ये ७८,५८९ युरोपियन अमेरिकेत राहण्यास गेले.

८७७ (१८ : १६, १५ आगस्त ५९, २५४–२५६)

आस्त्रियन युद्धात ४० हजार लोक मेले, तर १० हजार कैदी झाले. फ्रान्सच्या बादशहाने आपला दिमाख दाखविण्याकरिता हकनाक फ्रेंच लोकांना युद्धाच्या भरीस घातले व नुकसान करून घेतले. आता तो आस्त्रियाशी तह करील.

८७८ (१८ : १६, १५ आगस्त ५९, २५४–२५६)

बंडखोर सर्फिराझखान याने एकाच गावच्या लुटीत ५० हजार रुपये मिळविले. लेफ्टनंट रूमने त्याचा संपूर्ण पराभव केला. शेवटी सर्फिराझखान याने विष पिऊन आत्महत्या केली. (धूमकेतूवरून)

८७९ (१८ : १६, १५ आगस्त ५९, २५४–२५६)

काही बंडखोर सरदार ग्वाल्हेरच्या मुल्की अंमलदारांना लाच देऊन त्यांचा आश्रय घेत आहेत. (धूमकेतूवरून)

८८० (१८ : १६, १५ आगस्त ५९, २५४–२५६)

रा. विरेश्वर सदाशिव छत्रे शिळाछापावरचे 'ज्ञानबोधक' साप्ताहिक सुरू करणार आहेत. त्याची किंमत सालीना साडेचार रुपये राहील. (धूमकेतूवरून)

८८१ (१८ : १६, १५ आगस्त ५९, २५४–२५६)

रा. काशिनाथ गंगाधर क्षत्री यांनी किंतानावर रंगीत कशीदा काढण्याच्या कलेवर एक सुंदर ग्रंथ केला आहे. मराठी भाषेत हा पहिलाच ग्रंथ आहे (धूमकेतूवरून)

८८२ (१८ : १६, १५ आगस्त ५९, २५४–२५६)

केप आफ गुड होपच्या बंदरात एका साहेबाने ४० मासे धरले, त्यांतल्या एका माशाच्या अंगातून १२॥ खंडी तेल निघाले. हे तेल दिवा जाळण्यासही उपयोगी पडते.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १८, अंक १७, मुंबई, १ सप्टेंबर १८५९

८८३ (१८ : १७, १ सप्टेंबर ५९, २५८–२५९)

'न्यूस आफ धी चर्चेस' या व्रतपत्रात वाचकांच्या पत्रव्यवहारात असे म्हटले की : रमजानच्या महिन्यात दंग्यांची संख्या वाढते. म्हणून ख्रिस्ती लोक त्यांजपासून नेहमी दूर राहातात. तुर्की लोक धर्मासंबंधी विचार करू लागले आहेत. कोणाच्या बोलण्याचा रागलोभ न मानता ते मनमोकळी चर्चा करतात. आद्रिया नोपलचा एक तरुण सैनिक ख्रिस्ती झाला, म्हणून त्यास कैद करण्यात आले. काही वर्षांपूर्वी अशा गुन्ह्याबद्दल फाशी झाली असती. या सैनिकास एक पत्र देऊन अधिकाऱ्याकडे पाठविण्यात आले. आता तो अधिकाऱ्यासह शुभवर्तमान वाचीत बसतो. तुर्कस्थानचा सुलतान धर्म बदलण्यावरून कोणासही शिक्षा करीत नाही. सलीम आगा याने प्रसिद्धपणे ख्रिस्ती धर्मास अनुकूल असे विचार प्रगट केले, तरी त्यास काही शिक्षा झाली नाही. तुर्की राज्यातील ४० हजार नागरिकांनी अर्ज केल्यावरून सुलतानाने त्यांना ख्रिस्ती धर्माचे विचार वाचण्याची परवानगी दिली आहे. हा हुकूम म्हणजे नेटिवांचा धर्म ठार मारण्याचा परवानाच होय.

८८३ अ (इंग : २५७–५८)

**८८४** (१८ : १७, १ सप्टेंबर ५९, २६०–२६१)

कंपनीच्या चलनी शिक्क्यावर आरबी अक्षरांनी किंमत लिहिलेली असते. तसेच या आरबी अक्षरामुळे काही लोकांची अशी गैरसमजूत झालेली आहे की, सरकार महमंदी धर्मास अनुकूल आहे. त्याऐवजी देवनागरी लिपीमध्ये जर किंमत कोरली असती, तर बरे झाले असते. कारण ब्रह्मपुत्रा नदीपासून सिंधू नदीपर्यंत देवनागरी सर्वांना वाचता येते. दक्षिणेतही देवनागरी जाणणारांचे प्रमाण मोठे आहे. म्हणून इंग्रजी, संस्कृत आणि आरबी लिपीत मजूकर कोरावा. पार्लमेंटने असा ठराव केला आहे की, मलिका-मा-आझमा राणीच्या नावाचे नाणे हिंदुस्थानात सुरू करावे. आम्ही असे सुचवितो की, इंग्रजी, आरबी व देवनागरी अक्षरे नाण्यावर असावीत अथवा फक्त इंग्रजी असावीत.

**८८४ अ** (इंम : २५९–६०)

**८८५** (१८ : १७, १ सप्टेंबर ५९, २६१–२६३)

रामचंद्रअय्या पत्रात लिहितो की, तुमच्या धर्मपालटाच्या विचाराने अति खेद होऊन मी वेडावून गेलो. सर्व रात्र डोळ्यासी डोळा लागेना. आपण कुटुंबावर अपकीर्ती आणीत आहात. आमचे आनंदअय्या असे काही करतील असे वाटले नव्हते. सगळे कुटुंब निराशेत बुडून जगासमोर आपला बदलौकिक होईल. माझी तर अक्कल गुंग होऊन हातपाय गळून गेले. बाऱ्यांच्या टोळीने तुमच्या मुसक्या बांधून तुमचा गळा कापला, असे स्वप्नसुद्धा मला पडले. दूर देशावरून आलेला मिशनरी आपला बेत सिद्धीस नेल्याखेरीज राहणार नाही. तुम्ही मात्र मरणापर्यंत परके राहाल. भिकाऱ्याचे जिणे जगाल. जन्मेंकरून तुम्ही ब्राह्मण. धेडामध्ये कसे दिवस कंठाल? अनाडी मूर्खांप्रमाणे परक्यांच्या बोलण्यावर विश्वास ठेवून लोक भुलतात. तुम्ही शहाणेसुर्ते विद्वान मूर्खांच्या मंडळीत कसे राहणार? आता विनंती एवढीच की, विचार करण्यासाठी थोडा अवकाश करा. एकदा तरी इकडे येऊन मजसंगती तोंडातोंड बोला. मग तुम्हांस योग्य वाटेल ते करा.

८८५ अ (इंम : २६१)

८८६ (१८ : १७, १ सप्टेंबर ५९, २६३-२६५)

'वाचणारा एक' पत्रात म्हणतो की : अडीच वर्षांमागे 'बाबाचा कावा' नावाचे पुस्तक प्रसिद्ध झाले होते. त्यात म्हटले होते की, हिंदू धर्म म्हणजे परस्परविरोधी मतांचा कुलपी गोळाच आहे. सध्या वेदाचा धर्म हिंदूमध्ये चालत नाही. त्यांचा आचारधर्म म्हणून मृत मनुष्याच्या तरंगत आलेल्या वस्त्राप्रमाणे आहे. वेदाचे आदेश निर्जीव ठरले आहेत. ब्राम्हणलोक रेशमाच्या वस्त्रामध्ये गुंडाळून तो ममीप्रमाणे सुरक्षित ठेवतात. ऋग्वेदाच्या सूक्तांचा अर्थ पाहिल्यावर ध्यानात येते की, पूर्वीचा धर्म आता राहिला नाही. एकही मानव वेदातील ब्रम्हज्ञानाप्रमाणे चाललाही नाही अगर चालणार नाही. वेदाप्रमाणे चालण्यास असमर्थ व विमुख होऊन ते मोक्षप्राप्तीस मुकतात. व्यासादिकांचेदेखील देहगुण सुटले नाहीत. ते मायेच्या बंधनातच होते. मूर्तिपूजा जर चालूच राहणार आहे, तर ब्रह्मचारी बाबाच्या ग्रंथाची काय गरज आहे ? असे असून बाबा ज्या वल्गना करतात, त्याचे आश्चर्य वाटते.

८८७ (१८ : १७, १ सप्टेंबर ५९, २६५–२६६)

'एक वाचणारा' ने ऋग्वेदसूक्तांचा गोषवारा पुढीलप्रमाणे दिला आहे : देवापासून उत्पन्न झालेला चपळ घोडा देवांच्या तर्पणासाठी दिल्हा जातो. त्याच्या पुढे सजवलेला बकराही चालत असतो. हे यज्ञाच्या अन्नाकरिता ग्रहणीय बळी समजावेत. या घोड्यास बकऱ्यासह यज्ञकुंडाला तीन प्रदक्षिणा घालावयाला लावतात. घोड्याचे मांस व चरबी यांतून देवांचे अन्न तयार होवो. मंत्र म्हणणारे ब्राह्मण आपल्या अपेक्षा पूर्ण झाल्यामुळे संतुष्ट होवोत. अन्नभिलाषी देवदेवतांना हे अन्न तुष्टि होईपर्यंत मिळो. मांस शिजविण्याची भांडी व अवजारेही घोड्यास मान देतात. यज्ञाकरिता निवडलेला घोडा देवांना स्वीकार्य ठरो. वषट् या शब्दाने तो उल्लेखिला आहे. अतिशय कुशलतेने हा घोडा कापला जात असे.

(ता. १ आगष्टाच्या ज्ञानोदयांत छापलेल्या सूक्ताचे भाषांतर)

८८८ (१८ : १७, १ सप्टेंबर ५९, २६७–२६८)

'बीभत्स कामाचा द्वेषक' लिहितो की : कलावंतणीचा नाच किंवा पोऱ्यांचा तमाशा हे फार वाईट आहेत. इसकीची गाणी गाऊन व नाचून अविरभाव करण्याने मनात कामविकार येतो. यातून गरती (स्त्रिया) देखील कसबपणा करू लागल्या. पुरुष कलावंतिणीसी लंपट होत आहेत. बायकोचा वेष दिलेला पोऱ्या गैरसिस्त वर्तणूक करतो. गुप्तातली कामे सोंगाने प्रसिद्ध करतो. असे करणे म्हणजे पाप विकत घेणे व पैक्याचे नुकसान करणे होय. शेजाऱ्यांना जागरण मात्र घडते. रात्री ९ पासून १११॥ पर्यंत लोक तमाशाच्या लावण्या ऐकतात. नेटिव सुज्ञ लोकांनी व मिशनऱ्यांनी सुबोध केला तो वाया गेला. १८५६ मध्ये सरकारने बीभत्स लावण्यांना प्रतिबंध करणारा कायदा केला. पण लोक रस्त्यावरती किंवा जत्रेत तमाशे करतात. त्यांस कायद्याचे भय वाटत नाही. काही मुलखी व युरोपियन अंमलदार हे सर्व शांतपणे ऐकतात. कायदा बिचारा दप्तरी आश्रय घेऊन लपून बसला आहे. कायदा झाला, तरी नसल्यासारखाच आहे. म्हणून अंमलदारांनी कठोरपणे कायद्याची अमलबजावणी करावी.

८८९ (१८ : १७, १ सप्टेंबर ५९, २६८–२६९)

'एक पंतोजी' लिहितो की : राहुरीस नागपंचमीच्या दिवशी मरीदेवीस नैवेद्य देऊन मग सापाची सोई करतात. एका निकटीच्या भक्ताच्या अंगात कडाख्याची देवी येते. भावड्या लोकांना सांगते की, माझे देऊळ बांधा. ख्रिश्चन उपदेशकाने प्रश्न विचारला तर म्हणते की, 'मी अशा पाद्र्याशी बोलत नसते.' कॉलरा झाल्यावर देवीच्या पूजेपेक्षा जितक्या लवकर रोग्यास औषध मिळेल, तेवढे चांगले असते. देवीवर भाव ठेवणाऱ्या दहा लोकांमधून नऊ लोक तडफडून मरतात. एकूण तेवीस हजार लोक पटकीने मेले. लोकांना सावध करण्याची गरज आहे.

८९० (१८ : १७, १ सप्टेंबर ५९, २६९–२७०)

'ख्रिस्ती सेवक' पत्रात म्हणतो की : चहूकडे जरीमरीचा रोग पसरला असून हजारो माणसे मरत आहेत. पण हिंदू लोक औषध घेत नाहीत. कारण त्यांना वाटते की, औषधाने मरीदेवता जास्त चेतळेल. देवीची बोळवण करण्यासाठी गावाबाहेर जाऊन हिरवे पातळ व नारळे वाहून नमस्कार करतात. खोकरगावी एका मिशनेऱ्याने औषध देऊन अनेकांना बरे केले. ख्रिस्ती माणसाला हा रोग झाला, तर तो शांतपणाने औषधोपचार करतो. ईश्वराची इच्छा असेल, तर मरावयासही तयार असतो. मरणे म्हणजे लाभ व जगणे म्हणजे ख्रिस्त, असे तो समजतो. आपला हवाला तो खऱ्या देवावर टाकतो. नेटिवांप्रमाणे तो अंधःकारात वावरत नाही. जे ख्रिस्तास शरण येतील, त्यांना हा लाभ होईल.

८९१ (१८ : १७, १ सप्टेंबर ५९, २७०–२७१)

'एक ख्रिस्ती' पत्रात लिहितो की : महामारीचा भयंकर वाखा चाललेला आहे. मूर्तिपूजक लाकडी मूर्तीस पातळ-चोळी नेसवून तिला कोंबड्याचा बळी देतात. पाद्री लोक औषधे देतात, म्हणून मरीआई रागावून जास्त लोक मारते, असे ते बोलतात. मरीआईच्या गाडीमधून दोन मेंढरे व सवा मण तांदूळ आणून ते अज्ञानी लोक कोल्हारच्या यात्रेत देवीच्या नावाने अर्पण करतात. ख्रिस्ती माणसाला असे वाटते की, हे सर्वजण पापिष्ट व भ्रष्ट आहेत. देवाने रोगरूपी शिपाई पाठवला, तर शांत मनाने त्याच्याकडे जावे. नबूखदनेझारनार राजाने सोन्याची मूर्ती करून प्रजाजनांना तिच्या पाया पडावयास लावले. तिथा ख्रिस्ती भक्तांनी नमस्कार केला नाही, म्हणून त्यांना आगीच्या भटीमध्ये टाकले. पण या खऱ्या भक्तांना अग्नीने स्पर्शदेखील केला नाही. जिवंत जो देव असतो, तो अशा रीतीने मिथ्या कल्पनांचा मोड करतो.

८९२ (१८ : १७, १ सप्टेंबर ५९, २७१–२७२)

युरोपात फ्रान्स व आस्त्रिया यांचा तात्पुरता सल्ला झाला. फ्रेंच लोक बादशहावर चिडलेले आहेत. इटलीतील संस्थाने फ्रान्सच्या राजास मिळाली, तर पुन्हा केव्हाही युद्ध सुरू होईल. या युद्धाची प्रकटपणे चौकशी व्हावी, अशीही मागणी होत आहे.

८९३ (१८ : १७, १ सप्टेंबर ५९, २७१–२७२)

रे. स्मिथ यांनी दिल्लीस पांच मनुष्यांना बाप्तिस्मा दिल्हा.

८९४ (१८ : १७, १ सप्टेंबर ५९, २७१–२७२)

वायव्य इलाख्यात एक चांभार स्त्री नवऱ्याच्या चितेवर सती गेली. बाण्याने तूप देऊन मदत केली. कारण तो सतीच्या शापास भ्याला. सती सिद्धीस गेली. परंतु सरकारने चौकशी करून नातलग चांभार, अग्रगण्य गावकरी, चौकीदार, यांना तीन वर्षांपासून १० वर्षेपर्यंत तुरुंगवासाची शिक्षा दिल्ही आहे. ठाणेदारास बडतर्फ केले.

८९५ (१८ : १७, १ सप्टेंबर ५९, २७१–२७२)

महाराणी विक्टोऱ्या यांची भेट फ्रान्सचा बादशहा घेणार आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

८९६ (१८ : १८, १५ सप्टेंबर ५९, २७४--२७६)

'फुलमुनी आणि करुणा यांचा वृत्तांत' हे पुस्तक दिसण्यात सुंदर आहे, विषयही चांगला आहे. छापण्याच्या विशेष चुका नाहीत. भाषा सुलभ आणि सुरळीत आहे. बंगाली लोक व मराठे यांच्या पोषाकांत, रीतीभातीत, खाण्यापिण्यात जेवढा फरक आहे, तेवढाच फरक यांत जाणवेल. परभाषेची तऱ्हाही विशेष नाही. रे. लाकोई याची कन्या मलंज मडम हिने प्रथम हा ग्रंथ इंग्रजीत रचिला. मुंबईतील मडमांनी त्याचे मराठी भाषांतर केले. हा ग्रंथ विशेषेकरून विवाहित व लेकुरवाळ्या स्त्रियांना उपयुक्त ठरेल. एका माजिस्त्रेताच्या मडमेला ख्रिस्ती लोकांकडे जाण्याची इच्छा झाली. तिने तेथे ज्या गोष्टी पाहिल्या, त्यांचे वर्णन ग्रंथात येते. शूचिर्भूतपणा, व्यवस्था, फुलांची आवड, ईश्वराच्या कृत्यांचे वर्णन, मानवाचे मानसिक सद्‌गुण, बालकांचे शिक्षण, शेजाऱ्याशी कसे वर्तावे, याबद्दल माहिती मिळते. शाब्बाथाचे महत्त्व, दारू व कैफ यांचा निषेध, यात आल्यामुळे आम्हांस आनंद वाटला. परंतु उपदेशास 'झाड पाला' असे नाव दिल्यामुळे मात्र खेद वाटला. सद्‌गुणी माणसाचे सुख, दुर्गुणी व्यक्तीचा अकालमृत्यु, दुःखी करुणाबाईचे देवाकडे फिरणे, असे अनेक विषय मोठ्या चतुराईने आणले आहेत. पात्रांची आचरणरूपी जिवंत उदाहरणे दिली आहेत. हा ग्रंथ म्हणजे मराठी भाषेस अमोल्य लाभ होय. शाब्बाथ शाळांच्या पुस्तकसंग्रहात हा ग्रंथ नेहमी ठेविला पाहिजे. असे ग्रंथ आणखी शंभरपट व्हावेत.

८९६ अ (दंम : २७३–२७४)

८९७ (१८ : १८, १५ सप्टेंबर ५९, २७७–२८१)

आनंदाया आपला शालक रामचंद्र याला लिहितो की : मी ख्रिस्ताला प्रसिद्धपणे स्वीकारल्यामुळे माझे अंतःकरण आनंदभरित झाले. वडलांच्या घरी परत येणाऱ्या उधळ्या राजपुत्राप्रमाणे मी देवाकडे फिरलो. आत्म्याच्या समाधानाकडून माझे मन शांत झाले. मला देवाचा पुत्र होण्याचा अधिकार मिळाला. माझे आईबाप व तुझी बहीण (माझी पत्नी) यांना हा मजकूर युक्तीच्या वाटेने निवेदन कर. हर्षमय स्वप्नातून जागा होऊन मी आश्चर्य व आनंद यांजकडून भरून गेलो आहे. मिशनरीसाहेब खऱ्या देवाबद्दल प्रेमाने बोलतात. ते त्यांची अवगणना करणे अशक्य आहे. शुभवर्तमानावरच्या विश्वासाने पाप्याच्या मनात खरी शांती निर्माण होते. आपल्या पापाची खातरी झाली की, लगेच देवास शरण गेले पाहिजे. पापाच्या जाणिवेने मी तीन वर्षे अशांत मनःस्थितीत घालविली. शेवटी पवित्र आत्म्याच्या प्रेरणेखाली आलो. माझ्या मनात चाललेले युद्ध मिशनरी गुरूस समजले होते. ईश्वराची कृपा आकाशाएवढी उंच आणि सागराएवढी खोल आहे. येशूचे रक्तच आम्हांला सर्व पापापासून पवित्र असे बनविते. ईश्वरास आनंदाने स्तविण्यात मी दिवस घालवितो. येशूची स्तुती सदासर्वकाळ केल्यामुळे मला फारच समाधान वाटते आहे. जगाच्या मार्गातून खऱ्या सुखाच्या मार्गात मी आलो आहे. माझ्या पत्नीसही माझ्या मनःपालटाच्या खात्रीने आनंदच वाटेल.

८९७ अ (इंम : २७६–२७७)

८९८ (१८ : १८, १५ सप्टेंबर ५९, २८१–२८३)

कलकत्ता कोर्टात बाबा सीताराम तिवारी या साधूची मिळकत आपणास मिळावी म्हणून त्याचा शिष्य न्हीतू सिंग याने अर्जी केली होती. मयत सीताराम भिक्षा मागे. शिवाय लाकडाचा उदीमही करीत असे. त्याची मिळकतही अफाट आहे. धर्मशास्त्रात असे सांगितले आहे की, संन्याशाने कसलाही संग्रह करू नये. त्यामुळे वारसाच्या भांडणात काहीही जीव नाही. शिवाय न्हीतू हा काही सत्‌शिष्य नाही. त्याचे आचरण शुद्ध नाही. काही प्राप्ती होत असे, म्हणून तो बाबाचा उदीम सांभाळी. राजा कोमल किसनकडे तो चाकरी करतो. त्याने ठेवलेल्या राखेपासून त्याला दोन मुले झाली. सिंग म्हणतो की, बेवीस वर्षांपूर्वीच मी रखेलीस सोडून दिल्हे. एकंदरीत हिंदू साधू भूलथापा देणारे असतात. शिवाय लबाड बोलून कुतकर्मे जिरवितात. व्यभिचार करून स्वतःला ब्रह्मचारी म्हणवितात. वा रे वा साधू !

८९९ (१८ : १८, १५ सप्टेंबर ५९, २८३–२८४)

एक मडम रोगी पडली. ती ज्या वैद्याचे औषध घेत असे, तो पाखंडी व नास्तिक होता. तो म्हणे की, 'प्रायश्चित्ताची गरजच नाही. पापाबद्दल आपणांस पश्चात्ताप झाला, तरी पुरे आहे !' तेव्हा मडम त्यास औपरोधिकपणाने म्हणाली की : 'मग तुमची फी देण्याचीही मला गरज नाही. कारण तुम्हांला त्रास दिल्याबद्दल मला दुःख वाटते. तेच पुरेसे नाही काय ?' तेव्हा आपल्या विचारामधील उणिवांची वैद्यास जाणीव झाली. माणसाचे पापऋण पर्वतासारखे वाढत असते. पश्चात्ताप केल्यावर प्रायश्चित्ताची फार गरज आहे. येशू जो पाप्याचा जामीन व मनुष्यांचा तारणारा, त्याला शरण जावे.

१०० (१८ : १८, १५ सप्टेंबर ५९, २८४–२८५)

देवाने आम्हांला ख्रिस्ताच्या संगतीचे वतनदार बनविले आहे. आपली पापे जरी अनंत असली आणि अनेक बाबतींत आम्ही उणे असलो, तरी देवाच्या मार्गात चालून शुद्ध रीतीने त्याची सेवा करावी. आमच्या खेदित भावांनी पापाकडे पाहून वेळभर रडत बसू नये. येशूचे पुण्य मनात आणून पवित्र आचरण ठेवावे. येशूच्या नावाने प्रार्थना करावी. सैतान तुमच्या या मार्गात अडथळे निर्माण करील. ईश्वरी क्रोधाची प्रचीती आपण घेतो, त्याप्रमाणे कृपेचीही खात्री करून घ्यावी. येशूला ज्या अमोल्य गोष्टी मिळाल्या, त्या मिळण्यास आपणांपैकी प्रत्येकजण योग्य आहे. आकाशात आणि पृथ्वीवर आम्हांला त्याने अधिकार दिल्हा. आमच्या योग्यतेने आम्ही तो मिळवू. तुमचा अविश्वास आणि अयोग्यपणा प्रभूच्या पायांजवळ कबूल करा. त्याचे पुण्य व दया बोलत जा. त्याने विलंब केला, तरी त्याची वाट पाहा. तो येईलच, उशीर करणार नाही.

१०१ (१८ : १८, १५ सप्टेंबर ५९, २८५)

मेजर गालसाहेबास मारणाऱ्या मीर हादीस फाशी देण्यात आले, पण हुरमतखान नावाचा कुप्रसिद्ध मुखिया अजून सापडला नाही.

१०२ (१८ : १८, १५ सप्टेंबर ५९, २८५)

हत्यारे व बंदुकीची दारू लपवून ठेवल्याबद्दल राजा हिंदपाल सिंघ या तालुखदाराची अर्धी जहागिरी जप्त करून इंग्रज सैन्याने त्याचा किल्ला पाडून टाकला.

१०३ (१८ : १८, १५ सप्टेंबर ५९, २८५)

अयोध्या प्रांतात १०४७ किल्ले जमीनदोस्त करण्यात आले. एकूण ६६८१ शिपाई शरण आले.

**१०४** (१८ : १८, १५ सप्टेंबर ५९, २८५)

लेफ्टनंट वाटसन्ने ४०० बंडखोरांवर छापा घालून चाळीस जणांना जागेवरच ठार मारले.

**१०५** (१८ : १८, १५ सप्टेंबर ५९, २८५)

काठेवाडातील उकामुदल गावी बंडखोरांनी गडबड केली. द्वारकेचा किल्लासुद्धा जिंकला. मामलेदार जीव घेऊन पळाला. या दंग्यात ३० बंडखोर पडले.

**१०६** (१८ : १८, १५ सप्टेंबर ५९, २८५)

पंजाबात बंडप्रकरणी पत्रे सापडल्यावरून अटक झालेल्या कैद्यांत काही फकीरही आहेत.

**१०७** (१८ : १८, १५ सप्टेंबर ५९, २८५)

फरकाबादच्या नबाबास काळ्या पाण्यावर पाठविण्यात आले.

**१०८** (१८ : १८, १५ सप्टेंबर ५९, २८५)

बंगाल हरकारूवरून समजते की, नेपाळच्या हवेमुळे नानाचा भाऊ बाळाराव, हरदत्त सिंघ नावाचा तालुकदार व नजीबाबादचा नबाब मृत्यु पावले. नानाही तापाने हैराण झाला आहे. बाळाराम मेला, ही बातमी मात्र खोटी असावी, असे बोलले जाते.

**१०९** (१८ : १८, १५ सप्टेंबर ५९, २८५)

येशू ख्रिस्त हाच शेवटचा पैगंबर असताना काही मुस्लिमांनी अशी बातमी उठविली आहे की, इमाम मेंदी किंवा काना धज्जाल हा पैगंबर जन्मास आला असून या देशामध्ये मोठी राज्यक्रांती होणार आहे. काही मौलवी लोकांची मने अस्थिर करून हेतुपुरस्सर दंग्यास प्रोत्साहन देतात. एका मौलवीस नुकतीच तीन महिन्यांची ठेप झाली.

९१० (१८ : १८, १५ सप्टेंबर ५९, २८६)

डाक्तर विल्सनसाहेबांनी 'हिंदुस्थान देशाची तीन हजार वर्षांपूर्वीची स्थिति' या नावाचा एक ग्रंथ केला आहे. या देशाचे क्षेत्रफळ ३,७५,००० चौरस मैल आहे. असे साहेब म्हणतात. लोकसंख्या २० कोटी आहे. सन १८५५ मध्ये १४ कोटी ४७ लाखांची निर्यात झाली, तर २० कोटी १९ लाखांची आयात झाली. सहा कोटींची किफायत झाली.

९११ (१८ : १८, १५ सप्टेंबर ५९, २८७–२८८)

ब्रिटिश पार्लमेंटने राणी व्हिक्टोरिया यांना खर्चासाठी ३८ लाख ५० हजारांची नेमणूक दिल्ही.

९१२ (१८ : १८, १५ सप्टेंबर ५९, २८७–२८८)

महू जवळील मंडलेश्वरच्या छावणीत शिपायांनी दंगल करून मेजर कीटिंग यांना ठार मारले. होळकरांचे सैनिक दंगा मोडण्यासाठी आले होते. त्यांची चार माणसें पडली.

९१३ (१८ : १८, १५ सप्टेंबर ५९, २८७–२८८)

लार्ड एल्फिन्स्टन पुण्यास बदलून गेले. ते पुढल्या साली विलायतेस जाणार, अशी वदंता आहे.

९१४ (१८ : १८, १५ सप्टेंबर ५९, २८७–२८८)

नानाचा गुलहेर रंगराव याची फाशी रद्द झाली. त्याऐवजी त्यास हद्दपार केले जाईल. (धूमकेतूवरून)

९१५ (१८ : १८, १५ सप्टेंबर ५९, २८७–२८८)

इंग्रज सरकारने पुणे व सातारा परत दिलीं, तर आपण लढाई करणार नाही, असा निरोप नानाने आग्र्याच्या गवरनरास पाठविला, अशी बातमी आहे. पण ती बहुधा खोटी असावी.

९१६ (१८ : १८, १५ सप्टेंबर ५९, २८७–२८८)

पुणे ते नागपूरच्या डाकेच्या कंत्राटदाराने बंडाच्या काळात चांगली चाकरी बजावल्याबद्दल सरकारने त्यास दहा हजार रुपये इनाम दिल्हे.

९१७ (१८ : १८, १५ सप्टेंबर ५९, २८७–२८८)

दिल्लीचा बादशहा बहादूरशाह याचे मानमरातब, किताब आणि हक्क रद्द करण्यात आले आहेत. (धूमकेतूवरून)

९१८ (१८ : १८, १५ सप्टेंबर ५९, २८७–२८८)

ब्राह्मण्याप्रमाणे आता पुण्यात 'न्हावण्य' झाले आहे. या रोमशत्रूंनी असे ठरविले आहे की, न्हावी जमात ब्राह्मणांची हजामत करणार नाही. ब्राह्मणलोक दुसऱ्या जातीवाल्यांच्या घरी जेवण्यास जातात, एवढेच काय, पण ते कसबिणींच्या व कलावंतिणींच्या घरीसुद्धा जेवण्यास जातात, पण न्हाव्याच्या घरी जेवण्यास जात नाहीत. म्हणून न्हाव्यांनी हरताळ पाडिली आहे. त्यांनी फिर्यादही केली आहे. आम्हांस वाटते, न्हावी लोकांचे म्हणणे बरोबर आहे.

९१९ (१८ : १८, १५ सप्टेंबर ५९, २८८)

कुलाब्याच्या पूर्वेकडे समुद्रात पक्की भिंत बांधून १४ एकर जमीन नवीन करणार आहेत. या जमिनीच्या साहाय्याने कोट्यवधी रुपयांचा व्यापार चालेल.

९२० (१८ : १८, १५ सप्टेंबर ५९, २८८)

एका बंगाली संस्थानिकाने स्वतः हिंदू असूनही खिस्ती धर्मपुस्तकाचा अभ्यास करण्याकरिता व शाळा काढण्याकरिता मिशनाच्या खात्यास अर्ज केला आहे. याचा खर्च तो स्वतः देणार आहे. (धूमकेतूवरून)

**९२१** (१८ : १८, १५ सप्टेंबर ५९, २८८)

लाहोरकडे एका संभावित बाबूने बाप्तिस्मा घेतला.

**९२२** (१८ : १८, १५ सप्टेंबर ५९, २८८)

बंगाल सरकारने एक जाहीरनामा काढून जमीनविक्रीचा इरादा प्रगट केला. नियम व करार मागाहून जाहीर होतील.

**९२३** (१८ : १८, १५ सप्टेंबर ५९, २८८)

इंग्लंड व चीन यांचे मोठे युद्ध होणार असून चीनकडे ५ हजार सैनिक रवाना होतील. या देशातून ८ हजार गोरे व २० हजार सीख जाणार आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**९२४** (१८ : १९, १ आक्तोबर ५९, २९०–२९२)

गेल्या १८ महिन्यात अमेरिकेतील ५ लाख लोकांनी येशू ख्रिस्ताचा धर्म अंगीकारला. कित्येक गावातील बहुतेक प्रौढ ख्रिस्ती झाले. ऐर्लंड देशातही धर्मसंजीवनाचे काम चांगले चालले आहे. आयरिश तरुणांनी ठरविले आहे की, कृपेच्या सिंहासनासमोर दररोज प्रार्थना करावी. ईश्वराने पवित्र आत्म्याची वृष्टी करावी, अशी विनंती करीत जावी. अशा प्रार्थनेस आता सात हजारांवर लोक जमतात. कारण जगिक हितापेक्षा आत्मिक हित अधिक मोलवान असते. आपले मतभेद गुंडाळून माणसे तेथे जमतात. अधार्मिक लोक आपल्या पापावरून निराश होऊन येतात, तर धार्मिक लोक आपली श्रद्धा बळकट करण्यासाठी येतात. प्रार्थनेने मनास टिकाऊ आनंद व शांती मिळतात, म्हणून कलालांनी दारूचा धंदा सोडला, तर दुष्ट स्त्रियांनी दुराचरण टाकून दिल्हे. अनेक कामकरी विश्वासूपणाने भक्ती करतात. धर्मसंजीवनाने परस्पर द्रोह संपला. नीती वाढली. छाकटे कमी झाले. गुन्ह्यांची संख्या कमी होते आहे. हे देवाचे काम असून सैतानास संपविण्याचा उद्योग आहे. ईश्वर आपला पवित्र आत्मा ओतून दुष्ट माणसांना आपल्याकडे ओढून घेतो. खरेपणाच्या मार्गावर नेतो.

**९२४ अ** (इंम : २८९–२९०)

९२५ (१८ : १९, १ आक्तोबर ५९, २९३)

लाक्रोईसाहेबांनी हिंदुस्थानात ३८ वर्षे धर्मप्रसाराचे काम केले. बंगाली भाषा शिकून घेऊन त्यांनी उपदेश सुरू केला. देशी भाषेत उपदेश करण्यात इतर कोणताही धर्मोपदेशक त्यांची बरोबरी करू शकत नव्हता. त्यांच्या श्रमास चांगले फळ येऊन बंगाली लोकांना ख्रिस्ती धर्माचे ज्ञान झाले. ८ जुले १९५९ रोजी वयाच्या ६० व्या वर्षी ते मृत्यु पावले. त्यांच्या उत्तरक्रियेस एक हजार ख्रिस्ती लोक उपस्थित होते. त्यांची कन्या मुलंज मडम यांनी एतद्देशी ख्रिस्ती लोकांसाठी अनेक सुरस पुस्तके लिहिली आहेत.

९२५ अ (इंम : २९२–२९३)

९२६ (१८ : १९, १ आक्तोबर ५९, २९४–२९५)

सुरत मुक्कामी रे. ग्लासगो यांनी सहाजणांना बाप्तिस्मा दिल्हा. त्यात १ पारशी आहे. या पारशाने कोर्टातील एका रैटराकडून पवित्र शास्त्र घेऊन वाचले व त्याची ख्रिस्ती धर्माबद्दल खात्री पटली. मद्रासेत चौघांचा बाप्तिस्मा झाला. त्यात दोन स्त्रिया आहेत. शाळेमध्ये शिक्षण घेत असतांना त्यांचा मनःपालट झाला. नारायणस्वामी या तरुण हिंदूच्या नातलगांनी कोर्टात अर्ज करून त्यास अल्पवयी ठरविले होते. तो १६ वर्षांचा झाल्यावर आप्तांनी काही काळ अज्ञातवासात ठेवून त्याला प्रतिबंध केला. पण त्याने निश्चय करून धर्म बदलला. चार वर्षांपूर्वी त्याचा चुलत भाऊ ख्रिस्ताकडे आला.

९२६ अ (इंम : २९३–२९४)

**९२७** (१८ : १९, १ आक्तोबर ५९, २९६–२९९)

मनःपालट झालेला आनंदाया याने रामचंद्रायास लिहिले आहे की : रामचंद्रायाचे पत्र निराशजनक होते. वास्तविक आनंदायाच्या जीवनात खेदमय रात्रीनंतर आनंदी प्रातःकाळ आला आहे. पण दोघांचे विचार वेगळे आहेत. कारण बाबेलातील भाषाभेळाप्रमाणे वाणीचा पालट झाला. आपण चळलो, असे ज्यांना वाटते, ते आत्म्याची शक्ती ओळखण्यास शक्तिमान नाहीत. ईश्वरराज्यामध्ये प्रवेश केल्यामुळे आता गाढ निद्रा मिळते. देवाच्या पुस्तकातील प्रसंग स्वप्नामध्ये दिसतात. सार्वकालिक जीवनासाठी नवा जन्मच मिळाला आहे. आपली सर्व नातलगे व देशबंधू यांनाही हे सुख मिळाले पाहिजे. देवाने अवाच्य कृपा करून एकुलता पुत्र जगाच्या तारणासाठी दिल्हा. आता यासाठी प्राण गेला तरी चालेल. जातीतून बहिष्कृत झाल्याबद्दल खेद वाटत नाही. ईश्वराच्या कृपेपुढे जगाच्या धिक्काराची काय चिंता? आपण घाई केल्याबद्दल दुःख नाही. देवाच्या मंडळीत जाण्यास उशीर केला, म्हणून मात्र वाईट वाटते. चवदाव्या वर्षापासून मी पवित्र शास्त्र वाचले, पण दुराग्रही मूर्ख होत्साता बनून त्याचा अनादर केला. मूर्तिपूजेचे मूर्खपण, पाखंडीपणाचा अंधार, गर्वाच्या व्यर्थ कल्पना व पापाची सेवा ह्यां सोडून दिल्ही. रामचंद्रयानेही आपले अनुसरण करावे आणि आशीर्वादित व्हावे. मी तर सर्वोत्तम वैद्याच्या औषधीने आरोग्य पावलो. विश्वासाच्या तरवारीने बंद छेदून लुटारूंच्या गुहेमधून बाहेर यावे. खरा धनी तोच आहे.

**९२७ अ** (इंम : २९५–२९६)

९२८ (१८ : १९, १ आक्तोबर ५९, २९९-३०३)

१८५७ च्या स्थूलकाय बंडाचा धाकटा बंधू दोन वर्षांनी बोर्नियो बेटावर जन्मला आहे. त्याने अनेकांची आहुती घेतली. या बालदैत्याचा हिंस्र वृत्तांत इसेनबर्ग साहेबाने पाठविला आहे. बोर्नियोचा काही भाग डच सरकारच्या, तर काही इंग्रजांच्या ताब्यात आहे. इंग्रज रेसिडेंट तेथील सुलतान आदमच्या तर्फे कारभार पाही. सुलतानाचा भाऊ प्राबो याने राजपुत्रावर विषप्रयोग केला. पण राजाच्या मर्जीतील नसल्यामुळे त्यास राज्य मिळाले नाही. डचांनी दामजितला गादीवर बसविले. म्हणून प्राबोने ३०० सैनिक जमवून बंड केले. त्यांनी ख्रिस्ती लोकांना जबरीने मुसलमान करण्यास प्रारंभ केला. बांजरमासिंग या राजधानीच्या शहरात मिशनाचे ठाणे आहे. तेथे हजारो ख्रिस्ती लोक गोळा होत आहेत. बेथाबारागावी ७३ साहेबांना व ख्रिस्त्यांना ठार करण्यात आले. पोयलोतेलोच्या मिशन शाळेमधील अनेक ख्रिस्ती मारले गेले. असा अनर्थ गावोगावी घडला आहे. आणखी निदान ३५ साहेब, मडमा व त्यांची लेकरे ठार झाली. आम्हांस आशा वाटते की, आता सर्वत्र शांतता झालेली असेल. ज्यांचे सर्वस्व गेल्यामुळे त्यास दुःख झाले आहे. त्यांच्यासाठी आपण प्रार्थना करू या.

**९२९** (१८ : १९, १ आक्तोबर ५९, ३०३–३०४)

न. य. लिहितो की : नीलगिरीकरबावा सर्वांचे बिनचूक भविष्य सांगतात, अशी सर्वत्र प्रसिद्धी होती. म्हणून आम्ही एका दरिद्री माणसाला धनवानाचा पोषाख दिला आणि एका तरुणास ब्राह्मणी विधवेचा पोषाक करावयास लावले. मग बावास मुद्दाम बोलावून भविष्य विचारले. बावाने 'धनवाना'चा उजवा हात कागदावर शाईने उमटविला. तसेच 'बाईसाहेबा'ची सामुद्रिक चिन्हे पाहून दयाळू म्लेंच्छाच्या मदतीने यांना आपली सर्व संपत्ती परत मिळेल, असले भविष्य सांगितले. देवीच्या देवळात ब्राह्मणभोजन आणि दक्षिणा देण्याचा सल्ला मात्र दिल्हा. थोड्या वेळाने बावाच्या लक्षात आले की, हे धनवान नसून मूळचे दरिद्रिच आहेत, तेव्हा बावा फार खजिल झाला. 'आपले ज्ञान पोट भरण्याचे मात्र आहे. असल्या बस्ताद लोकांची कधी गाठ पडली नव्हती.' अशी मनमोकळी कबुली त्याने दिली.

**९३०** (१८ : १९, १ आक्तोबर ५९, ३०४)

मंडलेश्वरच्या दंगेखोरांपैकी ३०० जणांना पकडून त्यांच्या ताब्यातील ३० हजार रुपये जप्त करण्यात आले. तरी अजून १५० बंदिवान मोकळे असून त्यांच्याजवळ निदान ५० हजार रुपये असावेत, असा अंदाज आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १८, अंक २०, मुंबई, १५ आक्तोबर १८५९

**९३१** (१८ : २०, १५ आक्तोबर ५९, ३०५–३०९)

'एक ख्रिस्ती' पत्रात लिहितो की : नगरमधील एका कारंजावर पाणी भरण्याकरिता एक ख्रिस्ती स्त्री गेली असता लोकांनी तिला पाणी भरण्यास प्रतिबंध केला. ख्रिस्तिणीने तेथे पाणी भरले, तर कारंजे जणू डसेल, अशा भावनेने सर्वांनी आरडाओरडा केला. गावात नाना अफवा उठल्या. काहींनी बाजारात हरताळ पाळला. ४३२ ग्रामस्थांनी सह्या देऊन माजिस्त्रेताकडे अर्ज केला व राणीच्या जाहीरनाम्याअन्वये संरक्षण मागितले. ही कारंजी बादशहांनी बांधलेली असल्यामुळे मुसलमान मंडळी अर्जावर सह्या देत नाहीत. माजिस्त्रेताचे असे मत पडले की, हे नेटिव ख्रिस्ती पूर्वीदेखील कारंज्यावर पाणी भरीत होते. म्हणून त्यांचा वहिवाटीचा हक्क आहे. सर्व हक्कांत पाणी भरणे, हा मोठा हक्क आहे. असल्या मनाईस कसलाही आधार नाही. तरीही त्याने सगळ्या कारंजावर पोलिसांचा बंदोबस्त ठेवलेला आहे. धर्म बदलला, तरी वहिवाटीचा हक्क बदलत नाही, हे अगदी अबाधित असे तत्त्व आहे. कायदा सर्वांना समान व निःपक्षपाती वागणूक देईल, असेच राणीने जाहीर केले आहे. कारंजे शुद्ध करण्याचे निमित्त करून त्यात शेण कालविणे अयोग्य होय. हिंदू लोक मुस्लिमांनाच काय, पण दुष्ट वर्तणुकीच्या स्त्रियांनाही पाणी भरू देतात, त्यावेळी त्यांचा धर्म बुडत नाही काय ? एवढा गोंधळ होऊनही ख्रिस्ती लोक अत्यंत शांत राहिले आहेत.

**९३१ अ** (इंम : ३०९–३१२)

१३२ (१८ : २०, १५ आक्तोबर ५९, ३१३-३१६)

रामचंद्रय्याने आनंदय्यास पत्रात लिहिले आहे की : तुमची मातापितरे खेदाने व्याकुळ झाली. भार्या स्वतःस विधवा समजते. लेकरांचा आकांत व त्यांची दीनवाणी बोलणी कानांनी ऐकवत नाहीत. तुम्ही जातिभ्रष्ट झाला, म्हणून माझा अंतर्दाह होऊन देहभान हरपले. गावातील प्रतिष्ठित भिक्षुकांनी ही गोष्ट जाहीर केल्यामुळे तुमची मातोश्री बेशुद्ध पडली, तर वडील मूर्च्छित झाले. धर्मपालट करणारांची उत्तरक्रिया करून घटस्फोट करावा, असे शास्त्री म्हणाले. एक सप्तकात तुम्ही परत आलात, तर अजूनही जातिपावन होऊ शकाल. नंतर गुप्तात तुम्ही पाहिजे ते करा. जनांना संतोषविण्यासाठी बाह्यात्कारी रीती पाळाव्यात. तुम्हांस मास व दारू यांची आवड होती, तर मला तसे सांगावयास हवे होते. येशू ख्रिस्तावर गुप्तपणे प्रीत करावी, असेल तर खुशाल करा. परंतु जनास संतोषविण्यासाठी त्यांच्या रीती पाळल्या पाहिजेत. घराण्याचे नाव बुडण्याची वेळ आली आहे; तरी तुम्ही आपल्या स्वच्छंदी रीती सोडाव्यात. अजूनही आपण सुखी होणे संभाव्य आहे. तुमच्या पत्नीने आपले मंगळसूत्र तोडून एक तुकडा या पत्रासोबत दिलेला आहे. पत्राचा जाब येईल, म्हणून वाट पाहात आहे.

१३२ अ (इंम : ३१२-३१३)

१३३ (१८ : २०, १५ आक्तोबर ५९, ३१६-३२०)

नाना नेपाळात शिकार करीत असल्याबद्दल बातमी आहे. त्याचा ठावठिकाणा नक्की नसल्यामुळे त्याला पकडून देण्याची खात्री राजा जंगबहादूर देऊ शकत नाही.

१३४ (१८ : २०, १५ आक्तोबर ५९, ३१६-३२०)

जितूरनजीक दंगा करणाऱ्या अरब रोहिल्यांच्या बंदोबस्तासाठी लष्कर रवाना झाले.

**९३५** (१८ : २०, १५ आक्तोबर ५९, ३१६–३२०)

इमाम मेहदीचे जाहीरनामे लिहून पाठविणाऱ्या फकिरास फाशीची शिक्षा झाली. फकिराने मामलेदारास दिलेल्या पत्रात सर्वत्र दंगा माजविण्याचा आदेश दिला होता.

**९३६** (१८ : २०, १५ आक्तोबर ५९, ३१६–३२०)

कलकत्त्यात एका संभावित गृहस्थाचा मुलगा डफसाहेबाकडे उपदेश घेण्याकरिता आला असता, नातलगांनी दंगल माजविली. शिद्दी लोकांची मदत घेतली. पोलीस इन्स्पेक्टर आल्यावर लोक पांगले.

**९३७** (१८ : २०, १५ आक्तोबर ५९, ३१६–३२०)

न्यू हॉलंडच्या ओसाड भागात अद्यापही रानटी लोक राहतात. त्यांच्यामध्ये मिशनांचे काम उत्तम रीतीने चालले आहे.

**९३८** (१८ : २०, १५ आक्तोबर ५९, ३१६–३२०)

मुंबईतील भाट्यांची संख्या सुमारे १६ हजार आहे.

**९३९** (१८ : २०, १५ आक्तोबर ५९, ३१६–३२०)

माजगावजवळ जळालेल्या अमेरिकन जहाजाची किंमत लिलावात १३ हजार रुपये आली. त्याची उंची १८॥ फूट होती व ते तांब्याने मढविलेले होते.

**९४०** (१८ : २०, १५ आक्तोबर ५९, ३१६–३१७)

विहिरीवर व तलावाच्या वरवंडीवर उभे राहून पाणी शेंदण्यामुळे दरवर्षी झोक जाऊन स्त्रिया पडतात व मरतात. यंदा तीन बाया मेल्या.

**९४१** (१८ : २०, १५ आक्तोबर ५९, ३१६–३१७)

अमेरिकेने चार साहेबलोकांनी बलूनमधून १९ तासांत १२०० मैलांची मजल मारली. काही दिवसांनी विमानातून अटलांटिक महासागर ओलांडून जाण्याचा त्यांचा बेत आहे.

**९४२** (१८ : २०, १५ आक्तोबर ५९, ३१६–३२०)

अमेरिकेत एका माणसाने तोलकाठीच्या साहाय्याने १२० रत्तल वजनाच्या माणसाला पाठीवर घेऊन दोराच्या मदतीने नदी ओलांडण्याचा विक्रम केला.

**९४३** (१८ : २०, १५ आक्तोबर ५९, ३१६–३२०)

काश्मीरच्या महाराजांनी महाराणी विक्टोरियास नजर करण्यासाठी १५ लाख रुपयांचा काश्मीरी शालींचा तंबू तयार केला आहे. त्यात निखळ सोन्याचा पलंग आहे.

**९४४** (१८ : २०, १५ आक्तोबर ५९, ३१६–३२०)

महाराजा दुलपसिंग ड्यूक आफ नार्मण्डीचा वाडा विकत घेऊन लंडनमध्ये राहणार आहे.

**९४५** (१८ : २०, १५ आक्तोबर ५९, ३१६–३२०)

मि. नसरवानजी आर्देशर यांनी सध्याच्या तिप्पट टिकाऊ बायलर तयार केले असून त्याचे पेटंट घेतले आहे. हे बायलर कापडाच्या गिरणीसाठी उपयुक्त ठरतील.

**९४६** (१८ : २०, १५ आक्तोबर ५९, ३१६–३२०)

एका अमेरिकन साहेबाने इंदिया रबराची हलकी पण टिकाऊ लेखणी शोधून काढली.

**९४७** (१८ : २०, १५ आक्तोबर ५९, ३१६-३२०)

एका अमेरिकन गृहस्थाने सतरंज्या व गालिचे साफ करण्याचे यंत्र तयार केले आहे. त्यात ५० काठ्या असून ५० कुंचे आहेत. ते आपोआप चालू होऊन सतरंजी स्वच्छ होते.

**९४८** (१८ : २०, १५ आक्तोबर ५९, ३१६-३२०)

हिंदुस्थान सरकारची राजधानी कलकत्याहून अलाहाबादेस आणण्याची योजना ब्रिटिश अधिकाऱ्यांनी नापसंत ठरविली.

**९४९** (१८ : २०, १५ आक्तोबर ५९, ३१६-३२०)

इतालीवर निर्णायक विजय मिळविल्यावर फ्रान्सचा बादशहा मोठ्या इतमामाने पारिस शहरात आला. त्याच्या स्वागतासाठी शेकडो लोक जमले होते. एकेका घराच्या खिडक्यांचे भाडे ३० रुपयांपर्यंत गेले. लढाईतले कैदी मात्र इतालीस जाण्यास नाखूष आहेत. कारण त्यांना फ्रेंच जीवन फार आवडले.

**९५०** (१८ : २०, १५ आक्तोबर ५९, ३१९-३२०)

बोर्नियो बेटात शांतता झाली. कित्येक बंडखोर डच सरकारला शरण आले.

**९५१** (१८ : २०, १५ आक्तोबर ५९, ३१९-३२०)

काठेवाडातील बंडखोरांनी द्वारकेचा किल्ला घेतला, म्हणून गाइकवाड सरकारने त्यांचे पारिपत्य करण्यासाठी सैन्य पाठविले, परंतु बंडखोरांचा बीमोड होणे कठीण वाटले. म्हणून तो विभाग इंग्रजांच्या ताब्यात दिल्हा. द्वारकेचे देवस्थान सरकारी कामदाराकडे दिल्यामुळे ब्राम्हणांचे उत्पन्न बुडाले. त्यांनी लोकांना चिथावून बंड केले. देवळामध्ये नित्यशा दुराचारही फार चालतात.

९८२ (१८ : २०, १५ आक्तोबर ५९, ३१९–३२०)
उपासमारीला कंटाळून नानाचे सैनिक राप्ती नदीच्या किनाऱ्यावर लुटालूट करीत आहेत. अयोध्येच्या बेगमेचा सरदार मन्नुखान पळून गेल्यामुळे बेगमेच्या सैन्याची दंगलही आता थांबली.

९८३ (१८ : २०, १५ आक्तोबर ५९, ३१९–३२०)
रामबक्ष या बंडखोरास इंग्रज सरकारने फाशी दिल्हे.

९८४ (१८ : २०, १५ आक्तोबर ५९, ३१९–३२०)
मिठावरची जकात बारा आण्यावरून एक रुपया झाली.

९८५ (१८ : २०, १५ आक्तोबर ५९, ३२०)
ज्या किरकोळ बोलण्याने लोक लज्जामय होतील, असे (काही) बोलू नये. (ज्ञा. प्र.)

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १८, अंक २१, मुंबई, १ नोव्हेंबर, १८५९

**९५६** (१८ : २१, १ नोव्हेंबर ५९, ३२१–३२६)
पाणीप्रकरणी नगरच्या माजिस्त्रेताने निकाल दिला दिला की : धर्मपालट करण्यापूर्वी जे हक्क नागरिकांना होते, ते कायमच राहतात. जनावरांनाही पाणी पिण्याचा हक्क आहे, मग मानवास तो का नसावा? 'एक ख्रिस्ती' लिहितो की : नगरमध्ये दुकानदारांना धाक दाखवून दुकाने बंद करण्यात आली. जो धंदा चालू ठेवील, तो 'बाट्याच्या बीजाचा' ठरेल, म्हणून व्यापारी गप्प बसले. ब्राम्हणांनी गाव सोडून जाण्याच्या वल्गनाही केल्या. एक नेटिव अंमलदारही लोकांना चिथावीत आहे. कारंजाजवळ ५०-५० घष्टपुष्ट बाया उभ्या करून ख्रिस्तो स्त्रियांना भीती दाखविली जाते. काही भट मुंबईस जाऊन अर्ज दाखल करीत आहेत. ख्रिस्ती लोकांना वेगळा हौद बांधून द्यावा, असाही विचार आहे. पण त्याने मूळ प्रश्न मिटणार नाही. त्यांचे वाजवी हक्क त्यांना मिळाले पाहिजेत. उन्हाळ्यात पाण्याचा तुटार पडल्यावर त्यांचे हाल होतील. ख्रिस्ती लोकांवर जादूटोणा करण्याचे बालिश बेत काहींनी चालवले आहेत. ईश्वराने सर्वांकरिता हवा व पाणी निर्माण केली. त्यात लबाड्या करून काही फायदा नाही. आपल्या न्याय्य हक्कासाठी झगडा करणे, हे मानवाचे कर्तव्य आहे. उजेड व अंधार यांचा मिलाफ होत नसतो. त्याप्रमाणे ख्रिस्ती धर्माचा इतर खोट्या धर्माशी समेट होणार नाही. परमेश्वर त्यांचा उपहास करून त्यांस शासन करील. लोकांनी सावध व्हावे व बोध घ्यावा.

**९५६ अ** (इंग : ३२१)

**९८७** (१८ : २१, १ नोव्हेंबर ५९, ३२७–३२९)

रामचंद्रअय्या लिहितो की : आपला मेव्हणा उत्तेजित चित्तवृत्तीतून अनेक वाद करतो. लहानपणी आपणही देवांचा अभिमान घेऊन लिंगाईत मुलांशी मारामाऱ्या करीत होतो, परंतु सुशिक्षित झाल्यावर देवांच्या कथा कल्पित कादंबऱ्यांप्रमाणे वाटू लागल्या. गावातला शाळागुरू स्वतः दारूचा अंमल करतो व म्हणतो की, आनंदया कुचकामी आहे. तत्त्वज्ञानरहित माणसे भाबभोळी असतात. पण खरे तत्त्ववेत्ते ज्ञानप्राप्तीकडे वळतात. बैबलातही कल्पनासृष्टीत शोभणाऱ्या चमत्कारिक गोष्टी आहेत. प्रत्येक धर्मात काही बाह्यक्रिया, कर्मे व व्यर्थ कांक्षा असतातच. ज्या चांगल्या लोकांनी तत्त्वज्ञानाचा सूक्ष्म अभ्यास केला, ते एकाच धर्माचे असतात. आनंदया जर गावामध्ये परत आला, तर गावचा मुख्य साहेब त्याला चांगली नोकरी मिळवून देईल. आनंदाचा चुलता जो संतय्या तो तर आनंदास सगळी संपत्ती देण्यास तयार आहे. मात्र त्याने घरी परत आले पाहिजे. थोडे शहाणपण दाखविले, तर श्रीमंताप्रमाणे राहाता येईल.

**९८७ अ** (इंग : ३२६–३२७)

**९५८** (१८ : २१, १ नोव्हेंबर ५९, ३३०–३३१)

बंगालमध्ये कुमारगंज ही शिवनारायण नावाच्या ब्राम्हणाची जहागीर आहे. त्या गावात पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर हा एक सुधाकर तरुण येऊन राहिला. जुन्या चाली टाकून देण्याविषयी तो प्रयत्नशील आहे. त्याने विधवाविवाहासाठी फार प्रयत्न केले, तेव्हा जहागीरदाराने त्यास पाखंडी ठरविले. विद्यासागराच्या सहकाऱ्यांना हत्यारबंद शिपायांच्या हातून मार दिला व त्यांचे मारून कुटून मेण केले. पुनर्विवाहासाठी प्रयत्न करणार नाही, अशा मजकुराच्या कागदावर जबरीने सह्या घेतल्या. गावच्या माजिस्त्रेताने दंगेखोरांस दंड करून जहागिरदाराकडून चांगल्या वागणुकीचा जातमुचलका लिहून घेतला. ईश्वरचंद्रासारखे सुधारक या देशात आहेत, म्हणून नेटिवांच्या सुधारणेची थोडीतरी आशा आहे. कितीही संकटे आली, तरी त्यांचे नीतिधैर्य ढळणार नाही.

**९५८ अ** (इंम : ३२९–३३०)

**९५९** (१८ : २१, १ नोव्हेंबर ५९, ३३१–३३२)

बाल्मिना गावात प्रार्थनेस दररोज ७० माणसे जमतात. ईश्वराच्या आशीर्वादाने भक्तांची संख्या वाढत आहे. पवित्र आत्मा पाठवून ईश्वर अनेकांना आकर्षित करीत असतो. नवीन अडीचशे माणसे येणार आहेत. लंडनदेरी गावात एक हजार मनुष्ये आदित्यवारी प्रार्थना करण्यास जमली होती. देवाचे काम देवच करतो. बेलफास्त गावच्या मिशनात अंतर्गत तंटा होता. तो आता थांबला आहे. जेथे कज्जा आहे, तेथे पवित्र आत्मा वसती करणार नाही. जेथे आवेश व भांडाळपण, तेथे दंगा व प्रत्येक कुकर्म असताच. एकमेकांवर प्रीती करा, हा तर येशूचा मुख्य संदेश आहे. म्हणून पहिला भावाशी समेट करा.

**९६०** (१८ : २१, १ नोव्हेंबर ५९, ३३२)

नम्रपणा व परमेश्वराचे भय, यांची फळे धन व गौरव व जीवन ही आहेत.

९६१ (१८ : २१, १ नोव्हेंबर ५९, ३३३–३३४)

इंग्लंडमधील धार्मिक जनांच्या वतीने ७५ लोकांनी पंतप्रधान चार्लस वुड यांच्याकडे अर्ज दिला की : हिंदुस्थानातील सरकारी शाळांत ख्रिस्ती शास्त्र शिकविण्यास मुभा असावी. मात्र ज्यांची खुशी असेल, त्यांनाच शिकवावे. कोणावरही जुलूम होऊ नये. लंकेमध्ये शास्त्र शिकविले जाते. हिंदुस्थानात तसे केल्यामुळे वाईट काहीच होणार नाही. पवित्र शास्त्रात शुद्ध नीती आहे, त्याने लोकांची सुधारणूक होईल. शास्त्र न शिकविण्यानेच अनहित होणार आहे. बायबल वाचले, तर लोकांचा वडिलोपार्जित धर्मावरचा विश्वास उडून जातो, हा विचारच अगदी निराधार आहे. प्रधानांना असे वाटते की, ख्रिस्ती धर्माच्या प्रसाराने इंग्रजी राज्यास बळकटी येईल. सरकार पवित्र शास्त्र शिकविण्यास नाखुशी नाही. पण यातील अडचणींचा विचार व्हावा.

९६२ (१८ : २१, १ नोव्हेंबर ५९, ३३४–३३५)

सोलापूरजवळ माढा या गावी नाना सराफाचे घर पावसामुळे पडले. घरात पेवाजवळ त्याची विधवा बहीण व इतर माणसे झोपली होती. नानाने शूद्र नोकरांकरवी त्यांना बाजूस काढले. बहीण मृतावस्थेत होती. तिच्या अंत्यविधीच्या वेळी ती सकेशा असल्यामुळे तिच्या प्रेतास इतर ब्राम्हणच काय, पण स्वतः नानाही शिवेना. नापिकांनी केस काढण्याचे नाकारले. मग शूद्राकडूनच तिची उत्तरक्रिया करण्यात आली. हीच स्त्री लग्नसमारंभात वावरली, तेव्हा सर्व ब्राम्हण भोजनासाठी हजर होते. अशा दुरभिमानामुळे आणि दुष्कर्मामुळेच ब्राम्हणांची दशा झाली आहे. (ज्ञानप्रकाशावरून)

९६३ (१८ : २१, १ नोव्हेंबर ५९, ३३५–३३६)

नाना नेपाळातच आहे. पण त्याचा नक्की ठावठिकाणा समजत नाही. त्याचे २५०० सैनिक उपासमार होऊन भीक मागत आहेत. नानाने दोन मडमा ओलीस धरल्या असून त्यांच्या जिवावरती तो स्वतःस जीवदान मागेल. राणा जंगबहादुराचे सैनिक त्याला पकडण्याचा आटोकाट प्रयत्न करीत आहेत. पण तो मेल्याच्या वदंता मुद्दाम पसरविल्या जात आहेत. इंग्रज सरकारला गाफील ठेवण्यासाठी या अवया उठवल्या जातात, हे उघड आहे.

९६४ (१८ : २१, १ नोव्हेंबर ५९, ३३५–३३६)

द्वारकेच्या देवळातून लष्कराने लुटून नेलेले जडजवाहिर सरकारने परत मिळवून द्यावे, म्हणून भाटे लोकांनी अर्ज केला, पण त्यांना कसलेही वचन देण्यास गवरनरने नकार दिला.

९६५ (१८ : २१, १ नोव्हेंबर ५९, ३३५–३३६)

माजी गवरनर जनरल लार्ड डलहौसी याच्यासाठी ३५ हजारांचा चांदीचा हौदा तयार केलेला होता. त्याच्या दुरुस्तीसाठी दीड हजार रुपये खर्च आला.

९६६ (१८ : २१, १ नोव्हेंबर ५९, ३३५–३३६)

स्टीम नॅविगेशन कंपनीच्या दोन गलबतांचा लिलाव झाला. त्यांची किंमत एकूण २ लाख २७ हजार रुपये आली.

९६७ (१८ : २१, १ नोव्हेंबर ५९, ३३५–३३६)

पुढील वर्षी लार्ड एल्फिन्स्तन विलायतेस जाणार असून, मुंबईचा गवरनर म्हणून लंकेचा प्रस्तुत गवरनर येणार आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**९६८** (१८ : २२, १५ नोवेंबर ५९, ३३७–३३९)

अहमदनगरच्या पाणीप्रकरणाविषयी नागरिकांनी केलेल्या अर्जास नामदार गव्हर्नरांनी उत्तर पाठविले, ते माजिस्त्रेतांनी नागरिकांना वाचून दाखविले. गवरनरसाहेबांचे मत असे आहे की : ही अर्जी बहकलेल्या लोकांनी केलेली आहे. नागरिकांचे मागणे गैरसमजुतीचे व बेअदबीचेच आहे. इतर धर्मीयांनी पाणी भरले, तर कारंजे बाटत नाही. मग ख्रिस्ती लोकांनाच प्रतिबंध का केला जातो ? राणीच्या जाहीरनाम्याचा लोकांनी युक्तीने विपरित अर्थ केला आहे. अर्जदार इतरांना उपद्रव करून स्वतःच्याच धर्मतत्त्वांची अवहेलना करीत आहेत. ख्रिस्ती लोकांना पाणी भरू दिल्यामुळे रयतेवर कसलाही जुलूम होणार नाही. लोकांची गैरशिस्त व मूर्ख मागणी सरकार मान्य करू शकत नाही. ख्रिस्ती लोकांच्या वाजवी हक्कास हा जाहीरनामा नडावा किंवा त्यांच्या मुळावरही यावा, असा राणीसरकारचा हेतू असणे शक्य नाही. अशाने त्यांच्या धर्मसंरक्षकपणासच लांछन निर्माण होईल.

**९६८ अ** (इंग : ३३७)

**९६९** (१८ : २२, १५ नोवेंबर ५९, ३३९–३४०)

सरकारने एक नवा हुकूम काढला आहे. त्यानुसार नीच जातीच्या विद्यार्थ्यांना घेताना पंतोजींने इन्स्पेक्टरास विचारावे. ज्या शाळा सर्व जातींच्या मुलांना प्रवेश देतात, त्यांनाच सरकार मदत देईल. शाळाप्रवेशाचा हक्क इतर धर्माच्या मुलांप्रमाणेच ख्रिस्ती लोकांच्या मुलांनाही आहे. सर्व प्रतींच्या लोकांच्या कल्याणार्थ प्रयत्न करणे, हा सरकारचा उद्देश आहे. एकंदरीत सरकारचा हुकूम योग्य व यथान्याय आहे. या आज्ञेबाबत एत्तद्देशीय ख्रिस्ती लोक गवरनरांशी नेहमी कृतज्ञ राहातील, त्यांच्या कारकीर्दीची यादगिरी करतील.

९६९ अ (इंग : ३३९)

९७० (१८ : २२, १५ नोव्हेंबर ५९, ३४०–३४१)

ओडिसा प्रांतामधील रामपूर येथे एक ब्राह्मण व ख्रिस्ती उपदेशक यांचा संवाद झाला. ब्राह्मण म्हणाला की : 'मी मूर्तींची पूजा करतो. कारण माझा देव साकार आहे. सगळे देव टोपलीत बुडवून मी त्यांची पूजा करतो. जर तसे केले नाही, तर हात घाणेरडे होतात.' उपदेशक म्हणाला की : खरा देव निराकार आहे. त्याची मूर्ती करणे म्हणजे पाप आहे. भोवतालच्या बायका मात्र पितळेच्या मूर्तींची तुलना आपल्या हातातल्या पितळेच्या पाटल्याशी करीत होत्या.

९७० अ (इंग : ३४०)

९७१ (१९ : २२, १५ नोव्हेंबर ५९, ३४२–३४३)

अहमदनगर मिशनची वार्षिक सभा तीन दिवस चालली होती. ईश्वरभक्तांचा मोठा समाज एकत्र जमला होता. अनेक अगत्याच्या विषयांवर भाषणे झाली. दररोज प्रार्थना व उपकारस्तुती होत असे. प्रभुभोजनास २०० ख्रिस्ती हजर होते. वियोगार्थ गीत गाइले गेले, त्यावेळी सर्वांना मोठा गहिवर आला, असे 'नगरकर ख्रिस्ती' आपल्या पत्रात लिहितात.

९७१ अ (इंग : ३४१–३४२)

**९७२** (१८ : २२, १५ नोव्हेंबर ५९, ३४४–३४६)

रामचंद्रया लिहितो की : मनातील दुःखामुळे प्रकृती बिघडली. आनंदयासारख्या स्थिर स्वभावाच्या माणसाने शांतपणाने विचार करावा. लिंगायताशी भांडण झाल्यावर दोघेही मेव्हणे पुराणावरचा विश्वास टाकून देऊन प्रार्थनेस महत्त्व देत असत. मरण हा शरिराचा धर्म असून आत्मा अमर आहे, यावर दोघांचा विश्वास होता. आत्म्याचा उद्धार तत्त्वज्ञानाकडून होतो. परंतु दैहिक तृप्ती होण्यासाठी सर्व विषयभोग मिळावयास हवेत. सांप्रत आनंदाची बुद्धी ठिकाणावरती नाही. सर्व समर्थ ईश्वर आपल्या पापांची क्षमा करीलच. शुभवर्तमानाचे ज्ञान प्रत्येकाने मिळविण्याची काहीही आवश्यकता नाही. येशूचा तारणोपाय जगात प्रगट झाल्यावर १८०० वर्षांनी त्याचे घोषण या देशात झाले, ही एकच गोष्ट त्याचा खोटेपणा दाखविण्यास पुरेशी आहे. आनंदयाचा नेमका बुद्धिभ्रंश झाला आहे. मिशनऱ्यांच्या कबजेतून त्याने विलंब न लावता सुटका करून घ्यावी.

**९७२ अ** (इंम : ३४३–३४४)

९७३ (१८ : २२, १५ नोव्हेंबर ५९, ३४६–३४९)

एका भोळ्या धार्मिक कुटुंबात सगुणाचा जन्म झाला. सगळ्या भावंडांत लहान असल्यामुळे ती फार लाडकी होती. पण ती छंदखोर किंवा अपलपोटी नव्हती. तिच्या आईने तिला मर्यादाशील आणि आज्ञांकित बनविले होते. सगुणीचा आत्मा शुद्ध व पवित्र होता. एकदा सगुणा शाळेतून आली व झोपून राहिली. तिचे जेवणास मन होईना. आईने चौकशी केल्यावर तिने सांगितले की, आपल्या मनात मैत्रिणीस जिवे मारण्याचे विचार आले. असे मानसिक पापसुद्धा आपल्या हातून घडता कामा नये, म्हणून मी मैत्रिणीची क्षमा मागितल्याशिवाय जेवणार नाही. आईसह मैत्रिणीकडे जाऊन तिने या काल्पनिक हिंसेबद्दल दिलगिरी प्रकट केली, तेव्हाच तिचे मन शांत झाले. द्वेष आणि प्रीति यांची झोंबी थांबली. द्वेषाने आपण सैतानाची लेकरे ठरतो. म्हणून खंती होऊन तिने पापक्षमा मागितली. मुलांना सुविद्या आणि सुनीती शिकविली, तर सगळी बालके सगुणीप्रमाणे सद्‌गुणी होतील. त्यांच्या मनांत सत्यतेचे बीजारोपण करावे.

९७४ (१८ : २२, १५ नोव्हेंबर ५९, ३४९–३५०)

द्वारकेच्या बंडाबाबत व लुटीवरून गुजराती व भाटे लोक सरकारला दोष देतात. द्वारकेत एक मुस्तकिम किल्ला आहे आणि ११ देवळे आहेत. त्यांपैकी द्वारकानाथाचे देऊळ सर्वांत मोठे आहे. त्याच्या मुख्य दरवाजास एक लक्षाचे सोने मढविले आहे. इतर दरवाजेही चांदीच्या पत्र्यांनी मढविले आहेत. मूर्ती सोन्यारुप्याच्या असून त्यांच्या अंगावर मौल्यवान अलंकार आहेत. मुख्य मूर्तीची तर दोन वेळा चोरी झाली. दक्षिणेचे उत्पन्न अर्धा लाख आहे. यात्राकर एक लाख येतो. दक्षिणेचे उत्पन्न बुडालेले ब्राह्मण वाघर लोकांना चिथावतात. त्यातून बंड झाले. इंग्रज सैन्याने कठोरपणाने बंडाचा बीमोड केला. शेकडो बंडखोर मारून सरकारने शांतता निर्माण केली, तरी नागरिक सरकारला नावे ठेवतात, सरकारवर जुलमाचा आरोप करतात. हा कर्मनष्टपणा होय. सरकारने मिळविलेल्या मूर्ती व जवाहीर सरकारने परत दिलीं आहेत. गुजराथेतील वृत्तपत्रे बेताल होऊन मनस्वी विलाप करीत आहेत. सरकारला विनाकारण दूषणे देत आहेत. पोकळ सापडले म्हणून कोपराने खणू नये.

९७५ (१८ : २२, १५ नोव्हेंबर ५९, ३५०–३५२)

नाना आपल्या मुजपुरी व पुरभाई सैनिकांसह १४ हत्तींवर द्रव्य लादून नेपाळात हिंडतो आहे, तर अयोध्येची बेगम कटमंडूत आहे. नेपाळच्या राण्याचे सैन्य त्यांना पकडू शकले नाही. राण्याचेही त्यात अंग आहे की काय, अशी शंका येते.

९७६ (१८ : २२, १५ नोव्हेंबर ५९, ३५०–३५२)

उत्तर हिंदुस्थानातील अनेक बंडखोरांना फाशी देण्यात आले.

९७७ (१८ : २२, १५ नोव्हेंबर ५९, ३५०–३५२)

ब्रीनियोतील बंडखोर अद्यापही युरोपियनांवर सूड उगविण्याचा प्रयत्न करीत आहेत. नेटिव खिस्त्यांचा छळ होत आहे.

**९७८** (१८ : २२, १५ नोव्हेंबर ५९, ३५०–३५२)
कुर्गचा माजी राजा वीर राजेंद्र वैदर यांचा मृत्यु झाला.

**९७९** (१८ : २२, १५ नोव्हेंबर ५९, ३५०–३५२)
युरोपातील लढाईत फ्रान्सचे व सार्डिनयाचे ६३,००० सैनिक मेले, तर आस्त्रियाचे ४९,६६४ सैनिक मृत्यु पावले.

**९८०** (१८ : २२, १५ नोव्हेंबर ५९, ३५०–३५२)
अयोध्या प्रांतात एका आठवड्यात १३ लाख ७२ हजार ५५९ हत्यारे जप्त झाली.

**९८१** (१८ : २२, १५ नोव्हेंबर ५९, ३५०–३५२)
पुण्यातील मुलींच्या शाळेची वार्षिक परीक्षा झाली, तेव्हा डाक्तर भाऊ दाजी यांनी मुलींना १०० रुपयांची बक्षिसे वाटली. पुण्यात राणी विक्टोऱ्या यांच्या स्मरणार्थ पदार्थसंग्रह करण्याचे ठरले आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १८, अंक २३, मुंबई, १ दिसेंबर १८५९

**९८२** (१८ : २३, १ डिसेंबर ५९, ३५६–३६२)

'एक ख्रिस्तीण' आपल्या पत्रात लिहिते की : भातोडी (अहमदनगर) हे रमणीय गाव आहे. मेहेकरी नदीच्या काठावर नृसिंहाचे सुंदर मंदिर आहे. तेथे जाऊन खऱ्या व जिवंत देवाबद्दल स्त्रियांना उपदेश केला. नदीजवळ ख्रिस्ताची गाणी गाऊन दाखविली. आम्ही दर आदित्यवारी स्त्रियांना गोष्टी सांगतो. आम्ही परक्या व अनोळखी असून त्यांच्या दुखण्याची चौकशी केली, म्हणून त्यांना फार आनंद झाला. शरिराच्या दुखण्यापेक्षा नरकातले दुःख किती वाईट असते, ते त्यांना समजावून दिले. येशू हा एक डोळस वाटाडी आहे. एका विधवा स्त्रीला औषधोपचार सांगितला. अनाथ व दुःखित यांचा सांभाळ करणारा एकच खरा व जिवंत देव आहे, याची त्यांना खात्री पटली. मूर्तीची भक्ती हे मूर्खपणच आहे, हे त्यांना जाणवले. नेटिवांच्या पोथ्यांपेक्षा ख्रिस्ताची पोथी सोपी आहे. त्यांच्या वेड्यावेड्या समजुती मात्र गेल्या पाहिजेत. अष्टीच्या एका श्रीमंत विधवेचे धन तर लोकांनी फुगीर भाषणे करूनच लुटले. तिच्या वित्तविषयाचा चोळाबोळा केला. नीतिमत्त्वाचा सूर्य जो ख्रिस्त, त्याची जर ओळख पटली, तर असे प्रकार होणार नाहीत. अर्थात या कामात फार अडचणी आहेत. तरीही निराश होता कामा नये. अश्रूंनी पेरावे व उत्सवाने कापावे. काळाच्या समाप्तीपर्यंत खरा देव आमच्याबरोबर राहील.

**९८२ अ** (इंग : ३५३–३५६)

**९८३** (१८ : २३, १ डिसेंबर ५९, ३६२–३६३)

मडम वुड यांनी दोन वर्षे सातारा मिशनाचे काम फार प्रीतीने केले. मंडळातील ईश्वरभक्तीने तिला फार उत्साह वाटे. पटकीच्या उपद्रवाने तिचा दुःखद अंत झाला. ती आकाशात विसावा आणि आपल्या श्रमाचे फळ पावेल.

**९८३ अ** (इंम : ३६२)

**९८४** (१८ : २३, १ डिसेंबर ५९, ३६४–३६७)

आनंदभया लिहितो की : 'मी देवपुरला प्रभुभोजनाच्या संस्कारामध्ये भाग घेतला. या गावातील नेटिवांचे मत रामचंद्रसारखेच आहे. पण ज्याने खरेपणाचा स्वीकार मनापासून केला, त्याला विद्वानांचे भय धरायवास नको. ईश्वराच्या वचनास लगटून राहावे. परमेश्वराचे शास्त्र हाच माझा मजबूद आश्रय आहे. येशूने जगाच्या तारणासाठी आपला प्राण बळीरूपे अर्पण केला. रामचंद्र याने आपल्यासाठी खोटेपणा करण्याचे कारण नाही; उलट त्यानेही मिशनामध्ये आले पाहिजे. ईश्वराचा विश्वासू सेवक खरेपणात स्थिर राहातो. प्रभुभोजनात वेगळाल्या जातींतून ख्रिस्तीपण स्वीकारलेली अनेक मंडळी पाहून फार आनंद वाटला. हलक्या कुळांतले अनेक भाऊही आहेत. पण ते ईश्वरी राज्याचे वतनदार आहेत. छाकट्या मूर्तिपूजकांचे मत मनावरती घेऊ नये. अनीतिमान माणसे फार तरवे सांगत असतात. मला माझ्या विचारापासून प्रवृत्त करणे, हा तर सैतानाचा कावा दिसतोय. मला तुम्हां सर्वांचे नेहमी स्मरण होते. तरी माझे मत बदलणार नाही.'

**९८४ अ** (इंम : ३६३–३६४)

९८५ (१८ : २३, १ दिसेंबर ५९, ३६७–३६८)

भागूजी नाईक भिलाने वाटमारी व लुटालूट केली होती. तसेच कप्तान हेन्रीस ठार मारले होते. आपल्या ५६ लोकांसह तो पिंपळ्याच्या रानात येऊन शेतकऱ्यांना भाकरी मागत होता, तेव्हा मीठसागर गावी सुपरिटेंड सूटर यांना ही खबर समजली. साहेब १२५ शिपायांसह त्यांच्यावर तुटून पडले. लढ्यात सगळे बंडवाले ठार झाले. भागूजीचे प्रेत ज्या जागेवर हेन्रीचा मृत्यु झाला, तेथे लटकावण्यात आले. याच सूटरनी नरगुंदकराचे पारिपत्य केले होते.

९८६ (१८ : २३, १ दिसेंबर ५९, ३६७–३६८)

मद्रासच्या हिंदू–मुसलमान नागरिकांनी विलायत सरकारास अर्ज केला होता की : सरकारने मिशनरी शाळांना साहाय्य करू नये. सरकारी अंमलदारांना मिशनच्या सभेमध्ये भाग घेण्यास मनाई असावी. इंग्लंडचा पंतप्रधान सर चार्लस वुड याने ही मागणी फेटाळली आहे. सर्वच धर्मांच्या लोकांना शाळेसाठी मदत मिळते, तशी मिशनरी शाळांनाही मिळत राहणार. धर्मसंबंधी सक्ती कोणावरही केली जाणार नाही, पण कोणाची तरफदारी जशी चालू दिली जाणार नाही, तशी कोणाला इजाही होऊ दिली जाणार नाही. रयतेची धर्मसंबंधी समजूत किंवा भक्ती यांत कोणतीही ढवळाढवळ होणार नाही, असे पंतप्रधान म्हणतात.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**९८७** (१८ : २४, १५ दिसेंबर ५९, ३७०–३७२)

ईश्वराचा आशीर्वाद मिळविण्यासाठी अगत्याने प्रार्थना करावी लागते. प्रापंचिक सुखाची काळजी करणे, हा मूर्खपणा आहे. आपले सर्व लक्ष आकाशासंबंधी गोष्टीकडेच लावावे. जोपर्यंत ईश्वराकडून क्षमा होत नाही, तोपर्यंत प्रार्थना केली पाहिजे. ईश्वराचे राज्य व नीतिमत्त्व शोधली पाहिजेत. कलकत्यात दुर्गापूजेच्या उत्सवाच्या वेळी रेवरंड डाक्तर डफ यांनी आपल्या मंडळीत आयर्लंडमधील धर्मसंजीवनाची माहिती दिल्ही. जे ईश्वराकडे फिरतात, त्यांचे अंतःकरण आनंदभरित होते, असे सांगितल्यावर पुष्कळांच्या नेत्रास अश्रू आलीं. कित्येक उदमी वाणी लोकांनी दररोज प्रार्थनेस येण्याचे ठरविले. लुदियाना मिशनने म्हटले आहे की : येशूकरिता जगावे हे आमचे कर्तव्य आहे. लक्षावधि लोक नाशाच्या मार्गाने चालले आहेत, त्यांचे कल्याण साधणे आवश्यक ठरते. सगळया मानवकुळास ईश्वर आशीर्वाद देईल. देवाच्या उपकारस्तुतीत नेहमी मग्न असावे.

**९८७ अ** (इंम : ३६९–३७०)

९८८ (१८ : २४, १५ डिसेंबर ५९, ३७३–३७४)

'नगरकर ख्रिस्ती' पत्रात लिहितो की : वर्तमानदीपिकेचा कर्ता असे मानतो की, ख्रिस्ती लोकांच्या १०० पट इंग्रजीचे ज्ञान त्याला आहे. पण ही त्याची निव्वळ भ्रांती समजावी. सन १८५० चा कायदा फक्त मालमत्तेस लागू आहे, असे तो समजतो, पण रैट आफ गार्डियनशिप प्रमाणे मुलाचे पालनपोषण बापाच्या अखत्यारीत असते. आमंत्रणावाचून जेवण्यास जाणे हा 'हक्क' समजणाऱ्या ब्राह्मणांना कायद्याचे ज्ञान नाही. धर्माच्या प्रकरणात आपल्या मनःसाक्षीप्रमाणे वागता येईल, हा ब्रिटिशांच्या राजनीतीचा मुख्य सिद्धांत आहे. अनीतिमान लोकांनी पाणी भरले, तर कारंजे बाटत नाही, हे नेटिवांचे 'तत्त्व' मात्र अजब आहे. धर्म बदलण्याने कोणीही नीच होत नसतो. कारंजावर ख्रिस्त्यांना पाणी भरू दिल्यामुळे कसलाही जुलूम होणार नाही, कारण राजाची जात उत्तम जातीच्या बरोबरीची असते.

९८८ अ (इंम : ३७५)

**९८९** (१८ : २४, १५ डिसेंबर ५९, ३७६–३७९)

आनंदअयर या पत्रात म्हणतो की : 'आज मी तुला मित्रबुद्धीने लिहीत आहे. नरकण्याच्या स्मरणाने भयभीत होऊन हा सुमार्ग मी सोडणार नाही. भाडी वैद्याच्या औषधाने माझा रोग वाढत गेला. आता खरा वैद्य मला बरे करील. रामचंद्राचे तत्त्वज्ञान फक्त तोंडीच असून तो स्वतःदेखील तसे वागत नाही. निर्जीवाची भक्ती माणसास शोभत नाही. कृष्णापूर गावचे दारूबाज लोक अद्वैतमत व मध्वमत सांगू लागले, तर ते आम्ही ऐकणार नाही. वेगळाल्या मतवाद्यांच्या सांगण्यात कधीच मेळ पडणार नाही. त्यांची मते अर्थरहित तर आहेतच, पण विपरितही आहेत. तुलादेखील पापिष्ठ सुखोपभोगाची आवड आहे. आपले पाप सोडण्याची तुझी इच्छा नाही. तत्त्वज्ञानाचा डौल दाखवून बदफैलीपणाची मुभा माणसाला हवी असते. येशू ख्रिस्ताचा आत्मा पावल्यावाचून पवित्र शास्त्राचा उपदेश कोणाला समजणार नाही. हे शास्त्र पूर्वी हिंदुस्थानात कोणास ठाऊक नव्हते, एवढ्याने ते खोटे ठरत नाही. अज्ञानदशेमध्ये माणसाच्या हातून पाप घडते. माणसाचा नाश होतो, तो अविश्वासानेच होतो.'

**९८९ अ** (ईस : ३७५–३७६)

९९० (१८ : २४, १५ डिसेंबर ५९, ३७९-३८२)

आजपर्यंत जज्जाच्या हुकमावरून तुरुंगात जाऊन कैद्यांना उपदेश करीत असत. याला गवर्नर जेनरलसाहेबांनी बंदी केली. येशू ख्रिस्त म्हणतो की, आत्मा अमर असून त्यासारखा मोलवान पदार्थ दुसरा नाही. सर्व जगात शुभवर्तमान गाजवावे, असा त्याचा संदेश आहे. पापी माणसास पश्चात्तापाचा मार्ग दाखविणे, हे उपदेशकाचे काम असते. अपराध्यांना चांगला मार्ग सांगणे, हे अगत्याचे काम आहे. कैसाराचे कैसारास व देवाचे देवास मिळावे असेच आम्ही मानतो. ज्यांची खुशी असेल, त्यांनाच उपदेश करतो. आपल्या अघोर कर्मांची त्यांजकडून खुबीने कबुली घेतो. काही कैदी खोट्या पुराव्यामुळे कैद भोगीत आहेत. उपदेश ऐकण्याने कैदेत काही सूट मिळेल, अशी कोणाचीही समजूत झालेली नाही व होणारही नाही. उपदेशकांनी कोणालाही जुलमाने धर्मभ्रष्ट केलेले नाही. म्हणून सरकारने हा प्रतिबंध ताबडतोब रद्द करावा.

९९१ (१८ : २४, १५ डिसेंबर ५९, ३८२-३८४)

गवर्नर जेनरल यांच्या लखनौ दरबारास अनेक सरदार आले होते. जमीनदारांचा दरबार स्वतंत्र भरविण्यात आला. साहेब-मजकुरांनी बंडकाळात मदत केलेल्या चारशे इमानी नेटिवांना इनामे व जहागिऱ्या दिल्या. साहेब म्हणाले की : गतवर्षीच्या धामधुमीचे पारिपत्य करणे सरकारास भाग पडले. आता शांतता आहे. तुम्ही आपल्या जहागिरीच्या सुधारणुकीकडे लक्ष पुरवावे. कायदे मानण्याचा कित्ता दाखवावा. इंग्रज सरकार कोणाचाही धर्म बुडविणार नाही. कुभांडी लोकांवर विश्वास ठेवून सरकारशी विरोध कोणी करू नये. चीफ कमिशनरसाहेबाचा सल्ला घेत जावा.

**९९२** (१८ : २४ १५ दिसेंबर ५९, ३८४)

बद्री नावाचा एक ब्राह्मण नेपाळहून आला असून तो सांगतो की, नानासाहेब पेशवा मरण पावला. मृत्युसमयी नानाने दिलेल्या मोहोराही तो पुरावा म्हणून दाखवितो. उत्तरक्रियेचे वर्णन करतो, पण खरे काय ते कळणे कठीण आहे.

**९९३** (१८ : २४, १५ दिसेंबर ५९, ३८४)

भागुजी भिलाचा शेवट करणाऱ्या नेटिव कमांडंटचा व पोलिसांचा स्वागतसमारंभ नगरमध्ये झाला. दारूकाम व मेजवानी झाली. कर्नल पाटंजर यांना व सूटर साहेबांस 'विक्तोऱ्या क्रास' मिळणार आहे.

**९९४** (१८ : २४, १५ दिसेंबर ५९, ३८४)

लखनौच्या माजी राजास २२ लाखांचे पेन्शन मंजूर झाले.

**९९५** (१८ : २४, १५ दिसेंबर ५९, ३८४)

गेल्या कार्तिकी यात्रेत पंढरपुरात ९०० लोक पटकीने मेले. आगगाडीच्या सोयीमुळे यात्रा जास्त भरेल. तेव्हा किती मनुष्यसंहार होईल कोण जाणे?

**९९६** (१८ : २४, १५ दिसेंबर ५९, ३८४)

डाक्तर मिचेल स्वदेशाहून परत आले. स्कातलंदात त्यांना 'डाक्तर आफ लाव्‍ज्' पदवी मिळाली. अमेरिकन व तुर्की मिशनांचे काम पाहून ते इकडे आले आहेत.

**९९७** (१८ : २४, १५ दिसेंबर ५९, ३८४)

दिल्ली येथे बहुत हिंदू तरुण खिस्ती होतात, असे वर्तमान आले आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

ज्ञानोदय, पुस्तक १९ अंक १, मुंबई, २ ज्यानेवारी, १८६०

९९८ (१९ : १, २ ज्यानेवारी ६०, २–४)

उत्तर हिंदुस्थानमध्ये आता शांतता आहे. लोक स्वस्थता पावले आहेत. अनेक बंडखोर शरण आले. लार्ड कानिंग यांनी कृपेची आशा दाखवून लोकांची प्रीति इंग्लिश राज्यावर बसविण्याचे प्रयत्न केले. बुंदेलखंडात व नेपाळात गडबड करणाऱ्या बापड्या बंडखोरांनीही डोक्यातील वेड सोडून द्यावे. मुंबई इलाख्यातील भिलांचा पूर्ण मोड झाला. राणीच्या जाहीरनाम्यानंतर सरकारकडून अगदी सुज्ञ वागणूक झाली. मद्रास सरकारने सर्वांना सारखी वागणूक दिल्ही. सर्व प्रतीच्या लोकांना जिवंतपणी आणि मेल्यावरही रस्ते खुले केले. मद्रासी नायरांचा निषेध केला, तर ख्रिस्ती लोकांचा पाणी भरण्याचा हक्क मान्य केला. ज्यांची इच्छा असेल, त्यांना पवित्र शास्त्र वाचण्यास मुभा दिल्ही. इतर देशांप्रमाणे इकडेही धर्मसंजीवन होत आहे. अनेक मंडळ्या नव्याने स्थापन झाल्या. सर्वांवर पवित्र आत्म्याची वृष्टी होते आहे. येशूची निंदा व द्वेष करणारेही ख्रिस्ती होत आहेत.

९९८ अ (इंग : १–२)

९९९ (१९ : १, २ ज्यानेवारी ६०, ४–५)

कलकत्याच्या भजनगृहात रेवरंड लाक्रोई उपदेश करीत असताना एका श्रोत्यास फार संताप आला. तो शरिराने दांडगा असून त्याच्या हातात काठी होती. त्याने साहेबांना डोक्यावर मारण्याचा प्रयत्न केला. पण चुकून काठीचा टोला खांद्यावर लागला. इतर श्रोते रागावले व त्यांनी या माणसास पोलिसांच्या ताब्यात देण्याचे ठरविले. पण साहेब त्याला म्हणाले, 'येशू म्हणतो की, तू आपल्या वैऱ्यावर प्रीति कर आणि जे द्वेष करतात त्यांचे बरे कर.' येशूची आज्ञा म्हणून त्याला सोडून देण्यात आले. जो तुरुंगात असावा, तो मोकळा व खुशालीत राहिला. या प्रसंगी बरकड श्रोत्यांनी खिस्ताचा जयजयकार केला. लाक्रोईसाहेबांनी आकाशातील बापाचा गौरव केला.

९९९ अ (इंग : ४)

१००० (१९ : १, २ ज्यानेवारी ६०, ५)

१९ नोवेंबर १८५९ रोजी रे. टेलर जोसेफ साहेबांचा मृत्यु झाला. त्यांनी उत्तर हिंदुस्थानात ४० वर्षे उपदेशकाचे काम केले. बेळगाव एथे बहुत वर्षे देवाचे काम केले. उत्तर हिंदुस्थानातील बंडात त्यांची एक कन्या भ्रतारासह मारली गेली. येशू खिस्त आपल्या सन्निध आहे, असे वाटून अतिशय उल्हासाने ते काम करीत असत.

१००० अ (इंग : ५)

१००१ (१९:१, २ ज्यानेवारी ६०, ६–७)

रामचंद्राया लिहितो की : आम्हा सर्वांचा सत्यानाश झाला आहे. गावातल्या प्रतिष्ठित लोकांनी आम्हांला बोलावून दमदाटी केली. कावेबाजपणाचा आरोप केला. आनंदायाच्या कुटुंबास गाव सोडून जाण्यास भाग पडले. हा अन्याय सहन झाला नाही, म्हणून आनंदायाच्या बायकोने दोन्ही मुलांसह तळ्यात उडी टाकून आत्महत्या केली. मातोश्री मरणोन्मुख आहेत. या सर्व अनर्थाचे कारण आनंदाया हाच आहे. या जिण्याच्या नाटकाचा कळस झाला आहे. हा सर्व प्रताप आनंदायाच्या धर्मपिसेपणाचा असल्यामुळे त्याचे तोंडही पहावेसे वाटत नाही. आपल्या जिवाची काही गरज जर असेल, तर त्याने गावाकडे येऊ नये.

१००१ अ (इंम : ६)

१००२ (१९ : १, २ ज्यानेवारी ६०, ७–८)

आनंदाया शेवटच्या पत्रात लिहितो की : आपल्या बायकोने मुलांसह जीव दिला, ही हकीगत खोटी आहे. देवपूर स्टेशनवर त्यांची सर्वांची भेट झाली. आता ते पाटना गावी सुखरूप आहेत. ईश्वरानेच आपली प्रार्थना ऐकली. काळा विरा या विश्वासू नोकराने सर्वांना थेटपर्यंत मदत केली. गावच्या एका दुष्ट माणसाने एक घोडेस्वार त्यांच्या पाठलागावर सोडला होता. आनंदायाला आता कसलीही काळजी वाटत नाही. रामचंद्रायाच्या मनामध्ये जरी द्वेषाची भावना असली, तरी तो प्रीतीच करणार. विचारवान आणि सुज्ञ लोक या बारा पत्रांचे तात्पर्य लक्षात घेतीलच. आमच्या सर्वकालिक जीवनासाठी देवाने एकुलता पुत्र दिल्हा आहे. या बारा पत्रांतील गोष्ट काल्पनिक नव्हे, तर जे घडण्यात आले त्याप्रमाणे सांगितले.

१००२ अ (इंम : ६)

१००३ (१९ : १, २ ज्यानेवारी ६०, ८–९)

मुंबई इलाख्यातील सर्व जिल्ह्यांचे एकूण क्षेत्रफळ ८० हजार ४४ चौ. मैल आहे. प्रजा ८४ लाख ५६ हजार ३९३ आहे. दर चौरस मैलास १६५.६ लोक राहातात. बेळगावचा व धारवाडचा विस्तार व प्रजा सर्वांत मोठी आहेत. खेडे जिल्हा सर्वांत लहान आहे. नगर जिल्ह्याची प्रजा सर्वांहून अधिक म्हणजे ९ लाख ९५ हजार ५८३ आहे. भडोचची लोकसंख्या थोडी आहे. नगरचे क्षेत्रफळ सर्व इलाख्याच्या एक अष्टमांश आहे.

१००४ (१९ : १, २ ज्यानेवारी ६०, ९–११)

त्रावणकोरातील उंच जातींनी शानार स्त्रिया अंगभर पोषाक करतात, म्हणून दंगल केली होती. दंग्याचा बंदोबस्त चांगला झाला नाही, म्हणून मद्रासचे गवर्णर चार्लस त्रिविलयनसाहेबांनी पत्र पाठवून कळविले आहे की : राणी सरकारने प्रजेच्या संरक्षणार्थ काही कृपेची वचने दिल्ही आहेत. शानार लोकांना मिळालेली वर्तणूक इतकी अमानुष आहे की, आम्ही जर या जुलमाविरुद्ध उभे राहिलो नाही, तर जगातील सुधारलेले लोक आमच्या तोंडावर थुंकतील. सत्य न्याय आणि मनुष्यपण यांच्या विरुद्ध उंच जातींची वागणूक आहे. त्रावणकोरचा राजाही म्हणतो की, हा रानटीपणाच आहे. ब्रिटिश सरकारचा प्रतिनिधी राज्यकारभारात सल्ला देत असतो, म्हणून या जुलमाचा दोष इंग्रज सरकारवरही येतो. यास्तव रयतेस स्वतंत्रता दिल्ही पाहिजे. शानार स्त्रियांचा कसा अपमान होतो, याबद्दल सरकारकडे अनेक अर्जी आल्या. राणीच्या जाहीरनाम्याचा विपरित अर्थ करणे, ही मूर्खपणाची गोष्ट होय.

१००५ (१९ : १, २ ज्यानेवारी ६०, ९-११)

'कैंदळकर' लिहितो की : राहुरीजवळ ब्राह्मणी गावी एका गुरूने स्पष्टपणाने कबूल केले की, ख्रिस्ती शास्त्राविषयी माझी खातरी झाली. पण जगाच्या लाजेमुळे मी काही बोललो नाही. पण याच गुरूने सर्व लोकांना सांगितले की, विहीर बाटली आहे. लोकांनी विहिरीचा उपसा केला. ब्राह्मणांना जेवू घातले. असे प्रायश्चित्त झाल्यावर लोक पाणी पिऊ लागले. यात ब्राह्मणाचे केवढे अज्ञानपण दिसते. आपल्या स्वार्थावर नजर ठेवून ते आपलेच हित करून घेतात. या जुलमातून ते मुक्त झाले, तर त्यांच्यावर पवित्र आत्म्याची वृष्टी होईल. यावर संपादक लिहितात की, प्रायश्चित्ताचे खरे कारण समजले नाही. इतर जातीयांनी पाणी घेतले नसताना स्वतःच्या दक्षिणेसाठी बारवेस शिक्षा दिल्ही. बारवेची गाळणी झाली हे बरे झाले.

१००६ (१९ : १, २ ज्यानेवारी ६०, १२-१३)

'मूर्तिपूजकांचा कळवळा करणारा' पत्रात लिहितो की : अहमदनगरमधील एक महादेव भंगला. देवळाच्या बाहेर नवे कारंजे आहे. ते 'बाटले' म्हणून देवाजवळच्या हौदामधून पाणी नेण्यास एक बाई गेली. तिच्या हातातील घागर पडून महादेव भंगला. भंगलेल्या देवाची पूजा निषेधार्ह असल्यामुळे दुसरा देव बसवावा, असा विचार चालू आहे. कलीमध्ये देवाचे देवपणच राहिले नाही, असे लोक म्हणतात. कारंजे बाटल्यामुळे देवाने स्वतःस भंगून देवाचे देवपणच राहिले नाही, असे लोक म्हणतात. कारंजे बाटल्यामुळे देवाने स्वतःस भंगून घेतले, असेही बोलतात. काही लबाड लोक तर हा गुन्हा ख्रिस्ती लोकांच्या माथ्यावरती टाकीत आहेत. नवे शिवलिंग बसविण्याची पोळीबाजांनी हिकमत सुरू केली, पण पूर्वीच्या शिष्टमंडळाचाच खर्च अजून भरून निघाला नाही. मुंबईस गेलेल्या बालिष्टरांचा खर्च दिल्हा गेला नाही. म्हणून त्याच देवाची पूजा करण्यास लोक राजी झाले. जे निरर्थक मूर्तींचा अभिमान धरतात, ते लज्जित होत असतात.

१००७ (१९ : १, २ ज्यानेवारी ६०, १३–१४)

अहमदनगरच्या पाणी प्रकरणाबाबत 'एक ख्रिस्ती' पत्रात लिहितो की : ख्रिस्ती लोकांचा पाणी भरण्याचा हक्क बुडवावा, म्हणून काही लोक ३५ रुपये घेऊन मुंबईस गेले होते. आगगाडीत बसण्याची त्यांची हौस फिटली. मुंबईतही अन्नछत्रावर जेवून त्यांनी यजमानांना विनंती केली की, कलकत्ता आणि विलायत येथपर्यंत पल्ला बांधून हा अनर्थ थांबवावा. या लोकांची दाद लागली नाही व ते परत आले. आता एका वडलर्फ शिरस्तेदारास दरमहा १५ रु. कबूल करून शिष्टाईस पाठवले आहे. इतरांची समजूत अशी झाली की, सार्वजनिक पैशावर चैन करण्याचा हा उद्योग आहे. ज्या कामात भट्ट पडेल, त्या कामाचा विचकोपा होत असतो. सध्या नव्या कारंज्यातून कोणीही हिंदू पाणी भरीत नाही. मुंबईस गेलेली शिष्टमंडळी मात्र 'गोपाळकाल्या'चे पाणी पीत होती. तेथे सर्वांच्या विटाळाचे पाणी पिणारे, येथे मात्र ख्रिस्ती लोकांना प्रतिबंध करीत आहेत.

१००८ (१९ : १, २ ज्यानेवारी ६०, १४–१६)

नानासाहेब नेपाळात मरण पावला, ही बातमी खरी आहे. नेपाळचा जंगबहादूर दररोज ४–५ बंडखोर पकडून इंग्रजाकडे पाठवीत आहे. नेपाळातून बंडखोर अगदी थोडक्याच दिवसात नाहीसे होतील.

१००९ (१९ : १, २ ज्यानेवारी ६०, १४–१६)

गवर्नर जेनरलसाहेबाच्या तंबूस मीरतजवळ आग लागून सरकारी कागदपत्र जळाले.

१०१० (१९ : १, २ ज्यानेवारी ६०, १४–१६)

ग्वाल्हेरचे महाराज आपल्या नोकरीत युरोपियन कंटिंजेंटची पलटण ठेवणार आहे.

१०११ (१९ : १, २ ज्यानेवारी ६०, १४–१६)

मद्रास मिशनमध्ये अलिकडे २०९२ माणसे नव्याने आली.

१०१२ (१९ : १, २ ज्यानेवारी ६०, १४–१६)

एका डाक्तराने सर्पदंशावर नवा उपाय सुचविला आहे. सर्पदंशाच्या जागी शस्त्राने लहान जखम करून नैत्रिक आसिद लावावे. रोगी बेशुद्ध झाला, तर त्याला अमोनिया पाजावा. या उपायाने बरेच रोगी बरे झाले.

१०१३ (१९ : १, २ ज्यानेवारी ६०, १४–१६)

जगातली पहिली वृत्तपत्र छपाई ७ नोव्हेंबर १६६५ रोजी झाली. (वृत्तसारवरून)

१०१४ (१९ : १, २ ज्यानेवारी ६०, १४–१६)

बेली नामे महाविद्वानाने सिद्ध केले की, पृथ्वीगोलाचे वजन १२,५६,१९ दशअब्ज टन आहे.

१०१५ (१९ : १, २ ज्यानेवारी ६०, १४–१६)

हिंदुस्थानच्या टपालखात्यातून गेल्या वर्षी ४ लाख २० हजार पत्रे गेली. प्राप्ती ३२ लाख रुपये, तर खर्च ४२ लाख रुपये झाला.

१०१६ (१९ : १, २ ज्यानेवारी ६०, १४–१६)

काबूलमध्ये एक सोन्याची खाण सापडली आहे. एक मुल्ला तेथून सोने आणून ते सराफांना विकीत असे. त्यांच्या भांडणातून सरदार अझमखानास खाणीचे वृत्त समजले. आता सरदाराने तेथे पहारा ठेवला असून सोने काढण्यास सुरुवात केली आहे.

१०१७ (१९ : १, २ ज्यानेवारी ६०, १४–१६)

भागुजी नाईकाचा बीमोड झाल्यामुळे आता शहाजी नाईकाने अनेक भिल गोळा करून बंड सुरू केले आहे. त्याचे साथीदार १५०० आहेत.

१०१८ (१९ : १, २ ज्यानेवारी ६०, १४–१६)

दिंडोरीचा मामलेदार गोपाळराव साने यांनी एका विवाहित स्त्रीस पळवून नेऊन तिसी व्यभिचार केला. पुण्याच्या 'ज्ञानप्रकाश' पत्रात बातमी आल्यावर तिच्या नवऱ्याने फिर्याद केली. मामलेदारास ६ महिन्यांची शिक्षा झाली व २०० रु. दंड झाला. ज्या चार लोकांनी खोट्या साक्षी दिल्या, त्यांना १–१ वर्षाची ठेप झाली. स्त्रीलाही २०० रुपये दंड झाला.

१०१९ (१९ : १, २ ज्यानेवारी ६०, १४–१६)

लष्करातील गुन्हेगारांची फटक्यांची शिक्षा विलायत सरकारने कायद्याने बंद केली.

१०२० (१९ : १, २ ज्यानेवारी ६०, १४–१६)

फ्रेंच सरकार चीनवर १२ हजार सैन्य पाठविणार आहे.

१०२१ (१९ : १, २ ज्यानेवारी ६०, १४–१६)

कलकत्त्याचे दोन रोमन कॅथॉलिक उपदेशक आणि मुंबईमधील दोन बैरागिणी रोमन मठाचा त्याग करून प्राटेष्टंट पंथाकडे आल्या. प्रभूच्या कृपेने अज्ञानातून सुटल्या.

१०२२ (१९ : १, २ ज्यानेवारी ६०, १४–१६)

रे. आबट यांच्या नोकरावर हल्ला केल्याबद्दल अहमदनगरच्या चार असामींना सुमारे १४०० रुपये दंड झाला.

१०२३ (१९ : १, २ ज्यानेवारी ६०, १४–१६)

आदनचे मि. गिल्डर आता मुंबई–मिशनचे काम करणार आहेत.

१०२४ (१९ : १, २ ज्यानेवारी ६०, १४–१६)

रे. गारेट यांची मह्सिूरचे डिरेक्टर आफ पब्लिक इन्स्त्रक्शण म्हणून नेमणूक झाली.

१०२५ (१९ : १, २ ज्यानेवारी ६०, १४–१६)

ज्या सापांना सुळेदात असतात, तेच फक्त विषारी असतात, हे लोकांना माहीत असले पाहिजे. कारण कित्येक लोक साप चावल्यावर नुसत्या भयानेच मरतात.

१०२६ (१९ : १, २ ज्यानेवारी ६०, १४–१६)

मि. हालडन फेन्विक् यांच्या पत्नी विंचू डसल्यामुळे एका तासात मृत्यु पावल्या.

१०२७ (१९ : १, २ ज्यानेवारी ६०, १४–१६)

गेल्या वर्षी ४३ हजार युरोपियन वृतपत्रे हिंदुस्थानात आली.

१०२८ (१९ : १, २ ज्यानेवारी ६०, १४–१६)

रे. स्कूलब्रेद व स्तील हे स्कॉटिश मिशनरी राजपुतान्यात अजमेर एथे मिशन सुरू करणार आहेत. रे. विल्सनही तिकडे गेले आहेत.

१०२९ (१९ : १, २ ज्यानेवारी ६०, १४–१६)

अमेरिकेत मिस्तर हिकाक याने पाण्यावरून चालण्यासाठी कथलाचे जोडे शोधले आहेत. तो अर्धा तास एका नदीवरून चालत होता. जमिनीवर जलदीने चालावें त्याप्रमाणे चालला.

१०३० (१९ : १, २ ज्यानेवारी ६०, १४–१६)

१८६० चे मराठी पंचांग छापून तयार आहे. किम्मत एक आणा आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

---

## ज्ञानोदय, पुस्तक १९, अंक २, मुंबई, १६ ज्यानेवारी १८६०

---

१०३१ (१९ : २, १६ ज्यानेवारी ६०, १८–२२)

ऑनराबल मान्स्टुवर्त हे गवर्णर एल्फिन्स्तनसाहेबाचे चुलते होते. त्यांचा जन्म पुरातन व कुलिन अशा स्कॉटिश घराण्यात झाला. १७९८ त ते हिंदुस्थानात आले. नागपूरमध्ये व काबूलला रेसिडेंट म्हणून काम केल्यानंतर १८१० पासून ते पेशवे दरबाराकडे आले. महाराष्ट्रात इंग्रजाचे राज्य सुरू झाल्यावर ब्राह्य मराठे सरदारांना त्यांनी काबूत आणले. त्यांच्या मनमिळाऊ स्वभावाने ते रयतेस अतिशय प्रिय झाले. त्यांना देशी भाषा चांगली अवगत होती. आपल्याकडे येणारास भेट घेतल्याशिवाय ते जाऊ देत नसत. शाळा, छापखाने, ग्रंथनिर्मिती, ग्रंथालये, वैद्य पाठशाळा, या बाबतींत त्यांची कामगिरी प्रशंसनीय ठरली. १८२६ त मुलींची शाळा मिशनाने सुरू केली. या साहेबानेच इकडे सतीबंदी अंमलात आणली. ३ लाख ८२ हजारांचा खर्च करून भजनालये बांधली. त्यांच्या बोलण्यात हलकट व अप्रतिष्ठित शब्द कधीही येत नसत. त्यांच्या कारकीर्दीत एकच वाईट गोष्ट झाली व ती म्हणजे वर्तमानपत्रावर फार नियंत्रण आले. १८२७ त ते परत गेले, तेव्हा त्यांच्या आठवणीखातर एल्फिन्स्तन विद्यालय व टाऊन हाल येथील त्यांचा पुतळा, या गोष्टी नेटिवांनी कृतज्ञता म्हणून केल्या. त्यांनी हिंदुस्थानचा विस्तृत इतिहास लिहून प्रसिद्ध केला आहे. ते व्यासंगी विद्वान होते. विलायत सरकारने त्यांना उमरावगिरी व कानडाचे गवरनरपद देऊ केले. ते त्यांनी नाकारले. मोठाले किताबही त्यांनी नाकारले. खडकीच्या लढाईतील विजयाबद्दलचे एक पदक मात्र स्वीकारले. मरणसमयी त्यांचे वय ७९ किंवा ८० असावे.

१०३१ अ (इंम : १७-१८)

१०३२ (१९ : २, १६ ज्यानेवारी ६०, १८–२२)

आफ्रिकेमधील एका राजाने विक्टोऱ्या राणीकडे मौल्यवान नजराणा देऊन वकील पाठविला. वकिलाने राणीस विचारले की, 'इंग्रज लोक इतक्या महत्त्वास व योग्यतेस चढले त्याचे गुज काय आहे?' राणीने नम्रतेने उत्तर दिले की : 'आम्ही प्रीतीने आणि ईश्वराच्या सद्भीतीने राज्य करतो, हे त्याचे गुज आहे. इंग्रजांचे राज्य सैन्यबळावर, जहाजांच्या समुदायावर, आरसेमहाल किंवा सोन्यारुप्याची भांडी, वैभव, यांवर अवलंबून नाही.'

१०३२ अ (इंम : ३२)

१०३३ (१९ : २, १६ ज्यानेवारी ६०, २३–२५)

मिसर देशाचा पाच्छा महंमद याने २० तरुणांना शिक्षणासाठी इंग्लंडमध्ये पाठविले. त्यात महमद एळकेलोही होता. दानधर्म व उपासतापास यांवर त्याची फार श्रद्धा असे. ख्रिस्ती लोकांना तो दुष्ट समजे. ख्रिस्ताचा तिरस्कार करीत असे. त्याच्या नेव्ही ऑफिसरने पवित्र शास्त्राचा विषय काढला की, तो उघडपणाने तुच्छता दाखवी. पुढे अधिकाऱ्याने त्याला पापाच्या शास्त्राचा विषय काढला की, तो उघडपणे तुच्छता दाखवी. पुढे अधिकाऱ्याने त्याला पापाच्या क्षमेचा सिद्धांत समजावून दिल्हा, तेव्हा त्याचे मन शास्त्रात रमू लागले. त्याची बुद्धी साधारणच होती. पण प्रत्येक गोष्टीचा खोल विचार केल्यावाचून तो काहीही मान्य करीत नसे. पाद्री ग्रिफीन याचा उपदेश त्याला आवडे. त्याच्या कल्पनेपेक्षा ख्रिस्ती धर्म त्याला फारच वेगळा वाटला. त्याचे उपयोगित्व व लाभ कळल्यावर तो दुखणाइतांनाही शास्त्र वाचून बोध करीत असे. १८३२ मध्ये तो फार आजारी झाला. दुखण्यात त्याची श्रद्धा वाढत गेली. आपली मालमत्ता शांत मनाने त्याने मित्रांना वाटून दिली. अखेरच्या रात्री धर्मोपदेशकाशी तो बोलत होता. मरताना तो येशूबद्दल म्हणाला : 'नाही दुसरा आश्रय । तूच करिसी निर्भय ॥' नंतर इतर तरुणांनी ख्रिस्ती धर्माची दीक्षा घेतली.

१०३३ अ (इंग : २३)

१०३४ (१९ : २, १६ ज्यानेवारी ६०, २५–२६)

पुण्याजवळ भीमेच्या काठावर तुळापूर नावाचे गाव आहे. त्याच्या नावाबद्दल अशी दंतकथा सांगतात की : औरंगजेबाची छावणी भीमेच्या तीरावर होती. त्यावेळेस एक नावाडी बादशहाशी बोलत होता. त्याचा नकल्या स्वभाव व नोकझोकीची उत्तरे ऐकून औरंगजेबाने त्यास विचारले, 'माझ्या स्वारीच्या हत्तीचे वजन किती आहे सांग बरे ?' तेव्हा नावाड्याने तो हत्ती नावेवर चढविला. मग नाव पाण्यात जेवढी बुडाली होती, त्या जागेवर खूण केली. त्या खुणेपर्यंत धोंडे नदीत टाकले. मग त्या धोंड्यांचे वजन केले. म्हणून या गावास 'तुळापूर' असे नाव बादशहाने दिल्हे.

१०३५ (१९ : २, १६ ज्यानेवारी ६०, २६–२७)

आफ्रिका खंडात गोरिला हे चमत्कारिक माकड आढळते. ते माणसाप्रमाणे दोन पायावर चालते. त्याची उंची ५-६ फूट असते. त्याचे बाहू माणसाच्या तंगडीएवढे जाड असतात. ते माणसांना आपटून मारू शकते. 'निशेगो' गोरिलाच्या डोक्यावर केस नसतात. झाडाच्या दुभाळक्यामध्ये घर बांधून ते राहाते. गोरिलाची बोटे ठोसर आणि आखूड असतात. कुलुकांबा प्रकारचे गोरिला केसाळ असतात. दाढी व कल्ले यांमुळे ते हबशी माणसाप्रमाणे वाटते. त्याची बोटे लांब आहेत व त्याला बोलता येत नाही. एरव्ही त्यांना 'रानमनुष्ये' म्हणता आले असते.

१०३६ (१९ : २, १६ ज्यानेवारी ६०, २७–२८)

भट्टोजि दीक्षित हा व्याकरणकार सुमारे ५०० वर्षांपूर्वी जन्मला. तो गौड ब्राह्मण असावा. त्याचा 'सिद्धांतकौमुदी' हा व्याकरणग्रंथ अतिशय सुलभ व बिनचूक आहे. 'मनोरमा' ही कौमुदीची टीका आहे. 'वैयाकरणभूषण' हा अर्थविचाराचा ग्रंथ आहे. यातून व्युत्पत्ती समजते. 'कौस्तुभ' ही भाष्यावरील टीका असून तिची भाषा सुलभ व प्रौढ आहे. भाष्याचे महत्त्व कायम राहावे म्हणून पंडितांनी हा ग्रंथ बुडविला, अशी दंतकथा आहे. भट्टोजीने देशपर्यटन करून आपल्या ग्रंथांच्या नकला वाटल्या. त्याने काशीस राहून व्याकरणशास्त्राचा अभ्यास केला होता. त्याच्या मुलाचे नाव 'भानू' होते. भानूचे आजोबा वैजनाथ भट्ट यांनी 'परिभाषेंदुशेखरा'वर टीका केली होती. मृत्यूनंतर तो ब्रह्मपिशाच बनला व दोन शिष्यांना त्याने व्याकरण शिकविले, अशी आख्यायिका सांगतात.

(मूळ टीप : हा विषय कविचरित्र या ग्रंथाच्या १७–२०पृष्ठांवरून घेतला आहे.)

ज्ञानोदयकर्त्यांची टीप : कर्नाटक देशाचा आद्य राजा मयूर वर्मा याने गौड ब्राह्मणांची पुष्कळ कुळे शालिवाहन शकाच्या नवव्या शतकात कोंकण ते कऱ्हाड यांमधील सह्याद्रीच्या पायथ्याशी आणून स्थापिली. त्यांत भट्टोजि दीक्षिताचा आजा सकुटुंब होता. ब्रिटिश लोकांचे हिंदुस्थानात राज्य येईपर्यंत या लोकांस शेणवी हे पद होते. शेणवी म्हणजे सैन्याचा अधिकारी. संस्कृतात त्यास सेनाधिपति असे म्हणतात. आता ते लोक कारकुनी, कोणी व्यापार करितात.

१०३७ (१९ : २, १६ ज्यानेवारी ६०, २८–२९)

रा. जनार्दन रामचंद्रजी कळवितात की : 'कविचरित्र' या पुस्तकामध्ये अनेक प्राचीन व अर्वाचीन विख्यात कवी आणि ग्रंथकार यांची चरित्रें मी दिली आहेत. संस्कृत, मराठी, तेलगू व तामीळ कवींचाही यात परामर्श घेतला आहे. १८१ कवींची व ग्रंथकारांची माहिती ३०० पृष्ठांत देत आहे. मूल्य दीड रुपया आहे. वर्गणीदारांनी आपली वर्गणी पाठवावी.

१०३८ (१९ : २, १६ ज्यानेवारी ६०, २९–३०)

'ज्ञानोदय वाचणारा' पत्रात म्हणतो की : या देशात ज्योतिष नामे एक प्रबळ दैत्य माजला असून त्यायोगे लोकांना दुःख व पीडा सोसावी लागतात, हे पाहून सुज्ञ व सुशिक्षित लोकांना फार वाईट वाटते. किन्ही गावच्या जोशाने लोकांना सांगितले की, गावच्या मारुतीला अनिष्ट ग्रह लागला आहे. मारुतीला घाम फुटला अशी वार्ताही पसरविली. खऱ्या देवावर कधी असे संकट येणार नाही व आले तरी माणूस ते काय दूर करणार आहे? धर्मोपदेशकाने जोशास दटावले, तर तो डोळे मिचकावून म्हणाला की, 'आमच्या पोटावर पाय कां देता?' मग सर्वांनी मारुतीची तेलशेंदूर मारून पूजा केली. एक काडी घेऊन बाजरीत फिरविली. संकट गेले, असे आश्वासन मिळाल्यावर जोशास चार आणे दक्षिणा मिळाली. एकंदरीत सर्व ढोंग आहे. यापेक्षा आंधळ्या-पांगळ्यास द्यावे.

१०३९ (१९ : २, १६ ज्यानेवारी ६०, २९–३०)

उत्तरेकडील बंड अगदी मोडून गेले आहे. प्रमुख बंडखोर मरण पावले. उरलेले इंग्रजांच्या कैदेत आहेत. खान बहादूर खान हा बंडखोर तर हत्तीची शिकार करीत असताना सहजगत्या पकडला गेला. हत्तीच्या मागावर असताना त्याला जंगबहादूर भेटला. आपण साहेबलोकांसी वाईट वर्तणूक केल्यामुळे आपणांस फार लाज वाटते, असे तो म्हणाला. तेवढ्यात जंगचे लष्कर आले आणि त्याने खानास ताब्यात घेतले. बंडखोरांना आश्रय देणारे संभात्रीत नेटिव आता भयभीत झाले आहेत. आपण जर कोणाला आश्रय दिल्हा, तर इंग्रज आपले घरदार खणून काढतील, अशी त्यांना भीती वाटते. आता फिरोझ शहा, आदिल अहमद, गोदासिंघ आणि अयोध्येची बेगम, एवढेच काय ते बाहेर राहिले आहेत. बेगम ही स्त्री असल्यामुळे तिला पकडण्याचे सरकारास विशेष अगत्य नाही. इतरांना पकडण्याची तजवीज होत आहे.

१०४० (१९ : २, १६ ज्यानेवारी ६०, ३१–३२)

गुजरातेत वाघर लोकांची आणि इंग्रज लष्कराची मोठी लढाई होऊन वाघरांचा अगदी मोड झाला. बरेच मेले. ७०० कैद झाले. इंग्रजांचे १५ सैनिक मेले.

१०४१ (१९ : २, १६ ज्यानेवारी ६०, ३१–३२)

बिठूरच्या नानासाहेबांच्या वाड्याचे संगमरवरी धोंडे सरकारने जप्त केले आणि कानपूरच्या ख्रिस्ती भजनालयास फरसबंदी करण्यासाठी नेले.

१०४२ (१९ : २, १६ ज्यानेवारी ६०, ३१–३२)

अयोध्येच्या सुभ्यात बऱ्याच दिवसांत कोणी स्त्री सती गेली नव्हती. परंतु काही दिवसांपूर्वी फैजाबादेस सतीचा प्रकार घडला. तिच्या नातेवाईकांना सरकारने कठोर शिक्षा दिली.

१०४३ (१९ : २, १६ ज्यानेवारी ६०, ३१–३२)

सुरतेमध्ये भयंकर आग लागून अनेक घरे जळाली. ज्यांचे नुकसान झाले, त्यांच्या साहाय्यासाठी जहांगीरजींनी एक हजार आणि फ्रामजी नसरवानजी यांनी ८ हजार रुपये दिल्हे.

१०४४ (१९ : २, १६ ज्यानेवारी ६०, ३१–३२)

नगरमध्ये पाण्याच्या बखेड्यावरून एका नेटिव ख्रिस्त्यास मारहाण झाली. या खटल्यात १३ जणांना ६७५ रुपये दंड झाला. इतर दोघांना ७५ रुपये व ५० रुपये असा दंड झाला.

१०४८ (१९ : २, १६ ज्यानेवारी ६०, ३१–३२)

नगर जिल्ह्यात एबले मुक्कामी गणपतीच्या दिवसांत काही लोकांनी न्यायाधीश व कोर्ट यांचे सोंग आणले. या नकली न्यायाधीशाने एका वाण्यास सांगितले की 'तू आपले दुकान सेशन कोर्टासाठी रिकामे करून दे.' परंतु काही साहेबांनी या मंडळींवर खटला भरला. कोर्टाच्या बेअब्रुवरून २४ असामींना एकूण १ हजार रुपये दंड झाला.

१०४९ (१९ : २, १६ ज्यानेवारी ६०, ३१–३२)

मुंबई इलाख्यातील तुरुंगखात्याचे इन्स्पेक्टर बेरिंग्टनसाहेब यांनी ठराव केला आहे की : तुरुंगातील कैद्यांनी एकमेकांशी बोलू नये. मुकाट्याने काम करावे. एका कोठडीत एकाच कैद्यास ठेवावे. हा कायदा अंमलात आल्यावर गुन्ह्याचे प्रमाण कमती होईल, असे त्यांना वाटते.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**१०४७** (१९ : ३, १ फेब्रुवारी ६०, ३४–३७)

इंग्लंडची महाराणी म्हणते की : इंग्रजांच्या वैभवाचे रहस्य ख्रिस्ती शास्त्रामध्ये आहे. हिंदुस्थानात काही ठिकाणी पोर्तुगीजांचे राज्य असून ते माणसांची पूजा करतात. फ्रान्सिस झाव्यरसारख्या संताची प्रार्थना करतात. त्यांच्या हाडांचे तुकडे विकतात. भोळे भ्रमिष्ट लोक ते विकतही घेतात. त्यांच्या कल्पित कहाण्या शास्त्रवत् मानतात. ईश्वराच्या ठिकाणी माणसाला मानणे, हे हलकेपणाचे व निर्बळपणाचे गुज आहे. गोव्याच्या सरकारने असे जाहीर केले की, सेंट झाव्यरच्या प्रेताची सर्वांनी पाहणी केली आणि आता ते दर्शनासाठी खुले आहे. वास्तविक ते अत्यंत विरूप अवस्थेमध्ये आहे. पण शेकडो पोर्तुगीज लोक भक्ती दाखविण्यासाठी गोव्यात जमत आहेत. संत झाव्यरचा जन्म १५०६ मध्ये तर मृत्यू १५५२ मध्ये झाला. मृत्यूनंतर ७० वर्षांनी कॅथॉलिक मिशनने त्याला साधू ठरविले. हा जेसुइट मिशनरी चीनला गेला होता. त्याने केलेले चमत्कार अतिशयोक्तिसह सांगून लोक त्याच्या हाडांची पूजा करतात. पण सांताक्रूझ जहाजाबद्दलचे त्याचे भविष्य खोटं ठरले. हे जहाज कधीच मोडणार नाही, असे तो म्हणाला होता, पण तीस वर्षांनंतर ते पार मोडून गेले. सत्पुरुषांच्या हाडांची भक्ती, नवस, प्रार्थना, हे ख्रिस्ती शास्त्राच्या विरुद्ध आहे.

**१०४७अ** (इंग्र : ३३–३४)

**१०४८** (१९ : ३, १ फेब्रुवारी ६०, ३८)

सोल्जरलोक बहुधा मस्ती करणारे व सरकारच्या प्रजेस उपद्रव करणारे असतात, हे तर सर्वांस ठाऊक आहे. गोऱ्या पलटणी स्थलांतरास जातात, तेव्हा वाटेने मारहाण व लूट करतात. काही वेळा स्त्रियांची अब्रूदेखील घेतात, परंतु एक चांगला अनुभव येथे नमूद करतो. कोल्हार या गावी काही मिशनरी उपदेश करण्यास गेले. जवळच सरकारची गोरी पलटण उतरली होती. अनेक सोल्जर जत्रेत शांतपणाने उपदेश ऐकत उभे राहिले. त्यांनी कसलाही उपद्रव दिल्हा नाही. नंतर असे कळले की, ते नियमित प्रार्थना करतात आणि त्यांच्या प्रार्थना मंडळ्याही आहेत. क्रूर सिंह आणि लांडगे प्रार्थनेच्या योगाने मेंढरे बनतात.

**१०४८ अ** (इंम : ३७–३८)

**१०४९** (१९ : ३, १ फेब्रुवारी ६०, ३८–३९)

कच्च्या शाईने लिहिल्यामुळे अगर दुसऱ्या काही कारणाने लिहिलेली अक्षरे पुसट झाली असतील, तर अर्धा चमचा प्रुसिएट ऑफ पोट्यास घेऊन पाण्यात मिश्रित करून ठेवावे. उंटाच्या केसाचा कलम करून ते अक्षरावर फिरवा, म्हणजे ती ठळक होतील. अथवा अधेलाभर काळा चहा अर्ध्या वाटीभर कढत पाण्यात कुसकरून घ्यावा; किंवा याच प्रमाणात क्यार्बोनेट ऑफ सोडा घ्यावा अथवा पाव औंस हिराकस अर्धवाटी पाण्यात टाका. किंवा सल्फ्युरेट ऑफ पोट्यासिएम तितक्याच पाण्यात मिसळा. यांपैकी कोणताही द्राव अक्षरे ठळक बनवितो. त्यातल्या त्यात पहिला प्रकार सर्वांत जास्त उपयुक्त आहे.

**१०४९ अ** (इंम : ३८)

**१०८०** (१९ : ३, १ फेब्रुवारी ६०, ३९–४०)

वेल्स आणि लंडन शहर येथे कित्येक महिन्यांपासून प्रार्थनेच्या मंडळ्या सुरू आहेत. कार्डिगानशैर परगण्यातील ८० हजारांपैकी १५ हजार प्रजा प्रार्थना करते. ईश्वराच्या कृपेच्या सिंहासनासमोर आग्रही प्रार्थना केली जाते. आपल्या महापातकांनी शारीरिक पीडा पावून पश्चात्तापाने दग्ध होतात, मग ते ईश्वराची स्तुती करतात. लंडन शहरातील ६० मंडळ्यांत प्रत्येकी २०० पासून ५०० पर्यंत लोक जमतात. व्यापारी लोक, स्त्रिया, गरिबांची लेकरे, यांच्या स्वतंत्र प्रार्थना होतात. उगीच गप्पा छाटणारे लोक मनापासून ईश्वराची स्तोत्रे गातात. आता रूक्ष अरण्यांच्या जागेवर आत्मिक फळांची समृद्धी होईल. हिंदुस्थानात काही नामधारी व दर्शनी ख्रिस्ती लोक दुराचरण करून अडखळण व विघ्नरूप होत आहेत. पण ते जर देवाचे खरे भक्त बनले आणि सर्व धर्मातील सुशिक्षित तरुण प्रभू येशूकडे आले, तर किती बरे होईल.

**१०८१** (१९ : ३, १ फेब्रुवारी ६०, ४०–४२)

जगद्गुरू प्रभू येशूने शिष्यांना आज्ञा दिल्ही होती की, सर्व जगामध्ये जाऊन शुभवर्तमान गाजवा. त्यायोगे अनेक लोक खोटा धर्म सोडून तारणाऱ्या मार्गावर आले. गेल्या शेपन्नास वर्षांत हा प्रयत्न फार चालू आहे. अमेरिकेतील १६ मंडळ्या व युरोपातील २५ मंडळ्या देशोदेशी मिशनरी पाठवितात. यासाठी ९० लाखाहून जास्त खर्च होतो. मुंबई इलाख्यात ३६ मिशनरी कार्य करतात.

१०६२ (१९ : ३, १ फेब्रुवारी ६०, ४२–४५)

उच्चवर्णीयांच्या योगे देशास काही लाभ न होता हानी मात्र होते. काही लोक नेहमी म्हणतात की, ब्राह्मणांची निंदा करणे, हाच यांचा उद्योग आहे. पण लोकहितवादीने काही वर्षांपूर्वी प्रभाकर पत्रात हेच म्हटले होते. इंग्रज लोक या देशातून गेले, तर अंदाधुंदी व भालेराई होईल, असे त्याने लिहिले. बाजीरावाच्या गोष्टीवरून दिसते की, इंग्रजांसमोर ब्राह्मणशाही टिकली नाही. ढोंगाने पूजा करणारे मूर्खशिरोमणी त्यांच्यांत फार आहेत. स्वहस्ताने तुळशीपत्र खुडण्यापासून अग्निहोत्रापर्यंत सतत निरर्थक उद्योग ते करतात. त्यांचे आयुष्य कर्मठपणातच चालले आहे. कोणाच्या तरी घरी जेवून १२ वर्षे अध्ययन केल्याबद्दल डौल ते मिरवितात. पण स्वतः उपजिविका मिळविण्याचे सामर्थ्य त्यांजपाशी नाही. व्यावहारिक विद्या येत नाही, व्यापार-धंदा समजत नाही. घोकंपट्टी करणारास दान दिल्यामुळे आळसाची वृद्धी मात्र होते. ढबलेबाबाचे ढोंग माहीत असून लोक त्याला दक्षिणा देत असत. कोणीही चाल मोडली की, हे त्याचा द्वेष करितात. म्हणूनच उपासतापास आणि नवससायास यांपेक्षा वास्तविक ज्ञान वाढावयास हवे. संन्यासी आणि यात्रेकरून हे बेवकूब लोक असतात. त्यांचे ढोंग मोडून त्यांस शुद्धीवर आणले पाहिजे. रयतेनेसुद्धा आळशांना असा आश्रय देणे बंद करावे.

१०६३ (१९ : ३, १ फेब्रुवारी ६०, ४५–४६)

एका कैद्यास काळ्या पाण्याची शिक्षा झाली असता त्याने फाशीची मागणी केली. पण कोर्टाने त्याची विनंती फेटाळून काळ्या पाण्याची शिक्षा कायम केली.

१०६४ (१९ : ३, १ फेब्रुवारी ६०, ४५–४६)

दिल्लीमध्ये २०० लोकांनी बाप्तिस्मा घेतला. त्यांच्यात चांभार लोक जास्त आहेत. मद्रासकडे ३५०० जण मंडळीत आले. अहमदनगरात कित्येकजण सहकुटुंब खिस्ती झाले.

१०५५ (१९ : ३, १ फेब्रुवारी ६०, ४५–४६)

बंगाल्यातील कपूरथाळ्याचा राजा ख्रिस्ती मिशन स्थापन करून त्याचा सर्व खर्च करणार आहे. त्याने स्वतः ख्रिस्ती स्त्रीशी लग्न केले.

१०५६ (१९ : ३, १ फेब्रुवारी ६०, ४५–४६)

न्यूयॉर्कमध्ये एक कॅथालिकसाहेब व वैरागीण प्रातेस्तंत पंथात आली.

१०५७ (१९ : ३, १ फेब्रुवारी ६०, ४५–४६)

गुजराथच्या शाळाखात्याचा डेपुटी इन्स्पेक्टर महिपतराम रूपराम इंग्लंडला जाणार आहे. त्याजबरोबर दोन हिंदू चाकर राहातील.

१०५८ (१९ : ३, १ फेब्रुवारी ६०, ४५–४६)

कलकत्त्यातील एक हिंदू तरुण फिलादेल्फिया येथे शिक्षणासाठी गेला, तेव्हा त्याला भरतखंडातील २० कोटी लोकांचा प्रतिनिधी मानून मंडळीमध्ये प्रार्थना करण्यात आली.

१०५९ (१९ : ३, १ फेब्रुवारी ६०, ४५–४६)

भरतखंडातून १५ हजार फौज चीनकडे जाणार.

१०६० (१९ : ३, १ फेब्रुवारी ६०, ४५–४६)

फिलादेल्फिया शहराची लोकसंख्या १० वर्षांत ६६ टक्के वाढली.

१०६१ (१९ : ३, १ फेब्रुवारी ६०, ४५–४६)

सुरतमध्ये एका पिसाळलेल्या कोल्ह्याने एका वाण्याच्या मुलीस गंभीररीत्या जखमी केले.

१०६२ (१९ : ३, १ फेब्रुवारी ६०, ४६–४८)

गवरनर जनरलच्या छावणीतील आग लेडी कानिंगच्या तंबूतील शेगडीमुळे लागली होती.

१०६३ (१९ : ३, १ फेब्रुवारी ६०, ४६–४८)

कप्तान ग्रांत या साहेबाने एका वेळी हजारो माणसांचा स्वयंपाक तयार करण्याची युक्ती शोधली आहे. चिनी लढाईत ५००० माणसांचा स्वयंपाक एका वेळी करता येईल.

१०६४ (१९ : ३, १ फेब्रुवारी ६०, ४६–४८)

सर्प चावला असता दंशित भागावर ओली राख टाकावी. दोन चमचे मोहऱ्यांचे पीठ गरम पाण्यात घालून प्यावे.

१०६५ (१९ : ३, १ फेब्रुवारी ६०, ४६–४८)

रेशमी कापडावरील डाग घालवायचा असेल, तर ५ तोळे लिंबाचा अर्क व २॥ तोळे टरपेन तेल मिश्रित करून डागावर चोळावे.

१०६६ (१९ : ३, १ फेब्रुवारी ६०, ४६–४८)

मद्रास इलाख्यात ५२ हजार गावे असून मद्रास शहराची वस्ती ७ लाख आहे. (प्रभोदयवरून)

१०६७ (१९ : ३, १ फेब्रुवारी ६०, ४६–४८)

१८५८ मध्ये दहा लक्ष उतारूंनी रेल्वेने प्रवास केला. गाडीखाली सापडून एक प्रवासी आणि सात नोकर मरण पावले.

१०६८ (१९ : ३, १ फेब्रुवारी ६०, ४६–४८)

जगन्नाथ शंकरशेट यांनी स्वतः चालविलेल्या शाळेकरिता २० हजार रुपये अनामत देऊ केले.

१०६९ (१९ : ३, १ फेब्रुवारी ६०, ४६-४८)
फोर्जिटसाहेब पुढील मे महिन्यात विलायतेस जाणार

१०७० (१९ : ३, १ फेब्रुवारी ६०, ४६-४८)
राणीच्या लष्करातील एक हापिसर पेटविलेल्या विडीने आग लागून मरण पावला. (लखनौ हेरल्डवरून)

१०७१ (१९ : ३, १ फेब्रुवारी ६०, ४६-४८)
मक्केची यात्रा यंदा फक्त ५० हजारांची भरली. कारण पटकीच्या वाख्याने गेल्या वर्षी शेकडो लोकांचा मृत्यू झाला होता.

१०७२ (१९ : ३, १ फेब्रुवारी ६०, ४६-४८)
कोटगडचे मिशन पैशाच्या कमताईमुळे मोडणार आहे.

१०७३ (१९ : ३, १ फेब्रुवारी ६०, ४६-४८)
रॉबर्ट पार्टसन आणि जान टेलर पंजाबातील सियालकोट मिशनात उपदेशकाचे काम करतील.

१०७४ (१९ : ३, १ फेब्रुवारी ६०, ४६-४८)
तिनिविली मिशनात १४ नेटिवांना उपदेशकाचा दर्जा मिळाला.

१०७५ (१९ : ३, १ फेब्रुवारी ६०, ४६-४८)
आता तारेसही पाकिटाप्रमाणे तिकिटे लावावीत, असा पोस्ट खात्याने हुकूम काढला.

१०७६ (१९ : ३, १ फेब्रुवारी ६०, ४६-४८)
कराचीपासून आदनपर्यंत विजेची तार टाकली जाईल.

१०७७ (१९ : ३, १ फेब्रुवारी ६०, ४६-४८)

फराकाबादेचा नवाब दोन चाकरांसह आदनकडे रवाना झाला.

१०७८ (१९ : ३, १ फेब्रुवारी ६०, ४६-४८)

ब्रह्मदेशाचा राजा तारायंत्र, लोखंडी रस्ते, वगैरे सुधारणुकींची कामे करणार आहे.

१०७९ (१९ : ३, १ फेब्रुवारी ६०, ४६-४८)

मुंबईच्या किल्ल्याची तटबंदी मजबूत करण्याचे काम सुरू होणार आहे. या कामास ७ वर्षे व २० लक्ष रुपये लागतील. (प्रभोदयवरून)

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**१०८०** (१९ : ४, १५ फेब्रुवारी ६०, ५१–५५)

कॅथॉलिक व ग्रीक यांच्या मतांकडून शुद्ध ख्रिस्ती धर्माचा अपवाद आणि निंदा होतात. निर्जीव व सडक्या पदार्थांकडून चमत्कार होतात, असे त्यांना वाटते. पण पुष्ट रोगग्रस्तांच्या समुदायावर जसा सिंह जय पावतो, तसा ख्रिस्ती धर्म विजयी होईल. झाव्यरची ममई वधितल्यावर एका मुलीचे पायाचे व्यंग नाहीसे झाले, असे तिची आई सांगते. पण यास वैद्याचीच काय, परंतु साध्या यात्रेकरूचीही साक्ष नाही. प्रेतपूजा करणारांचे कोण समाधान करणार? येशू तर म्हणत असे की, पारख करा, मग विश्वास ठेवा. आपल्या मताला अनुकूल राहणे, हा मानवी स्वभाव आहे. ख्रिस्त गरीबच होता, पण त्याने समजुती वाढू दिल्या नाहीत. यासाठी त्याच्या शिष्यांना हानी व पाठलाग सोसावी लागली. येशूचे चमत्कार मात्र अगदी खरे आहेत. कारण तो देवपुत्र होता. खरे व खोटे सोने ओळखता येते. तुमच्या मृत साधूंची नखे व केस चमत्कार करीत असतील, तर निदान व्याधिग्रस्तांना तरी बरे करा. वांझ स्त्रीस लेकुरवाळी बनवा. तुमचे ढोंग, टकविद्या आणि थोतांड उघडे पडेलच पडेल.

**१०८० अ** (इंम : ४९–५१)

**१०८१** (१९ : ४, १५ फेब्रुवारी ६०, ५६-५८)

रा. मोडकांनी नगरला ५ वर्षे काम केले. मुंबईच्या मंडळीस त्यांची आवश्यकता वाटते. म्हणून त्यांच्या जागेवर विष्णू भास्कर करमरकर यांना नेमून मोडकांस मुंबईस नेले आहे. रे. बालंटैननी या प्रसंगी स्तोत्र वाचले. सर्वदिक्षत पालकपदाची जबाबदारी घेण्यास त्यांनी कबुली दिल्ही. 'निर्भयपणे शास्त्र गाजवा, मनात लाज ठेवू नका. सगळे धर्मग्रंथ तत्परतेने वाचावे, कारभाऱ्याप्रमाणे विश्वासू राहून कळपातील मेंढरांचे पालण करावे.' असा उपदेश झाल्यावर त्यांनी ईश्वराचा आशीर्वाद मिळावा म्हणून प्रार्थना केली. ईश्वरी ज्ञानाचा प्रकाश सर्वत्र फाकेल, याची खात्री आहे.

**१०८१ अ** (इंम : ५५-५६)

**१०८२** (१९ : ४, १५ फेब्रुवारी ६०, ५८-६४)

अमेरिकेत एक धार्मिक गृहस्थ राहात होता. त्याची स्त्री शहाणी व सुबुद्धीची होती. त्यांची सहा लेकरे अतिशय आदर्श होती. त्यांच्या तोंडांत शिवीगाळ अजिबात नसे. प्रार्थना व बोध हे जणू त्यांच्या मनाचे अन्न होते. पण एक दिवस ती मुले लबाड बोलली. हे बापास कळल्याबर तो अत्यंत दुःखी झाला. मुलांना शिक्षा करण्याच्या कल्पनेने गहिवरला. त्याची पत्नी कळवळून म्हणाली की, 'मुलांना मारण्यापेक्षा मला शिक्षा करा'. हे ऐकून तिची थोरली मुलगी सर्वांची शिक्षा स्वतःवर घेण्यास तयार झाली. तिचा पवित्र आत्मा अनुभवून आई संतुष्ट झाली. ईश्वर न्यायी असून पापाचा द्वेष करतो. तो सर्वांवर दया करतो. पश्चात्ताप झाला, तर क्षमा करतो. ही तत्त्वे त्यांच्या अंगवळणी पडली होती. पवित्र शास्त्र वाचले, तर आत्मिक ज्ञानाबरोबरच उपयोगी असे जगिक ज्ञानदेखील मिळते. जो नम्र आणि लीन, तो धन्य असतो. आईबाप जर मुलांना रागावले, तर मुलांची बिघडणूक होते. त्यांस मायेने व बोधाने जिंकावे.

**१०८३** (१९ : ४, १५ फेब्रुवारी ६०, ६४)

आग्रा येथे गवरनर जेनरल यांना शिंदे महाराज भेटले. त्यांना २ लक्षांचा मुलुख व दत्तकाची परवानगी मिळाली. (प्रभोदयवरून)

**१०८४** (१९ : ४, १५ फेब्रुवारी ६०, ६४)

अमेरिकेत लोखंडाने मढवलेली गलबते तयार झाली. ती वादळात किंवा खडकावर आपटल्याने फुटणार नाहीत, इतकी बळकट आहेत.

**१०८५** (१९ : ४, १५ फेब्रुवारी ६०, ६४)

सन १८५९ मध्ये अमेरिकेत ४५ लाख गठ्ठे कापूस पिकला.

**१०८६** (१९ : ४, १५ फेब्रुवारी ६०, ६४)

अमेरिकेत रस्ते झाडण्याचे यंत्र निघाले आहे. त्याचा खर्च आठवड्याला ४ हजार रुपये आहे.

**१०८७** (१९ : ४, १५ फेब्रुवारी ६०, ६४)

एका साहेबाने बलूनच्या साहाय्याने अटलांटिक महासागर ओलांडण्याची सिद्धता केली आहे. गेल्या ५० वर्षांत तीन हजार बलून उडाली. पण फक्त एका माणसाचा मृत्यू झाला, तोदेखील त्याच्या निष्काळजीपणामुळे. म्हणून त्याला भीती वाटत नाही. आता आगगाड्या व आगबोटी यांच्याप्रमाणे बलून सर्रास उडू लागतील. आतापर्यंत ८ हजार लोकांनी बलूनमधून यशस्वी प्रवास केला आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १९, अंक ५, मुंबई, १ मार्च १८६०

**१०८८** (१९ : ५, १ मार्च ६०, ६७–७२)

वुड मडमेचे वय मृत्यूसमयी ३४ होते. अमेरिकेतील हावर्डसाहेबाची ती मुलगी होती. १८४७ त तुर्कस्थानातील स्मर्णा गावी ती प्रथम शिक्षिका झाली. धार्मिक स्त्रियांना ती शुभवर्तमान सांगे. तिने अनेकांना प्रभूकडे फिरविले. लिंच बर्गला शिकविण्याचे काम केल्यावर तीन वर्षांपूर्वी ती हिंदुस्थानात आली. तिची नेमणूक सातारा मिशनमध्ये झाली. तिला साताराचे घर फार आवडले. निसर्गरम्य प्रदेशात तिने प्रभूचे काम अविरतपणे केले. तिने मराठी शिकून घेतले होते. ईश्वरावरील विश्वास आणि प्रीती, हा तिचा आधार होता. मध्यंतरी ती काही दिवस नगरास राहिली व कामावर रुजू होण्याकरिता साताऱ्यास जाण्याकरिता निघाली. वाटेवर वाखा लागून तिचा मृत्यू झाला. सार्वकालिक जीवन प्राप्त व्हावे, म्हणून ती आकाशात गेली. मृत्यूच्या अंधारमय नदीस पार करून ईश्वराप्रत गेली. खरे भक्त आपल्या मरणाने ईश्वराचे गौरव वाढवितात

**१०८८ अ** (इंग : ६५–६७)

१०८९ (११ : ५, १ मार्च ६०, ७२-७५)

अहमदनगरच्या पाणीप्रकरणाबाबत 'एक ख्रिस्ती' लिहितो की : नगरमध्ये एका कारंजावर काही ख्रिस्ती स्त्रियांनी पाणी भरले. पुरुषांनी ते पाहिले आणि स्त्रियांना चिथवले. 'बाट्यांनी डाव साधला.' अशी बडबड स्त्रिया करीत होत्या. काही नेटिव हिंदूंनी जवळचा सरकारी नळ फोडून तेथेच पाणी भरले. शिपायाने त्यांना प्रतिबंध केला. तिसऱ्या दिवशी पाहिले, तर कोणीतरी करंज्यामध्ये मुद्दाम कचरा टाकला होता. पाण्यात पाखरू व कुत्रे मेल्याबद्दलही हूल उठली. कसेही करून ख्रिस्ती लोकांना उपद्रव द्यावा, अशी यांची वृत्ती आहे. त्यांनी ख्रिस्ती लोकांना धक्के मारून त्यांवर धोंडे व धूळ फेकली. ढकलाढकली करून लाथा मारल्या. एका ख्रिस्ती धर्मोपदेशकाच्या घरावर दगड फेकले. फौजदाराने ख्रिस्त्यांना फार मदत केली. ३० असामींना पकडून खटले भरले. त्यांपैकी तेरा जणांना ६७५ रुपये दंड झाला. एकाने माफी मागितली. सरकारने योग्यायोग्य पाहून चांगला बंदोबस्त केला. विनाकारण व गैरशिस्त फिर्याद कोणी करणार नाही. फौजदार खरसेट नसरवान आणि माजिस्त्रेत रामचंद्र अमृत दुगल अपराधीदेखील मदत करतात. कर्मठ व धर्मपिसाट अधिकारी असते, तर त्यांनी खऱ्याचे खोटे करून ख्रिस्ती लोकांसच फाशात आणले असते.

**१०९०** (१९ : ५, १ मार्च ६०, ७५–७६)

'एक एत्तद्देशीय ख्रिस्ती' लिहितो की : ख्रिस्ती महात्म्यांच्या प्रेताचे दर्शन घेतले, म्हणजे माणूस निरोगी होतो, हे खोटे आहे, पण त्यावरून काही लोक मोश्याच्या चमत्कारांनाही खोटे ठरवू पाहतात. पण मोशे हा काही साधू किंवा गुरू नव्हता. मिसर लोकांच्या दासत्वातून लोकांना त्यानेच मुक्त केले. फारोशी लढण्यास त्याने उत्तेजन दिल्हे. गुलामीच्या कष्टामधून त्याने प्रजेला दुधाच्या व मधाच्या प्रदेशात नेले. मोशेच्या चमत्कारांनी यहुदी लोकांची सुटका झाली. मोशे जर ठक असता, तर लोकांनी त्याच्यावर विश्वास ठेवलास नसता. मोश्या ईश्वराचा लाडका होता. म्हणून ईश्वराने यहुद्यांना सोडविले. बोकडांचे रक्त दारावरती शिंपले गेल्यामुळे यहुद्यांची बालके मृत्यूपासून बचावली. म्हणून मोश्याच्या चमत्कारांना खोटे म्हणण्यापूर्वी पुरता विचार करावा.

**१०९१** (१९ : ५, १ मार्च ६०, ७६–७८)

'मूर्ख चालीस हसणारा एक' लिहितो की : आज ग्रहण होते. चंद्राचे ग्रहण सुटल्यावर लोकांनी भोजन केले. ही चाल हजारो वर्षांची असून तिजविषयी विचार झाला नाही. व्युत्पन्न लोकांनी विचार केला, तर त्यातील गैरशिस्तपणा कळेल. ईश्वरप्रेरित ग्रंथांना मान दिला नाही किंवा ब्राह्मणास गुरू मानले नाही, तर माणूस नास्तिक ठरतो. चंद्राचे शुद्ध मंडळ दिसल्याशिवाय लोक जेवत नाहीत, परंतु आपल्या उपवासानेच ग्रहण सुटेल, अशी शेखी मिरविणे चूक आहे. ज्योतिषांचे पंचांगातील गणितही काही अंशाने चुकत असतेच. तरी ग्रहणात भोजन न करण्याची चाल सोडून द्यावी.

**१०९२** (१९ : ५, १ मार्च ६०, ७६–७८)

दोन हजार बंडखोर पकडल्यामुळे लखनौचे सर्व तुरुंग भरले गेले. (प्रभोदयवरून)

**१०९३** (१९ : ५, १ मार्च ६०, ७६–७८)

नानासाहेब मेल्याची बातमी खोटी आहे. तो जोग्याचा वेष घेऊन बद्रीनाथकडे गेलेला आहे. त्याची मालमत्ता मात्र सरकारने जप्त केली.

**१०९४** (१९ : ५, १ मार्च ६०, ७६–७८)

तुफुझल हुशेन खान हा रिसालदार ४६ वर्षे सरकारची नोकरी करीत होता. बंडाच्या काळात त्याने केलेल्या मदतीबद्दल त्यास तहहयात ६ हजारांची जहागीर देण्यात आली. बंडखोरांनी दोनदा त्याचे घर लुटून फार नुकसान केले होते.

**१०९५** (१९ : ५, १ मार्च ६०, ७६–७८)

निजामाच्या एका आसामीने त्याचे न ऐकता रेसिडेंटच्या छावणीमध्ये घर विकत घेतले, त्यावरून लढाई होऊन उभय पक्षाचे लोक जखमी झाले.

**१०९६** (१९ : ५, १ मार्च ६०, ७६–७८)

विडी पेटविताना जो साहेब आग लागून मेला, त्यास दुसऱ्या साहेबाने रजई गुंडाळून व आग विझवून वाचविण्याचा प्रयत्न केला, पण त्याचा काही उपयोग झाला नाही.

**१०९७** (१९ : ५, १ मार्च ६०, ७६–७८)

नगरच्या शास्त्र्यांनी सोलापूरच्या ब्राह्मणांना पत्र लिहून विचारणा केली आहे की, खिस्ती लोकांना कारंजावरून पाणी भरू द्यावे की नाही? सोलापुरात सभा भरली म्हणतात. पण अजून जबाब आलेला नाही.

**१०९८** (१९ : ५, १ मार्च ६०, ७६–७८)

नगर जिल्ह्यांतील दिंडोरीचा मामलेदार गोपाळ रामचंद्र याची शिक्षा अपिलात रद्द झालेली आहे. कायदे आणि लोकव्यवहार यांचा मेळ बसविणे प्रायः मनुष्याकडेच आहे. (ज्ञानप्रकाशवरून)

१०९९ (१९ : ५, १ मार्च ६०, ७८–८०)

सिंधमध्ये 'दक्षिण आफ्रिकन ज्वारी 'ची लागवड होते आहे. हे नवे धान्य उत्कृष्ट असून त्याच्या ताटापासून साखर निघते. दक्षिणेतही ही लागवड होईल, तर बरे होईल.

११०० (१९ : ५, १ मार्च ६०, ७८–८०)

हाल्ली बंगाल्यात ९० हजार काळी, तर ५५ हजार गोरी फौज आहे. फ्रेंड ऑफ इंडियाचा कर्ता म्हणतो की, इतक्या फौजेची गरज नाही. ही फौज निम्मी असावी.

११०१ (१९ : ५, १ मार्च ६०, ७८–८०)

हिंदू सणांकरिता सरकारने ११ सुट्या दिल्या, तरी त्यांना आणखी चार सुट्या हव्या आहेत. उद्देश काय, तर पोटभर जुवा खेळणे, दारू पिणे, शिमग्यात अमंगल बोलणे, आणि गोवऱ्या चोरणे. शिमगा हा सण काही शाबाथ (विश्राम) दिनाप्रमाणे नाही.

११०२ (१९ : ५, १ मार्च ६०, ७८–८०)

कोणी एक एत्तद्देशीय गृहस्थ इंग्रजी वर्तमानपत्र काढणार आहेत, पण आम्हांस वाटते की, सुशिक्षित तरुणांनी इंग्रजी पत्राच्या नादी लागू नये. त्यांच्या इंग्रजी पत्राचे फारसे वजन पडणार नाही. उपहास मात्र होईल. त्यापेक्षा इंग्रजी पत्रांना बातम्या पाठवाव्या.

११०३ (१९ : ५, १ मार्च ६०, ७८–८०)

गेल्या वर्षी इंग्लिश सरकारने ८१७ शिडांची जहाजे आणि १५३ आगबोटी बांधल्या.

११०४ (१९ : ५, १ मार्च ६०, ७८–८०)

सन् १८५८ मध्ये मुंबईहून ४ लाख ५७ हजार कापसाचे गठ्ठे विलायतेस गेले, तर १८५९ मध्ये ७ लाख ८५ हजार ५२१ गठ्ठयांची निर्यात झाली.

११०५ (१९ : ५, १ मार्च ६०, ७८–८०)

नगर शहरात गेल्या वर्षी अकरा लक्षांचा उदीम झाला.

११०६ (१९ : ५, १ मार्च ६०, ७८–८०)

अफूच्या निरखांच्या बातम्या पाठवण्यातून तार खात्यास ५० हजारांचे उत्पन्न मिळाले.

११०७ (१९ : ५, १ मार्च ६०, ७८–८०)

मोरोक्को आणि स्पेन यांच्यात मोठी लढाई चालू आहे.

११०८ (१९ : ५, १ मार्च ६०, ७८–८०)

केप आफ गुड होप विभागात नाताळ या ठिकाणी रुप्याच्या खाणी सापडल्या. (वृत्तसारवरून)

११०९ (१९ : ५, १ मार्च ६०, ७८–८०)

डाक्तर भाऊ दाजी यांनी मोठ्या कुशलतेने एका सात वर्षांच्या मुलाचा मुतखडा काढला. त्याचे वजन तीन तोळे होते. (प्रभोदयवरून)

१११० (१९ : ५, १ मार्च ६०, ७८–८०)

रत्नागिरीच्या मिऱ्या डोंगरावर कुलाब्याच्या दांडीसारखा लहान दिवा तयार केला जाईल. त्यासाठी १,०३४ रुपये खर्च येईल. (जगन्मित्रवरून)

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**११११** (१९ : ६, १५ मार्च ६०, ८१–८२)

अहमदनगर जिल्ह्यात कोकमठाण आणि संवत्सर या गावांचे लोक दरवर्षी लढाई खेळतात. अज्ञानी लोकांच्या मूर्ख समजुतीवरून ही विलक्षण आणि क्रूर चाल बहुत काळापासून चालू आहे. दोन्ही गावांचे लोक नदीच्या दोन तीरावर उभे राहतात आणि गोफणीने दगड मारतात. हा काही पोरखेळ नाही, तर या पाषाणास्त्राने अनेकजण गंभीर जखमी होतात. हातपाय किंवा डोळा गमावण्याचे अनेक प्रकार घडतात. ज्या खिस्ती धर्मोपदेशकाने ही लढाई प्रथमच पाहिली, त्याचाही डोळा निकामी झाला. पीक चांगले यावे, म्हणून ही लढाईची पद्धत पडलेली आहे. जर मनात द्वेष ठेवला नाही, तर पीक येणार नाही, अशीही समजूत आहे. या वैशाखी लढाईची सरकारला चांगली माहिती आहे. सरकारने लोकांना ताकीद दिली, पण खेडूत ऐकत नाहीत. खोंडांचे मनुष्यबळी, काठेवाडचा कन्यावध, या अघोर चाली बंद करणारे सरकार स्वस्थ बसेल काय? नेटिव अंमलदार याविषयीच्या बातम्या दाबीत असावेत, असा अंदाज आहे. सरकार योग्य बंदोबस्त करील अशी आमची आशा आहे.

**११११ अ** (इंग : ८१)

११११२ (१९ : ६, १५ मार्च ६०, ८२-८५)

'गावोगावी फिरणारा ख्रिस्ती' लिहितो की : ज्या वृद्ध माणसांनी जुन्या आमदानीमध्ये व्याघ्राप्रमाणे अस्पृश्यांवर कडकडीत अंमल चालविला, ते ओरडत आहेत की, हिंदू धर्म एकंकार होत चालला. ख्रिस्ती लोकांच्या अंगावर व्याघ्र व चित्ता यांच्याप्रमाणे बुभुक्षितपणे तुटून पडण्यास पाहात आहेत. या भागात मिशनाचे काम चांगले चालले आहे. मंडळीत येण्याचा लोक हट्ट धरतात. उपदेशकांनी किंवा ख्रिस्ती भावांनी आमच्याकरिता तंबू ठोकून दिल्हे. भोवताली दुष्टाईची चट लावून नरकाग्नीकडे नेणाऱ्या लोकांची पाले होती. ते पापाचा विक्रय करतात. यात्रेमध्ये अनेक ख्रिस्ती लोक आलेले होते. नेटिव हिंदूंना फार आश्चर्य वाटले. शिपायास विचारले की, तुम्ही तमाशा बंद का करीत नाही ? तर उत्तर मिळाले : 'कोणाचाच इलाज नाही. अंमलदार तमाशा पहाताहेत. बीभत्स गाण्याविरुद्ध कायदा आहे. पण त्याची अंमलबजावणी नाही.' मग उपदेशकांनी तमाशात जाऊन कायदे पाळण्याची विनंती केली. काही लोक खाली डोया करून पळाले. नंतर शुभवर्तमान सांगितले. तमाशा मात्र चालूच राहिला. लोक देवासाठी येत नाहीत, तमाशाकरिता येतात. या भक्तीची पायली भरत आलेली आहे.

**१११३** (१९ : ६, १५ मार्च ६०, ८५–८७)

'एक फिरस्ता' पत्रात लिहितो की : भेरडापुरात एक गोंधळी नाच्यासारखे हावभाव करीत होता. तेणेकरून पाटलाने त्यास हाकलून लावले. बायकांस मोहित करण्याचे त्याचे चाळे पाटलास आवडले नाहीत. पाटलांना अशा गोष्टीचा त्रास वाटतो. पुढे एक संभावित गृहस्थ भेटले. ते मला खिस्ती धर्म स्वीकारल्याबद्दल टोचू लागले. मला भूल पडली, असेही म्हणाले. सगळे जग वैरी झाले, तरी मी खिस्तास सोडणार नाही. 'सटवीचे अक्षर टळत नसते' असा शेरा मारून हा गृहस्थ एका ब्राह्मणाची कथा सांगू लागला. कारण तो महारणीशी गुप्तात लागू होता. पण इकडे ब्राह्मणाबरोबर भोजन करीत होता. त्याच्या गावातले ब्राह्मण पूर्वीच भ्रष्ट झाले. त्यांनी नाकाने कंदर्प सोलू नये. अनेक व्यभिचारी ब्राह्मण तुमच्या जातीत आहेत. शाक्तांचे खाणे-पिणे सर्वांनाच ठाऊक असते. एक वैद्य दारू पिऊन गटारात लोळतो. 'दृष्टीआड सृष्टी' म्हणून तुम्ही डोळ्यांवर कातडे ओढता. तेव्हा ब्राह्मणांनी शुद्धीवर येऊन पाप्याविषयीची चळवळ थांबवावी.

११९४ (१९ : ६, १५ मार्च ६०, ८७–८८)

'एक हिंदुकांक्षाद्वेषक' लिहितो की : हिंदू लोकामध्ये अनेक कांक्षा व भ्रामक समजुती आहेत. कोणी आजारी पडला, तर भुताचे घरबंधन करीत बसतात. घोडनदीजवळच्या एका गावात नुकत्याच जन्मलेल्या एका मुलीस चार दात होते. तेव्हा तिच्या आजीने पंचाक्षरी बोलावला. तो अनेक अशुभ लक्षणे वर्तवू लागला. हे मूल झाड व घरदारावर खराटा फिरविणारे निघणार, म्हणून दानधर्म केला. म्हातारी जास्तच खचली व रोगी होऊन मेली. हाही त्या बालिकेचा 'पायगुण'च समजला गेला. तिच्या बापास कोणी सांगितले की, मुलगी तुझ्या मुळावर आली. त्यानेच म्हैस मोडली, बैल आंधळा झाला, वगैरे. पण ही दुर्दैवी बालिका तीन महिन्यांची होऊन परलोकी गेली. सर्वांना हायसे वाटले. कोणी रडलेही नाही. वाचणाऱ्यांनी विचार करावा की, एखादे लहान मूल कुटुंबावर विघ्न आणू शकेल काय ? पापामुळे विघ्ने येऊन दुःख होते. हिंदूंच्या कांक्षा म्हणजे मांत्रिक लोकांची लबाडी होय. असल्या मूर्ख कांक्षा दूर झाल्या पाहिजेत.

११९५ (१९ : ६, १५ मार्च ६०, ८८–९०)

'ज्ञानोदय वाचणारा' पत्रात लिहितो की : पवित्र शास्त्राचा प्रसार सुंदर रीतीने चालतो. शिंगवे नायक येथे ५० माणसे मिशनाकडे आली. ईश्वर एक आहे आणि ख्रिस्ती शास्त्रच मानवाचे तारण करील, यांवर लोकांचा विश्वास बसत आहे. हिंदूंमधील ज्ञानाची किल्ली फक्त ब्राह्मणाच्या हातात आहे. कोणाच्याने वाचवेना, असे शास्त्र देव देईलच कसा ? अचेतन ईश्वराचे ब्रह्मरूपाने वर्णन करणे अयोग्य होय. अवतारी देवाच्या चरित्रात पापाच्या गोष्टी आढळतात. वेद आणि पुराणे यांतील वर्णन अगदी परस्परविरुद्ध असते. माणूस स्वपुण्याने तारला जातो. मग देवाचे काय महत्त्व राहिले ? भागीरथीत हाडके टाकल्यामुळे कोणी स्वर्गास जात नाही. ख्रिस्ती धर्मच खरा आहे. तो सर्व जगात पसरल्यावाचून राहणार नाही.

११२६ (१९ : ६, १५ मार्च ६०, ९०–९४)

प्रीसलीसाहेबाने १७७४ मध्ये सिद्ध केले की, वायू हे मिश्र तत्त्व आहे. १७८५ मध्ये मिस्तर स्कील याने आक्सीजन ग्यासचा शोध लावला. वायुमध्ये २१ भाग आक्सीजन, ७८ भाग नैत्रोजन व एक भाग कार्बानिक आसिड ग्यास असतो. आक्सीजन हा स्थितिस्थापक असून ज्वलनास मदत करतो. त्याच्यावाचून कोणी जिवंत राहणार नाही. त्याच्या मिश्रणाने वानस्पत्य व खनिज पदार्थांस आम्लता आली आहे. पाण्यातही आक्सीजन असतो. उलट नैत्रोजनने ज्वलनक्रिया बंद होते. हा ग्यास प्राणघातक आहे. त्यास वास व रंग नाही. तो सर्व ग्यासांत जास्त जड आहे. कार्बानिक आसिडने तर माणूस गुदमरतो, चुन्याच्या भटीत हा ग्यास प्राणघातक ठरत असतो. हिऱ्यामध्ये शुद्ध कार्बान सापडतो. सावधगिरी म्हणून कोळशाच्या खाणीत मेणबत्ती जाळून पाहावे. मेणबत्ती विझली, तर तेथे जाऊ नये. जिवाला धोका असतो. हवेतील आक्सीजन ग्यासाचे प्रमाण वाढविले, तर मनुष्य हजारो वर्षे आनंदाने जगू शकेल. घाणेरे पाणी, डबकी, अरण्ये, यांचा कोंदटपणा नाहीसा झाला पाहिजे. मग रोगबीजे कमी होऊन माणसाचे आयुष्य फार वाढेल. तो दोनशे वर्षे जगेल. यमसदनभूत पृथ्वी स्वर्गरूप होईल. सद्‌गुणांची वाढ होईल.

१११७ (१९ : ६, १५ मार्च ६०, ९५–९६)

मीठ हा फार उपयोगी जिन्नस बहुतकरून सर्व देशांत मिळतो. समुद्र, झरे, सरोवरे, डोंगर, ही त्याची उत्पत्तिस्थाने आहेत. पोलंड देशात ७४३ फूट खोल मीठ सापडते. स्पेनमध्ये कारडोबात ५०० फुटी मिठाचा डोंगर आहे. मिठाकडून पाचनशक्ती प्रदीप्त होती. मीठ खाल्ले नाही, तर जठररस कमी होऊन कृमी (जंत) होतात. हालंद देशात कैद्यांना मीठ देत नसत. म्हणून ते जंत होऊन मरत. रेचकपणाने मीठ कोठा साफ राखते. मुलांना कृमी झाले, तर मीठ जास्त खाऊ द्यावे आणि मिठाई कमी द्यावी. अजीर्णाने १५ वर्षे आजारी असलेल्या माणसाला नियमाने मीठ दिले, तेव्हा त्याच्या तोंडातून मोठा जंत पडला. दातदुखी किंवा सूज, यांवरही मिठाचा उपयोग होतो. येशू म्हणत असे की : 'तुम्ही पृथ्वीचे मीठ आहात. आपले बोलणे मिठाने चवदार केल्याप्रमाणे कृपायुक्त असावे'. (प्रभोदयवरून)

१११८ (१९ : ६, १५ मार्च ६०, ९६)

रेव. टेलर गुजरात मिशनात व स्वार्थत नागपूरमध्ये प्रभूचे काम करतील.

१११९ (१९ : ६, १५ मार्च ६०, ९६)

शेकडो रोमन काथेलिक प्रातेस्तंत होत आहेत, म्हणून आम्हांस फार आनंद वाटतो. बेलफास्तमध्ये शंभर, तर इलिनॉय संस्थानात हजारोंनी या पंथात प्रवेश केला. बोहिम्या देशात तर गावेच्या गावे प्रातेस्तंत बनली.

११२० (१९ : ६, १५ मार्च ६०, ९६)

इराणचे आखात व हिंदुस्थान यांत प्रतिवर्षी १ कोटी ६३ लक्षांचा व्यापार चालतो. (जगन्मित्रवरून)

**११२१** (१९ : ६, १५ मार्च ६०, ९६)

फतेगडच्या पोस्तमास्तरने सरकारशी दगाबाजी केली, म्हणून त्यास ६ महिन्यांची कैद झाली व ६ हजार रुपये दंड झाला.

**११२२** (१९ : ६, १५ मार्च ६०, ९६)

लखनौ दरबाराच्या वेळी गवर्णर जनरलसाहेबास ६८,७३० रुपयांच्या मोहरा नजर मिळाल्या. साहेबाने यापेक्षा जास्त किंमतीचे पोषाख वाटले. (जगन्मित्रवरून)

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १९, अंक ७, मुंबई, २ एप्रिल १८६०

**११२३** (१९ : ७, २ एप्रिल ६०, ९८–९९)

एक धर्मोपदेशक महाबळेश्वरचा घाट उतरून वाई येथे गेला होता. या रस्त्यावर प्रथम पांचगणी गाव आहे. त्याची हवा आरोग्यकारक आहे. ख्रिस्तवासी ग्रेवसूसाहेब येथे बंगला बांधून राहिला होता. मिस्तर चेसन या साहेबाने येथे बुंदाची पुष्कळ झाडे लावली आहेत. बुंद आणि स्वादिष्ट पीछ फळाच्या बागाही लावल्या. गुलाबांच्या ताट्याही तयार केल्या. जवळच मुशाफरांसाठी बंगला तयार होत आहे. पाचगणी ते वाई पायवाटेने तीन कोस आहे. हा अत्यंत रमणीय प्रदेश आहे. जागोजाग शेते नांगरलेली आहेत. पाऊस मात्र लांबला आहे. कृष्णातीरावर दरोबस्त ख्रिस्ती भजनालये होतील, तेव्हा पाहणारांचे डोळे अगदी निवतील. लोक शांतपणाने उपदेश ऐकतात. पण ख्रिस्ती धर्मातील महद्गत्याच्या गोष्टीबाबत ते अज्ञानी दिसले.

**११२३ अ** (इंम : ९७–९८)

११२४ (१९ : ७, २ एप्रिल ६०, १००-१०४)

या महाराष्ट्र देशात ब्राह्मणी विधवेचा पुनर्विवाह झाला, म्हणून आम्हांस आनंद वाटतो. ब्राह्मणातील विधवा किती पापमोहात दिवस काढतात, हे सर्वांना ठाऊक आहे. कित्येक भ्रूणहत्या होतात. म्हणून सुधारकांनी कंबरा कसल्या पाहिजेत. रघुनाथ जनार्दन हा सरकारी नोकर व नर्मदा नावाची विधवा या शेणवी ब्राह्मणांचा विवाह पुण्यात झाला. गोखल्यांच्या बागेत अतिशय गुप्तपणे कार्य पडले. फक्त २० माणसे हजर होती. रा. बळवंतराव गोपर्डीकरांनी तेथे सुरस व्याख्यान दिल्हे. आता नवे ग्रामण्य सुरू होणार, असा रंग आहे. सुधारणूक आणि अज्ञान यांचा निकराचा संग्राम होण्याचा समय आला. अज्ञानरूपी राजाचा शिरच्छेद लवकरच होईल. दक्षिणा आणि तूपपोळ्या यांच्या मोबदल्यात ग्रामण्याचे निराकरण करण्याची आशा दाखविली जाईल. पण कोट्यवधी विधवांची कैदेतून सुटका मात्र होईल. याबद्दलचे ब्राह्मणांचे बंड सिद्धीस जाणार नाही, असे पक्के समजावे. मुंबईत एका देशस्थ 'रावसाहेबा'ने ब्राह्मणी विधवेशी पुनर्विवाह केला. कार्य गुप्तपणाने झाले. आता विधवांना ते अश्रू आणि दुःखही सोसावी लागणार नाहीत.

११२४ अ (इंम : ९९-१००)

**११२८** (१९ : ७, २ एप्रिल ६०, १०५–१०६)

मूर्तिपूजेविषयी राममोहन रायाची मते कशी काय होती, ते भागवतांनी लिहिलेल्या चरित्र पुस्तकावरून कळते. सन १८१६ मध्ये वेदांताच्या भाषांतरास लिहिलेल्या प्रस्तावनेत तो म्हणतो : 'हिंदू लोक कोट्यवधि देव मानतात. त्यांची स्वतंत्र देवळें बांधून पूजा करतात. ही मुळात परमेश्वराची लाक्षणिक भक्ती होती. परंतु आता तिला स्थिर आचारधर्माचे स्वरूप आले आहे. कोणी जर वादोपक्रम केला, तर त्याला सर्वजण नास्तिक म्हणतात. मला मात्र सारासार विचार आणि सामान्य बुद्धी यांवरून वाटते की, ब्रह्मांडाचा पालनकर्ता व नियंता कोणीतरी ज्ञानसंपन्न आणि अनादि आत्मा आहे. तो सर्वशक्तिमान् आणि सर्वांहून श्रेष्ठ आहे. त्यास पुरतेपणी जाणणे किंवा त्याचे वर्णन करणे, आपल्या सामर्थ्यापलिकडचे आहे. म्हणून इंद्रियगोचर पदार्थ हाच देव मानणाराचे मूर्खत्व लक्षात येते. या अज्ञानी लोकांची मला कीव येते. माझ्या स्वतंत्र मतामुळे मला निंदा व अपमान सोसावीं लागलीं. पण सद्भावपूर्वक प्रार्थना, हाच ईश्वरभक्तीचा खरा मार्ग आहे. भगवंत गुप्तपणे पाहातो व उघडपणे प्रतिफळ देतो.

**११२८ अ** (इंम : १०४–१०५)

**११२९** (१९ : ७, २ एप्रिल ६०, १०६–१०७)

एक म्हातारा ब्राह्मण काही उद्योग मिळेना, म्हणून पंतोजीचे काम करू लागला. एक दिवस शिकवीत असताना त्याची लाळ सुताराच्या मुलाच्या पाठीवर पडली आणि त्याचा सुरका भिजला. पंतोजीने मुलास सांगितले की, ब्राह्मणाचे तोंड म्हणजे तीर्थकुंड आहे. थुंका म्हणजे महातीर्थ आहे. सुताराच्या मुलाने विचार केला की, आपल्या घरामधील पितरांची हाडे या 'तीर्थात' टाकावीत. म्हणून त्याने त्या अस्थींचा चुरा केला व दुसऱ्या दिवशी गुरुजींच्या तोंडात टाकला : खरा प्रकार समजल्यावर पंतोजी फार खजिल झाला.

११२७ (१९ : ७, २ एप्रिल ६०, १०६-१०७)

संख्याशास्त्रज्ञांचा असा अंदाज आहे की, पृथ्वीतलावर १ अब्ज ३० कोटी माणसे राहातात. शरीररचनेवरून काकेडयन, मोगल्यन, मले, इथयोप्यन, अमेरिकन, इंदियन असे ५ प्रकार होतात. त्यांपैकी सर्वांत जास्त मोगल्यन, म्हणजे ५२ कोटी २० लाख आहेत. प्रातेस्तंत खिस्ती, काथोलिक व ग्रीक धर्मीयांची संख्या ३३ कोटी ५० लाख आहे. यहुदी महमदी १६॥ लाख, तर मूर्तिपूजक ८० लाख आहेत. अमेरिकेत सुधारित लागवडीच्या पद्धती असल्यामुळे तेथे चांगले पोषण होते. उद्योगानेच माणसाची संपत्ती वाढते. उत्तम शेती, मध्यम व्यापार आणि कनिष्ठ चाकरी, अशी म्हण आहे. म्हणून कृषिकर्म करण्याकडे लक्ष पुरवावे. युरोपियन बळकट, ज्ञानी, कुशल, पराक्रमी व सुखी आहेत. कारण खिस्ती धर्माने त्यांची मने प्रकाशित झाली.

११२८ (१९ : ७, २ एप्रिल ६०, १०९)

तुकाराम हा देव होता, असे नेहमी लोक बोलतात. पण गोधाजी पाटील याने कीर्तनात एक अभंग सांगितला. त्याचा मतितार्थ असा आहे की : माणसाला देव म्हणणे, हा पापाचा उपाय आहे. लोकांकडून पूजा घ्यावी, असा आपला अधिकार नाही. आपले पाप आपल्या मनाला ठाऊक असते. ईश्वराच्या हातात सुरी आहे आणि माझे डोकेही आहे. तो योग्य काय ते करील. या आशयाचा अभंग खाली दिला आहे. अखेरच्या चरणात 'तुका म्हणे' असा शब्दप्रयोग आहे.

११२९ (१९ : ७, २ एप्रिल ६०, १०९-११०)

मुंबई पलटणीच्या बंडास होळकरांचे सहाय्य आहे, ही बातमी खोटी ठरली.

११३० (१९ : ७, २ एप्रिल ६०, १०९–११०)

दिल्लीचा बादशहा बहादूरशाह याचा रंगूणच्या तुरुंगात छळ केला जातो, असा अर्ज राणी सरकारकडे गेला होता. पण बादशहाने सरकारी अधिकाऱ्यांना सांगितले की: आपणांस कोणत्याही गोष्टीची उणीव पडू दिली जात नाही. माझ्या नशिबाने माझी ही स्थिती झाली आहे. अधिकाऱ्यांचा काही दोष नाही.

११३१ (१९ : ७, २ एप्रिल ६०, १०९–११०)

उत्तर हिंदुस्थानमधील बंडामुळे सरकारला ४० कोटींचे कर्ज झाले. त्यावरचें व्याज २ कोटी आहे.

११३२ (१९ : ७, २ एप्रिल ६०, १०९–११०)

दिल्लीचा किल्ला मोडून टाकून आग्र्याच्या किल्ल्याभोवती खंदक खणला जाईल.

११३३ (१९ : ७, २ एप्रिल ६०, १०९–११०)

पेंढाऱ्याचें बंड ४७ वर्षांनंतर पुन्हा सुरू झाले. नवसारी गावी एका ब्राह्मणास ठार मारून त्यांनी ५०० चा ऐवज नेला.

११३४ (१९ : ७, २ एप्रिल ६०, १०९–११०)

फरुक्काबादेच्या नबाबास अरबस्थानच्या किनाऱ्यावर सोडून देण्यात आले. मात्र त्याने पुन्हा हिंदुस्थानात येऊ नये, अशी ताकीद देण्यात आली.

११३५ (१९ : ७, २ एप्रिल ६०, १०९–११०)

बंडकाळात इंग्रजांना मदत केली, म्हणून जंगबहादूर यांना विशेष अब्रू व योग्यता मिळतील.

**११३६** (१९ : ७, २ एप्रिल ६०, १०९-११०)

कानपूरच्या एका फकिराने बरेच दिवस १४ औंस वजनाचा दगड हातात धरून ठेवला आहे. तो म्हणतो की, 'मी एका मडमेस हा धोंडा मारणार होतो, पण तो हातास चिकटून बसला'. हे खरे असेल काय? की पैसे मिळविण्यासाठी ढोंग आहे?

**११३७** (१९ : ७, २ एप्रिल ६०, १११-११२)

कोणी म्हणतात झाशीची राणी मेली नाही, ती नेपाळात जिवंत आहे.

**११३८** (१९ : ७, २ एप्रिल ६०, १११-११२)

जर्मनीत अनेक काथोलिकांनी प्रातिस्तंत पंथ स्वीकारला.

**११३९** (१९ : ७, २ एप्रिल ६०, १११-११२)

अमेरिकेत ४ हजार वर्तमानपत्रे असून पैकी ५०० दैनिके आहेत. अनेक वर्तमानपत्रांचे प्रत्येकी १४ ते १५ लक्ष वर्गणीदार आहेत. अशी अभिरुची या देशात केव्हा निर्माण होणार?

**११४०** (१९ : ७, २ एप्रिल ६०, १११-११२)

इंग्लंडपेक्षा हिंदुस्थानचा विस्तार १४ पट आहे, पण विलायतेतील तयार मालाच्या एक दशमांश माल एकट्या हिंदुस्थानात खपतो.

**११४१** (१९ : ७, २ एप्रिल ६०, १११-११२)

युरोपचा ज्वालामुखी विजुव्यस विझविण्यासाठी समुद्राचे पाणी आणण्याची योजना तयार झाली असून या कामास १० लाख रुपये खर्च येईल.

**११४२** (१९ : ७, २ एप्रिल ६०, १११–११२)

चिलमने व गुडगुडीने 'मदत' अफू (अफूचा अर्क) ओढल्याबद्दल एका ब्राह्मणास नगरात दंड झाला.

**११४३** (१९ : ७, २ एप्रिल ६०, १११–११२)

जर्मनीतील एका विद्वानाने माणसाच्या डोक्यावरील केस मोजण्याचा प्रयोग केला; तर निरनिराळी माणसे ८८,७४० पासून १,०९,४४० पर्यंत केस डोक्यावर वागवितात, असे सिद्ध झाले. यावरून नेटिवांच्या धर्मग्रंथातील केसांचा आकडा म्हणजे आटकळपंचविशी ठरते :

**११४४** (१९ : ७, २ एप्रिल ६०, १११–११२)

टकलावर केश उगविण्याच्या औषधाचा शोध अमेरिकेत लागला आहे.

**११४५** (१९ : ७, २ एप्रिल ६०, ११२)

मुंबईत ३६ वर्तमानपत्रे निघतात. त्यांत ८ मराठी आहेत, पैकीं २ अर्धसाप्ताहिके, ४ साप्ताहिके, दोन मासिके आणि एक (ज्ञानोदय) महिन्यातून दोनदा प्रसिद्ध होते.

**११४६** (१९ : ७, २ एप्रिल ६०, ११२)

ख्रिस्तियन वर्नाकुलर एज्युकेशन सोसायटीतर्फे पंतोजी तयार करण्याचे विद्यालय सुरू होणार आहे. असे विद्यालय कलकत्त्यातही व्हावयास हवे

११४७ (१९ : ७, २ एप्रिल ६०, ११२)

मुंबईतील पारशी पंचायत जातिप्रकरणाची सर्व कामे पाहाते. तिचा अधिकार एका धैर्यवान पारशाने धिक्कारून टाकला. तो जातिबहिष्कृत होता. अशा वाळीत टाकलेल्यांचे नातेवाईक वारले, तर त्यांची उत्तरक्रिया पारशी स्मशानभूमीत करू देत नाहीत. पण या गृहस्थाने स्मशानभूमीचे कुलूप तोडून आपल्या मुलीचे शव नेहमी उत्तरक्रिया होणाऱ्या जागी ठेवले. आता 'पंचायतच' पंचायतीत पडली.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

---

## ज्ञानोदय, पुस्तक १९, अंक ८, मुंबई, १६ एप्रिल १८६०

---

११४८ (१९ : ८, १६ एप्रिल ६०, ११४–११७)

वाई हे प्रख्यात ठिकाण असून तेथे कोकणस्थ ब्राह्मणांची वस्ती आहे. एकूण लोकसंख्या १२ हजार आहे. कृष्णेच्या पूर्वतीरावर घाटांची रांग व देवळे फार शोभायमान वाटतात. इथे पुरुष संध्या करीत असतात आणि स्त्रिया पाणी भरीत राहातात. गाव लवणात बसलेले असल्यामुळे अनेक घरात पुराचे पाणी शिरते. हवा बिघडून गेल्या वर्षी महामारीने १२०० रोगी मरण पावले. शाळेतील पंतोजी दुसऱ्या बाजीरावाचा धडा मोठ्या मेहनतीने शिकविताना दिसला, पण इंगरेजी शिकणारी मुले थोडी आहेत. देवळाजवळ तारणोपायाचा उपदेश केला. रोज कृष्णा नदीमध्ये स्नान करूनही पाप जात नाही, याची खात्री पटविली. ठिकाणोठिकाणच्या लोकांनी खिस्ती धर्माचा स्वीकार करून तारण मिळविले, याची माहिती दिल्ही. खिस्ती धर्मप्रसार हा कोणाच्या नाशाकरिता नाही, तर सर्वांच्या कल्याणासाठी आहे, हे त्यास पटले. तालिकोटहून लोक खिस्ती धर्मांची पुस्तके घेऊन जातात. गावोगावचे लोक शांतपणाने उपदेश ऐकतात.

**११४८ अ** (इंम : ११३–११४)

**११४९** (१९ : ८, १६ एप्रिल ६०, ११८–११९)

सन १८५९ मध्ये ली बेरियर यांनी एका निबंधात एका नव्या ग्रहाची माहिती दिली. कदाचित एकाहून अधिक ग्रह असावेत. पण हा शोध एका खेड्यातील गरीब वैद्य लास्कर बालत यानेही लावला आहे. त्याचे टिपण बेरियरच्या आधीचे आहे. हा ग्रह बुधाच्या गमनमार्गातच आहे. त्याची सावली डागाप्रमाणे सूर्यबिंबावर दिसते. तो १९ दिवसांत सूर्यास प्रदक्षिणा घालतो. सूर्यापासून नेहमी ८ अंशावर राहातो. सूर्यापासून अंतर १ कोटी ३० लाख मैल आहे. खगोलविद्या आश्चर्यकारक आहे आणि ज्याने ही जगे निर्माण केली, तो ईश्वर अति सामर्थ्यवान व थोर आहे.

**११४९ अ** (इंम : ११७–११८)

११८० (१९ : ८, १६ एप्रिल ६०, ११९-१२३)

अहमदनगरच्या पाणीप्रकरणाबाबत 'एक ख्रिस्ती' पत्रात लिहितो की : माळीवाड्याचे कारंजे ख्रिस्ती लोकांना वापरू देऊ नये, म्हणून तेथील लोकांनी फार प्रयत्न केला. टहले पहाऱ्यावर ठेवले. त्यांच्याकडून कानगी आली, तर गोंधळ उडेल, अशी स्थिती झाली. पण प्रत्यक्षात ख्रिस्ती लोकांनी पाणी घेतले, तरी काहीच घडले नाही, असे मानून इतरांनी पाणी भरले. कारंजे बाटले, ही गूल कोणीतरी उगीच उठविली, असे सांगून ते आपल्याच लोकांना टप्पू मारीत होते. ख्रिस्ती लोक मात्र निर्भयपणे पाणी भरतात. इतर लोक त्याकडे डोळेझाक करतात. जातिभेदाचे बंड आता बुडेल व ही भांडणे संपतील, अशी आशा आहे. मात्र लोकांनी आपसातदेखील मारामाऱ्या करू नयेत, असे वाटते. लोक विनोदाने एकमेकांना बाटल्याबद्दल चिडवितात, तेव्हा मौज वाटते. म्युनिसिपालिटीने कारंजे स्वच्छ केल्यावर काही भट्टांनी त्यास अग्निडाग देऊन शुद्ध केले. तरीही वातावरण अगदी शांत आहे. सर्व जातिधर्मांचे लोक पाणी भरतात.

११८१ (१९ : ८, १६ एप्रिल ६०, १२४)

'एक सुशोधक' पत्रात म्हणतो की : रघुनाथ जनार्दनाच्या पुनर्विवाहाविषयी इंग्रजी पत्रात विरोधी मजकूर येतो. त्याचे हे दुसरे लग्न असून पहिली बायको जिवंत आहे, असेही ते म्हणतात. तसे असेल, तर मात्र अयोग्य आहे. पण आनंद याचा वाटतो की, विद्वानांचे कोरडे पांडित्य संपले. कृतीला सुरुवात झाली. हे लग्न भिक्षुकांच्या हातून लागले. निषेध करणाऱ्या मूठभर लोकांना बळवंतराव गोपर्डीकरांनी उत्कृष्ट भाषण देऊन परतवून लावले. या जुन्या कपींच्या रकट्याप्रमाणे मलीन झालेल्या बुद्धीतील अज्ञानरूप खकाणा नेहमी झटकला पाहिजे. हा सर्व प्रकार आनंद मानण्याजोगा आहे. नर्मदेस राखेप्रमाणे न ठेवता रघुनाथाने विवाह करून आदर्श उदाहरण घालून दिल्हे. (पूना ऑबजव्हरवरून)

ज्ञानोदयकर्त्यांची टीप—पुनर्विवाहास पाठिंबादर्शक.

११८२ (१९ : ८, १६ एप्रिल ६०, १२५–१२७)

वृद्ध पोप उर्फ रोमन क्याथोलिकांचा शंकराचार्य, याचे उरलेले दात पडण्याची वेळ आली आहे. म्हाताऱ्याची तीक्ष्ण नखे व दाढा ल्यूथरच्या शास्त्ररूप शस्त्राने काढल्या गेल्या. तरी काही देश त्याच्या दातांत अडकले त्यांना तंबाखूप्रमाणे चघळून त्याने शुष्क व नीरस करून टाकले. पोपचा कैवारी आस्त्रियाचा बादशहा याचा दारूण पराभव झाला. शेकडो वर्षांपासून तेथील लोकांवर जुलमाचे जुकड पडले होते. त्यांच्या आत्म्यावर व शरिरावर पोपचा अंमल होता. त्याचा राजकीय टेका आता नाहीसा झाला. युरोपच्या राजांना पोपाची राजकीय सत्ता व ढवळाढवळ मनापासून नकोशी झाली. फ्रान्सचा नेपोलियन बोनापार्ट याने त्याची महापूजा बांधली होती. फ्रान्समध्ये प्रसिद्ध झालेल्या एका पुस्तकात म्हटले आहे की : पोपाने संन्याशाप्रमाणे राहावे. राज्यांच्या उलटापालटीत मन घालू नये. तैबेर नदीच्या काठी मारियेच्या नावाचा जप करीत बसावे. पोपाचे सिंहासन डळमळीत झाले. युरोपियन वृत्तपत्रे पोपच्या राजसत्तेवर कडक टीका करीत आहेत. पोपच्या नावाने शिधा–दक्षिणा घेणारे रोमन भटभिक्षुक अस्वस्थ झाले आहेत. फ्रेंच लष्कराचे बळ गेली १०–१२ वर्षे पोपला उपयोगी पडले. आता तोही आधार गेला. इताली संस्थानावरचा अधिकार पोपाने सोडावा, असे पत्र फ्रान्सच्या राजाने पाठविले आहे. पोपाचे पातेले बुडते आहे. सगळा युरोप युद्धसमुद्रात बुडण्याची शक्यता आहे :

११८३ (१९ : ८, १६ एप्रिल ६०, १२७–१२८)

मिसर देशाची लोकसंख्या दरवर्षी शेकडा १॥ टक्के वाढते, तर नीलच्या काठी १०॥ टक्के वाढते.

११८४ (१९ : ८, १६ एप्रिल ६०, १२७–१२८)

अलेक्झांड्रिया ते कराची आणि क्राट बेट असे तारायंत्र पुरे झाले.

११६५ (१९ : ८, १६ एप्रिल ६०, १२७–१२८)

जरीमरीचा उपद्रव युरोप व अमेरिकेतही होत आहे. जुन्या मताच्या लोकांची समजूत आहे की, इंग्रजी राज्य आल्यामुळेच पटकी आली. ती समजूत चुकीची आहे.

११६६ (१९ : ८, १६ एप्रिल ६०, १२७–१२८)

अहमदनगरच्या पाणीप्रकरणात साक्षीदार आधी विचार करून मग साक्ष देतात. एक माणूस एकाच क्षणी दोघांच्या घरी एकाच वेळेस जेवावयास बसला होता, म्हणे. (प्रभोदयवरून)

११६७ (१९ : ८, १६ एप्रिल ६०, १२७–१२८)

शेणवी जातीत आणखी एका विधवेचा पुनर्विवाह झाला, असे ज्ञानप्रकाशवरून कळते.

११६८ (१९ : ८, १६ एप्रिल ६०, १२७–२८)

अहमदनगरात शिमग्यात नाचतमाशे पाहण्याने जाग्रण झाल्यामुळे एक गृहस्थ पटकी होऊन मृत्यु पावला.

११६९ (१९ : ८, १६ एप्रिल ६०, १२७–२८)

पुण्याची म्युनिसिपालिटी अस्पृश्यांसाठी स्वतंत्र हौद बांधणार आहे. पण काहीच खर्च न लागता न्याय झाला असता, तर बरे झाले असते. सुधारलेल्या विद्वानांना हे बरे वाटते ना ?

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

११६० (१९ : ९, १ मे ६०, १३०-३१)

अहमदनगरच्या पाणीप्रकरणाबाबत सरकारने केलेल्या ठरावाने नगरच्या लोकांचे समाधान झाले नाही. त्यांनी दुसरी अर्जी तयार करून गवर्णर साहेबाकडे पाठविली. त्यात अशी मागणी केली होती की, खिस्ती लोकांसाठी वेगळी कारंजी नेमून द्यावीत. माजिस्त्रेत टायटलर यांनी आपला अभिप्राय जोडताना लिहिले की, नगरात बरीच कारंजी असल्यामुळे हे एक वेळ शक्य होईल, पण ज्या गावी फारसे पाण्याचे साठे नाहीत, तेथे हे शक्य होणार नाही. शिवाय मूळ तत्त्वाचा निर्णय त्याने लागत नाही. पाण्याला बाट आहे, ही कल्पनाच अयोग्य आहे. नेटिव खिस्ती लोकांनीही हे दोन्ही मुद्दे आपल्या पत्रात लिहिले आहेत. खिस्ती लोकांच्या हक्काच्या प्रकरणात हिंदुस्थानात मनस्वी गोंधळ होत आहे. विचारशील हिंदू कबूल करतात की, हा अन्याय आहे. इतरांनी पाणी घेऊ नये, असे कोणत्याच धर्मशास्त्रात लिहिलेले नाही. कायद्याप्रमाणे प्रत्येकाचे हक्क रक्षिले पाहिजेत. मुंबईत अशी अडचण कधी येत नाही. यथान्याय गोष्टीस कोणीही प्रतिबंध करू नये. रैट ह्यानराबल गवर्णर यांनी आपला निर्णय असा दिल्हा की, खिस्ती लोकांनी पाणी भरल्यामुळे कारंजे भ्रष्ट होत नाही. म्हणून पूर्वीच्या हुकमात पालट करण्याचे काहीच कारण नाही.

११६० अ (इंम : १२९-१३०)

**११६१** (१९ : ९, १ मे ६०, १३४–१३८)

मि. रामजी मल्हारी लिहितात की : वयाच्या २६ व्या वर्षापर्यंत धर्माबद्दल विचारच केला नव्हता. मिशनेरी हे इंग्रजांचे चाकर असून ते लोकांस बाटवितात, असे म्हणून मी त्यांची हेळणा करीत असे. ज्वरपीडेने बडबडणाऱ्या रोग्याप्रमाणे मी टीका करी. देवतांपुढे स्तोत्र व मंत्र म्हणण्यात माझा वेळ जाई. ब्राह्मण गुरूचा व पंचाक्षऱ्याचा मी उपदेश घेई. १८५१ मध्ये मी ज्ञानोदयाचा एक अंक वाचला. मग मी ज्ञानोदयाचा वर्गणीदार झालो. अनेक खिस्ती पुस्तकेही वाचली. विचारलहरीने केलेली निंदाही वाचली. मग माझी खात्री झाली की, हिंदुधर्म मनुष्यकृत आहे. असीरगड येथे बदली झाल्यावर मी प्रार्थना करू लागलो. दापोलीस एक खिस्ती माझा मित्र झाला. तो म्हणे की, जर पृथ्वीवर खिस्तास मान्य केले नाही, तर आकाशात त्याचा अंगीकार करण्यासही आपण लाजू. म्हणून मी संतोषाने खिस्ती धर्म स्वीकारला. ईश्वरास पाप आवडत नाही. त्याचा कोप कोणासही सहन होणार नाही. ज्याने तारणोपाय दिल्हा, त्याला संतुष्ट ठेविले पाहिजे. बहकलेले मेंढरू योग्य त्या कळपात तोच आणून सोडतो. म्हणून सर्वांनी बोध घेऊन त्याला शरण जावे.

**११६१ अ** (इंम : १३२–१३४)

११६२ (१९ : ९, १ मे ९०, १३८–१४०)

सूर्यकिरण मनुष्याच्या आणि इतर प्राण्यांच्याही शरीरास हितावह आहेत. जेथे सूर्याचे किरण पडतात, ते ठिकाण बहुदा निरोगी असते. ओलीने जमिनीस सडकी घाण येते, ती सूर्यकिरणांनी नाहीशी होते. अरुंद रस्त्यावर अंधारामुळे घाण कुजते. ज्या घरावर झाडांची छाया असते, तेथे दुर्गंधी फार येते, माणसे रोगी बनतात. कोंदट जागी किंवा पडद्यात काम करणारे स्त्रीपुरुष पिंगट, अशक्त व रोगी होतात. डाक्तर केन उत्तर महासागराजवळ राहिला, तेव्हा तो फार अशक्त होऊन परत आला. म्हणून म्युनिसिपल कमिश्र्यांनी रुंद रस्ते ठेवावेत. लोकांनीही घरास भरपूर खिडक्या ठेवाव्यात. घरात आणि गावामध्ये नेहमी स्वच्छता ठेवावी. नेहमी स्वच्छ प्रकाशात आणि सूर्यकिरणात फिरणे आवश्यक आहे. डायोजिनीस या तत्त्वज्ञान्याने शिकंदर बादशहास फक्त मोकळे ऊन मागितले होते. ऊन मिळाले नाही, तर फार नुकसान होते. स्त्रियांना सतत पडद्यात बसविल्यामुळे त्या अगदी पिंगट बनतात. म्हणून गोशा पद्धती हानिकारक आहे. बाहेर फिरल्यामुळे बायका बिघडतात, हे मत चुकीचे आहे. माणसाने सदाचरणी होण्याकरिता पवित्र शास्त्र शिकावे. येशू खिस्त हा नीतिमत्त्वाचा सूर्य आहे.

११६३ (१९ : ९, १ मे ९०, १४०–१४१)

फ्री चर्च मिशनाच्या मुली स्वैपाक करीत असताना एकीचे पांघरूण पेटून ती फारच भाजली. तिच्या बापाने तिच्या अंगावर पाणी टाकून तिला हास्पिटलात नेले. परंतु ती तेथेच मरण पावली. तिचा बाप्तिस्मा झालेला नव्हता. तरी तिचा येशूवर भरवसा होता. चांगल्या आचरणाने आणि मरणाने किती उत्कृष्ट उपदेश होतो पाहा.

११६४ (१९ : ९, १ मे ९०, १४०–१४१)

सरकारने लोकांच्या प्राप्तीवर कर बसविला आहे. २०० रुपयांपासून ५०० पर्यंत शेकडा २ रुपये व ५०० हून अधिक असेल, तर शेकडा ४, असा हा कर आहे.

११६५ (१९ : ९, १ मे ६०, १४०–१४१)

बरेलीचा बंडखोर खान बहादूर खान ह्यास कोतवाली चावडीपुढे लोकांच्या समुदायासमक्ष फाशी देण्यात आले. दुष्टांचे दुष्टपण अल्पकाळपर्यंत चालते व ते कुत्र्याच्या मौतीप्रमाणे मरतात : लोखंडी सेकाठीने कुंभाराच्या मडक्याचा चुरा होतो, तसा देव त्याच्या गाभाराचा चुरा करितो.

११६६ (१९ : ९, १ मे ६०, १४०–१४१)

नगर पार्करच्या राण्यास १४ वर्षे व त्याच्या दिवाणास १० वर्षांची ठेप झाली.

११६७ (१९ : ९, १ मे ६०, १४०–१४१)

इंग्लंड देशातील कायदे हिंदुस्थानास लागू होणार, असे म्हणतात.

११६८ (१९ : ९, १ मे ६०, १४०–१४१)

रास्त गोफ्तारच्या कर्त्याने सरकारला अशी सूचना केली की, सोन्यावर व डागिण्यावर कर बसवावा. तसे झाले, तर डागिणे घालण्याची मूर्ख चाल बंद होईल. शेकडो बालके डागिण्यापायी मरतात, ती वाचतील व लग्नाच्या खर्चामध्ये एक बाब कमी होईल. पानसुपारीवर व तंबाखूवरही कर बसविला, तर जनावराप्रमाणे रवंथ करण्याची चाल तरी मोडेल. काही पदार्थ शरिरास गरज नसताना जवळ बाळगणे आणि चघळणे तरी बंद होईल.

११६९ (१९ : ९, १ मे ६०, १४१–१४२)

शिंद्याप्रमाणे होळकरासही दत्तक घेण्यास परवानगी मिळाली.

११७० (१९ : ९, १ मे ६०, १४१–१४२)

मि. महिपतराम रूपराम गुजराथी विलायतेस गेला. समुद्रप्रवासाने धर्म बुडतो, असे मानणारे लोक त्याच्याबद्दल तिटकारा दाखवितात. परंतु विलायतेत जाऊन काही लाभ होणार असतील, तर ते गमावू नयेत. तिकडे चांगले लोक अधिक आहेत, तसे वाईट लोकही आहेत. कोणाचा सहवास घडतो, ते पाहावे. त्यापेक्षा एथेच राहून देशाच्या कल्याणार्थ झटावे, हे बरे आहे.

११७१ (१९ : ९, १ मे ६०, १४१–१४२)

अटलांटिक महासागरातील तार २ लाख रुपये खर्च करून दुरुस्त केली जाईल.

११७२ (१९ : ९, १ मे ६०, १४१–१४२)

अमेरिकेत दर सप्तकात एक हाजार शिवण्याची यंत्रे तयार होतात. त्यामुळे शिवणाचे काम अतिशय चांगले चालते. गतवर्षी शिवणयंत्र कंपनीस २ लाख ८६ हजार रुपये मिळाले.

११७३ (१९ : ९, १ मे ६०, १४१–१४२)

अमेरिकेत वाफेचे नवीन यंत्र तयार झाले. हे यंत्र बायलरमधील पाण्याचे पृथक्करण करून आक्सीजन व हैड्रोजन वेगवेगळा करते. या शोधाने वाफेच्या यंत्रास व आगगाडीत कोळशांचा खर्च वाचेल.

११७४ (१९ : ९, १ मे ६०, १४१–१४२)

अमेरिकेत ३६२ गॅस कंपन्या असून त्यांचे भांडवल १० अब्ज ४७ कोटी ८९ लाख ९०० रुपये आहे.

११७५ (१९ : ९, १ मे ६०, १४१–१४२)

व्हिटवर्थ या साहेबाने आर्मस्ट्रांगपेक्षा शक्तिमान तोफ तयार केली. तिच्यातील ३ पौंडाचा गोळा ४½ मैलांवर जाऊ शकतो.

११७६ (१९ : ९, १ मे ६०, १४१–१४२)

फत्तेगडला ४ ब्राह्मण व ३ क्षत्रिय यांचा बाप्तिस्मा झाला. आणखी हजारो लोक मंडळीकडे येऊन बाप्तिस्मा मागत आहेत.

११७७ (१९ : ९, १ मे ६०, १४३–१४४)

अटक नदीच्या खालून विवरमार्ग तयार करण्यासाठी १० हजार रुपये मंजूर झाले आहेत. गव्हर्नर जनरल यांच्या उपस्थितीत पहिला सुरुंग उडविला गेला. आता जमिनीखालून गाड्या, घोडी व पायदळ जातील. पांडवकृत्ये व लेणी यांपेक्षा हे चमत्कारिक व उपयुक्त काम आहे.

११७८ (१९ : ९, १ मे ६०, १४३–१४४)

वर्तमानपत्राच्या टपालास ६ तोळ्यापर्यंत एक आणाच हशील पडणार आहे.

११७९ (१९ : ९, १ मे ६०, १४३–१४४)

पारशी लोकांच्या दुष्ट चाली बंद करण्यासाठी तरुणांनी उपदेश करण्याचा क्रम सुरू केला.

११८० (१९ : ९, १ मे ६०, १४३–१४४)

बल्लारी येथील एका ब्राह्मणास अचाट स्मरणशक्ती लाभली आहे. तो एकदम १०–१२ गोष्टींकडे लक्ष ठेवतो व सर्वच स्मरण नीट ठेवतो. बुद्धिबळ व गंजिफांचे डाव पटाकडे न पहाता एका वेळी खेळू शकतो ! त्याला अनेक भाषांमधील कविता येतात. घंटा एकसारखी वाजविली, तर तिचे ठोके नेमके किती पडले, ते तो सांगू शकतो. त्याची स्मरणशक्ती पाहून लोक आश्चर्याने मुग्ध होतात. पण एवढ्या मातबर स्मरणशक्तीच्या जोरावर तो फक्त पोट भरण्याचे काम करतो. गवर्नर लार्ड एल्फिन्स्तन यांनीही त्यास प्रशंसेचा दाखला दिला आहे. जो मनुष्य भक्तिमान नसतो, तो चांगल्या देणगीचेही मातेरे करतो.

११८१ (१९ : ९, १ मे ६०, १४३–१४४)

मुंबईत दीड महिन्यात पावणेतीनशेहून अधिक मुले गोवराने मरण पावली.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**११८२** (१९ : १०, १५ मे ६०, १४७–१५०)

अहमदनगर मिशनात सन १८५९ मध्ये नवीन मंडळी झाली नाही. सध्या ११ मंडळ्या आहेत. गेल्या १४ वर्षांमध्ये एकंदर ख्रिस्ती ३६९ झाले. बाप्तिस्मा घेतलेल्या मुलांची संख्या ३१ ने वाढली. नगरचे माजिस्त्रेत फ्रेजर टैटलर यांनी खर्च भरून काढण्यासाठी एक हजाराची देणगी दिल्ही. गव्हर्नर लार्ड एल्‌फिन्स्तन यांनीही काही द्रव्याश्रय दिल्हा. पाणी प्रकारात योग्य तो न्याय दिल्हा. प्रतिबंधाच्या ओझ्याखाली दडपलेल्या ख्रिस्ती भावांना दिलासा मिळाला. वार्षिक सभेमध्ये २०० लोक प्रभुभोजनासाठी आले. सर्वांनी स्तोत्रे म्हटली. रे. व मडम बालंटैन, फारार मडम, बिसेलसाहेब व मडम, आबट हे पतिपत्नी, बार्करसाहेब व मडम, फेरबांक पतिपत्नी, या श्वेतवर्णी मिशनऱ्यांबरोबर देशी उपदेशक पुढीलप्रमाणे काम करतील : रे. हरी रामचंद्र विनायक मोडक, विष्णु भास्कर करमरकर, सिदुबा बापूजी मिसाळ, दीनसाहेब, मारुती रघुनाथ सांगळे, वगैरे.

**११८२ अ** (इंम : १४५–१४६)

११८३ (१९ : १०, १५ मे ६०, १५०–१५७)

बंडाचे अरिष्ट टळले. सर्वत्र शांतता झाली. बंडवाल्यांचा बीमोड करण्यासाठी बेसुमार खर्च झाला. बंडवाल्यांची झोटिंगबादशाही नष्ट करण्याकरिता ३८ कोटी रुपये खर्च जास्त झाला. या कर्जावरचे व्याजसुद्धा कोट्यवधी रुपये होईल. हे सर्व हिंदुस्थानातील रयतेच्या कल्याणाकरिता केले आहे. इंग्लिश लोकांनीही कर्ज दिल्हे. ब्रिटिश सरकार कसलीही खंडणी घेत नाही. उलट संरक्षण मात्र करते. बजेटात तुटार येऊ नये, म्हणून काही कर बसवावे लागतील. कर हे साहाय्यच आहे. गेल्या वर्षी सरकारने साखरी व अंबाडीची जकात कमी केली होती. जमिनीचे लिलावही थांबविलेले आहेत. काळा-गोरा, नोकर व सामान्य माणूस, असा भेद न करता कर बसविणे आहे. व्यापाराची गैरसोय न होता किंवा धर्मास धक्का न लावता कर बसविणे आहेत. प्राप्तिकर नव्याने येत आहे. २०० ते ५०० पर्यंत शेकडा २ व त्यापुढे ४, असा दर आहे. जमिनीतील प्राप्ती, खाजगी उदीम, प्रसिद्ध फंडापासूनची मिळकत व पगार, यांवर कर बसेल. शेतीस प्राप्तिकराचे नियम लागू करणार आहेत. त्याचा आकार उगवणीदार अधिकारी ठरवतील. सामान्य कारागिरास सालिना फक्त १ रुपया द्यावा लागेल. दारूवर आणि तंबाखूवर मात्र जास्त कर बसेल. अफूवरही कर राहील. १८५७ व ५८ ही वर्षें भयाची व संकटाची होती. कोणासही अन्न गोड लागत नव्हते. ज्यांनी बंडवाल्यांचे अघोरी अत्याचार समक्ष पाहिले, त्यांची मनःस्थिती काय असेल, त्याची कल्पनासुद्धा करवत नाही. कराचा पैसा हिंदी प्रजेच्याच कल्याणाकरिता खर्च होणार आहे. पाच वर्षांनंतर प्राप्तिकराचा फेरविचार होणार आहे. मग उद्योगधंद्यांना उत्तेजन मिळेल.

११८४ (१९ : १०, १५ मे ६०, १५७–१५९)

बंडामुळे उत्तर हिंदुस्थानचा फार नाश झाला. पण नेपाळला फार लाभ झाला. दरिद्री नेपाळ्यांना चांगले दिवस आले. एकट्या अयोध्येच्या बेगमेजवळ पन्नास लाखांचे वित्त होते. या हिशोबाने राणा जंगबहादुराला सरासरी दोन कोटींचा तरी लाभ झाला असावा.

**११८५** (१९ : १०, १५ मे ६०, १५७–१५९)

काही मुसलिम लोक काळ्या व शिख पलटणींना फितविण्याचा प्रयत्न करीत आहेत. २–२॥ हजार शिपाई दिल्लीत बहकल्यासारखे वागतात. पण भयाचे कारण नाही. जे फितुरी करतात, ते मरणच विकत घेतात म्हणा ना!

**११८६** (१९ : १०, १५ मे ६०, १५७–१५९)

अहमदनगरच्या उत्तर भागात काही भील लोक लूट वगैरे प्रलय करीत आहेत. तिकडे दवड गेली.

**११८७** (१९ : १०, १५ मे ६०, १५७–१५९)

दिल्लीत चेद्दालाल या जैनाने बाप्तिस्मा घेतला.

**११८८** (१९ : १०, १५ मे ६०, १५७–१५९)

मद्रासेतील शास्त्रप्रसारक मंडळीने ४ दक्षिणी भाषांतली ५६,६२९ पुस्तके विकली.

**११८९** (१९ : १०, १५ मे ६०, १५७–१५९)

लार्ड कॅनिंग यांनी लाहोरच्या मिशन शाळेतील ३५० विद्यार्थ्यांची परीक्षा घेतली. तसेच पेशावरला ख्रिस्ती भजनालयाचे बांधकाम पूर्ण व्हावे, म्हणून ५ हजारांची देणगी दिल्ही.

**११९०** (१९ : १०, १५ मे ६०, १५७–१५९)

मुसलमान लोकांनी महंमदाचे ३ केश विकण्याला काढून त्याची किंमत ५० हजार लावली आहे. सगळे केश विकले, तर ४० अब्ज ५६ कोटी ९६ लाख रुपये येण्याची त्यांना आशा वाटते.

११९१ (१९ : १०, १५ मे ६०, १५७–१५९)

अलाहाबाद मुक्कामी मि. डब्ल्यू म्युवर यांच्या निमंत्रणावरून अनेक साहेब जमले. ३०० देशी ख्रिस्ती आले होते. ओयन, कौली व मोहन, यांची भाषणे झाल्यावर प्रभुभोजन झाले.

११९२ (१९ : १०, १५ मे ६०, १५९–१६०)

मुंबईत काही पारशी व हिंदू तरुण वृत्तपत्रे काढीत आहेत. पारशी लोक त्यांचा पैगंबर झरतुष्ट्र याच्याविषयी, तर हिंदू लोक वेदांवर व पुराणावर माहिती लिहिणार आहेत. या सर्वांनी निःपक्षपाती राहून चालींचा फेरविचार करावा.

११९३ (१९ : १०, १५ मे ६०, १५९–१६०)

अफूवरील सरकारी कर वाढणार आहे.

११९४ (१९ : १०, १५ मे ६०, १५९–१६०)

सुरत येथे धरणीकंप झाला.

११९५ (१९ : १०, १५ मे ६०, १५९–१६०)

काही दिवसांमागे एका विहिरीत एका लेकराचे प्रेत सापडले. हा खून बहुधा डागिण्यापायी झाला असावा. डागिणे घालण्याच्या चालीमुळे किती हजार बाळे प्राणास मुकली असतील ? काही ख्रिस्ती नेटिवही मुलांवर डागिणे घालतात, म्हणून आम्हांस फार दुःख वाटते.

११९६ (१९ : १०, १५ मे ६०, १५९–१६०)

एक स्त्री मूल रडू नये म्हणून त्याला नित्य अफू देत असे. तेणेकरून ते मूल मरण पावले. अज्ञान व मूर्ख समजुतींनी हे नुकसान घडले. सरकारने अशा लोकांना शिक्षा करावी.

११९७ (१९ : १०, १५ मे ६०, १५९–१६०)

मिसर देशाचा वसूल चार कोटी आहे. तरी त्या देशास १ कोटी २५ लाखांचे कर्ज आहे.

११९८ (१९ : १०, १५ मे ६०, १५९–१६०)

चीनचे क्षेत्रफळ ५३ लाख ५० हजार चौ. मैल आहे. लोकसंख्या ४० कोटींवर आहे. जमाबंदी ४२ कोटी रुपये आहे. एकंदर फौज ९ लक्ष आहे. १३॥ कोटींच्या विलायती मालाची दरवर्षी आयात होते. चिनी सरकारास कर्ज मात्र अगदी नाही.

११९९ (१९ : १०, १५ मे ६०, १६०)

युरोपखंडात २ हजार वृत्तपत्रे निघतात. त्यांपैकी ३०० इंग्लिश व २७० फ्रेंच आहेत. बेलज्यम हा देश आकाराने लहान असून तेथे २६२ वृत्तपत्रे नियमित प्रसिद्ध होतात. अमेरिकेत १५०० नियतकालिके निघतात. लवकरच त्यांची संख्या ५ हजारांवर जाईल. ही संख्या सर्व पृथ्वीतील वृत्तपत्रांच्या दुप्पट आहे. मग हिंदुस्थान कोणत्या कोपऱ्यात पडेल, त्याचा विचार करा.

१२०० (१९ : १०, १५ मे ६०, १६०)

मार्च महिन्यांत आग्रा शहराजवळ एक चमत्कार दिसला. जमिनीमधून एकाएकी एक ज्वाला निघून हवेत चढून गेली आणि मग अदृश्य झाली. तोफेच्या बाराप्रमाणे मोठा आवाज झाला.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १९, अंक ११, मुंबई, १ ज्यून १८६०

**१२०१** (१९ : ११, १ ज्यून ६०, १६१–१६२)

एल्फिन्स्तन साहेब सात वर्षे मुंबईचे गव्हर्नर होते. त्यांनी केलेल्या बंदोबस्तामुळे चांगल्या लोकांना फार संतोष झाला. त्यांनी विहाडाहून मुंबईस पाणी आणले. लेखणीच्या एकाच फाट्याने बगाडाची अघोर चाल मोडली. पाण्यासारख्या न्याययुक्त प्रकारात धैर्य दाखविले. ते शांत आणि धैर्यवान असून बंडकाळात त्यांनी उत्तम बंदोबस्त ठेवला. या सर्व कामगिरीबद्दल त्यांना मानपत्र देण्याचे ठरले. बहुमानपत्रास उत्तर देताना साहेबमजकूर म्हणतात की, मला आणखी पुष्कळ गोष्टी तडीस न्यावयाच्या होत्या. साहेब खास बोटीने बिलायतेस रवाना झाले.

**१२०१ अ** (इंग : १६१)

१२०२ (१९ : ११, १ ज्यून ६०, १६४–१६७)

आता बहुत तुर्क लोक ख्रिस्ती धर्माचा स्वीकार करू लागले. त्यांत मोठाल्या अंमलदारांचे नातलगसुद्धा आहेत. गेल्या चार वर्षांत ९ हजार शास्त्रपुस्तके विकली गेली. हा तीस वर्षांतला विक्रम आहे. रे. विल्यम्स हा पूर्वाश्रमीचा मुस्लिम असून तुर्की कुटुंबातील अनेक लोक त्याच्याकडून शास्त्रपुस्तक घेऊन वाचतात. एका वर्षात बीस जण ख्रिस्ती झाले, त्यात कट्टर कुराणवादाकडून मनःपालट झालेला मुल्लाही होता. शास्त्र वाचण्यावरून एका सरदाराच्या पुतण्याचा नातेवाईकांनी पाठलाग केला. पण त्याने आपले मत बदलले नाही. अनंतकाळच्या जीवनासाठी तो उत्सुक आहे. एका मौलवीने नवाच धर्मपंथ सुरू करून खळबळ उडवून दिली. तो कुराण वाचताना ख्रिस्ताचे सिद्धांत सांगतो. जुना व नवा करार ईश्वरप्रणित आहेत, फुटकान म्हणजे बऱ्याबाईटाचा निवाडा शुभवर्तमानामध्येच सापडतो, त्यांच्या शास्त्रात ६२ ठिकाणी ख्रिस्ती शास्त्राच्या खरेपणाबद्दल साक्ष आहे. येशूच खरा न्याय करील, हे त्यांना पटलेले आहे. या मतांचा जे धिक्कार करतील, ते अनंत काळच्या यातनेमध्ये व विनाशात जाणार आहेत. असे तो मौलवी सांगतो व २० हजार लोक त्याच्या पंथास येऊन मिळाले. हे लोक गंभीर व प्रार्थनातत्पर आहेत. मिशनेऱ्यांवर त्यांचा पूर्ण भरवसा आहे.

१२०२ अ (इंग : १६२–१६४)

१२०३ (१९ : ११, १ ज्यून ६०, १६७–१६८)

अलिकडे काही वाचकांची मराठीत व इंग्रजीत फार लांब लांब पत्रे आली आहेत. पण सर्व काही आम्ही छापू शकणार नाही. पत्रे लांब असल्यामुळे त्यांना जागा देववत नाही. जर कोणी मनोरंजक वृत्तांत अगर गावोगावी फिरण्याच्या हकिगती पाठवील, तर त्या पत्रांस आवश्य जागा देऊ.

१२०३ अ (इंम : १६७)

१२०४ (१९ : ११, १ ज्यून ६०, १६८)

सर्पदंश झालेल्या जागेच्या वर दोन बोटे सोडून सुतळी किंवा चिरगूट पक्के बांधून विषाचा प्रसार थांबवावा. जेथे सर्पाचे दात लागले असतील, तेथे चाकूने फासण्या पाडाव्यात. विषारी रक्त वाहू द्यावे. एखाद्या धीट माणसाने विषारी रक्त अर्धा तास चोखून लगेच थुंकावे. गिळू मात्र नये. अर्ध टाक दारू व तितकेच पाणी घेऊन लिकर अमोनियाचे २० ते ३० थेंब टाका व अर्ध्या तासाच्या अंतराने रोग्याला पाजा. किंवा दुसरे काही चेतनावर्द्धक औषध पाजा. बेशुद्ध होऊ देऊ नका.

१२०६ (१९ : ११, १ ज्यून ६०, १६८-१७१)

'एक श्रोता' पत्रात धर्मसंवादाबाबत म्हणतो की : मुंबईच्या समुद्रकिनाऱ्यावर, ब्रह्मचारीबावाच्याच जागेवरती आब्दुलशाह नामक गृहस्थ वाद करतो. तो म्हणतो की : 'मी चार वर्षे विचार केला आणि मला वाटते की, ख्रिस्ती शास्त्र खोटे आहे. ख्रिस्ती शास्त्राचे तथाकथित ग्रंथकर्ते तेच होते की नाही, अशी मला शंका आहे. तसेच त्या शास्त्रात ईश्वरास शोभत नाहीत, अशा गोष्टी आहेत. म्हणून ते ईश्वरदत्त नाही. ते खोटेही वाटते. कारण एका ठिकाणी एक, तर दुसऱ्या ठिकाणी दुसरीच गोष्ट लिहिली आहे.' तेव्हा रामकृष्ण विनायक यांनी शहाकडे प्रमाण मागितले. मग शहाने थातुरमातुर काही वाचून दाखविले. मोश्याच्या मरणाची हकीगत तो स्वतः कशी लिहील, असेही विचारले. तेव्हा रे. दाजी पांडुरंग म्हणाले की, होमर व बैरनचे ग्रंथ त्यांचेच आहेत, यास तरी काय प्रमाण आहे? मोश्याच्या मृत्यूची हकिगत दुसऱ्या कोणी लिहिली असावी, असेच सर्वजण मानतात. काही ग्रंथकार काही वेळा तृतीयपुरुषी लिहितात. हाही मुद्दा महत्त्वाचा आहे. भवानी विश्वनाथांनीही यास पाठिंबा दिल्हा. इस्रायली लोकांची साक्षच महत्त्वाची मानली पाहिजे, या मुद्यावर भर दिल्हा. ख्रिस्ती शास्त्र ईश्वरदत्त असण्याची प्रमाणे वेगळी आहेत. पण कोणी कोणाचा अपमान न करता वादविवाद चालू ठेवील, तरच ही रेवरंड मंडळी पुन्हा चर्चेस तयार होतील. काही श्रोत्यांनी निंदास्पद उद्‌गार काढून 'हुर्यो' केली.

१२०६ (१९ : ११, १ ज्यून ६०, १७१-१७३)

'एक फिरस्ता' पत्रात लिहितो की : फिरत फिरत मी संगमनेर तालुक्यात उंबरी येथे गेलो. प्रवरेच्या काठावर प्रवचन केल्यावर पाटलाशी दोस्ती जमली. एक दिवस पाहिले, तर पाटील कोणाची तरी उत्तरक्रिया करीत होता. दशपिंड पाडणे चालले होते. ख्रिस्ती धर्मात मृत व्यक्तीला तारकाच्या हातात दिले जाते. सुतक, दशपिंड, दिवस घालणे, हा प्रकार अजिबात नाही. धर्माच्या नावाची गुडवूड आणि भोंदण्याचा प्रकार नाहीत. नेटिवांचे शास्त्र म्हणते की, पिंड दिल्हा म्हणजे पितरास पोहोचतो. मग कावळे म्हणजे पूर्वज समजावेत काय? प्रत्येक कावळ्यास पूर्वज कसे समजावे? कदाचित तो अस्पृश्यांचाही पूर्वज असेल!! निर्जीव पदार्थास देव मानण्याने पाप मात्र वाढते. खडाष्टकामुळे सोयरिक मोडणे, अनिष्ट ग्रहामुळे उपवास करणे, असले कठीण बंद हिंदूंभोवती तयार झाले. आपण उन्हात खपावे आणि मजुरीच्या पैशांनी पुरोहिताची घरे भरावीत! येशू हाच खरा तारक आहे. त्याजकडे चला. खरी शांती आणि आनंद मिळवा.

१२०७ (१९ : ११, १ ज्यून ६०, १७३-१७५)

दिल्लीच्या शिपायात कसलीही फितुरी नाही. १८५७ प्रमाणे पुन्हा बंड होणार, असे ज्यांना वाटले, त्यांची निराशा झाली. एका फकिरास कैदेत नेण्यावरून काही असमाधान दिसले होते, एवढेच. बंडाचे दिवस आता 'काऊने नेले!'

१२०८ (१९ : ११, १ ज्यून ६०, १७३-१७५)

इंग्रज-फ्रेंचांचें चीनशी युद्ध होईल, असा रंग दिसतो आहे.

१२०९ (१९ : ११, १ ज्यून ६०, १७३-१७५)

बेळगाव मुक्कामी अनेक साहेबांचे आणि मडमांचे जीव वाचवल्याबद्दल मुतुकुमार ऐया यांचा सन्मान करून त्यांना विलायती तरवार बक्षिस देण्यात आली.

१२१० (१९ : ११, १ ज्यून ६०, १७३–१७५)

इंग्लंडमध्ये ५ लक्ष शेतकरी असून पन्नास कोटी रुपये सारा गतवर्षी वसूल झाला. तिकडे पिठाच्या वजनावरून पिकाच्या दर्जाची परीक्षा करतात. गव्हाचा व सातूचा दर्जा निकृष्ट ठरला.

१२११ (१९ : ११, १ ज्यून ६०, १७३–१७५)

पश्चिमेकडील देशांत गाईंचे पोषण उत्तम होते, म्हणून रुचकर दूध आणि पुष्कळ मांस मिळते. एक गाय मरण पावली, तिचे वजन दोन खंडी ३० शेर भरले. नेटिवांच्या गाई फार अशक्त असतात. शाकाहारी लोक असल्यामुळेही हेळसांड होत असावी.

१२१२ (१९ : ११, १ ज्यून ६०, १७३–१७५)

शेंडेनक्षत्रांच्या निरीक्षणावरून असे सिद्ध झाले आहे की, एका धूमकेतुस सूर्याभोवती प्रदक्षिणा करण्यास कमीत कमी ३½ वर्षे, तर दुसऱ्यास ७६ वर्षे इतका काळ लागतो. विनेक, ब्रोर्सन, बेला, फय, तत्तल, व हाले, अशी त्यांची नावे आहेत. तत्तल व हाले वगळता बाकीचे येत्या ६ वर्षांत आकाशात दिसतील.

१२१३ (१९ : ११, १ ज्यून ६०, १७५–१७६)

१८ जुलै १८६० रोजी सूर्याचे खग्रास ग्रहण होईल. जगातील १०० ज्योतिषी त्याचे निरीक्षण करतील. आमच्या भट्टांस मात्र परदेशी ग्रहणे कळत नाहीत.

१२१४ (१९ : ११, १ ज्यून ६०, १७५–१७६)

१८५१ प्रमाणे ६२ सालीही लंडनमध्ये मोठा पदार्थसंग्रह तयार होईल. उत्तम व कुशल अशा कारागिरांना बक्षिसे मिळतील.

१२१७ (१९ : ११, १ ज्यून ६०, १७५–१७६)

अमेरिकेत नवीन शोधांचे पेटंट देण्याचे खाते आहे. गतवर्षी ४,४९१ सनदा दिल्या गेल्या.

१२१६ (१९ : ११, १ ज्यून ६०, १७५–१७६)

अमेरिकेत एक स्वयंचलित यंत्र खोट्या नाण्यांची लगेच पारख करते.

१२१७ (१९ : ११, १ ज्यून ६०, १७५–१७६)

जनावरांच्या कातड्यांचा रांधा करून ओतीव कातडे करण्याचा शोध जर्मनीत लागला आहे. त्याच्या साच्यातून पादत्राणे तयार होतात.

१२१८ (१९ : ११, १ ज्यून ६०, १७५–१७६)

उत्तर अमेरिकेत नवीन तयार झालेल्या वाफेच्या गाडीत ३५ टन लोखंड व १२० माणसे ताशी ५ मैल वेगाने नेता येतात.

१२१९ (१९ : ११, १ ज्यून ६०, १७५–१७६)

इंग्लंडचे राजपुत्र आलबर्ट प्रिन्स आफ वेल्स कानडास व अमेरिकेस भेट देणार.

१२२० (१९ : ११, १ ज्यून ६०, १७५–१७६)

जुन्नरमध्ये मिशनरी व गावकरी यांचा पाण्यावरून काही बखेडा पडल्याची बातमी आहे.

१२२१ (१९ : ११, १ ज्यून ६०, १७५–१७६)

अलिकडे महामारीचा मनस्वी झपाटा मुंबई, खंडाळा, नाशिक, बडोदा, वगैरे शहरांत चालू आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**१२२२** (१९ : १२, १५ ज्यून ६०, १७८–१७९)

लुदियाना मिशनाची १० ठाणी आहेत. सर्व ठिकाणी लोक आनंदाने उपदेश ऐकतात. घेरा मंडळीत तिघा हिंदूंनी बाप्तिस्मा घेण्याचा मानस जाहीर केला. बिजनोर परगण्यात ६० कुटुंबांना ख्रिस्ती होण्याची इच्छा आहे. वुडसैड या मिशनरी साहेबांनी प्रत्येक गावी उपदेश करून माहिती दिली. तेव्हा ३० नवे लोक मिशनात आले. त्यांना व्यवसाय पुरविण्यात आले. प्रौढांना साक्षर करण्यात आले. १० मुलांचाही बाप्तिस्मा झाला. यंदा दीक्षा घेणाऱ्या लोकांत अनेक धर्मांचे लोक व स्त्रिया आहेत. शुभवर्तमानाचे घोषण प्रत्येक गावात व्हावे, म्हणून गावकरीसुद्धा मदत करतात. मि. बैली या नेटिवास उपदेशक नेमण्यात आले.

**१२२२अ** (इंम : १७७-१७८)

१२२३ (१९ : १२, १५ जून ६०, १७९-१८५)

'सभेत असणारा एक' धर्मसंवादाबाबत लिहितो की : आबद्ल शाह यांचे प्रतिपादन असे आहे की : मोशाची ५ पुस्तके ही त्याने लिहिलेली वाटत नाहीत. मोशाच्या मृत्यूनंतर इस्रायली मंडळी खनान देशात आली. तोपर्यंत त्यांनी मान्ना हे अन्न खाल्ले. यावर रामकृष्णपंत म्हणाले की, नंतरच्या इतिहासकाराचे हे वाक्य आहे. रा. भवानी विश्वनाथांना यात शुद्ध फसवणूकच वाटते. काही भाग यहोशवाने जोडला. त्या काळात सह्या करून नवा मजकूर जोडण्याची चाल नव्हती. शास्त्र शिकविणारेसुद्धा ही गोष्ट स्पष्ट करतात. तरीही खरेपणाला व्यंग आले, असे रा. भवानीपंतास वाटले. रामकृष्णपंतांनी म्हटले की, यात लबाडी किंवा खोटेपणा अजिबात नाही. खऱ्या घडलेल्या गोष्टीच त्यात सांगितलेल्या आहेत. मोशाने ईश्वराचीच वाणी प्रत्यक्ष ऐकली व नेमशास्त्र प्रगट केले, याबद्दल खात्री असल्यामुळेच इस्रायली लोकांनी पिढ्यानपिढ्या त्यावर श्रद्धा ठेवली. भवानीपंत म्हणाले की, ते लोक अडाणी व धर्मपिसे असावेत, म्हणून त्यांना नेमाची गरज भासली. रेवरंड दाजींनी सांगितले की, ते अतिशय विचक्षण होते. रामकृष्णपंतांनी समारोप केला की, संदर्भावरून मोशाचे लेखन व दुसऱ्याचे लिखाण यातला फरक समजतो. यानंतरही वाद होणार आहे. संपादक लिहितात की, फक्त १२ ओव्या मोशे याच्या मरणाबाबत व उत्तरक्रियेविषयी आहेत. तेवढ्यावरून त्याच्या धर्मास दूषण लावू नये.

१२२४ (१९ : १२, १५ जून ६०, १८५–१८९)

रा. गोविंद नारायणांच्या 'भोजनबंधु पानतंबाखू' या पुस्तकात ५१ पाने असून किंमत ३ आणे आहे. अज्ञानदशेतील मुले व्यसनासक्त होऊ नयेत, म्हणून ते लिहिले. या नाटकाची भाषा रूढिशुद्ध आणि सुगम आहे. वारंवार वापरलेल्या संस्कृत श्लोकांचा अर्थ सामान्य प्रेक्षकांना मात्र समजणार नाही. काही युक्तीने तो द्यावयास हवा होता. दुर्व्यसनांचा निषेध रामराव व शोभाचार्य यांच्या भाषणांमधून चांगल्या रीतीने झाला. स्वतः रामराव आपली कन्या चारू हिच्या उपदेशावरून व्यसन सोडतो. ही कन्या एखाद्या पंतोजीप्रमाणे योग्यायोग्याचा निवाडा करते. स्त्रिया व लहान मुलेदेखील या व्यसनांचे दास बनतात, याचा लेखकाला खेद वाटतो. आपली तलफ भागविण्याकरिता कर्ज काढणारे लोक मूर्खच म्हणावे लागतील. सवाई माधवरावाच्या जन्माच्या वेळी १। लाखाची पानसुपारी झाली. त्यावेळी नानाचे शहाणपण कोठे गेले? ब्राह्मणांनी दिवाळखोरी करूनच आपले राज्य गमावले. या व्यसनांचे शरीरावर अनेक अनिष्ट परिणाम होतात, असे डाक्तर मंडळी सांगतात. म्हणून थोडे प्रमाण ठेवण्याचा उपदेश निरुपयोगी आहे. लेखकाने जास्त प्रसंग दाखवून व्यसने सोडण्याचे अगत्य प्रेक्षकांच्या मनावरती ठसविणे आवश्यक होते. ज्यांची विवेकबुद्धीच बोथली आहे, अशांना चांगल्या मार्गावर आणणे जरूरीचे आहे. जे विवेकास गुंडाळून ठेवतात, त्यांना व्यसनामुळे अधःपतनाचा मार्ग असतो.

१२२८ (१९ : १२, १५ ज्यून ६०, १८९–१९०)

मुंबईत संयुक्त विद्यार्थी सभेची बैठक झाली. डा. मिचेल अध्यक्षस्थानी होते. जातिभेद, पुनर्विवाह, बालविवाह, या सर्वांचा विचार झाला. समाजात सुधारणूक आवश्यक आहे, असे सभेचे मत आहे. भवानी विश्वनाथजी म्हणाले की, सुधारणेचे पोकळ पांडित्य नको आहे. तरुणांमध्ये नीतिधैर्यच कोठे आहे ? दुसऱ्या कोणीतरी सुधारणा करावी, म्हणून ते वाट पहात बसतात. म्हणून स्वतः लहानशी का होईना, सुधारणा करा. जातिभेद सोडा. माधव मोरेश्वरजींनी आव्हान दिले की, काफीचा कप घेऊन जात मोडण्यास कोण तयार आहे? तेव्हा एकही तरुण पुढे आला नाही. आमचे तरुण केवळ तोंडाने बोलणारे आहेत. त्याप्रमाणे चालणारे नाहीत. जे योग्य वाटते, त्याचे आचरण टाळणे, हे किती लाजिरवाणे जीवन आहे. जातवाले आपणास जातीबाहेर टाकतील, याच्या भीतीनेच ते गप्प बसतात. धैर्य जर दाखविले, तर जाती मोडतील. धैर्य मात्र पाहिजे व त्याचाच तर दुष्काळ आहे.

१२२६ (१९ : १२, १५ जून ६०, १९०–१९१)

बहुत लोक सूर्यास देव मानून त्याच्या पाया पडतात. पण ही अज्ञानपणाची समजूत आहे. प्राण्यांना आपले व्यवहार नीट करता यावे, सर्वांना प्रकाश आणि आरोग्य मिळावीत, यांकरिता देवाने सूर्यास आकाशात ज्योतिरूपे ठेवले आहे. ख्रिस्ती शास्त्रात ईश्वराला सूर्याची उपमा मात्र दिल्ही आहे. सूर्यापासून दैहिक, तर ईश्वराकडून आत्मिक लाभ होतात. सूर्यापासून अखंड किरण निघतात. तो त्यांना कधी आखडीत नाही. त्याचे असंख्य किरण निमिषार्धात कोटी योजनांवर जाऊन पोहोचतात. किरणांचा प्रवाह सतत चाललेला असतो. जेव्हा हा भूगोल सूर्यास पाठमोरा होतो, तेव्हा रात्र पडून काळोख होतो. सूर्यामुळे पदार्थ ओळखता येतात, हा खरा लाभ आहे. येशू ख्रिस्तास नीतिमत्त्वाचा सूर्य म्हणतात. अज्ञानरूप अंधःकार व पापरूपी घाणही नाहीशी करून तो आमचे अंतःकरण निर्मळ व प्रकाशित करतो. आडरानातून आम्ही जीवनाच्या खऱ्या मार्गावर येतो. शास्त्रामुळे विपुल ज्ञानाचा पुरवठा होतो. सत्कर्मे सफळ होतात. आम्हांस पुण्य लेववून शोभायमान व दीपरूप बनविले जाते. जे मूर्तिपूजेच्या अंधारात बुडाले, त्यांचा नाश अटळ आहे.

१२२७ (१९ : १२, १५ जून ६०, १९१–१९२)

दिल्ली दरबारामधील एका खासबरदाराने काही ख्रिस्ती लोकांना जिवानिशी मारले होते. इंग्रज लष्कराने दिल्ली जिंकल्यावर त्याला फाशी झाली असती. पण त्याने विष खाऊन आत्महत्या केली.

१२२८ (१९ : १२, १५ जून ६०, १९१–१९२)

ब्रह्मदेशात पेगू येथे १५० कारेन लोकांनी बंड केले आहे. ते लुटालूट करीत असून त्यांच्यामागे सरकारचे धावणे गेले आहे. लवकरच त्यांचे पारिपत्य होईल.

१२२९ (१९ : १२, १५ ज्यून ६०, १९१–१९२)

राजपूत संस्थानांपैकी आन्सबाडा या ठिकाणी दंगल झाली. मह्, निमच, अमदाबाद व बडोदा येथील लष्कर तिकडे नेण्याचा हुकूम झाला.

१२३० (१९ : १२, १५ ज्यून ६०, १९१–१९२)

काबूलहून अशी बातमी आली आहे की : बुखारी व तुर्क लोकांनी अफगाणी सैन्याचा मोठा पराभव केला. त्यात दोस्त महंमद खानाची दोन मुले मृत्यू पावली. म्हणून खान शोकाचा पोषाक करून त्याचा सूड उगविण्यासाठी गेला.

१२३१ (१९ : १२, १५ ज्यून ६०, १९१–१९२)

अयोध्येजवळ हुसेनपूर गावात एका वाण्याची स्त्री सती गेली. तिला मदत करणाऱ्या ७१ लोकांना पोलिसांनी कैद केले.

१२३२ (१९ : १२, १५ ज्यून ६०, १९२)

दिल्लीच्या बादशहाचे तक्त कलकत्त्यास नेत आहेत. हे बिलोरी सिंहासन अवजड व गाबरे आहे. काशीहून ते आगबोटीने कलकत्त्यास नेतील.

१२३३ (१९ : १२, १५ ज्यून ६०, १९२)

मुंबईस लवकरच धुराचे दिवे लावण्यास लागणाऱ्या वस्तूंचा एक कारखाना उभारला जाईल.

१२३४ (१९ : १२, १५ ज्यून ६०, १९२)

ग्रेट ब्रिटन व आयर्लंड यांच्या संयुक्त राज्याची जमा गतवर्षी ७१ कोटी ८ लाख ९६ हजार ६९०, तर खर्च ६२ कोटी ५० लाख २२ हजार ८९३ झाला. शिल्लक १ कोटी ५८ लाख ७३ हजार ७९७ आहे.

१२३५ (१९ : १२, १५ जून ६०, १९२)

मद्रासेत दोन साहेब मुसलमान झाले : तेथील जुम्मा मशिदीत निमाजासाठी जाऊ लागले, तेव्हा मशिदीत त्यांना मनाई झाली. एखाद्या मौलवीच्या सहीची पत्रे आणा, असा आदेश मिळाला.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई; टी. ग्रॅहॅम, प्रिंटर्स

## ज्ञानोदय, पुस्तक १९, अंक १३, मुंबई, २ ज्युलै १८६०

१२३६ (१९ : १३, २ ज्युलै ६०, १९५–२०१)

आमचा प्रिय भाऊ शेख दाऊद याचा मृत्यू झाला. १५ आगस्त १८४७ रोजी त्याने रे. बर्जेसकडून बाप्तिस्मा घेतला. त्यावेळी तो इंग्रजी शाळेत शिक्षक होता. कोणता धर्म खरा मानावा, याविषयी त्याच्या मनात बरेच दिवस झुंज चालले होते. आपले मित्र व नातेवाईक आपला पाठलाग करतील, अशी त्यास भीती वाटे. खिस्ती झाल्यावरही त्याच्या मनातला संघर्ष चालू होता. पुढे तो कोर्टात रैटर झाला. काही काळ बदफैलीही बनला. पण अखेरीस १८५३ मध्ये मंडळीत परत आला. तो पवित्र शास्त्राचा उपदेश करून खिस्ती मंडळ्यांना मदतही करीत असे. त्याने अनेक मनोरंजक व बोधप्रद पुस्तके लिहिली. धार्मिक आणि अधार्मिक यांचा भेद, हे त्याचे विशेष. शुद्ध आचरण व गुणस्वभाव यांनीच तो लोकप्रिय झाला. आम्हांस आशा वाटते की, त्याचे कुटुंबसुद्धा दिव्य नगराची वाट चालत राहील. मृत्यूपूर्वी त्याला मनोहर व मोलवान् असा खिस्तच दिसत होता. शुभवर्तमानाचे सामर्थ्य त्याच्यात प्रगट झाले. परीक्षा आणि लढाई यातच त्याचे जीवन गेले. दुर्धर रोगाने जर्जर होऊनही त्याचे तोंड आनंदी दिसत होते. आता तो प्रभूमध्ये विश्रांत घेत आहे.

१२३६ अ (इंम : १९३–१९५)

१२३७ (१९ : १३, २ जुलै ६०, १९५–२०१)

हनराबल मालेटसाहेब यांनी एल्फिस्तन व जमशेटजी व जिजीभाई विद्यालयाच्या वार्षिक परीक्षेच्या वेळी काही बोधपर भाषण केले. तेव्हा मराठी व गुजराती पत्रकर्त्यांनी याबद्दल उघड नापसंती दाखविली. मालेटसाहेब म्हणाले : 'सरकार कोणाला जबरीने ख्रिस्ती धर्म शिकवीत नाही. हे खरे आहे. पण ख्रिस्ती धर्माची माहिती करून घेण्यास हरकत नाही, ख्रिस्ती धर्माने माणसाचे सुख वृद्धिंगत होते. पश्चिमदेशीय लोक त्यामुळे ज्ञानी व सामर्थ्यवान झाले.' आता या बोलण्यात वाईट काय आहे बरे? शुभवर्तमान जगात गाजविण्याची येशूची आज्ञा असल्यामुळे त्यांनी असे भाषण केले. सरकारी अंमलदाराने असे बोलू नये, या म्हणण्यात अर्थ नाही. कारण यात कोणावर जुलूम करण्याचा हेतू नव्हता. फक्त सल्ला होता. ज्यांची ख्रिस्ती धर्माचे ज्ञान मिळविण्याची खुशी आहे, त्याला प्रतिबंध करू नये. त्यांनी हे भाषण सरकारी नात्याने केले नाही. जे योग्य दिसले, ते खाजगीरीत्या साहेब बोलले. सरकारी नाते व दर्जा हापिसातच राहिला. साहेबलोक नाही का हिंदू धर्माची माहिती करून घेत? हिंदू, ग्रीक, रोमी, या सर्वांचा इतिहास सर्वजण वाचतात. इतिहासातील अगत्याच्या गोष्टी मुलांना कळल्या नाहीत, तर ते अज्ञानी राहतील आणि विद्वानांना हे लांछन ठरणार आहे. ख्रिस्ती धर्माची स्थापना, अमेरिकेची वसाहत, यांबद्दल ज्ञान मिळविण्यात अयोग्य काहीच नाही. ज्या लोकांनी एवढा हाकाटा केला, त्यातील कित्येकांना ही मते मान्य आहेत. देशाचे कल्याण करणे, हाच देशाभिमान आहे. म्हणून ख्रिस्ती धर्माचा विरोध सोडून द्यावा.

**१२३८** (१९ : १३, २ ज्युलै ६०, २०५–२०६)

लंडन शहराची लोकसंख्या नक्की सांगता येत नाही. कारण सहस्रावधी लोक तेथून स्थलांतर करतात व तितकेच नव्याने येतात. १८५९ साली ५४ हजारांनी लोकसंख्या वाढली, यांपैकी अर्धे लोक तेथे जन्मले असावेत. लंदन ही विशाल उतारशाळाच आहे. गतवर्षी ९३ हजार बालके जन्मली. म्हणजे दर ५ मिनिटांनी १ बालक जन्मते. पण या बेसुमार पिकाची कापणीसुद्धा फार मोठी आहे. कारण ६२,००० मेले. म्हणजे दर आठ मिनिटांस एकाचा मृत्यू झाला. कडक उन्हाळा व हिवाळा, गवंड्याचा हरताळ, ही मृत्यूची कारणे आहेत. दोनशे वर्षांपूर्वी आजाराने मरणारांची संख्या दर लाखात ४,९८८ होती. सध्या ती १,३३३ वर उतरलेली आहे. यावरून रोगांचे प्राबल्य कमी झाले, असे सिद्ध होते. स्वच्छ व निरोगी अन्न, स्वच्छ पाणी, साफ रस्ते, स्वच्छ हवा, वैद्यकीय मदत, यांची सोय वाढत आहे.

**१२३९** (१९ : १३, २ ज्युलै ६०, २०६–२०८)

तात्या टोप्याच्या आप्तकाळातील मित्र दिल्लीचा शाहजादा फिरोजशहा सर्वांची नजर चुकवून कंदहारमार्गे इराणात गेला. तो मक्केस जाणार आहे. तो काही राजकीय कुभांड उपस्थित करणार नाही, पण फकीर होऊन यात्रा करीत राहील.

**१२४०** (१९ : १३, २ ज्युलै ६०, २०६–२०८)

अयोध्या प्रांतात आणखी २–३ स्त्रिया सती गेल्या. या खटल्यातील असामींना कैद झाली.

१२४१ (१९ : १३, २ ज्युलै ६०, २०६–२०८)

काही दिवसांमागे ग्वाल्हेर प्रांतात एक मातीची घागर गावोगावी फिरत होती. कोणच्या तरी दुखण्यावरचा हा तोडगा होता म्हणतात. आता कमिशनरांनी हुकूम काढला की, चिठ्या, चपट्या, घागरी फिरविल्या गेल्या, तर गावच्या चौकीदारास शंभर फटक्यांची शिक्षा मिळेल. लंबारदार व जमीनदार त्यात सामील झाले, तर पगाराच्या शेकडा ५ टक्के दण्ड होईल.

१२४२ (१९ : १३, २ ज्युलै ६०, २०६–२०८)

अयोध्येच्या हरदुई तुरुंगात काही लबाड कैद्यांनी पिठात हाडांची भुकटी स्वतःच मिसळवली आणि कैद्यांमध्ये प्रचार केला की, सरकार सर्वांना धर्मभ्रष्ट करीत आहे. असली कुभांडे घेऊन अफवा उठविणाऱ्या दुष्ट लोकांना मोठी शिक्षा करावयास पाहिजे.

१२४३ (१९ : १३, २ ज्युलै ६०, २०६–२०८)

मुंबईत चवघे चिनी मुसलमान झाले, म्हणून त्यांची मिरवणूक निघाली.

१२४४ (१९ : १३, २ ज्युलै ६०, २०६–२०८)

दक्षिण अमेरिकेत पेरूमधील लिमा प्रांतात दरवर्षी ४५ धरणीकंप होतात.

१२४५ (१९ : १३, २ ज्युलै ६०, २०६–२०८)

गतवर्षी पंजाबात हिंस्र पशूंनी अनेक माणसे मारली. त्यात ४६७ मुले मेली.

१२४६ (१९ : १३, २ ज्युलै ६०, २०६–२०८)

मि. पेस्तनजी सोराबजी यांना बंडकाळातील कामगिरीबद्दल खान बहादूर किताब मिळाला.

**१२४७** (१९ : १३, २ ज्युलै ६०, २०६–२०८)

१० जून रोजी कल्याण व वासिंद दरम्यान आगगाड्यांची टक्कर होऊन एक साहेब मेला.

**१२४८** (१९ : १३, २ ज्युलै ६०, २०६–२०८)

पंजाब सरकारने गतवर्षी ६९ मुलींची दुराचारापासून सुटका केली. कसबिणींनी या मुली आईबापापासून खरेदी केल्या होत्या.

**१२४९** (१९ : १३, २ ज्युलै ६०, २०६–२०८)

मद्रासचे गवर्णर चार्लस त्रिवेल्यन यांच्यावर काही ठपका आल्यामुळे त्यांना विलायतेत परत जावे लागले. लंकेचे गवर्णर हेन्री वार्ड यांची मद्रासेस नेमणूक झाली. गवर्णर कौन्सिलाचे सभासद मोरहेड सध्या अक्टिंग गवर्णर राहातील.

**१२५०** (१९ : १३, २ ज्युलै ६०, २०६–२०८)

अमेरिकेमध्ये पहिले वृत्तपत्र १७०४ मध्ये व दुसरे १८२० मध्ये निघाले. स्वातंत्र्ययुद्धाच्या वेळी फक्त ३५ वृत्तपत्रे होती, आता ४० हजार आहेत. लवकरच ५० हजार होणार आहेत. गेल्या दहा वर्षांत वृत्तपत्रांचा खप ४२ कोटी ७० लाखांवर गेला आहे.

**१२५१** (१९ : १३, २ ज्युलै ६०, २०६–२०८)

अमेरिकेतील मिसिसिपी व तिच्या उपनद्या यांवर १६०० आगबोटी चालत असतात. त्यांची किंमत ६० कोटी रुपये आहे.

१२६२ (१९ : १३, २ ज्यूलै ६०, २०६–२०८)

येत्या अगस्त महिन्याच्या अखेरीस एक मोठा धूमकेतू किंवा शेंडे नक्षत्र दिसू लागेल. १६५६ मध्ये दिसलेल्या धूमकेतूची शेंडी १०० अंश लांब होती. हा धूमकेतूही अत्यंत तेजःपुंज आहे. तो आश्चर्यकारक दृष्टिविषय होईल.

१२६३ (१९ : १३, २ ज्युलै ६०, २०६–२०८)

मार्चमध्ये लंकेच्या किनाऱ्यावर ६९ हजार ६०० रुपयांचे मोत्यांचे शिंपले निघाले. (प्रभोदयवरून)

१२६४ (१९ : १३, २ ज्युलै ६०, २०६–२०८)

सुरतच्या ब्रिग्ज व हारिस या दोघां युरोपियनांनी तापी नदीतून पोहून जाण्याची पैज लावली. अशा प्रकारात वाहून जाण्याची भीती असते. ज्यात आपला नाश आहे, अशा पैजा लावू नयेत. ऐहिक व पारलौकिक कल्याणाच्या गोष्टीत पैजा लावणारे किती सापडतील? इंग्लंडमध्ये दोन माणसांची झोंबी झाली, ती पहाण्यास शहाणेसुरते लोकही गेले होते. ही किती लज्जेची गोष्ट आहे?

१२६५ (१९ : १३, २ ज्युलै ६०, २०६–२०८)

महाराणी व्हिक्टोरियाच्या मुकुटात ११ लाख २८ हजार रुपयांचे हिरे व मोती जडविलेले आहेत. (प्रभोदयवरून)

मुंबई, एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

**१२६६** (१९ : १४, १६ ज्युलै ६०, २०९–२१०)

ज्या गोष्टीची आम्ही बहुत दिवस इच्छा धरीत होतो, ती गोष्ट ईश्वराने घडवून आणली. मुंबईच्या पवित्र शास्त्र प्रसारक मंडळीने विद्याखात्याचे डैरेक्टर यांस पत्र लिहून सरकारी शाळांत शास्त्राची प्रत ठेवण्यास परवानगी मागितली. डैरेक्टर यांनी आपल्या उत्तरात म्हटले आहे की, अशी प्रत ठेवण्यास हरकत नाही. शाळेच्या ग्रंथसंग्रहात त्या सांभाळून ठेवाव्यात. ज्या विद्यार्थ्यांची खुशी असेल, त्यांना वाचू द्यावे. म्हणून ८ भाषांतील प्रती शाळांकडे रवाना झाल्या. याबद्दल आम्हास फार आनंद वाटतो.

**१२६६ अ** (इंम : २०९)

**१२६७** (१९ : १४, १६ ज्युलै ६०, २१०–२११)

अहमदनगरच्या दुसऱ्या मंडळीवर रे. विष्णु भास्कर करमरकर यांना पालक नेमले आहे. पूर्वीचे पालक रे. रामकृष्ण मोडक यांनी ५ वर्षे विश्वासूपणे काम केले. त्यांना मुंबईस नेमल्यानंतर नगरात विष्णुपंतांची नेमणूक झाली. सुरुवातीस या नेमणुकीबद्दल त्यांनी फार अनमान केले. पण त्यांची उपदेशाची रुची सर्वांना आवडली. मिशनाने त्यांची सर्व विषयामध्ये परीक्षा घेतली. नंतर थोरल्या भजनालयात त्यांना दीक्षा देण्याचा समारंभ पार पाडला. रे. फरबांक व बालेंटैन यांनी प्रार्थना व स्तोत्र म्हटली. रे. सिदोबा बाबूर्जीनी त्यांना उजवेपणाचा हात दिल्हा. आमची ईश्वरास प्रार्थना आहे की, या नव्या पालकाच्या हातून अनेक जीवात्मे ख्रिस्ताकडे यावेत. पीक फार आहे, कामकरी थोडे आहेत.

**१२६७ अ** (इंम : २१०)

**१२५८** (१९ : १४, १६ ज्युलै ६०, २१२–२१३)

एका गोसावणीने एका अनाथ मुलाला सांभाळले होते. तो जवळच्या गावातील मिशनाच्या शाळेत जात असे. एक दिवस गावच्या नदीला मोठा पूर आला होता. पलीकडच्या गावचा एक देव नदीत बुडाला. म्हणून लोक दोराच्या सहाय्याने पाण्यात जाऊन देवाचा शोध घेत होते. पुढे मुलगा शाळेत गेल्यावर या प्रकाराचा हास्यास्पदपणा त्यास शिक्षकांनी समजावून दिल्हा. त्याने गळ्यातील माळ तोडून ख्रिस्ती होण्याचे ठरविले. नंतर त्याच्या आईने ख्रिस्ती धर्म स्वीकारण्याचे ठरविले. ही मायलेकरे मंडळीस मिळाली आहेत.

**१२५८ अ** (इंम : २१२)

**१२५९** (१९ : १४, १६ ज्युलै ६०, २१३)

अहमदनगर जिल्ह्यांत शेंडी येथे तिघा तरुणांचा बाप्तिस्मा झाला. ते महार असून हुशार व उद्योगी आहेत. त्यांचा दीक्षाविधी पहाण्यास गावकऱ्यांनी गर्दी केली होती. गावच्या पाटलासही हा समारंभ पाहून आनंद वाटला. उंच जाती अस्पृश्यांना देवळात जाऊ देत नाहीत. ख्रिस्ती लोकांत मात्र प्रत्येकजण देवळात जाऊ शकतो. दीक्षा घेणारे तरुण चांगल्या चालीचे असल्याबद्दल पाटलाने खात्री दिलेली आहे.

**१२५९ अ** (इंम : २१३)

१२६० (१९ : १४, १६ जुलै ६०, २१३–२२०)

धर्मसंबंधी संभाषणाबाबत 'एक ख्रिस्ती' पत्रात म्हणतो की : अबदुल शहा म्हणाले की, येशू तारणारा नाही, तर तलवार गाजविणारा आहे. पवित्र शास्त्रात तसे वाक्य आहे. तेव्हा रे. रामकृष्णपंतांनी या वाक्याचा अर्थ समजावून दिल्हा. लोकांचा छळ व द्वेष सहन करावा लागतो, म्हणून ते वाक्य आहे. विधर्मी लोकांनी अनेक ख्रिस्त्यांना मारले. रे. दाजी पांडुरंग यांनी सांगितले. मोशाच्या पुस्तकांवर त्याचे नाव नसते, तरी त्यातील वाक्ये ईश्वराचीच आहेत, म्हणून ती खरी आहेत. रा. भवानी विश्वनाथांना मात्र त्याचे नक्की लेखक कोण, ते हवे होते. कारण त्यांत बहुत ठिकाणी तृतीय पुरुषी उल्लेख दिसतात. श्री. मोडक म्हणाले की, इंग्रजीत तसे लिहिण्याची चाल आहे. मराठीतही काही वेळा तसली वाक्ये येतात. अमक्यानेच ही पुस्तके लिहिली, असा स्वतंत्र उल्लेख असण्याचे काहीही कारण नाही. जरी या पुस्तकांचे कर्ते वेगवेगळे असले, तरी त्यांचे लेखन पवित्र आत्म्याच्या प्रेरणेनेच झाले. रे. दाजी म्हणाले की, देवाला तोंड नाही, असल्या आक्षेपात काही तथ्य नाही. कां तर तो उल्लेख लाक्षणिक आहे. मनुष्याशी बोलताना देव मानवी वाणीने बोलत असतो. शिवाय नैसर्गिक चमत्कार हेही ईश्वराचे बोलणेस असते. उदा., वीज, पाऊस, धुके, वगैरे.

**१२६१** (१९ : १४, १६ ज्युलै ६०, २२०–२२१)

पवित्र शास्त्रात म्हटले आहे की : उन्हाळ्यात गोळा करतो तो पुत्र बुद्धिमान, पण कापणीच्या वेळी निद्रायमान राहतो तो लज्जाकर समजावा. द्वेष, झगडे उठवितात, पण प्रीती सर्व अपराधांस आच्छादिती. धनवानाचे द्रव्य हे त्याचे सुदृढ नगर आहे. गरिबाचा नाश हे त्याचे दरिद्र आहे. दुष्कर्म करणे, मूर्खाला खेळ असे आहे. परंतु बुद्धिमान मनुष्य ज्ञानसंपन्न आहे. न्यायी कधी ढळणार नाहीत, परंतु पृथ्वीत दुष्ट स्वस्थ बसणार नाहीत. जो डोळे मिचकावतो, तो दुःख देतो. पण वाचाळ मूर्ख खाली पडतो. न्यायीचे कार्य जीवनार्थ आहे, दुष्टाची प्राप्ती नाशासाठी असती. जे मान्य ते न्यायीच्या ओठांस कळते, परंतु दुष्टाचे मुख कुटिल बोलणारे आहे. जो सैल मुठीने खर्च करतो, तो दरिद्री होतो. परंतु उद्योगाचा हात धन मिळवितो. परमेश्वराचे भय आयुष्य वाढविते, दुष्टाची मात्र वर्षे उणी होतात.

**१२६२** (१९ : १४, १६ ज्युलै ६०, २२१–२२२)

मद्रास इलाक्यात धर्मसंजीवन होत आहे. नामधारी मूर्तिपूजक व ख्रिस्ती यांची फजिती होत आहे. लोक पापरूपी मृतावस्थेतून सजीव होऊन उठत आहेत. खरेपणाचा अंगीकार करून शांती व तारण पावत आहेत.

**१२६३** (१९ : १४, १६ ज्युलै ६०, २२१–२२२)

दक्षिण हिंदुस्थानच्या चर्च मिशनेरी सोसायटीत १८५० त ३८७७ ख्रिस्ती होते. १० वर्षांत त्यांची संख्या २६,६३६ वर गेली. शिवाय १०,६०४ उपदेश ऐकण्यास येतात. मंडळाच्या ४३५ शाळामध्ये ११,६९२ विद्यार्थी आहेत. (प्रभोदयावरून)

**१२६४** (१९ : १४, १६ ज्युलै ६०, २२१–२२२)

गुजराती सरकारी शाळेत विद्यार्थ्यांची संख्या ५ वर्षांत ७६५५ वरून १४,५६६ वर गेली. (प्रभोदयावरून)

१२६५ (१९ : १४, १६ ज्युलै ६०, २२१–२२२)

तापाची साथ चालू असेल, तरच तेलात भिजविलेले पडदे वाऱ्याचे लावले असता रोगाचे प्रमाण कमी होते. मिसर देशात रोगराईने १० लाख माणसे मेली. पण तेलाच्या वखारीमधील तेली व मजूर एकही मेला नाही. म्हणून तेलात भिजविलेले पडदे वापरावेत.

१२६६ (१९ : १४, १६ ज्युलै ६०, २२१–२२२)

अडचणीच्या वेळी ईश्वरच साहाय्य करीत असतो. गेली काही वर्षे व्हेल माशांचा तुटवडा पडला. तेव्हा त्यांतून निघणाऱ्या तेलाचा पुरवठाही थांबला. आता कोळशापासून तेल काढण्याचे काम चालले आहे. अमेरिकेत असे खाणीतून तेल मिळते. एक खाण तर १९९ फूट खोल असून दर २४ तासांत ४२ पिंपे तेल त्यातून मिळते.

१२६७ (१९ : १४, १६ ज्युलै ६०, २२१–२२२)

पत्रे व बंग्या त्वरित पोहोचविण्यासाठी लंडनमध्ये मंडळी स्थापन झाली. तिचे भांडवल २५ लाख आहे.

१२६८ (१९ : १४, १६ ज्युलै ६०, २२२–२२३)

युनैटेड स्तेत्स देशात शिद्दी गुलाम दीर्घायुषी असतात. एका शिद्याचे वय मरणसमयी १४० वर्षे होते.

१२६९ (१९ : १४, १६ ज्युलै ६०, २२२–२२३)

युनैटेड स्तेत्स व फ्रान्स या देशांत यंत्राने जोडे तयार होतात. फ्रान्स लष्कराच्या एका कारखान्यात दररोज ३० हजार माणसांचे जोडे बनवले जातात.

१२७० (१९ : १४, १६ ज्युलै ६०, २२२–२२३)
चिनी लोकांत म्हण आहे की, स्त्री नीतिमान असावी, तिचे मुख सलज्ज असावे, मिष्ट भाषणाचे प्रवाह तिच्या होटातून बाहेर पडावे आणि हात उद्योग करण्यास तत्पर असावेत.

१२७१ (१९ : १४, १६ ज्युलै ६०, २२२–२२३)
मुंबई इलाख्याची राजधानी पुणे शहरात होईल. गव्हर्नरांचा बंगला व इतर इमारती यांसाठी जागा नक्की करण्यात आली आहे.

१२७२ (१९ : १४, १६ ज्युलै ६०, २२२–२२३)
सिंदबा घाटात भागोजी नावाच्या भील नाइकाने ५०० सैनिकांसह पुन्हा धुंडावा सुरू केला. नगरचे पोलीस अधिकारी तिकडे रवाना झाले.

१२७३ (१९ : १४, १६ ज्युलै ६०, २२२–२२३)
मुंबई परिसरात सुताचे कापडाचे कारखाने झाले. आणखीही काही कारखाने होणार आहेत. इथले तयार कापड उदमी लोकांना व गिऱ्हाईकांना फार पसंत पडते.

१२७४ (१९ : १४, १६ ज्युलै ६०, २२२–२२३)
सन १८५८ मध्ये आयात मालाच्या जकातीचे उत्पन्न ५५॥ लक्ष आले होते. यंदा ते ४० लाखांनी वाढून ९५॥ लक्ष रुपये झाले. मीठ व अफू यांपासून प्रत्येकी ९ लाखाची जकात आली. निर्यात मालावरील जकातीचे उत्पन्न ५९ लाख रुपये आले.

१२७५ (१९ : १४, १६ ज्युलै ६०, २२३–२२४)
दिल्ली शहरातील जुम्मा मशिद सार्वजनिक नाही, तर ती दिल्लीच्या बादशहाची असल्यामुळे तिच्यावर इंग्रज सरकारची मालकी सिद्ध झाली. आता तेथे लष्कर राहील.

**१२७६** (१९ : १४, १६ ज्युलै ६०, २२३–२२४)

अयोध्येच्या राजपुत्राने वैसरायशी ओळख करून घेण्याची इच्छा व्यक्त केली, म्हणून राजाने त्यास वेताच्या छडीने खूब ठोक दिल्हा.

**१२७७** (१९ : १४, १६ ज्युलै ६०, २२३–२२४)

चीन देशातील लढाईस इंग्रज सरकारला १ कोटी रुपये खर्च येईल.

**१२७८** (१९ : १४, १६ ज्युलै ६०, २२३–२२४)

बायजाबाई शिंदे यांच्या ठेवींवरील १८५७ पासूनचे व्याज रोख देण्यात येईल.

**१२७९** (१९ : १४, १६ ज्युलै ६०, २२३–२२४)

माथेरानचा माजी गवर्णर लॉर्ड एल्फिनस्तन यांचेसाठी बंगला ४७ हजार खर्च करून बांधला होता. तो सरकारने विक्रीस काढला. एक यहुदी व्यापारी २२ हजार देण्यास तयार आहे. असा तोटा सहन करण्यापेक्षा विद्यावृद्धीकडे व देशसुधारणेकडे सरकारने लक्ष द्यावे.

**१२८०** (१९ : १४, १६ ज्युलै ६०, २२३–२२४)

गेल्या १०३ वर्षांत इंग्रजांनी १३ लढाया केल्या. सरासरी ८ वर्षांनी एक लढाई झाली. आरमाराचा खर्च दरसाल ८ कोटी झाला. १८१४ मध्ये २३ कोटी ५० लाख रुपये खर्च आला. गतवर्षी १० कोटी खर्च झाला.

**१२८१** (१९ : १४, १६ ज्युलै ६०, २२३–२२४)

कलकत्त्यात डाक्तर डफ यांनी दोघा हिंदू तरुणांना बाप्तिस्मा दिल्हा.

**१२८२** (१९ : १४, १६ ज्युलै ६०, २२४)

मोल्स्वर्थकृत 'इंग्रजी-मराठी कोशाचा' संक्षेप या पुस्तकाच्या छपाईला प्रारंभ झाला. वर्गणीदारांनी अहमदनगरला शाहू दाजी, पुण्यात बाबा पदमनजी, मुंबईत काशीनाथ विश्वनाथ, यांच्याकडे नावे नोंदवावीत. क्यांडीच्या कोशाच्या काही प्रती अद्याप शिल्लक आहेत. किं. ४ रुपये आहे. मोल्स्वर्थच्या पुस्तकाची किंमत छपाईनंतर दीडपट पडेल. तरी आगाऊ नावे नोंदवावीत.

मुंबई, एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

---

## ज्ञानोदय, पुस्तक १९, अंक १५, मुंबई, १ आगस्त १८६०

---

**१२८३** (१९ : १५, १ आगस्त ६०, २२५–२२६)

बंगाल आणि ओरिसा येथे चरकपूजा म्हणजे बगाडें घेण्याची अघोरी चाल आहे. असे प्रसिद्धपणे शरिरास यातना देणे, हे क्रूर कर्म होय. ही नीच चाल बंद करावी, म्हणून तिकडील मिशनरी लोकांनी सरकारास पुष्कळ आग्रह केला. बंगालचे लेफ्टनंट गव्हर्णर नेहमी लोकांचे मन वळविण्याचा प्रयत्न करतात. सरकारनेही आता हुकूम काढला आहे की, पोलिसांनी बगाडांना बंदी करावी. अशा कृत्यास परवानगी नाकारावी व लोकांना सरकारचा मानस समजावून सांगावा. सरकारचा लोकांच्या धर्मांत हात घालण्याचा हेतू नाही. पण हा विधी क्रूर आहे. शहाणे व सुधारलेले लोक याचा धिक्कारच करतात. कालीघाटच्या यात्रेत हल्ली बगाड होत नाही. बगाडाची चाल सगळ्या देशातून नाहीशी झाली, तर फार बरे होईल.

**१२८३ अ** (इंम : २२५)

**१२८४** (१९ : १५, १ आगस्त ६०, २२७–२३०)

काशी मिशनात गेल्या वर्षी दहा जणांचा बातिस्मा झाला. त्यात एक पंजाबी स्त्रीदेखील आहे. पुष्कळ दिवस ती भजनालयात येत असे. तिचा मनःपालट झाला. माधवराव नामे गृहस्थही आग्र्याहून येथे आला. तो नास्तिकांची मते सांगे. पण भजनास मात्र अगत्याने येई. भ्रमिष्ट व पोकळ असा निःशास्त्रवाद वाचून तो नास्तिक बनला. काही काळ तो काशीबाहेर गेला. पण परत आल्यावर त्याने दीक्षा घेतली. साधारणतः नातेवाईकांत गेलेले लोक परत येत नाहीत. पण हा परत आला. ईश्वराच्या आशीर्वादाने तो येशू ख्रिस्ताकडे वळला. नातेवाईकांच्या द्वेषाला व मारहाणीला दाद दिली नाही. कित्येक शहरांत धर्मपालट होत आहे. कारण बंडाचा नाश झाल्यामुळे लोकांची श्रद्धा अशी बनली की, इंग्लिश सरकारला ईश्वराचा विशेष आश्रय आहे. काही नेटिव ख्रिस्ताची गाणी गातात.

**१२८४ अ** (क्रम : २२६–२२७)

**१२८५** (१९ : १५, १ आगस्त ६०, २३१–२३३)

रोमन कॅथोलिकांनी 'ख्रिस्ती धर्माचे सार' नावाचे पुस्तक प्रसिद्ध केले. परंतु ते निरुपयोगी आहे. कारण भाषा दुर्बोध आहे. येशूच्या पुनरुत्थानापर्यंतच्या हकिगतीवर प्रातेस्तंत लोकही विश्वास ठेवतात. पण पोपाची सत्ता त्यांना नाकबूल आहे. ७ संस्कारही त्यांना अमान्य आहेत. बाप्तिस्मा व प्रभुभोजन हे दोन संस्कारच त्यांना मान्य आहेत. येशू ख्रिस्तच वेदीवर अर्पिला जातो, हे म्हणणे चूक आहे. पर्गेटोरी हा विस्तवयुक्त नरकसुद्धा त्यांना मान्य नाही. येशूसंगती स्वर्गात राहून अनंतकाळ सुख भोगावे, हे त्यांचे ध्येय आहे. कोरीव जिन्नस व निर्जीव पदार्थ, यांची जर पूजा केली, तर ख्रिस्ती आणि मूर्तिपूजक यांच्यांत काहीच फरक राहणार नाही. कार्योलिक मात्र मूर्तिपूजेचे पुष्टीकरण करतात. शिवाय मेरीस 'ईश्वराची आई' मानतात. हे अगदी चूक आहे. त्यांनी शास्त्र शोधून पाहावे, म्हणजे त्यांना खरे तत्त्व कळेल.

१२८५ अ (इंग : २३०–२३१)

१२८६ (१९ : १५, १ आगस्त ६०, २३३–२३५)

एक नगरवासी ' पत्रात म्हणतो की : कडा या गावी एका शास्त्र्याने वर्गणी करून पशुयाग केला व सहा मेंढे मारले. यज्ञासाठी २ हजार रुपये खर्च झाले. त्र्यंबकेश्वराहून कांही ब्राह्मण आले होते. सखाराम भट्ट हा यजमान होता, तर १८ ब्राह्मण ऋत्विज झाले. मेंढ्यांची पूजा करून त्यांस कुणब्याच्या हातून दर्भाच्या फासाने मारतात. त्यांचे मांस शिजल्यावर साखरेसह ते खातात. प्रत्येक ऋत्विजास भरपूर दक्षिणा देण्यात आली. नगरचे अनेक शास्त्री हा यज्ञ पहाण्यास आले होते. पुष्कळांना हे वेदोक्त कर्म पाहण्यास मिळाल्याबद्दल फार आनंद वाटला. कसेही असले, तरी ही हिंसा करावयास नको होती, असे लोक म्हणतात. मंत्राचे सामर्थ्य आता राहिले नाही, म्हणून ब्राह्मण हळहळताना दिसतात. मारलेल्या पशूस मंत्राने पुन्हा जिवंत करता येते, असे त्यांना वाटते. पण बैलांच्या आणि मेंढरांच्या रक्ताने पापाची क्षमा होणार नाही. देवाने दया करावी, म्हणून येशू ख्रिस्ताने खांबी मरण पतकरले. म्हणून अशा पशुयज्ञांची काही गरज नाही.

१२८७ (१९ : १५, १ आगस्त ६०, २३५–२३६)

मोहरमच्या सणात शांतता म्हणून जाहिरनामा निघालेला आहे. त्यानुसार ताबूत व पंजे मिरविणारांनी दंगल न करतील असेच लोक बरोबर न्यावेत. तमाशगिरांनी ते पाहाण्यास जावे, पण पळून दंगा करू नये. कोणतेही हत्यार कोणी जवळ ठेवले, तर त्यास अटक होऊन कैद होईल. १० व्या तारखेस सायंकाळी ६ च्या आधी सगळे ताबूत गावाबाहेर न्यावेत व घरी परत जाताना शांतता राखावी. कैफी व अंमली पदार्थांच्या दुकानदारांनी ९ व्या व १० व्या तारखेस दुकाने रात्री व दिवसा बंद ठेवावीत. वाघ वगैरे सोंग घेणारांना शिक्षा होईल, असे नियम जाहीर झाले. मि. फोर्जेट हे पोलीस-अधिकारी अतिशय दक्ष असून अनिष्ट चाली मोडीत आहेत.

**१२८८** (१९ : १५, १ आगस्त ६०, २३६–२४०)

धर्मसंबंधी संभाषणाबाबत शहाच्या बाजूने एक पारशी तरुण म्हणाला की : देव आकारी आहे, असे निर्गमावरून दिसते. उदा. देव तोंडातोंड बोलला. तेव्हा रे. रामकृष्ण म्हणाले की, त्याचा अर्थ शब्दशः घ्यावयाचा नाही. कारण देव आत्मा आहे, असे शास्त्र म्हणते. शहास मात्र मोश्याची वाक्ये व इतरांची, याची नक्की विभागणी हवी आहे. दानी लोकांनी लाइश गाव जिंकले, तेव्हा दान हे गाव पाठलागाची सीमा दर्शविते. यार्देन नदी जार व दान यांच्या संगमाने तयार झाली आहे. दाना हा फाटा असावा. दानच्या अस्पष्ट उल्लेखावरून शहाने वाद काढला. दुसऱ्यांनी काही मजकूर लिहिला, तरी मोश्याच्या विधानांना बाधा येत नाही, हे त्यास पटवून दिले आहे. तरीही प्रतिपक्षाच्या लोकांनी थट्टा केली की, यांना शास्त्राची अजिबात माहिती दिसत नाही. असे सदरहू सभेस जाणारा 'एक ख्रिस्ती' पत्रात लिहितो.

**१२८९** (१९ : १५, १ आगस्त ६०, २४०)

इंग्लंडमधील दुष्टाई कमी होऊन नीतीची व धार्मिकपणाची वृद्धी व्हावी, असा जाहीरनामा राणीसाहेबांनी आपल्या कौंसलाच्या अनुमतीने काढला.

**१२९०** (१९ : १५, १ आगस्त ६०, २४०)

सीरिया देशात ख्रिस्त्यांचा पाठलाग होत असूनही तुर्की सरकार काही बंदोबस्त करीत नाही.

**१२९१** (१९ : १५, १ आगस्त ६०, २४०)

दिल्लीच्या माजी बादशाहास इंग्रजांनी कैदेत का होईना, पण मोठ्या मिजाशीत ठेवले, हे कळल्यावर दिल्लीचे लोक इंग्रजांचे गुण गात आहेत. (ज्ञानबोधकावरून)

१२९२ (१९ : १५, १ आगस्त ६०, २४०)

दिल्लीचा शहजादा याकूब यास दरमहा दहा रुपये पेन्शन मिळणार.

१२९३ (१९ : १५, १ आगस्त ६०, २४०)

कप्तान आटकिन व लेफ्टनेंट प्रोबिन यांनी राजा नाईक आणि त्याचे भील सरदार यांचा पाठलाग केला. पण कोणीच सापडले नाहीत. सहा हजार रुपयांची रोकड मात्र हाती लागली.

१२९४ (१९ : १५, १ आगस्त ६०, २४०)

मुरादाबादेचा नवाब ५-६ महिन्यांनी विलायतेस राहण्यास तयार असून त्याच्याबरोबर १०० माणसांचे खटलेही जाईल.

१२९५ (१९ : १५, १ आगस्त ६०, २४०)

खंबायतच्या टपालातील एका शिपायाने लखोट्यावरील छाप किंवा तिकिटे काढून घेतली, म्हणून त्यास ७ वर्षांची कैद झाली.

१२९६ (१५ : १५, १ आगस्त ६०, २४०)

वायव्य इलाख्यातील एका वृत्तपत्रावरून असे समजते की, सप्तऋषीच्या जवळ अकाशात शेंडेनक्षत्र दिसू लागले आहे.

१२९७ (१९ : १५, १ आगस्त ६०, २४०)

गेल्या मे महिन्यात बंगालच्या टाकसाळीत ४७ लाख ३३ हजार ६३९ रुपयाचे, तर मद्रासेत ४ लाख २९ हजार ४०४ आणि मुंबईत २५ लाख ९८ हजार रुपयाचे नाणे पाडण्यात आले. (धूमकेतुवरून)

१२९८ (१९ : १५, १ आगस्त ६०, २४०)

दिल्ली ग्याझेटकडे अशी बातमी आली की, आदिल अहमद व रावसाहेब पेशवा हे दोघे बंडखोर वेष पालटून बासबारा येथे फिरत आहेत.

१२९९ (१९ : १५, १ आगस्त ६०, २४०)

कलकत्याच्या कायदेमंडळातील नामदार पी. डब्ल्यू लिजेटसाहेब मरण पावले. समुद्रातील एका गलबतावर त्यांचा मृत्यू झाला.

मुंबई एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

**१३००** (१९ : १६, १५ आगस्त ६०, २४३-२४९)

"माक्षिमा आणि मिनिमा यांची कृत्ये बीजगणिताने सोडविण्याची रीती" हे पुस्तक दिल्लीचा गुरू रामचंद्र सुंदर लाल याने केले. त्याच्या पुस्तकास प्रस्तावना लिहिताना डी मार्गनसाहेब म्हणतात की : कोणीही सूचना न करता रामचंद्राने हे पुस्तक लिहिले. रामचंद्र हा पानपत गावचा राहणारा आहे. दोन रुपये स्कालरशिपवर त्याने शिक्षण घेतले. त्याला गणित विषयाची फार अभिरुची होती. कोर्टात रैटर असताना त्याने गणित विषयाची अनुवादित पुस्तके लिहिली. ज्ञानप्रसारासाठी मासिक चालविले. युरोपियन विद्या व धर्म या विषयांवरही निबंध लिहिले. टामसन साहेबाकडून नवा करार घेऊन वाचला. प्रथम तो दरोबस्त धर्म खोटे आहेत, असे मानीत असे. पुढे डाक्तर स्प्रेंजरशी त्याची गाठ पडली. या परिचयातून बेथूनसाहेबाशी परिचय झाला. कोर्ट आव डैरेक्टरांनी त्यास दोन हजार रुपयांचे बक्षिस व सन्मानाचा पोषाख दिल्हा. ईश्वराच्या अतर्क्य व कृपायुक्त सूत्राकडून येशू ख्रिस्ताबद्दल माहिती मिळाली. सरकारी नोकर नास्तिक असतात व देव एक असल्यामुळे कोणत्याच धर्माची गरज नाही, असे पूर्वी तो समजत असे. परंतु सरकारी नोकरांना गुडघे टेकून प्रार्थना करताना त्याने पाहिले. मग त्याचा मनःपालट होऊन त्याने बाप्तिस्मा घेतला. बंडाच्या काळात त्याला अक्षरशः लपून बसावे लागले. शांतता झाल्यावर सरकारने त्यास रुडकीच्या इंजिनिअरिंग कॉलेजात मुख्य गुरू नेमले. सध्या तो दिल्ली पाठशाळेत मुख्य गुरू आहे.

**१३०० अ** (इंम : २४१–२४३)

**१३०१** (१९ : १६, १५ आगस्त ६०, २४९–२५२)

तुर्कस्थानात खारपूत गावी पेत्रस नावाचा एक धर्मोपदेशक आहे. तो नामधारी ख्रिस्ती लोकांना उपदेश करून त्यांचा मनःपालट करीत असे. एकदा तो डोंगरवटीतल्या पालू शहराजवळच्या खेड्यात गेला. तेथील खुर्द नावाचे दुष्ट लुटारू माणसांचे सर्वस्व हरण करून प्राण घेत असत. पेत्रसने एका घरी मुक्काम केला. रात्री चोर आले, तेव्हा घरधन्याने चोरांना सांगितले की, हा साधू आहे. पण चोरांनी पेत्रसाचे घड्याळ हिसकावले. पेत्रस शांतपणे त्यांना म्हणाला की : 'न्यायाचा दिवस जेव्हा उगवेल, तेव्हा तुमची सर्व कर्मे प्रगट होतील. देवासमोर तू कोणत्या तोंडाने उभा राहशील? चोरांना नरकामध्ये अनंतकाळ यातना भोगाव्या लागतात.' तेव्हा चोरांना पश्चात्ताप झाला. येशू ख्रिस्त त्यांना क्षमा करील, हे पटवून देण्यात पेत्रस यशस्वी झाला. पेत्रस रात्रभर जागत राहिला व चोरांच्या मनात सैतान येऊ नये, म्हणून प्रार्थना करीत बसला. चोरांची वृत्ती खचितच पालटली होती. ते सकाळी शांतपणाने निघून गेले.

**१३०१ अ** (इंम : २४९)

१३०२ (१९ : १६, १५ आगस्त ६०, २५२–२५३)

युरोप खंडात बहुत वेळा माशांचे व तत्सम पदार्थांचे पाऊस पडले. मेजर हेरियट यांच्या डायरीवरून असे दिसते की : १७८० साली मद्रासेत माशांचा पाऊस पडला. १८३० व १८३७ मध्येही माशांचा पाऊस पडला. १८३९ त सिंधमध्ये सकर या ठिकाणी मुतेऱ्यांची वृष्टी झाली. जमिनीवर पडले, तरी ते मुतेरे जिवंत व चपळ असे होते. १८४६ मध्ये कोकणात पावसातून काही चमत्कारिक पदार्थ पडला. त्यास लोकांनी 'मोत्यांचा पाऊस' म्हटले. पण ती पक्ष्यांची लहान अंडी असावीत. यंदा ठाणा येथे ६ इंच माशांचा पाऊस पडला. याचे कारण असे की, समुद्रावर मोठ्या वावटळी होतात. वाऱ्याबरोबर मासे उंचावर जातात व काही वेळाने खाली पडतात. कधीकधी वाऱ्याचा वेगच इतका असतो की, हे मासे खूप दूरवर नेले जातात.

१३०३ (१९ : १६, १५ आगस्त ६०, २५३–२५४)

व्यापारी लोकांचे मुखत्यार व कस्टमचे कमिशनवर स्पूनर यांच्या बैठकीमध्ये असे ठरले की, आगत मालावर जकात वाढवावी. निर्गत मालावर जकात कमी असावी. (धूमकेतूवरून)

१३०४ (१९ : १६, १५ आगस्त ६०, २५३–२५४)

मुंबईत ऐरिस नावाचे इंग्रजी साप्ताहिक सुरू झाले.

१३०५ (१९ : १६, १५ आगस्त ६०, २५३–२५४)

सदर अदालत लवकर पुण्यास न्यावी, असा हुकूम झाला.

१३०६ (१९ : १६, १५ आगस्त ६०, २५३–२५४)

तारायंत्र खात्यास प्रतिवर्षी १० कोटी ५४ लाख ७५० रुपयांचा तोटा येतो. (प्रभोदयावरून)

**१३०७** (१९ : १६, १५ आगस्त ६०, २५३–२५४)

बल्लारी गावचे मिशन १८१० मध्ये सुरू झाले. तेथे १०६ ख्रिस्ती असून १३० विद्यार्थीही शिकतात. बेळगांवचे मिशन १८२० मध्ये सुरू झाले. तेथे ३३ ख्रिस्ती लोक असून मिशनाच्या शाळेत ६० मुले आहेत. बंगलोर मिशनही १८२० पासून चालू आहे. तेथे ५४ ख्रिस्ती असून शाळेत ३९३ विद्यार्थी आहेत. उपदेशक तयार करण्याच्या शाळेत ४ विद्यार्थी आहेत. (प्रभोदयावरून)

**१३०८** (१९ : १६, १५ आगस्त ६०, २५३–२५४)

बेळगाव येथे रे. बेननसाहेबांनी एका ब्राह्मण पतिपत्नीला बाप्तिस्मा दिल्हा.

**१३०९** (१९ : १६, १५ आगस्त ६०, २५३–२५४)

बंड मोडल्यापासून लखनौमध्ये ८९ लोकांचा बाप्तिस्मा झाला.

**१३१०** (१९ : १६, १५ आगस्त ६०, २५३–२५४)

छोटा नागपूर प्रगण्यात २००० कोल लोक ख्रिस्ती झाले. जंगलातून दीक्षा घेण्यासाठी अनेक लोक येतात. ही गोष्ट नामदार गवरनरांसह अभूतपूर्व वाटली. ४६ कबीरपंथी लोक आले व दीक्षा मागू लागले. असल्या कुत्सित पंथामधून लोक तारक ख्रिस्ताकडे येतात, तेव्हा आम्हांस फार आनंद वाटतो.

**१३११** (१९ : १६, १५ आगस्त ६०, २५४–२५५)

ठाण्याचे दादोबा देवजी विलायतेस सुखरूप पोहोचले. ५-६ मजली इमारती पाहून त्यांस नवल वाटले. कुत्र्यांवर कर द्यावा लागतो, हजामतीस बकिलाच्या फीइतका पैसा द्यावा लागतो, तीन रुपयाचे तांदूळ दोघांस ३ दिवस पुरतात, हे पाहून त्यांना नवल वाटले. (ज्ञानप्रकाशवरून)

१३१२ (१९ : १६, १५ आगस्त ६०, २५४–२५५)

गुजराथमधील शेट महिपतराम रूपरामही सुखरूप लंदनला पोहोचले. एशियाई लोकांसाठी बांधलेल्या घरात ते राहातात. यंदा १२०० लोक तेथे राहून गेले. ते सर्व एशियाई होते. (ज्ञानप्रकाशवरून)

१३१३ (१९ : १६, १५ आगस्त ६०, २५४–२५५)

महाराजा दलिपसिंग सध्या विलायतेत आहेत. तिकडील विद्याभ्यासाची प्रगती पाहून त्यांनी पंजाबातील विद्याखात्याच्या डैरेक्टरास दरमहा हजार रुपये पगार देण्याचे ठरविले. आता पंजाबात नवीन शाळा सुरू होतील. (ज्ञानप्रकाशवरून)

१३१४ (१९ : १६, १५ आगस्त ६०, २५४–२५५)

इंग्लंडात हल्ली ४५ पारशी राहातात. हिंदु, मुसलमान तर कित्येक आहेत. अमेरिकेतसुद्धा कलकत्त्याचा एक मनुष्य राहतो.

१३१५ (१९ : १६, १५ आगस्त ६०, २५४–२५५)

सन १८५७ मध्ये हिंदुस्थानात गोरे सैन्य ४५,५२२, तर काळे २,३२,२२४ होते. आता ४८८० अंमलदार व २,२४,३५३ शिपाई ठेवणार आहेत. (ज्ञानप्रकाशावरून)

१३१६ (१९ : १६, १५ आगस्त ६०, २५४–२५५)

सर्व सरकारी नोकरांना प्राप्तीवरील कर द्यावा लागतो. व्यापार-उदीम करणारांना मात्र हा कर नाही. पूर्वीच्या राजांप्रमाणे इंग्रजसरकार जबर व निरर्थक कर बसवीत नाही. उगीचच कारणावाचून दुकाने बंद ठेवणारांना मात्र दंड व १ वर्षाची शिक्षा होईल.

१३१७ (१९ : १६, १५ आगस्त ६०, २५६)

मद्रासचे गवरनर हेन्री वार्ड आपल्या कामावर रुजू झाल्यानंतर थोड्याच दिवसात पटकीचा वाखा होऊन मरण पावले.

१३१८ (१९ : १६, १५ आगस्त ६०, २५६)

मद्रासेत पटकीचा वाखा फार झपाट्याने चालू आहे. एका दिवशी १२८, दुसऱ्या दिवशी ६४, तर तिसऱ्या दिवशी २८ माणसे मेली.

१३१९ (१९ : १६, १५ आगस्त ६०, २५६)

वऱ्हाड प्रांतात फिरोजपूर गावच्या लोकांनी तारायंत्राचे खाचले पुरण्यात अडथळा आणला.

१३२० (१९ : १६, १५ आगस्त ६०, २५६)

दिल्लीच्या बहादूरशहाची बेगम अमिनिया इला दरमहा आठ रुपये, तर दोघी मुलींना प्रत्येकी तीन रुपये पेन्शन सांक्षण झाली. (ज्ञानप्रकाशावरून)

१३२१ (१९ : १६, १५ आगस्त ६०, २५६)

राजपुताना सरकारने फिरोजशहास पकडून देणारास हजाराचे इनाम जाहीर केले. (ज्ञानप्रकाशावरून)

१३२२ (१९ : १६, १५ आगस्त ६०, २५६)

जिल्हा अहमदनगरातील अंकोले तालुक्यातील चास गावचे दरोडेखोर भील पकडले गेले.

मुंबई एक्सचेंज प्रेस, फोर्ट

**१३२३** (१९ : १७, १ सप्टेंबर ६०, २५७–२५८)

लार्ड एल्फिन्स्टन विलायतेस गेल्यावर थोडक्याच दिवसांनी मृत्यु पावले. सर हेन्री वार्ड यांना तर महामारीचा वाखा झाला. बहुत वर्षे त्यांनी लंकेचा कारभार दक्षतेने व सुज्ञतेने चालवून लोकांना सुखी केले. त्यांच्या अकल्पित मृत्यूने मद्रासच्या लोकांचा फार आशाभंग झाला. गवर्णर जेनरालच्या कायदेमंडळाचे सभासद जेम्स विलसन हे अतिसाराने मृत्यु पावले. हे साहेब सरकारच्या वसुलाचा व खर्चाचा बंदोबस्त करण्याच्या कामात फार वाकबगार होते. इंग्रज सरकारला कर्जाचे मनस्वी ओझे झाले असून ते उतरविण्याच्या कामासाठी त्यांना आणले होते. हा बुद्धिमान व हुषार पुरुष फार झटून श्रम करणारा होता. काही कडक उपाय योजल्यामुळे त्यांची फार निंदा झाली. मनस्ताप व आजार यांतून ते अकालमृत्यूच्या दाढेत सापडले. त्यांचे कामच असे होते की, लोकांस काही उपकार वाटणार नाहीत. अशा नाजूक कामास लोक चांगले म्हणत नसतात. ईश्वर आपणांस कोणत्याही घटकेस बोलावील. याकरिता आपण आपल्या कारभाराचा हिशोब देण्यास तयार असावे. ईश्वराचे गौरव करण्याकरिता काम करावे.

**१३२३ अ** (इंग : २५७)

१३२४ (१९ : १७, १ सप्टेंबर ६०, २६०-२६३)

१८५७ च्या भयंकर बंडात सरकारी अंमल नाहीसा झाला होता. बंडाळी व झोटिंग पादशाही चालून पंतोजी व विद्यार्थी येरोपियनांचा छळ करीत होते. इंग्रज सरकारकडे विजयश्री आली. मग शाळा पुन्हा सुरू झाल्या. १८५८ त ५०६८ शाळा होत्या, तर ५९ मध्ये ८३९५ शाळा सुरू झाल्या. साडेतीन कोटी प्रजेपैकी १ लाख २२ हजार ३१६ विद्यार्थी आहेत. एकूण शाळांपैकी निम्म्या सरकारी व बाकीच्या मिशनरी व गावठी आहेत. सर्केटच्या शाळेत वाचन व जुजबी गणित शिकवतात. १० वर्षांपूर्वी सबंध इटावा जिल्ह्यात एकच मुलगा शिकत होता. हल्काशाई खेडवळ शाळेपेक्षा तहसिल शाळा चांगल्या असतात. तरीही कालेज डिव्हिजनमध्ये फारच थोडे विद्यार्थी शिकतात. सरकारी शाळांचा खर्च इतर शाळांच्या दुप्पट आहे. इंग्रजी शाळेमधील एका विद्यार्थ्याच्या खर्चात खेड्यातील १७० विद्यार्थ्यांचा खर्च भागू शकेल, असे व्यस्त प्रमाण वायव्य प्रांतात आहे. मिशनच्या शाळांत पवित्र शास्त्र शिकवितात, हे माहीत असूनही अनेक संभावित लोकांची मुले त्याच शाळांत येतात. मिशनेरी लोकांची विद्वत्ता, योग्यता, बुद्धी आणि उद्योग, यांबद्दल लोकांची खात्री पटली आहे. काशीच्या सरकारी पाठशाळेत गतवर्षी प्रत्येक विद्यार्थ्यामागे २०० रुपये खर्च झाले. यांतली काही रक्कम मिशनेरी शाळांना देण्यास हरकत नाही. कारण मिशनेरी शाळांमध्ये शेकडो विद्यार्थी शिकतात. मिशनऱ्यांपासून इंग्रजाच्या राज्यास भय आहे, अशी पोकळ बडबड करणारांनी याचा नीट विचार करावा.

१३२४अ (इंम : २५८-२६०)

१३२८ (१९ : १७, १ सप्टेंबर ६०, २६४–२६५)

सीरिया देशात ड्रूज लोकांनी ख्रिस्ती लोकांची मोठ्या प्रमाणावर हत्या केली. बैरतहून आलेल्या होडीत फक्त ३४ माणसे आली. त्यांची वस्त्रे रक्ताने भरलेली होती. तेथे ५०० प्रातेस्तंत व ग्रीक ख्रिस्ती होते. भजनालय बांधून ते प्रार्थना करीत असत. आता या गावात फक्त दोनच ख्रिस्ती राहिले आहेत. ड्रूज लोकांच्या फौजेने ख्रिश्चन वस्तीवर हत्यारे घेऊन हल्ला केला. तुर्की सरदाराजवळ फौज असूनही तो तमाशा पाहात बसला. ख्रिस्ती लोकांचा प्रथम जय झाला, तेव्हा त्याने एका गढीत शस्त्रे ठेवण्यास सांगितले. काही दिवसांनी ख्रिस्ती लोकांवर हल्ला करण्यास ड्रूज लोकांना चिथावले. एकही माणूस जिवंत राहू दिल्हा नाही. सैदोन या ठिकाणीही एक हजार ख्रिश्चनांची निर्दय कत्तल झाली. महमदी धर्माच्या स्थापनेपासून त्यांनी अशाच विश्वासघातकीपणाने क्रूर कत्तली केल्या आहेत. केवळ ईश्वराची कृपा म्हणूनच काही लोक वाचले. इंग्लिश सरकार काही स्वस्थ बसणार नाही. गुन्हेगारांना शिक्षा व्हावी, म्हणून आपले वजन वापरील.

१३२८ अ (इम : २६३–२६४)

१३२६ (१९ : १७, १ सप्टेंबर ६०, २६५–२७०)

धर्मसंबंधी संभाषण : मोश्याच्या चमत्काराविषयी अबदुल शाह याने चर्चा केली. मोशा नीतिमान व सद्भक्त असल्यामुळे त्याला चमत्कार करण्याची शक्ती मिळाली. पूर्वी ऐकण्यात व पाहण्यात न आलेल्या गोष्टीस आपण चमत्कार म्हणतो. ते अमानवी व निसर्गनियमांच्या पलिकडे असतात. मोशाने काठीचा साप केला, तो ईश्वरी चमत्कार होय. फारोच्या गारुड्यांनी मात्र गुंडाई, जादू व हातचलाखी, यांनी काठीचा साप केला. मोशाच्या सापाने त्यांना गिळून टाकले. मोशाने सर्व जलाशयांतल्या पाण्याचे रक्त केले. फारोच्या जोशांनी मात्र मिसर नदीमधील पाण्याचे रक्त केले. मग ईश्वराने त्याचे पुन्हा पाणी केले. काही काळ नील नदीच्या काठी झिरे खणून पाणी काढावे लागले. मोशाची कृती ईश्वराच्या सामर्थ्याची होती, तर जोशी व फारो यांची कृती केवळ मानवी चातुर्याची होती, असे 'सभेस जाणारा एक श्रोता' लिहितो.

१३२७ (१९ : १७, १ सप्टेंबर ६०, २७०–२७२)

एका वैद्याने असे नमूद केले आहे की, मसाल्याच्या पदार्थांनी पचनास अडथळे येतात. (ज्ञानप्रसारकावरून).

१३२८ (१९ : १७, १ सप्टेंबर ६०, २७०–२७२)

मधमाशांची पोळी हुडकण्यासाठी लोक स्वतःबरोबर मधाचा करंडा नेतात. मधमाशी त्यातील मध खाण्यासाठी येते. त्यावरून तिचा माग काढून पोळ्याची जागा पाहातात. नंतर वोंगडी गुंडाळून पोळ्यातील मध काढून घेतात. मध औषधीदेखील असतो. पवित्र शास्त्रात ज्ञानाला 'मधापेक्षा गोड' म्हटले आहे.

१३२९ (१९ : १७, १ सप्टेंबर ६०, २७०–२७२)

कोटा येथे बर्टनसाहेबास मारणाऱ्या आवाजखान व मेहेरखान यांना फाशी देण्यात आले.

१३३० (१९ : १७, १ सप्टेंबर ६०, २७०–२७२)

बोर्नियो बेटातील बंड १४ महिन्यानंतर डच सरकारने अगदी मोडून काढले आहे. १५ लक्ष प्रजेत स्वस्थता असून ख्रिस्ती लोक आनंदात आहेत.

१३३१ (१९ : १७, १ सप्टेंबर ६०, २७०–२७२)

खैराबाद येथे सात जणांचा बाप्तिस्मा झाला.

१३३२ (१९ : १७, १ सप्टेंबर ६०, २७०–२७२)

त्रावणकोरच्या राजाचा मृत्यू झाला.

१३३३ (१९ : १७, १ सप्टेंबर ६०, २७०–२७२)

एक युरोपियन जज सेवानिवृत्तीनंतर विलायतेस न जाता ख्रिस्ती धर्माचे काम करण्यासाठी येथेच राहणार आहेत. मेजर रिंद यांनाही बेरा येथे जागा मिळाली. पंतप्रधान चार्ल्स वुड यांना ही योजना पसंत असून राणीने त्याबद्दल संतोष दर्शविला. या देशाच्या कल्याणासाठी युरोपियन लोक झटत आहेत.

१३३४ (१९ : १७, १ सप्टेंबर ६०, २७२)

चर्च मिशनाच्या कामासाठी ९ मिशनरी साहेब हिंदुस्थानात येणार.

१३३५ (१९ : १७, १ सप्टेंबर ६०, २७२)

विक्टोऱ्या राणीसाहेबांची कन्या व प्रशियाच्या राजाची सून इला कन्या रत्नाचा लाभ झाला.

१३३६ (१९ : १७, १ सप्तेंबर ६०, २७२)

कलकत्यातील कायदे मंडळाचे सभासद जेम्स विल्सन यांच्या मृत्यूमुळे त्यांच्या जागेवर हिंदुस्थान सरकारचे सेक्रेतारी सेसिल बीदन यांची नेमणूक झाली.

१३३७ (१९ : १७, १ सप्तेंबर ६०, २७२)

सन १८५९–६० या वर्षात मुंबई टापूत १४,२०९ माणसे मरण पावली. गेल्या दहा वर्षांची मृत्यूची सरासरी १४७३० आहे. यंदा सवापाचशे मृत्यू कमी झाले. एकूण आकड्याच्या एक सप्तमांश, म्हणजे १९५५ लोक पटकीने मेले, तर देवीने फक्त ३७८ मेले. देवी काढण्याच्या सोयीमुळे अपमृत्यूचे प्रमाण अगदी कमी झाले. सुधारलेल्या लोकांच्या समागमाने किती अमोल्य लाभ होतात पाहा.

मुंबई एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

**१३३८** (१९ : १८, १५ सप्तेंबर ६०, २७५–२७९)

अमेरिकन बोर्ड १८१० मध्ये स्थापन झाले. यंदा ५० वे वर्ष असल्यामुळे मंडळीस फार उत्साह वाटतो. पहिल्या वर्षी २ हजार खर्च झाले, तर आता दरसाल ७ लाख खर्च होतात. चारशे साहेब व मडमा देवाचे काम करीत आहेत. १५० ख्रिस्ती मंडळ्या व २९ हजार ख्रिस्ती लोक आहेत. शाळा, पाठशाळा, छापखाने, यांच्या वतीने बेसुमार काम चालते. सूर्य दररोज पृथ्वीस फेऱ्या घालतो, तेव्हा दर सेकंदास त्या मिशनाचे कार्य दिसते. हजारो पापी अंधारातून उजेडाकडे आले. हिंदुस्थान, आफ्रिका, भारत, अमेरिका, या सर्व राष्ट्रांत तारणाचे काम चालते. मंडळी म्हणजे एकेक किरण आहे, ती शक्य तेवढा अंधार दूर करते. हे खरे नाणे अखेरीस सर्वत्र विजयी होणारच आहे. जुन्या खटाऱ्या व जर्जर धर्मावरचा लोकांचा विश्वास उडत आहे. आणखी ५० वर्षांत सर्व जगात वेगाने ख्रिस्ती धर्म वाढेल, खोटे व दुष्टधर्म बुडतील, मोठाल्या राज्यक्रांत्या होतील. सन १८११ ते १५ मध्ये मिशनास ९५,४६३ रुपये मिळाले, तर ५६ ते ६० मध्ये ३४ लाख २२ हजार ३७८ रुपये मिळाले. तरी एक लाख तीस हजारांचे कर्ज आहे. ते देणग्यांतून फेडण्याचा विचार आहे. दरवर्षी आक्टोबर महिन्यात ४ दिवस सभा चालते. प्रार्थना व प्रभुभोजन होतात.

**१३३८अ** (इंग : २७३–२७५)

**१३३९** (१९ : १८, १५ सप्टेंबर ६०, २७९–२८२)

'लोकांची दुर्दशा पाहून कीव करणारा' लिहितो की : मोगलाईचा काही भाग पुन्हा निजामाकडे जाणार, अशा अफवा उठल्यामुळे लोक देवास नवस करीत आहेत की, या द्वाड अशा मोगलाईचे राज्य आम्हांवर येऊ देऊ नकोस. मोगलाईत वारंवार डोके पडून स्त्रियांच्या नाकास, कानास विद्रूपता आली. सरी काढण्यासाठी गळे कापले गेले. इंग्रजी राज्यात निवांत झोप व सुखाची भाजीभाकर तरी मिळते. आता पुन्हा मोगलाई होणार म्हटल्यावर कित्येक लोक गाव सोडून गेले. तांब्याच्या थाळीऐवजी खापरी परळ वापरू लागले. शेतकऱ्यांच्या घरादाराचा उन्हाळा करून मोगल अधिकारी वसुली करतात. इंग्रेजी अंमलात लोक दागिने वापरू शकत होते. आता ते दहशतीनेच घाबरले आहेत. निजामाच्या जुलमाच्या वाख्यावर कसलेच औषध चालत नाही. एकाच्या फायद्यासाठी लाखो लोकांना अग्नीत लोटावे, हे दयेच्या अगदी विरुद्ध आहे. अरब रोहिले, बंड करून वाटमारेपणा करीत असतात, असे हे मोगलाई राज्य आहे. दरोडेखोरांना पोट भरता यावे, म्हणून हा अन्याय चालू दिला जातो, असे त्यांचे अधिकारी अगदी उघडपणाने सांगतात. तर ही वास्तविक दुःरावस्था लक्षात घेऊन इंग्रज सरकारने निजामाकडे मुलूख देऊ नये.

**१३३९ अ** (इम : २८२–२८३)

१३४० (१९ : १८, १५ सप्टेंबर ६०, २७९–२८२)

'उत्साह पाहणारा' पत्रात म्हणतो की : नेटिव लोक मंत्राने पवित्र झालेला राखीचा दोरा मणगटावर बांधतात. भूतपिशाच्चापासूनही त्याने रक्षण होते, म्हणून राख्यांना खोटे मोतीही जोडलेले असतात. घृतकुल्या मधुकल्याचे जेवणही जेवतात. नारळी पौर्णिमा म्हणून समुद्रास नारळे अर्पण करतात. सागरतीरावर अफाट गर्दी होते. अनेक दुकानदार पाले ठोकून बसतात. सडका नारळ स्वस्तात मिळतो, म्हणून बरेच लोक त्याचे अर्पण करतात. या नासक्या नारळांच्या घाणीने डोके फिरून जाते. अप्रतिष्ठित भिकारी भीक मागत असतात, तर ब्राह्मण वगैरे मंत्र सांगून नारळाची पूजा करवितात. काही दुकानदार तर समुद्रात फेकलेले नारळ परत आणून स्वस्त विकतात. काही बुभुक्षित लुटारू अर्पणाचे नारळ दुकानदारांना देतात, आणि थोडेफार पैसे मिळवितात. या मेळ्यात इतर वस्तूंचे दुकानदार येतात व नफा कमावतात. एकंदरीत धर्मातही ठकबाजी, लबाडी व फसवणूक चालते. नासका नारळ देऊन समुद्राची थट्टामस्करी केल्यावर तो कसला आशीर्वाद देणार आहे? या लोकांच्या अज्ञानमय अंतःकरणात सद्धर्माचा आश्चर्यवान प्रकाश पडावयास हवा.

१३४१ (१९ : १८, १५ सप्टेंबर ६०, २८७–२८८)

नासके व खारे पाणी प्याल्यामुळे अतिसाराची व्यथा होते. म्हणून ५–६ मडकी वाळूने भरून त्यांस तळाशी भोके पाडून पाणी गाळून प्यावे. उतरंड केल्यास पाणी अगदी स्वच्छ होईल किंवा पाणी तापवून गार करावे व नंतर प्यावे.

१३४२ (१९ : १८, १५ सप्टेंबर ६०, २८७–२८८)

जाळण्यास लाकडे नसली, तर प्राण्यांची हाडे सर्पण म्हणून वापरतात. हाडांना चरबी असेल, तर त्यानुसार जाळ कमीजास्ती होतो. १८२९ मध्ये रशियन फौजेने असा प्रयोग केला होता.

**१३४३** (१९ : १८, १५ सप्टेंबर ६०, २८७–२८८)

कप्तान आर यांनी अयोध्येच्या दरबारात चांगली चाकरी केली. आता त्यास त्या सरकारने चौदा हजारांची जहागिरी देऊन आपणाकडे कायम ठेवून घेतले.

**१३४४** (१९ : १८, १५ सप्टेंबर ६०, २८७–२८८)

एक आरमिनी उपदेशक २६ इराणी मुसलमानांना मुंबईमध्ये बाप्तिस्मा देणार आहे, कारण इराणात धर्मांतरास बंदी आहे.

**१३४५** (१९ : १८, १५ सप्टेंबर ६०, २८७–२८८)

इंदूरचा होळकर नामदार वैसरायसाहेबांच्या भेटीस जाणार आहे. येताना तो कालीघाटची व जगन्नाथाची यात्रा करून परत येईल.

**१३४६** (१९ : १८, १५ सप्टेंबर ६०, २८७–२८८)

सीरियात ख्रिश्चन लोकांचा मुसलमानांनी घात केला, म्हणून त्यांना शिक्षा देण्यासाठी इंग्लंड, फ्रान्स व रशिया यांचे सैन्य जाणार आहे. फ्रान्सचे सैन्य पूर्वीच रवाना झाले. पण कृती करण्यापूर्वी तुर्की सरकारची संमती घेतली जाईल.

**१३४७** (१९ : १८, १५ सप्टेंबर ६०, २८८)

नानासाहेब पेशवा नेपाळातुन तिबेटात गेला, अशी वंदता आहे. हिंदू लोक भरतखंडाची मर्यादा ओलांडीत नाहीत. मग हा अट्टल ब्राह्मण म्लेंच्छ भूमीत कसा गेला ? शास्त्र पाळण्यासाठी त्याने व बरोबरच्या लोकांनी करंगुळ्या कापून त्यांची प्रेतदहनाप्रमाणे उत्तरक्रिया केली, असे सांगतात. हा आत्मघटस्फोट झाल्यावर विदेही होऊन ते सर्व तिबेटात गेले. त्यांच्यासह १० हजार लष्कर व १३ तोफा आहेत.

१३४८ (१९ : १८, १५ सप्टेंबर ६०, २८८)

प्राप्तीवरील कराशिवाय सरकारने स्टँपचा कायदा लागू केला आहे. त्यानुसार रोखे, पावत्या, कोणत्याही व्यवहाराचे दस्तऐवज, यांना सरकारचे टिकिट लावले, तर तो व्यवहार कायदेशीर ठरेल. त्यावर सह्याही कराव्या लागतील. टपालाची सहीची तिकिटे मात्र चालणार नाहीत.

मुंबई एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

**१३४९** (१९ : १९, १ आक्टोबर ६०, २९१-२९५)

सन १८२० मध्ये सांदविच बेटात मिशनची स्थापना झाली. एपिस्कोपल बोर्डाच्या एका देने नावाच्या साहेबाने त्याविषयी निःपक्षपाती साक्ष दिल्ही. तो म्हणतो की : मिशनऱ्यांनी ४० वर्षांत सांदविच लोकांना सुशिक्षा दिल्ही. त्यांच्या हवाईयन भाषेस मुळाक्षरेही करून दिल्ही. व्याकरण आणि कोष रचून पवित्र शास्त्राचे भाषांतर केले. शाळा घातल्या. शिक्षकही तयार केले. उघडे वाघडे फिरून हिरवे मांस खाणारे हे लोक आता शिकतात. प्रतिष्ठित पोषक करतात. न्यायाधीश किंवा राजसभेचे सभासद बनतात. मिशनरी लोकांनी त्यांची सुधारणूक घडविली. औषधे नेऊन रोगराई कमी केली. मडमांनीही नेटिवांस लिहिणे-वाचणे-विणणे वगैरे शिकविले. दया, विद्वत्ता, बहुश्रुतपणा, इत्यादी गुण शिकविले. हवाई भाषेत दंतकथा, इतिहास ग्रंथित केली. नेटिव शिक्षक तयार केले. गोऱ्या आणि काळ्या शिपायांना शिक्षण देणे, हे त्यांचे काम आहे. पूर्वी सांदविच बेटाच्या काठाबरच्या लोकांना अंतर्भागाची माहिती नव्हती. म्हणून उदमी, व्यापारी लोकांनी बाहेर गैरसमज पसरविले. मिशनऱ्यांची वर्तणूक आणि श्रम यांबद्दल सांदिविचचे रहिवासी अत्यंत संतुष्ट आहेत. सांदविचमधील कायदे सुज्ञपणाचे आणि यथान्याय आहेत. प्रत्येक घरात व झोपडीत पवित्र शास्त्राचा तर्जुमा आढळतो. ईश्वराचा आशीर्वाद मागितल्याशिवाय ते घासही घेत नाहीत.

**१३४९ अ** (इंम : २८९-२९०)

१३५० (१९ : १९, १ आक्टोबर ६०, २९७–३००)

मिस्तर बाबा पदमनजी यांची ओळख ज्ञानोदयाच्या वाचकांना पूर्वीच झालेली आहे. त्यांची ग्रंथ करण्याची शक्ती, विषयप्रतिपादनाची हातोटी, आणि रसिक शैली सर्वांनाच ठाऊक आहेत. 'निबंधमाला' हे पुस्तक ८ वर्षांपूर्वी त्यांनी दक्षिणा प्रैज कमिटीस नजर केले. त्याबद्दल त्यांना १२० रुपये इनाम दिल्हे. आता हे पुस्तक छापले आहे. पण टाईप सुंदर नाही. काही ठिकाणी तर तो इतका पुसट आहे की, वाचताही येत नाही. टसे चांगले असते, तर हे पुस्तक आहे यापेक्षा बहुगुणित सुंदर दिसले असते. यातील विषय फार उपयोगी, ज्ञानदायक व मनोरंजक आहेत. व्यावहारिक विषय, इतिहास, खिस्ती धर्म आणि नीती, असे अनेक निबंध या संग्रहात आहेत. बाबांनी या ग्रंथाचे नाव 'सर्वसंग्रही' असे दिले होते. नानाशास्त्री आपट्यांनी ते बदलून निबंधमाला असे केले. याचे कारणही कळत नाही. ग्रंथकर्त्याच्या संमतीवाचून नाव बदलणे ही अयोग्य गोष्ट आहे. शिवाय मूळ ग्रंथातला एक तृतीयांश भाग गाळून टाकला. कारण उघडच आहे व ते म्हणजे त्यात खिस्ती धर्माची स्तुती होती. रिपोर्टर आपटे यांनी बाबांच्या कुटुंबसुधारणा नाटकाचाही बराच भाग गाळला होता. निबंधमालेचे तर ६० ठळक, ढाळदार आणि मोलवान मोती गाळले. दक्षिणा कमिटी गणपतीची व रामकृष्णाची चित्रे असली, तरच पुस्तके छापते, असा अनुभव आहे. कीर्तनकारांच्या भाकड कथांना उपयोगी पडेल, असाच मजकूर ते लवकर स्वीकारतात. ८ वर्षे हा ग्रंथ सांदीत लोळत पडला. शिक्षणखात्याच्या डैरेक्टराने हस्तक्षेप केल्यावर तो छापला. ग्रंथकर्त्यास काहीही फेरफार व शुद्धताही करू दिल्ही नाही. खिस्ती लोकांना या योजनेतून उत्तेजन मिळत नाही. उलट हरदास, पुराणिक, यांना उत्तेजन दिले जाते. हा पक्षपात व अन्याय आहे.

१३५० अ (इंम : २९५–२९७)

**१३५१** (१९ : १९, १ आक्टोबर ६०, ३००–३०२)

मि. बाबा पद्मनजी यांच्या शब्दरत्नावली या पुस्तकाची १०० पृष्ठे असून किंमत १२ आणेच आहे. मि. टामस ग्राहाम यांनी ते निर्मळ व सुंदर रीतीने छापले. बांधणीही फार चांगली आहे. क्यांडी आणि मोलस्वर्थ यांनी महाराष्ट्रात फिरून अमोल्य शब्दसंपत्ती गोळा केली होती. विदेशी लोकही भाषेचा शोध घेतात व इंग्रजी शिकणारांनाच तिचा लाभ होतो, हे विलक्षण आहे. विद्वान लोक मराठीचा कंटाळा करितात. खऱ्या देशाभिमानी लोकांना वाटते की, हे सर्व ज्ञान मराठीत यावे. भाषांतर करण्याचे कामसुद्धा एत्तद्देशीय लोकांनाच करावे लागणार आहे. इंग्रेजीत कितीही पंडित झाले व ते प्रतिष्ठेस चढले, तरी ते आपल्या देशाचे मित्र नव्हत. सहस्त्रावधी शब्दांमधून बाबांनी निवडक शब्द काढून ही शब्दरत्नावली तयार केली. इजमध्ये सुमारे १३ हजार शब्द आहेत. पुढेमागे इंग्रजीतील रोजेस थिसारसप्रमाणे एखादा ग्रंथ मराठीत करण्याचा त्यांचा विचार आहे. त्यामध्ये इंग्रजी शब्द व त्याचा मराठी भाषणपर्याय असेल. तरी सर्व सुशिक्षित लोक व विद्यार्थी यांनी निदान एकेक प्रत विकत घ्यावी. ज्यांना स्वभाषा चांगली अवगत नसते, त्यांना परभाषाही चांगली येणार नाही.

**१३५१ अ** (इंम : २९५–२९७)

**१३५२** (१९ : १९, १ आक्टोबर ६०, ३००–३०३)

लखोट्याच्या तिकिटावर काही लिहू नये, हा हुकूम सरकारने मागे घेतला.

**१३५३** (१९ : १९, १ आक्टोबर ६०, ३०२–३०३)

द्वारकेतील वाघरांचे बंड मोडण्याकरिता जेव्हा गोरे सोजीर गेले, तेव्हा त्यांनी फार उन्मत्तपणा केला, अशी बातमी आहे. आता पुन्हा वाघरांचे बंड सुरू झाले आहे. पूर्वीच्या पराभवाची जाणीव ठेवून तरी या कृष्णभक्तांनी उगे राहावे.

१३५४ (१९ : १९, १ आक्टोबर ६०, ३०२–३०३)

उदेपूरचा राणा सुरूपसिंघजी फार उदार आहे, अशी सर्वजण तारीफ करतात. कारण त्याने आपल्या १ कोटी ३० लक्षांच्या उत्पन्नापैकी तीस लक्ष देवस्थानास, तर तीस लक्ष जहागीरदारांना आणि चाळीस लाख जनानखान्यातील राण्यांना दिले आहेत. उरलेली रक्कम तो भटभिक्षुकांस वाटतो. ही मूर्ख दिवाळखोरी आहे. भट लोक त्यास 'कर्णाचा अवतार' म्हणतात. विद्या, शाळा, रस्ते, पूल, यांसाठी एक कवडीही खर्च करणार नाही, असले मूर्ख राजे प्रजेचे काय कल्याण करणार ?

१३५५ (१९ : १९, १ आक्टोबर ६०, ३०२–३०३)

विलायतेत मिस्स फेथफुल नावाच्या स्त्रीने 'विक्टोरिया छापखाना' सुरू केला. तेथील सर्व कामे मडमाच करतात. राणीने विशेष संदेश पाठवून या उपक्रमाची स्तुती केलेली आहे.

१३५६ (१९ : १९, १ आक्टोबर ६०, ३०३–३०४)

महिपतराम रूपराम याचे ब्राह्मण्य विलायतेस गेल्यामुळे नष्ट होईल, असे नेटिवांना वाटत होते, पण आगबोटीवर तो स्वतंत्र खोलीत राहात होता. लंडनमध्ये दूध व भाज्या मिळण्यास त्याला काहीही अडचण पडत नाही. नळाने पाणी येत असल्यामुळे सोवळे टिकून राहाते. म्हणून ज्यांची ऐपत आहे, त्यांनी इंग्लंडमध्ये जाऊन तेथील कला, कौशल्य, कारखाने व अचाट उद्योग पाहावेत.

१३५७ (१९ : १९, १ आक्टोबर ६०, ३०३–३०४)

रशियाची प्रजा ६ कोटी ५२ लाख आहे. १८५८ मध्ये ६८८३ शाळांत २,२३,१९७ विद्यार्थी होते. तीनशे बालकांतून एखादा मुलगा शिकतो. फारच थोड्यांना विद्या प्राप्त होते.

१३५८ (१९ : १९, १ आक्टोबर ६०, ३०३–३०४)

रंगूणच्या तुरुंगातून २० कैद्यांनी पळून जाण्याचा प्रयत्न केला. पहारेकऱ्यास जिवानिशी मारण्याचा त्यांचा बेत होता. पण एका पोलिसशिपायाने हल्ला करून चार कैदी ठार मारले. अनेकांना घायाळ केले.

१३५९ (१९ : १९, १ आक्टोबर ६०, ३०३–३०४)

अमेरिकेच्या प्रवासासाठी गेलेल्या विक्टोऱ्या राणीच्या दोघा पुत्रांना तेथे फार सन्मानाची वागणूक मिळत आहे.

१३६० (१९ : १९, १ आक्टोबर ६०, ३०३–३०४)

मुंबईतील एत्तद्देशीय लोक एक पेढी स्थापन करणार असून त्यांनी ५० लाखांचे भांडवल जमा केले आहे, असी बोलवा आहे.

मुंबई एक्सचेंज प्रेस, फोर्ट

## ज्ञानोदय, पुस्तक १९, अंक २०, मुंबई, १५ आक्तोबर १८६०

**१३६१** (१९ : २०, १५ आक्तोबर ६०, ३०६–३०९)

सन १८५२ पासून चीन देशात बंड चालू आहे. तार्टाराच्या अंमलातून अनेक प्रांत बंडखोर चिन्यांच्या हाती आले. मिशनरी लोक सूचौ गावात गेले, तेव्हा नागरिकांनी त्यांचा फार सत्कार केला. येशू ख्रिस्तासच ते तारक मानतात. रोमन कॅथालिकांच्या मूर्तीदेखील त्यांनी जुन्या मूर्तीप्रमाणे फोडून टाकल्या. त्यांचा पहिला राजा हंग सेएन त्सेन हा अद्याप जिवंत व खुशाल आहे. ते आदित्यवारीच शाबाथ पाळतात. प्रौढ पुरुष, स्त्रिया व बालक यांनाही बाप्तिस्मा देतात, शांगती हा आकाशातला बाप व येशू त्याचा पुत्र आहे, असे त्यांचे ठाम मत आहे. अंतःकरणाची परीक्षा करून आपले पापिष्ठपण ओळखणे, यातूनच आकाशाचा मार्ग खुला होणार आहे. जो पश्चात्ताप करतो व पापापासून दूर राहातो, त्याचाच आत्मा आकाशात जातो. दररोज संध्याकाळी ते प्रार्थना करतात की, आम्हांला सैतानापासून दूर ठेवावे. जेवणाच्या आधीही ते ईश्वराचा आशीर्वाद मागतात. मिशनऱ्यांनी युरोपातून हत्यारे खरेदी करून आणावी, म्हणून ते पैका देण्यास तयार होते. पण मिशनऱ्यांनी यास नकार दिल्हा. शाब्बाथाच्या उपदेशास ते नियमित हजर राहातात. मूर्तीचे देऊळ नष्ट करताना प्रातेस्तंतांच्या प्रार्थना म्हणत असतात. संपूर्ण पृथ्वीच्या मानवसंख्येपैकी एक तृतीयांश एवढी मानवसंख्या चिनी लोकांची आहे. त्यांच्यात योग्य मार्गाने शुभवर्तमानाचा प्रसार होत आहे.

**१३६१ अ** (इंम : ३०५-३०६)

१३६२ (१९ : २०, १५ आक्तोबर ६०, ३०९–३१०)

'हिंदुस्थानचा पाहरेकरी' या पत्रावरून समजते की : ख्रिस्ती पेठ गावामध्ये जे. सी. अरलेपन नावाचा ख्रिस्ती उपदेशक तिनिबली प्रांतात राहातो. त्याला कोणताही पगार मिळत नसतो. देवाच्या आश्रयावर टेकून तो हे काम करतो. काही दिवसांपूर्वी त्याच्याकडे दोन बाया आल्या. त्यांची आपल्या पापाविषयी खात्री झाली. तीन दिवस त्यांच्या मनाची तळमळ होत होती. शास्त्रवाचनात आणि प्रार्थनेत त्या मग्न राहिल्या. नंतर त्यांची खातरी झाली की, आपल्या पापाची क्षमा झाली. म्हणून त्यांना हर्ष झाला. पाहणारांना वाटले असते की, त्यांना पिशाच्चाची बाधा झाली. पण नंतर हे धर्मसंजीवन आहे, अशी त्यांच्या नवऱ्यांचीही खातरी झाली. आपल्या पापरूप निद्रेतून जागृत होऊन त्या सर्वांनी बाप्तिस्मा घेतला. नंतर २०० लोक ख्रिस्ती धर्मात आले.

१३६३ (१९ : २०, १५ आक्तोबर ६०, ३१०–३१२)

एका लहान गावात नानसी नावाची एक स्त्री राहात होती. ती एका डोळ्याने आंधळी व पांगळी होती. ती अलग्नी होती व तिला कोणी नातलगे नव्हती. तरी ती फार सुखी होती. शारीरिक सौंदर्यापेक्षा मनाचे सामर्थ्य, हे तिचे सौंदर्य होते. कोणी एक फिरस्ता तिला विचारू लागला की, 'तू एवढी आनंदी कशी?' तेव्हा ती म्हणाली की, 'दिवसा सूर्यास फिरवणाऱ्या व रात्री आकाशात ताऱ्यांना फिरविणाऱ्या देवावर मी विश्वास ठेवते. बर्फाने फुले, झाडे करपून जातील, असल्या कल्पना करून मी असुखी होत नसते. का की, ईश्वर योग्य तेच करील. वाइटाच्या कल्पनांना मी नेहमी दोन हातावर दूर ठेवीत असते. अभरवसा, कृतघ्नता, वाटेल एवढी उदासीनता नसावी. देवाच्या आशीर्वादाला आम्ही भीतिरूप पासोडीत गुंडाळतो व अनिष्ट अपेक्षेने गुदमरून टाकतो. म्हणून आम्ही दुःखी होतो. आपल्याकडून जेवढे चांगले करवेल, तेवढे केल्यावर स्वस्थ राहावे. ईश्वराच्या सुज्ञतेवर भरवसा ठेवण्यास शिकावे.' जे नानसीच्या नेमाप्रमाणे चालतात, त्यांना पृथ्वी हेच सौख्यस्थान वाटते. सैतानाला ते थारा देत नाहीत.–ख्रिश्चन ट्रेझरी.

१३६४ (१३ : २०, १५ आक्तोबर ६०, ३१२-३१३)

येशूने बहुदा देशात हिंडत असताना रोगाची व भूतांची पीडा झालेल्यांना बरे केले. विश्वास धराल, तर सर्व होईल, असे तो म्हणे. विश्वास ठेवणारांसाठी देव सर्व शक्ती पणाला लावतो. नाझरेथचे लोक विश्वासात कमी पडले, म्हणून येशूने तेथे चमत्कार केले नाहीत. प्रेषितांनी अनेक चमत्कार केले. अनान्या व साफैरा यांनी लबाडी केली, म्हणून त्यांचा नाश झाला. पौलाचा चमत्कारिक रीतीने पालट झाला. पेत्रसाने शारोन गावातील लोकांना प्रभूकडे फिरविले. फिलिप्स गावचे सगळे रहिवाशी एकदम विश्वासी बनले. पण हल्ली असे चमत्कार घडत नाहीत. म्हणून लोक विचारतात की, इतर धर्मांपेक्षा ख्रिस्ती धर्मात विशेष काय आहे ? छापखान्याच्या सोयीमुळे धर्ममतांचा फैलाव होतो. मग आताशा प्रभूचा हात तोकडा पडला की काय ? येशू तर काल, आज आणि सर्वकाळ आहेच. याचा अर्थ एवढाच की, आम्ही विश्वासात कमी पडतो. मनापासून प्रार्थना करा, म्हणजे तुम्ही मागाल ते मिळते. विश्वास ठेवा.

१३६५ (१९ : २०, १५ आक्टोबर ६०, ३१३–३१८)

धर्मसंबंधी संभाषणाबाबत 'सभेस जाणारा' लिहितो की : अबदुल शहांनी असा आक्षेप घेतला की, मोशाकृत ग्रंथ ईश्वरी प्रेरणेचे नाहीत. कितीएक शतकांपर्यंत त्यांची कोणाला माहितीदेखील नव्हती, एका ठक उपाध्याने ते 'मोशाचे ग्रंथ' म्हणून राजास दिल्हे. यावर खिस्ती उपदेशक म्हणाले की, मोशाच्या ग्रंथात काही मजकूर दुसऱ्याचा आहे. होमरच्या काव्यातही दुसऱ्यांनी केलेल्या ओळी आहेत. मोशाची साक्ष वंशपरंपरा चालत आली. त्याला ईश्वराकडून प्रेरणा मिळत असे. इस्रायलींना त्याने दास्यत्वातून मुक्त केले. देवाने अधिकार दिलेला असा तो भविष्यवादी होता. मोशाचे चमत्कार देवाच्या शक्तीने झाले, तर फारोचे जोशी गुंडाईने चमत्कार करीत. हे काही ठकपणाचे लेखन नाही. मोशाने निर्मिलेला सापसुद्धा ईश्वरी सामर्थ्याचे प्रतीक होता. सगळा मिसर देश व्यापला जाईल, एवढे बेडूक त्याने निर्मिले. जोशांनी मात्र त्यातलेच दोन बेडूक उचलून त्यांस फिरविण्याचा प्रयत्न केला. नंतर मोशाने नील नदी रक्तमय केली. देशभर उवा पसरल्या. यावर शहाने वितंडवाद करून म्हटले, की या सर्व गप्पगोष्टी व ठकविद्या आहेत. मोशाच्या चमत्कारास प्रमाण काय आहे, ते सांगितले पाहिजे.

१३६६ (१९ : २०, १५ आक्टोबर ६०, ३१८–३१९)

सांदविच बेटात गेल्या दहा वर्षांत जन्माच्या दुप्पट मृत्यूचे प्रमाण झाले आहे. प्रजा कमी होत आहे. अशाने या बेटाच्या रहिवाशांचे अगदी बीमोड होऊन जाईल.

१३६७ (१९ : २०, १५ आक्टोबर ६०, ३१८–३१९)

उत्तर अमेरिकेत दीड लक्ष यहुदी राहतात. त्यांचा पोषाख, उद्योग, विद्वत्ता, सर्व साहेबाप्रमाणे आहे. पण ते आपल्या पूर्वजांचा धर्म चालवतात. इतर देशांतले यहुदी खिस्ती धर्म मानतात.

१३६८ (१९ : २०, १५ आक्टोबर ६०, ३१८–३१९)

इतालीचा सेनापती गारिबाल्दी याने राजाविरुद्ध युद्ध पुकारून त्यास पळवून लावले आहे. सिसिली व नेपल्स त्याच्या ताब्यात आले. आता पोपाचाही अधिकार बुडेल. गरीबांचे राज्य येईल.

१३६९ (१९ : २०, १५ आक्टोबर ६०, ३१८–३१९)

मुंबईचा एक खोजा व्यापारी १३ हजार तांब्याच्या थाळ्या करून त्यांत खडीसाखर भरून ती आपल्या लोकांना वाटणार आहे. या व्यर्थ कांक्षेखोर कृत्यास २५ ते ३० हजार रुपये लागतील.

१३७० (१९ : २०, १५ आक्टोबर ६०, ३१८–३१९)

आक्टोबरपासून टपालाचे नवे दर अमलात येतील. दस्तऐवज १० रु. वर असेल, तर आणि ५० रु. पेक्षा कमी असेल, तर अर्ध्या आण्याचे तिकिट लावावे. ५० रुपयांपेक्षा जास्त व्यवहार असेल, तर एक आण्याचे तिकिट लावावे.

१३७१ (१९ : २०, १५ आक्टोबर ६०, ३१८–३१९)

कलकत्ता शहरी डाक्तर ब्युस्ट यांचा मृत्यू झाला. बहुत वर्षेपर्यंत ते कलकत्त्यास टैम्स वर्तमानपत्र चालवीत होते.

१३७२ (१९ : २०, १५ आक्टोबर ६०, ३१९–३२०)

चीनमध्ये इंग्रज-फ्रेंचांच्या संयुक्त सेनेने चिनी फौजेचा पराभव केला. चीन सरकारने सल्ल्याचे बोलणे सुरू केले. लढाया न होता सर्व कलह मिटतील, तर किती बरे होईल!

१३७३ (१९ : २०, १५ आक्टोबर ६०, ३१९–३२०)

हिंदुस्थानात शाळांत, व पाठशाळांत पवित्र शास्त्र शिकवावे की नाही, यावरून पार्लमेंटात वाद झाला. (प्रभोदयावरून)

१३७४ (१९ : २०, १५ आक्टोबर ६०, ३१९–३२०)

१२ जुलै १८६० रोजी रात्री खानदेशात नक्षत्रपतन झाले. नक्षत्र प्रतिसूर्याप्रमाणे तेजस्वी वाटले. चंद्रज्योतीप्रमाणे ५० हातांपर्यंत प्रकाश दिसला. तारा पडल्यावर तोफेसारखा आवाज झाला. भोळे लोक म्हणतात की : 'हे अद्‌भुत दुश्चिन्हाचे कारण होय. महापराक्रमी राजाचा मृत्यू किंवा जन्म याचे हे सूचक आहे. (ज्ञानप्रकाशावरून)

१३७५ (१९ : २०, १५ आक्टोबर ६०, ३१९–३२०)

सर जमशेदजींची विलायतेत १ लाख ७० हजारांची मालमत्ता आहे. (प्रभोदयावरून)

१३७६ (१९ : २०, १५ आक्टोबर ६०, ३१९–३२०)

लंडन युनिवर्सिटीत वार्षिक परीक्षेमध्ये मि. नौरोजी कावसजी आणि फ्रामजी बमनजी या दोघा पारशी तरुणांनी बक्षिसे मिळविली. ते सिद्धपदार्थविज्ञान आणि लातिन भाषा या विषयांत निपुण ठरले. (प्रभोदयवरून)

१३७७ (१९ : २०, १५ आक्टोबर ६०, ३१९–३२०)

इताली देशाची सर्व प्रजा २ कोटी ३५ लाख ८६ हजार इतकी आहे.

१३७८ (१९ : २०, १५ आक्टोबर ६०, ३१९–३२०)

सिंदव्याचा खाज्या नाईक भील यास त्याच्याच माणसाने ठार मारले व त्याचे डोके सिरपूर येथे अधिकाऱ्यासमोर हजर केले. त्याच्या मुलालाही पायांत बेड्या घालून आणले.

१३७९ (१९ : २०, १५ आक्टोबर ६०, ३२०)

कलकत्ता शहरात ८ लाख, मुंबईत ७ लाख ८० हजार, मद्रासेत ५ लाख ५१ हजार प्रजा राहाते. गतवर्षी कलकत्यात १४ लाख ९ हजार, मुंबईत १४,५४० मद्रासेत १०,२६६ लोक मरण पावले. या तीन शहरांत गतवर्षी मेलेले पुन्हा जिवंत झाले, तर एक नवे शहर वसेल.

१३८० (१९ : २०, १५ आक्टोबर ६०, ३२०)

कोल्हापूर मुक्कामी एका ब्राम्हणी विधवेने आपल्या व्यभिचारजन्य बालकाचा खून केला. तिला राजेबहादूर आपासाहेबांनी १५ वर्षे सक्तमजुरीची शिक्षा दिल्ही. या प्रकरणावरून पुनर्विवाहाचे अगत्य लक्षात येते.

१३८१ (१९ : २०, १५ आक्टोबर ६०, ३२०)

दिल्ली व अयोध्या प्रांतांत पाऊस न पडल्यामुळे दुष्काळाचे भय आहे. खाण्यास न मिळाल्यामुळे बहुत गरीबांना आपली पोटची बाळे विकली. पण आता पाऊस पडला असून दुष्काळाचे संकट नाहीसे झाले आहे. पण दिल्लीत अद्याप पाऊस नाही.

मुंबई एक्सचेंज प्रेस, फोर्ट

**१३८२** (१९:२१, १ नोव्हेंबर ६०, ३२१)

अहमदनगरच्या पाणी प्रकरणाचे सर्व कागदपत्र विलायतेस पाठविण्यात आले. ते पाहून राणीसरकारचे प्रधान चार्लस सी. वुड यांनी ९ आगस्त १८६० रोजी ठराव केला की, या बाबतीत फिर्यादीचे म्हणणे अमान्य करण्यात येत आहे. राणीच्या जाहीरनाम्याचा भलताच अर्थ करून फिर्यादी लोक त्यावर उड्या मारितात. पण ही त्यांची मोठी चूक आहे. कारंजातून पाणी घेणाऱ्या ख्रिस्ती लोकांना पीडा देण्याचे जे प्रयत्न फिर्यादी लोकांनी केले, त्यांस जाहीरनाम्यात काही आधार नाही.

**१३८२ अ** (इंग : ३२१)

**१३८३** (१९ : २१, १ नोव्हेंबर ६०, ३२२–३२७)

मुंबई इलाख्यातील अमेरिकन मिशनाचे ५० वे वर्ष असल्यामुळे 'नगरकर खिस्ती' लिहितो की : यंदाची सभा आनंदकारक व लाभदायक झाली. रे. मरे मिचल, मोडक, बेरामजी करसासजी, नारायण शेषाद्री व बाबा पद्मनजी आले होते. पाहुण्यांची इतकी गर्दी झाली की, खिस्ती भावांची घरे पुरली नाहीत. दररोज सकाळी व दुपारी ३–३ तास सभा चाले. देवाने शिपायांच्या बंडाचा नाश केल्याबद्दल त्याची उपकारस्तुती झाली. आपले मन तपासून आपले आचरण खरेपणाचे आहे की नाही, याचा विचार झाला. प्रत्येक वेळी सुरुवातीस गीतगायन होत असे. इतर धर्म नाहीसे होऊन खिस्ती धर्मच टिकेल, याविषयी भाषणे झाली. मूर्तिपूजक आणि अविश्वासू नातलगांसाठी कार्य केले पाहिजे, याचा विचार झाला. धर्मसंजीवन आणि प्रार्थनामंडळ्या यांची माहिती देण्यात आली. तासन्‌तास बैठक चालली, तरी लोक कधी कंटाळले नाहीत. मिशनच्या अनेक भावांनी एकत्र येऊन समागमाचा व बोधाचा लाभ दिल्हा. "देवाची प्रिय लेकरे प्रेमळ सोबती" हे गीत म्हणताना सर्वांचे हृदय गहिवरले. रे. दाजीबा नीळकंठ यांनी नगर मिशनाची माहिती दिल्ही. ४५० जणांनी प्रभुभोजन घेतले. सभा संपल्यावर वियोगाने सर्वांची मने हेलावली. प्रभूने अपूर्व प्रीतीने त्यांस जोडिले आहे.

**१३८३ अ** (इंग ३२७–३३०)

**१३८४** (१९ : २१, १ नोव्हेंबर ६०, ३३०)

पवित्र शास्त्रातील तत्त्वावर रचलेल्या 'मी विदेशी' या कवितेत एक अनामिक कवी म्हणतो की : "मी तर परदेशी प्रवासी आहे. या जगात एक रात्रच राहणार आहे. मी आकाशात गेल्यावर मला प्रभूचा सहवास अखंड मिळेल. माझ्या मनास विश्रांती लाभेल. या संसारसागरात अखंड श्रम आहे. येथे शांती मिळत नाही. म्हणून वर जाण्यास मला उल्हास वाटेल. माझा प्रभू भेटला की, दुःख नाहीसे होईल. शत्रूचा त्रास तेथे नसेल. अश्रू गळणार नाहीत. मृत्यू माझा घास घेणार नाही." कविता इब्री ११ : १३ यावर आधारित आहे.

**१३८४ अ** (इंम : ३३०)

**१३८५** (१९ : २१, १ नोव्हेंबर ६०, ३३१-३३३)

सतलज आणि बियास नद्यांच्या दुआबात कपूरथळा हे संस्थान आहे. लॉर्ड हार्डिंज यांच्या कारकीर्दीत तेथील राजा एक लाखाची खंडणी देत असे. बंडाच्या काळामध्ये राजाने इंग्रजांना मदत केली, म्हणून ही खंडणी माफ झाली. आता राजाकडे तीन लक्ष रुपये महसुलाचा प्रांत आहे. राजा २७ वर्षांचा असून त्याला ख्रिस्ती धर्मच खरा वाटतो. पहिली बायको मरण पावल्यावर त्याने ख्रिश्चन स्त्रीशी लग्न केले. रे. वुडसैड यांना बोलावून राजाने मिशन सुरू केले. डाक्तर न्युटनला उत्तेजन देऊन तेथे दवाखाना सुरू केला. शाळेत देशी ख्रिस्त्यांना नोकऱ्या दिल्या. त्याच्या दुसऱ्या लग्नाचा धार्मिक विधी वुडसैड यांनी केला. राजाचा मानसिक पुनर्जन्मच झाला आहे. त्याचा विवाह मारेज आक्टाप्रमाणे नोंदवला आहे. तो साहेबांबरोबर राहतो व जेवण घेतो. तो आवेशी आणि भाविक आहे. त्याची पत्नी व ३ लेकरेही पवित्र शास्त्र वाचतात. इंग्रजी शिकतात. त्याची ख्रिस्ती बायकोही चांगली व प्रियकर आहे. मंडळीबद्दल तिला आस्था वाटते.

१३८६ (१९ : २१, १ नोव्हेंबर ६०, ३३३–३३४)

'एक सत्यवक्ता' पत्रात म्हणतो की : महिपतराम रूपरामबद्दलचा मजकूर वाचून फार दुःख झाले. हा सुधारलेल्या मनोवृत्तीचा म्हणून मि. हवार्डने त्याची निवड केली. पूर्वी रंगो बापुजी हे माटाची भाजी खाणारे गृहस्थ विलायतेस गेले, पण ते वृद्धकपी प्रामाणिक तरी होते. हा तरणा सोंगाड्या मात्र ग्रीन शाळेत बतावणी करण्यास शिकला. तो सुधारलेल्या लोकांत वागे. स्नानसंध्येची कांक्षाही त्याला नव्हती. बापाशीही भांडण होते. विलायतच्या बोटीवर चढल्यावर हा माभळभटच बनला. या भटास ब्रांडी, पाणी व बीफस्टेक्स लागत असली, तरी तो पत्रात लिहितो की, तिकडे जात मोडत नाही. त्याचे पत्र केवळ खोटे आहे. नाहीतर त्याने सोवळ्याने बोटीत चढून सेलरऐवजी गुजराती ब्राम्हणांना खलाशी करावे, असे होते. जानव्याचे बिंडे, भस्माचे डबे व गोमुखीची पिशवी, इत्यादी सामान बरोबर नेले पाहिजे होते. राममोहन राय, द्वारकानाथ ठाकुर व चकरबर्त्ती यांनी असली बतावणी कधीच केली नाही. रंगो बापूजी पैशाच्या लोभाने गेला, पण आल्यावर त्याला फार दुःख भोगावे लागले. महिपतरावसारख्या अप्रामाणिक व ढोंगी मनुष्यास विद्याखात्यात ठेवून सरकार लोकांचे कोणते कल्याण साधणार आहे? लपून छपून पाव व केळे खाणाऱ्या सुधारलेल्या लोकांनो, हेच का तुमचे धैर्य?

१३८७ (१९ : २१, १ नोव्हेंबर ६०, ३३४–३३६)

चिनी लोक यांत्रिक ज्ञानात व कलाकौशल्यात फार निपुण असल्यामुळे त्यांचा पराजय होईल, असे वाटले नव्हते. चीनच्या राजाने एक सप्तकपर्यंत तहाचे बोलणे लावले, पण ते निष्फळ झाले. इंग्रज सेनेने पेकिनवर ताबा मिळविला. पण त्यांनी बंडखोरांना मारू नये. कारण ते काही राजाच्या बाजूने नाहीत. फार तर त्यांना "राज्यांतर करणारे" म्हणता येईल. भलतेच कारण काढून त्यांच्या वाटेस जाऊ नये.

१३८८ (१९ : २१, १ नोव्हेंबर ६०, ३३४–३३६)

सीरियामधील ख्रिस्ती लोकांचा संहार आता बंद आहे. तुर्की बादशहाने ८ हजार फौजेसहित एका सरदारास तिकडे पाठवून १३०० लोक कैद केले. चौकशीनंतर १६७ लोकांना फाशी दिल्हे. ३५० जणांना जन्मठेप झाली. गुन्हेगाराचे कुळ किंवा पदवी यांचा विचारसुद्धा केला नाही. आता लोकांवर मोठा वचक बसला. त्यांच्या बायका व नातलगे मात्र शिव्याशाप देत हिंडतात.

१३८९ (१९ : २१, १ नोव्हेंबर ६०, ३३४–३३६)

कॅलिफोर्नियामध्ये सोन्याच्या खाणी सापडल्या म्हणून ६० हजार चिनी लोक तेथे वसती करून राहिले. बाप्टिस्ट मिशनऱ्यांनी साक्रामेंटो या ठिकाणी हजारो लोकांना बाप्तिस्मा दिल्हा. नवीन भजनालयसुद्धा बांधले आहे. शंभरापेक्षा जास्त माणसे ख्रिस्ती झाली.

१३९० (१९ : २१, १ नोव्हेंबर ६०, ३३४–३३६)

छोटा नागपूर या ठिकाणी २ हजार कोल लोकांनी ख्रिस्ती धर्माची दीक्षा घेतली. उपदेश ऐकण्याकरिता नियमाने १८ हजार जण येत असतात.

१३९१ (१९ : २१, १ नोव्हेंबर ६०, ३३४–३३६)

जेर्मनी देशात धर्मसंजीवन होण्याची चिन्हे दिसून येऊ लागली आहेत. कित्येक ठिकाणी प्रार्थनेच्या मंडळ्या स्थापन झाल्या. लोक आपली पापावस्था जाणीत आहेत. ईश्वर चहूकडे आपले गौरव करून घेवो.

१३९२ (१९ : २१, १ नोव्हेंबर ६०, ३३६)

चीन देशामधील हांगकांग येथे १६ लोकांनी ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केला. आणखी १०१ जण उमेदवारी करीत आहेत. त्यांनी मूर्तिपूजा वगैरे कांक्षांचा त्याग केला आहे.

१३९३ (१९ : २१, १ नोव्हेंबर ६०, ३३६)

सरकारी ठरावाप्रमाणे जानेवारी १८६१ पासून सर्व वर्तमानपत्राचे टपाल-हशील आगाऊ भरावयाचे आहे. तरी ज्ञानोदयाच्या बाहेरगावच्या वर्गणीदारांनी एक वर्षाची वर्गणी दीड रुपया त्वरित पाठवावी. एतद्देशीय वर्गणीदारांनी तीन रुपये आगाऊ पाठवावेत. जे साहेबलोक डाकमार्गाने अंक घेतात, त्यांनी ४ रुपये ८ आणे पाठवावेत.

१३९३ अ (इंम : ३३६)

मुंबई, एक्सचेंज प्रेस, फोर्ट

१३९४ (१९ : २२, १५ नोव्हेंबर ६०, ३३७–३३९)

'फ्रेंड आफ इंडिया' ने बातमी पाठविली आहे की : पंजाबात 'निकलसेनी गोसावी' नावाचा एक नवा धर्मग्रंथ उदयास आला. ते निकलसनला देव मानतात. चिलियनवाल्याच्या रणभूमीवर या साहेबाने शिखांचा मोठा पराभव केला. तो पंजाबी लोकांशी मायेने, न्यायाने वर्तला, म्हणून तो देव बनला. रामदासी, नानकपंथी, यांच्याप्रमाणे हा नवीन पंथ झाला आहे : केशरी कफनी व काळी वाटोळी टोपी, असा यांचा पोषाख असतो. त्यांच्या गाण्याचे धृपद "गुरु निकलसेन" असे आहे. १८५६ मध्ये निकलसनसाहेब पंजाबहून काश्मीरकडे गेला, तेव्हा त्याची पूजा करण्यास तोबा गर्दी झाली. त्याने फटके मारले, तर यांची भक्ती अधिक वाढली. पुढे निकलसन दिल्लीच्या लढाईत मरण पावला, तेव्हा एका शिष्याने मान कापून मृत्यू पतकरला. दुसराही तसाच मेला. तिसऱ्यास मात्र मिशनरी भेटला. त्याने बाप्तिस्मा घेतला. वीर पुरुषांना देव मानणे, हा नेटिवांचा स्वभावधर्म दिसतो. राम व कृष्ण हे पराक्रमी योद्धे नाही का देवत्व पावले? पण मृताची भक्ती करणे, हे वेडेपण होय.

१३९५ (१९ : २२, १५ नोव्हेंबर ६०, ३३९–३४०)

बंगालमध्ये शिवनारायणी नावाचा पंथ आहे. त्या पंथाचे लोक जातिभेद विसरून खानपान करतात, पण समाजात जातीचे नियम पाळतात. त्यांचा वृद्ध गुरु चतुरीदास याने सांगितले होते की : ईश्वराचा पवित्र अवतार थोडक्या काळानेच प्रगट होणार आहे. त्या संताचे ग्रंथ घरोघर जातील. पुढे मुझफरपूरचे दोघे मिशनरी मुरियारु गावी आले. तेव्हा त्यांनी येशूची माहिती दिली. सर्व शिवनारायणी पंथीयांची खात्री झाली की, मानवाची पापे धुणारा, तारणारा ईश्वरी अवतार तो हाच होय. इतर लोकांनी त्यांचा छळ व पाठलाग केले, घरे जाळली, तरी ते अविचल राहिले. वंशपरंपरागत विणण्याचा व्यवसाय करून जगले. जमीनदाराने त्यांना घरे दिली. जे प्रभूचा आश्रय करतात, ते सर्व सुखी होतात.

१३९५ अ (इंम : ३३९)

१३९६ (१९ : २२, १५ नोव्हेंबर ६०, ३४१)

इंडियन फिल्ड नामक वृत्तपत्रात काही बंगाली तरुणांनी म्हटले आहे की : "आमचे सुधारलेले मित्रसुद्धा नवरात्राच्या सणामध्ये दुर्गापूजा करतात. त्यात त्यांना काही गैर दिसत नाही. मूर्तिपूजेमुळे खऱ्या व जिवंत देवाचा अपमान होतो, पण यांची तशी खातरी नाही. पूजेस प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष उत्तेजन देणे, हे नास्तिक मताच्या खालच्या पायरीचे आहे. जे सुधारक म्हणवितात, त्यांनी विवेकाने विचार करावा. जे धैर्य धरून मूर्तिपूजेचा निषेध करतात, त्यांचा गौरव होईल. हिंदू व पारशी तरुणांनी खरे काय ते ओळखावे, मूर्तीपुढे गुडघे टेकणे, सण पाळणे, वेडगळ चालींना उत्तेजन देणे, या सर्व गोष्टी बंद होतील असा दिवस कधी येईल बरे ? आपण ढोंग करून मूर्ख चालींना प्रोत्साहन देतो व आपल्या संततीचा नाश करून घेतो."

**१३९६ अ** (इंम : ३४०-३४१)

**१३९७** (१९ : २२, १५ नोव्हेंबर ६०, ३४१-३४३)

रेवरंड गोपीनाथ नंदी यांच्या पत्रावरून समजते की : फत्तेपूरच्या मिशनामध्ये ५ जणांनी दीक्षा घेतली. नौबिया या ब्राह्मण स्त्रीचा पती पूर्वी ख्रिस्ती झाला. आता तीही ख्रिस्ती धर्मात आली. नातेवाईकांचा छळ व पाठलाग तिने धैर्याने सोसला. तिचा मनःपालट झाला आहे. तिची कन्या सुनियाही ख्रिस्ताकडे आली; मसीही हा तर पलटणीतला शिपाई होता. त्याचा मित्र रेटर बाबू यांजसह तो रस्त्यावरील प्रवचन ऐकत असे. त्याला ख्रिस्ती धर्माचे खरेपण पटले. ब्रह्मदेशचा रहिवासी सालोमन भावाच्या मृत्यूमुळे पंजाबात आला. एका धर्मशाळेत त्याने चार दिवस शुभवर्तमान ऐकले. मनोभावाने शोध करून त्याने दीक्षा घेतली. शिवाय एक रिसालदार आबशालोम याने रे. नंदीकडून ख्रिस्ती धर्माची माहिती मिळवून दीक्षा घेतली.

**१३९८** (१९ : २२, १५ नोव्हेंबर ६०, ३४३-३४५)

पृथ्वीवरील स्थावरजंगमादि पदार्थांची उत्पत्ती व विस्तार, यांचा शोध ज्या शास्त्रज्ञांनी केला, त्यांचा फार उपकार मानला पाहिजे. प्राण्यांच्या उत्पत्तीत जगकर्त्याचे गौरव दिसते. ईश्वराची कल्पना, सामर्थ्य व दयाळुत्व अगाध आहेत. कोंबडीने आपले अंडे उबविण्यास सुरुवात केल्यावर १२ तासांनीच पिलाची लक्षणे दिसतात, २४ तासांत काळजाच्या जागी धडधड लागते. ७० तासांनी पंख तयार होतात. १९० तासांनी चोच उघडते. २३६ तासांनंतर त्याचा रंग हिरवा होतो. २६४ व्या तासी त्याला डोळे उत्पन्न होतात. १८ दिवसांनंतर त्या पिलाचे ओरडणे प्रथम ऐकू येते. लहानशा अंड्यात पिलाचे अवयव ईश्वर गुप्तपणे ठेवतो. कितीही अंडी असली, तरी हाच फेरफार दिसतो. अंड्याची जागा बदलली किंवा ते उलटे केले, तरी या क्रियेमध्ये काही फरक पडत नाही. ईश्वराचे सामर्थ्य सुवंदित असो !

१३९९ (१९ : २२, १५ नोव्हेंबर ६०, ३४५–३४९)

धर्मसंबंधी संभाषणाबाबत 'सभेस जाणारा एक' लिहितो की :
रे. मोडकांनी शहासमोर चमत्काराची काही लक्षणे सांगितली. तो चमत्कार इंद्रियांद्वारा कळलेला असावा, प्रसिद्धपणे झालेला असावा, त्याचे स्मारक व विधी पुढे चालावेत. ही लक्षणे मोशाच्या चमत्कारास जुळतात. मोशाने साप केल्यामुळे तो फारतर मोठा गारुडी ठरतो. तसे रेल्वेच्या शोधाने ईश्वरी चमत्कार वाढतो. ईश्वरी असाधारण कृतीस चमत्कार म्हणावे. फारोच्या जोशांच्या गुंडाईपेक्षा मोशाचे चमत्कार श्रेष्ठ आहेत. उदा. तांबड्या समुद्रातून लाखो लोकांना कोरड्या वाटेने नेणे, खडकातून पाणी काढणे आणि आकाशातून मान्ना नामक अन्नाचा पुरवठा करणे. या सगळ्या चमत्कारांच्या खुणा मिसर देशात आढळतात. लाखो माणसांनी हे चमत्कार स्वतः पाहिले. हिलकिया नावाच्या याजकाने ठकबाजी करून या ग्रंथाचे कर्तृत्व मोशाकडे दिले, हे म्हणणे चूक आहे. पण तसा उल्लेख कोठेही नाही. मोशाच्या पंचग्रंथांना पूर्वीच प्रसिद्धी मिळाली होती. राजा व इस्त्रायली लोक यांना त्यांतला सर्व मजकूर ठाऊक होता. त्यातले विधी व नेम सर्वजण पाळीत होते. म्हणून हे चमत्कार मोशाने घडविले आहेत, यात शंका नाही.

१४०० (१९ : २२, १५ नोव्हेंबर ६०, ३४९–३५१)

चीनचा राजा व इंग्रज यांचा तह झाला नाही. तातार स्वारांनी इंग्रज फ्रेंचांच्या सैन्यावर हल्ला केला. पण त्यांचा पराभव झाला. सेनापती एल्गीन, त्यांचा सेक्रेटरी आणि एक बातमीदार, यांना चिन्यांनी पकडले आहे. त्यांच्या हातांत तहाचे निशाण होते व ते प्रेते पुरण्यासाठी रणांगणावर गेले होते. चिन्यांचे हे कृत्य अगदी गैरशिस्त आहे.

१४०१ (१९ : २२, १५ नोव्हेंबर ६०, ३४९–३५१)

बाघर लोकांनी माधवपुर गाव लुटले.

१४०२ (१९ : २२, १५ नोव्हेंबर ६०, ३४९–३५१)

प्राप्तिकरासाठी व्यापाऱ्यांच्या वह्या तपासल्या जातील, अशी वदंता उठल्यावर आग्रा आणि अलाहाबाद येथील व्यापाऱ्यांनी १ लक्ष ६० हजार रुपये कर देण्याचे स्वतः होऊन मान्य केले. इतर उदमी व्यापाऱ्यांवर कायद्याप्रमाणे कर बसेल.

१४०३ (१९ : २२, १५ नोव्हेंबर ६०, ३४९–३५१)

दस्तऐवजावर नियमाप्रमाणे स्टांप नसेल, तर १०० रुपये दंड होणार आहे. तरी तिकिट न लावलेले दस्तऐवज लोकांनी स्वीकारू नयेत.

१४०४ (१९ : २२, १५ नोव्हेंबर ६०, ३४९–३५१)

आक्सफर्डचे डब्ल्यु. ए. रसलसाहेब यांना पुणे पाठशाळेचे प्रिन्सिपाल नेमले आहे.

१४०५ (१९ : २२, १५ नोव्हेंबर ६०, ३४९–३५१)

कलकत्याच्या बाबू कालीदास दत्त यांनी हिंदू धर्म सोडून प्रसिद्धपणे ब्राम्हो धर्माचा स्वीकार केला. या पंथात ईश्वराचे अस्तित्व मान्य केले असले, तरी आचरण नास्तिकाप्रमाणे असते.

१४०६ (१९ : २२, १५ नोव्हेंबर ६०, ३४९–३५१)

बोरघाटाच्या लोखंडी रस्त्यावर २० हजार कामकरी आहेत.

१४०७ (१९ : २२, १५ नोवेंबर ६०, ३५१–३५२)

उत्तर अमेरिकेच्या वायव्येकडून अटलांटिक सागरातून पासिफिक सागराकडे जाण्याचा मार्ग शोधून काढणारास २० हजार रुपयांचे इनाम जाहीर झाले. सर ज्यान फ्रांकलीन याने असा प्रयत्न केला. पण तो त्यातच मृत झाला. आर मक्लुअर याने बेहरिंग समुद्रधुनीमधून हा मार्ग शोधला. थिजलेल्या बर्फामुळे त्याला फार त्रास झाला. पण त्यास यश मिळाले.

१४०८ (१९ : २२, १५ नोवेंबर ६०, ३५१–३५२)

कलकत्यात पाण्याच्या जोरावर यंत्राने पंखे चालवितात. पाणी मात्र जमिनीपासून १५ फूट चढलेले असावे लागते.

१४०९ (१९ : २२, १५ नोवेंबर ६०, ३५१–३५२)

विलायतेत इसलिंगटनच्या कारागिराने तीन फूट व्यासाचा सूर्यकांत मणी तयार केला. त्याच्याजवळ नेल्यामुळे पोलाद व प्लातिनम यांचादेखील रस होतो. एका हिऱ्याचे वजन अर्ध्या तासात तीन पंचमांश झाले.

१४१० (१९ : २२, १५ नोवेंबर ६०, ३५१–३५२)

काही जातीचे बेडूक दगडाच्या पोटात अनेक वर्षे राहातात. एका साहेबाने दगड जोडून त्यात बेडूक ठेवले, तर १०, १२,१५ वर्षे झाली, तरी बेडूक जिवंत होते. परमेश्वराची कृत्ये अगाध आहेत.

१४११ (१९ : २२, १५ नोवेंबर ६०, ३५१–३५२)

गुजरातेत इंग्रजांच्या सैन्याने वाघर बंडखोरांचा पराभव केला. मोठी लूट मिळाली.

१४१२ (१९ : २२, १५ नोवेंबर ६०, ३५१–३५२)

नीमच परगण्यात दुष्काळ पडल्यामुळे धान्याच्या निर्यातीवर बंदी आली.

१४१३ (१९ : २२, १५ नोव्हेंबर ६०, ३५१–३५२)

सरकारने रयतेवर कर बसविला, याचा निषेध म्हणून पुण्याच्या व्यापाऱ्यांनी दिवाळीची रोषणाई करावयाची नाही, असे ठरविले आहे.

१४१४ (१९ : २२, १५ नोव्हेंबर ६०, ३५२)

मि. महिपतराम रूपराम हा एक ढोंगी सुधारक आहे. तो म्हणतो की, 'मी हिंदुस्थानात परत आल्यावर पंचगव्य घेणार आहे.' वाह वा रे सुधारणारा!

१४१५ (१९ : २२, १५ नोव्हेंबर ६०, ३५२)

विक्तोऱ्या राणीची स्वारी कुटुंबासुद्धा जेर्मणी देशास गेली. तो त्यांच्या भ्रताराचा जन्मदेश आहे.

१४१६ (१९ : २२, १५ नोव्हेंबर ६०, ३५२)

जेर्मणीहून ८ मिशनरी व ७ मडमा धर्मकार्यासाठी आल्या.

१४१७ (१९ : २२, १५ नोव्हेंबर ६०, ३५२)

गवर्नर जेनरलसाहेबांनी निजामाकडे असा प्रस्ताव मांडला की, गोदावरीच्या उत्तरेचा प्रदेश इंग्रजांना देऊन त्या मोबदल्यात दुसरा प्रदेश घ्यावा. पण निजाम कबूल होत नाही.

१४१८ (१९ : २२, १५ नोव्हेंबर ६०, ३५२)

आक्तोबरमध्ये मुंबईत समुद्रावर तुफान होऊन होड्यांमधील ५ माणसे बुडून मेली.

**१४१९** (१९ : २२, १५ नोव्हेंबर ६०, ३५२)

पुणे फ्री चर्च विद्यालयात ४०० मुले इंग्रजी विद्या व ख्रिस्ती धर्म शिकतात. (प्रभोदयवरून)

मुंबई, एक्सचेंज प्रेस, फोर्ट

## ज्ञानोदय, पुस्तक १९, अंक २३, मुंबई, १ दिसेंबर १८६०

**१४२०** (१९ : २३, १ दिसेंबर ६०, ३५४–३५६)

रे. स्काट आपल्या पत्रात म्हणतात : मोहनलाल हा ब्राह्मण पंतोजी होता. बंडवाल्यांच्या धामधुमीत तो बेरोजगार झाला. त्याने आपल्या गावी राहून नव्या कराराचा नीट अभ्यास केला. आपण आपल्या जातीतील अनेकांना ख्रिस्ताकडे वळवू, असा त्याला विश्वास वाटे. म्हणून तो रस्त्यावर प्रवचने करीत असे. हिंदू पुराणातील भविष्यात जो कलंकी अवतार सांगितला, तोच येशू ख्रिस्त आहे, असे तो पटवून देई. याच मोहनलालने नुकताच प्रसिद्धपणे फत्तेगड येथे बाप्तिस्मा घेतला. मिथ्याचाराच्या जाळयात गुंतलेल्यांनी लवकर ख्रिस्ताकडे यावे, असे त्याने दीक्षेनंतर केलेल्या भाषणात सांगितले. अज्ञानी माणसास ज्ञानी करण्यासाठी देवाने पवित्र शास्त्र दिल्हे आहे. येशू वाचून दुसरा कोणी तारणार नाही, अशी उंच जातीच्या लोकांचीही खातरी झाली आहे. गुप्तपणे ख्रिस्ती मत मानण्यापेक्षा प्रसिद्ध आचरण चांगले असते. नानासाहेबाने क्रूरपणाने अनेक साहेबांचा व मडमांचा वध केला. त्यावेळी पुन्हा ख्रिस्ती धर्माचे काम चालेल, अशी काही आशा वाटत नव्हती. पण देवाच्या मंडळीवर नरकाचे बळ चालत नसते.

**१४२० अ** (इंग्र : ३५३–३५४)

१४२१ (१९ : २३, १ डिसेंबर ६०, ३५७–३५९)

पेरलेल्या दाण्याचे बहुतपट पीक येते. केलेले उपकार वाया जात नाहीत. अमेरिकेतील लोखंडी रस्त्याचा एक कामदार आपला अनुभव सांगताना म्हणतो की : माझी आगगाडी रोज वेर्जिन्या संस्थानच्या डोंगराळ प्रदेशातून जाते. डोंगराच्या दरीजवळ ग्राफ नामे एक म्हातारी व तिच्या तिघी मुली एका घरात राहतात. शेजारच्या गावात फळे विकण्यासाठी या मुली रोज जात. या नाजूक पण निरोगी मुलींना पाहिले, म्हणजे मन प्रसन्न होई. मी त्यांना रोज गाडीमध्ये बसू देत असे. त्यांचे चिमणे पाय दुखू नयेत, म्हणून त्यांना आग्रहाने गाडीत घेत असे. एका हिंवाळ्यात बर्फ फार पडले होते. आमची गाडी डोंगरातून धावत होती. मध्यरात्री एक कर्कश किंकाळी ऐकू आली. म्हणून गाडी थांबली. फाणस घेऊन शोध केला, तर चारशे हातावर एक मोठा चर तयार झाला होता. जवळच ग्राफबाई व तिच्या मुली यांनी लाकडाचा मोठा जाळ केला होता. पाऊस व बर्फ यांनी त्या गारठून गेल्या, तरी मला इशारा देण्यासाठी त्या थांबल्या होत्या. हजारो स्त्रीपुरुषांचे व बालकांचे प्राण त्यांच्या सावधगिरीने बचावले. लोकांनी आपसात वर्गणी करून त्या सर्वांना ९०० रुपयांची थैली दिल्ही. रेल्वे कंपनीने तिला नवे घर बांधून दिल्हे आणि तिच्या सन्मानाकरिता तिच्या घराजवळ दररोज गाडी थांबविण्याचा ठराव केला.

१४२१ अ (इंम : ३५६–३५७)

१४२२ (१९: २३, १ डिसेंबर ६०, ३५९–३६४)

अहमदनगरच्या पाणी प्रकरणाबाबत 'एक ख्रिस्ती' पत्रात लिहितो की : ख्रिस्ती लोकांच्या वाजवी हक्काबद्दल हिंदूंनी नगरमध्ये गैरसमजानें बखेडा मांडला. ख्रिस्ती लोकांनी पाणी भरलें, म्हणून ९–१० कारंजी टाकून दिल्ही. धर्माच्या बचावाकरिता पाणी भरू नका, असे शूद्रांना बजावलें. काही दिवस आपल्या खास कारंज्यातून त्यांना पाणी दिल्हे. मुसलमान लोक ऐकणार नाहीत, म्हणून सावकारामार्फत त्यांनाही धमक्या दिल्या. व्यापार-उदीम व कर्जफेड यांच्या भयाने तेही गप्प बसले. म्युनिसिपल कामदारही ब्राह्मण विभागीय कारंजांना जास्त पाणी सोडीत. पण पाणी न घेण्याचा आग्रह फार दिवस चालला नाही. प्रथम रात्री व नंतर दिवसा उघडपणे सगळेच पाणी भरू लागले. अमृतेश्वरच्या कारंज्याजवळ पाण्याकरिता स्त्रियांची फार गर्दी होई. तेथे काही छचोर सोट बहिरोबा स्त्रियांची टिंगल करीत बसत. म्हणजे कारंज्यावर बहिष्कार घालणारांनी या अनाचारास साह्याय्य केले. स्त्रियांवर पाप दृष्टी ठेवून त्यांना भ्रष्ट करण्याची वासना लोकांनी धरू नये. 'बहिष्कृत' कारंज्यात जनावरांना पाणी पिण्यास आणणे, पिण्यासाठी घाणेरे कपडे खळबळणे, मुलांना लघुशंका करावयास लावणे, असले निंद्य प्रकार नेटिवांनी सर्रास केले. पाण्यात शेण कालवल्यामुळे पाण्यास दुर्गंधी सुटून महामारीचा उपद्रव झाला. पंढरपूरचे यात्रेकरू आल्यावर वाखा सुरू झाला. ब्राह्मण मात्र अफवा उठवितात की, ख्रिस्ती लोकांनी कारंज्यात गुळण्या टाकल्या. यानंतर ब्राह्मणांनी माजिस्त्रेताकडे व मुंबई सरकारकडे जे अर्ज पाठविले, त्याची माहिती व ब्रिटिश पंतप्रधानाचे उत्तर पूर्वी ज्ञानोदयात प्रसिद्ध झाले आहेच. आता तरी नगरच्या लोकांनी नवीन अर्ज्या करू नयेत. देवाने ख्रिस्ती लोकांचा पक्ष खरा ठरविला, त्याचे गौरव असो.

**१४२३** (१९ : २३, १ डिसेंबर ६०, ३६४–३६५)

इंग्रज–फ्रेंचांच्या सैन्याने चीनची राजधानी पेकिनवर स्वारी केली, तेव्हा चीनचा बादशहा तार्टार देशास पळून गेला. लाखो रुपयांची लूट इंग्रज सरकारकडे जमा झाली. चिन्यांनी अनेक युरोपियनांस ठार मारले, हे मात्र अगदी गैरशिस्त कृत्य त्यांनी केले. कारण युधकैद्यांना मारू नये, असा संकेत आहे.

**१४२४** (१९ : २३, १ डिसेंबर ६०, ३६४–३६५)

प्राप्तिकराच्या वादावरून दुकानदारांनी दिवाळीची रोषणाई रद्द केली. हिंदू लोक मनास येईल तेव्हा सण रद्द करू शकतात. मग सरकारने तरी दिवाळीची सुट्टी कशासाठी द्यावी? दिवाळीसारखे दिवाळखोर आणि शिमग्यासारखे कुत्सित सण बंद झाले पाहिजेत.

**१४२५** (१९ : २३, १ डिसेंबर ६०, ३६४–३६५)

नानासाहेब आपल्या क्रूर व घातक मित्रांसह तिबेटकडे गेला, अशी बातमी होती. ना. वैसराय यांनी चौकशी केल्यावर तिकडील कमिशनरचे पत्र आले की, नाना बहुत दिवसांमागेच मरण पावला. त्याच्या मृत्यूबाबत कोणासही संशय नाही.

**१४२६** (१९ : २३, १ डिसेंबर ६०, ३६४–३६५)

इतालीत गारिबाल्दीचा जयच होत आहे. हे युद्ध संपूर्ण युरोपात पसरण्याचा धोका संभवतो.

**१४२७** (१९ : २३, १ डिसेंबर ६०, ३६४–३६५)

विक्तोऱ्या राणीसाहेब जेर्मणीहून इंग्लंडमध्ये परत आल्या.

१४२८ (१९ : २३, १ दिसेंबर ६०, ३६४–३६५)

बंगाल्यात चरकपूजेची दोन दिवसाची सुटी रद्द झाली. होळीची सुट्टीही एक दिवसच मिळणार.

१४२९ (१९ : २३, १ दिसेंबर ६०, ३६४–३६५)

सर जमशेदजी जिजिभाईचे चिरंजीव करसेटजी यांना 'सर' पदवी लावण्यास परवानगी मिळाली.

१४३० (१९ : २३, १ दिसेंबर ६०, ३६५–३६७)

एका फ्रेंच शास्त्रज्ञाने असा शोध लावला आहे की : डुकराच्या मांसात 'त्रुचिना स्परासीस' नावाचा अतिसूक्ष्म किडा असतो. सतत ते मांस खाण्याने हे किडे स्नायू शोषून घेतात. तरी लोकांनी हा मांसाहार कमी करावा. मोशाने या मांसाहारास बंदी केली होती. ती मात्र दैवी प्रेरणेनेच. कारण त्याला हे माहीत असणे, असंभव्य होते.

१४३१ (१९ : २३, १ दिसेंबर ६०, ३६५–३६७)

डाक्तर रशया यांनी असे सिद्ध केले की : गाण्याने क्षयरोग जातो. जेर्मनी देशात क्षयाचा प्रसार अगदी कमी आहे, कारण तेथे शाळेतच गायनाचे शिक्षण देतात. (प्रभोदयवरून)

१४३२ (१९ : २३, १ दिसेंबर ६०, ३६५–३६७)

सक्राम्स गलबताचा कप्तान पुलन यांनी असा शोध लावला की : समुद्राच्या पृष्ठभागावरील पाण्याची उष्णता ७५ अंश असते. त्यावेळी २१६० पुरुष खोलीवर ती उष्णता फक्त ३५ अंशच असते. ऊन पाणी नेहमी गार पाण्याच्या वर राहाते. यावरून हिंदूंची वडवानळाची कल्पना निराधार ठरते. खिस्ती शास्त्रातील कल्पना मात्र खऱ्या ठरत आहेत.

१४३३ (१९ : २३, १ डिसेंबर ६०, ३६५–३६७)
गंगेला कालवे काढण्याकरिता २९ लक्ष रुपये खर्च येणार आहे. यंदा व पुढील वर्षी प्रत्येकी रुपये ८ लक्ष खर्च होईल.

१४३४ (१९ : २३, १ डिसेंबर ६०, ३६५–३६७)
एका युरोपियन डाक्तराने एका माणसाच्या उजव्या पायातून २७ नारू व डाव्यातून १६ नारू काढले. हे किडे पायात राहातात. त्यांची उत्पत्ती मात्र शरीराच्या बाहेर आहे.

१४३५ (१९ : २३, १ डिसेंबर ६०, ३६७–३६८)
मुंबईच्या खोजांनी इंग्लिश विद्यालय स्थापन करण्यासाठी ५० हजार रुपये जमा केले होते. पण त्यांचा गुरू आगाखान याने अरबीखेरीज दुसरी भाषा शिकण्यास मनाई केल्यामुळे हा बेत रद्द झाला. हाच आगा मुलाला फारशी शिकवितो. शिवाय खोजे लोक हिंदूंची पुराणे वाचतात. त्यांना मात्र मनाई करीत नाही. इंग्रजी विद्येनेच मुलांचे हित होणार आहे.

१४३६ (१९ : २३, १ डिसेंबर ६०, ३६७–३६८)
नाशिक मिशनाने शरणपूर ही वसाहत तयार केली आहे. तेथे एक शाळा आणि उद्योगशाळाही आहे. २५ मुले व २८ मुली शिकतात. गेल्या वर्षी शाळेस ३ हजारांची देणगी मिळाली. उद्योगशाळेमध्ये २७ जणांना सुतारकी लोहारकी, वगैरे कसब शिकविले जाते. शाळेचे भांडवल ५ हजार असून काही कर्जही आहे.

१४३७ (१९ : २३, १ डिसेंबर ६०, ३६७–३६८)
पूर्वी औरंगाबाद मद्रास इलाख्यात होते. आता कमांडर-इन्-चीफ सर ह्यू रोज यांच्या हुकुमानुसार ते मुंबई इलाख्यात समाविष्ट झाले आहे. मद्रास येथील लष्कराची छावणी मलकापुराजवळ होईल.

**१४३८** (१९ : २३, १ दिसेंबर ६०, ३६८)

पुढील जानेवारीच्या एक तारखेपासून वर्तमानपत्राचे टपाल हशील आगाऊ भरण्याचा सरकारी ठराव झाला आहे. तरी डाकमार्गाने ज्ञानोदय घेणाऱ्यांनी २४ अंकांची वर्गणी दीड रुपया आगाऊ पाठवावी. एतद्देशीय वर्गणीदारांनी तीन रुपये पाठवावेत. जे साहेबलोक डाकमार्गे अंक घेतात त्यांनी ४॥ रुपये पाठवावेत.

**१४३८अ** (हंस : ३६८)

मुंबई, एक्सचेंज प्रेस, फोर्ट

**१४३९** (१९ : २४, १५ दिसेंबर ६०, ३६९–३७०)

इंग्लंडच्या राणीचा जेष्ठ पुत्र व राज्याचा वारीस प्रिन्स आफ वेल्स कानडामार्गे अमेरिकेस गेला होता. नयगारा हा विशाल धोदाणाही त्याने पाहिला. तेथील रोषणाई पाहून तो शिकारीसाठी राणात गेला. प्रत्येक ठिकाणी त्याचा मोठा पाहुणचार झाला. वॉशिंग्टनच्या राज्याध्यक्षाने त्याचा बहुमान केला, तेव्हा ५ लाख लोक त्याला सामोरे गेले होते. ज्यार्ज वाशिंग्टनच्या कबरीसही त्याने भेट दिल्ही. तेथे टोपी काढून तो काही काळ उभा राहिला. बाजेवाल्यांनी शोकगीत वाजविले. इंग्लंडचा राजा तिसरा ज्यार्ज वाशिंग्टनला बंडखोर आणि फितूर म्हणत असे. त्याच्या पणतूने अशा प्रकारे वाशिंग्टनला मान दिल्हा, म्हणून आनंद वाटतो. वाशिंग्टनचे शत्रूदेखील कबूल करतात की, त्याच्या साम्यतेचा योद्धा पृथ्वीच्या पाठीवर क्वचितच होऊन गेला असेल. अमेरिकन लोक तर त्यास 'देशाचा पिता' असे नाव देतात. ८४ वर्षांमागे हे 'बंडखोर राष्ट्र' मूळ देशापासून विभक्त झाले. तेव्हापासून एवढा स्नेहभाव दोन राष्ट्रांत दिसला नव्हता.

**१४३९ अ** (इंग : ३६९)

१४४० (१९ : २४, १५ डिसेंबर ६०, ३७१–३७२)

हिंदुस्थान सरकारच्या अंमलातील सर्व ठिकाणी इंग्रज सरकारने प्राप्तिकर लागू केला. पुणेकर व्यापाऱ्यांनी या करास विरोध केला व असेसरांच्या देखत फॉर्म फाडून टाकले. पण कलेक्टर देविडसन यांनी त्यांची खातरी पटवून दिल्ही की : २०० रुपयांपर्यंत हा कर पडत नाही. प्रामाणिकपणे फर्मे भरून देण्यात व्यापाऱ्यांचे हित आहे. मुंबईच्या व्यापाऱ्यांशी सल्लामसलत करण्याकरिता त्यांनी मुदत मागितली. पण त्यांची विनंती अमान्य झाली. नगर-सातारा याठिकाणी लोक निमूटपणाने फर्मे भरतात. मुंबईच्या व्यापाऱ्यांनी जर विलंब केला, तर त्यांना दंड व शिक्षा होतील. सरकार स्वतःहून करडेपणा किंवा सक्ती करणार नाही. पण हयगय झाली, तर नाइलाज आहे. पुणे मुक्कामी कलेक्टरच्या कचेरीत हंगामा करून फर्मे फाडून टाकणाऱ्या तीन सावकारांना २-२०० रुपये दंड झाला व तिप्पट कर वसूल करण्यात आला. लोक आता सावध होऊन फर्मे भरून देत आहेत. अगला गिरे, पिछला हुशार.

१४४० अ (इंम : ३७०–३७१)

१४४१ (१९ : २४, १५ डिसेंबर ६०, ३७२–३७३)

'सरकार व रयत यांचा शुभचिंतक' पत्रात लिहितो की : हाली देवस्थान, पीर व मशिदी, यांना सरकारकडून लक्षावधी द्रव्य मिळते. हे द्रव्य सरकारने आपल्या कर्जफेडीसाठी घ्यावे. सध्या पुजारी वगैरे लठ्ठाश्रमी भट्ट अळशी बसतात. ते उद्योग करू लागतील व दुष्ट क्रिया चैनशीर राहून दुसऱ्यांस बिघडवितात, अनाचाराची वृद्धी करतात, त्यांस बंदी होऊन दुष्टाईस सरकारकडून उत्तेजन मिळणार नाही. लोक नाखूष होऊन चेततील व बंड करतील, अशी भीती बाळगण्याचे कारण नाही. कारण या तरतुदीने प्राप्तिकराची आकारणी कमी होईल. मग लोकांना कुरकूर करण्यास काहीच जागा राहणार नाही. जर एवढ्याने कर्ज फिटत नसेल, तर देवस्थानांच्या देणग्या निदान पाच वर्षे बंद कराव्यात. तोच पैसा अमानत ठेवून त्यातून खर्च करावा. एखादा सावकार अगर कंपनी या कर्जफेडीची हमी घेत असेल, तर काही ठराविक वर्षांपर्यंत देवस्थानच्या देणग्या त्यांनाच द्याव्यात. याने सरकारची कर्जासंबंधीची काळजी व खटाटोपाचे ओझेही अगदी उतरतील. सरकार आपले हित पाहते, याविषयी रयतेचीही खातरी होईल. लोक सरकारास अधिक चाहतील.

१४४१ अ (इंम : २४, ३७३–३७४)

१४४२ (१९ : २४, १५ दिसेंबर ६०, ३७४–३७६)

'एक नाशिककर' लिहितो की : १३ नोव्हेंबर १८६० रोजी शरणपूरला वार्षिक सभा झाली. मिशन शाळेच्या विद्यार्थ्यांनी सुशोभित निशाणांची मिरवणूक काढून रे. प्रेस यांचे शुभचिंतन केले. नंतर देवळात प्रार्थना म्हटली गेली. गेल्या वर्षी ईश्वराने सर्वांना सुरक्षित ठेवल्याबद्दल उपकारस्तुती झाली. ६० माणसांनी बाप्तिस्मा घेतला. प्रेससाहेब स्वदेशी गेल्यावर इजनबर्ग हा पालक होणार आहे. सोराबजी दादा गंगापूर मिशनात राहील. रे. इजनबर्गने नम्रतेने सांगितले की, ईश्वरच आपल्याकडून काम करवितो. येथील लोकांनी अंधारातून उजेडात यावे, यासाठी कार्य केले पाहिजे. आम्हांस देवाने जो उजेड दिल्हा, तो इतरांनाही मिळावा, याकरिता झटत राहावे. मि. फकिरा आणि रतनजी नौरोजी यांनीही देवाचा आशीर्वाद मागितला. शेतकरी नांगरतो, पेरितो व पावसाची वाट पहातो. आम्हीही मेहनत करून ईश्वराच्या आशीर्वादाची वाट पहात राहावे. रे. आपाजी व कृष्णाजी यांनीही बोध केला. प्रीतिभोजनासाठी २०० मनुष्ये जमली होती. सायंकाळी मुलांचे खेळ झाले. शोभेची दारू उडविण्यात आली. असे दारूकाम लोकांनी पाहिले नव्हते. उत्तरोत्तर अधिक मंडळ्या स्थापन होऊन आम्हांस आनंदाचे दिवस दिसावेत, अशी प्रार्थना आहे.

१४४३ (१९ : २४, १५ दिसेंबर ६०, ३७६–३७८)

'एक एत्तद्देशीय खिस्ती' लिहितो की : नेटिवाप्रमाणे स्वप्नासंबंधी भविष्य आपण जोशाकडून पाहात नाही. आपली श्रद्धा अशी आहे की, ईश्वर स्वप्नांच्या द्वारे आपली इच्छा मानवांना कळवीत असतो. पवित्र शास्त्रामध्ये याविषयी अनेक प्रमाणे सापडतात. मूर्तिपूजक मात्र सर्व मनोभास आणि तप्त झालेल्या मस्तकामधील विषय व कल्पना खऱ्या मानतात. पण एखाद्या विशेष पवित्र गोष्टीविषयी स्वप्नातून काही सूचना मिळाली, तर ती खोटी मानू नये. मी सांगत असलेल्या स्वप्नांचा सर्वांनी विचार करावा. स्वप्नात असा भास झाला की : एक देशी मिशनरी व युरोपियन लगबगीने येऊन म्हणाले की, 'पहा ! देवाने आपणांवर फार कृपा केली आहे ! म्हणून मी धावत रस्त्यावर गेलो. पाहातो तो अनेक हिंदू लोकांचा समुदाय आमच्यामागून येत होता. एक काळा काफीर मात्र आपले पिंगट केश फिसकारून वेडेविद्रे तोंड करून बडबडत होता. हा रानटी मनुष्यखेरीज करून सर्वजण 'तो (खिस्त) मला पाहिजे,' असे मोठ्याने बोलत होते. त्यांची चर्या गंभीर होती व नेत्र झाकलेले होते. यांना जर आपण जागा दिल्ही नाही, तर देवाच्या कृपेस व्यर्थ जाऊ दिल्याप्रमाणे होईल. तरी माझ्या स्वप्नाचा विचार करा व देवाची प्रार्थना करा.

१४४४ (१९ : २४, १५ डिसेंबर ६०, ३७८–३८२)

मादागास्कर बेटात बहुत लोक ख्रिस्ती झाले. परंतु तेथील राणी राणावालो मंजका ही मात्र सातत्याने त्यांचा छळ व पाठलाग करते आहे. ख्रिस्ती लोकांना ठार मारण्याचे ठराव जाहीर सभेत झाला. अनेकांना धोंडे मारून कुत्र्यांसमोर व बारूडांसमोर टाकले. बाधकांना बेड्या घालून बंद केले. पायांना साखळदंड घालून मुद्दाम रविवार–बाजारातून फिरवीत नेतात. आजाऱ्यांना औषध नाही. निवारा नसल्यामुळे अनेकांना रानोमाळ पळत व लपत फिरावे लागते. असे दुःख ख्रिस्ती लोक १८ वर्षे भोगीत आहेत. राहारो नावाचा तीस हजारी मनसबदार मात्र त्यांना अनुकूल झाला आहे. राणीने आपला पुत्र राकोतोंदरादोमाव, दत्तपुत्र रांबो असलामा, यांची चमत्कारिक रीत्या परीक्षा घेऊन राकोतोंदास वारस जाहीर केले. दोघांना बंद ग्लास उचलण्यास लावले. राकोच्या पेल्यात रत्न निघाले, तर रांबोच्या पेल्यात माती निघाली. ती मृत राजाच्या कबरेतील होती. आता राकोच राजा होईल. तो ख्रिस्ताचा चाहता असून मूर्तिपूजेचा तिरस्कार करतो. राहारोनेही आपली निष्ठा त्याच्याकडे आहे, असे जाहीर केले. दत्तपुत्र रांबोने राकोला राज्याचा निर्विवाद स्वामी मानले. राजधानी आंतानानारिवो येथे ४ दिवस मोठा उत्साह झाला. आता तेथे ख्रिस्ती लोकांना चांगले दिवस येतील.

१४४५ (१९ : २४, १५ डिसेंबर ६०, ३८२–३८४)

चिनी लोकांनी विश्वासघाताने अनेक कैद्यांना ठार मारले. यास बादशहाची अनुमती होती, असे म्हणतात. कैद्यांच्या हातामध्ये घट्ट चामोटे बांधले. कित्येकांची डोकी उडविली. म्हणून इंग्रजांनी राजाचे दोन वाडे जाळले. चिनी सैन्यावर हल्ला करून त्यांचा पराभव केला. राजास या अघोरी कृत्याबद्दल १६ लाख ६६ हजार ६६६ रुपये दंड केला. शिवाय लढाईच्या खर्चाबद्दल त्याजकडून दोन कोटी ६६ लाख ६६ हजार ६६६ रुपये घ्यावयाचे असेही ठरले. राजाने या तहावर सही केली. पण त्यास संतोष वाटला नाही, असे दिसते. हा करार मोडल्यास त्याला याहून जबर शिक्षा होईल. पेकिनच्या दरवाजावर चिन्यांऐवजी इंग्लिशांचा सक्त पहारा आहे.

१४४६ (१९ : २४, १५ डिसेंबर ६०, ३८२–३८४)

चीनमधून गेल्या वर्षी ३४,३७५ खंडी चहा व ७५ हजार रेशमी गठ्ठे विलायतेस व अमेरिकेस रवाना झाले.

१४४७ (१९ : २४, १५ डिसेंबर ६०, ३८२–३८४)

कराचे तक्ते छापण्यास सरकारास २२ लाखांचा खर्च आला.

१४४८ (१९ : २४, १५ डिसेंबर ६०, ३८२–३८४)

सन १८५९ मध्ये ब्रिटिशांना हिंदुस्थानकरिता ५९ कोटींचे कर्ज झाले होते. ते आता ९७ कोटींवर गेले आहे. वसूल जमा करण्यासाठी ७ कोटी रुपये लागतात.

१४४९ (१९ : २४, १५ डिसेंबर ६०, ३८२–३८४)

नोव्हेंबर १८६० च्या तिसऱ्या आठवड्यात मुंबईत २१३ मनुष्ये मरण पावली.

**१४५०** (१९ : २४, १५ दिसेंबर ६०, ३८३)

पेकिन हे जगातील सर्वांत दाट वस्तीचे शहर समजावे लागेल. शहरात झाडी फार आहे. त्यामुळे दुरून ते बरोबर दिसत नाही. हे शहर फार विस्तीर्ण आहे. बहुतेक घरे एकमजली आहेत. ती सुंदर नसल्यामुळे शहर कंगाल व मोडकळीस आल्यासारखे दिसते. सरकारी इमारती मात्र प्रशस्त असून त्यांवर चकचकीत हिरवी-पिवळी कौले आहेत. रस्ते नीट व रुंद आहेत. रस्त्यांवर फरसबंदी किंवा मुरूम नसल्यामुळे गाड्यांच्या चकाऱ्या सर्व रस्त्यांवर उमटतात. उन्हाळ्यात फुंफाटा व पावसाळ्यात चिखल, अशी स्थिती असते. पेकिन या शहराचे तार्तार व चिनी असे दोन भाग आहेत. तार्तारचा घेर ६ मैल व क्षेत्रफळ १२ मैल आहे. चिनी विभागाचे क्षेत्रफळ १५ मैल आहे. लोकवस्ती २० लाख आहे. प्राचीन सादोम लोकांप्रमाणे ते दुराचरणी वाटतात.

**१४५१** (१९ : २४, १५ दिसेंबर ६०, ३८४)

ज्यानेवारीच्या १ तारखेपासून वर्तमानपत्रांना आपले टपाल हशील आगाऊ भरावे लागेल. तरी ज्ञानोदयच्या वर्गणीदारांनी आपली वर्गणी दीड रुपया आगाऊ पाठवून द्यावी. एत्तद्देशीय वर्गणीदारांनी तीन रुपये, तर डाकमार्गे ज्ञानोदय घेणाऱ्या साहेबलोकांनी ४॥ रुपये पाठवावेत.

**१४५१ अ** (इंम : ३६४)

मुंबई, एक्सचेंज प्रेस, फोर्ट

**१४७२** (२० : १, १ ज्यान्युएरी ६१, ३–५)

ज्ञानोदय पुस्तक विसावे, याच्या प्रारंभास संपादक लिहितात : १८६० या वर्षात बहुत अगत्याच्या गोष्टी घडल्या. युरोपात जुलमी राजास पदच्युत करून प्रजेस आता आपले हक्क व अधिकार मिळाले. इताली देशात आता आपले हक्क व अधिकार मिळाले. इताली देशात सर्वत्रांस एकसारिखे हक्क व मोकळीक देणारे असे राज्य स्थापिले. चीन देशाचा बादशहा इंग्लिश सरकारास लिहून दिलेल्या कराराप्रमाणे वर्तणूक करीना. म्हणून इंग्लिश व फ्रेंच यांची सैन्ये एकत्र होऊन त्यांनी चीनचा पराभव केला. पेकिन शहर जिंकले. शेवटी चीनच्या बादशहाने तहनाम्यावर सह्या केल्या. हिंदुस्थानमध्येही आजपर्यंत सरकारास जे कर्ज झाले, ते फिटावे, या उद्देशाने वसुलासंबंधी नव्या तजविजी सुरू केल्या. प्राप्तीवरील कराप्रकरणी कायदा पसार होऊन सुरूही झाला आहे. या देशात इंग्लिश सरकारचा अंमल पुन्हा पक्का झाला आहे. बंड मोडून शेवटच्या ठिणग्यादेखील विझून गेल्या. गतवर्षी हिंदुस्थानात ख्रिस्ती धर्माची जी वृद्धि झाली, ती पाहून फार आनंद वाटतो. निरनिराळ्या मिशनाच्या संबंधातील ख्रिस्ती मंडळ्यांत पूर्वीच्या वर्षी मिळाली नव्हती, तितकी अधिक मनुष्ये मिळाली. जे नवे वर्ष लागले, त्यात याहून मोठाल्या व अगत्याच्या गोष्टी ईश्वराने आमच्या दृष्टीस पाडाव्या.

**१४७२ अ** (इंग्र : १–२)

१४८३ (२० : १, १ ज्यान्युएरी ६१, ६–७)

काही कुभांडी लोक बुध्या प्राप्तीवरील कराचा भलताच अर्थ भासवीत आहेत. पण सरकारने कराच्या तत्त्वांचे सोपे फर्मे तयार केले आहेत. २०० रुपयांपर्यंत कर माफ आहे. ज्यांची प्राप्ती सालीना २०० रुपयांहून जास्त आहे, त्यांना शेकडा २ व ५०० रुपयांहून जास्त मिळकत असणारांना शेकडा ४ कर आहे. यांपैकी एक रुपया सरकार रस्ते व तलाव यांसारख्या रयतेच्या उपयुक्त कामांकडे खर्च करील. हा कर फक्त पाच वर्षे राहील. जे लोक शेकडा ५ प्रमाणे कर देतील, त्यांच्या व्यवहाराची चौकशी सरकार करणार नाही. लोकांनी स्पेश्याल कामदाराकडून कर ठरवून घ्यावा. शिवाय त्यांचे प्राप्तीचे तर्क अगदी गुप्त राहातील. अपिलाचीही सोय आहे. दगाबाजी करून मूर्ख वर्तणूक करणारांचे मात्र नुकसान होईल. लोकांच्या प्रामाणिकपणावर शक्य तितका इतबार ठेवलेला आहे. संशय येईल, अशी वर्तणूक कोणीही करू नये. पूर्वी बंडवाल्यांनी फार विध्वंस केला. म्हणून हा कर बसविणे भाग आहे. पेंढारी लोकांनीही फार प्रलय केला होता. सरकारने उपाय केले नसते, तर भयंकर दुर्दशा झाली असती. मोठमोठ्या मातबर इमारती व वाडे बंडवाल्यांनी पाडून त्यांचा नाश केला. त्यांचा बीमोड करण्यासाठी सरकारला बेसुमार द्रव्य खर्चावे लागले आहे. लोकांनी आपल्या कमाईचा फारच थोडा भाग फक्त पाच वर्षेच सरकारास द्यावयाचा आहे व ही काही भारी गोष्ट नव्हे.

१४८३ अ (ईप : ५–६)

१४७४ (२० : १, १ ज्यान्युएरी ६१, ८)

अहमदनगर मिशनाचे काम फार चांगल्या रीतीने चालले आहे. गेल्या नवेंबर महिन्यात कैंदळ आणि बांबोरी या दोन ठिकाणी मिशनांची स्थापना झाली. या दोन्ही मंडळी रे. आबट यांच्या देखरेखीखाली आहेत. दिसेंबरात तुकाईचे शिंगवे, या गावी मिशन स्थापन झाली. तेथे रे. फेरबांक मुख्य आहेत. वाडगाव आणि सातळ गावची मिशन रे. बारकर यांच्या देखरेखीखाली आहेत. आता नगर मिशनच्या १६ मंडळ्या झाल्या. एकंदर ख्रिस्ती माणसे ५०० असून ३०० हून अधिक लेकरांचा बाप्तिस्मा झाला. या मिशनाचा १८६० सालचा वार्षिक रपोट लवकरच छापला जाईल.

१४७४ अ (इंम : ७–८)

१४७५ (२० : १, १ ज्यान्युएरी ६१, ८–९)

लार्ड मकाले या विद्वानाचे नाव बहुतेक इंग्रजी शिकलेल्या लोकांना ठाऊक आहे. एक वर्षामागे तो मरण पावला. त्याने लिहिलेला इंग्लंड देशाचा इतिहास विलायतेतील शाळांत शिकविला जात आहे. पण हा साहेब निःशास्त्रवादी होता. कोणतेच धर्मशास्त्र तो मानीत नसे. पण त्याचे हे नास्तिक मत पालटण्यास त्याचा मित्र लार्ड शाफ्तसबरी कारणीभूत झाला. मकाले आपल्या मित्रांना फार मान देत असे. एकदा शाफ्तसबरीने शुभवर्तमानाची एक सुंदर प्रत त्याला भेट दिल्ही. बरोबर एक प्रीतियुक्त पत्रही पाठविले. येशूच्या प्रिय शिष्याने म्हणजे योहानाने लिहिलेला वृत्तांत वाचण्यास कसेही करून दोन तास घालवा, अशी त्यात विनंती होती. इतक्या सभ्यतेने आणि आदराने केलेली ही विनंती मकालेने ऐकली व त्याचे मत पालटले. तो येशू ख्रिस्ताचा प्रेषित योहान याच्या अत्युत्तम व बालबोध गोष्टी खऱ्या मानीत असे.

१४९६ (२० : १, १ ज्यान्युएरी ६१, ९–११)

रा. स. ना. क. र. लिहितात : ईश्वराच्या आज्ञा पाळणाऱ्या मनुष्यास समाधान मिळेल. उलट ढोंग करणारांस नरकवासच भोगावा लागतो. रहिमतपूरचे बाबुराव सातपुते यांच्या बायकोचे पाय झडत होते. म्हणून त्यांनी १०–११ वर्षे खातगुणच्या पिराची भक्ती केली. पीर बाबूरावांशी बोलतो, अशा अफवा सुरू झाल्या. खातगुणाहून तो पीर बाबूरावच्या घरी येणार, असे त्याला स्वप्न पडले. एक दिवस मध्यरात्री दीपाचा लकलकाट होऊन पीर रहिमतपुरात आला. शेकडो लोक त्याच्या दर्शनास येऊ लागले. हा बाबूराव त्यांना उदी देई. बकऱ्याऐवजी नारळ व पेढे घेई, कारण तो ब्राह्मण असल्यामुळे हिंसा वर्ज्य होती. भोवतालच्या ४०–५० गावांत त्याची फार कीर्ती झाली. पुढे त्याने सरकारवाडा ४५० रुपयांस विकत घेतला आणि काही चमत्कार होऊन पीर तेथेही आला! हैद्राबादचा एक राजंभटही असाच तुरबतीचा पीर होऊन बसला आहे. तो नवसाला पावतो. लावंड गावच्या एका बाईनेही पीर आपल्या गावी नेला आहे. असल्या अज्ञानास लुब्ध होणे, हे पतनाचे कारण आहे. निराकार परमेश्वरास भजणेच उत्तम होय. ब्राह्मण लोक पीराची भक्ती करून दीन–दीन ओरडतात. यामुळे त्यांचा धर्म भ्रष्ट होत नाही काय? चोरांच्या मंडळीत तस्कराचा अपमान होत नसतो. त्यापेक्षा एकमेव अशा जगत्पित्याच्या ठायी लक्ष लावून अक्षय सुखाचा अनुभव घ्यावा.

१४५७ (२० : १, १ ज्यान्युएरी ६१, ११–१३)

'एक प्रातस्तंन' लिहितो की : युरोपाहून येणाऱ्या बातम्या असे दर्शवितात की, रोमन कॅथॉलिकांचा पापा जो पोप, त्याच्या पापाचा घडा भरत आला आहे. ग्यारिबाल्दीने अनेक देशांना सामराज्याचा लाभ करून दिला आणि तो रोमवर हल्ला करणार आहे. म्हणून हा साठी बुध नारीचा राजयोगी आचार्य घाबरला. त्याने मोलाचे शिपायी आणून पलटणी केल्या. पण काही उपयोग झाला नाही. आस्त्रिया व स्पेन देश कॅथॉलिक असूनही त्याला मदत करण्यास तयार नाहीत. फ्रान्सने तर त्याला उपदेश केला की, आता अधिकाराचा लोभ सोडा. कशीबशी एक फौज मात्र त्याच्या मदतीकरिता पाठविली. गारिबाल्दीचे सैन्य रोमवर हल्ला करण्याचेश तयारीत आहे. हा एवढा योगी असून त्याला जगिक वैभवाचा मोह आहे. त्याचे अनुयायी तर सांगतात की, त्याला अमानवी साह्य होते. मराठ्यांचा राजा संभाजी हा म्हणे झाव्यराच्या प्रेतासमोर गवर्नरने प्रार्थना केली तेव्हा गोव्यातून निघून गेला. इंग्रज सैन्य गोव्यावर चालून आले, तर झाव्यराने छडीने त्यांना मारले. मग झाव्यराचे प्रेतच रोम शहरात न्यावे. म्हणजे सर्व संकटे पळून जातील. सारांश काय, तर प्रेत कधी चमत्कार करीत नसते. झाव्यराचे केस आणि दात कोणाला वाचवू शकत नाहीत. मसालाभरित प्रेत जर चमत्कार करीत असते, तर युरोपियन देशाकडे दात विचकून साहाय्य मागण्याची काय गरज होती ? म्हणून ही सर्व थोतांडे सोडून प्रभू येशूवर विश्वास ठेवावा व पवित्र शास्त्राप्रमाणे चालावे.

१४५८ (२० : १, १ ज्यान्युएरी ६१, १३–१४)

चीनच्या बादशहाने तहाच्या करारनाम्यावर सही करून तो पेकिनमध्ये जाहीर केला. लार्ड एल्गिन यांनी पेकिनमधील सैन्य काढून घेतले. चीनची लढाई विझून गेली. चिनी बंडवाले शांघाय वगैरे ठिकाणावर हल्ले करणार आहेत. इंग्रज–फ्रेंचांचे चार हजार सैनिक चीनमध्ये आहेत.

१४५९ (२० : १, १ ज्यान्युएरी ६१, १३–१४)

प्रिन्स आफ वेल्स अमेरिकेहून स्वदेशी सुखरूप परत आले. अटलांटिक महासागरावर प्रतिकूल वारे सुटल्याने त्याला परत येण्यास विलंब झाला.

१४६० (२० : १, १ ज्यान्युएरी ६१, १३–१४)

एका मराठी वृत्तपत्राने लिहिले की : 'नानाविषयीचे वर्तमान म्हणजे नानाच आहे !' आणि हे खरे आहे. नाना मेल्याची बातमी पूर्वी आली होती. आता बंगालचा एक लष्करी अधिकारी सांगतो की, नाना जिवंत आहे. यात खरे काय ? तरीही सरकारने सावध राहून अफवा उठविणारांना शिक्षा करावी.

१४६१ (२० : १, १ ज्यान्युएरी ६१, १३–१४)

फ्रान्सची राणी हवापालट करण्यासाठी स्काटलंड देशामध्ये गेली, तर आस्त्रियाची राणी मदीरा बेटाकडे गेली.

१४६२ (२० : १, १ ज्यान्युएरी ६१, १३–१४)

मेंडीबाजारात आग लागून सात घरे जळून गेली.

१४६३ (२० : १, १ ज्यान्युएरी ६१, १३–१४)

कायदेमंडळाने हिंदुस्थान सरकारच्या १८६०-६१ च्या अंदाजपत्रकाची तपासणी केली. टिपूच्या वंशजांना सालीना ५० लक्ष रुपये कसे दिले जातात, याची चौकशी चालू आहे.

१४६४ (२० : १, १ ज्यान्युएरी ६१, १३–१४)

एका मुसलमानाने सागरमध्यातील खडकावरच्या पीरास नवस केला होता. म्हणून तो पोहत तिकडे गेला, पण बुडून मेला.

१४६५ (२० : १, १ ज्यान्युएरी ६१, १५–१६)

वायव्य प्रांतात दुष्काळ पडला असून अन्नान्नदशा झाली आहे. लेफ्टनंट गवरनर ही दुरवस्था दूर करण्याचा प्रयत्न करीत आहे.

१४६६ (२० : १, १ ज्यान्युएरी ६१, १५–१६)

मुंबईचे व्यापारी लोक पुन्हा पूर्वीप्रमाणे व्यापार करू लागले.

१४६७ (२० : १, १ ज्यान्युएरी ६१, १५–१६)

सर विलियम देनिसन मद्रासचे गवरनर झाले.

१४६८ (२० : १, १ ज्यान्युएरी ६१, १५–१६)

सन १८५९ मध्ये निर्यातीपेक्षा १९ कोटी २३ लाख रतल कापसाची वस्त्रे जादा आयात झाली. याखेरीज लोखंड, लाकूड व लोकर यांची आयात झाल्यामुळे हिंदुस्थानचा हजारो रुपयांचा तोटा होतो. म्हणून यंत्राने उत्पादन करण्याचे कारखाने वाढले पाहिजेत.

१४६९ (२० : १, १ ज्यान्युएरी ६१, १५–१६)

आर्मस्त्रांग तोफेपेक्षाही प्रभावी तोफ विलायतेत तयार झाली.

१४७० (२० : १, १ ज्यान्युएरी ६१, १५–१६)

अमेरिकेत वाफेच्या योगाने वाद्यांच्या पेट्या वाजविण्याची युक्ती निघाली आहे. आता बोटीवरही वाद्याचा सुरस आणि उच्च शब्द ऐकून प्रवाश्यांना आल्हाद वाटतो.

१४७१ (२० : १, १ ज्यान्युएरी ६१, १५–१६)

काही वैद्यांनी जाहीर केले की : कोळशाच्या बुकणीने दात घासले, तर दातांना विकार होतो. मिठाने मात्र अपाय होत नाही.

१४७२ (२० : १, १ ज्यान्युएरी ६१, १५–१६)

नेहमी विचारमग्न असणारा माणूस कृश होतो, तर हसणारा मात्र निरोगी असतो, अशी समजूत आहे. पण हसण्यामुळे ज्ञानरज्जू निखळून जातात. चरबी वाढून अकालमृत्यू येतो. तरी लोकांनी बागोबहार, शुकबहात्तरी यांसारखी पुस्तके वाचणे सोडून द्यावे. विद्या, कला, नीति, धर्म, यांवरची गहन व लाभदायक पुस्तके वाचीत राहावे. विचार करण्यात वेळ घालवा, ईश्वराचे स्मरण करावे.

१४७३ (२० : १, १ ज्यान्युएरी ६१, १६)

इकडील (मुंबई इलाख्यातील) लोक प्राप्तीवरील कर देण्यास रडतात, तसे उत्तर किंवा वायव्येकडचे लोक रडत नाहीत. ते कुरकूर न करता सरकारी फर्मे समजावून घेतात. १८५७ चे बंड किती भयंकर आणि नाशकारक होते, याची त्यांना चांगली जाणीव आहे. सरकारने किती मेहनत करून अनेक जीव गमावून बंडाचा नाश केला, हे त्यांना बरोबर समजते. ते आनंदाने कर देतात. वायव्येकडे अनेकांच्या बायकापोरांना बंडवाल्यांनी ठार मारले, तसे इकडे काही झाले नाही. हिंदु–मुसलमान राजे प्रजेस मारहाण करीत असत. इंग्रज सरकार मात्र रयतेशी सहनशीलतेने वागते. त्यांच्या अर्ज्या ऐकून ठराव बदलते. म्हणूनच या लोकांस असले ढंग सुचतात. अशा गुणाचे लोक जर काही ऐकत नसले, तर त्यांस थोडीबहुत शिक्षा करावयास हवी.

मुंबई, एक्सचेंज प्रेस, फोर्ट

**१४७४** (२० : २, १५ ज्यान्यूएरी ६१, १८–२०)

१८६० हे योबेल (ज्युबिली) वर्ष असल्यामुळे बास्टन येथे बोर्डाची सभा भरली. ३५०० लोक हजर होते. डा. हाफकिन्स यांनी दीड तास उपदेश केला. मिशनाने १२५७ उपदेशक रानटी देशांमध्ये पाठविले. १६२ खिस्ती मंडळ्यांत वीस हजार खिस्ती लोक आहेत. १ लाख ७५ हजार विद्यार्थी शिकले. १ अब्ज ५० कोटी पानांचे ग्रंथ मिशनांनी छापले. सांदविच आणि चेरोकी बेटांत अज्ञानाचा नाश होऊन व्यवस्थित व नियमानुसार सर्कारे स्थापन झाली. ईश्वरास भिऊन कायदे केले जातात. बोर्डाचा खर्च ७॥ लाखांवरून आठ लाखांवर नेण्यास सर्वांची एकमुखी संमती मिळाली. दूर दूरचे देश मिशनरी पाठवून सभेचा वृत्तांत आस्थापूर्वक मिळवतात. तुर्कस्थान, इराण व दक्षिण अफ्रिका, येथील उपदेशक हजर होते. तुर्कस्थानातील अज्ञानदशा कमी झाली. १८१० मध्ये एका लहानशा घरात अमेरिकन बोर्ड सुरू झाले. दरसाल निदान ११०० लोक तरी खिस्ती धर्म स्वीकारतात. १८१३ मध्ये नाट्ट व हाल हे दोन मिशनरी प्रथम मुंबईस आले. त्या दोघांना प्रकृती बिघडल्यामुळे परत जावे लागले. ही कल्याणकारक मंडळी विश्वास व प्रीती धरून कार्य करीत आहे.

**१४७४ अ** (इंग : १७–१८)

१४७८ (२० : २, १५ ज्यान्युएरी ६१, २२–२५)

ज्यापान : रे. ग्रीन लिहितात की, ज्यापान हा देश फारच रमणीय आहे. अगदी इंग्लंडप्रमाणे वाटतो. एथील हवापाणी फार चांगली व हितकर आहे. येथील बादशहा आपल्या रयतेस फार पिडतो. परदेशी लोकांवर त्याची करडी नजर असते. मिशनऱ्यांच्या घरावर चौक्या आणि पहारे आहेत. त्यातून फायदा एवढाच की, चोर–दरवडेखोरांपासून संरक्षण होते. वास्तविक हे राजकीय संबंधांना बाधा आणणारे कृत्य आहे. परंतु अमेरिकन सरकार हे पहारे उठविण्याकरिता प्रयत्न करणार आहेच. जपानी लोक मित्रत्वाने वागतात. पण ते जबरदस्ती व जुलूम यांच्या प्रभावाखाली आहेत. हे लोक आनंदी, शोधक, विचारवान व व्यासंगी आहेत. चिनी लिपीत छापलेला नवा करार इकडे मिळतो. इकडे अर्ध्या जमिनीतच धान्याची लागवड होते. बाकी सर्व अरण्य आहे. बादशहा श्रीमंत आहे, तर लोक आळशी आहेत. राजाचे आश्रित अगदी निरुद्योगी आहेत. राजकुळातल्या लोकांची रहाणी साधी आहे. एक जपानी पंडित सध्या शास्त्राचा अभ्यास करतो. त्याला पवित्र शास्त्राची फारच गोडी वाटते. यद्दो शहरात जपान्यांनी रोमन कॅथालिक लोकांचा पाठलाग करून १०० कुटुंबांचा घात केला. आजही पुष्कळ कॅथॉलिक तिकडे भेटतात. त्यांच्या मनात गोंधळ असून विचारात फार चुक्या आढळतात. काही जुनाट फलकावर कॅथालिकास पकडून देणारास ४०० ते ६०० रुपये इनाम देण्यात येईल, असा उल्लेख आढळतो.

१४७८ अ (इंम : २०–२२)

१४७६ (२० : २, १५ जान्युएरी ६१, २५-२६)

कसल्याही सापाचे विष लिकर अमोनियामुळे खात्रीने उतरते. रत्नागिरी जिल्ह्यात बेसुमार विषारी साप आहेत. सरकारने तीन वर्षांत ३० हजार ६५० रुपये खर्च करून लोकांना बक्षिसे वाटली. जन्मेजयाच्या सर्पसत्रापेक्षा सर्पांचा मोठा संहार इकडे झाला आहे. रत्नागिरीचे अधिकारी कांबळे यांनी लिकर अमोनियाच्या कुप्या आणल्या. त्याने अनेकांना गुण आला. मृत्यूचे प्रमाण फार खाली आहे. फुरशासारख्या जहालिम सापाचे विषसुद्धा या औषधाने उतरते. फुरसे चावले की, अंग सुजते. नाक-कान-डोळ्यांतून फार रक्त वाहाते. १५-२० दिवसांनी तो माणूस मरतो. लिकर अमोनियाने ४०० माणसे बरी झाली आणि खर्च फक्त २२॥ रुपये आला. तीस हजार खर्चूनही हे काम झाले नव्हते. यंदा १ हजार कुप्या खपल्या आहेत. ८०० गावांच्या लोकांनी या औषधासाठी अर्ज केले. केमिस्ट वगैरे विक्रेत्याकडे ते औषध मिळते. एका कुपीस ६-७ आणे पडतात. लोकांनी हा उपाय करून आपला फायदा करून घ्यावा.

१४७७ (२० : २, १५ ज्यान्यूएरी ६१, २६–२९)

रा. जनार्दन रामचंद्रजी यांनी बरेच शोध व परिश्रम करून 'कविचरित्र' हे पुस्तक छापले. रा. भाऊ दाजींस ते नजर केले. कारण मयत बाळ गंगाधर यांचेनंतर एवढा विद्वान व परिशोधक माणूस झाला नाही. लेखकाचा नित्याचा व्यवसाय व विद्या पाहाता फार आश्चर्य वाटते. कांकी, १००–२०० रुपये पगार घेणारे तरुण न्यूसपेपरपलिकडे वाचन करीत नाहीत. समुद्रफेण किंवा माखग माशांप्रमाणे पुस्तकाची गोडी आहे. त्यातून काळा रस निघाला, तर तो माशाचा दोष नाही. मासा धुऊन घ्यावा, त्याप्रमाणे लेखकाने परिशीलन केले. मिथ्या गोष्टी टाकून योग्य ते ग्रहण करावे. संस्कृत, प्राकृत, तामिळ व तेलंगी, अशा १७० कवींची त्यात माहिती आहे. काळ्या मेघाच्छादित आकाशामध्ये १-२ चांदण्या चमकाव्या, त्याप्रमाणे एक दोन स्त्रियाही त्यात सापडतात. पूर्वीचे लोक विचारशील व विद्याव्यासंगी होते. ज्ञानहीनत्व किंवा पशुतुल्यत्व हा डाग त्यांनी कमी केला. त्यातील काही अमानुष किंवा अद्‌भुत चमत्कारही करीत, असे म्हटले जाते. पण राम मोहनराय काही अलौकिक नव्हता. महीपतीने भगवंताच्या प्रेरणेने ग्रंथ लिहिले, यास पुरावा मिळत नाही. रामानुज व वल्लभाचार्य तर एकमेकांना खोटे व पाखंडी म्हणत. म्हणून वाचकांनीच सारासार विचार करावा. चालीप्रमाणे हे सांगायला हवे की, पुस्तकाची बांधणी सुंदर आहे. पृष्ठे २४५ व किंमत फक्त दोन रुपये आहे. 'कविचरित्र म्हणजे हिंदुस्थानातील प्राचीन व अर्वाचीन कवि आणि ग्रंथकारक यांचा इतिहास' (प्रभोदयवरून.)

१४७८ (२० : २, १५ ज्यान्यूएरी ६१, २९–३०)

गारिबाल्दीने जिंकलेला प्रदेश सार्दिन्याच्या बादशहाच्या स्वाधीन केला व तो शेतीच्या कामासाठी निघून गेला. ईश्वर त्यास या स्तुत्य व परोपकारी कामात विजयी करो !

**१४७९** (२० : २, १५ ज्यान्युएरी ६१, २९–३०)

सीरिया देशातील दंगा थांबला आहे. तुर्की सरकारने २०० जणांना फाशी तर चारशेंना जन्मठेप सुनावली. पण सहस्रावधी स्त्रिया विधवा झाल्या, बालके पोरकी झाली, अन्नवस्त्रास मोताद झाली. त्यांची दुर्दशा पाहून जगातले परोपकारिक लोक मदत पाठवीत आहेत.

**१४८०** (२० : २, १५ ज्यान्यूएरी ६१, २९–३०)

दत्तियाच्या राणीने १८५७ मध्ये इंग्रजांना मदत केली, म्हणून वैसराय लॉर्ड कानिंग यांनी तिला ५ हजार रुपये किंमतीचा खिलात दिल्हा.

**१४८१** (२० : २, १५ ज्यान्यूएरी ६१, २९–३०)

निजामाने इंग्रजांना मदत केली, म्हणून त्यास दक्षिण गोदावरी प्रांत देणार आहेत. उत्तर गोदावरी पुन्हा इंग्रजांकडे येणार आहे. औरंगाबाद, वऱ्हाड, येथील लोकांची जुलमातून सुटका होईल. बालके ज्ञानी होतील. मिशनरी तेथे शुभवर्तमान गाजवितील.

**१४८२** (२० : २, १५ ज्यान्यूएरी ६१, २९–३०)

सन १८५९ सालामध्ये तिगस्तापेक्षा ७ लाख ५ हजार ७५९ रुपये जमीन व मालमत्ता– कर जास्त वसूल झाला. गेल्यावर्षी ३५,२०० रुपये जास्त मिळाले.

**१४८३** (२० : ३, १५ ज्यान्यूएरी ६१, २९–३०)

जे लोक प्राप्तिकराचे फर्मे मागून नेणार नाहीत, त्यांना शिक्षा होईल, असे सरकारने जाहीर केले. आतापर्यंत ३५ हजार फर्मे गेलेले आहेत. आणखी एक लक्ष तरी फर्मे लागतील. कर-वसुलीचे काम लवकरच सुरू होईल.

**१४८४** (२० : २, १५ ज्यान्यूएरी ६१, ३१–३२)

कार्तिकाच्या वद्य पक्षात गुजराती ब्राह्मण जातीत पुनर्विवाह झाला. काही सारस्वत ब्राह्मणांनी त्याला साहाय्य केले.

**१४८५** (२० : २, १५ ज्यान्यूएरी ६१, ३१–३२)

प्राप्तीवरील कराचे लष्करासाठी वेगळे दर आहेत. ज्यांचे उत्पन्न सालीना ४१५ रुपये सहा आणे आहे, त्यांना मात्र कर आहे. त्यापेक्षा कमी वेतनावर कर नाही. बंड मोडून काढण्यात साहाय्य केल्यामुळेही सवलत दिली आहे.

**१४८६** (२० : २, १५ ज्यान्यूएरी ६१, ३१–३२)

देक्कन हेरल्ड हे इंग्रजी अर्धसाप्ताहिक पुण्यात सुरू होत आहे.

**१४८७** (२० : २, १५ ज्यान्यूएरी ६१, ३१–३२)

डीसा ते सिंध लोखंडी रस्ता मारवाडमार्गे तयार होईल.

**१४८८** (२० : २, १५ ज्यान्यूएरी ६१, ३१–३२)

अमेरिकेत गेल्या ९ वर्षांत २०,५८९ मैलांचा जादा लोखंडी रस्ता तयार झाला. वेगवेगळ्या कंपन्यांच्या स्पर्धेतून हे रस्ते तयार होतात. त्यातून जुन्या भांडवलदारांचे नुकसान होते. २८ हजार मैल सडक तयार असून १६ हजार मैलांनी जादा सडक तयार होईल. त्यासाठी ८० कोटींचा खर्च होईल. प्रजा शे. ४६·२२ टक्के वाढते, तर लोखंडी रस्ता शेकडा १२०१·४१ प्रमाणे वाढतो ! दक्षिणेकडे रोकडारोकड काम चालते. म्हणून खर्चसुद्धा कमी येत असतो. उत्तरेकडे ७२ हजार, तर दक्षिणेकडे ४५ हजार रुपये दर मैलास लागतात. सध्या या कंपन्यांना एकुण ८२ कोटी २४ लाखांचे कर्ज आहे.

१४८९ (२० : २, १५ ज्यान्युएरी ६१, ३१–३२)

कलकत्त्यात एकाने चुन्याचा दिवा तयार केला. त्याचा प्रकाश सूर्यकिरणांप्रमाणे आहे.

१४९० (२० : २, १५ ज्यान्युएरी ६१, ३१–३२)

अमेरिकेत यंत्राने गाईचो धार काढण्याचा शोध लागला आहे. यंत्र कासेस जोडून तुमडीप्रमाणे धार काढतात. गाईच्या कासेला रग लागत नाही आणि त्यात हातांचा मळही जात नाही. शिवाय धार काढण्याचा वेग तिपटीने वाढतो.

मुंबई, एक्सचेंज प्रेस, फोर्ट

## ज्ञानोदय, पुस्तक २०, अंक ३, मुंबई, १ फेब्रुवारी, १८६१

**१४९१** (२० : ३, १ फेब्रुवारी ६१, ३५–४०)

'हरी रामचंद्र' लिहितात की : धर्मोपदेशकाच्या कामाकरिता येथे आल्यावर सातारकरांनी घर मिळू दिले नाही. भुताटकीच्या वाड्यात राहावे लागले. पाण्याच्या बाबतीतही अडवणूक झाली. सार्वजनिक आडावर पाणी भरू देत नाहीत. आमची कामे करणाऱ्या गड्यास व न्हाव्यासही जातिवाळ करतात. एका मुसलमानाने पाणी भरू दिल्हे, तर त्यास अद्वातद्वा बोलून फितविले. पोलिसही नेटिवांच्या बाजूने बोलतात. म्युनिसिपल कमेटीकडे तक्रार केली, तर त्यांनी जास्तच कडक शब्दांत पाणी न भरण्याची ताकीद दिल्ही. सर्व लोकांसमक्ष हुकूम सांगितला. शेवटी हुजूर डेपुटी माजिस्त्रेटाकडे अर्ज दिल्हा. त्यांनी मात्र कमेटीचा हुकूम आपल्या अधिकारात रद्द केला. सार्वजनिक ठिकाणी पाणी भरण्याचा खिस्ती नेटिव लोकांचा हक्क बिनशर्त मान्य केला. तशी सूचना फौजदारामार्फत पोलिसांनाही दिली. आता असे झाले आहे की, ज्या हौदातून पाणी घ्यावे, तो तो हौद लोक टाकून देतात. नगरप्रमाणेच वापर कमी होऊन हौदामधले पाणी खराब होऊ लागले आहे. तरीही पाणी घेण्याचा हक्क मान्य झाला, हे ईश्वरी सूत्राने घडलेले कल्याणकारक काम होय. पाणी घेण्याचा जन्मसिद्ध हक्क आणि वहिवाट न्यायाधीशाने कबूल केली, हे फार चांगले झाले. लोकांनीही पोकळ हट्ट टाकून द्यावा. सातारा उजाड करण्याच्या गप्पा मारू नयेत. पूर्वी ब्राह्मणांनी हिंदू राजांना नाचविले. आता त्यांच्या कांगाव्याला सरकार भिणार नाही.

**१४९१ अ** (इंम : ३३–३५)

**१४९२** (२० ३: १ फेब्रुएरी ६१, ४०–४५)

'एक सातारकर' लिहितात की : या गावात बाटाची अनुपम्य विलक्षण शक्ती दिसते. ख्रिस्ती उपदेशकाच्या गड्याने जेथे पाणी भरले, त्या हौदाच्या पाण्याने चूळ भरणारास ब्राह्मणांनी मोठे प्रायश्चित्त दिल्हे. त्याच्या न्हाव्यासही मोठा गंडा बसला. बाटाचा विद्युल्लता-धर्म जणू काही गड्याच्या घागरीतून माणसाच्या अंगामध्ये गेला. सगळे हौद एकाच जमिनीने जोडलेले व एकाच हवेमध्ये आहेत, म्हणून सगळा गाव बाटला. चूळ भरणारा ब्राह्मण तर यवनापेक्षा नीच ठरून लक्षाश्रमी भिक्षुकांनी त्याला सक्षौर प्रायश्चित्त घेवविले. भटांची मात्र खूपच पोळी पिकली. तरी लोकांनी त्यांच्या नादी लागू नये. यावर संपादक म्हणतात की : या पोळी बहाद्दर ब्राह्मणांच्या बारीक पाहण्याची शर्थ आहे खरीच. सगळी जमीन व हवा विटाळली, मग ब्राह्मणही बाटले, तर त्यांनी आता वेदोच्चार करू नयेत, त्या गावात अन्नही खाऊ नये. संपूर्ण हिंदुस्थानामध्ये जमीन व हवा एकच सलग आहेत, म्हणजे सगळी देवस्थानेसुद्धा विटाळली. असल्या अघोर अज्ञानाच्या बंधनातून हे लोक केव्हा मुक्त होतील?

**१४९२ अ** (इंम : ४२–४३)

१४९३ (२० : ३, १ फेब्रुएरी ६१, ४३–४४)

गेल्या आगस्त महिन्यामध्येही पाऊस न पडल्यामुळे वायव्य इलाख्यात मोठा दुष्काळ पडला आहे. गेल्या तीन वर्षांत अशीच अनावृष्टी चालू आहे. ऑक्टोबराची शेवटची संधीही गेली. शिवाय बंडामध्ये धान्याचे साठे जाळले गेल्यामुळे धान्याचा संग्रह नाहीसा झाला. हा प्रांत उदास दिसतो. हिरवी शेते तर क्वचितच दिसतात. हजारो लोक उपासाने व भलतेच अन्न पोटात गेल्यामुळे मरण पावले. बायकापोरे अन्नान्न करीत हिंडतात. पुरुषांना मेहनतीची शक्तीही उरली नाही. गुरेढोरे रोड होऊन निरुपयोगी झाली. लोक जनावर कापून खाताहेत, पोटची पोरे विकीत आहेत. काही दिवसांनी ते लेकरांचेही मांस खातील, अशी भिती वाटते. युरोपियनांनी व नेटिवांनी ४५ हजारांचा मदतनिधी जमवला. सरकार सहा लक्ष रुपयांची दुष्काळी कामे काढणार आहे. सडका, कालवे, लोखंडी रस्ते, तयार होणार आहेत. शक्तिमान लोकांना वाटखर्च देऊन तिकडे नेण्यास सरकार तयार आहे. अशक्त लोकांना रोख पैशांचे साह्य दिले जाईल. मात्र लोकांना निरुद्योगी बनवू नये. एवढीच सूचना आहे. भिकाऱ्यांना या फंडातून मदत करू नये. दिल्लीतही मिशनरी मंडळी अन्नवस्त्रादिक वाटण्याचे काम करीत आहेत. तिकडील लोक लवकरच या दुःखापासून मुक्त होतील.

१४९४ (२० : ३, १ फेब्रुएरी ६१, ४४–४५)

बोरघाटरूपी शत्रूच्या पाठीस ३० हजार लोक लागले आहेत! मानवाच्या सुखाकरिता आणि उपभोगाकरिता त्याला वश करावयाचे आहे. या अजातशत्रूचा पराभव रेल्वे कंपनी करू शकेल, असे कोणासही वाटले नव्हते. परंतु कंपनीने कुशलतेने व श्रमाने मोठा पराक्रम केला. या प्रचंड आणि प्रखर शत्रूला लंगोट्या व इजारवाल्या शिपायांनी जागोजाग घायाळ केले. त्याच्या उदरास आरपार विस्तीर्ण छिद्रे पाडली. त्यातील छिन्नभिन्न पदार्थांनी दरेखोर भरले. बोरघाटात तोफांप्रमाणे गर्जना झाली की, अदृश्य आणि श्रुतयुद्ध झाल्यामुळे मोठी मौज वाटते. कंपनीचे शिपाई त्याच्या मस्तकावर नाचतात, तर कोणी पोटात शिरून त्याचे विदारण करतात! त्याला जेरीस आणण्याकरिता नाना युक्त्या चालू आहेत. बोरघाट संपूर्ण काबीज करण्यास या सैन्याला निदान दहा वर्षे लागतील. मगच लोकांचे श्रम आणि पीडा यांचा परिहार होईल. वेचलेले द्रव्य कारणी लागेल.

१४९५ (२० : ३, १ फेब्रुएरी ६१, ४५–४७)

शिंगापूरच्या नारळात एक प्रकारचे मोती पिकते, असा शोध लागला आहे. ते शुभ्रवर्ण असून त्याची रचना कंदर्पासमान असते. पण या नारळात मोत्यास आवश्यक असे कार्बोनेट आफ लैम हे तत्त्व मात्र नाही. त्याचा व्यास दोन पंचमांश इंच असून ते मोलवान आहे.

१४९६ (२० : ३, १ फेब्रुएरी ६१, ४५–४७)

संत फ्रान्सिस झाव्यर याच्या 'ममई' ने आठ चमत्कार केले, असे गोव्याचे गवरनर आत्मविश्वासाने सांगतात. दुर्धर रोग, पीडा व अधू पाय बरे करणे असे चमत्कार त्याने केले. अशा पोकळ व मूर्ख गोष्टींवर भाव ठेवल्यामुळेच हे पोर्तुगीज अज्ञानी व हलके झाले आहेत.

१४९७ (२० : ३, १ फेब्रुएरी ६१, ४५–४७)

केंब्रिज युनिवर्सिटीत हिंदुस्थानी भाषा शिकविण्यासाठी एका प्रोफेसरची जागा निर्माण झाली. त्यावर मेजर स्तिफनची नेमणूक झाली. या जागेसाठी ११ उमेदवार आले. त्यात मुनशी सैय्यद अब्दुल्ला आणि हैदरजंग होते. पण त्यांची निवड झाली नाही.

१४९८ (२० : ३, १ फेब्रुएरी ६१, ४५–४७)

सन १८६० च्या नवेंबर अखेरीस सरकारी जामदारखान्यामध्ये १२ कोटी ९ लाखांची शिल्लक होती. गतवर्षी सदरहू तिजोरीमध्ये १३ कोटी ३१ लाख ४८ हजार ९१५ रुपये शिल्लक होते.

१४९९ (२० : ३, १ फेब्रुएरी ६१, ४५–४७)

लाहोर विद्यालयाच्या वरिष्ठ विभागात दरबारी लोकांच्या मुलांसाठी शिक्षणाची सोय आहे. तेजसिंग व दीनानाथ सिंघांची बुद्धिमान मुले तेथे शिकतात. फी ५ रु. पडते. ६० मुले शिकत आहेत. हे 'उद्याचे संस्थानिक' सुशिक्षित असणे आवश्यक आहे. सगळी संस्थाने खालसा व्हावीत, अशी आमची इच्छा नाही. पण राजे जर सुज्ञ व दयाळू नसतील, तर त्यांच्या हाती राज्य म्हणजे 'मेंढवाड्यात वाघ,' अशी अवस्था होईल.

१५०० (२० : ३, १ फेब्रुएरी ६१, ४७–४८)

सुरत जिल्ह्यातील असेसरांनी प्राप्तिकर आकारणीचे काम संपवले. एकूण उत्पन्न तेरा लाखांवर जाईल. सालीना ५२ हजार रुपये सुरतमधून वसूल होतील. इतर असेसरही आपले काम संपवीत आहेत.

१५०१ (२० : ३, १ फेब्रुएरी ६१, ४७–४८)

फ्रेंड आफ इंदियाचे ३४६६ वर्गणीदार आहेत. इंग्लंडमधील साप्ताहिकांचे ३ हजार वर्गणीदार आहेत, तर अमेरिकेत ही संख्या साठ हजारांवर जाते. दैनिकांचे वाचक १० ते १५ लाखांवर आहेत. त्या देशांतील लोकांची वाचनाची अभिरुची केवढी अचाट आहे पाहा !

१५०२ (२० : ३, १ फेब्रुएरी ६१, ४७–४८)

युरोपात राजे, राण्या व बादशहा त्यांची संख्या फक्त ४७ आहे. पोपची त्यात गणना होते. त्यांचे वय १४ ते ७९ पर्यंत आहे. सर्वांत वडील राजा ७३ वर्षे वयाचा आहे, तर व्हिक्टोऱ्या राणीच्या राज्याभिषेकास २३ वर्षे झाली.

१५०३ (२० : ३, १ फेब्रुएरी ६१, ४७–४८)

वाशिंग्टनच्या वेधशाळेने एका नव्या ग्रहाचा शोध लावला.

१५०४ (२० : ३, १ फेब्रुएरी ६१, ४७–४८

मुंबई इलाख्यात सध्या ३६ मिशनेरीसाहेब आहेत, शिवाय पाच जर्मन मिशनरी आहेत. दीक्षा पावलेले नेटिव उपदेशक १२ आहेत.

१५०५ (२० : ३, १ फेब्रुएरी ६१, ४७–४८)

पुण्यामध्ये खास अतिशूद्रांकरिता तीन शाळा आहेत. त्यामध्ये २५६ मुले शिकतात. दरसाल सुमारे १५०० रुपये खर्च होतात. मे. कोक आणि रीवससाहेब विद्याखात्यात आहेत. त्यांना असे वाटते, की तीन पृथक शाळांपेक्षा एकच उद्योगशाळा असावी.

१५०६ (२० : ३, १ फेब्रुएरी ६१, ४७–४८)

इराणमधील छळास कंटाळून १०० पारशी नुकतेच मुंबई येथे आले.

१८०७ (२० : ३, १ फेब्रुएरी ६१, ४७–४८)

औरंगाबादेस रे. देविदसन यांनी २३ मांग मनुष्यांस बाप्तिस्मा दिल्हा.

मुंबई, एक्सचेंज प्रेस, फोर्ट

**१५०८** (२० : ४, १५ फेब्रुएरी ६१, ५०–५४)

रे. व्हैटसाहेब आपल्या व्याख्यानात म्हणाले : पंढरपुरास वर्षातून दोनदा यात्रा भरते. बहुतेक लोक पायी येतात. फारच थोडे वाहनांतून येतात. कित्येक तर ५०० कोस चालतात. यंदा ७० हजार यात्रा भरली. देवळात २-३ हजार लोक बारीत उभे राहातात. गोंधळ झाला की, शिपाई व बडवे त्यांना तोबे मारतात. प्रदक्षिणेच्या मार्गावर अनेक जण दंडवत घालतात. या गावात देवळे पुष्कळ आहेत. पण खऱ्या देवाचे एकही देऊळ नाही. जागोजाग कीर्तने चालतात. झिपरी साळू नावाची बाईही कीर्तन करते. तिला जनाबाईचा अवतार मानतात. ही यात्रा प्रकृतीस हानिकारक आहे. लोक अशक्त होऊन त्यांना वाखा होतो, कारण बेसुमार दाटीने हवा अगदी बिघडते. संपत्तीचा नाशही या यात्रेत फार होतो. एक लक्ष यात्रेकरू जवळ जवळ ५ लाख रुपये खर्च करतात. लोक आपल्या हातांनी हा कर स्वतःवर लादून घेतात. त्यापुढे प्राप्तीवरील कर अगदी किंपदार्थ आहे !! यात्रेने बुद्धीसही काही लाभ होत नाही. नीतीची बिघाडणूकसुद्धा होते. यात्रेमध्ये चोरटे व भामटे यांचा मनस्वी प्रलय असतो. धर्माची तर फार नासाडी होते. सर्वव्यापक भगवानाला यात्रेच्या ठिकाणावर शोधून लोक धर्माची खरी तत्त्वे व्यर्थ ठरवितात. निर्जीव मूर्तीत ते देवास पाहातात. नदीत बुडकुली मारल्यामुळे पापाची क्षमा होते, ही समजूत चूक आहे. एकंदरीत हा खोट्या धर्माचा फासाच आहे. पंढरपुरात या काळात जातिभेद फारसा दिसत नाही. अतिशूद्र सोडले, तर बाकीचे दाटीवाटीने बसतात. सोयीप्रमाणे जातिभेद गुंडाळतात.

**१५०८ अ** (इंग : ४३–५०)

१५०९ (२० : ४, १५ फेब्रुएरी ६१, ५४–५६)

'सत्यवादी' लिहितो की : पुण्यातही पाण्यावरून धुमाळी झाली. ज्ञानप्रकाशने एकतर्फी आणि असत्य वर्तमान छापले. खोट्या गटारी वार्ता छापून विस्तवावर तेल ओतावे, हे केवढे नीच कर्म आहे ! पुण्याच्या मिशनाचे रामचंद्र बाबाजी बुधवारच्या सरकारी हौदातले पाणी हातांनी घेऊन प्याले, तेव्हा लोकांनी गर्दी केली. दुसऱ्या दिवशी ते रस्त्याने जात असताना दोन हजार माणसांनी जमून त्यांना काठ्या व भांडी मारली. ते मूर्च्छित पडले. जवळ राहणाऱ्या मुनसफाने त्याकडे अगदी दुर्लक्ष केले. जवळच्या चौकीतील पोलीस बऱ्याच वेळाने आला. मग मारणारेच लोक साळसूद होऊन उभे राहिले. २९ लोकांनी कोर्टात ख्रिस्ती लोकांविरुद्ध साक्षी दिल्या. फक्त एका ब्राह्मणाने त्यांस अनुकूल साक्ष दिल्ही. माजिस्त्रेताने पुराव्याअभावी रामचंद्रजीची निर्दोष सुटका केली. मि. रामचंद्रांवर पाण्यात थुंकण्याचा खोटा आरोप केला गेला. मारणारे ५०–६० त्यांनी ओळखले. त्यांतल्या काहींवर खटला भरला गेला. पण डिपुटीसाहेबाच्या 'न्यायचातुर्या' ने तेही निर्दोष सुटले. रामचंद्रजींना अनुकूल साक्ष देणाऱ्या ब्राह्मणास वाळीत टाकण्याच्या धमक्या मिळत आहेत. सार्वजनिक हौदावर बंदी झाली. घरमालकाने घर सोडण्याची निकड लावली आहे. याप्रमाणे सर्व मजकूर खरा आहे.

१५०९ अ (इंम : ५६–५७)

१८१० (२०:४, १५ फेब्रुएरी ६१, ५७–५९)

'ख्रिस्तदास' पत्रात म्हणतो की : मूर्ख भक्ती ही समर्थाच्या क्रोधाचे कारण असते. गडद काळोखातून प्रभूच्या आश्चर्यकारक प्रकाशामध्ये गेले पाहिजे. सिद्धेश्वराच्या यात्रेत व्यापारी लोकांची पाले उभी राहतात. भांडे आळी, मिठाई आळी, वगैरे फार सुशोभित दिसते. तरी पर्जन्याने पुष्कळ मालाची खराबी झाली. शुभवर्तमानाच्या प्रचारास ५००–६०० लोक जमत, पण भोवताली लोकांची फार गर्दी होई. त्यायोगे बोलणे ऐकू येत नसे. त्यामुळे आम्ही 'लोकांस सोंग' असे झालो. हे वेडे लोक मात्र काठ्यांचे लग्न लावतात, तेव्हा त्यांच्या अज्ञानाची कीव येते. जनावराचे लग्न लावले, तर त्यांत काही अर्थ आहे. लग्नाचे 'समाधान' झाले की, वाद्यांचा व टाळ्यांचा एकच गजर होतो. मग एक नूतन व्यालेली गाय आणतात. तिला दिवसभर उपाशी ठेवतात. होमास अग्नी मिळाल्यावर गाईस अन्न देतात. गाईने न घाबरता अन्न खाल्ले, तर ते महागाई होण्याचे चिन्ह मानले जाते. सिद्धेश्वराच्या देवळाभोवती खंदक असून त्यात पाणी असते. देवळावरती दिव्यांचा लखलखाट असतो. देवळासमोर कलावंतिणींचा नाच होतो. देवच नाचाचा शोकी असला, म्हणजे भक्तही तसेच होतात. कित्येक बाया लोटांगण घालीत तेथे येतात. त्यापेक्षा त्यांनी प्रभूस संतोषविले, तर ते चांगले होईल. येथे एका बैराग्याने एका मुलीवर बलात्कार केला. लोकांच्या दयेवर पोसलेले मानवी पोळ असे त्रासदायक ठरतात. आता तरी लोकांनी डोळे उघडावेत.

१८१० अ (इंग : ५९–६१)

१८११ (२० : ४, १५ फेब्रुएरी ६१, ६१–६३)

'एक सावध करणारा' लिहितो की : एका गुजराती ब्राह्मणाने पुनर्विवाह केला. तो एकदम लौकिकात आला. तो स्तुतिपात्र झाला. प्रश्न एवढाच की, उत्तम प्रतीचे लोक काय करतात? आमचे रावसाहेब भास्कर दामोधर तर विधुर आहेत. व ८–९ वर्षांच्या त्या पोरीशी लग्न जुळविण्याच्या खटपटीमध्ये आहेत. विलायतेत धर्मशाळा असावी, म्हणून त्यांनी निबंध लिहिला. क्यांडीच्या गैरहजेरीत त्रान्सलेतरूचे काम केले. ह्वार्डने त्यांना सेंत्रल देपोचे मुख्य नेमले. आता ते इनाम कमिशनमध्ये ४०० रुपयांवर गेले आहेत. नवनीतामध्ये त्यांनी कवितेवर निबंधही लिहिला. मग हे वैद्यराज स्वतःची खरूज कधी घालविणार? महिपतरामासारखे अभक्ष्य त्यांनी खाल्ले नाही. पण एखाद्या तरुण विधवेस दुःखसमुद्रातून काढण्याचा विचारही त्यांस येत नाही. 'भास्करास ग्रहण लागले' एवढे मात्र खरे! दुसरे लग्न ठरविताना ते जोशांची मदत घेत आहेत. अजून काही ना काही ग्रहांच्या अडचणी आहेतच. मग त्यांनी प्रतिभास्कराचार्य व्हावे आणि गणपत कृष्णाजीच्या पंचांगास एक जोतिषनिबंध जोडावा, हे बरे! लवकरच राणीसाहेबांच्या ज्येष्ठ पुत्राचे लग्न होणार आहे. कन्येची ग्रहपरीक्षा भास्कराचार्यांनीच करावी! खरे म्हणजे ईश्वर अनुकूल असेल, तर शनि-मंगळ-गुरू काही वाकडे करू शकत नाहीत.

१८१२ (२० : ४, १५ फेब्रुएरी ६१, ६३–६४)

वायव्य इलाख्यातील दुष्काळ शुक्ल पक्षातील चंद्राप्रमाणे वाढत आहे. दिल्लीत व आग्र्यातही सर्वत्र हालाखीची परिस्थिती दिसते. पंजाब प्रांतात थोडा पाऊस झाला. पण दक्षिणेकडेही दुष्काळ पडत आहे. त्रावणकोरात धान्याची मनस्वी महर्गता झाली. पोटास गोळाभर अन्नही मिळत नाही. पोटची पोरे ते चार चार आण्यास विकीत आहेत. देवास ज्या कारणांनी क्रोध येतो, अशी कामे लोकांनी करू नयेत. श्रीमंतांनी यथाशक्ती द्रव्य देऊन लोकांना दुःसह मृत्यूच्या दाढेतून सोडवावे.

**१५१३** (२० : ४, १५ फेब्रुएरी ६१, ६३–६४)

गवर्णर जेनरालसाहेब लार्ड कानिंग यांचा दौरा काशीपासून पेशावरपर्यंत होणार आहे. त्यांच्याबरोबर ७ हजार स्वार आहेत. एका ठिकाणी त्यांच्याबरोबर १७,७२५ लोक होते. बायब्येकडे हा 'दुष्काळात तेरावा महिना होईल.' तेव्हा साहेबांनी माफक स्वारी बरोबर घ्यावी.

**१५१४** (२० : ४, १५ फेब्रुएरी ६१, ६३–६४)

मुंबईचे गवर्णर ज्यार्ज क्लार्क गुजरातचा दौरा करीत आहेत. सुरतेस त्यांच्या सन्मानार्थ तोफांची सरबती झाली. भडोचला बडोदेकर महाराजांनी त्यांचा मोठा पाहुणचार केला. तेथे नवा लोखंडी रस्ता तयार झाला आहे.

**१५१५** (२० : ४, १५ फेब्रुएरी ६१, ६३–६४)

कटमंडूचा रेसिडेंट कर्नल रामसे कळवितो की : ब्राशरसाहेबाजवळ अशी बातमी आहे की, नानासाहेब नेपाळच्या पहाडीत जिवंत आहे. ब्राशरनेच शेवटी त्याचा पाठलाग केला होता. म्हणून सरकारने नीट शोध घ्यावा. नानाची बायको कुंकू लावते की नाही, तेही नीट पाहावे. ही गोष्ट संशयात राहाणे बरोबर नाही. नाना आहे, असे समजून काही लोक उगीच उड्या मारीत आहेत.

मुंबई, एक्सचेंज प्रेस, फोर्ट

## ज्ञानोदय, पुस्तक २०, अंक ५, मुंबई, १ मार्च १८६१

**१५१६** (२० : ५, १ मार्च ६१, ६६–७०)

रे. व्हैट पंढरपूर यात्रेबाबत म्हणतात की : यात्रा म्हणजे अज्ञान, भ्रांती व मूर्खपणा आहे. पांडुरंगमाहात्म्य या पोथीत श्रीधर म्हणतो की : एका रक्षेने साठ सहस्र वर्षे तप केले, म्हणून ती कृष्णाची राधा झाली. तेव्हा रुक्मिणी रागावून दिंडिरवनात आली. तिची समजूत घालण्यासाठी तो पंढरपूरात आला. याच ठिकाणी कृष्णाने मल्लिकार्जुनाचा आकार घेऊन दिंडिरनामक दैत्याशी हजार वर्षे युद्ध केले. शेवटी त्याच्याच विनंतीवरून तो येथे उभा राहिला. तिसरी कथा पुंडलिकाची आहे. कुक्कट ऋषीचे वैभव पाहून पुंडलिकाने आईबापांची भक्ती सुरू केली. या पुण्यावान भक्ताकरिता पांडुरंग विटेवर उभा आहे. पुंडलिकाचे नाव प्रत्येक भजनात येते. श्रीधर म्हणतो की, देव दमूनभागून उभा आहे. प्रश्न असा येतो की, देव कसा दमेल ? एकूण हा पंथच भ्रांतीचा आणि अज्ञानाचा आहे. पंढरीस गेल्यामुळे सर्व पापे भस्म होतात, असे सगळे संत सांगतात. हे सर्व अकल्याणकारक व देवाच्या गौरवाच्या विरुद्ध वाटते. भाकडकथांवर जे विश्वासतात, त्यांच्या मनात काहीतरी वाण आहे व अव्यवस्था तर आहेच ! भुकेलेला आत्मा व शांतीसाठी तळमळणारे मन यांना तेथे काही मिळत नाही. दुष्काळाने पिडलेला माणूस राखच खात सुटतो. नद्या आणि मूर्ती कसलेच पुण्य देत नसतात. खरे आत्मिक अन्न शुभवर्तमानात आहे. खरी पवित्रता मात्र हवी आहे. जत्राखेत्रा करण्याच्या नादी लागू नये.

**१५१६ अ** (इंम : ६५–६६)

**१८१७** (२० : ५, १ मार्च ६१, ७१–७२)

१८६१ या वर्षी सत्यदीपिका नावाचे एक सुंदर पण लहान मासिक सुरू झाले. त्याच्या १६ पृष्ठी अंकास फक्त चार पै. पडतात. ख्रिस्ती वर्नाक्युलर एज्युकेशन सोसायटी या परोपकारी मंडळीने ते सुरू केले. मि. बाबा पदमनजी हे त्याचे कर्ते आहेत. लहान लेकरांना उपयुक्त गोष्टींचे ज्ञान व्हावे, त्यांची कोमल मने सुधारून देवाकडे लागावीत, हा त्यांचा उद्देश आहे. युरोप-अमेरिकेत अशी हितावह पुस्तके अनेक प्रसिद्ध होतात. मि. बाबा लहान लेकरांवर फार प्रीती करितात. म्हणून हर्षाने ही कामे करितात. मुले प्रौढ झाल्यावर त्यांना मिळणारे विद्याचारही त्यांना समजतील. ती अडाणी राहणार नाहीत. मुलांनी ही पुस्तके नेहमी वाचावीत आणि आईबापांनीही त्यांना उत्तेजन द्यावे.

**१८१७अ** (इंम : ७०–७१)

**१८१८** (२० : ५, १ मार्च ६१, ७२–७४)

साप डसल्यावर पुढे दिलेले उपाय करावेत. आजारी माणूस किंवा गरोदर बायको असली, तरी अपाय होणार नाही. सापाने चावा घेतलेल्या जागेच्यावर दोरी गच्च आवळून बांधावी. म्हणजे ते विष रक्ताशयाकडे जाणार नाही. दंशाच्या जागी कापून रक्त पिळून काढावे. चोखणे हा उत्तम उपाय आहे. चोखणाराने लगेच ते थुंकले, तर धोका नसतो. जखमेवर लिकर अमोनिया लावावा. तसेच पोटातही द्यावा. ४ वर्षांपर्यंत १॥ तोळा पाण्यातून व मोठ्या माणसास ४॥ तोळे पाण्यामध्ये मिसळून द्या. मनुष्य बेशुद्ध असेल, तर दर बारा मिन्युटांनी अर्धा डोस देत जावा. फुरसे चावले असेल, तर वीस वीस थेंब द्यावेत. दंशित माणूस जरी मरावयास टेकला, तरी हाच उपाय करावा. कारण, अनेक माणसे बरी झाली आहेत. दातखीळ बसली, तर नाकाशी अमोनियाची कुपी धरा. कुपीवर लाख बसवा. म्हणजे औषधाची शक्ती कमी होणार नाही.

१५१८ अ (इंमं : ७२)

१५१९ (२० : ५, १ मार्च ६१, ७४–७६)

'ख्रिस्तचरणतल्लीन' लिहितो की : ज्ञानप्रकाशने क्षुल्लक शंका काढून ख्रिस्ती लोकांची निंदा केली. पण खरा परीक्षक पितळेच्या गोफास सोने म्हणत नाही. ज्ञानप्रकाशने लांब एडिटोरियल लिहून तक्रार केली की, हे लोक पाणी बाटवितात. पण ही सर्वांच्या भोगवट्याची मालमत्ता आहे, खाजगी नाही. पूर्वी तर अस्पृश्यांना सकाळ-संध्याकाळ रस्त्याने फिरण्याची बंदी होती. बाट्यांचे तोंड न पाहणारे लष्करातील गोहत्या सहन करतात. संस्कृत विद्या म्लेंछ गुरूकडून शिकतात. शिखासूत्रनष्ट आचार्य आला म्हणून कोणी विद्या सोडली नाही. ब्राह्मणांनी स्वतःचा वेगळाच भट्टी हौद करावा आणि गोमूत्राने भरून ठेवावा. हे दुरभिमानी लोक काय हट्ट धरतील, याचा नेम नाही. ख्रिस्त्यांना मारहाण करून ते ४०० सह्यांचे अर्ज रवाना करतात. ख्रिस्ती लोकांनी पाण्याप्रमाणेस बायकामुले आणि मालमत्ता यांवरचाही हक्क सोडावा, असे ते म्हणतात. मग धर्मांतराने धनकोचाही हक्क बुडतो, असे मानावयास काय हरकत आहे ? ख्रिस्ती मनुष्य पूर्वधर्मामधल्या बायकोमुलांना वेडगळ चालीतून सोडवतो, पण लोकहितवादीसारखी सुधारणेची पत्रे लिहिणारी व रावसाहेब, रावबहादूर किताबत मिरवणारी माणसे कोणती देशसुधारणा करीत आहेत ? पंचगव्याचे पावित्र्य वर्णन करणारेच गोमांस खाऊन दारू पितात! मोठी जागा मिळाली की, गोमुखीत हात घालून जप करीत बसतात. अपंक्त झाले, तर सक्षौर प्रायश्चित्त घेतात!! या लोकांनी कोणता परोपकार केला, ते ज्ञानप्रकाशने सांगावे.

**१५२०** (२० : ५, १ मार्च ६१, ७७)

आफ्रिका खंडामध्येही आता लोखंडी रस्ता झालेला आहे. केप आफ गुड होप एथून नाताळ नामक वसाहतीपर्यंत ही सडक होऊन गेल्या ज्यून महिन्यात सुरू झाली. हा अपूर्व चमत्कार पाहाण्यास काफरी लोकांची गर्दी झाली होती. वाफेच्या या घोड्याबरोबर पळत जाऊन पैज जिंकण्याचे त्यांनी ठरविले. एक धावल्यानंतर ते उघडेबंब लोक कसेबसे गाडीबरोबर होते. पण नंतर गाडी अचानक १५ कोस वेगाने धावू लागली. आणि हे तमासगीर काफरी कृष्णवर्ण पैजगीर लवंडून कोल्हांट्या खाऊ लागले.

**१५२० अ** (इंम : ७६–७७)

**१५२१** (२० : ५, १ मार्च ६१, ७७)

देकन हेरल्ड या पत्रावरून असे समजते की, पुणे शहरात काही दिवसांपूर्वी पाणीप्रकरणावरून जो बखेडा झाला होता, त्याचा निकाल सरकारी अंमलदारांनी दिला आहे. त्यात असे म्हटले आहे की, कोणी मनुष्य कोणत्याही जातीचा असो, त्याला सरकारी हौदातून पाणी भरण्याचा हक्क आहे.

**१५२१ अ** (इंम : ७७)

**१५२२** (२० : ५, १ मार्च ६१, ७८–७९)

कोटाचे महाराज राव यांनी आपले सैन्य १३ हजारांवरून २० हजार करण्याची परवानगी मागितली, पण सरकारने ते अमान्य केले. आम्हांस वाटते की, १३ हजार फौजसुद्धा जास्त आहे. काही जडभारी झाले, तर इंग्रज मदत करतातच. त्यांनी गाईकवाडास वाघर लोकांपासून मुक्त केले. म्हणून आहे ही फौजच कमी करावी.

**१६२३** (२० : ५, १ मार्च ६१, ७८–७९)

मोलीमचा राजा जुलमी असल्याबद्दल खात्री पटल्यामुळे इंग्रज सरकारने त्याला पदच्युत करण्याचे ठरविले आहे. इतरही जुलमी राजे असतील, तर त्यांनाही दूर करावे. यावरून राजेलोक सावध वर्तणूक करतील. प्रजाही आनंदी राहील.

**१६२४** (२० : ५, १ मार्च ६१, ७८–७९)

इंग्रज सरकारने रायचूर व धाराशिव हे प्रांत निजामास देऊन वऱ्हाड वगैरे ३२ लक्षांचा मुलुख आपल्याकडे घेतला. ६० लक्षांचे कर्ज सरकारने सोडून दिल्हे.

**१६२५** (२० : ५, १ मार्च ६१, ७८–७९)

रेवाच्या राजास रक्तपीती झाली, अशी बातमी आहे.

**१६२६** (२० : ५, १ मार्च ६१, ७८–७९)

त्रावणकोरचा राजा रामवर्मा याने अशी सूचना केली आहे की, सगळ्या संस्थानिकांनी मालिका–मा–आझम विक्टोऱ्या राणीस सोन्याचे सिंहासन नजर करावे. यासाठी दहा लक्ष रुपये खर्च येईल. रामवर्मा ५ हजार रुपये देणार आहे.

**१६२७** (२० : ५, १ मार्च ६१, ७८–७९)

लार्ड कानिंग यांनी इंदूर दरबारातील सत्काराच्या वेळी ज्यांना सरकारी खिलात मिळणार होती, त्यांचे नजराणे स्वीकारले नाहीत. इंदूरच्या घराण्याकडे राज्य कायम राहील, असे सांगून बिजावरच्या राजाने सती बंदी केल्याबद्दल त्याला शाबासकी दिल्ही. धारच्या पवार राजांनी बंडास कुमक केली, म्हणून त्यांचा परगणा अयोध्येस जोडला.

१५२८ (२० : ५, १ मार्च ६१, ७९–८०)

कुर्गची राजकन्या विक्तोऱ्या गुराम्मा हिचे दिलिपसिंगाशी ठरलेले लग्न मोडले. तिने लेफ्टनंट जान कांपबेलशी विवाह केला.

१५२९ (२० : ५, १ मार्च ६१, ७९–८०)

कलकत्त्याचे तरुण खिस्ती मि. गुंगली हे उपदेशक झाले असून त्यांचे लग्न अमेरिकन मडमेशी होणार आहे.

१५३० (२० : ५, १ मार्च ६१, ७९–८०)

मुंबईत रे. शेरीफ यांनी दोघांना बाप्तिस्मा दिल्हा, तर नगरमध्ये विष्णु भास्कर करमरकरांनी एका शिष्यास दीक्षा दिल्ही.

१५३१ (२० : ५, १ मार्च ६१, ७९–८०)

चीनमध्ये शांघाईजवळ कापसाची लागवड फार होते. नद्यांचा गाळ त्यास खत म्हणून उपयोगी पडतो. जून ते आगस्तचा पाऊस त्यास फार उपयोगी पडतो. पुढे पाऊस थांबला नाही, तर त्याची फार खराबी होते. शेरडांच्या पाठीवर थैल्या लादून हा कापूस दुसरीकडे नेतात. कापसाच्या झाडापासून तेल मिळते व सर्पण मिळते. चिनी कापूस हिंदुस्थानामधील कापसापेक्षा उत्तम असतो.

१५३२ (२० : ५, १ मार्च ६१, ७९–८०)

सुरत जिल्ह्यात १ लक्ष ८२ हजार रुपये कर दरसाल वसूल होतो. काही लोक तर ५ वर्षांचा कर आताच देण्यास तयार आहेत. सरकारने बंडकाळात उत्तम व्यवस्था ठेवल्यामुळे ते कृतज्ञता बाळगतात.

१५३३ (२० : ५, १ मार्च ६१, ७९–८०)

मेजर बनबरी, शिलींग, हियरसी, बाबू श्रकि नारंजन यांना अयोध्या प्रांतात खास जहागिरी बक्षिस देण्यात आल्या.

१८३४ (२० : ५, १ मार्च ६१, ७९–८०)

बाघर लोकांचा प्रमुख बापू माणिक यास ३७ लोकांसह इंग्रज सैन्याने अटक केली. उखामंडळ भागातसुद्धा आता कोणी बाघर बंडखोर राहिले नाहीत. बाघरांचा पूर्ण बीमोड झाला.

मुंबई, एक्सचेंज प्रेस, फोर्ट

## ज्ञानोदय, पुस्तक २०, अंक ६, मुंबई, १५ मार्च १८६१

१८३५ (२० : ६, १५ मार्च ६१, ८२–८५)

पाणीप्रकरणी 'एक ख्रिस्ती' पत्रात लिहितो की : पाणी घेण्यावरून घोडनदी गावाजवळील कर्डे या ठिकाणी ख्रिस्ती उपदेशकांना मारहाण झाली. साहा ख्रिस्ती तेथे गेले. रात्रीची वेळ म्हणून चावडीजवळच उतरले, व तळ्यातून पाणी घेतले. तेव्हा ५०–६० लोक जमले आणि त्यांनी या लोकांना बेदम मारहाण केली. शिपायाच्या हातून त्यांचा बंदोबस्त होऊ शकला नाही. अनवाणी व बोडके असे ख्रिस्ती जवळच्च सूटरसाहेबांच्या छावणीत गेले. साहेबांनी गावच्या मामलेदारास बोलावून निरोप दिल्हा की, पाटील-कुलकर्ण्यांसह सर्वांच्या जबान्या घ्याव्या. परंतु या दोघांना तर बोलावलेही नाही. इतरांपैकी ११ असामी मात्र बोलावले व त्यांना फक्त ४९ रु. दंड केला. तोही गावानेच भरला. मामलेदाराचे कृत्य म्हणजे दया नसून गैरइनसाफी होय. कपतान सूटरनी मात्र गावकऱ्यांना बोलावून समज दिली की, पाणी घेण्याचा ख्रिस्ती लोकांना अधिकार आहे. चावडीत उतरू देण्याबद्दलसुद्धा बजावले. पण गावकऱ्यांनी ते तळे टाकून दिल्हे. निमोणी गावचा अमृतराव याने फार शहाणपणाची वर्तणूक केली होती. तसे जर कर्डेकरांनी केले असते, तर बरे झाले असते. ख्रिस्ती लोक मात्र फार सहनशीलतेने वागले. आपणांस मारणारांवर त्यांनी हात उगारला नाही.

**१८३८ अ** (इंम : ८१–८२)

**१८३६** (२० : ६, १५ मार्च ६१, ८५–८८)

'एक सत्यवक्ता' लिहितो की: ज्ञानप्रकाशने खोट्या व गटारी बातम्या छापून दिशाभूल केली. उदा. मि. रामचंद्र यांना स्टुवर्डसाहेबाने पाणी घेण्याबद्दल ताकीद केली, असे तो लिहितो. पण ते सर्व खोटे आहे. खटल्याच्या निकालापर्यंत पाणी देऊ नये, अशी मसलत मात्र दिल्ही. ख्रिस्ती लोकांनी हौदात उष्टे पाणी टाकले, असेही त्याने खोटेच छापले. दोन मेंढरांना हजारो व्याघ्र व लांडगे यांनी मारले, हे मात्र त्याला जणू समजलेच नाही! निष्पक्षपाती बातमी देणे, हा पत्रकर्त्यांचा धर्म आहे. मारामारीच्या वेळी रामचंद्रजी तेथे उपदेश करीत होते, हेही खोटे आहे. या त्याच्या लबाड्या पुराव्यासह दाखविल्या आहेत. पुण्यातील भटांनी मात्र बुधवारचा हौद शुद्ध करून घेतला. सरकारी हौदावर जातिभेद चालणार नाही, असे सरकारने जाहीर केले असून दंगलखोरांना ताकीद दिल्ही आहे. सध्याचे फौजदार कडक शिस्तीने वागतात, म्हणून त्यांचा दरारा कायम आहे. पुण्यातले मराठे व ब्राह्मण एकाच हौदातून पाणी घेण्याची मसलत करीत आहेत. परंतु अजूनही निर्णय होत नाही. या सर्व प्रकरणात मि. ढमढेरे मात्र दुटप्पीपणाने वागले. पूर्वी ते मि. रामचंद्र यांना मैत्रीच्या भावनेने वागवीत असत, पण त्या दिवशी मात्र रामचंद्रांना शिपायाकडून बाहेरच्या बाहेरच घालवून देण्यात आले. ज्ञानप्रकाशच्या भट्ट संपादकांनी आता गोमूत्र टाकून हौद शुद्ध करण्यास हातभार लावावा.

**१८३६ अ** (इंम : ८८–८९)

**१८३७** (२० : ६, १५ मार्च ६१, ९०–९१)

सन १८२९ मध्ये एक उत्तर हिंदुस्थानी ब्राह्मण आपली बायको, तान्ही कन्या आणि दोघे चाकर, यांसह जगन्नाथपुरीच्या यात्रेस निघाला. बाळासोर येथे त्याच्या पत्नीस पटकीचा वाखा झाला. ब्राह्मण कोठेतरी निघून गेला. बहुधा तो मेला असावा. आजारी बाईस कोणीही साहाय्य केले नाही. डाक्तर सटन या मिशनरीसाहेबांनी तिचा कळवळा करून काही औषध दिल्हे. तीन दिवसांनी बाई मरण पावली. साहेबाने तिची तान्ही मुलगी बरोबर घेतली. येशू बालकावर प्रीति करीत असे, हे आठवून तिचा सांभाळ केला. लहान वयात अन्न खाऊ घालण्यापासून कष्ट घेतले. सटनसाहेबास मूलबाळ नाही. तेव्हा ही त्यांचीच मुलगी बनली! शिक्षण पूर्ण केल्यावर ती कन्या अमेरिकेमध्ये शिक्षिका झाली. बेहारीलाल या ख्रिस्ती उपदेशकाशी तिचा विवाह झाला. सध्या ती दोघे स्कातलंद देशात आहेत. त्यांच्या विवाहाच्या वेळी कसलाही विधी किंवा जेवणावळ न करता प्रार्थना करून येशूचा आशीर्वाद मागण्यात आला.

**१८३७ अ** (इंम : ८९–९०)

१५३८ (२० : ६, १५ मार्च ६१, ९१–९२)

'ख्रिस्तचरणतल्लीन' पत्रात म्हणतो की : ज्ञानप्रकाश महाराजांनी नेटिव ख्रिस्त्यांना उपदेश केला आहे की, त्यांनी नेटिव हिंदूंना यंत्राचे, विद्यांचे, शेतकीचे, ज्ञान द्यावे व त्यांची दुःखे दूर करावीत. म्हणजे ख्रिस्ताकरिता दुःख भोगल्याबद्दल श्रेय लागेल. कोरड्या अंगी तिडका आणि बोडक्या डोई लिखा, या म्हणीप्रमाणे या संपादकास स्वदेशाची कळवळ आली आहे. पण हेच ख्रिस्ती तहानेने मरू लागले, तर हा त्यांच्या तोंडात पाणी ओतण्यास मात्र तयार होणार नाही. कोरडे ब्रह्मज्ञान फक्त सांगणार. ही विद्वान धेंडे मोठा पगार खातात. त्यांनी एखाद्या कुणब्यास कधी शिकविले आहे काय? पुण्यामधील अतिशूद्रांच्या शाळेला तीन रुपये तरी पाठविले आहेत काय कधी? इसापनीतीतील बेडूक वैद्याप्रमाणे त्यांनी शहाणे व्हावे. एत्तद्देशीय ख्रिस्ती गरीब आणि अज्ञानी आहेत. यांत्रिक सुधारणा त्यांनाही हवी आहे. पण त्यास देवाचे राज्य आणि नीतिमत्ता यांची स्थापना व्हावयास हवी आहे. ख्रिस्ती धर्म बहुत रक्तपातास कारणीभूत झाला, असे सांगून ज्ञानप्रकाशाने आपल्या इतिहासज्ञानाचा अजब असा मासलाही दाखविला आहे. असे कुजके केणे या दिवसांमध्ये चालणार नाही.

१६३९ (२० : ६, १५ मार्च ६१, ९३–९४)

रे. ज्यान कावस लिहितात की : बायव्येप्रमाणे त्रावणकोरात दुष्काळ पडला आहे. उपासमारीने लोक इतके कृश झाले की, ओळखूही येणार नाहीत. राजाने दिवाणामार्फत अन्न वाटण्याची व्यवस्था केली आहे. पटकीने तर थैमान मांडले. तीन महिन्यांत १५०० ख्रिस्ती लोक मेले. जे वाख्यामधून वचावले, ते उपासमारीने मेले. काही शेतात थोडे तांदळाचे पीक आले होते. पण ते काळ्याधुल्यांनी खाऊन चपाट केले. लोकांनी शेताची आऊतेच काय, पण घराचे दरवाजेही विकून खाल्ले. सध्या झाडपाला व चिंचोके यांवरच दिवस काढीत आहेत. अन्नाच्या शोधात हिंडून त्यांचे पाय सुजले. काहींनी आपली बालके फक्त चार आण्यांत विकली. खरेदीदार मुसलमान त्यांचे धर्मांतर करून त्यांना गुलाम म्हणून विकतात. असा दुष्काळ पूर्वी कधी पडला नव्हता. कंदमुळेच काय, पण नारळही जळून जाताहेत. पुढे उन्हाळा आहे. ८ महिने विपत्तीचा काळ आहे. हाडांचे पिंजरे झालेल्या स्त्रीपुरुषांना सरकारतर्फे भाताची पेज दिली जाते. काही ठिकाणी रस्ते व कालवे यांची कामे निघाली. पण अशक्त लोक कामाला जाऊ शकत नाहीत. काम केले, तरी लवकर मजुरी मिळत नाही. श्रीमंतांनी पुढे येऊन उपासमार होणाऱ्या लोकांना मदत करावी. जो गरिबास देतो, तो प्रभूस उसने देतो.

१६४० (२० : ६, १५ मार्च ६१, ९५–९६)

रोहिलखंडात आणि फरूकाबादेतही दुष्काळ पडला. पाटाचे पाणी देऊनही शेते सुकतात. कलकत्ता व मुंबई या शहरांत त्यांच्या मदतीसाठी २ लाख ४३ हजारांचा निधी जमला. त्रावणकोराकडे २१ हजार माणसांची अन्नपाण्याची सोय केली आहे. एका बॅरिस्टरने अशी सूचना केली की, ५ लाख रुपयांचे भांडवल जमवून कंपनीमार्फत देशावरून धान्य आणावे व नफा भांडवलदारांनी वाटून घ्यावा.

**१८४१** (२० : ६, १५ मार्च ६१, ९५–९६)

सन १८६०–६१ मध्यें सरकारला ६ कोटी ६७ लाख ८० हजारांची तूट आली.

**१८४२** (२० : ६, १५ मार्च ६१, ९५–९६)

दिल्ली बाप्टिस्ट मिशनने ११० लोकांना दीक्षा दिली.

**१८४३** (२० : ६, १५ मार्च ६१, ९५–९६)

पूर्व आफ्रिकेत मिशन स्थापण्याकरिता मानचेस्तरचे मिशनेरी गेले आहेत.

**१८४४** (२० : ६, १५ मार्च ६१, ९५–९६)

मि. मनचरजी बैरामजी कोळा आणि रूस्तमजी यांनी विलायतेमध्यें वैद्यविद्येचे शिक्षण घेतले. गोन्या डाक्तरांसारख्या पदव्या त्यांना मिळाल्या. रा. दादाभाई नौरोजीही विलायतेमध्यें असून त्यांनी कापसाच्या लागवडीबद्दल टौन हालात फार सुरस व्याख्यान दिल्हे. पारशी लोकांची कीर्ती वाढते आहे.

**१८४५** (२० : ६, १५ मार्च ६१, ९५–९६)

१६ फेब्रुवारी १८६१ रोजी बंगाल प्रांतात श्रीरामपूर आणि इतर ठिकाणी पाण्याचे हौद व तळी यांतील पाणी समुद्राच्या भरतीप्रमाणे एकाएकी चढउतार घेऊ लागले. सर्वांना फार आश्चर्य वाटले. या चमत्काराचे कारण समजले नाही.

**१८४६** (२० : ६, १५ मार्च ६१, ३६)

महाराज दलिपसिंघाची मातोश्री महाराणी चंदकौर हिंदुस्थानातच आहे. मुलास भेटण्यासाठी ती नेपाळातून कलकत्यात आली. महाराज ख्रिस्ती झाल्यावर विलायतेस गेले. महाराणी विक्टोऱ्याची त्यांच्यावर फार मर्जी आहे. राजांचा स्वभाव उत्कृष्ट आहे. राजकीय कामापेक्षा त्याला शिकारीचा शौक जास्त आहे. ते परत आल्यामुळे सिख लोकांना फार आनंद झाला. काहींनी अशी अफवा पसरविली की, १८६२ त युद्ध होऊन सिखांचा विजय होईल. म्हणून कित्येक सिख नोकऱ्या सोडून पंजाबात आले. पण दलिपसिंघ हुशार आहेत. सामर्थ्यवान इंग्रजांशी भिडण्यास ते तयार होणार नाहीत. खोटा धर्म सांगणाऱ्या लबाडांचे ते ऐकणार नाहीत. मिशनऱ्यांना विसरून ते काही कृतघ्न होणार नाहीत. पंजाबात काही उलटापालट होईल, अशी भीती बाळगण्याचे कारण नाही.

मुंबई, एक्सचेंज प्रेस, फोर्ट

**१५४७** (२० : ७, १ एप्रिल ६१, ९८–१०४)

'एक नगरकर' लिहितात की : रे. कासमभाई, त्याची बायको रंगाबाई व रे. बार्कर, असे अहमदनगर जिल्हा, ता. नेवासा, येथील वाडगावी गेले होते. तेथील चावडीत ते उतरले. आर्बिटग पोलिसपाटलाने त्यांना सांगितले की, ही चावडी नसून खाजगी देऊळ आहे. कासमभाई पंतोजीच्या घरून जेवून येत असता पोलिसपाटलाच्या घराजवळ २५० लोक जमा झाले होते. त्यांनी गर्दी करून गोंधळ सुरू केला. रंगाबाईस डोके फुटेपर्यंत मारले. जखमी अवस्थेत ती मांगवाड्याकडे पळाली. कासमभाईस लाथाबुक्यांनी मारले. मुक्या माराने त्यास बेशुद्ध पडण्याची वेळ आली. मारहाण केल्यानंतर शुद्धतेसाठी शिंतोडा करून घेतला. नेटिवांना अपराधाचा विटाळ होत नाहीं. पण सदाचारी लोकांना शिवल्यामुळे मात्र विटाळ होतो. पंतोजीने पळून जाऊन खोकरगावी मेजि. साहेबांना ही बातमी कळवल्यावर चौकशी सुरू झाली. नेवाश्याच्या मामलेदाराने अनेक असामींना अटक केली. पण हा भोजराज मोठा न्यायचतुर आहे. त्याने साक्षीदाराना पळवून ठेवले होते. पुढे नगरच्या सेशन कोर्टाने दोघांना २ वर्षांची, तर ११ जणांना १–१ वर्षाची सक्तमजुरीची शिक्षा केली. ८ कैद्यांना निर्दोष सोडून दिले. वाडगावचा पोलिसपाटील अद्यापही आजारीपणाचे निमित्त करून आपली जबाबदारी टाळीत आहे. हे तंटे लवकर विझले, तर बरे होईल. हिंदूंनी अशा कामाचा पश्चात्ताप करून सर्वांना भाऊ मानून प्रीतीने वागावे.

**१५४७अ** (इंम : ९७–९८)

१५४८ (२० : ७, १ एप्रिल ६१, १०६–१११)

मि. विल्यम वुड लिहितात की : 'मी २३ डिसेंबरला सातान्याजवळील कोरेगाव येथे गेलो. पाटलाने सांगितले की, लोक उपदेश ऐकण्यासाठी जमतील. चावडीतल्या लोकांशी बोलताना तो माझी कुचेष्टा करीत होता. पण मी सांगितले की, उपदेश करतो, पण भीक मागत नाही. काही वेळाने उपदेश ऐकण्यास लोक जमले. पण काही केल्या ते गप्प राहात नव्हते. पाटलाला सांगितले की, लोकांना गप्प कर. पण दांडगे लोक गडबड करीतच होते. थोड्या वेळाने सगळेच निघून गेले. नंतर मामलतदार व फडणीस येऊन धर्माविषयी चर्चा करू लागले. पाणीप्रकरणात त्यांचे मन माझ्याविरुद्ध होते. तेवढ्यात काही लोकांनी तंबूपर्यंत माझा पाठलाग केला. दगड धोंड्यांचा अविरत वर्षाव होत होता. गर्दी इतकी झाली की, मामलेदारापर्यंत रिघाव होणे कठिण झाले. म्हणून शेजारचा वाडा गाठला. पण तेथील म्हातारीने थांबू दिले नाही. तेवढ्यात दोन सभ्य तरुण आले. त्यांनी मात्र संरक्षण देऊन पुन्हा तंबूपर्यंत सुरक्षितपणे पोहोचविले. मामलेदार तोंडापुरत्या तरी दंगलखोरांना शिव्या देत होता. मी दंगलीच्या चौकशीचा आग्रह धरला. प्रथम तर त्याला दंगलखोर सापडेनात. कप्तान रोजसाहेबांनी दंग्याची चौकशी पूर्ण केली. पाच लोकांना ३० रुपयांपासून १०० रुपयांपर्यंत दंड केला. तीन सरकारी नोकर दोन दोन महिने बडतर्फ केले. लवकरच मी पुन्हा त्या गावात उपदेशासाठी जाणार आहे.

१५४८ अ (इंम : १०४–१०६)

१८४९ (२० : ७, १ एप्रिल ६१, ११२)

'पुष्टिकरण' लिहितो की : १५ फेब्रुवारीचा 'अभाळ फाटल्यावर ठिगळास काय द्यावे ?' हा लेख वाचला. रा. सा. भास्कर दामोधर इतरांना ब्रह्मज्ञान सांगतात. पण स्वतः कोरडे पाषाण राहातात. ही गोष्ट सिद्ध झाली आहे. भास्करास ग्रहण लागून त्याचा खग्रास झाला. शाळाखात्यात इन्स्पेक्टर असताना हा भास्कर नगरावर उदय पावला होता. त्याची विद्वत्ता, इंग्लिश भाषण व लेखन पाहून सर्वजण त्याची तारीफ करीत. कायदेमंडळाकडे विधवांच्या पुनर्विवाहाकरिता त्याने बहुत लोकांच्या सह्यांचा अर्जसुद्धा पाठविला होता. हेच रावसाहेब ल्हान पोरीशी दुसरे लग्न करीत आहेत, यावरून स्वतः लिहिलेल्या मजकुरावर ते हरताळाचा बोळा सहज फिरवू शकतात, हे सिद्धच झाले. मुंबईतील पुनर्विवाह-उत्तेजन मंडळीचे ते अध्यक्षही आहेत. आणखीही दोघा 'स्वदेशसुधारकांनी' अशीच ल्हान पोरीशी लग्ने केली म्हणतात. यांच्याकडून या हतभाग्य देशाची सुधारणा कधीच होणार नाही. सुधारणेच्या उपायांचा ते धिक्कार करीत आहेत.

मुंबई, एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

१५५० (२० : ८, १५ एप्रिल ६१, ११४–११५)

'उपदेश करीत फिरणारा' लिहितो की : महाकाळ वाडगाव येथे एका ख्रिस्ती माणसाने सांगितले की, या गावचे मानभाव नदीचे पाणी नेहमीच्या वापराच्या भागातून घेत नाहीत, तर अर्ध्या कोसावर असणाऱ्या प्रवाहातून घेतात. म्हणून मी त्या मानभावांची भेट घेतली. मानभावांस पाप व विटाळा यांचा कंटाळा आहे. कारण कृष्णाचे भक्त अपवित्र गोष्टींपासून दूर राहू इच्छितात. इतर हिंदू सर्वच नदी पवित्र मानतात. मानभाव म्हणाला की : नुकतीच त्र्यंबकेश्वरला यात्रा भरली होती. लोकांनी तेथे स्नान करून आपले पाप गोदावरीमध्ये टाकले. तेच इकडे वाहून येते. म्हणून आम्ही या पाण्यास स्पर्शदेखील करीत नाही. चार महिने झाल्यावर तो सर्व घाट समुद्रापर्यंत वाहून जाईल. मग आम्ही पाणी घेऊ. तेव्हा त्याला उपदेश केला की, नदीत पाप धुतले जाते, ही कल्पनाच चूक आहे. पाप हे चर्मात, मांसात किंवा हाडात नाही, तर ते अंतःकरणात असते. खऱ्या पश्चात्तापाने व येशूच्या रक्ताने ते धुतले जाते. म्हणून नदीचे पाणी घेण्यात कसलाही दोष नाही.

१५५० अ (इंग : ११३)

**१५५१** (२० : ८, १५ एप्रिल ६१, ११५–११६)

बंगाली 'इंदियन रीफार्मर' लिहितो की : मुंबई इलाख्यात काही ठिकाणी पाण्यावरून दंगली झाल्या. असे प्रकार कोठल्याही सुधारलेल्या, रानटी अथवा अर्धसुधारक देशात घडू शकणार नाहीत. या देशात ख्रिस्ती लोकांची संख्या वाढते आहे आणि तिचा समावेश अवघ्या प्रजेमध्ये होईल. त्यांना उत्तेजन व आश्रय देण्यातच सरकारचे मोठे हित आहे. बंगालमध्ये सर्व धर्मांचे लोक एकाच हौदातून पाणी घेतात. 'फ्रेंड आफ इंदिया' लिहितो की : लार्ड एल्फिन्स्तनसाहेबांनी व गावोगावच्या न्यायाधीशांनी लोकांचा खूब निषेध केला. ख्रिस्त्यांना उपद्रव देणारांना शिक्षा दिल्ही आहे. इंग्रजांच्या राज्यास जर बळकटी यावयाची असेल, तर ख्रिस्ती धर्माशिवाय दुसरा उपायच नाही. चहूकडे हाच धर्म चालला, तर लष्कर कमी होऊन त्याचा खर्च पाच कोटीवर येईल. नेटिव ख्रिस्ती उपदेशकांना पैसा देऊन तो धर्म अधिक बळकट करीत आहेत.

**१५५१ अ** (इंम : ११५)

**१५५२** (२० : ८, १५ एप्रिल ६१, ११६)

मार्च महिन्यात पुणे मुक्कामी पाण्यावरून आणखी एक बखेडा झाला. त्याचा शेवटही फार चमत्कारिक ठरला. एका ख्रिस्त्याने गणेशपेठ हौदावर पाणी भरले. ते पाहून दांडगट लोक जमा झाले. त्यांनी शिव्या देऊन ओरड केली. ख्रिस्त्याने काहीच न बोलता मुकाट्याने फिर्याद दाखल केली. मग मात्र ते दांडगट त्यास शरण गेले. गैरशिस्त वर्तणुकीबद्दल माफी मागू लागले. त्यांनी चांगल्या वर्तणुकीचे आश्वासन दिल्यावर त्यांना सोडून देण्यात आले.

**१५५२ अ** (इंम : ११६)

**१८८३** (२० : ८, १५ एप्रिल ६१, ११७)

'फ्रेंड आफ इंदिया'वरून समजते की : बाबू प्रसन्नकुमार ठाकूर यांचे चिरंजीव आणि बालासुंदराबाई हिचा भ्रतार ज्ञानेंद्रमोहन ठाकूर यांनी खिस्ती धर्माचा स्वीकार केला आहे. जमीनदार घराण्यातील हा गृहस्थ आता लंडन शहरामधील युनिव्हर्सिटी कॉलेजमध्ये बंगाली भाषा व हिंदुधर्मशास्त्र यांचा प्रोफेसर बनला आहे. मुलकी हुद्याच्या परीक्षेसाठी तो विद्यार्थी तयार करतो. हिंदुस्थानी भाषेसाठी मि. अब्दुल्ला व गुजरातीसाठी मि. दादाभाई नवरोजी यांची नेमणूक झाली. बंगाली भाषेसाठी ज्ञानेंद्रमोहन ठाकूर यांची नेमणूक झाली.

**१८८३ अ** (इंग : ११६–११७)

१८८४ (२० : ८, १५ एप्रिल ६१, ११७–१२२)

'ख्रिस्तदास' लिहितो की : मिचल आणि व्हैट या साहेबांनी लेखण्या उचलल्यामुळे विठ्ठलदल बरेच बायाळ झाले. मजसारख्या मरतुकड्या शिपायाच्याने सोंगासारखे पुढे न सरता त्या शूरांच्या शस्त्राआड लपून राहणे योग्य नाही. म्हणून या नामांकित मानलेल्या पंढरपूर शहरात गेलो. हे गाव सुंदर आहे. पण यात्रेच्यावेळी लोक फार घाण करतात. आपल्या भोळवट देशबांधवांना लुटून येथे लोकांनी माड्या बांधल्या. बुद्धिहीन माणसांचीच काय, पण राजांचीही त्यांनी पारख केली आहे. विठोबाचे देऊळ मोठे शोभिवंत आहे. देवळात सतत भजन चालूच राहाते. बडवे पैशाच्या आशेने चौकशी करू लागले, तेव्हा मी त्यांना सांगितले की : मी निराकाराची भक्ती करतो. देव सर्व ठिकाणी आहे. ख्रिस्ताच्या नावाकरिता मी पूर्वधर्मातील बायकोमुलांचा त्याग केला. विठ्ठल हा पूर्वीचा कृष्ण असून तो निरोग्याचा वैद्य व विद्वान लोकांचा शिक्षक आहे. प्रभू येशू मात्र कष्टकरी व ओझ्याने लादलेल्या लोकांना विसावा देतो. येथील देवळात बायजाबाईने दिलेल्या चांदीच्या पलंगावरून बिठोबाचे पुजारी व रुक्मिणीचे पुजारी यांचा वाद कोर्टामध्ये गेला आहे. देवस्थान सरकारने ५–६ हजारांचा कर लादला. पण त्याचे वार्षिक उत्पन्न २ लाखांवर आहे. जेजुरीचे यात्रेकरूही तेथे आले होते. पाण्याच्या आशेने झऱ्यामागे धावणाऱ्या हरणाप्रमाणे ते तीर्थयात्रा करीत राहतात. यात्रेत चोऱ्या व बलात्कारही होतात. खऱ्या देवापासून लोक दूर जातात.

१५५५ (२० : ८, १५ एप्रिल ६१, १२२–१२५)

'सत्यशोधक' पत्रात म्हणतो की : विरोबा हा मानवी देव आहे. प्रत्येक खेडेगावाच्या सरहद्दीवर हा शेंदरी देव असतो व धनगराची मुले त्याची राखण करतात. त्यास महादेवाचा पुत्र वीरभद्र मानतात. पुजारी धनगरास वर्षातून एकदा तरी त्याचा 'खेळ' करावा लागतो. ४० मेंढरे मारून त्यांचे मांस शिजवितात. सर्वांना जेवण दिले जाते. सहा मण ज्वारीच्या भाकरी त्या दिवशी खपतात. मोराच्या परांचा कुंचा बांधलेल्या काठ्या गावोगावहून येतात. मग ऊद जाळून डफडी वाजवतात. 'वाणा' ची गाणी म्हणतात. अंगात येणारे लोक हातांनी निखारे चोळतात. खेळ संपल्यावर पुन्हा सर्वांना जेवण दिले जाते. अज्ञानरूप अंधकारातील या लोकांना सैतान फसवीत असतो. साकूरच्या एका धनगराने मरणापूर्वी असे सांगितले होते की, मी मरणानंतर प्रगट होईन. त्याने एक शेंदरी धोंडा गावाजवळ स्थापिला. तेव्हापासून हे तीर्थक्षेत्र सुरू झाले. हे लोक बाडवडलांप्रमाणेच अज्ञानात बुडून खोट्या देवाला भजत आहेत. खऱ्या देवाची आज्ञा पाळणे सोडून व्यर्थ दुराचरण करतात. आपण जर दगडास बाप म्हटले, तर आपल्या खऱ्या पित्यास राग येईल. त्याप्रमाणे या दगडांना देव म्हटल्यामुळे खऱ्या देवाला राग येईल.

**१८८६** (२० : ८, १५ एप्रिल ६१, १२५–१२६)

सर्वांना वाटते की, आपण शंभर वर्षांहून अधिक काळ जगावे. परंतु आपण जपून चालावे आणि ईश्वराचे नियम पाळावे, असे मात्र थोडक्यांसच वाटते. अमेरिकेतील राल्फ फार्णहाम नावाचा गृहस्थ १०५ चालू वर्षांचा आहे. सन १७७५ च्या लढाईत तो लढला होता. तरुणपणात नेमस्तपणाने राहिला. म्हणून ईश्वराने त्यास दीर्घायुष्याची ही देणगी दिल्ही. या वयातही तो निरुपयोगी नाही. तो स्वतः आपले सर्पण फोडतो. पहाटेस सर्वांच्या अगोदर उठतो व रात्रीचा सर्वांच्या आधी निजतो. सर्वच ऋतूंत हा त्याचा क्रम कायम असतो. मद्याचा थेंबही त्याने कधी जिभेस लावला नाही. वैद्याची गरज लागण्याइतके दुखणे त्याला कधीच आलेले नाही. तो चहा व कॉफी पितो, पण रात्रीचा मांसाहार करीत नाही. जनरल वाशिंग्टनची प्रेसिडेंट म्हणून नेमणूक झाली, तेव्हा त्याने अभिप्रायाची सही केली. प्रत्येक अध्यक्षाच्या शपथविधीच्या वेळी त्याला मानाने बोलावतात. असा हा दीर्घायुषी राल्फ फार्णहाम.

**१८८७** (२० : ८, १५ एप्रिल ६१, १२६–१२८)

वायव्य इलाख्यात व दिल्लीत दुष्काळाने गंभीर स्वरूप धारण केले आहे. रे. स्मिथ आणि रे. इवान्स पहाटेपासून उपाशी माणसांचा शोध करून त्यांना सदावर्त–केंद्रावर पोहोचवितात. एकदा तर अन्नार्थी माणसांच्या गर्दीत काहीजण चेंगरून मेले. कित्येक संभावितांनी भीक मागण्याची लाज वाटल्यामुळे जीवही दिल्हा. या अशक्त लोकांना पाट्या उचलण्यापलिकडे काम करता येत नाही. त्यातही एका मुलास पीठ मिळाले. ते त्याने उपाशी आईस नेऊन दिल्हे. कलकत्याकडे ३॥ लाख खंडी धान्य पाठविण्यात आले. सोन्याचे जानवे घालणाऱ्या भिक्षुकास देण्यापेक्षा दुष्काळग्रस्तास अन्न द्यावे.

१५५८ (२० : ८, १५ एप्रिल ६१, १२६–१२८)

यंदा दुष्काळामुळे अफूचे सगळे पीक बुडणार आहे. चीन या देशात अफीमबाज लोक दहा वर्षांत मरतात. म्हणून त्यांनी हा व्यापार बंद केला आहे. व्यापाऱ्यांनी द्रव्यलोभ सोडून द्यावा.

१५५९ (२० : ८, १५ एप्रिल ६१, १२६–१२८)

आकियाब गावी आग लागून ८०० घरे जळाली. कोणातरी चंडोल ओढणाऱ्या शिपायाच्या गाफिलपणाने विस्तव पडून ती पेटली.

१५६० (२० : ८, १५ एप्रिल ६१, १२६–१२८)

फत्तेपूरचे जज्ज टकरसाहेब यांना ठार मारणाऱ्या लोकांची चौकशी करण्यासाठी कमिशन नेमले होते. परंतु त्यांच्याविरुद्ध फारसा पुरावा न मिळाल्यामुळे त्यांना निर्दोषी सोडण्यात आले. फत्तेपूरच्या सरकारी कचेरीतील ब्राह्मण कारकून संशयास्पद रीतीने वागतात. आरोपीस त्रास होईल, असे पुरावे दडवितात. मध्ये त्यांना चाकरीवरून तात्पुरते दूरही केले होते. इकडील ब्राह्मण एकाच माळेचे मणी आहेत. त्यांच्यामध्ये खरे व प्रामाणिक लोक फार थोडे निघतील.

१५६१ (२० : ८, १५ एप्रिल ६१, १२८)

पूर्वी अहमदनगर जिल्ह्यात भागुजी नायक भिलाचे बंड फार माजले होते. त्यावेळी येसू नायकाने त्याची खबर पोलिसांना दिल्ही. सुटरसाहेबांनी भागुजी भिलाचा पुरता बंदोबस्त केला होता. आता महाद्या नावाचा एक भील येसूचा सूड घेण्यासाठी टपून होता. त्याने येसूस त्याच्या बायकोमुलांसह ठार मारले. नंतर तो लपून छपून दरोडे घाली. त्याने दरोडे घालून ३५ हजारांचा माल पळविला. एवल्याचा फौजदार बाळाजी रामचंद्र याने महाद्या भिलास खानदेशच्या सरहद्दीवर पकडले आहे.

१५६२ (२० : ८, १५ एप्रिल ६१, १२८)

नाशकाकडे एका ब्राह्मणी विधवेचे सक्तीने केशवपन केल्याबद्दल तिच्या नातेवाईकांना मि. आरथर माजिस्ट्रेट यांनी तरुंगवासाची शिक्षा दिल्ही. यानेच मूर्ख आचार व जुलूम यांना पायबंद बसेल व सुधारणूक होत राहील.

मुंबई, एक्सचेंज प्रेस, फोर्ट

## ज्ञानोदय, पुस्तक २०, अंक ९, मुंबई, १ मे १८६१

१५६३ (२० : ९, १ मे ६१, १३०–१३३)

अहमदनगर मिशनमध्ये १८६० च्या अखेरीस १३ साहेब व मडमा, ४७३ ख्रिस्ती स्त्रीपुरुष व ३३० लेकरे आहेत. मंडळ्यांची संख्या ११ वरून १६ वर गेली. प्रभुभोजनासाठी नवीन मनुष्ये सतत येतात. १८३१ मध्ये नगरचे मिशन स्थापन झाले. पहिल्या ५ वर्षांमध्ये फक्त ९ माणसे ख्रिस्ती झाली, तर यापूर्वीच्या ५ वर्षांत ३६३ लोक ख्रिस्ती झाले. यावरून आम्ही अधिक श्रम करण्याकरिता उत्तेजित व्हावयास पाहिजे. मिशनेऱ्यांनी गावोगावी जाऊन राहावे आणि नियमाने शुभवर्तमान सांगावे, असा नेम केल्यामुळे दीक्षा घेणारांची संख्या वाढत आहे. मंडळ्या जीवट होऊन विशेष उद्योग होऊ लागला. ६२ जणांचे मृत्यू झाले. बाळाजी, अंधळा गोपाळ व मलाबाई, लखीराम, योसेबा, यांच्याप्रमाणेच शेख दाऊद या सज्जन ख्रिस्ती माणसाची सर्वांना नेहमी आठवण येते. या सर्वांनी तारणावर खरा भाव ठेवला होता. ख्रिस्ती लोकांचे वजन व उपयोगित्व वाढत आहे. मंडळीत नवे सामर्थ्य प्रगट झाले. दर वीस कोसांवर ६० पेक्षा अधिक गावांत धर्मोपदेशक आहेत. ३३ गावांत मिशनाच्या शाळा चालतात. पैसा मिळेल, त्याप्रमाणे भजनस्थाने वाढवीत आहोत. गतवर्षी ४१४० रुपयांची मदत मिळाली. एकट्या हंटरसाहेबांनी १ हजार रुपये दिल्हे. ख्रिस्ताच्या राज्याची वृद्धी व्हावी म्हणून प्रार्थना करतो.

**१८६३ अ** (इंग : १२९–१३०)

**१८६४** (२० : ९, १ मे ६१, १३३–१३७)

१८६१ या वर्षाच्या आरंभापासून अहमदनगर, पुणे, सिकंदराबाद, अलाहाबाद, या ठिकाणी गारांचे पाऊस पडले. १२ जानेवारीस नगरला तुफानी पाऊस होऊन गारा पडल्या. गारा लहान व लिंबाएवढ्या होत्या पण कित्येक लोक त्यांचे अतिशयोक्त वर्णन करीत आहेत. गुळाच्या ढेपेएवढी गार पडली, अशी थाप ठेवून देतात. खरे म्हणजे गारा एकमेकांस चिकटून त्या मोठ्या वाटतात. मेघात पाणी जमून गारा पडतात. जलबिंदूंना ३२ अंशांपेक्षा कमी उष्णता असेल, तर पाण्याचे बर्फ होऊन गार पडते. गार कापली, तर ती कांद्याच्या किंवा अभ्रकाच्या रचनेसारखी दिसते. उष्ण प्रदेशात चापट, गोल, पैलुदार गारा पडतात. गारांनी शेते खराब होऊन खळ्यातील धान्य वाहून जाते. पाला झडून फांद्या मोडतात. घोडनदीकडे चार लमाण मेले, अशी बातमी आहे. सिकंदराबादेत विशाल गारांनी मोठाच प्रलय उडवून दिल्हा. पशुपक्षीच काय, पण माणसेही मेली. युरोपात गारांच्या पावसाने फार नुकसान होते. गोळ्यांच्या भडमारासारख्या गारा पडतात. गारांची वृष्टी, हा ईश्वराचा कोप होय. ईश्वराने अमोरी लोकांना असेच खड्यांनी मारले होते. ईश्वर रागावला, तर फुसक्या पदार्थांचे आयुध करून असे कंदण करतो. योद्धे थरथरा कापतात व नास्तिकांचेदेखील डोळे उघडतात. ईश्वराच्या या तोफखान्यापुढे माणसाचा इलाज चालत नसतो. पशुपक्ष्यांना आधी त्याचे ज्ञान होते. माणूस मात्र झोडिला जातो. म्हणून ईश्वर हाच त्राता व रक्षक आहे.

१५६५ (२० : ९, १ मे ६१, १३७–१३८)

राहुरीचा 'स्वदेशहितेच्छू' लिहितो की : नेटिवांच्या लग्नामध्ये बऱ्याच अयोग्य चाली आहेत. उदा. स्त्रीपुरुषांनी एकमेकांच्या अंगावर गुलाल व चिक्सा फेकणे. हे अगदी टोरी काम आहे. यामुळे लहान मुलेही तसेच करून आपला कामातुरपणा प्रगट करतात. आपणच वाईट आचरलो, तर आपली मुले दुप्पट बिघडतील. स्त्रियाही एकमेकींना अवाच्य आणि कुत्सित शब्द उखाण्यात आणून आपले कामातुर मन दर्शवितात. डोक्याचा पदर लांब टाचेपर्यंत घेणाऱ्या व सासुरवास सहन करणाऱ्या स्त्रिया त्या याच काय, असा प्रश्न निर्माण होतो. मराठा व इतर जातींमधील वर्णन लिहिताना लाज वाटते. अठरा वर्णाचे गुरु ब्राह्मण तेही असेच, मग इतर जातींचे काय बोलावे ? नवरानवरीने खोबरे चावून एकमेकांच्या अंगावर थुंकणे ही घाणेरडी बाब नाही का ? अमर्यादेच्या चाली ताबडतोब सोडा. राजहंसाप्रमाणे विचाराच्या चुंचीने दुधाचे मात्र ग्रहण करा.

१५६६ (२० : ९, १ मे ६१, १३८–१४०)

'मूर्तिपूजकांचा कळवळा करणारा' लिहितो कीः १८५९ मध्ये नगरात पाण्यावरून बखेडा माजला होता. त्याची हकिकत ज्ञानोदयात येऊन गेली. मूर्तीचा खपरा उडाला की, ती जखमेने हैराण होत असते. अमृतेश्वर हे मोठे नाव बागविणारा देव भंगलाच कसा, असाही प्रश्न इतर धर्मीयांना पडतो. हे लिंग पूज्य नसल्यामुळे नवे बसविणे आवश्यक होते. पण अर्जविनंत्यांसाठी फार खर्च झाल्यामुळे थोडे दिवस त्याचीच पूजा झाली. देवळाचे मालक दातार यांनी नाशकावरून नवे लिंग घडवून आणले. स्थापनेसाठी खर्च केला. सगळे मिळून शंभर एक रुपये घालविले. पण पोळीबहाद्दर वतनदार भिक्षुकांना मात्र बोलावले नाही.

चौऱ्यांयशीच्या फेऱ्यात सापडून हा देव नवी पण लहान कुडी घेऊन जन्मास आला. जुना महादेव शेजारी पिंपळवृक्षाजवळ मुंजोबापासी बसला; तेथेच एक जुना फुटका देवही आहे. मंत्राने मूर्तीत दैवत येते, तर मग मूर्ती भंगते कशी, असा खरा प्रश्न आहे. असो. ज्या फडताळामुळे जुनी मूर्ती भंगली, त्याचे तोंड पाठीमागच्या बाजूस पडले असून देवाला बिलकूल वर्दळ लागू नये, अशी व्यवस्था केलेली आहे. ज्या देवाचा एवढा बंदोबस्त करावा लागतो, त्याच्या देवपणावर कोण विश्वास ठेवील?

१८६७ (२० : ९, १ मे ६१, १४०–१४१)

'उत्तराची अपेक्षा करणारा ख्रिस्ती' लिहितो की : ज्ञानविस्तार या पत्रात सद्गुरूवर एक कविता आहे. विषयसुखात न गुंतता खऱ्या गुरूचे चरण धरावेत, अशी ही कविता अगदी अंतरंगी आहे. पण जे खऱ्या गुरूकडे येत नाहीत, ते बहकलेल्या मेंढराप्रमाणे होतात. हजारो गौरवर्णी परदेशस्थ मेहनत करून आम्हांस ज्ञान देताहेत. भितऱ्या सुधारणेच्या शिखरावर चढलेले लोक म्हणजे ब्राह्मण, दौलत कमावण्याची विद्या शिकविणारे प्रोफेसर, ब्रह्मचारी बुवा, वाममार्गी व पुराणातले गुरू, यांच्याकडून खरे ज्ञान होत नाही. कष्टकऱ्यांना विसावा देणारा येशू हाच सद्गुरू होय. त्याच्या पवित्र धर्माने पृथ्वी व्याप्त होत आहे. सगळ्या माणसांदेखत जर त्याला स्वीकारले, तर आकाशात बापही आपणाला अंगीकारील. एक प्रभू, एक विश्वास, एक देव, एक धर्म, असे वातावरण हवे आहे. येशू आम्हांला ज्ञान देऊन सुमार्गात नेतो. तो प्रेमळ असा उपाध्या आहे. त्या गौरवी राजाला आम्ही फार वाखाणतो.

१८६८ (२० : ९, १ मे ६१, १४०–१४१)

वायव्य प्रांतातील दुष्काळाची स्थिती कायमच आहे. अन्न वाटण्याच्या ठिकाणी हजारो भुकेले लोक येतात. रोगी, अशक्त लोकांची गर्दी होते. कित्येक अन्नाच्या राशी पड्यात प्राण सोडतात. फार गर्दी झाली, तर बालके एकमेकांच्या हातातली भाकरी हिसकावून घेतात. साहेबलोक अन्नदानासाठी मेहनत करीत आहेत. सिंहस्थात लाखोंचे दान करणारांनी तिकडेही मदत पाठवावी.

१८६९ (२० : ९, १ मे ६१, १४०–१४१)

नानासाहेबाविषयी नवीन बातमी अशी की : तिबेटात धुनारी शहरानजीक तो राहातो. त्याच्याजवळ तीस हजारांची फौज आहे. तो दरोडे घालून उपद्रव देण्याचा संभव आहे. ज्ञानप्रकाश म्हणतो की, देशत्याग, संपत्तिनाश, सज्जनवियोग, या शिक्षा त्याला झाल्या, त्या पुरेशा आहेत. पण राणीने क्षमेचा जाहीरनामा काढला, त्यावेळी तो शरण आला नाही, म्हणून कायद्याप्रमाणे त्याला शिक्षा व्हावयास हवी. वाघ जखमी झाला, तरी त्याला मारावेच लागते. नानाला जिवंत सोडणे हे राजनीतीच्या विरुद्ध आहे.

१८७० (२० : ९, १ मे ६१, १४२–१४३)

रावसाहेब महिपतराम रूपराम विलायतेहून परत आले. डा. भाऊ दाजींनी त्यांच्या सन्मानार्थ संभावितांची सभा भरविली. रावसाहेबांनी आता खरी हकीगत सांगावी. बहिष्कारास भिऊ नये किंवा ढोंगीपणाही करू नये. क्षुल्लक कारणावरून कोणावर जातीबाळ पडता कामा नये. ३६२ वर्षांपूर्वी वास्को द गामा गुड होप बंदराकडून आला, तेव्हा त्यास मांबस व मेलिंदा गावचे अहिंसा धर्म पाळणारे गुजराती मदत करीत होते. महिपतराम यांनी विलायतेच्या रीतीभाती सांगाव्यात.

१८७१ (२० : ९, १ मे ६१, १४३–१४४)

महाराज दुलिपसिंग आपल्या मातोश्री व बंधु गुलाबसिंग यांच्याबरोबर पुन्हा विलायतेस जाणार.

१८७२ (२० : ९, १ मे ६१, १४३–१४४)

बंगाल्यात पुनर्विवाहाचे प्रमाण वाढत आहे. अनुकूल काळाची ते वाट पाहात नाहीत. ब्रह्मसमाज यासाठी प्रयत्न करतो. कोणाचा छळ झाला, तर त्यास मदत करतो.

**१८७३** (२० : ९, १ मे ६१, १४३–१४४)

मुंबईमध्ये मांडवी तलावातून महार लोक पाणी घेत असता ५००-६०० मुसलमानांनी गर्दी करून त्यांना प्रतिबंध केला. त्यांचा पाणी घेण्याचा हक्क सरकारने त्यांना द्यावा.

**१८७४** (२० : ९, १ मे ६१, १४३–१४४)

इंग्लंडमध्ये ५९ सालात २८ लाख ३० हजार गठ्ठे कापूस आला. त्यापैकी पाच सप्तमांश अमेरिकन होता.

**१८७५** (२० : ९, १ मे ६१, १४३–१४४)

ग्वाल्हेर महाराजांचा एकुलता पुत्र मरण पावला. आता त्यांस वारिस नाही.

**१८७६** (२० : ९, १ मे ६१, १४३–१४४)

१०० रत्तल विलायती कोळशाची फक्त ३ रत्तल राख पडते, तर भारतात १८॥ रत्तल राख पडते. कोळशांकडून पाण्याची वाफ करण्यास विलायती कोळसा चांगला असतो. त्याने ८ रत्तल पाण्याची वाफ होते. नर्मदेकडील कोळशाचा उपयोग केला तर फक्त ५·४२ रत्तल पाण्याची वाफ होते.

**१८७७** (२० : ९, १ मे ६१, १४३–१४४)

आताशी मुंबई द्वीपात दर सालात १०० तरी मुले देवी रोगाने मरतात. देवी काढल्या, तर एवढे प्राणी वाचले असते.

मुंबई, एक्सचेंज प्रेस, फोर्ट

**१५७८** (२० : १०, १५ मे ६१, १४५–१४८)

'बाट्ये' हा शब्द रोजच्या बोलण्यात काही हलकट लोक वापरीत. पण सध्या संभावित पत्रकर्तेही वापरू लागले आहेत. या निंद्य शब्दाने ख्रिस्ती लोकांना ताडन करण्याचा त्यांचा हेतू असतो. तरीही खरे संभावित लोक हा शब्द वापरीत नाहीत. 'देशी ख्रिस्ती' असा शब्दच वापरतात. मुसलमानांना लांडे म्हणणारे लोक ख्रिस्त्यांना बाट्ये म्हणतात. पण एखादा हिंदु जर मुसलमान झाला, तर त्यालाही ही संज्ञा लागू पडेल. कोशाच्या अर्थाप्रमाणे 'नीच जातीशी योनिसंबंध करणारा व अभक्ष्यभक्षण करणारा' तो बाट्या होतो. मग जे ब्राह्मण असे वर्तन करतात, त्यांना हे नाम का देऊ नये ? एका पेशव्यानेच यावनीशी संबंध ठेवला होता, हे जगजाहीर नाही का ? हिंदूंतील काही जाती मद्यमांसा घेतात. त्यांना बाट्ये का म्हणू नये ? काही सुधारक ब्राह्मण असे वागतात. ते बाट्ये नाहीत काय ? याचा अर्थ हाच की ख्रिस्ती लोकांना केवळ द्वेषाने ही संज्ञा दिल्ही जाते. बटावणे या शब्दाचा अर्थ नाणे बदलून घेणे एवढाच आहे. भ्रष्ट किंवा पतित असा त्याचा अर्थ होणार नाही. विद्वान लोकच अशी शब्दयोजना करू लागले, तर सर्रास सगळे लोक असे बोलतील. लहान धातूवरून मोठा शब्द होतो. म्हणून हा शब्द योजणे अयोग्य आहे. हिंदूंमधील भ्रष्ट आचार–विचार पाहून हिंदू लोक खऱ्या देवास संतोषविण्याकरिता धर्मान्तर करतात. हिंदू वर्तमानपत्रात मात्र खोटे शब्द स्थापू पाहातात. तरी त्यांनी ही निंदेची संज्ञा लावण्याचे सोडावे, हे बरे.

**१५७८ अ** (कंस : १४५)

१८७९ (२० : १०, १५ मे ६१, १४९–१५१)

गेल्या वर्षी बेळगावात नारायण विष्णु व रुक्मिणी या ब्राह्मण पतिपत्नीचा बाप्तिस्मा झाला. हे उभयता प्रतिष्ठित कुटुंबातील आहेत. नारायण दोन वर्षे पवित्र शास्त्र वाचून विचार करीत होता. हिंदुधर्म खोटा वाटून तो ख्रिस्ती होण्याचा निश्चय करी. त्याच्या नातलगांनी मामूलवहीवाटीनुसार त्याला कोंडून ठेवले होते. पण मोकळीक मिळाल्यावर त्याने हा निश्चय सर्वांना सांगितला. त्याचा दृढ निश्चय पाहून सर्व गप्प बसले. त्याची पत्नी प्रथम त्यास विरोध करी. म्हणून त्याने प्रार्थना व शास्त्र वाचनाची मदत घेऊन तिचा मनःपालट घडविला. ख्रिस्ती लोकांच्या घरी पाणी पिऊन तिने जात मोडली. दोघे प्रौढ असल्यामुळे नातलगांना काही करता आले नाही. तरी त्यांनी दागिन्यांच्या चोरीवरून एक खटला भरला. त्यात ते निर्दोष सुटले, तेव्हा ख्रिस्ती मिशनऱ्यावर फसवणूक आणि भूलथापा देण्याचा खटला भरण्यात आला. परंतु बाईने धैर्य राखून आपण ख्रिस्ती असल्याबद्दल निर्वाळा दिल्हा. मग जमलेले सर्व ब्राह्मण निघून गेले. या दोघांचा दीक्षाविधी थाटाने साजरा झाला. रुक्मिणी मराठी व कानडी वाचू शिकली. नारायणाने सर्कारी नोकरीची परीक्षा दिल्ही व तोही इंग्रजी शिकतो. तो नेहमी देवाचे काम करणार आहे.

१८७९ अ (इंम : १४८–१४९)

**१५८०** (२० : १०, १५ मे ६१, १५१–१५२)

शुभसूचक पत्रात पुण्याच्या पाणीप्रकरणाविषयी सरकारचा ठराव प्रसिद्ध झाला. तो जगन्मित्र पत्रावरून घेतला आहे. या ठरावात म्हटले आहे की : ८ असामींनी खिस्ती लोकांनी सार्वजनिक हौद वगैरे ठिकाणी पाणी न घ्यावे, असा अर्ज दिला होता. ब्राह्मणांनी अशा पाणी घेण्यास हरकत करून दंगल माजविली. परंतु हे प्रकरण सरकारपर्यंत गेल्यावर त्यांनी असा निर्णय दिल्हा की, या कामी खिस्ती लोकांना प्रतिबंध करता येणार नाही. अहमदनगरास व साताऱ्यास असा हुकूम झाला असताही पुण्यात हरकत यावी, हे अयोग्य आहे. अहमदनगरच्या ग्रामस्थांनी एकत्र येऊन असा ठराव केला की, सर्व ठिकाणी जसे पारशी व मुसलमान पाणी भरतात, त्याप्रमाणे खिस्ती लोकांना पाणी भरू द्यावे. मनुष्याच्या जातिधर्मास त्यायोगे कसलाही धक्का पोहोचत नाही. या सर्वांचा विचार करून पुण्याच्या अर्जदारांना हुकूम देण्यात येतो की, त्यांनी सार्वजनिक ठिकाणी पाणी भरण्यास खिस्ती लोकांना कसलीही हरकत करू नये. खाजगी हौदाची आणि विहिरीची बाब मात्र मालकाच्या खुशीवर व मुखत्यारीवर अवलंबून आहे.

**१५८० अ** (इंम : १५२–१५३)

१५८१ (२० : १०, १५ मे ६१, १५३-१५५)

ब्रह्मदेशातील कारेन उपदेशक साबकाला लिहितो की : आम्ही मूर्तिपूजेच्या अंधारातून ख्रिस्ती धर्माच्या प्रकाशामध्ये आलेलो आहोत. म्हणून एक राष्ट्रीय व धार्मिक झेंडा करावा. शास्त्राचे खरेपण व देवाचा प्रकाश आपण लोकांना द्यावा. त्याची जाणीव झेंड्याच्या रूपाने पुढील पिढीला द्यावी. इस्रायलांची संताने मिसऱ्यापासून सुटल्यानंतर किंवा इंग्लिश लोक रोमी मूर्तिपूजकापासून स्वतंत्र झाले अगर अमेरिका स्वतंत्र झाली, त्यावेळी त्यांनी नवी निशाणी बनविली. आपण जंगली लोक होतो व आपल्या लोकांना शिक्षणाचा गंध नव्हता. प्रभू येशूने आम्हांस दासपणाच्या अंधारातून बाहेर काढले. १८३२ पासून शास्त्राचे अमोल्य ज्ञान आम्हांस मिळत आहे. 'आत्म्याची तलवार ही देवाची देणगी' असे वाक्य आम्ही झेंड्यावर कोरणार. परदेशी लोकांकडून मदत घेऊ नये. परदेशी गोरे उपदेशक हे आपले आईबाप आहेत. त्यांच्यावर अन्नवस्त्राचा भार टाकू नये. शाळेत सर्व व्यावहारिक ज्ञान मिळते. म्हणून पंतोजींचा खर्च आपण चालवावा. ज्ञानी पुत्र बापास संतुष्ट करतो. मूर्ख पुत्र म्हणजे आईस दुःखदायक ठरतो. झटा म्हणजे कराल, नाहीतर असेच उराल. आपण एक ख्रिस्ती राष्ट्र म्हणून जगणार आहोत. आमचा झेंडा आता तयार झाला आहे.

१५८२ (२० : १०, १५ मे ६१, १५५–१५६)

नानासाहेबाविषयी लिहिताना आम्ही असे लिहिले होते की, नानाची बायको कोठे आहे, त्याचा शोध करून तिच्या कपाळी कुंकू आहे की नाही, ते पाहा, म्हणजे नाना जिवंत की मेला याचा काही निर्णय लागेल कारण हिंदू स्त्रिया कुंकू म्हणजे सौभाग्यद्रव्य असे समजतात. अस्पर्श्यांत किंवा सुतकात मात्र कुंकू लावीत नसतात. कुलीन व पतिव्रता स्त्री सतत कपाळावर कुंकू लावूनच वावरेल. तेव्हा एक वृद्ध नेटिव्ह हसून म्हणाला की, 'तसे समजू नका, कारण हे लोक कोणत्या प्रसंगी कसे वागतील, ते सांगता येत नाही. मागे पेशवे आणि इंग्रज यांच्या लढाईत गोखले हा ब्राह्मण सरदार पडला, अशी वदंता उठली. पण पेशव्याच्या कारभाऱ्याने खरा मजकूर कोणास कळू नये म्हणून तिला कुंकू लावून प्रदक्षिणा करण्यास भाग पाडले. ती अशा रीतीने तुळसीची सेवा नित्य करी, तेव्हा पेशव्यांच्या सेनेस धीर आला. गोखल्याच्या मरणाची वाट पहणाऱ्यांच्या मसलती फसल्या. सारांश ब्राह्मणाचा कांही विश्वास धरिता येत नाही.

१५८३ (२० : १०, १५ मे ६१, १५६–१५८)

'सभेस जाणारा' एक लिहितो की : ब्रह्मचारी बाबाने ५ साप्ताहिक सभा घेतल्या. आपण कलकत्त्याकडे जाणार आहोत, तरी वेदोक्त धर्मप्रकाशावर कोणास काही शंका असतील, तर त्यांचे समाधान करू, असेही तो म्हणे. पण बाबा स्वतःच एकेक तास बोलत. जुनाट समजुतीच्या हिंदू लोकांना तो ग्रंथ आवडला नाही. अनेक वृत्तपत्रांतून प्रतिकूल अभिप्रायच आले होते. १००–१२५ लोक जमत असत. काही पारशी नियमाने हजरी लावीत असत. बहुतेक श्रोते अनुमोदन व पुष्टीकरण करणारेच दिसत. आत्माराम बापू दळवे अनुमोदकांत अग्रगण्य होते. त्यांना बाबांचा प्रत्येक शब्द खरा वाटतो. पण त्याचे तर्कशुद्ध समर्थन त्यांनी कधीच केले नाही. मग त्यांची खातरी डळमळीत आहे की यात नुसतीच परोपकार बुद्धी आहे ? भवानी विश्वनाथ कानविंदे मात्र खिस्ती असूनही शंका काढते झाले. त्यांच्या खटपटीने सर्व जातींना व्याख्यानास प्रवेश मिळाला. दुर्भाषण व अपमान यांना थारा न देता न्याय्य रीतीने ते नेहमी बोलत असत. सर्व जातींवर हिंदूंनी प्रेम करावे, असे त्यांना वाटते. मुसलमानांप्रमाणे खिस्ती लोकांशी सभ्य वागणूक ठेवावी, हे त्यांनी निर्भयपणे व उघड रीतीने सांगितले. ते अविचारातून सुटले हे योग्य झाले. रे. रामकृष्ण खिस्ती धर्माची बाजू मांडून ग्रंथाच्या विरुद्ध बोलले. भवानीपंताप्रमाणे दुसरा कोणी नेटिव हिंदू दिसला नाही. निःपक्षपाती व धैर्यवान् हिंदू लोक एकंदर कमीच आहेत.

१५८४ (२० : १०, १५ मे ६१, १५९–१६०)

त्रावणकोरचा दुष्काळ कमी झाला, पण वायव्येकडला दुष्काळ कायमच आहे. आतापर्यंत ४ लक्ष रुपयांचे अन्न त्यांना पोचविले आहे. इंग्लंडहून सात लक्ष रुपयांची मदत झाली. दुष्काळात हिंदू लोक जात विसरून पावरोटी खातात, ही समाधानाची गोष्ट आहे. पण यानेच बाट पसरला, असे म्हणणारेही काही निघतीलच.

**१५८५** (२० : १०, १५ मे ६१, १५९–१६०)

या वर्षी प्राप्तीवरील कर १ कोटी ३९ लक्ष ८१ हजार ७३ रु. आला. सरकार हा कर पुढील वर्षी बंद करण्याचा संभव आहे, कां तर हे उत्पन्न अपेक्षेपेक्षा फार कमी आहे.

**१५८६** (२० : १०, १५ मे ६१, १५९–१६०)

या देशातील काळ्या सैन्याची संख्या २ लक्ष ८४ हजारांवरून १ लाख ४० हजारांवर आणली आहे. राणीचा तोफखानाही परत जाईल व लष्कराचा खर्च पुष्कळ कमी होईल.

**१५८७** (२० : १०, १५ मे ६१, १५९–१६०)

सरकारने काटकसरीचे धोरण आरंभिले असून ७७ पलटणी मोडल्या. ९ तुरुंग कमी करून इनाम कमिशनचे खातेही बंद केले. शिक्षण व न्यायखात्यांतील अनेक जागा कमी केल्या आहेत. देवस्थानांची वर्षासने बंद केली, तर फार खर्च वाचेल.

**१५८८** (२० : १०, १५ मे ६१, १५९–१६०)

विलायत सरकारच्या उत्पन्नापैकी शेकडा ६० एवढी रक्कम कर्जाच्या व्याजापोटी खर्च होते. यासाठी हिंदुस्थानच्या वसुलामधून एक रुपयाही जात नाही.

**१५८९** (२० : १०, १५ मे ६१, १५९–१६०)

खोंड लोक पूर्वी मनुष्यबळी अर्पण करीत. इंग्रजांच्या कायद्यामुळे १८३६ पासून दोन हजार माणसांची सुटका झाली. त्यांपैकी २५० मिशन शाळेत शिकतात. गेल्याच महिन्यात अशा एका बळीला इंग्रजी लष्कराने सोडवून आणले.

**१८९०** (२० : १०, १५ मे ६१, १६०)

भवानीपूर गावी गुरू प्रसन्नदत्त या हिंदू तरुणाचा बाप्तिस्मा झाला. तो मिशन शाळेचा विद्यार्थी आहे. त्याचा बाप दप्तरदार याने त्याचे मन वळविण्याचा फार प्रयत्न केला. पण या तरुणाने अगदी प्रसिद्धपणे खिस्ती धर्म स्वीकारला.

**१८९१** (२० : १०, १५ मे ६१, १६०)

मोरिशसमध्ये एका साहेबाने मोरिशस एथे तीन बदके विकत घेतली. त्यांच्या गळ्याच्या पिशवीतून सोनेमिश्रित धूळ निघाली. मोरिशस बेटाच्या नदीमध्ये सोन्याचे रज वाहात येत असावेत. त्या नदीचे पाणी ही बदके प्याली असावीत.

मुंबई, एक्सचेंज प्रेस, फोर्ट

## ज्ञानोदय, पुस्तक २०, अंक ११, मुंबई, १ ज्यून १८६१

**१५९२** (२० : ११, १ ज्यून ६१, १६२–१६६)

नेटिव राजाने विनंती केल्यावर लुधियाना मिशन स्थापन झाले आहे. त्याचा खर्च राजा स्वतः चालवितो. दरोबस्त स्वतंत्र राजे प्रभू येशूच्या धर्मास साहाय्य करतील, अशी आशा आहे. मिशनास आपल्या कामामध्ये पूर्ण स्वतंत्रता आहे. मिशनच्या मालमत्तेचे राजा संरक्षण करीत असतो. प्रजेसही त्याने धर्मस्वातंत्र्य दिल्हे. म्हणून कसलाही गैरसमज झालेला नाही. त्याची तीनपंचमांश प्रजा मुसलमान असून १ लाख ८० हजार लोकवस्ती आहे. रे. वुडसैड आणि डॉ. न्यूटन यांना राजाने घरे दिली. प्रार्थना, दवाखान्याचे काम, शाळेत शिकविणे, धर्मशाळेकडे लक्ष पुरविणे, ही कामे दोघे मिशनरी करतात. राजपुत्रांनाही ते शिकवितात. हे राजपुत्र अत्यंत हुशार असून पुढे विलायतेस शिक्षणासाठी जाणार आहेत. राजधानीतील शाळेत सर्व म्हणजे १२० मुले पवित्र शास्त्र वाचून ज्ञान मिळवितात. आणखी तीन नव्या शाळा स्थापन होणार आहेत. दाकतर न्यूटन गरिबांना धर्म वाटतात. दवाखान्यातही गोरगरिबांची फार गर्दी असते. मिशनरीसाहेब सर्वांना तारणाचे सुवर्तमान कळकळीने शिकवितात. इकडे पीक फार आहे, परंतु कामकरी थोडेच आहेत. न थकता परिश्रम केले, तर मोठे परिणाम जाणवतील.

**१५९२ अ** (इंम : १६१–१६२)

**१८९३** (२० : ११, १ ज्यून ६१, १६७–१६९)

गेल्या वर्षी मि. जी. ज्यान यांनी तैपिंगच्या राजाची नांकिंग शहरात भेट घेतली. त्या राजाने ठरविले की, मूर्तिपूजेचा कडू वृक्ष समूळ उपटून टाकून ख्रिस्तीधर्मरूप जीवनाचे गोड झाड लावावे. देवाच्या मदतीने हे साध्य होईल. शुभवर्तमानाचा प्रसार सर्व पृथ्वीवर झाला पाहिजे, हे आमचे मत परदेशस्थ भावांना कळवा, अशीही त्याने विनंती केली. राजपुत्राने असा हुकूम काढला आहे की, धर्मोपदेशकांना देशात कोठेही हिंडण्यास परवानगी आहे. परमेश्वराने कृपा करून हा धर्म स्वीकारण्याची आम्हांस संधी दिल्ही. ईश्वर, ख्रिस्त आणि राजा, यांची आज्ञा मिळाली आहे. सध्या लढाईचे त्रासदायक वातावरण असल्यामुळे मिशनेऱ्यांना काही इजा होण्याचा संभव आहे. तथापि हे सर्वजण विश्वासू आणि निष्कपटी आहेत. सर्व मांडलिक राजांनी आपल्या सरदारांना हुकूम देऊन या धर्मोपदेशकांना सवलती उपलब्ध करून द्याव्यात. प्रीतीने व एकचित्ताने त्यांच्याशी वागून त्यांना कुटुंबातील नातलगाप्रमाणे वागवावे. राजाने हा हुकूम मुलाकडून देवविला. कारण मुलास ख्रिस्ताबद्दल प्रीती वाटावी, असे त्यास वाटते. मूर्तिपूजा, अफूबाजी व दुराचार नाहीसे होऊन तेथे नवा धर्म प्रस्थापित होईल. यात काही शंका नाही. सगळे चिनी लोक तारणाच्या मार्गावर यावेत, यासाठी सर्वांनी प्रार्थना कराव्यात.

**१८९३ अ** (इंग : १६६–१६७)

१८९४ (२० : ११, १ ज्यून ६१, १६९–१७१)

साताऱ्यापासून बारा कोसांवर खातगुण गावी पीर होता, असे 'एक ख्रिस्ती' पत्रात म्हणतो. पण एका गृहस्थाने स्वप्नाचे ढोंग सांगून तो पीर रहिमतपूरला नेला. ताराबाई लावंड या स्त्रीसही घुमाडले. तेव्हा तिनेही जरा ढोंग करून पीर पुन्हा आपल्या गावी नेला. एका वृक्षाखाली नाडापुडी व उदबत्ती पाहून लोकांचा विश्वास बसला. हा चमत्कार कळल्यावर भोवतालच्या अनेक गावांतील लोक पीर वलीच्या दर्शनास जमा झाले. कितीतरी मेंढरे मारून त्यांची कंदुरी करण्यात आली. नवसावाचूनही ईश्वर मुले देतो, मग गरीब प्राण्याचा जीव का घेता? असे विचारले, तेव्हा ते गप्प बसले. न्यायी व दयाळू येशूची हकिगत त्यांना सांगितली, तेव्हा त्यांनी राम-रहीम ऐक्याची कबुली दिली. परंतु त्यांना येशू माहीत नव्हता. दाविदाचे गीत समजावून सांगितल्यावर मात्र त्यांनी येशूबद्दल आपलेपणा दाखविला. कुराणात पीराचे नाव नसताना त्याची भक्ती होते, मग येशूचे मोठेपण समजून घेण्यास काय हरकत आहे? एकादशीच्या दिवशी बकरी कशाला मारली? असे त्यांना विचारले, तेव्हा हिंदू फार चपापले. पापाचा पश्चात्ताप करून ख्रिस्तास शरण जावे, म्हणजे तारण मिळते, यावर त्यांना उपदेश केला. खारीक-खोबरे व बत्तासे उधळून त्यांनी पीराची पालखी मिरवली. चार दिवसानंतर यात्रा उलगडली.

१५९५ (२० : ११, १ ज्यून ६१, १७१–१७५)

'पुष्टीकरण' लिहितो की : रावसाहेब भास्कर दामोदर यांच्या समर्थनासाठी काही डिफेन्सवाले पुढे आले. ते स्वतःही असेच बोलतात. पुनर्विवाह प्रकरणी त्यांची मते कायम आहेत. वांगी खाऊ नयेत म्हणणाऱ्या पुराणिकाप्रमाणे ते वागताहेत. पुराणिक स्वतः वांगी खातो, तसे हे बाळनवरीशी विवाह करतात. पुनर्विवाहाची चाल निदान २५ जणांनी सुरू करावी, म्हणजे सर्वांना धैर्य येईल. नाहीतर जातीवाळ होण्याचे भय आहे. सबब, हे दादासाहेब व रावसाहेब दिवाभीतांसारखे मागे राहातात. छळास आणि बहिष्कारास बिचकतात. कोणी बोलले, तर म्हणतात विटंवना करू नका. यांच्या सबबी व बहाणे अगदी पळपळीत आहेत. लोकांची अनुकूलता मिळवण्यास निश्चय व धैर्य यांची गरज आहे. वाट पाहात बसल्यामुळे काही होत नसते. स्वतः केले पाहिजे. इतर लोक दूध ओततील, म्हणून सगळेच पाणी टाकतात व दुधाचा हौद भरत नाही. तिसऱ्या एडवर्ड राजास केवळ सहा लोक बळी हवे होते. तेव्हा एकाने धैर्य केल्यावरच इतर पाच समोर आले. लूथराने अज्ञानग्रस्त धर्मावर हल्ला चढवला. धर्मोपदेशक तर अंगुष्ठापासून मस्तकापर्यंत पापात व दुराचरणात बुडाले होते. त्याने लोकोत्तर धैर्य दाखविले. म्हणून पृथ्वीचे कल्याण झाले. यांच्यापेक्षा महिपतराम हजार वाट्यांनी बरा म्हणावा लागेल. त्यांचे पाहून काही लोक तरी विलायतेस जाऊ लागतील. जर आपणांत धैर्य नसेल, तर सुधारणुकीच्या गपा मारू नयेत. अनुकूलतेची वाट पाहाणारांच्या हातून काहीही काम होणार नाही. स्वतः दीपिकाकर्ताही पुनर्विवाहास प्रतिकूल दिसतो. या जुन्या कपीला असलीच मते शोभतात.

१६९६ (२० : ११, १ ज्यून ६१, १७५)

जो कोणी आपली स्तुती आपणच करितो, स्वतःस बाखाणितो, माझ्या मते मी थोर आहे, असे म्हणतो, त्याचे सर्व जगात हसू होते. म्हणून मनात नम्र भाव बागवावा. दुसरे जर आपली स्तुती करू लागले, तर तो स्तुतिवाद नम्रतेने ग्रहण करावा. चांगले गुण संकोचवृत्तीने शोभतात आणि सुधारतात. आपल्याजवळ नसलेली पदवी किंवा सद्गुण यांचा डौल घातला, तर आपला उपहास होतो. त्याची उघडीक लवकर होते. सर्वत्र अनादर होतो. आपले मत काय ते उत्कृष्ट आणि इतरांचे ते निकृष्ट आहे, असे मानण्याचा निर्बंध करावा. कदाचित आपल्या आसमंतातले लोकच खरा विचार करीत असतील. आपण खोटे असू शकू, असे जाणू लागणे व तसे वागणे, ही मोठी गोष्ट आहे.

१६९७ (२० : ११, १ ज्यून ६१, १७५–१७६)

एका डोम कावळ्याला मोराचा वेष हवा होता. त्याच्याप्रमाणे उत्तम पक्षी होणे नको होते. अहंकाराने फुगून जाऊन त्याने मोराच्या पंखांनी स्वतःला खूप नटविले. असा पिचडवेष धारण केल्यावर त्याने आपल्या मंडळीचा त्याग केला व तो मोरासारख्या सभ्य प्राण्यांशी सहवास करू लागला. त्याचा खोटा डौल पाहून मोरांनी ओळखले की, हा तोतया आहे. त्यांनी संतापून त्याची सगळी पिसे बुचाडून त्यास त्याच्या भाऊबंदाकडे पाठवून दिल्हे. पण त्याच्या जातवाल्यांनीही त्याचा धिक्कारच केला. उपहास व हेळणा, हा वास्तविक दंड त्यास मिळाला. (शालोपयोगी नीतिग्रन्थावरून)

१६९८ (२० : ११, १ ज्यून ६१, १७६)

सतीवर कायद्याने बंदी असतानाही सतीचे अघोर प्रकार उत्तरेकडे पुन्हा होत आहेत. कुत्रे आपल्या ओकीकडे आणि धुतलेली डुकरीण पुन्हा गाळाकडे जात आहेत : जुन्या म्हणी खऱ्या असतात.

१८९९ (२० : ११, १ ज्यून ६१, १७६)

मद्रास वेधशाळेचा अधिकारी मि. पेगन याने एका नवीन ग्रहाचा शोध लावला असून त्याला 'एशिया' असे नाव दिले आहे. असा शोध लावणारा तो हिंदुस्थानातील पहिला खगोलतज्ज्ञ ठरेल.

१९०० (२० : ११, १ ज्यून ६१, १७६)

पेशावरजवळ युसफसाई पर्वतामध्ये काही दगडी पुतळे सापडले. त्यांचे पोशाक सध्याच्या बंगाली लोकांप्रमाणे आहेत. प्राचीन काळी नाश पावलेल्या एखाद्या शहराचे शेष तेथे सापडण्याचा संभव आहे. काही लेख व जिनसा सापडल्या तर जुन्या इतिहासावर प्रकाश पडेल.

१९०१ (२० : ११, १ ज्यून ६१, १७६)

कलकत्त्यात तीन मनुष्यांना उपदेशकाची दीक्षा देण्यात आली. रे. लाल बिहारी यास फ्री चर्च मिशनने पालक म्हणून निवडून घेतले आहे.

मुंबई, एक्सचेंज प्रेस, फोर्ट

## ज्ञानोदय, पुस्तक २०, अंक १२, मुंबई, १५ ज्यून १८६१

**१६०२** (२० : १२, १५ ज्यून ६१, १७९–१८५)

कलकत्ता शहरात तिघा नेटिवांना उपदेशकाची दीक्षा देण्यात आली. ज्या शहरात चाळीस वर्षांपूर्वी एकही ख्रिस्ती नव्हता, तेथे शेकडो ख्रिस्त्यांची गर्दी प्रार्थनामंदिरात झाली. गेली ४५ वर्षे हे मिशन तेथे काय करते. बाबू ताराप्रसाद चतरजी म्हणाला की : मी आता शुभवर्तमान गाजवीन. खोट्या धर्माच्या जुवाखाली लोक कण्हताना मी पाहातो. येशूच्या रक्ताकडून त्यांचे तारण होईल. पवित्र शास्त्राने मला खोट्या भ्रांतीतून सोडवले. खांबी दिल्हेला येशू अमर आत्म्याचे तारण करतो. ईश्वरास आत्म्याने व खरेपणाने भजावे. मी रस्त्यावर, बाजारात व देवळातही उपदेश करीन. प्रभूच्या द्राक्षमळ्यात काम करून आयुष्य वेचीन. बाबू काशीनाथ दत्त म्हणाला की : येशूने मला अंधारातून उजेडात आणले. नाशाच्या मार्गाने जाणारांना मी तारणाचा मार्ग दाखवीन. दुष्टांना पापातून सोडवीन. त्यांना न्यायीकृत व पवित्र बनवीन. माझी मिथ्याचारातून सुटका झाली आहे. शाळेत शिकविण्याचे व भाषांतरे करण्याचे काम मी करीन. बाबू सूर्यकुमाराने सांगितले की : मी मनोभावाने ख्रिस्ती धर्म स्वीकारला. कारण तो स्वार्थाचा धर्म नाहीं, प्रीतीचा आहे. ईश्वराने मला उजेड आणि मसलत द्यावीत. अशुद्ध आत्म्याचे सैन्य काढून टाकण्याचे सामर्थ्य फक्त येशूमध्ये आहे. तो गौरवाचे तेज आणि तत्त्वाची प्रतिमा आहे. माझा देह आणि आत्मा मी त्याला अर्पण केला आहे. पाठलाग व दुःख सोसून मी त्याचे काम करीन. म्हाताऱ्या पौलसप्रमाणे आता मला जगणे हे ख्रिस्त, व मरणे हा लाभ आहे.

**१६०२ अ** (इंम : १७७–१७९)

**१६०३** (२० : १२, १५ ज्यून ६१, १८६–१८९)

पुणे शहरात अनेक जागी दारूची दुकाने सुरू झाली. यावर ज्ञानप्रकाशकर्ता लिहितो की : 'सरकारची नजर फक्त पैशावर दिसते आहे. हिंदूंच्या व मुसलमानांच्या शास्त्रांनी मद्याचा कडक शब्दात निषेध केला आहे. पूर्वीच्या राजांनी दारूस असे उत्तेजन दिलेहे नव्हते. इंग्रजांनी मद्याचे कारखाने गल्लोगल्ली माजविले. पाद्री लोक तर सगळ्या हिंदुस्थानला ब्रह्मज्ञान शिकविण्याची जपमाळ हातात घेऊन हिंडतात. अमेरिकेत दारूवर कायद्याने बंदी आहे. या व्यसनाने माणसाची दुर्दशा होते, हे उघड असताना केवळ फायद्यासाठी हे प्रकार चालतात. सरकारच जनतेच्या नाशास उद्युक्त झाले, असे म्हटले पाहिजे. अवघ्या चार रुपये करासाठी सरकार मद्यालयास आश्रय देते. उष्ण हवेच्या देशात मद्यपानामुळे विलायतेपेक्षा जास्त नुकसान होते. उत्तरोत्तर गटारात लोळणाऱ्या झिंग्या लोकांची संख्या वाढेल. 'यावर ज्ञानोदयकर्ता म्हणतो की : ज्ञानप्रकाशचे लिहिणे अगदी यथार्थ आहे. सरकारचे मन वळविणे फक्त ईश्वराच्या हातात आहे. ब्राह्मणांमध्येच मद्यपानाचे व्यसन जास्त दिसते. शाक्त पंथीयांची मात्र चांगली सोय झाली. पाद्री लोक पोकळ पांडित्य करतात, असे तो म्हणतो. पण आमच्या हातात कसलाही अधिकार नाही. भाषण आणि लेखन यांद्वारे याचा निषेध करण्यापलिकडे आम्ही काही करू शकत नाही. सरकार दारूचा अनर्थ थांबवीत नाही, म्हणून आमचे बोलणे काही पोकळ ठरणार नाही. आम्ही अनेक शहरांत मद्यपान निषेधक मंडळ्या स्थापन केल्या. ख्रिस्ती लोकही जर पीत असतील, तर ते फार हानिकारक आहे.

**१६०३ अ** (इंम : १८५–१८६)

१६०४ (२० : १२, १५ जून ६१, १८९–१९१)

वायव्य प्रांतातील दुष्काळाची भयानकता अजून कायमच आहे. तरी रीलीफ कमिटीने १५ हजार लोकांचे प्राणरक्षण केले. दहा लाख रुपये इंग्लंडमध्ये जमले. सात लाख रुपये पेढीवर पडूनच आहेत. पैसा वक्तशीर गेला असता, तर हजारो लोकांचे प्राण वाचवता आले असते. देणारे देतात, पण कोठीवाले खर्चिण्यास मागेपुढे पाहातात.

१६०५ (२० : १२, १५ जून ६१, १८९–१९१)

१८५७ च्या बंडामधील युसुफखान या सरदारास राणीने क्षमा केली होती. परंतु तो बंडखोरांशी फितुरीने पत्रव्यवहार करीत आहे, असे सिद्ध झाले. यावरून त्यास फाशी दिल्हे आहे. दुष्ट माणसांना क्षमा केली, तरी त्यांच्या मनात कृतज्ञताबुद्धी निर्माण होत नाही. यास्तव नानासाहेब पेशव्यालाही सरकारने क्षमा करू नये.

१६०६ (२० : १२, १५ जून ६१, १८९–१९१)

कलकत्त्याच्या बेथून सोसेटी या मंडळीत राजा काला कृष्ण याने निबंध वाचून सांगितले की, जुनाट संस्कृत ग्रंथांवरून असे अनुमान करता येते की, वाफेही अचाट शक्ती प्राचीन आर्यांना ठाऊक होती. वाफेच्या गाड्याविषयीची त्यांची माहिती तो पुढील सभेत मांडणार आहे.

१६०७ (२० : १२, १५ जून ६१, १८९–१९१)

मुंबई इलाख्यात ५ नवीन सरकारी शाळा सुरू झाल्या व ६५८ विद्यार्थी वाढले. १६५ देशी शाळा सुरू होऊन त्यांमध्ये ९४०१ विद्यार्थी जास्त आले.

१६०८ (२० : १२, १५ ज्यून ६१, १८९–१९१)

विद्याखात्याच्या खर्चामध्ये काटकसर केली जाईल. पण तपासनीस कमी केले, तरी शाळांची संख्या कमी करू नये, असे आम्हांस वाटते. सुरत-भडोच, पुणे-सोलापूर, या जिल्ह्यांचे एकीकरण होणार आहे. काही पलटणीही कमी होतील. दिवाणी कोर्टांमधील शास्त्री आणि मौलवी यांची संख्याही कमी करावी.

१६०९ (२० : १२, १५ ज्यून ६१, १९१–१९२)

मुंबईमधील चार काळ्या पलटणी कमी होणार आहेत व चार वर्षांपेक्षा कमी नोकरी असणाऱ्या शिपायांना डिचार मिळणार आहे. कमी केलेल्या लोकांना चार महिन्यांचा पगार व वाटखर्चही मिळेल. तो जर अधिकारी असेल, तर त्यास तरवार बाळगण्यास मुभा राहील.

१६१० (२० : १२, १५ ज्यून ६१, १९१–१९२)

बजारकराचा निषेध म्हणून मुंबईतील गायकसाई व बकरकसाई यांनी आपले काम बंद ठेवले होते. फोर्जेटनी समजूत घातल्यावर ते सुरू केले.

१६११ (२० : १२, १५ ज्यून ६१, १९१–१९२)

पुण्याजवळ घोरपडीच्या एका बंगल्यावर वीज पडून एक सोजीर मरण पावला व दोघे जखमी झाले. बंगल्यावर लोखंडी सीग असल्यामुळे बंगला शाबूद राहिला.

१६१२ (२० : १२, १५ ज्यून ६१, १९१–१९२)

पुण्याच्या गणेशपेठ हौदावर बुरडांनी पाणी भरले, म्हणून ब्राह्मण लोकांनी तो हौद वर्ज्य केला. पुढे महारांनी तेथे पाणी भरल्यामुळे बुरड लोकांनीही तो हौद टाकला. महार-मांगाना सगळे हौद मोकळे झाले, तर पेशव्यांनी पोसलेल्या जातिभेद वृक्षाच्या मुळावरच घाव बसेल. बुरड व ब्राह्मण नगरात एकाच हौदावर पाणी भरतात. पण महारांना नीच मानतात. जातिभेद ही मूर्खपणाची समजूत होय. ब्राह्मणाच्या मांडीस मांडी लावून बसण्याचा त्यांचा हव्यास काही जात नाही.

१६१३ (२० : १२, १५ ज्यून ६१, १९१–१९२)

नर्मदेच्या काठावरील कोळशाच्या खाणीचे कारखाने सुरू करावे, असा इंग्रज व्यापाऱ्यांनी विचार केला आहे. हा कोळसा आगगाडीवर जाळून पाहून त्यांनी पसंत केला. लोखंडी रस्त्याची एक शाखा नर्मदेकडेही न्यावी, असा रेल्वे-कंपनीचा विचार आहे.

१६१४ (२० : १२, १५ ज्यून ६१, १९२)

युनैटेड स्तेत्सची खानेसुमारी झाली. त्यावरून असे दिसते की : तेथील लोकसंख्या ३ कोटी १३ लाख ७४ हजार ८५६ आहे. दहा वर्षांत ८१ लाख ८३ हजार लोक वाढले. गोऱ्यांची वृद्धी शें. ४१, तर गुलामांची शेंकडा २० आहे.

१६१५ (२० : १५, १५ ज्यून ६१, १९२)

नामदार राणी विक्तोऱ्या राणी यांची दुसरी कन्या प्रिन्सेस आलीस हिचे लग्न प्रिन्स लुईसशी होणार आहे, म्हणून तिला यंदा ३ लाख रुपये आंदण मिळतील. पुढे दरसाल ६० हजार रुपये मिळतील.

मुंबई, एक्सचेंज प्रेस, फोर्ट

**१६१६** (२० : १३, १ ज्युलै ६१, १९५–२००)

फतेगडच्या गोपाळ नामे न्हावी तरुणाने ख्रिस्ती धर्माची दीक्षा घेतली. मिशन शाळेत फी पडत नाही, म्हणून बापाने त्यास शाळेत घातले. वडलोपार्जित व्यवसायाचा कंटाळा येऊन तो वैद्य शाळेत शिकला. पुढे दवाखान्यात असिस्तंत झाला. ख्रिस्ती पंतोजींची ओळख झाल्यानंतर तो शास्त्र वाचू लागला. त्यास मनापासून वाटले की, आपण ख्रिस्ती व्हावे. रेव. फुलर्टनने त्यास दीक्षा देऊन त्याचे नांव हाज्न ठेवले. नंतर गोपाळचा बाप साहेबांकडे आला. पुत्र धर्मभ्रष्ट झाला, कुळास बट्टा लागला, असे तो म्हणाला. (मुलाने) आपले हात मोडून डोळ्याचे तेज नाहीसे केले असा आरोपही करू लागला. पण ख्रिस्ती धर्म बापावर प्रीति करावी असे शिकवतो, हे मुलाने त्यास समजून दिल्हे. थोडीफार झटापट झाल्यावर तो निघून गेला. दुसरे दिवशी दोन दांडगट लोकांना घेऊन तो गोपाळला नेण्यास आला. गोपाळचा निश्चय पाहून सर्वजण निघून गेले. पुढे गोपाळ हा वाईट चालीचा मुलगा आहे, अशा मजकुराची पत्रे येऊ लागली. तो मंडळीचा खराबा करील, अशी भीती लेखक बाळगीत असे. तेव्हा साहेब म्हणाले की : जर तो वाईट असेल, तर आमच्यात राहून नक्की सुधारेल. त्यास आनंदाने ख्रिस्ती राहू द्या. कारण येशू त्याच्या मनात सुभक्ती निर्माण करील. हिंदू लोक जात मोडण्याच्या प्रकारास फार भितात. दुराचरण करून रोग लागला, तरी त्यास वाईट समजत नाहीत. गंगेत बुडकुळी मारून ते मुक्त होतात.

**१६१६ अ** (इंम : १९३–१९५)

**१६१७** (२० : १३, १ ज्युलै ६१, २०२–२०४)

इंग्लंड-अमेरिकेप्रमाणे या देशावरही पवित्र आत्म्याची वृष्टी व्हावी, म्हणून लोक प्रार्थना करितात. मदुरा एथे नुकतेच धर्मसंजीवन झाले. ते हळूहळू दक्षिणेकडे पसरत आहे. रे. जेम्स हेरिक लिहितात की : अलिकडे चार महिन्यांत या देशात पवित्र आत्मा येऊन लोकांस त्यांची पापिष्ट अवस्था दाखवीत आहे. हे कृपेचे काम १॥ महिना चालूच आहे. पाप आणि पापावरून प्राप्त होणारे फळ पाहून मनस्वी दुःख होते. नंतर शांती, आनंद व वर्तणुकीत सुधारणा होणे, ही लक्षणे त्या सर्वांत दिसतात. मंडळीतल्या फुटीचा समेट झाला. लोक पूर्वीपेक्षाही जास्त धार्मिक झाले. मृत्यूनंतर देवाच्या उजवीकडे जागा मिळावी, म्हणून ते प्रयत्नशील आहेत. रे. जेसी लिहितात की : पाठशाळेतील विद्यार्थ्यांवर पवित्र आत्म्याची वृष्टी होत आहे. तीन नवे तरुण प्रभुभोजनासाठी आले. काहीजण एकदम इतके स्फुंदु लागले की, आम्हांस वाटले की त्यांना विंचवाने डंखिले असावे. दुःखाच्या कळा व ठणका लागल्याप्रमाणे ते ओरडत होते. त्यांची पापे त्याना टोचीत होती. प्रार्थना केल्यानंतर ते गुडघे टेकून व ऊर बडवून रडताना दिसले. दुःखाच्या झपाट्यात डोके आपटून घेत होते. त्यांना पापाची जाणीव असून परम दयाळू परमेश्वर त्यांना तारील. प्रार्थना केल्यावर ते थोडे शांत झाले. सुटीमध्येही देवाचे काम करण्याचा त्यांचा निश्चय आहे. हा अवघा अंधारभरित प्रदेश देवाच्या गौरवाने देदिप्यमान होईल.

**१६१७अ** (इंम : २००–२०२)

**१६१८** (२० : १३, १ ज्युलै ६१, २०५–२०६)

काही दिवसांपूर्वी मुंबईत दिवाळीबाई या विधवेचा एका गणपतराम नामे पुरुषाशी विवाह झाला. अनेक वजनदार नेटिव आले व त्यांनी मंडपास शोभा आणली. काही दिवस वृत्तपत्रांनी उलटसुलट चर्चाही केली. नंतर एका संपादकाने 'दिवाळी वाहू' या सहीचे एक पत्र छापले. त्यात पुनर्विवाहात पुढाकार घेणाऱ्या गृहस्थाची फार निंदा केली होती. या विवाहासाठी आपणांस एक हजाराचे बक्षिस व जातीत घेण्याची कबुली देण्यात आलेली होती, असे दिवाळीचे म्हणणे आहे. दीपिकेवरून असे कळते की, या दोघा दादलाबायकोंनी पुढाकार घेणारास खूप शिव्या दिल्या. पैसा जर मिळाला नाही, तर दिवाळीबाईस लाथ मारून हाकलून देण्याची धमकी गणपतरामाने दिल्ही. मग तिने आत्महत्या केली, तरी त्याला काही पर्वा वाटणार नाही. अशा घटनेने पुनर्विवाहविरोधकांना जास्तच स्फुरण येणार आहे. या देशातील अनर्थकारक चाली नाहीशा करण्याचे कार्य अशा द्रव्यलोभी मोलकऱ्यांच्या हातून होणार नाही : खरी कळकळ ज्यांना वाटते, त्यांनी अशा लालची लोकांची मदत घेऊ नये. निग्रह व मोठे मन असेल, तरच हाल सोसून मोठाल्या अनर्थांशी झोंबी घेता येईल. अशा लोकांनीच त्यावर प्रथम घाव घालावा.

**१६१८अ** (इंम : २०५)

**१६१९** (२० : १३, १ ज्युलै ६१, २०६–२०८)

वायव्य प्रांतातील दुष्काळग्रस्तांना मदत म्हणून विलायतेतून आणखी ५० हजार रुपये आले. पेशावर पासून अल्हाबादपर्यंत मदत देण्यात आली. ग. ज. साहेबांचा विचार असा दिसतो की : या निधीएवढी रक्कम लोकांनी द्यावी. पण ती आम्हांस योग्य वाटत नाही. पूर्वी गोळा केलेल्या रक्कमाही परत द्यावयास हव्यात.

१६२० (२० : १३, १ ज्युलै ६१, २०६–२०८)

पश्चिम इराणमध्ये नेस्तोऱ्यन मिशन म्हणजे बिघडलेल्या ख्रिस्ती लोकांसाठी मंडळी आहे. तेथील शाळेत ३ हजार शास्त्र वाचणारे लोक तयार झाले. नेस्तोऱ्यन भाषेत त्याचे भाषांतर झाले. युरोपात सिटी-मिशने चालवली जातात. या कार्यामुळे मिशनरी लोक स्वदेशाची सुधारणूक करण्याऐवजी बाहेरच्या देशांत जातात, हा आक्षेप निश्चित कमी होईल.

१६२१ (२० : १३, १ ज्युलै ६१, २०६–२०८)

राजा राम मोहन रायाच्या पुत्राने त्याचा श्राद्धविधी केला. हे सुधारणेस विरोधी आहे. जातिभ्रष्ट होणे नाहीसे व्हावे, म्हणून त्याने केलेले हे ढोंग होय. ज्ञानोदयकर्ता म्हणतो, असले सुधारणाविरोधी कृत्य करताना त्यास शरम वाटावयास पाहिजे. (प्रभोदयावरून).

१६२२ (२० : १३, १ ज्युलै ६१, २०६–२०८)

बंगालमध्ये न्हावी जातीमध्ये एक पुनर्विवाह झाला. वधू फक्त नऊ वर्षांची आहे. यावरून असे दिसते की, ब्राम्हणाप्रमाणे न्हावी लोकांतही पुनर्विवाहास प्रतिबंध असावा. स्नानसंध्येबरोबर इतर अनर्थकारक चालीसुद्धा यांनी गळ्यात घेतलेल्या दिसतात. नवरीचे वय अवघे नऊ आहे, म्हणजे हा विवाह सुधारणेच्या विरोधी आहे. त्यातून बालविबाहाच्या अनर्थकारक चालीलाच उत्तेजन मिळाले.

१६२३ (२० : १३, १ ज्यूलै ६१, २०६–२०८)

सन १८६० साली ५ लाख ७० हजार गठ्ठे कापसाची निर्यात झाली. या व्यवहारात ७५ लाख रुपयांचा तोटा झाला आहे. सालगुदस्ताच्या दुप्पट कापूस यंदा निर्यात झाला. अमेरिकेमध्ये लढाई चालू असल्यामुळे यंदा तिकडे कापूस गेला नाही.

१६२४ (२० : १३, १ ज्युलै ६१, २०६–२०८)

मद्रासचा ज्योतिषतज्ज्ञ पागसन याने एका नवीन ग्रहाचा शोध लावला आहे. त्याचे नाव 'एशिया' ठेवण्यात आले. तरी पण १० एप्रिल रोजी हार्वर्ड वेधशाळेत टुटलसाहेब यांना आणखी एका ग्रहाचा शोध लागला होता. मंगळ व बृहस्पती यांच्यामध्ये पागसनच्या ग्रहाचा क्रमांक ६६ ऐवजी ६७ राहील.

१६२५ (२० : १३, १ ज्युलै ६१, २०६–२०८)

मनुष्याच्या शरिरात एकूण २३० हाडे आहेत. फुप्फुसात हवा राहण्यासाठी ६० कोटी छिद्रे असतात : (सत्यदीपिकेवरून).

१६२६ (२० : १३, १ ज्युलै ६१, २०६–२०८)

तारखात्यामध्ये फार लुच्चेगिरी चालते. कारकून लोक एका व्यापाऱ्याच्या तारेचा मजकूर दुसऱ्याला सांगून हजारो रुपये कमावतात. ही ठकविद्येची शर्थच म्हणावी. मुंबईच्या कोर्टात यातून अनेक खटले दाखल होत आहेत.

१६२७ (२० : १३, १ज्युलै ६१, २०६–२०८)

पंजाबात इंग्रजांची रयत १ कोटी ४९ लाख, तर नेटिव संस्थानची प्रजा २ कोटी २० लाख आहे. पंजाबचे एकूण क्षेत्रफळ १ लाख ९७ हजार ३४९ चौ. मैल आहे. यात काश्मीरही आले.

१६२८ (२० : १३, १ ज्युलै ६१, २०६–२०८)

भायखळ्यातील इस्रायली लोकांच्या भजनालयाकरिता दोन लक्षांहून अधिक खर्च झाला.

मुंबई, एक्सचेंज प्रेस, फोर्ट

## ज्ञानोदय, पुस्तक २०, अंक १४, मुंबई, १५ ज्युलै १८६१

**१६२९** (२० : १४, १५ ज्युलै ६१, २१२–२१८)

गोपाळच्या दवाखान्यातील मोठा डाक्तर सुधारलेल्या मताचा डौल सांगतो, पण पाद्रीसाहेबांशी तो औपरोधिकपणे बोलला. पाद्रीलोक जगाची उलटापालट करतातच कशाला, असे त्याने विचारले. गोपाळच्या म्हाताऱ्या बापाला वेडे केले, म्हणून त्यांस दोष दिल्हा. पण पाद्रीलोक सगळे जग हाच स्वदेश समजतात. पौलसाच्या वेळी ज्ञानी व वैद्यदेखील मूर्तिपूजेच्या ढोंगात सांपडले होते. हिंदुस्थानात आत्मिक अंधार असून निर्जीव पदार्थांची पूजा होत असते. धंदेवाले लोक तर हत्यारे पुजतात. डाक्तर म्हणाला की, सगळे धर्म चांगले आहेत व देव एकच आहे. गोपाळ ख्रिस्ती झाला, म्हणून त्याच्या हातून कोणीही औषध घेणार नाही. काळ्या पलटणीवरच्या गोऱ्या डाक्तराकडून माणसे औषध घेतात. पण गोपाळास मात्र ते जातीबाळ करतील. लबाड माणसांइतकेच व्यसनी लोकही ख्रिस्ती धर्मात संपादले जात नाहीत. हिंदूंत मात्र ते चालतात. शेवटी डाक्तराने आरोप केला की, गोपाळने दवाखान्यातील पिचकाऱ्या व प्याले चोरली. गोपाळचे नातलग त्याला अजून सांगतात की, त्याने जातीत परत यावे. परंतु त्याने आपला निश्चय दृढ ठेवून त्यांना घालवून दिल्हे. आता त्याने कामाचाही राजीनामा दिला. कारण डाक्तर त्याजवर मोठ्या चोरीचा आरोप घालण्याचा संभव आहे. नातलगांचे वेडेपण धर्मांतर करणाऱ्या तरुणांना त्रासदायक ठरते. मोठे झुंज झाल्याशिवाय हिंदू धर्माचा पराभव होणार नाही. ख्रिस्ती धर्माच्या महत्कार्याकरिता हवा तो त्याग करण्यास उपदेशक तयार आहेत. ख्रिस्त शांतीसाठी नाही, तर तरवार गाजविण्याकरिता आला आहे.

**१६२९ अ** (इंग : २०९–२१२)

**१६३०** (२० : १४, १५ ज्युलै ६१, २२०-२२३)

डेरेक्तर हावर्ड यांनी ५९-६० चा विद्याखात्याचा रपोट दिला आहे. गेल्या ५ वर्षांत विद्येची बरीच बढती झाली. सन १८५५ त २९१ शाळा व २३,६८१ विद्यार्थी होते, तर १८६० त ७६१ शाळांत ४४,१६६ विद्यार्थी आहेत. नव पंतोजीही जास्त शिकलेले व सुधारक मताचे आहेत. पूर्वीचे गुरू सांगत की, पृथ्वी गोलाकार आहे, पण त्यांचा स्वतःचाच त्यावर विश्वास नव्हता. कारण पुराणात तसे वर्णन नाही. विद्यार्थीही मधूनच शाळा सोडून देत. आताचे विद्यार्थी इंग्रजीमध्ये फर्डा आहेत. शिक्षकही विद्वान असे आहेत. इंग्रजी शाळांपेक्षा देशी शाळांवर जास्त खर्च होतो. त्या शाळाही संख्येने कमी आहेत. इंग्रजी शाळांचा खर्चही फार असतो. शिक्षकांचे व प्रोफेसरांचे पगार ५०० ते ७०० असतात. इंग्रजी शिकवणे आवश्यक आहे. परंतु देशी भाषांनाही उत्तेजन द्यावयास हवे. इंग्रजी पुस्तकांची भाषांतरे करणे फार आवश्यक आहे. संस्थांनी शाळा ४१ वरून १२२ वर गेल्या. मिशनची संख्या तर ३५२८ शाळांत ९१,३३० विद्यार्थी एवढी प्रचंड झाली. इन्स्पेक्टर लोकांनी स्वतः परीक्षा घ्याव्यात आणि उमेदवारीची पद्धत बंद करावी, अशी सूचना खात्याने केली, कारण उमेदवार नेमण्यात वशिलेबाजी फार होते आहे. टोणग्या उमेदवारांना जागा देऊ नयेत. उत्साही व कामसू लोकच घ्यावेत. एकूण प्रजेच्या १३ टक्के विद्यार्थी शाळांत शिकत आहेत.

**१६३० अ** (इंग : २१८-२२०)

**१६३१** (२० : १४, १५ ज्युलै ६१, २२४)

१६ फेब्रुवारीस बंगालमधील तळ्यात चढउतार तयार झाले. हा धरणीकंपच होता. जमीन दबल्यामुळे तळ्याचे पाणी हेलकावले. याचवेळी बोर्निओ व सुमात्रा येथेही भूमिकंप झाला, अशा बातम्या आहेत. हिंदू समजतात त्याप्रमाणे हे दैवतांचे कृत्य खास नाही.

१६३२ (२० : १४, १५ ज्युलै ६१, २२४)

मि. वजीर बेग यांनी विलायतेत शस्त्रक्रियानिपुण अशी एम्. आर. सी. एस. पदवी मिळविली. इकडे येऊन ते वैद्याचे आणि उपदेशकाचेही काम करणार आहेत.

१६३३ (२० : १४, १५ ज्युलै ६१, २२४)

हिंदुस्थानातील लोखंडी रस्त्याचे काम चालूच राहील, असे आश्वासन पंतप्रधान चार्लस वुड यांनी दिल्हे आहे.

१६३४ (२० : १४, १५ ज्युलै ६१, २२४)

गतवर्षी इंग्लंडमध्ये दोन अर्ब दहा कोटी रुपयांचा माल आयात झाला.

१६३५ (२० : १४, १५ ज्युलै ६१, २२४)

८ जुलै १८६१ रोजी सूर्यग्रहण झाले. ते १ तास १६ मिनिटे टिकले. अभ्रामुळे ते दिसू शकले नाही.

मुंबई, एक्सचेंज प्रेस, फोर्ट

**१६३६** (२० : १५, १ आगस्त ६१, २२६–२३०)

रे. व्हैट आपल्या सुरस व्याख्यानात म्हणाले की, पुराणे मिथ्या व मूर्ख आहेत. दुर्गुणी व्यक्तींचे ती समर्थन करतात. वेदही फार खराब आहेत. वेद ब्रह्मदेवाने केले किंवा ते ब्रह्मदेवाच्या आधी होते, असे हवे तर माना. पण सुनसेप, कण्व, पराशर, यांनी ते रचले. ऋग्वेदच यात मुख्य आहे. इंद्र, वायु, मरुत्, वरुण व उष या देवतांची त्यात प्रार्थना आहे. परंतु सध्या त्यांची पूजाही होत नाही. म्हणजेच हिंदूंची दैवते काळानुसार बदलली. महाभूतांचे ऋग्वेदकृत वर्णन चमत्कारपूर्ण व कविलाघवयुक्त असे आहे. उदा. मरुत् रथातून येतो. अग्नीच्या मुखाने देव अन्नाचे भक्षण करतात. ऋग्वेदातील देवता सोमरस पिऊन नृत्य करतात. जगिक गोष्टींची त्यांना हाव आहे. संपत्तीचे व युद्धातील जयाचे त्यांना वेड आहे. पाप व तारण यांविषयी वेदात थोडाही उल्लेख नाही. दैवतांनी यथेच्छ मद्य पिण्यास द्यावे, याकरिता ऋग्वेदात प्रार्थना आहेत. मूळ ईश्वरापेक्षा अग्नीलाच अकारण महत्त्व दिले आहे. वेदात वर्णभेद आणि पशुयज्ञ यांचा काही उल्लेख नाही. मांसाशन मात्र आहे. वेदांचा अर्थही नीट कळत नाही. अटकळपंचविशीने अर्थ करावा लागतो. सध्याचे ब्राह्मण त्यातला धर्म पाळीत नाही. आपले मत पक्के धारण करणे, एवढाच धर्माचा अर्थ होऊन बसला आहे. वेदांतील प्रार्थनेने पापाचा नाश होणे फार कठीण आहे. म्हणून खऱ्या व श्रीमंत देवास शरण जावे.

**१६३६ अ** (इंग : २२५–२२६)

१६३७ (२० : १५, १ आगस्त ६१, २३१–२३४)

वर्तमानदीपिकाकर्ता लिहितो की : प्रत्येकास आपल्या धर्माप्रमाणे वागण्याचा अधिकार आहे, म्हणून यापुढे आम्ही बाट्ये संज्ञा वापरणार नाही. हिंदू धर्माचा त्याग करणे, हे काही गाय कापण्याइतके दुष्कर्म नाही. खिस्ती झालेल्यांना लोक धोंडे मारतात, त्यांची दुर्धा करतात, ते उपदेश करीत असताना त्यांचा पाठलाग करतात, हे लाजिरवाणे असे कृत्य होय. काहीजण तर त्यांस मारण्यास धावतात. हा केवळ माथेफिरूपणा आहे. आमच्या देशात अनेक पंथ, धर्म, व जाती आहेत. स्वामीनारायण पंथात शेकडो लोक गेले. शाक्त तर इतके आहेत की, त्यांनी होर्मसजी पेस्तनजीच्या दुकानातील गावठी व इंग्रजी दारू महाग करून टाकली. कासम खाटकाच्या दुकानातला माल हातोहात खपतो आहे. मग एखाद्याचे खरे मतपरिवर्तन झाले, तर त्याला त्रास देणे अयोग्य होय. वादविवाद करणे योग्य आहे. पण हुल्लडबाजी करणे अयोग्य होय. द्वेषबुद्धी फार वाईट असते. शिव्या आणि मारहाण, हे तर मूर्खांचे काम आहे. आम्ही हे मत नेहमी प्रकटपणाने मांडले आहे. आम्हास ढोंग करणे आवडत नाही. या मजकुराचे सर्वांनी मनन करावे. खिस्ती बंधूंच्या योग्यतेस वाजवी मान द्यावा. दुष्ट आचरण करू नये.

१६३७ अ (इंम : २३०–२३१)

**१६३८** (२० : १५, १ आगस्त ६१, २३५–२३८)

रंगुबाई व बाळाजी रघुनाथ या ब्राह्मणी जोडप्याचा पुनर्विवाह झाला आहे. रंगूबाईचे पहिले लग्न सातव्या वर्षी झाले. नवरा मेल्यावर ती धीराने माहेरी राही. पण तिच्या आईने ब्राह्मणांच्या सल्ल्यावरून तिचे केशवपन म्हणजे गंगाविधी करावा असे ठरविले. याच सुमारास तिची बाळाजीशी ओळख झाली. तो पोलिसांचा पटेवाला आहे. दोघांचा काही कुव्यवहार झाल्यावर तिच्या भावाने तिला मारहाण करीत वेशीपर्यंत नेले. वेशीच्या पहारेकऱ्यांनी तिला फौजदाराच्या संरक्षणामध्ये ठेवले. तिने जबाब दिल्हा की माहेरी माझ्या जीवास धोका होईल. काही कारकुनांनीही तिला फितविण्याचा प्रयत्न करून 'तसेच' ठेवण्याचा घाट घातला. पण ती निश्चयाने बाळाजी बरोबर निघून गेली. नंतर बाळाजी परत अहमदनगरास आला. तेव्हा रे. विष्णु भास्करांशी त्याची गाठ पडली. त्यांनी अगोदर लग्न करा व नंतर ख्रिस्ती शास्त्र ऐकत जा, असा सल्ला दिल्हा. विष्णुपंतांनी त्यांचे लग्न लावले. ख्रिस्ती लोक वाईट चालीच्या माणसांना आश्रय देतात, अशी लोक उघडपणे टीका करतात. पण हेच लोक तिला 'वाईट' बनवीत होते. कोणाजवळही तशी राहा, असा साळसूद सल्ला देत होते. ब्राह्मणी राज्यात विधवा बाईस अतिशय क्रूर वर्तणूक मिळे. विधवेच्या पुनर्लग्नास पवित्र शास्त्र पूर्ण मुभा देते. दुःखात जळणे किंवा पाप करणे अयोग्य होय.

**१६३८अ** (इंग : २३४–२३५)

**१६३९** (२० : १५, १ आगस्त ६१, २३८–२४०)

दुष्काळाच्या चौकशी कमिशनने केलेल्या रिपोर्टात म्हटले आहे की : निदान १५ लाख लोक अन्नपाण्यावाचून मेले. पण रीलीफ कमिटीने अन्न पुरवून याच्या दुप्पट लोक वाचवले. गुरे तर सर्वच मेली. मालमत्तेचे नुकसान ३ लाखावर गेलेले आहे.

१६४० (२० : १५, १ आगस्त ६१, २३८–२४०)

अमृतसर एथे ७ शेर वजनाची उल्का पडली. ती इंग्लंडच्या पदार्थसंग्रहालयात ठेवली जाईल.

१६४१ (२० : १५, १ आगस्त ६१, २३८–२४०)

४ जुलैपासून नवे शेंडेनक्षत्र दिसू लागले.

१६४२ (२० : १५, १ आगस्त ६१, २३८–२४०)

निजामाचा वजीर सालारजंग याने इंग्रजांना १८५७ मध्ये मदत केली, म्हणून त्याचे कर्ज माफ करण्यात आले. पण निजामाचे दरबारी त्याच्याविरुद्ध निजामाचे कान भरवीत आहेत व इंग्रजांशी मिळून तो मोगलाईचे नुकसान करील, अशी समजूत करून देत आहेत. निजाम दुसरा वजीर नेमणार आहे.

१६४३ (२० : १५, १ आगस्त ६१, २३८–२४०)

रावळपिंडीच्या पलटणीत एक मोठा सर्प आला आणि तो वाद्यांचा आवाज ऐकत बराच वेळ बसला. सैनिकांनी त्यास मारले.

१६४४ (२० : १५, १ आगस्त ६१, २३८–२४०)

चीनमध्ये एक स्त्री नवऱ्याच्या मृत्यूनंतर सती गेली. तिने स्वतःस गळफास लावून घेतला. मृत्यूपूर्वी ती आपल्या मुलांशी प्रेमाने बोलली. (प्रभोदयवरून)

**१६४५** (२० : १५, १ आगस्त ६१, २३८–२४०)

सर जमशेटजी जिजीभाई यांना विलायतेत गेल्यावरती न्हावण्याचा अजब अनुभव आला. त्यांनी कित्येक मराठे चाकर बरोबर नेले. त्यांत एक हजाम होता. त्याच्या जातवाल्यांनी त्याच्यावर बहिष्कार टाकला होता. पुढे शेटजींनी बुंदीचे जेवण दिल्हे. तेव्हा त्याच्यावरचा जातीवाळ संपला. बुंदीने बाट हटविला.

**१६४६** (२० : १५, १ आगस्त ६१, २३८–२४०)

बडोद्याच्या गायकवाडाचे दिवाण कोल्हापुरास गेले आहेत. दरबारातील आपल्या हितशत्रूंचा नाश व्हावा, म्हणून ते देवीची आराधना करणार आहेत. (प्रभोदयवरून)

**१६४७** (२० : १५, १ आगस्त ६१, २३८–२४०)

सन १८५८-५९ मध्ये टपाल खात्यास २५ लाख रुपये उत्पन्न मिळाले. या खात्याचा खर्च मात्र ५२ लाख झाला. एकूण तोटा ३ लाख झाला. तरी लोकांस वाटते की, टपालाच्या योगाने सरकारला किफायत होते.

**१६४८** (२० : १५, १ आगस्त ६१, २३८–२४०)

म्हैसूरच्या राजवंशातील मि. जलालुद्दीन गवर्णर जनरलच्या दरबारास जोडे घालून गेला होता. याने साहेबांची बेअदबी झाली, म्हणून त्याचे नाव दरबारने यादीतून काढून टाकले.

मुंबई, एक्सचेंज प्रेस, फोर्ट

**१६४९** (२० : १६, १५ आगस्त ६१, २३८–२४०)

वेणीमाधव चक्रवर्ती या तरुण ब्राह्मणाने डाक्तर डफ याजकडून बाप्तिस्मा घेतला. त्याने इंग्रजी भाषेचा चांगला अभ्यास केल्यानंतर त्याचे मन हिंदूंच्या मूर्खाचारावरून उडाले. नास्तिकांची मते त्याला आवडत नाहीत. ब्राह्मण ज्यांस वेदांत म्हणतात त्यापेक्षा मूळचे अद्वैतमत अगदी वेगळे आहे. सगळी सृष्टी म्हणजे केवळ आभासच होय, असे अद्वैतमत सांगते. ब्रम्हो समाजाने युरोपियन एकेश्वर मताशी त्याची विलक्षण भेसळ करून तीनशेसाठ ठिगळांची कथा तयार केली आहे. शिवाय हिंदूंच्या आचारविचारांशी तिचा मेळदेखील बसत नाही. म्हणून आपल्या सदसद्विवेकबुद्धीला अनुसरून तो खिस्ती झाला आहे. पूर्वी वेणीमाधव खिस्तमतावर कडक टीका करीत असे. टीका करण्यासाठी त्याने बायबल विकत घेतले. पण ईश्वरी सूत्र एवढे विलक्षण आहे की, त्याचाच संपूर्ण मनपालट झाला. नातलगांचो निंदा किंवा पाठलाग यांस तो घाबरला नाही. एक बिंदू पडला. आता मोठा पाऊस केव्हा पडेल ?

**१६४९ अ** (इंम : २४१)

**१६५०** (२० : १६, १५ आगस्त ६१, २४३–२४४)

एक स्कॉच मिशनरी पत्रात लिहितो की : शबाथाच्या दिवशी एक ९६ वर्षांचा महंमदी गृहस्थ माझ्या घरी आला. तो फार शांत स्वभावाचा व विचारी आहे. त्याने एकाग्र चित्ताने उपदेश ऐकला. पवित्र शास्त्राचे पुस्तक त्यांनी हृदयाशी धरले. तो म्हणतो की : 'मी मेलेल्या माणसांशी काही संबंध ठेवणार नाही. आतापर्यंत मी फार चूक केली. माझा तारणारा येशूच असून तो जिवंत देव आहे, याविषयी माझी खात्री पटली आहे. गौरवी परमेश्वराने तेजस्वी सूर्य निर्माण केला. मसिहा येशू हा इमान्वेल म्हणजे आमच्या संगती देव असा आहे. आजपासून मी त्यालाच माझा तारणारा, असे मानीन. माझ्यासारख्या अनाथ पाप्यास तोच तारील.' त्याचे बोलणे ऐकून सर्वजण गहिवरले.

**१६५० अ** (इंम : २४३)

**१६५१** (२० : १६, १५ आगस्त ६१, २४५–२४६)

'ब्राह्मणाचे कल्याण इच्छिणारा' पत्रात लिहितो की : नगरचे एक वेदसंपन्न गृहस्थ कोर्टात शास्त्राचे काम करीत असत. त्यांचे कुटुंब १५ वर्षांमागे निवर्तले. त्यांची काळीकभीण कृत्ये लिहिणेदेखील शरमेचे आहे. ते एका विधवा कन्येच्या मुलीच्या घरात गेले असता, तिच्या नवऱ्याने त्यांना 'येथेच्छ कुट्टा' खाऊ घातला. शास्त्रीबुवांनी ही 'मसलत' कशीतरी मिटविली. जजसाहेबांना हे कळेल, म्हणून या वृद्ध पाप्याने पेन्शन मिळविली. त्यांच्या मुलाने त्यांना दुसरे लग्न करण्याचा सल्ला दिल्हा होता. पण त्यांनी मानला नाही. पण त्यांनी विधवेसी विवाह करून पुनर्विवाहाचे श्रेय मिळवावे. एखाद्या कुवासणी स्त्रीला सुवासणी करून घ्यावे. यांचा धर्म म्हणजे घाणेऱ्या पाण्याचे डबके आहे. त्या रेंद्यात कित्येक बेडूक लोळत असतील.

**१६५१ अ** (इंम : २४४–२४५)

**१६८२** (२० : १६, १५ आगस्त ६१, २४६–२४८)

'लोककल्याणेच्छू' पत्रात म्हणतो की : गेली काही वर्षे मोहरमचा बंदोबस्त चांगला होता. शांतता, हत्यारबंदी, कैफ न करणे, जनावरांची अगर शिद्याची सोंगे न घेणे, वगैरे शिस्त पाळण्यात आली. परंतु या वर्षी वाघांच्या सोंगाचा सुकाळ झाला. तासे व डफडी यांच्या भडभडाटाने शहर रात्रंदिवस दणाणत होते. हिलालाची व दारूची मनस्वी घाण सुटली. सोंगे करणारांकडून जातमुचलका लिहून घेतल्यामुळे तंटेबखेडे झाले नाहीत. पण कामगार वर्गानेसुद्धा सोंगे घेऊन फार धामधूम उडविली. काही वर्षे वाटले होते की, या मूर्ख चाली बुडाल्या. पण यंदा वेडीविद्रं सोंगे फार हिंडली. सुधारणेच्या पंथात पडलेले पाऊल खूपच मागे आले. अंमलदारवर्गाने यावर नियंत्रण घालावे. मोरो जनार्दन या मुनसफाने नोकरीत कायम होण्याचा नवस फेडला. बारा इमामांसाठी सगळा पगार उधळला. १५० रुपये तेल, दारू आणि खेड्या यांत खर्च केले. काय हा उधळेपणा! एका भोळ्या भाट्याने तर तीनहजार रुपये रोख दिल्हे. धुंक्याप्रमाणे द्रव्य खर्चून हे लोक गलेफ व समया देतात. दुसऱ्या धर्मांच्या देवाचे उपकार मानणे अजब आहे. म्हणून खऱ्या देवास शरण जावे. या अज्ञानाच्या बंधनातून तोच आम्हांस मुक्त करील.

**१६८२ अ** (इंम : २४८–२४९)

**१६८३** (२० : १६, १५ आगस्त ६१, २४९–२५१)

पत्रलेखक 'सूचक' लिहितो की : खोट्या धर्माविरुद्ध आणि खऱ्या धर्माच्या बाजूने प्रमाण देण्याचे काम पुस्तकमंडळी करते. लोकांच्या बोलभाषेत पुस्तक प्रसिद्ध झाले, तर पुष्कळ लोक पुस्तके वाचतात. ती लाभदायक ठरतात. इकडील मुसलमान लोकांकरिता जी पुस्तके लिहिली जातात, ती हिंदुस्थानी, उडदु किंवा फारशीत आहेत. मुस्लीमांतले विद्वान लोकच ही पुस्तके वाचू शकतात. इतर मुसलमानांच्या दृष्टीने ती असून नसून सारखीच आहेत. पढिक लोक त्यांना वाचूनही दाखवीत नाहीत. वाचले, तरी त्यातले उंच उंच शब्द समजत नाहीत. ते अशुद्ध उर्दू बोलतात. मराठी मात्र त्यांना कळते. म्हणून 'मिजानुल हक' यासारख्या पुस्तकांचे भाषांतर व्हावयास हवे. म्हणजे आपल्या धर्माचे वास्तविक रूप त्यांना कळून येईल. काही खिस्ती उपदेशकांना मौल्वीशी वाद करण्यास त्यांचा उपयोग होईल. बाबा पद्मनजीने हिंदू व खिस्ती धर्मांची तुलना संवादाच्या रूपाने लिहिले, तसे पुस्तक मराठीत झाले, तर ते उपयुक्त ठरेल.

**१६८३ अ** (इंग : २५१)

**१६८४** (२० : १६, १५ आगस्त ६१, २५२)

अमेरिकन लोकांनी जपानी लोकांशी मैत्री वाढविण्याकरिता काही सुंदर व मनोरंजक जिनसा बक्षिस दिल्या आहेत. त्यांपैकी एक स्वाराची गाडी सुंदर व टुमदार होती. त्यात लहान लेकरूसुद्धा बसू शकले नसते. तरी लोक तिच्या दमणीच्या किनाऱ्यास घट्ट धरून बसले. चक्राकार लोखंडी रस्त्यावरही गाडी ताशी वीस मैलांच्या वेगाने फिरत होती. एक गृहस्थ गाडीने फिरताना इतक्या मोठ्याने हसत होता की, त्याचे शरीर खळखळा हालत होते. ज्यापानात उत्तरोत्तर ज्ञानाची प्रगती होणार आहे. त्यांच्या अज्ञानरूप अंधाराने भरलेल्या मनात ईश्वरी शास्त्राच्या ज्ञानाचा प्रकाश लवकर पडणार आहे.

१६५४ अ (इंम : २५१)

१६५५ (२० : १६, १५ आगस्त ६१, २५२–२५३)

एका मराठी कवीने म्हटले आहे : 'आम्ही जातीचे ब्राह्मण। आमचे सोयरे मुसलमान।' अफगाणिस्थानात ख्रिस्ती उपदेशकांचे भाषण लोक शांततेने ऐकतात. परंतु काही दिवसांपूर्वी सिंधू नदीच्या काठावरील माकड (मकद्) या गावी लोकांनी त्यांचा पाठलाग करून शिवीगाळ व धिंगामस्ती केली. येथील औलियासाधूंनी भिंत पळविली, वाघावर स्वार होऊन सापाचे चाबूक केले, पाखंडी मताची पुस्तके कोरी करून टाकली, कन्यांना पुत्र बनविले, असल्या कथा येथे प्रचलित आहेत. विशेष म्हणजे हिंदू लोकांतही असले चमत्कार करणारे साधू अनेक होऊन गेले. या दोहोंमधले साम्य पहिल्यावर हिंदूंचेच भाऊ मुसलमान आहेत, यात काहीही शंका राहणार नाही. नेटिव लोकांच्या तीर्थक्षेत्राचे लोक फार दांडगे व उद्धट असतात. वास्तविक महापुरुषाची समाधी किंवा कबर जेथे असेल, तिथले लोकसुद्धा सदाचारी सात्त्विक आणि प्रीतिमान असले पाहिजेत.

१६५६ (२० : १६, १५ आगस्त ६१, २५३–२५६)

वायव्य प्रांतातील दुष्काळी विभागात पर्जन्य पडला. जिकडे तिकडे हिरवी राने दिसतात. तरीही अन्न मागणारे स्त्रीपुरुषांचे घोळके कमी झाले नाहीत.

१६५७ (२० : १६, १५ आगस्त ६१, २५३–२५६)

गुजरातेतील भाट लोक बाप्पा व कवने गाऊन पोट भरतात. राजे व बादशहा त्यांच्याकडून कसलाही कर घेत नसत. प्राप्तिकराची आकारणी असेसराकडून भाटांनाही आली, तेव्हा ते फौजदाराकडे गेले. हातात सुऱ्या घेऊन धमक्या देऊ लागले. ते बायकांसह आले होते. सगळी कुटुंबे सुरीने स्वतःस मारून जमिनीवर रक्त शिंपडीत व कामदारांना शिव्याशाप देत होती. यात काही लोक प्राणास मुकले. अज्ञानी भाटात अद्याप शांतता झालेली नाही.

१६५८ (२० : १६, १५ आगस्त ६१, २५३–२५६)

द्वारकेच्या वाघर बंडखोरांचे बंड मोडल्यानंतर हे लोक गावाकडे जाऊन शेती करू लागले.

१६५९ (२० : १६, १५ आगस्त ६१, २५३–२५६)

आयर्लंडची प्रजा दहा वर्षांत शेकडा १२ टक्क्यांनी कमी झाली.

१६६० (२० : १६, १५ आगस्त ६१, २५३–२५६)

व्हिक्टोऱ्या राणीने 'इंदियन आर्दर आफ नैटहुड' हा नवा किताब सुरू केला असून एकनिष्ठ संस्थानिकांना व कर्तबगार युरोपियनांना ही पदवी दिल्ही जाईल.

१६६१ (२० : १६, १५ आगस्त ६१, २५३–२५६)

तुर्की बादशहा अब्दुल मेजदीद मरण पावला. त्याने २२ वर्षे राज्य केले. रशियाने त्याच्यावर स्वारी केली, तेव्हा इंग्रजांनी त्याला फार मदत केली. म्हणून त्याने मिशनांना परवानगी दिल्ही. आता त्याचा भाऊ अब्दुल अझीझ हा शहाणा, विचारी, सुधारक बादशहा झाला आहे.

**१६६२** (२० : १६, १५ आगस्त ६१, २५३–२५६)

रोमचा पोप गंभीर रीत्या आजारी आहे.

**१६६३** (२० : १६, १५ आगस्त ६१, २५३–२५६)

इतालीतील संस्थानांचे एकीकरण होऊन सार्दिन्याच्या अधिपत्याखाली एकच राज्य झाले. विक्तर इमान्युएल यास पोपने शाप दिल्हा होता की, याचे राज्य बुडून जाईल. पण तो शाप विफल ठरला. या राजास फ्रेंच व तुर्क राजांनी मान्यता दिल्ही.

**१६६४** (२० : १६, १५ आगस्त ६१, २५३–२५६)

अमेरिकेतील लढाई अजून मिटली नाही. उभय पक्षांना मनापासून वाटते की, लढाई थांबावी.

**१६६५** (२० : १६, १५ आगस्त ६१, २५३–२५६)

इराणाची राजधानी तेहराण येथे मोठा दुष्काळ पडलेला असताना अन्न वाटणाऱ्या अधिकाऱ्यांनी वशिलेबाजी केली, तेव्हा फ्रेंच सैनिकांनी स्वतःचे अन्न लोकांना वाटून दिल्हे. इराणी लोकांनी फ्रेंचांबद्दल फार प्रेम वाटू लागले आहे.

**१६६६** (२० : १६, १५ आगस्त ६१, २५३–२५६)

रेवरंड ट्टिंग पेशावरच्या रस्त्यावर उपदेश करीत होते, तेव्हा एका मुस्लिमाने त्यांच्यावर सुरी उगारली. लोकांनी त्यास पकडून कोतवालाच्या ताब्यात दिल्हे. कैद्यास पकडणाऱ्या लोकांना प्रत्येकी १०० रुपयांचे बक्षिस देण्यात आले.

**१६६७** (२० : १६, १५ आगस्त ६१, २५३–२५६)

अयोध्येच्या सतीप्रकरणावरून कित्येक नातेवाईकांना सक्तमजुरीच्या शिक्षा देण्यात आल्या.

१६६८ (२० : १६, १५ आगस्त ६१, २५३–२५६)

जगन्नाथाच्या यात्रेत लोकांनी या वर्षी रथ ओढण्यात विशेष उत्सुकता दाखविली नाही.

१६६९ (२० : १६, १५ आगस्त ६१, २५३–२५६)

सांदविच बेटाची लोकसंख्या ६९,८०० इतकी आहे. गेल्या सात वर्षांत प्रजेची संख्या एकसारखी घटते आहे. ओबाहु बेटात मात्र २ टक्के, तर लाना बेटात ४॥ टक्के, इतकी प्रजावृद्धी झाली.

१६७० (२० : १६, १५ आगस्त ६१, २५३–२५६)

सन १८६०-६१ मध्ये चर्च सोसायटीस १४ लाख ९१ हजार रुपये मिळाले. त्यात १९२ परदेशी, तर ६६ नेटिव्ह उपदेशक आहेत. तिनीविली मिशनास १६०० नवे खिस्ती लोक मिळाले. लंडन मिशनरी सोसायटीस ८ लाख ८३ हजार रुपये मिळाले, तर वेस्लियन मिशनास १४ लाख मिळाले. अमेरिकन बोर्डास सुमारे ८ लाख ५९ हजार, तर त्राक्त सोसैटीस १० लाख ३१ हजार मिळाले. बैबल सोसायटीला १६ लाख ७९ हजार रुपये मिळाले. मंडळीतर्फे १७ लाख ८७ हजार पवित्रशास्त्राच्या प्रती खपल्या.

१६७१ (२० : १६, १५ आगस्त ६१, २५३–२५६)

गतवर्षी लंडन शहराची लोकसंख्या २८ लाख ३ हजार ३४ इतकी होती.

**१६७२** (२० : १६, १५ ऑगस्त ६१, २५३–२५६)

सन १८६२ मध्ये इंग्लंड देशात नवे पदार्थ संग्रहालय होणार आहे. त्याकरिता १० लाख टन लोखंड व तितकेच लाकूड हवे आहे. ६ लाख चौरस फूट भिंगे लागतील. विजापूरची थोरली तोफ नेण्यासाठी किती खर्च येईल, याचा अंदाज काढण्याचे काम चालू आहे. हे राक्षसी उल्हाट यंत्र अहमदनगर मुक्कामी ओतण्यात आले.

मुंबई, एक्सचेंज प्रेस, फोर्ट

## ज्ञानोदय, पुस्तक २०, अंक १७, मुंबई, १ सप्टेंबर १८६१

**१६७३** (२० : १७, १ सप्टेंबर ६१, २५८–२५९)

अमेरिकेत लढाई चालू असल्यामुळे अमेरिकन मिशनांना पूर्वीप्रमाणे पैशाचा पुरवठा होत नाही. तरीही कित्येक साहेबलोक आणि एत्तद्देशी मित्र नेहमी मदत करतात. काम अडू देत नाहीत. एका हिंदू गृहस्थानेही १०० रुपये मदत पाठविली. तो म्हणतो की : 'माझा ख्रिस्ती धर्मावर विश्वास नाही. परंतु तुम्ही मिशनरी लोक आमच्या देशबांधवांच्या सुधारणुकीसाठी श्रम घेता, म्हणून मी हे साहाय्य देत आहे'. या गृहस्थाने सुज्ञपणाने मिशन्यांच्या परोपकारिक हेतूची साक्ष दिली. यापेक्षा चांगला दाखला तो काय असतो ? परंतु आमची खात्री आहे की, शुभवर्तमानात खांबी दिलेल्या ख्रिस्ताची गोष्ट नसती, तर ते पोकळ व निरुपयोगी ठरले असते. हा धर्म सफळ, कल्याणकारक आणि ईश्वरदत्त आहे. ख्रिस्ती धर्माबद्दल कित्येक हिंदू मनातून प्रीती बाळगतात. ख्रिस्ती लोकांची ममता, कळवळा व सन्मान त्यांच्या मनामध्ये वसत असतात. या स्नेहभावाची आम्ही वृद्धी करू. सत्याचा शोध, तसेच जनकल्याणाचे विविध उपाय यांबाबतीत सहकार्य करू.

**१६७३ अ** (इंग : २५७)

**१६७४** (२० : १७, १ सप्टेंबर ६१, २५९–२६०)

दिल्ली मिशनाचे कार्य दिवसेंदिवस वृद्धिंगत होते आहे. यंदा १०० मनुष्यांचा बाप्तिस्मा झाला. दोन नवी भजनालये बांधून झाली. तिसरे लवकरच पूर्ण होईल. सहा मंडळ्या धर्मप्रसाराचे काम करतात. लहान मुलांची शाळा व प्रौढ शिक्षणाचे वर्गसुद्धा नियमित चालतात. आठवड्यातून एकदा सामुदायिक प्रार्थना होते. सगळे ख्रिस्ती गरिबीतून आले आहेत. दिल्लीच्या बादशहाची एक नात ख्रिस्ती झाली. ती गरीब असली, तरी आकाशाच्या राज्याची वारसदारीण झाली. एका जमीनदारानेही दिक्षा घेतली. तो मजुरांमध्ये धर्मप्रसार करतो. बंडाच्या धामधुमीत मडमेचा प्राण वाचविणाऱ्या मौलवीचा मुलगाही ख्रिस्ती झाला. मीरत ते रोहिलखंड या प्रदेशात देवाचे नाव गाजत आहे. असे जर कामकरी मिळाले, तर पुष्कळ पिकाची कापणी होईल.

**१६७४ अ** (इंग : २५९)

१६७८ (२० : १७, १ सप्टेंबर ६१, २६१–२६२)

लंडनमध्ये भाषण देताना ओडिसाने माजी रेवरंड विल्किन्सन म्हणाले की : एक ब्रिटिश अंमलदार अशा मताचा होता की, मिशनेऱ्यांच्या कार्यास चांगले फळ येणे कठीण आहे. कारण एक तर नेटिवलोक धर्म बदलणार नाहीत व बदलला, तरी ते चांगले खिस्ती होणे कठीण आहे. तेव्हा धर्मोपदेशकाने गंगाधर नावाच्या नेटिव खिस्त्याशी त्याची भेट घडविली. हा गंगाधर पूर्वी एका देवळाचा पुजारी होता. त्याचे उत्पन्न मोठे होते. पण मनात पालट झाल्यावर त्याने सर्व उत्पन्न सोडले. हे कळल्यावर अंमलदार चकित झाला. गंगाधर काही पोटासाठी खिस्ती झाला नव्हता. देवावरचा विश्वास उडत चालल्यावर त्याने देवासमोर बसून दोन दिवस अखंड शिव्या दिल्या, पण देवाने त्याला काहीही केले नाही. तेव्हा हा खरा देव नाही, अशी त्याची खातरी झाली. शेवटी त्यानेच अंमलदाराची परीक्षा घेतली व म्हटले की, 'साहेब तुम्ही तरी खरे खिस्ती आहात का ?' यावर साहेब रागावून निघून गेला.

१६७८ अ (इंग : २६०–२६१)

**१६७६** (२० : १७, १ सप्टेंबर ६१, २६३–२६५)

रे. व्हैट साहेबांनीं तुर्कस्थानात एक चमत्कारिक माणूस पाहिला. तो पांगळा असून ईबरहून किल्सिगावी आला आहे. त्याच्या शरीरास व्याधी जडली असून अनेक व्यंगे उत्पन्न झाली आहेत. अत्यंत अशक्त व दयनीय अवस्थेत तो पडून असतो. शरीरास २० वर्षे तिडका लागल्या असूनसुद्धा तो विव्हळत नाही. ४-५ वर्षांपूर्वी तो अधम व दुराचारी होता. त्याने प्रातस्तंत धर्माविषयी ऐकले व ख्रिस्ताचा अंगीकार केला. या आजारी चोराचा हृदयपालट झाला. त्याचे अंतःकरण शांतीने व आनंदाने भरलेले आहे. अपंग अवस्थेतही तो वाचावयास शिकला. तो म्हणतो की : ईश्वराची इच्छा असेल तेव्हा स्वर्गांत जाण्यास आपण तयार आहोत. पापाची क्षमा किंवा सार्वकालिक जीवन ही विकत घेण्याच्या वस्तू नाहीत. शुभवर्तमानाचे सामर्थ्य त्याच्या बोलण्यावरून समजते. शारीरीकदृष्ट्या त्याच्याएवढा हतभाग्य प्राणी कोणी नाही. याच्या उलट आत्मिकदृष्ट्या त्याच्याएवढा सुखी व भाग्यवान प्राणी कोणी नाही. त्याचे शांतवन करण्यास जे जातात त्यानाच तो उपदेश करतो. डोंगरवट प्रदेशातही ख्रिस्ती धर्माचे खमीर पसरत आहे. त्याच्या प्रयत्नावरून दहा कुटुंबांनी ख्रिस्ताचा अंगीकार केला.

**१६७६ अ** (इंम : २६२–२६३)

**१६७७** (२० : १७, १ सप्टेंबर ६१, २६५)

मिरजापुरचे खैर ख्वाही हिंद हे वृत्तपत्र १८५७ च्या धामधुमीत बंद पडले होते. ते पुन्हा चालू झाले, याकरिता आम्हांस आनंद वाटतो. पहिल्या अंकात अनेक उपयुक्त असे विषय असून ज्या ख्रिस्तभक्तांनी धर्मप्रीत्यर्थ प्राण गमावले, त्यांचे वृत्तांत येणार म्हणून सर्वांना हर्ष वाटत आहे. उत्तरेकडे यास चांगला आश्रय मिळेल, अशी आशा वाटते.

१६७७ अ (इंग : २६५)

१६७८ (२० : १७, १ सप्टेंबर ६१, २६५–२६८)

वर्तमानदीपीकेचा कर्ता लिहितो की : बाळाजी व रंगुबाई यांना वाळीत टाकण्यात काही चूक नव्हती. शिवाय, बहिष्कारामुळेच ही दोघे ख्रिस्ती मंडळीस मिळाली. व्यभिचारासच लग्नाची संज्ञा प्राप्त झाली आहे. यावर आमचे म्हणणे असे की : नातलगांच्या जुलूमशाहीस ती कंटाळली होती. दुष्कर्मावरून बहिष्कार टाकला. पण नगरच्या एका 'शास्त्रावरून' असे दिसेल की, अशा कारणावरून पुष्कळांना वाळीत टाकावे लागेल. रंगूबाईच्या गौप्य व्यभिचारास ते संमती देण्यास तयार होते. रेवरंड विष्णुपंतांनी त्यांना लगेच बाप्तिस्माही दिल्हा नाही. नीट अभ्यास करा, तूर्त ख्रिस्ती पद्धतीने लग्न करा, असे सांगितले. ब्राह्मण तर बाळाजीस ख्रिस्ताकडे न जाण्याची गळ घालीत होते. त्यांचे लग्न लावण्यात अनुचित तर काही नाहीच, परंतु दुराचाराची बंदी मात्र झाली. यास पुनर्विवाह म्हणता येत नाही, असे दीपिकाकर्ते म्हणतात. पण असे ५–१० प्रकार घडल्यावर हिंदूंचा पुनर्विवाहविरोध नक्कीच कमी होईल, असे आम्हांस वाटते. विवाह झाला, तरीही तो कुसंगापूर्वी झाला पाहिजे होता, अशा बोलण्यात आता काय अर्थ आहे? अशाने बापड्या विधवांना कोण अंगीकारील? हिंदू रीतीने लग्न झाले नाही, ही एक पोकळ सबब आहे.

१६७९ (२० : १७, १ सप्टेंबर ६१, २६८–२७२)

'देशाभिमानी' पत्रात म्हणतो की : जन्मठेपेची कैद झालेल्या माणसास तेथील पारतंत्र्य, हलके अन्न व लाताबुक्के, यांची इतकी सवय होते की, त्यास बाहेरचे जग आवडेनासे होते. त्याप्रमाणे हिंदूंतील जातिभेदाची स्थिती आहे. जातिभेदातून मुक्त व्हावे असे त्यांना वाटत नाही. या कडू जहर वृक्षापासून फार हानी आहे. तो समूळ उपटावा. जातिभेदाने एकी नाहीशी होते. लोकांत दुफळ्या-तिफळ्या होतात. द्वेष वाढतो. जातींतील भांडणे जेवणावरून मिटतात. तरी हा द्वेष कायम राहातो. जातिभेदाने देशाभिमान नाहीसा होतो. स्वतःला उंच मानून लोक दुसऱ्या जातीस तुडवितात. अट्टल हिंदू व अर्धेकच्चे सुधारलेले यांच्यात देशाचा अभिमान दिसत नाही. उमेदवारीच्या परीक्षांत नातलगांची वर्णी लावली जाते. कोणीही खरे व अंतःकरणपूर्वक देशाभिमानी नाहीत. जातिभेदाने सोयरिकी मिळत नाहीत. विवाहाच्या निवडीचे क्षेत्र संकुचित होते. योग्य जावई मिळण्याची पंचाईत पडते. आपोआप सुधारणा होईल, अशी समजूत करून बसू नये. परमहंस मंडळी चांगले कार्य करते. लूथराने धैर्य केले नसते, तर धर्मसुधारणा झाली असती का ? भ्रमिष्ट मते बाजूस ठेवून सतत उद्योग केला पाहिजे.

१६८० (२० : १७, १ सप्टेंबर ६१, २७२)

वायव्य प्रांतात पटकीचा मनस्वी उपद्रव चालू आहे. दररोज ३००-४०० लोक मरतात. गोरे लोक व मोठे साहेबही बहुत मेले.

१६८१ (२० : १७, १ सप्टेंबर ६१, २७२)

कलकत्ता बंदरातून १५ कोटी ५० लाखांचा माल निर्यात झाला, तर १५ कोटी ३३ लाखांचा माल आयात झाला. १६ लाख ३० हजार ५४० रुपयांचा नफा मिळाला.

मुंबई, एक्सचेंज प्रेस, फोर्ट

**१६८२** (२० : १८, १६ सप्टेंबर ६१, २७५–२७८)

'एक हिंदू' ने 'जातिभेद विवेकसार' हे पुस्तक लिहून देशबंधूंना नजर केले आहे. प्राचीन काळी गुणकर्मावरून वर्णभेद सिद्ध होत असे, परंतु ब्राह्मणांनी असा मतलबी नियम केला की, सगळे ब्राह्मण जन्माने पवित्र ठरावे. इतर वर्णांनीही असेच आपस्वार्थी व थोतांड नियम केले. युरोपात जातीपेक्षा रोजगार महत्त्वाचा असतो. विष्णुबावालासुद्धा जातिभेदाचे समर्थन करता आलेले नाही. मद्यपान व सोन्याची चोरी ही बहिष्काराची कारणे ब्राह्मण मानणार नाहीत. कारण ते 'अक्षय ब्राह्मण' आहेत. जो स्वतः पवित्र आहे, त्यालाच इतरांना वाळीत टाकता येईल. पण बाटामध्ये पचूनही ते स्वतःला शुद्ध समजतात. पुनर्विवाह, नियोग, परदेशगमन, या चालीरीतीही त्यांनी बंद केल्या. वर्णामध्ये उद्योगाच्या वाटणीची कल्पना होती. पण जातिभेदाने घोडा व डुक्कर इतका भेद तयार झाला. पूर्वी जात्यंतर केलेल्यांची यादीही लेखकाने दिल्ही आहे. ब्राह्मणांचे ढोंग त्याने उघड करून सांगितले. हलक्या जातीचा सदाचारी त्यांना अस्पर्श्य वाटतो. यातून अनीतीची वृद्धी मात्र होते. जातिनियमात मेळ काही नाही. कित्येकजण मांसाहार करतात, तरी त्यांचे ब्राह्मणत्व कायम राहाते. बसव व नानक यांनी याविरुद्ध मोठी चळवळ केली. मंजुघोषाच्या वज्रसूची टीकेवरून जातिभेदाचे मूर्खत्व कळून येते. कित्येक ऋषींचे जन्म गाढवी, कोल्ही, बेडकी यांपासून झाले, असे पुराणे सांगतात. यांना जर ब्राह्मण म्हणावयाचे, तर ब्राह्मणत्व कोठे राहिले? अशा विवेचनाने हे पुस्तक फार उपयुक्त ठरले आहे.

**१६८२अ** (इंग : २७३–२७५)

**१६८३** (२० : १८, १६ सप्टेंबर ६१, २७८–२७९)

'ज्ञानोदय वाचणारा' लिहितो की : मूर्तिपूजा वद्यपक्षाच्या चंद्रासारखी क्षय पावते आहे. तिचा पाया घटता झाला. तिची निष्ठा ठेवणे लाजेचे वाटू लागले. नगरात एक विठ्ठलाची दिंडी निघाली, परंतु सालाबादप्रमाणे थाट नव्हता. वीणाचिपळ्यांचा आवाजही ऐकू येईना. काही पोरगेले तरुण मळक्या पताका घेऊन चालले होते. काही शूद्र व ब्राह्मण लाजत लाजतच पालखी वाहात होते. अवघी दिंडी अगदी उदास व सुतकी वाटली. जगन्नाथपुरीतच काय, पण इतरत्रही देवास अशी कळा येते आहे. ज्या देवांनी आकाश व पृथ्वी निर्माण केली नाही, ते या आकाशाखालून नाहीसे होणार.

**१६८३ अ** (इंम : २७९–२८०)

**१६८४** (२० : १८, १६ सप्टेंबर ६१, २८०–२८१)

इंदापूरचा 'स्वदेश हितेच्छु' हिंदु बातमीदार लिहितो की : येथे एक अजब विवाह झाला. थानतुऱ्या लेकरांचे विवाह करण्याची मूर्ख पद्धत तर आहेच. द्रव्यलोभाने थेरड्यांना लहान मुली देणे, बाहुलाबाहुलीची लग्ने लावणे, पिंपळाची मुंज, कारंजे व तुळशीशालिग्राम, यांचे लग्न, एवढे प्रकार अपुरे वाटून की काय, पतंगराव व बावडीबाई यांचा विवाह थाटाने झाला. हे नवे खूळ २-३ वर्षे सुरू आहे. १२ हात रुंदीची बावडी पेठची 'सून' झाली. पतंगराव कसब्यातून हत्तीची नौबद घेऊन मिरवीत आले. वऱ्हाडी ४०० वर होते : त्यांना डोल्याप्रमाणे मिरविणाऱ्या लोकांचे खांदे दुखले. नवरानवरीस कागद व रंगीत चित्रे यांनी सजविले होते. दारूकाम खूप झाले. तीन मण तेल जाळले गेले. वरातीस एवढी गर्दी झाली की, पोलीस नसते, तर मारामारीच झाली असती. काळ आणि द्रव्य यांचा हा मूर्ख अपव्यय आहे. असल्या विलक्षणिक विवाहांची पुनरावृत्ती होऊ नये, म्हणून वर्तमानपत्रकर्त्यांनी जागरूकपणे प्रयत्न करावयास हवेत.

१६८५ (२० : १८, १६ सप्टेंबर ६१, २८१–२८२)

'एतद्देशीय भाऊ' लिहितो कीं : काटकसरीच्या सरकारी धोरणानें अनेक कारकून बडतर्फ झाले. शिपायांच्याही नोकऱ्या गेल्या. याबद्दल ज्ञानप्रकाशात एकाने पत्र छापले. पण त्याने एक चूक केली आहे. १८५७ च्या शिपायांच्या बदफैलीमुळे सर्वच लोक सरकारास बेइमान वाटतात, असे पत्रलेखक म्हणतो. पण तसे काही नाही. गैरमाहितगार साहेब लोक असे मानीत असतील. पण ना. गवरनरांनी प्रसिद्धपणे जे सांगितले, त्यात कोणतीही सूडबुद्धी दिसत नाही. बड्याचे तेल वांग्यावर काढणारे हे सरकार नव्हे! सरकारला बंडाचा बीमोड करताना मनस्वी कर्ज झाले. कराच्या उत्पन्नातून ते फिटणार नाही. तरी त्यांनी निष्ठुरतेने कोणासही काढले नाही. उलट इतर ठिकाणच्या रिकाम्या जागांवर त्यांची व्यवस्था लावली. त्यांच्या जुन्या पगाराचे अबस्त्राक्ट पाहून त्यांना तोच पगार कायम राहील, अशी तजवीज केली. म्हणून त्यांना खोटे दोष कोणी लावू नयेत. कारकूनलोक एकाच रोजगारावर अवलंबून राहातात. त्यांना लिहिणे फक्त जमते. तेही सावकारी हिशेब जमत नाहीत. पटेवाले शेतीचा व्यवसाय करू शकतात. 'ब्राह्मणी उंचपणाचा अभिमान' आड आल्यामुळे कारकून कोणत्याही व्यवसायात सामावत नाहीत. म्हणून आता तरी त्यांनी व सध्या शिकणाऱ्या विद्यार्थ्यांनी पुस्तकी शिक्षणापेक्षा काहीतरी हुनर शिकून घ्यावे. उद्योग गेला, तरी माध्यान्हीची भ्रांती पडणार नाही, अशी तजवीज करून ठेवावी.

१६८६ (२० : १८, १६ सप्तेंबर ६१, २८३-२८४)

नगरचा बातमीदार कळवितो की : राइट हानराबल सर ज्यार्ज रसल क्लार्क यांची स्वारी नगरला एक दिवसाच्या भेटीस आली होती. चार दिवस आधीच त्यांचे सेवक तंबू राहुट्या देऊन येथे राहिले. त्यांच्या सन्मानार्थ मुलकी आणि लष्करी अंमलदारांनी मोठा अभूतपूर्व समारंभ केला. मानवंदनेसाठी तोफा, युरोपियन रिसाला, काळशा पलटणी, यांचा अर्ध मैलाचा ताफा तयार होता. साहेब व मडमीसुद्धा चांगला पोशाक करून आल्या होत्या. किल्ला व भोवतालचा प्रदेश यांत १०–१५ हजार माणसे समारंभ पाहात होती. गवर्णरांच्या सन्मानार्थ तोफांची सरबत्तीही झाली. लष्कराच्या दोन ओळीतून मिरवीत साहेब अडीच घुमटावरील आपल्या निवासस्थानी गेले. किल्ला, फौजदारी तुरुंग, इंग्रेजी-मराठी शाळा, या ठिकाणांना त्यांनी भेटी दिल्या. रात्री खाना व बाल-नाच झाला. दुसरे दिवशी ते परत गेले. त्यांनी एथे येऊन विशेष काही केले नाही. फक्त एका आजारी कैद्याची शिक्षा रद्द केली.

१६८७ (२० : १८, १६ सप्तेंबर ६१, २८४)

गांधीलमाशी मधमाशीस म्हणाली की : 'आपण दोघी सारख्या दिसत असता लोक मला कां टाळतात? शरीराभोवती सोन्याचे वेढे असल्यामुळे मी तुझ्यापेक्षा सुंदर दिसते. राग आला की, तूसुद्धा मजप्रमाणेच जोराने डसतेस! पण मनुष्ये माझा द्वेष करतात, मला जिवे मारावयास यत्न करितात. मी त्यांस चहाच्या मेजावर व अवघ्या जेवणात भेटत असतो. असे असून मला टाळतात व तू संकुचित असून तुला हिंमतऋतूत पेंढ्यांनी भरलेली घरे बांधून देतात.' यावर मधमाशींने उत्तर दिल्हे की : 'तुझ्या हातून त्यांचे बरे काहीच होत नाही. तू त्यांना श्रमकारक आणि अपकारक आहेस. मी मात्र त्यांच्यासाठी मध गोळा करित्ये. स्वागतहीन भेटीत तू उगीच वेळ घालवित्येस. त्यापेक्षा दुसऱ्यांना उपयुक्त ठरेल, असे काहीतरी करीत जा.'

१६८७ अ (इंम : २८४)

**१६८८** (२० : १८, १६ सप्टेंबर ६१, २८४)

चौथ्या पुस्तकातील अभंगात म्हटले आहे की : देवाने आपणांवर जो उपकार केला, त्याची मनात नेहमी आठवण ठेवावी. दयाळू ईश्वर सर्व जगाचा रक्षक व सर्व पदार्थांचा दाता आहे. देवावर भाव ठेवून नेहमी खरे बोलावे. देवाची आज्ञा मानावी व त्याचीच स्तुती करावी.

**१६८९** (२० : १८, १६ सप्टेंबर ६१, २८४–२८८)

वायव्य प्रांतातील दुष्काळ संपला. जिकडे तिकडे हिरवागार शेते दिसतात. विलायतेहून १५ लाख रुपयांची मदत आली होती. १ लाख रुपये शिल्लक आहेत. ते लंडनातील गरिबांच्या मदतीसाठी खर्चावे, ही गवर्णरची शिफारस मात्र योग्य नाही. आलेला पैसा परत देऊ नये.

**१६९०** (२० : १८, १६ सप्टेंबर ६१, २८४–२८८)

इंग्लंडहून एक हजार कापसाचे गठ्ठे अमेरिकेस रवाना झाले. अमेरिकन युद्धामुळे हिंदुस्थानातील कापसालाही मागणी आहे. तरी किफायत करून घेण्याची ही वेळ लोकांनी गमावू नये.

**१६९१** (२० : १८, १६ सप्टेंबर ६१, २८४–२८८)

पारा जर शरिरात गेला, तर तो फुटून निघतो व गुडघ्यात दर्द करतो. अज्ञाणी वैद्य औषधात पारा वापरून रोग्याचे नुकसान करतात. श्रीमंत लोकांच्या घरात पारा लावलेल्या कपटी आरशाचा फार वापर होतो. श्वासावाटे पाऱ्याचे कण शरीरात जातात. ऐनेमहालात राहणारा पीडा भोगतो. त्यापेक्षा शुद्ध रुप्याचे आरसे वापरावेत. त्यात तोंडही निर्मळ व ठळक दिसते. आरशापेक्षा एक पंचमांश परावर्तन जास्त होते.

**१६९२** (२० : १८, १६ सप्तेंबर ६१, २८४–२८८)

ज्यापानी लोक सुकलेले फुलांचे गेंद युक्तीने पुन्हा फुलवितात. विस्तवावर फुलांचे देठ धरले की, कारबोन निर्माण होतो व त्याच्या आधारावर ही फुले २०–२० दिवस टिकतात.

**१६९३** (२० : १८, १६ सप्तेंबर ६१, २८४–२८८)

व्हाइसराय लार्ड कानिंग यांच्या कामाची मुदत भरल्यामुळे ते परत जात आहेत. त्यांच्या जागेवर नामदार लार्ड एलगिनसाहेब येत आहेत. ते जमेका बेटावर आणि उत्तर कॅनडात गवर्णर होते. चिनी लढाईच्या वेळी ब्रिटिशांच्यातर्फे राजप्रतिनिधीही होते. दिल्लीच्या बंडातही त्यांनी चांगली कामगिरी बजावली.

**१६९४** (२० : १८, १६ सप्तेंबर ६१, २८४–२८८)

इ. सन १२०० मध्ये होकायंत्र तयार झाले. १२२१ मध्ये जमिनीत कोळश्याच्या खाणी सापडल्या. १३३० त तोफेची दारू शोधली गेली. १४३६ मध्ये पुस्तके छापण्याची युक्ती, तर १५४९ त दुर्बिणीची कल्पना, १७१० मध्ये न्युकीमचे वाफेचे यंत्र, १७७२ त सूत काढण्याचे यंत्र, १७७८ त रसायनातून वीज, १८०४ त धुराचे दिवे, १८१२ त शिळा छाप, १८१३ वाफेच्या यंत्राने जहाज चालविणे, १८३१ त वाफेच्या यंत्राच्या गाड्या, १८४८ त तारायंत्र, असे शोध आजपर्यंत लागले.

**१६९५** (२० : १८, १६ सप्तेंबर ६१, २८४–२८८)

३५ वर्षांच्या संशोधनानंतर एका युरोपियनाने जरीमरीवर रामबाण उपाय शोधला. 'कासिया' या औषधाने मरीचे जंतू मरतात. शरीरातून थोडे रक्त काढून त्यात कासिया मिसळतात व ते दंडात टोचतात. मात्र हे फार दाहक असल्यामुळे डोक्यावर थंड पाणी सारखे ओतावे लागते.

१६९६ (२० : १८, १६ सप्टेंबर ६१, २८४–२८८)

निजामाची स्वारी हैद्राबादच्या रस्त्याने जात असताना एका मत्त हत्तिणीने एका माणसास दातात धरले. शेजारच्या गृहस्थाने भाले टोचून तिला रक्तबंबाळ केले, तेव्हाच ती शांत झाली. दुसऱ्या एका मत्त हत्तीने पाचसहा घोड्यांना स्वारासह जमिनीवर लोळविले.

१६९७ (२० : १८, १६ सप्टेंबर ६१, २८४–२८८)

टुटिंगसाहेबास मारणाऱ्या अफगाण कैद्याने खोटीच दातखीळ बसवून अन्नसत्याग्रह केला. शेवटी डाक्तराने क्लोरोफार्म देऊन त्यास बेशुद्ध केले व पोटभर जेवू घातले.

१६९८ (२० : १८, १६ सप्टेंबर ६१, २८४–२८८)

दुष्काळ रीलीफ फंडास मदत म्हणून दिलेले १ लाख ६ हजार रुपये सरकार परत मागते आहे. यावरून किती अडचण होईल बरे!

१६९९ (२० : १८, १६ सप्टेंबर ६१, २८८)
लंदन या ठिकाणी सिंहासनावर आरूढ झालेली राणी विक्टोरिया ही आम्हा सर्वांची महाराणी आहे. देवाने तिला हे सिंहासन दिल्हे, म्हणून आम्ही त्याचे चरण धरतो. देव सर्वांचाच मायबाप असून कृपादृष्टीने तो तिचे रक्षण करतो. ही राणी दीर्घकाळ राहावी, अशी आमची इच्छा आहे. ती बालकांप्रमाणे आम्हांवर माया करते. तिचे यश देवाने विस्तरावे व तिला विजयी करावे. तिच्या राज्यपदास संकटे येऊ नयेत. लोकसुखासाठी तिने कायदे केले. त्यांचा आम्हांस फायदा होतो. तिची कीर्ती वाढावी म्हणून आम्ही गाणी गाऊ. देवा विश्वंभरा, राणीला सांभाळ. दाणादाणी होऊन राणी विजय पावो. शत्रूंची कारस्थाने मोडावीत. त्यांचे बेत मोडून पडावेत. आम्हांला देवाचा भरवसा वाटतो. त्याने उशीर न लावता आमचे रक्षण करावे. तो सर्वशक्त व सर्वज्ञ आहे. दयाळू व उदारांचा राणा आहे. हे देवा, आम्हांवर करुणा कर.
(पांचवे पुस्तक)

मुंबई, एक्सचेंज प्रेस, फोर्ट

## ज्ञानोदय, पुस्तक २०, अंक १९, मुंबई, १ आक्टोबर १८६१

**१७००** (२० : १९, १ आक्टोबर ६१, २९०–२९२)

गुन्हा शाबीद झाल्यावर एखाद्याला शिक्षा व्हावी, हे योग्य आहे. पण काही लोक चेवात येऊन वहिम्याची नीट चौकसीच न करता जुलमाने मारहाण करून गुन्ह्याची कबुली घेतात, साक्षीदार तयार करतात. संस्थानी प्रदेशात असे नेहमी घडते. पण इंगरेजी मुलखातही असे एक उदाहरण घडले. दूरच्या खेड्यात असा क्रूरपणा घडू शकतो. अहमदनगरजवळ चांदा या खेड्यात एका कुणब्याच्या बाईवर २३ रुपयांचा ऐवज चोरल्याबद्दल आरोप आला. दोन शिपयांनी चौकसी आरंभिली. बऱ्या बोलाने विचारल्यावर तिने आरोप अमान्य केला. तेव्हा यांनी तिला चिंचेच्या फोकाने बेदम मारले. तीन वेळा मारले, तेव्हा ती पैसे देण्यास मान्य झाली. पण चोरी तिने नाकबूलच केली. तिच्या नवऱ्यासही दमदाटी झाली. शेवटी तिने विहिरीत आत्महत्या केली. एक शिपाई कुणबी, तर दुसरा मुसलमान होता. त्यांनी पुरावा दाबून टाकण्याचा प्रयत्न केला. नवऱ्यानेही १५ दिवसानंतर फिर्याद दाखल केली. दोघा शिपायांना तीन वर्षांची ठेप झाली. त्यांचा बचाव करणारे महालकरी व फौजदार यांस संस्पेंड केले आहे.

**१७०० अ** (इंम : २८९–२९०)

**१७०१** (२० : १९, १ आक्टोबर ६१, २९२–२९४)

निळे पर्वत सुंदर दिसतात, म्हणून साहेबलोक नीलगिरी पर्वताच्या प्रदेशात विश्रांतीकरिता जातात. तेथे जर्मन मिशनेरीही देवाचे काम करतात. बदामा जातीतला एक अब्राहाम नावाचा माणूस त्यांच्या उपदेशाने खिस्ती झाला. पण त्याची निर्दय बायको त्याला घरात घेईना. दररोज दारांशी जाऊन तो आपल्या लाडक्या लेकरांस हाक मारी. पण ही स्त्री मुलांना त्याच्याकडे जाऊ देत नसे. मूर्तिपूजकांच्या भयाने तिने ३॥ महिने त्याची भेट होऊ दिली नाही. त्याचा पाडा नावाचा धाकटा मुलगा झुरू लागला, तेव्हा तिने त्यास घरात घेतले. अब्राहामाने मुलाची प्रकृती सुधारल्यावर त्याला मिशनाच्या शाळेत घातले. तो देवाच्या लोकांतच राहणार आहे.

**१७०१ अ** (इंम : २९२)

**१७०२** (२० : १९, १ आक्टोबर ६१, २९४–२९६)

रे. कोवन पत्रात लिहितात की : नाकै हा ८० वर्षांचा म्हातारा फार धार्मिक होता. तरुण मुलाप्रमाणे तो शुद्ध व जलद पवित्र शास्त्र वाची. शास्त्र म्हणजे त्याच्या जिवाचा ताईत होता. तो एकनिष्ठ व विश्वासू होता. मंडळीत येऊन ठराविक जागेवर बसून प्रार्थना करी. पाऊस पडला, तर नदीतून पोहत जाई. तो फारच उद्योगी व मेहनती होता. पालकाकरिता दररोज फळेही आणीत असे. हा आनंदी व सहनशील म्हातारा गरीबांचे दुःख दूर करीत असे. आपल्या नावाचा एक रुपया व पत्नीचे आठ आणे पेटीमध्ये टाकी. अंथरुणावर पडल्यानंतरही तो पैसे पाठवी. मृत्यूच्या आदल्या रात्री आपण उद्या आकाशात जाणार, असे सांगून त्याने बायकोजवळ अधेली दिल्ही. शाब्बाथ त्याच्या पवित्र आत्म्यावरच उगवला. येशूने त्यास मूर्तिपूजेच्या अशुद्धतेपासून खंडून सोडविले होते. २५–३० वर्षे त्याने पालकाच्या संगतीत घालविली.

**१७०२ अ** (इंम : २९४)

**१७०३** (२० : १९, १ आक्टोबर ६१, २९६–२९७).

'एक ख्रिस्तदास' लिहितो की : निघोज गावी दरसाल मळाई देवीची यात्रा भरते. देवळाजवळच नदी असून तीमध्ये काही कुंडे आहेत. कुंडामध्ये काही मासे फार मोठाले आहेत. त्यांना देवीचे मासे समजतात. हे मासे जर कोणी खाल्ले, तर देवी त्यांना शिक्षा करते, अशी इथे भावडी समजूत आहे. खरे म्हणजे ती जागा ओसाड व भयानक असल्यामुळे कोणी त्यांना पकडीत नाही. ख्रिस्ती लोकांनी निश्चय करून त्यांतला मासा पकडला आणि भाकरी बरोबर खाल्ला. 'जागृत' देवीने त्यांना काहीही त्रास दिल्हा नाही. म्हणजे देवीविषयीच्या समजुती सगळ्या खोट्या आहेत.

**१७०३ अ** (इंम : २९७–२९८)

**१७०४** (२० : १९, १ आक्टोबर ६१, २९८–३०१)

'जातिभेदविवेकसार'चा लेखक लिहितो की : सृष्टीच्या आरंभी सर्व मनुष्ये हंस वर्णाची होती. प्रथम ब्राह्मणांची एकच जात होती. कामाच्या वाटणीवरून चार वर्ण झाले. ब्राह्मण किंवा क्षत्रिय गुणकर्मावरून ठरू लागले. दुर्गुणी माणूस ब्राह्मणपदवीवरून खाली जाई. हलक्या वर्णातला सद्गुणी ब्राह्मणपदास पोहोचे. व्यासाने एका शूद्रास ब्राह्मण बनविले. चारी वर्णांत अन्नव्यवहार व लग्नसंबंध सर्रास होई. रामाने भिल्लीणीची उष्टी बोरे खाल्ली. ब्राह्मणाच्या घरचे श्राद्धविधी गोमांसाशिवाय होत नसत. मधुपर्के गोमांस आवश्यक होते. ब्राह्मणसुद्धा सुरापान करीत असत. पुढे ब्राह्मणांनी मद्यमांसभक्षण बंद केले. क्षत्रियांत व ब्राह्मणांत सर्रास अन्न व विवाह हे व्यवहार चालत. जमदग्नीची पत्नी रेणुका क्षत्रियवंशी होती. पराशरास सत्यवती या कोळणीपासून व्यास नामे पुत्र झाला. जोपर्यंत हा बंधुभाव कायम होता, तोपर्यंत हा समाजसमतोल होता. पण नंतर उच्च कुळामधील लोक हलकी कामे करू लागले व वर्णसंकर सुरू झाला. वहिवाट व सहवास बंद होऊन प्रत्येक जात वेगळी बनली. ब्राह्मणांच्या नीच कर्माने गोंधळ आणि अज्ञान वाढले. चार वर्ण बुडून जाऊन अनेक जातींची थोतांडे तयार झाली. कोणी कोणास विचारीनासे झाले. सध्याचे बेबंद जातिभेद तुटसपणा, दुरभिमान, गर्व, अविश्वास, दंभद्वेष या दुर्गुणांसाठीच जणू निपजले आहेत.

१७०५ (२० : १९, १ आक्टोबर ६१, ३०१–३०३)

'ज्ञानोदय वाचणारा' एक लिहितो की : बेलापूरच्या गरीब ब्राह्मणाने पैसा खर्च करून नेवाशात विठ्ठल-रखुमाईचे एक देऊळ बांधले. देवांना पितळी डागिण्यांनी सजवून तो पूजाअर्चा करी. पण रखुमाईची मूर्ती कोणीतरी चोरली. बिचाऱ्या पुजाऱ्याचे कष्ट तर वाया गेलेच, पण पोट भरण्याचे साधनही गेले. आता हा विठ्ठल आपल्या पट्टराणीच्या शोधासाठी दिंडिरवनात जाईल काय ? पत्नीवाचून तो प्राणत्याग करील, देह ठेवणार नाही. सहा सात दिवस झाले, तरी देवी सापडली नाही. सरकारी फडणीसाने चौकशीचा आदेश दिल्हा आहे. या जागृत दैवताची चोरी व्हावी, हे एक आश्चर्यच आहे. चोर आल्यावर देवही त्यांचे पारिपत्य करू शकला नाही. हातची बाईल गमावणारा व पुजाऱ्याला दुःखी करणारा हा देव इहलोकी काय फळ देणार आणि स्वर्गात गेल्यावर मोक्ष तरी कसला देणार ? म्हणून मूर्तिभक्तहो, दोहो मतात लंगडणारे तुम्ही एकाच खऱ्या देवाकडे या. स्थापित व कल्पित देवाची भक्ती म्हणजे व्यर्थ कल्पना आणि वृथा शीण होय. मूर्तिपूजकांचा भ्रम अनिवार असतो. त्यांना देवाचे खरे ज्ञान नाही.

१७०६ (२० : १९, १ आक्टोबर ६१, ३०३–३०४)

कापसाची लागवड उष्ण देशातच होते. हिंदुस्थानात १८ लाख ७५ हजार खंडी कापूस होतो. अमेरिकेत ६० लाख एकरांत कापूस पेरतात. नेपल्समध्ये ३७॥ खंड्या कापूस होतो. तुर्कस्थान देशात ३७५ खंडी कापूस तयार होतो.

१७०७ (२० : १९, १ आक्टोबर ६१, ३०३–३०४)

मुंबई इलाख्यात १८६० मध्ये गुन्ह्यांची फार वृद्धी झाली आहे. घोर अपराध २७०० नी वाढले. ५० हजार किरकोळ अपराधी पकडले. २७५ खुनाचे गुन्हे घडले. त्यांपैकी ३१ जणांना फाशी झाली. इतके सक्त फौजदारी कायदे असून इंग्लंडपेक्षाही इथे जास्त गुन्हे घडतात.

**१७०८** (२० : १९, १ आक्टोबर ६१, ३०३–३०४)
दलिपसिंहास कर्जापोटी जहागिरी दिल्ही जाणार आहे.

**१७०९** (२० : १९, १ आक्टोबर ६१, ३०३–३०४)
पुणे फ्री चर्चच्या शाळेत २५० मुले शिकतात. मुस्लिमांच्या शाळेत ६० मुली आहेत. व्यावहारिक विद्येबरोबरच गायन व शिवणकामही शिकविले जाते. मिशनवाड्याची शाळाही चांगली चालते.

**१७१०** (२० : १९, १ आक्टोबर ६१, ३०३–३०४)
अयोध्या मिशनाची १० ठाणी आहेत. २७ परदेशी साहेब व मडमा, तर २४ एत्तद्देशी उपदेशक आहेत. १० भजनालये बांधण्यात आली. एक शेतही आहे. ५७ जण ख्रिस्ती झाले.

**१७११** (२० : १९, १ आक्टोबर ६१, ३०३–३०४)
रत्नागिरीत विंचवाच्या दंशाने तिघेजण मेले.

**१७१२** (२० : १९, १ आक्टोबर ६१, ३०३–३०४)
नाशकापासून ते चाळीसगावपर्यंत लोखंडी रस्ता तयार झाला.

**१७१३** (२० : १९, १ आक्टोबर ६१, ३०३–३०४)
चिनी लोक इसवी सनाच्या ८५ व्या वर्षापासून बंदुकीच्या दारूचा उपयोग करीत असत.

**१७१४** (२० : १९, १ आक्टोबर ६१, ३०३–३०४)
ब्रिटिश सरकारच्या फौजेतील काळ्या व गोऱ्या सैनिकांचे प्रमाण ठरविणारा हुकूम प्रसिद्ध झाला आहे.

मुंबई, एक्सचेंज प्रेस, फोर्ट

**१७१८** (२० : २०, १५ आक्टोबर ६१, ३०६–३१०)

सन १७७६ मध्ये अमेरिका इंग्लंडच्या राज्यापासून विभक्त झाली. सुरुवातीस त्यांची १७ संस्थाने होती. आता ३४ आहेत. प्रत्येक संस्थानाचे पृथक कायदे आहेत. लढाया व परराष्ट्रसंबंध मात्र मुख्य सरकारच्या अधीन आहेत. या संस्थानांनी शिद्दी लोकांना दास करून त्यांच्याकडून जमिनीची लागवड करून घेतली. दासांच्या मेहनतीवर ते श्रीमंत बनतात. १८०७ मध्ये दासपणाविरुद्ध कायदा झाला. काही परोपकारी लोकांनी गुलामांना मुक्त केले. त्यांना स्वतंत्र वसाहती करून दिल्या. गुलामगिरीवरून ५० वर्षे वाद व भांडणे चालू आहेत. दक्षिणेकडील लोक ही पद्धत बंद करण्यास मुळीच तयार नाहीत. प्रेसिडेंट लिंकनने त्यांचे मन वळविण्याचे फार प्रयत्न केले. पण अकरा संस्थानांनी विभक्त होऊन नव्या कायद्यास विरोध दर्शविला. या बंडखोरीने उत्तर अमेरिकेने युद्ध सुरू केले. बंडखोरांनी वाशिंग्टन शहर काबीज करण्याची तयारी चालविली. फितूर सरदार त्यांना मदत देतात. मिसुरीजवळ सरकारी फौजेने बंडखोरांचा मोठा पराभव केला. सरकारचा जय होऊन ही दुष्ट चाल अमेरिकेतून नाहीशी व्हावी, अशी आमची अंतःकरणपूर्वक इच्छा आहे. ही लढाई मिशनांना मात्र त्रासदायक ठरली. कारण अमेरिकन मिशनांच्या मदतीचा पुरवठा अगदी कमी झाला आहे. एतद्देशीय मित्र मात्र उदारपणाने पुढे सरसावून मदत करीत आहेत. साल मजकुरी मिशनाचे कोणतेही काम बंद पडणार नाही.

**१७१८ अ** (इंम : ३०५–३०६)

**१७१६** (२० : २०, १५ आक्टोबर ६१, ३११–३१३)

अमेरिकेतील लढाईचा रंग कसा राहील, याबर बऱ्याच गोष्टी अवलंबून आहेत. हा दासांच्या प्रकरणाचा वाद हिंदुस्थानच्या मैदानावर छडून मिटेल. कारण हा कापसाच्या पिकाचा वाद आहे. इंग्लंडमध्ये जी कापसाची आयात होते, ती मुख्यतः अमेरिकेतून होते. जर ही आयात दुसऱ्या देशाकडून झाली, तर ४० लाख बापडे शिद्दी, जे दासपणात खितपत पडले आहेत, त्यांची स्थिती नक्की सुधारेल. सन १८०० मध्ये इंग्लंडने ४५० खंडी कापूस त्यांच्याकडून घेतला. यंदा १७ लाख ९४ हजार खंडी कापूस त्यांच्याकडून घेतला. २० कोटी रुपये अमेरिकन व्यापाऱ्यांनी शिद्दी गुलामांच्या जिवावर मिळविले. हिंदुस्थानात जर सध्यापेक्षा जास्त कापूस तयार झाला, तर तो निर्यात करून अमेरिकेची मिरासदारी नष्ट करता येईल. शिद्दीलोकांचा जो पशुप्रमाणे विक्रय होतो, तोही थांबेल. अनेक सुवार्तिक या देशात खांबी दिलेल्या ख्रिस्ताचे संदेश गाजवितात. ते सतत प्रार्थना करतात की, अमेरिकन सरकारचा जय होऊन गुलामगिरीची प्रथा ताबडतोब बंद व्हावी. प्रेसिडेंट लिंकनसुद्धा प्रार्थनाशील गृहस्थ आहे. तो नेत्रात अश्रू आणून व सद्गदित होऊन प्रार्थना करतो. आपणही त्याचा जय व्हावा, म्हणून प्रार्थना करावी.

**१७१६ अ** (इंम : ३१०–३११)

१७१७ (२० : २०, १५ आक्टोबर ६१, ३१३–३१४)

ठाण्याचे हुजूर डेपुटी दादोबा पांडुरंग यांनी सरकारी नोकरीचा राजीनामा दिल्हा. त्यांच्या जागेवर रिचर्ड बेल्श आले आहेत. श्री. दादोबा आजमासे २०–२२ वर्षे सरकारी नोकरीत होते. प्रथम विद्याखात्यात ते १५ वर्षे कामास होते. नेटिवांना मोठ्या हुद्याची व भरवशाची कामे द्यावीत, असा ठराव झाल्यावर ते प्रथम नगरास डेपुटी झाले. नंतर ठाण्यास बदलले गेले. या हुद्यापेक्षा त्यांच्या विद्वत्तेने ते प्रसिद्ध आहेत. त्यांना अनेक देशी भाषा बोलता येतात. दादोकृत मराठी व्याकरण, स्त्रीशिक्षण निबंध, विधवाश्रुमार्जनाचा संस्कृत ग्रंथ, हे प्रसिद्ध आहेत. ते मोठे अभ्यासी गृहस्थ असून चाकरीशिवायचा काळ ते व्यासंगात घालवितात. नेटिवांना जोखिमाची सरकारी कामे मिळाली, तर ते इमानाने व प्रमाणिकपणाने करतील किंवा नाही, याची साहेब लोकांना शंका वाटे. कारण नेटिवांना कायदेकानूची विशेष माहिती नसते. पण या दोन्ही भाकितांचा या विद्वान व हुशार डेपुटीने पराभव केला. इतरांनीही जबाबदारीच्या जागा स्वीकारून कर्तबगारी दाखवावी. विद्या आणि अक्कल जेथे विपुल आहेत, तेथे क्षुल्लक व अयोग्य प्रकारचे हानन होण्यास किती वेळ पाहिजे. त्याचा लवकर मोड होतो. आता दादोबांनी उपयोगी व सुरस पुस्तके प्रसिद्धीस आणावी, अशी आमची त्यांना विनंती आहे. (ज्ञानप्रकाशवरून)

१७१८ (२० : २०, १५ आक्टोबर ६१, ३१४–३२०)

या देशात चर्चमिशनचे काम फार समाधानकारक रीतीने चालले आहे. उत्तर हिंदुस्थानांत त्यांची ४२ ठाणी आहेत. ५१ काळेगोरे उपदेशक, १५९ शाळा, ९९३१ विद्यार्थी आहेत. ९२५ जण प्रभुभोजन घेतात. बंडखोर सांतर परगण्यातही काम उत्तम चालते. रे. पस्सली स्वखर्चाने ५४९ मुलांची शाळा चालवितो. मद्रासेतही २८ मिशनेरी व २८,६८५ ख्रिस्ती लोक आहेत.

**१७१९** (२० : २०, १५ आक्टोबर ६१, ३१४–३२०)

रशियन बादशहा पैशाच्या फार अडचणीत आहे. दरसाल ४॥ कोटींनी त्याचे कर्ज वाढते आहे. आयातनिर्यातीतून नफा होत नाही. कलकत्याच्या व्यापारापेक्षा त्याचा व्यापार फक्त १ कोटीने जास्त आहे. बादशहास २ अब्ज ५१ कोटी कर्ज असून ९ कोटी नुसते व्याजापायी जातात. शिवाय, किरकोळ कर्ज १ अब्जाचे आहे.

**१७२०** (२० : २०, १५ आक्टोबर ६१, ३१४–३२०)

कापसाप्रमाणेच हिंदुस्थानातील व्यापारी तंबाखूच्या व्यापारातही फार नफा मिळवू शकतील. ग्रेट ब्रिटनच्या सरकारला यंदा ५॥ कोटींची जकात तंबाखूतून मिळाली. विलायतेत ७ कोटींची तंबाखू खपते. हिंदुस्थानच्या मानाने अमेरिकेची निर्यात फार कमी आहे. कलकत्यातून गेल्या वर्षी १ कोटी २८ लाखांची तंबाखू रवाना झाली. दारू, तंबाखू, यांसारख्या घातक पदार्थांचा विलायतेत बेसुमार खप आहे.

**१७२१** (२० : २०, १५ आक्टोबर ६१, ३१४--३२०)

उत्तर हिंदुस्थानात या वर्षी दुष्काळ, पटकीनंतर महापूर, या आपत्तींमुळे शेकडो लोक प्राणास मुकले. महापुराने पिके वाहून गेली, गुरे मेली, गावेच्या गावे वाहून गेली.

**१७२२** (२० : २०, १५ आक्टोबर ६१, ३१६–३२०)

दिल्लीचा माजी राजा बहादूरशाह रणगूण येथे शेवटचे क्षण मोजीत आहे. या हिवाळ्यातून तो पार पडणार नाही. त्याची बायको जीनतमहल मात्र धट्टीकट्टी आहे. तिचे मुलगे इंग्रजी शिकून तरबेज झाले. निदान रैटरचे काम करून पोट भरू शकतील.

**१७२३** (२० : २०, १५ आक्टोबर ६१, ३१६–३२०)

आपण इंग्रजांच्या स्वाधीन झालो, तर कशी वागणूक मिळेल, याची चौकशी करणारे पत्र नानाकडून इंग्रजांस मिळाले आहे.

**१७२४** (२० : २०, १५ आक्टोबर ६१, ३१६–३२०)

पैशाच्या अडचणीमुळे तुर्की बादशहाने आपले जवाहीर विकून टाकले. जगिक संपत्ती अशी नाशिवंत असते. एका भारतीय व्यापाऱ्याने ते विकत घेतले. तो व्हाइसरायला जवाहिर नजर करील.

**१७२५** (२० : २०, १५ आक्टोबर ६१, ३१६–३२०)

मिसरच्या पादशहास ७ कोटी १२ लाखांचे कर्ज आहे. स्वेज कालव्यासाठी २ कोटी ८४ लाखांचे भांडवल त्याने घातले. त्याने ५०० शिपाई ठेवून बाकी फौज काढून टाकली. रुपयाची नाणी पाडून तो काटकसर करणार आहे.

**१७२६** (२० : २०, १५ आक्टोबर ६१, ३१६–३२०)

चीनमध्ये १०० प्रातस्तंत मिशनरी काम करतात, पण इंग्रज व्यापाऱ्यांना वाटते की, ख्रिस्ती धर्मामुळे अफूचा व्यापार बंद होईल. म्हणून ते मिशनऱ्यांशी भांडतात.

**१७२७** (२० : २०, १५ आक्टोबर ६१, ३१६–३२०)

१८५७ च्या बंडात मारल्या गेलेल्या ख्रिस्ती लोकांचे स्मारक म्हणून दिल्लीमध्ये भजनालय तयार होणार आहे.

**१७२८** (२० : २०, १५ आक्टोबर ६१, ३१६–३२०)

मुंबई सरकारच्या सेक्रेटरींनी निवेदन प्रसिद्ध केले आहे की : लोकांनी पातळ व फुटेन्या कागदावर अर्ज करू नये. अर्ज मोकळ्या व सुवाच्य अक्षरात लिहावा. (ज्ञानप्रकाशवरून)

**१७२९** (२० : २०, १५ आक्टोबर ६१, ३१६–३२०)

लार्ड कानिंग यांनी कापसाचे विक्रमी उत्पादन करणारांस १० हजारांची तीन इनामे जाहीर केली आहेत. प्रतवारीही उत्तम हवी. (ज्ञानप्रकाशवरून)

**१७३०** (२० : २०, १५ आक्टोबर ६१, ३१६–३२०)

काचार संस्थानात हिंदू विधवेचा पुनर्विवाह झाला.

**१७३१** (२० : २०, १५ आक्टोबर ६१, ३१६–३२०)

म्हैसूर शहरात मिशनऱ्यांच्या कामास चांगले फळ येत आहे. मिशनऱ्यांच्या प्रार्थनेमुळे नेटिव लोक आकर्षित होतात. दोन तरुणांची खास परीक्षा घेऊन त्यांना बाप्तिस्मा दिला गेला. नातेवाइकांनी छळ केला, तरी ते शांत आहेत. आणखी तिघेही दीक्षा घेणार आहेत.

**१७३२** (२० : २०, १५ आक्टोबर ६१, ३१६–३२०)

तुर्की मिशनाचे काम समाधानकारक आहे. ४१२ उपदेशक १२४ ठाण्यांवर उपदेश करतात. ५५६३ मुले चर्चशाळेत शिकतात. २ लाख २५ हजार रुपये खर्च झाले. ईश्वर त्यांना मदत करीत आहे.

**१७३३** (२० : २०, १५ आक्टोबर ६१, ३१६–३२०)

अमेरिकेत पेन्सिल्वेन्या प्रांतात ३०० विहिरींतुन नित्य ३० पिंपे तेल निघते. त्यामुळे व्हेल माशाचे तेल खपेनासे झाले.

**१७३४** (२० : २०, १५ आक्टोबर ६१, ३१७–३२०)

युरोपातील सर्व देशांत रशियाची खडी फौज ८ लाख म्हणजे सर्वांत जास्त आहे. एकूण प्रजेचा ती ९० वा हिस्सा आहे.

१७३५ (२० : २०, १५ आक्टोबर ६१, ३१७–३२०)
फ्रान्समध्ये फोटोग्राफीवर २३,५४२ जगांचा उदरनिर्वाह चालतो.

१७३६ (२० : २०, १५ आक्टोबर ६१, ३१७–३२०)
पन्नास वर्षांपूर्वी ग्रेट ब्रिटनची प्रजा १ लाख ९० हजार होती. त्यांपैकी ४७५०० रोमन कॅथालिक होते. आता २ कोटी २० लाख प्रजेपैकी ३० लाख रोमन कॅथालिक आहेत.

१७३७ (२० : २०, १५ आक्टोबर ६१, ३१७–३२०)
१८५६ मध्ये लिवरपूलहून अमेरिकेस निघालेली आगबोट बुडाली. तिच्यावरील प्रवाशांपैकी विल्याम ग्राहाम याने बोट बुडताना पाहून लिहिलेले हृदयद्रावक पत्र एका शिसीत सापडले. शेवटपर्यंत त्याच्या मनात शांती व धैर्य होती.

१७३८ (२० : २०, १५ आक्टोबर ६१, ३२०)
पळसदेव तालुका इंदापूर येथील एका ब्राह्मण विधवेने गर्भपात केल्यामुळे तिला एक वर्षाची कैदेची शिक्षा झाली. तिचा नवरा २ वर्षांपूर्वी वारला.

१७३९ (२० : २०, १५ आक्टोबर ६१, ३२०)
अयोध्या प्रांतात आणखी एक सतीचा प्रकार घडला. पोलिसांना वक्तशीर खबर मिळू शकली नाही. मध्यभारतातील एका संस्थानातही एका विधवेस तिच्या नातेवाईकांनी जबरदस्ती करून सती जाणे भाग पाडले.

**१७४०** (२० : २०, १५ आक्टोबर ६१, ३२०)

'लिट्ल ट्रॅव्हलर्स झोनवर्ड' या कवितेच्या भाषांतरानुसार, कितीतरी लहान मुलेलेकरे आकाशाच्या प्रवासाला निघाली आहेत. येशूची ही कोकरे त्याला अनुसरतात. त्यांच्यावर प्रीत करून येशू सोन्यामोत्याचे दार उघडून त्यांस स्वर्गात घेतो. चीन, अमेरिका, इंग्लंड, येथून ती आली आहेत. जगातले हाल टाळून ती कष्टाच्या मार्गावर चालतात. शेवटी सर्व काळचे सुख मिळवितात. येशू त्यांचा अंगीकार करतो, असे कवी म्हणतो.

**१७४० अ** (इंम : ३२०)

मुंबई, एक्सचेंज प्रेस, फोर्ट

## ज्ञानोदय, पुस्तक २०, अंक २१, मुंबई, १ नोवेंबर १८६१

**१७४१** (२० : २१, १ नोवेंबर ६१, ३२१–३२३)

फ्रान्सचा दैनंदिन कारभार राणी पोमारे आणि तिच्या मदतीस असणारे कारभारी चालवतात. सोसैटी बेटावरील नेटिव लोकांनी त्यांना विनंती केली आहे की : आम्हांस भलते उपदेशक नकोत आणि रोमन कॅथॉलिक तर मुळीच नकोत! धर्माची सुशिक्षा फक्त प्रांतस्तंतच देऊ शकतात. बाहिती बेटावरील मिशनऱ्यांच्या बायकापोरांचा निर्वाह व्यवस्थित चालावा, याकरिता आम्ही दरसाल दोन हजार रुपये नियमित देत जाऊ. त्यांना घरे बांधून देऊ. तसेच जमिनीही देऊ. इंग्रज मिशनऱ्यांनी आम्हांला मूर्तिपूजेच्या अंधारामधून सोडविले. पण आम्ही काही फ्रेंचाचे शत्रू नाही. आमचे हितशत्रू तसा प्रचार करतात. पण त्याकडे सरकारने लक्ष देऊ नये.

**१७४१ अ** (इंम : ३२१)

**१७४२** (२० : २१, १ नोव्हेंबर ६१, ३२३)

कलकत्त्याचे डा. बोआज लिहितात की : त्यांच्याकडे एक हिंदू मुलगा आला व म्हणाला की, 'मला दीक्षा द्या'. साहेबाने उत्तर दिले की : येशूच तुला ख्रिस्ती करील. तू त्याची मनोभावे प्रार्थना कर. थोड्याच दिवसांनी तो मुलगा परत आला व म्हणाला की : येशू माझ्या अंतःकरणात येऊन राहिला आहे. तो आकाशातून उतरला व माझ्या मनात स्थिरावला. मग त्यास साहेबाने दीक्षा दिली.

**१७४२ अ** (इंग : ३२३)

**१७४३** (२० : २१, १ नोव्हेंबर ६१, ३२३–३२५)

खंडेराव नावाचा एक परदेशी शिपाई वल्द हायातुल्ला खान या काजीकडे नोकरीस होता. हा काजी एकदा औरंगाबादेस गेला, तेव्हा एका लावण्यवती स्त्रीस पाहून अगदी मोहित झाला. या स्त्रीला एका उमरावाने १०० रुपये महिना देऊन 'ठेवले' होते. काजीने १५० रुपये कबूल करून तिला ठेवले. रमणीय बंगला व बाग घेऊन मौजा मारू लागला. उमरावाचे लोक त्यास धाक घालीत होते की, 'या स्त्रीस जर तू सोडले नाहीस, तर प्राणास मुकशील?' एका रात्री उमरावाचे भाडोत्री सेवक त्यांना मारावयास आले. खंडेरावाने काजीला सावध केले व दरवाजा बंद ठेवण्यास सांगितले. मारेकऱ्याने खंडेरावास बेदम मारले. नगरच्या दवाखान्यात खंडेराव मरण पावला. भ्याड काजी अद्यापही औरंगाबादेस आहे. त्या रांडेने पैशासाठी त्यास अटकावले आहे. या बदफैली इसमास काजीच्या कामावरून काढून टाकले पाहिजे.

१७४४ (२० : २१, १ नोव्हेंबर ६१, ३२५-३२७)

इंदूरचे प्रसिद्ध सावकार दार्जीसाहेब किबे तीर्थयात्रेकरिता इकडे आले. त्रिंबकेश्वरापासून कोल्हापुरापर्यंतची सर्व क्षेत्रे ते पाहणार आहेत. त्यांच्याबरोबर १२५ शिपाई, कारकून, ब्राह्मण व ७०० चाकर आहेत. हत्ती व उंट व गाड्यांचे १५०० खटले असून त्यांचा रोजखर्च २ हजार होतो. अशा हिशेबाने यात्रेचा खर्च ७ लाख होईल व ८ लक्षांची ब्राह्मणदक्षिणा होईल. किबे सावकाराजवळ विपुल द्रव्य आहे त्यांनी मुलामुलींच्या लग्नाला ५ लक्ष रुपये लावले. कित्येक वेदपाठक भट्टांना ३०० ते ५०० ची वेतने देतात. हे जर काशीस गेले, तर ते किती द्रव्य नासतील, याचा अजमास करवत नाही. धर्म जरूर करावा. पण पोटबाबू व भ्रष्ट ब्राह्मण यांना करू नये. आळसात व पापात वेळ घालवणाऱ्या लोकांस दान देऊ नये. आंधळ्या-पांगळ्यांना दान करावे. रोगशाळा, विद्यालये व उद्योगशाळा यांना देणग्या द्याव्यात. यातून हजारोंचे कल्याण होऊन हा देश विद्यावृद्धीने प्रगती करील. सर जमशेटजीने अशी मदत केलेली आहे. दार्जींनी त्याचा कित्ता घ्यावा. इंग्रजांच्या समागमाने जमशेद लोकहिताची कामे करीत. पण दार्जींभोवती स्वार्थी भटांचा गराडा पडलेला आहे. ते स्वतः, निगर्वी, विचारी व दानशील आहेत. तरी त्यांनी ढोंगी भटांचा सहवास सोडावा, अशी विनंती 'स्वदेशकल्याणेच्छू' आपल्या पत्रातून करतो.

१७४७ (२० : २१, १ नोव्हेंबर ६१; ३२७–३३१)

'बुद्धिवादक' आपल्या पत्रात म्हणतो की : यहुदी लोक पूर्वी मूर्तिपूजक होते. ख्रिस्ताचे बारा शिष्य यहुदीचे होते. मुसलमानी धर्माचाही प्रसार हिंदुस्थानात झाला. गोव्यामध्ये पोर्तुगीजांनी कित्येकांना जबरीने ख्रिस्ती केले. म्हणजे ३॥ हजार वर्षांपासून धर्मांतर करण्याचा प्रघात आहे. असे असूनही ख्रिस्ती धर्म स्वीकारणारांना ते बोल लावतात. ब्राह्मणांचे पूर्वज इराणहून आले व त्यांनी सरस्वतीच्या तीरावर वेदांचा धर्म स्थापिला. सगर नावाच्या सूर्यवंशी राजाने समुद्रपर्यटन करून बाली बेटावर हिंदु धर्माचा प्रसार केला. बाली बेटात अद्यापही शिवपूजा व सतीची चाल दिसतात. कबीर तर हिंदूप्रमाणे टिळेटोपी घालीत असे. श्रीगोंद्याचा शेख महमद हा हिंदु साधूप्रमाणे एकादशी करीत असे. एक जेसुईट मिशनरी काशी क्षेत्रात आला. त्याचे वर्तन ब्राह्मणाप्रमाणे असे. पण तो कपटी वेशधारी होता आणि त्याचे लबाड वर्तन पुढे उघडे पडले. मग काशीकरांनी त्यास गावातून हाकलून लावले. तरीही आपल्या मनाला जो धर्म योग्य वाटतो, त्याचा स्वीकार करण्याची परवानगी असली पाहिजे. वडलांचा धर्म कधी सोडू नये, हे मत अगदी भ्रामक होय. आजचे ब्राह्मण तरी वैदिक ऋषींचा धर्म पाळतात काय? ते तर पंचमहाभूतांऐवजी निर्जीव मूर्तींस भजतात. शूद्रदेखील इतके धर्मापासून भ्रष्ट झाले नाहीत. त्यांचा पोषाखही बदलला. गुरांच्या कातड्याचे जोडे त्यांना आता चालतात. मग पायाखालचे जळत असताना डोंगरचे विझविण्यास ते कां धावतात?

**१७४६** (२० : २१, १ नोव्हेंबर ६१, ३३१–३३४)

'देशाभिमानी' लिहितो की : जातिभेदविवेकसाराचा कर्ता असे सांगतो की, वर्णसंकर झाला. जुन्या मताचे हिंदू मात्र म्हणतात की, हा जातिभेद मोडणे दुर्घट आहे. या दोन मतांचा मेळ बसणे फारच दुर्घट होय. 'एक हिंदूच्या' मते सध्या लट्टुमुट्टू जातिभेद आहे. सगळ्या जातींमध्ये जर सर्रास रोटी-बेटी व्यवहार झाला, तरच त्याला वर्णसंकर म्हणता येईल. शिवाय ब्राह्मण आपले सद्‌गुण टाकून नीच कर्मे करू लागले. मर्यादा राहिली नाही. तरीही अपराधी ब्राह्मणाचा दर्जा कोणी नीच मानीत नाही. त्यांच्या पोटजातींमध्ये विवाह होत नाहीत. पण उपदेशाचे काम सोडून ते चाकऱ्यां करू लागले. ते म्लेंछांना व अतिशूद्रांना घरात येऊ देत नाहीत. पण ज्या ऋषींचे गोत्र ते मिरवितात त्यांचेच जन्म पशुपक्ष्यांपासून झाले आहेत. शाक्त तर कुप्रसिद्ध आहेत. सवाई माधवराव हा सोनाराचे मूल होता, अशी कुजबूज पुण्यात ऐकू येते. कित्येक ब्राह्मण स्त्रिया परजातीच्या पुरुषाच्या घरी गेल्या. काही गुप्तपणे व्यवहार करतात. तात्पर्य, सगळे ब्राह्मण्य चौंढाळले. दृष्टीआड सृष्टी, म्हणून यातून सुटका करून घेणे अयोग्य आहे. न कळता सोमल्लार खाल्ला, तरी तो प्राण घेणारच. साप डसला की, विष चढणारच. म्हणून सगळे ब्राह्मणांचे कुळ भ्रष्ट झाले आहे. तरी जातीचा अभिमान आणि दुराग्रह सर्वांनी सोडावा, हे बरे. एकाच ईश्वराने सर्वांना निर्माण केले. उंच व नीच कोणीही नाही.

**१७४७** (२० : २१, १ नोव्हेंबर ६१, ३३४–३३६)

चीनचा बादशहा हायन फंग २२ आगस्त रोजी मृत्यु पावला. त्याने ११॥ वर्षे राज्य केले. तो तीस वर्षांचा होता. थोरल्या तीन भावांना डावलून याला राज्यपद दिले होते. पण विषयलंपटपणामुळे तो राज्यात लक्ष घालीत नव्हता. बंडखोर चालून आले, तेव्हा तो जनानखान्यात गुंग होता.

१७४८ (२० : २१, १ नोवेंबर ६१, ३३४–३३६)

मुंबईचे गवर्णर ज्यार्ज क्लर्क यांनी राजिनामा दिल्यामुळे सर हेनरी रौलिनसन आता गवर्णर होतील.

१७४९ (२० : २१, १ नोवेंबर ६१, ३३४–३३६)

येसू नामक भिलाने पकडून दिलेला बंडखोर महाद्या व त्याचे पाच सोबती यांना सूटरसाहेबांनी निंबगावी फाशी दिल्हे. हा प्रकार पाहण्यास बरेच भील हजर होते. (ता. इं.)

१७५० (२० : २१, १ नोवेंबर ६१, ३३४–३३६)

इंग्लंडमध्ये जिप्सी नावाची भटकी जमात आहे. विशेष म्हणजे ते हिंदुस्थानी भाषा बोलतात. फार पूर्वी ते हिंदुस्थानचे रहिवासी असावेत. ते चोऱ्यामाऱ्या करून उपजिविका करतात.

१७५१ (२० : २१, १ नोवेंबर ६१, ३३४–३३६)

दसऱ्याच्या आदल्या दिवशी सुरतेहून आगगाडी बडोद्यास गेली. तिच्यात जनावरांबरोबरच २ हजार माणसे होती. नर्मदेच्या व तापीच्या पुलावरून गाडी गेली, तेव्हा लोकांनी शेकडो नारळ पाण्यामध्ये फेकले. आगगाडी झाली, तरी लोकांच्या मूर्ख समजूती जात नाहीत.

१७५२ (२० : २१, १ नोवेंबर ६१, ३३४–३३६)

मुंबई इलाख्यातील प्रत्येक बंदिवानामागे सरकारास सात रुपये खर्च येतो. बंदिवानाच्या उद्योगातून थोडेफार उत्पन्न मिळते.

१७५३ (२० : २१, १ नोवेंबर ६१, ३३४–३३६)

मद्रासेत एका गृहस्थाने गाईस विष पाजून मारले, म्हणून न्यायाधीशाने त्यास ७ वर्षे काळ्या पाण्याची शिक्षा दिल्ही. परंतु एवढी कडक शिक्षा एखाद्या हिंदू राजास शोभली असती. फारतर गाईची किंमत घ्यावयाची.

१७८४ (२० : २१, १ नोव्हेंबर ६१, ३३६)

राणी सरकारने हिंदुस्थानातील संस्थानिकांना स्टार ऑफ इंडिया नावाचें पदक किंवा चांद द्यावयाचा ठरविला. परंतु हैद्राबादच्या निजामास ते मान्य नाही. कारण त्यावर राजाचा मुखवटा आहे. कोणतीही प्रतिमा शरिरावर वागवणे इस्लाम विरुद्ध आहे. दिवाण सालारजंग त्याची समजूत घालणार आहे. सदरहू दिवाणास तो कामावरून दूर करणार होता. कारण एका द्वेषकाने चहाडी केली. पण तो द्वेषक मारला गेला. या प्रकरणी जनानखान्यातील स्त्रियांनी निषेधाची चळवळही केली होती. कारण सालारजंग त्यांच्या खाण्यापिण्याची व्यवस्था उत्तम राखतो. आता सालारजंगाची जागा कायम राहील.

मुंबई, एक्सचेंज प्रेस, फोर्ट

## ज्ञानोदय, पुस्तक २०, अंक २२, मुंबई, १५ नोव्हेंबर १८६१

**१७५८** (२० : २२, १५ नोव्हेंबर ६१, ३४०–३४६)

'नगरकर ख्रिस्ती' लिहितो की : महाराष्ट्र देशातील अमेरिकन मिशनाची वार्षिक सभा ही एक अगत्याची गोष्ट आहे. मुंबई, सातारा, नगर, एथील चारशे ख्रिस्ती जमले होते. यंदाइतकी लाभदायक सभा पूर्वी कधीही झाली नव्हती. प्रार्थना, शास्त्रवाचन आणि गीतगायन नियमित होत असत. देशोदेशीच्या धर्मसंजीवनाची माहिती देण्यात आली. लोकांनी गद्दूळ व वाईट चाली कमी कराव्या, म्हणून उपदेश देण्यात आला. रे. विष्णु भास्कर यांनी मदतीचे आवाहन केले. प्राप्तीचा एक दशांश देण्याविषयी आग्रह धरला. काही स्त्रियांनी तर अंगावरचे डागिणे दिल्हे. एखादी वस्तू चोराच्या हातात जाण्यापेक्षा देवाच्या कामास द्यावी. सैतानाशी लढाई करण्यासाठी दररोज देणग्या गोळा होत होत्या. येशूने जगाकरिता आपले रक्तही दिल्हे. मग आपण जगिक वस्तू कां देऊ नयेत ? जगाच्या तारणाकरिता येशूने अनंत दुःखे सोशिली. ख्रिस्त खरा प्रिय आणि मोलवान आहे. म्हणून अनेक बांक नोटा जमा झाल्या. प्रभुभोजनासाठी ४०० लोक जमले होते. प्रार्थनेकरिता लोकांनी फार आस्था आणि आवड दाखविली. देवाने हा देश आपल्या गौरवाने भरावा, त्याच्या सुसमागमाने आत्मिक लाभ व्हावा, हीच प्रार्थना आहे.

**१७५८ अ** (इंम : ३३७–३४०)

१७८६ (२० : २२, १५ नोव्हेंबर ६१, ३४६-३५०)

नगरकर बातमीदार लिहितो की : भिंगारमध्ये नवरात्राच्या दिवसांत जत्रा भरते. त्यासाठी निदान १० हजार लोक गोळा होतात. तुळजापूरची भवानी हे जागृत दैवत समजतात. तिची पालखी या वाटेने जात असते. तिच्या तेली पुजाऱ्यांचा मोठा सन्मान केला जातो. पालखीत मूर्ती ठेवताना जड होते व तिला घाम येतो, अशी समजूत आहे. हा पलंग प्रत्येक गावात मुक्काम करतो. पाषाणाचे धर्म तिच्या ठिकाणी असताना एवढी भक्ती कशाची करतात, ते कळत नाही. खोट्या दैवतांचे महत्त्व वाढवून स्वतःची पोळी पिकविणारे लोक फार आहेत. इतर मूढ लोक त्यावर विश्वास ठेवतात. नगरजवळ अशाच दोन पिरांची स्थापना झाली आणि पुजाऱ्यांचा वाद बरेच दिवस चालू आहे. भिंगारात तर लोक देवीच्या पितळी मुखड्याचे दर्शन घेताना बीभत्स व अश्लील लावण्या ऐकत असतात. नाच तमाशामध्ये लोक फार वेळ घालवितात. व्यापाऱ्यांच्याइतक्याच उत्साहाने भामटे आणि उनाड लोकही यात्रेत हिंडत असतात. तमाशे करणारांवर ख्रिस्ती उपदेशकाने खटला भरला. पण माजिस्त्रेत काहीतरी सबबी सांगून सुनावणी टाळतो. सरकार कामदार आपली कामे बराबर करीत नाहीत.

१७५७ (२० : २२, १५ नोव्हेंबर ६१, ३५०)

कवी म्हणतो की : हे येशू ख्रिस्ता, जगाचा मालक असताना तुला जन्मल्यावर राहण्यास चांगली जागा मिळाली नाही. हे विश्वंभरा, गोठ्यामध्ये राहावे लागल्यामुळे तू अगदी विव्हल झालास. तुझे अमोल्य रक्त अवघ्या तीस रुपयांना विकले गेले. जुलमी अधिकाऱ्यांनी तुला दुष्ट माणसांच्या हातांत सोपवून लुटारूप्रमाणे बांधून की रे नेले. जांभळा झगा अंगात घालून दिंगल म्हणून तुझ्या हातात बोरू दिल्हा. डोक्यावर काटेरी मुगुट घालून डोक्यात वेत मारिला. तुला फटक्यांनी मारून मूर्ख लोक तुझ्या तोंडावर थुंकले. हातापायांवर खिळे मारून खांबावरती चढवले. जबरदस्तीने आंब पाजून तुझ्या छातीत भाला भोसकला, तेव्हा रक्ताचा व पाण्याचा लोट वाहिला. पापी माणसांना तारण्याकरिता तू जीव दिलास. त्याच्यावर विश्वास ठेवला, तर खरे सुख मिळेल. (कवितेचे गद्य सार)

१७५८ (२० : २२, १५ नोव्हेंबर ६१, ३५०–३५२)

फारुकाबादेच्या माजी नबाबाचा मक्केमध्ये मृत्यू झाला.

१७५९ (२० : २२, १५ नोव्हेंबर ६१, ३५०–३५२)

काबूलमध्ये पटकीने इतका कहर केला की : दिवसात तीनशे लोक मेले. व्यापारधंदे बंद पडले. अन्न व इतर मालाची आवक बंद पडली आहे. लोक दानधर्म व कुराणपठण यांत काळ घालवीत आहेत.

१७६० (२० : २२, १५ नोव्हेंबर ६१, ३५०–३५२)

यावर्षी हिंदुस्थान, आस्ट्रेलिया व आफ्रिका खंडांत जेवढा पाऊस पडला, तितका पूर्वी कधीही पडला नव्हता.

**१७६१** (२० : २२, १५ नोव्हेंबर ६१, ३५०–३५२)

राणीचे खास पदक स्वीकारण्यास निजाम तयार नाही. त्याला वाटते की, आपण मेल्यावर पदक परत घेतील किंवा आपणास जबरीने ख्रिस्ती करतील. निजामाच्या चाकरीतले अरब आणि रोहिले यांना सक्तीने कमी केले जाईल.

**१७६२** (२० : २२, १५ नोव्हेंबर ६१, ३५०–३५२)

मद्रासेत एका हिंदूने महादेवासमोर जीभ कापून घेतली. त्याने तो मेला. पुष्कळ लोक अशी जीभ कापून नंतर ब्राह्मणभोजने घालतात. यात खरी भक्ती काय आहे, ते ईश्वरच जाणे.

**१७६२ अ** (२० : २२, १५ नोव्हेंबर ६१, ३५०–३५२)

१८४९-५० च्या मानाने हिंदुस्थानचा परदेशांशी व्यापार ११ वर्षांमध्ये तिप्पट झाला आहे.

**१७६३** (२० : २२, १५ नोव्हेंबर ६१, ३५०–३५२)

वाणी लोकांचे ६०–७० गुरू आहेत. ते संस्कृतमध्ये प्रवीण आहेत. पण त्यांची वागणूक अशोभनीय आहे. कृष्णराधेचे विलास वाचणे व त्यांवर ग्रंथ लिहिणे, धर्मसंबंधी तमाशे दाखवणे, हेच त्यांचे काम आहे.

**१७६४** (२० : २२, १५ नोव्हेंबर ६१, ३५०–३५२)

न्यू हालंड बेटामध्ये जेम्स काजलंदसाहेबाने १७ जणांना दीक्षा दिल्ही. हे लोक खरे पश्चात्तापी होते. आपणांस बाप्तिस्मा मिळावा, म्हणून कित्येक दिवस साहेबाच्या भजनालयाजवळ बसून होते.

१७६५ (२० : २२, १५ नोव्हेंबर ६१, ३५२)

येशु लहान बालकांशी फार ममतेने वागे. तो कन्हवाळू मेंढपाळ होता. आपण जर त्या काळात लहान बाळ असतो तर त्याची माया आपणांस मिळाली असती. मुलांना वर्जू नका. ते मजपाशी राहातील असे येशु म्हणे. मी एकांतात त्याच्याकडे जाऊन त्याचा आशीर्वाद घेईन. त्याचा आवडता होऊन आकाशात अनंत काळपर्यंत सुखाने राहीन. पुण्यवान लोक राहावेत म्हणून येशूने ते स्थान मुद्दाम तयार केले आहे. (कवितेचे गद्य सार)

१७६५ अ (इंग : ३५२)

मुंबई, एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

## ज्ञानोदय, पुस्तक २०, अंक २३, मुंबई, २ दिसेंबर १८६१

१७६६ (२० : २३, २ दिसेंबर ६१, ३५४–३५५)

इंवेजिकल अलायन्सतर्फे सगळ्या ख्रिस्ती भावांना ही विनंती करण्यात येत आहे. आपली विश्वासाची व आग्रहाची प्रार्थना ऐकून ईश्वर आकाशाच्या खिडक्या उघडील आणि जगावर अमोल्य आशीर्वाद विपुलपणे ओतुन देईल. पवित्र आत्म्याविषयी विचार करावा. नम्र होऊन पाप कबूल करावे. अधार्मिकांकरिता प्रार्थना करावी. खोटी मते देवाने मोडावीत, म्हणून त्यास विनंती करावी. ख्रिस्ती मंडळीसाठी आशीर्वाद मागावा. पवित्र शास्त्र वाचावे. शाब्बाथ पाळावा. पवित्र व उद्योगी बनावे. पृथ्वीच्या सर्व सीमा देवाचे भय धरतील.

१७६६ अ (इंग : ३५३)

१७६७ (२० : २३, २ दिसेंबर ६१, ३५६–३५८)

हिंदुस्थानात अनेक एत्तद्देशीय ख्रिस्ती मंडळ्या धर्मकार्य करीत आहेत. त्यांच्या खर्चास परदेशाहून पैसा येत असल्यामुळे आपण काही मदत करावी, अशी वेळच आली नाही. यंदा मात्र अमेरिकन लढाईमुळे परदेशी मदत खंडित झाली. बंबे गार्डन पत्राने देशी भावांना विनंती केली की, मदत करा. मदुरामिशनातही अशी प्रार्थना केली गेली. तेव्हा अनेक भाऊ पुढे सरसावले. मंडळीच्या पेचात आणि दारिद्यात त्यांचे उदारपण मोठे शोभून दिसते. नगरमध्येही ३०० रुपये जमा झाले. वैर व मत्सर सोडून लोक मदत करतात. प्रभू म्हणतो की, घेण्यापेक्षा देणे बरे असते. आपले अवघे दहा भाग प्रभूच्या कोठारात भरती करावेत.

१७६७ अ (इंम : ३५५–३५६)

१७६८ (२० : २३, २ दिसेंबर ६१, ३५८–३५९)

मादागास्करची राणी मरण पावली. नियोजित राजा राका रादोमा गादीवर बसला. पण त्याचा सावत्र भाऊ आसालामा याने बंडाची तयारी केली. राका ख्रिस्ती आहे म्हणून काही सरदार विरुद्ध पक्षाकडे गेले. पण लढाईत राकाचाच जय झाला. राणीच्या सुतकात तेथील स्त्री-पुरुषांनी क्षौर केले, अनवाणी फिरणे, जमिनीवर निजणे, फाटकी वस्त्रे घालणे, असे त्यांचे सुतकाचे नियम आहेत. अशा अज्ञानी लोकांना ज्ञानी राजाच योग्य मार्ग दाखवील.

१७६९ (२० : २३, २ डिसेंबर ६१, ३५९–३६४)

'बुद्धिवादक' म्हणतो की, समजा वेदव्यास परत आला, तर त्याला एकही पर्णकुटिका सापडणार नाही. सुंदर सडक पाहून नवल वाटेल. पुराणिकाची बडबड ऐकून कंटाळा व त्रास वाटेल. लोकांनाही हा जटाळया साधू आवडणार नाही. तो मांसाहार करतो, असे कळले तर त्याचा राग येईल. लोकांना गीर्वाण भाषा न समजल्यामुळे तो घोटाळ्यात पडेल. त्याची शुद्ध संस्कृत भाषा लोकांना विचित्र वाटेल. कोणीही यज्ञ करीत नाही, असे कळल्यावर तो दुःखी होईल. स्मृतींना तो शास्त्र मानणार नाही. जातिभेद व अस्पृश्यता यांवरून सर्वांशी तो वाद करील. वेदाचा धर्म कोणालाच ठाऊक नसल्यामुळे तो चिडून जाईल. सुधारकांना हा म्हातारा अगदी 'सुपरस्टिशयस' वाटेल. ख्रिस्ती मिशनरी जर त्यास भेटले, तर वेदांच्या निरुपयोगीपणाचे त्याचे व्याख्यान ऐकून तो गोंधळून जाईल. त्याच्या काळात त्या व आजच्या धर्मात जमीन–असमानाचे अंतर पडलेले पाहून तो स्वर्गास निघून जाईल.

१७७० (२० : २३, २ डिसेंबर ६१, ३६५–३६७)

'एक पृच्छक' विचारतो की : तुळशीसारख्या निर्जीव पदार्थाचे दरवर्षी लग्न कशास करावे ? हा विलक्षणिक विवाह मंगलाष्टके म्हणून केला जातो. दरवर्षी तो होतो, म्हणून त्यास पुनर्विवाहच म्हणावयास हवे. हा एक अगदी पोरकट प्रकार आहे. कोट्यावधी ठिकाणी म्हणजे प्रत्येक घरी हे लग्न होत असते. हे जोडपे म्हणजे अजब. कारण नवरा तर अगदी निखालस निर्जीव आणि तुळस ही झाड म्हणून सजीव समजावी. या नवरीस बोकड खातो. नवऱ्यास उंदीर धक्के देतात. हे विधुर किंवा विधवा नसताना त्यांची लग्ने होतात. धातूची मूर्ती वा धोंडा यांसमोर अंतपाट धरला जातो. तुळशीची काकणे, मंगलसूत्र काही दिवसांनी काढून टाकतात. अशा या लग्नास काय नाव द्यावे, ते समजत नाही. पूर्वीचे राजे खंडाराणीशी म्हणजे कट्यारीशी लग्ने लावीत. मग या नवरीस मूर्तिराणी म्हणावे काय ? तरी हे पोरखेळ थांबवावेत.

**१७७१** (२० : २३, २ दिसेंबर ६१, ३६७–३६८)

गवर्णर जनरल लार्ड कानिंग याची पत्नी १८ नोवेंबर रोजी प्रवासात जंगलतापाने मृत्यू पावली.

**१७७२** (२० : २३, २ दिसेंबर ६१, ३६७–३६८)

निपालसिंग हा प्रख्यात बंडखोर अखेर इंग्रजी फौजेने पकडला.

**१७७३** (२० : २३, २ दिसेंबर ६१, ३६७–३६८)

कापसाची निर्यात जलदीने व्हावी, म्हणून सरकारने सडका बांधण्याचे काम सुरू केले. पेन्दारांना उत्तेजन देऊन कापसाची लागवड वाढविली जाईल.

**१७७४** (२० : २३, २ दिसेंबर ६१, ३६७–३६८)

इंग्लंडात आणि वेल्समध्ये निरनिराळ्या धार्मिक मंडळ्यांत २ कोटी ११ लख ५८ हजार ९३४ सभासद आहेत. आणि ३४,४६७ देवळे आहेत.

**१७७५** (२० : २३, २ दिसेंबर ६१, ३६७–३६८)

सरकारी ठरावाप्रमाणे वर्तमानपत्रांचे टपालाचे हाशील आता आगाऊ भरावे लागते. तरी वर्गणीदारांनी प्रथम दीड रुपया मनी ऑर्डरीने पाठवावा. साहेबलोकांनी ४॥ रुपये आगाऊ पाठवावेत.

**१७७५ अ** (इंम : ३६८)

मुंबई, एक्सचेंज प्रेस, फोर्ट

**१७७६** (२० : २४, १६ दिसेंबर ६१, ३७०–३७२)

क्रिस्तियन वर्णाकुलर एजुकेशन सोसैटी फार इंदिया वतीने काही पुस्तके प्रकाशित झाली. 'सत्यदीपिका' हे मासिकही या मंडळीतर्फे चालवले जाते. लहान मुलांसाठी तीन क्रमिक पुस्तके त्यांनी छापली आहेत. त्यातले विषय उपयोगी आहेत. मुलांच्या अंगी शिस्त व आज्ञाधारकपणा यावा, पापाची क्षमा व तारणाचा बोध व्हावा, म्हणून त्यातले पाठ रचले आहेत. मुळाक्षरासमोर बाराखड्या न छापता एकदम स्वावलंबनानेच मुलांनी वाचावे, अशी सोय केली आहे. शाळेतील शिक्षणास उपयुक्त अशी पुस्तकांची रचना आहे. काही कठीण शब्द मात्र टाळावयास हवे होते. उदा. प्रतिदिवशी, सत्यवादी. तसेच काही वाक्यांची रचनाही गुंतागुंतीची आहे. तीही टाळता आली असती. ईश्वराच्या दहा आज्ञांचा अभंग उत्कृष्ट आहे.

'शिक्षापद्धती' हे पुस्तक शिक्षकांना फार उपयुक्त ठरेल. मुलांना वाचन-लेखनात तरबेज करून घेणे आवश्यक आहे. प्रत्येक शाळेने त्याची एक तरी प्रत घ्यावी. या पुस्तकाचा छापसुद्धा सुरेख आहे.

'मुलांकरिता पहिले पुस्तक पृष्ठे ३२'
'मुलांकरिता दुसरे पुस्तक पृष्ठे ७५'
'मुलांकरिता तिसरे पुस्तक पृष्ठे १३०'

**१७७६ अ** (इंम : ३६९–३७०)

**१७७७** (२० : २४, १६ दिसेंबर ६१, ३७३–३७४)

हिंदुस्थानची राजधानी कलकत्त्याहून दुसरीकडे नेण्याचे ठरते आहे. लार्ड दालहौसी, विल्सन, लेयांग, या सर्वांना तेथील रोगकारक हवेमुळे अकाली मृत्यू आला. लार्ड कानिंगची पत्नीही नुकतीच मरण पावली. राणी विक्तोऱ्याची ती मैत्रीण होती. युरोपियन माणसाला कलकत्त्यात बारा महिन्यातच मृत्यू येतो! देशाच्या मध्यभागी असणारे शहर त्यासाठी निवडले पाहिजे. मुंबई अगर पुण्याची निवड झाली, तर आश्चर्य वाटावयास नको. पुणे झाले, तर महाराष्ट्र देशात चांगले फेरफार होतील. ईश्वर करो, तसेच होवो.

**१७७७ अ** (इंग्र : ३७२–३७३)

**१७७८** (२० : २४, १६ दिसेंबर ६१, ३७५–३७७)

लाक्रोईची कन्या मिसेस मलन्स कलकत्त्यामध्ये बंगाली भाषेतून शुभवर्तमान गाजवीत असे. मरणसमयी तिचे वय अवघे ३५ होते. १८५५ मध्ये तेथे जनाना मिशन सुरू झाले. १६० स्त्रिया व १५० कन्या उपदेश घेतात. मिशनच्या ३ मडमा आठवड्यातून एकदा त्यांच्या घरी जातात. ब्राह्मण, वैश्य व कायस्त जातींना उपदेश करतात. वृद्ध बायाही मनापासून ख्रिस्ताचा संदेश ऐकतात. त्यांच्या मनाचे डोळे उघडत आहेत. जनानखान्यातील अज्ञान अंधकार दूर होतो आहे. उपदेष्टी मलन्स मडम प्रीतीने व विश्वासाने काम करी. तिचे 'फुलमुनी व करुणा' पुस्तक सर्वांना आवडते. 'ख्रिस्ती धर्म म्हणजे काय' हेही वाचनीय आहे. अल्प वयात तिने जीवनाचे सार्थक केले.

**१७७८ अ** (इंग्र : ३७४–३७५)

**१७७९** (२० : २४, १६ दिसेंबर ६१, ३७७–३७८)

'वृत्तवैभव' नावाचे नवे साप्ताहिक अहमदनगर येथे ८ माहे दिसेंबर पासून सुरू झाले. रा. खंडेराव बाळाजी हे हुशार गृहस्थ त्याचे कर्ते असून रत्नागिरीस जगन्मित्र पत्रात त्यांनी काही दिवस काम केले. त्यांची लिहिण्याची शैली व शब्दयोजना सुंदर आहेत. खुबीदार विषय निवडून ते नम्रतेने व विनयाने लिहितात. पण त्यांनी इंग्रजी मजकूर छापू नये, कारण पहिल्या अंकातील इंग्रजीचो मासला बिनचूक नाही. त्याचा भरभराट झाल्याने आम्हांस आनंदच आहे. वीस वर्षांपूर्वी 'ज्ञानोदय' नावाचा एक पुत्र एथे जन्मला. त्याचे लालन हिंदुस्थानच्या पश्चिम राजधानीत होते आहे व तो भर ज्वानीत आला आहे. तो अज्ञानासुर दैत्याशी झगडून त्यास घायाळ करतो. आमचे वृत्तवैभवराव याच मातेच्या पोटी जन्मले. ती अष्टपुत्रा सौभाग्यवती होवो ! तिचा ज्येष्ठ पुत्र सद्गुणी नीतिमान व सद्धर्मपरायण आहे. तान्हे व पारठे दोघे दीर्घायु होवोत.

**१७७९ अ** (इंग : ३७७)

१७८० (२० : २४, १६ डिसेंबर ६१, ३७८–३८१)

पंढरपूरच्या यात्रेत रे. व्हैटचा उपदेश लोक एकाग्रतेने ऐकतात. महामारीचे नाशकारक ढग येत असतात. दररोज निदान ३०० माणसे मरतात. हवा उत्तरोत्तर बिघडत असते. लाख लोक दाटणीने राहातात. त्याने हवा नासती. कोणी मेला, तर त्यास तेथेच जाळतात. त्यामुळे शहर श्मशानाप्रमाणे वाटते. पटकीने तडफडणारी माणसे भयानक चर्या करून शेवटचे क्षण मोजीत असतात. कित्येक प्रेते खाचेत नग्न पुरतात, तर कैक चिता अर्धवट जळत असतात. सोलापूर स्टेशनावर अनेक वारेकरी मरून जातात. यात्रेचा लोकांच्या प्राणाशी निकट संबंध आहे. धरिता पंढरीची वाट । घेई जरीमरी पाठ ।। हे मूर्ख व भ्रष्ट लोक निदान दहा लाखांचा चुरडा करतात ! विचारशील लोकांना याचा वीट आला आहे. पटकीच्या दुर्धर रोगाचा लोंढा सर्व देशभर वाहातो आहे. बेसुमार गर्दीमुळे बाखा वाढत चाललेला आहे. सरकारनेच याचा काहीतरी बंदोबस्त करावयास हवा. असे रे. व्हेटसाहेब आपल्या पत्रात लिहितात. (तैम्स आफ् इंदिया पत्रावरून)

१७८१ (२० : २४, १६ डिसेंबर ६१, ३८१–३८२)

'बातमीदार' पत्रात म्हणतो की : पंढरपुर म्हणजे मृत्युरायाच्या शिकारीचे मुख्य स्थळ आहे. त्याच्या धनुष्यापासून मरीरूप बाण निघून यात्रेत महाप्रलय होतो. शेजारच्या गावांतील लोकांनाही तो हाणून पाडतो. सिविल सर्जन डॉ. कुक यांनी सरकारला पत्र पाठवले की : पंढरपूरच्या यात्रेकरूंना कोणत्याही शहरात मिसळू देऊ नये. शिपाई ठेवून त्यांस गावाबाहेरील मैदानातच थांबणे भाग पाडावे. काहीकाळ तंबू उभारून त्यांत त्यांना राहू द्यावे. मगच शहरात प्रवेश द्यावा. असे केले असता शेकडो लोक मृत्यूच्या दाढेमधून सुटतील.

१७८२ (२० : २४, १६ डिसेंबर ६१, ३८१–३८२)

सरबंडवाला नानासाहेब पकडला गेला, अशी बातमी आहे. बातमी खरी असेल, तर आनंदच आहे.

१७८३ (२० : २४, १६ डिसेंबर ६१, ३८१–३८२)

उदेपूरचा राजा मरण पावला.

१७८४ (२० : २४, १६ डिसेंबर ६१, ३८१–३८२)

नागपूरमध्ये बाबा पांडुरंग व रामस्वामी व्यंकटाचलय उपदेशक नेमले.

१७८५ (२० : २४, १६ डिसेंबर ६१, ३८१–३८२)

काबूलात पटकीने ७ हजार मेले.

१७८६ (२० : २४, १६ डिसेंबर ६१, ३८२–३८४)

हरदुई जिल्ह्यांत वासा या गावी एका स्त्रीला नातेवाईकांनी सती जाणे भाग पाडले. ३५ लोकांवर खटला भरला आहे.

१७८७ (२० : २४, १६ डिसेंबर ६१, ३८२–३८४)

१८६०–६१ मध्ये ९१४ टपाल कचेऱ्या होत्या. ४३,५७१ मैल डाक चालत होती. पैकी १०४६ मैल रेल्वेने चालली. मुंबई इलाख्यात रस्ते चांगले नसल्याने डाक पाठवण्यास फार खर्च येतो. दर मैलास १ रु. १४ आणे ६ पै पडतात. यंदा ८७ लाख ६९ हजार १७६ लखोटे पाठवले गेले, कारण बरेच साहेब थंड हवेसाठी महाबळेश्वरी राहून तेथून पत्रे धाडतात. (गार्घन)

१७८८ (२० : २४, १६ डिसेंबर ६१, ३८४)

कवी म्हणतो की : पाखरांना कोटी व खोकडांनाही बिळे आहेत. पण जगज्जीवन अशा येशूदेवाला मात्र जागा नाही. तो सर्वांत थोर असून घोर यातना भोगतो. आम्ही सर्वांनी धनवान व्हावे, हा त्याचा हेतू असतो. हे प्रभू, तू माझे धन व मन घ्यावीस. तू माझा उद्धार केलास. मी तुझे उपकार कसे बरे फेडू ? (कवितेचे गद्यसार)

**१७८८ अ** (इंम : ३८४)

**१७८९** (२० : २४, १६ डिसेंबर ६१, ३८४)

हल्ली वर्तमाणपत्रांचे डाक हशील अगोदर भरावे लागते. तरी वर्गणीदारांनी १ वर्षासाठी ३ रुपये आगाऊ पाठवावेत. जे साहेब डाकेने हे पत्र घेतात, त्यांनी ४॥ रुपये पाठवावे. जर वर्गणीदारांचे पैसे आले नाहीत, तर पत्र पाठवणे बंद केले जाईल.

**१७८९ अ** (इंम : ३८४)

मुंबई, एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

## ज्ञानोदय, पुस्तक २१, अंक १, मुंबई, १ ज्यानुएरी १८६२

**१७९०** (२१ : १, १ ज्यानुएरी ६२, २–४)

गतवर्षी एकटा चीन वगळता आश्या खंडात शांतता होती. युरोपात प्रत्यक्ष युद्धप्रसंग ओढावला नाही. पण १८६१ मध्ये अमेरिकेत इतिहासप्रसिद्ध लढाई सुरू झाली. ती लवकर बंद होणे अशक्य आहे. युरोपीय देशांनी तिकडे हत्यारबंद सैनिक पाठविले. उत्तर अमेरिकेस सर्व प्रकारची मदत केली. दक्षिण अमेरिका सरकार मात्र दासपण बंद करण्यास तयार नाही. ही प्रथा बंद होणार नाही, तोपर्यंत तेथे शांतता होणे कठीण आहे. गुलामांचा व्यापार बंद व्हावा, म्हणून सर्वांनी प्रार्थना करावी. या युद्धाने अमेरिकेतून येणारी मिशनांची मदत कमी झाली. तरी लोकांनी अडचण सोसून पैसे पाठविले. मिशनाच्या कामाबद्दल त्यांना आस्था आहे. अमेरिकेच्या सरकारने दक्षिण अमेरिकेची नाकेबंदी केली. त्यामुळे तेथे बेरोजगारी वाढली. कापसाचा व्यापार बंद झाला. हिंदुस्थानच्या कापसास मागणी वाढली. रशियन बादशहाने राज्यातील सर्व दासांना मोकळिक दिल्ही. सम्राट अलेक्षांदरचा कित्ता द. अमेरिकेने गिरविला पाहिजे. हिंदुस्थानात जर आबादी वाढली, तर प्राप्तीवरील कर बंद होऊ शकेल. मिशनांचे काम सर्वत्र समाधानकारक रीतीने झाले. देशी खिश्चनांनी मिशनांना भरपूर सहाय्यक केले. पवित्र आत्म्याची वृष्टी होत आहे.

**१७९० अ** (इंम : १–२)

**१७९१** (२१ : १, १ ज्यानुएरी ६२, ५)

राजमुगुट हे सम्राटाचे भूषण असते. इंग्रजांच्या राज्याची व या देशाची स्वामिनी विक्तोऱ्या महाराणी यांचा मुगुट रत्नजडित आहे. सोने व चांदी वापरलेला हा मुकुट १॥। शेर वजनाचा असून त्यावर २७८३ पैलुदार हिरे बसविले आहेत. त्यातील लाल माणिक तर अमोल्य आहे. राज्याभिषेक प्रसंगी राणीने हा मुगुट डोक्यावर ठेवला, तेव्हा त्याच्या भाराने तिचे डोके दुखू लागले. तेव्हापासून तो मुगुट मखमली गादीवर ठेवण्यात येतो. राणीसाहेब भाषण वाचीत असताना एक सरदार हा मुगुट हातात घेऊन उभा राहातो. हा मुगुट अतिशय बंदोबस्तात ठेवतात व निवडक लोकांनाच पूर्वपरवानगी घेऊन तो पाहाता येतो. हा मुगुट कधी कोमेत नाही व नाश पावत नाही. हा ईश्वराचा आशीर्वाद आहे.

**१७९१ अ** (इंग : ४)

**१७९२** (२१ : १, १ ज्यानुएरी ६२, ६)

ख्रिस्तीयन वर्नाकुलर एज्युकेशन सोसैटीने मराठीत कित्येक पुस्तके छापली आहेत. डा. विल्सनच्या 'तीन हजार वर्षांमागचे हिंदुस्थान' या पुस्तकावरून 'वेदधर्मी लोकांचा वृत्तांत' हा मराठी अनुवाद त्यांनी प्रसिद्ध केला. देशी शाळांतील शिक्षकांची सुधारणा व्हावी, म्हणून या सभेने एक परीक्षा आयोजित केली आहे. त्यात पवित्रशास्त्र, गणित, इतिहास-भूगोल, याबरोबरच शिक्षापद्धती व शाळेची व्यवस्था, हे विषयदेखील आहेत. ही परीक्षा १ एप्रिल रोजी होईल. विशेष गुणवत्ता मिळविणाऱ्या पंतोजींना २० रुपयांपासून ४० पर्यंत बक्षिसे दिली जातील. मिशनामार्फत पुस्तके मागवून घ्यावीत.

**१७९२ अ** (इंग : ५–६)

१७९३ (२१ : १, १ ज्यानुएरी ६२, ७–९)

इंग्लिश कालगणना सांगणारी आर्या व ओवी वृत्तात केलेली एक कविता दिली असून फेब्रुवारीचे २९ दिवस दर ४ वर्षांनी कसे येतात, त्याचे वर्णन केले आहे. वर्षाच्या संख्येस ४ ने भागल्यावर जर बाकी राहिली नाही, तर २८ दिवस धरावे. शिवाय एका कोष्टकात १८६२ मधील शाब्बाथ-दिवसही छापलेले आहेत. इंग्लिश वर्षांची व्यवस्था ज्योतिषास अनुसरून आहे व सोपी आहे. हिंदू वर्षामध्ये किती खटाटोप व गोंधळ आहे! १८६२ चे पंचांग तयार झाले. त्याची किंमत १ आणा पडेल.

१७९४ (२१ : १, १ ज्यानुएरी ६२, ९–१२)

'स्वदेश लोककल्याणेच्छू' लिहितो की : नगरास नाटकमंडळी आली. हे नाटकी लोक स्त्रियांसमक्ष बीभत्स व हलके शब्द वापरतात. संभावितांनी स्त्रिया–मुलांसह पाहण्याची योग्यताच नाही. नाटकवाले हलकट, पोरकट, छचोर व स्वच्छन्दी असे असतात. शिक्षक, हुद्देदार, चक्रीदार पागोटेवाले अंमलदार, यांनी तेथे जाऊ नये. देशाभिमानी व जाणत्या लोकांना नाटक पाहणे शोभत नाही. या लाजिरवाण्या धंद्यात 'शरिराचे' भाडे घेतले जाते. देवाचे सोंग घेऊन ते देवांची फजिती करतात. रांडांचे वेश घेऊन डोळे मोडून हावभाव करतात. लहान मुलांना स्त्रीवेश देऊन हावभावपूर्वक नाचविण्यात फार तोटा आहे. घरच्या माणसांना फसवून मुले नाटकाच्या धंद्यात पडतात. पण शेवटी त्यांना भीक मागावी लागते. या विनोदी सोंगाड्यांना कसलीही प्रतिष्ठा मिळणार नाही. कारण ते दिवसा डोळ्यांत काजळ घालून बायकांप्रमाणे निर्लज्जपणे वावरतात. यापेक्षा त्यांनी काही प्रमाणिक धंदा करावा. हे ठक नाटकवाले प्रेक्षकांना 'रसिक' संज्ञा देऊन फार लुबाडतात. तरी लोकांनी पैसे खर्चून नाटकरूप फल भक्षू नये. ज्ञानरूप मिष्टान्नाची चव घ्यावी. आपल्या मुलांना बिघडू देऊ नये. त्यांना सुशिक्षा देण्यात द्रव्याचा व्यय करावा.

१७९८ (२१ : १, १ ज्यानुएरी ६२, १२–१४)

'एक मुसलमान' लिहितो की : नगरजवळ मीरावलीचा डोंगर आहे. अज्ञानी लोक त्याला देव समजून भजतात. हिंदू व मुसलमान जमातींचे लोक दर गुरुवारी तेथे जमतात. कबरीच्या पाया पडणे किंवा तिला नवस करणे अयोग्य आहे. कित्येक लुच्चे लोक आणि खराब चालीच्या बायका तेथे जाऊन स्वैर वागतात. दुसरे लग्न व्हावे, म्हणून एक विधवा स्त्री तेथे येत असते. कुराणात कबरीची भक्ती निषिद्ध मानली आहे. हिंदूंना बारा गाडे देव असताना ते येथे कशाला येतात, तेही समजत नाही. शिवाय मीरावली भागात पापी लोकच फार जमा होत असतात. कबर कधी देव होणार नाही. विधवांना पुनर्विवाह करण्याची सर्रास परवानगी द्यावी. हे पत्र वाचून लोकांनी शिव्या दिल्या, तरी खरा विचार तोच मी लिहीत आहे. नगराजवळ दशाबाईचे डोंगर आहेत. तेथील मुसलमान पुजारी पिराची व्यवस्था ठेवतात. हिंदू लोक तेथे नवस करतात. मढी येथील पिराला हिंदू लोक कान्होबा म्हणून त्याची पूजा करतात. पण मुस्लिमांचा तो रमजान आहे. यापेक्षा खरा देव एकच आहे. त्यालाच शरण जावे.

**१७९६** (२१ : १, १ ज्यानुएरी ६२, १४–१५)

गेल्या वर्षी २२ जूनला लंदन शहरात बाजारात आग लागली, ती केवळ प्रलयाग्नीची प्रतिमाच होती. तीन कोटींचे नुकसान झाले. दुसऱ्या एखाद्या शहराचे असल्या आगीने दिवाळेच निघाले असते. केवळ लंदनचे पेढीवालेच ही हानि सहन करू शकले. सावकारलोक कित्येक वर्षांच्या मेहनतीच्या फळास मुकले. आग विझवीत असताना हुशार व शूर असा ब्रेदवुदसाहेब मृत्युमुखी पडला. तेम्स नदीच्या काठावरील वखारीत आग लागली व ती सगळीकडे पसरत गेली. आग पाहण्यासाठी लोक मिळेल त्या वाहनाने येऊन गर्दी करीत होते. मोठ्या पुलावरून आग स्पष्ट दिसे. पुलावर गर्दी झाल्यामुळे दोन माणसे नदीत पडून ठार झाली. नदीतून मेणाचे गोळे वाहात आले. ते विकून अनेक लोकांनी कमाई केली. एक होडीवाला पेटऱ्या मेणाने मरण पावला. वैद्यखान्यात अनेकांवर उपचार करावे लागले. एकट्या फिनिक्स पेढीवाल्याचेच ८ लक्ष ७० हजारांचे नुकसान झाले. (ज्ञानप्रसारकवरून)

**१७९७** (२१ : १, १ ज्यानुएरी ६२, १५–१६)

कलकत्यात रे. दे यांनी प्राणचरण बोज या तरुणास बाप्तिस्मा दिल्हा.

**१७९८** (२१ : १, १ ज्यानुएरी ६२, १५–१६)

नामदार गवरनर क्लार्क यांचे विलायतेस जाणे काही काळ तहकूब झाले आहे.

**१७९९** (२१ : १, १ ज्यानुएरी ६२, १५–१६)

निजामास स्तार आफ इंदियाचा नैट नेमण्याचा समारंभ झाला. त्याचा सुज्ञ दिवाण पदक अंगावर घालण्याबाबत त्याची समजूत घालील, अशी आशा आहे.

**१८००** (२१ : १, १ ज्यानुएरी ६२, १५–१६)

कच्छ प्रांतात कन्यावधाची दुष्ट चाल बंद करण्याबाबत कायदा झाला. पण मोर व बैल यांची हत्या होऊ नये, अशी अट तेथील संस्थानिकाने घातली. बकरी मारण्यास ही बंदी व्हावी, असा त्याचा प्रयत्न आहे.

**१८०१** (२१ : १, १ ज्यानुएरी ६२, १५–१६)

शनिवारी दुपारी १२ नंतर सरकारी कचेऱ्यांना सुट्टी द्यावी, असा सरकारचा विचार आहे. तसे झाले, तर वर्षात ७८ सुट्ट्या मिळतील.

**१८०२** (२१ : १, १ ज्यानुएरी ६२, १५–१६)

मुंबईमध्ये पटकीचा उपद्रव सुरू झाला. पंढरपुरच्या यात्रेचीच ही पीडा आहे.

**१८०३** (२१ : १, १ ज्यानुएरी ६२, १५–१६)

नाना धरला गेल्याची बातमी संशयास्पद दिसते. कारण तशी बातमी तीन ठिकाणांहून आली आहे.

**१८०४** (२१ : १, १ ज्यानुएरी ६२, १५–१६)

सुवेझच्या संयोगी भूमीवर ४५ कोसांचा कालवा तयार होईल. सीरियातून मजूर येणार आहेत.

मुंबई, एक्सचेंज प्रेस, फोर्ट

## ज्ञानोदय, पुस्तक २१, अंक २, मुंबई, १५ ज्यानुएरी १८६२

**१८०५** (२१ : २१, १ ज्यानुएरी ६२, १८–२०)

दक्षिण अफ्रिकेतील ८० वर्षे वयाचा म्हातारा लीबे हा मिशनऱ्यांचा द्वेष करीत असे. त्यांची संगत टाळण्यासाठी राहण्याची जागा सोडून तो दुसरीकडे गेला. पण मिशनरी तेथेही गेले, तेव्हा तो अद्वातद्वा बोलला. मिशनरी म्हणाला की, देवाने प्रकाशणाऱ्या सूर्याला सतत तरुण ठेवले आहे. लीबेची मुलगी मरण पावली, तेव्हा तर लीबेने मिशनऱ्यांवर प्राणघातक हल्ला करण्याचा प्रयत्न केला. काही काळानंतर मात्र लीबेचा मनःपालट झाला. त्याने साहेबास प्रेमाने बोलावून शास्त्र ऐकिले. देवाने आपणांस क्षमा करावी, म्हणून प्रार्थना केली. नाटक व सैतान यांपासून बचाव व्हावा, म्हणून येशूनी मध्यस्थी स्वकारली. स्वतःच्या धर्मातील अर्पणावरचा त्याचा विश्वास उडाला. आपल्या मुलानातवांनी व बासुतो जमातीनेही हा धर्म स्वीकारावा, अशी तो विनंती करीत असे. विशेष म्हणजे त्याचा मृत्यू रविवारीच झाला. देशोदेशी मिशने स्थापन झाल्यापासून पृथ्वीवर शुभवर्तमान फार गाजत आहे.

(न्यूस आव् द चर्चसवरून)

**१८०५ अ** (इंम : १७–१८)

१८०६ (२१ : २, १५ ज्यानुएरी ६२, २२–२३)

कलकत्त्यातील ब्राह्मण वर्गाचे दोन प्रकार मुख्यत्वे करता येतील : (१) मांसभक्षक (२) मांसवर्जक. पण मांसभक्षकांत काही पोटप्रकार आहेत. उघडपणे मांस खाणारे, गुप्तपणे खाणारे व दरवाजे लावून मांस खाणारे, असे तीन ठळक प्रकार दिसतात. मांसवर्जकांत जुन्या समजुतीचे म्हातारे पुष्कळ आहेत. पण ते मासे मात्र खातात. ती एका प्रकारची भाजीच मानली जाते. 'तरुण बंगाल' चे सभासद सुशिक्षित असून त्यांना काहीच वर्ज्य नाही. महाराष्ट्रीयांना वाटते की, मासे खाणे, हे तर भ्रष्टपणाचे लक्षण होय. बंगाली ब्राह्मण म्हणतात, वेदांत मांसभक्षण आहे. ते शरिरासही हितावह असते. याचा इकडील ब्राह्मणांनी विचार करावा. भ्रष्टता खाण्यात नाही, तर ईश्वराच्या इच्छेविरुद्ध चाळ्यात आहे.

१८०६ अ (इंग : २०–२२)

१८०७ (२१ : २, १५ ज्यानुएरी ६२, २३–२६)

तिगस्त साली रा. दादोबा देवाजी हे परभू गृहस्थ विलायतेस गेले. आपल्या बडतर्फीची दाद लावणे, तसेच सांगली संस्थानची बाजू मांडणे, हा त्यांचा उद्देश होता. नुकतेच त्यांच्या मृत्यूविषयी वर्तमान आले. तिकडील रीतीप्रमाणे त्यांचे शव गर्तेत दफन करावे लागले. यावरून वर्तमानदीपिकाकर्त्यांने विलायतेची वारी करणारांबद्दल नापसंती दर्शविली. कारण आपल्या धर्माचा उपहास होतो. रा. भास्कर दामोदरांना तर तिकडे एक धर्मशाळा हवी आहे. महिपतरामांनीही सांगितले की, तेथे धर्म सुरक्षितच राहातो. दीपिकाकर्त्यास मात्र वाटते की, हा देश सोडला की धर्म संपला. मग त्याच्या कलेवरात रुद्राक्ष व भस्मच भरावे लागते. विरोधी धर्माच्या नुसत्या फुपकाऱ्याने बापड्या दिवाभीतांचा प्राण निवून जातो. यावरून पहा की, हिंदूना परदेशी जाण्यात किती अडचणी आहेत. जिवंतपणी आणि मेल्यावरही अडचणी आहेतच. आता हिंदू धर्माने आपल्या भरतखंडरूप बिळातून तोंड काढून जगारण्यात मोकळा संचार करावा, असे त्यांना वाटतच नाही. तिकडे मेला, तर समाधी ध्यावी लागेल व जगला तर शेटजीप्रमाणे ढोंग करून प्रायश्चित्ताचा फजितवाडा करून घ्यावा लागेल.

१८०८ (२१ : २, १५ ज्यानुएरी ६२, २६–२७)

उत्तर हिंदुस्थानातील मिशनांचा रपोट देताना रेव. क्लार्क लिहितात की : २४ व्या पंजाबी पलटणीतील अनेक मजबी सिख बाप्तिस्मा मागतात. गेल्या वर्षी १६ जणांनी दीक्षा घेतली. पेशावर येथे बंगला बांधला असून १७०० रुपये खर्चून भजनालय बांधले आहे. दर रविवारी ८० लोक उपदेश ऐकतात. शाळेत सरासरी ३० जण उपस्थित राहातात. हे लोक अज्ञानी व अशक्त आहेत. त्यांस जड अन्न नाही, तरी दूध देण्याची गरज आहे. सुभेदार-जमादाराप्रमाणेच अनेक स्त्रियाही येत आहेत. क्लार्क मडम त्यांना उपदेश करते. एकूण ६०० कुटुंबांमधील लोक नेमाने उपदेश घेतात.

१८०९ (२१ : २, १५ ज्यानुएरी ६२, २६–२७)

नागपूरच्या रघोजी भोसल्याच्या पत्नी बकाबाई यांचे १८५८ मध्ये निधन झाले. ही स्त्री अत्यंत कर्तबगार होती. युवराज परसोजीस गादीवर बसवून तिने राज्य सांभाळले. पुढे दिराने त्यास विश्वासघाताने मारले, तरी ती वर्चस्व टिकवून होती. १८५७ च्या धामधुमीत ती इंग्रजांशी एकनिष्ठ होती. तिचा दिनक्रम फार कर्मठपणाचा होता. प्रातःकाळी ५ वाजल्यापासून जप, पूजा, अनुष्ठान, यात ती गर्क असे. धर्मकृत्यात तिचे १२-१२ तास खर्च होत. दररोज ५०–६० ब्राह्मण गोसाव्यांना ती भोजन देई. शेवटी तिचा अंतकाळ जवळ आल्यावर तिने ५०० गोदाने दिली. प्रत्येक वेळी ५० ते १०० रुपयांची दक्षिणाही दिल्ही. मरणाच्या वेळी ३०० ब्राह्मणांना तिने जेवू घातले. तिचा मृत्यू झाल्यावर तिच्या अस्थी गंगेत टाकण्याकरिता इंग्रज सरकारने दहा हजार रुपये अनुदान दिल्हे.

१८१० (२१ : २, १५ ज्यानुएरी ६२, २९–३०)

'एक मित्र' लिहितो की : पृथ्वीत ५ तत्त्वे आहेत, अशी हिंदूंची समजूत आहे, पण सृष्टीमध्ये ६५ मूलतत्त्वे आहेत व पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश, यांना मूलतत्त्वे समजणे मुळातच चूक आहे. तारायंत्रातून वीज गेली आणि तिचा पाण्यास स्पर्श झाला, तर दोन वायू तयार होऊन पुन्हा पाणी होते. लोखंडाचा जंग हाही वायूच आहे. रसायनशास्त्राने हे सारे प्रयोगानिशी सिद्ध केले आहे. वेदात खगोल, भूगोल, रसायण, या विषयी स्वकपोलकल्पित कल्पना सांगितल्या आहेत. परमेश्वराने पाणी उत्पन्न केले, त्याचा विटाळ मानता कामा नये. आश्विन महिन्यात घरातील पाण्याची पूजा करणे गैरशिस्तच आहे. फक्त परमेश्वर भजनपात्र आहे. जगातील दोन वायुतत्त्वे एकत्र करून त्याने पाणी उत्पन्न केले. पाण्याने अंग स्वच्छ होते, तसे आत्म्यास शुद्ध करण्यासाठी धर्माचे साधन हवे आहे. जगद्‌गुरू ख्रिस्ताजवळ ते साधन आहे. सर्व काळचे जीवन मिळविण्याकरिता त्यालाच शरण जावे.

१८११ (२१ : २, १५ ज्यानुएरी ६२, ३०–३२)

नामदार विक्तोऱ्या राणीसाहेबांचे पती प्रिन्स अल्बर्ट यांना अल्पकालीन आजारानंतर देवाज्ञा झाली. मनुष्याचे आयुष्य वाफेप्रमाणे थोडा वेळ दिसून नाहीसे होते.

१८१२ (२१ : २, १५ ज्यानुएरी ६२, ३०–३२)

अमेरिकेतील लढाई चालूच आहे. इंग्रज व फ्रेंचांचे सरकार मदतीस जाणार आहे.

१८१३ (२१ : २, १५ ज्यानुएरी ६२, ३०–३२)

फ्रेंच सरकारचे दिवाळे निघेल, असा रंग दिसतो. कारण यंदा ४० कोटींची तूट आली व कर्जाची रक्कम २ अर्बांनी वाढली. सावकार नवे कर्ज देत नाहीत. तूट ७० कोटींपर्यंत जाऊ शकेल. बादशहाची राणी बेसुमार खर्च करते. तिचा तीन महिन्यांचा खर्च १२ लाख झाला. राणी विक्तोऱ्याच्या चौपटने नेमणूक असूनसुद्धा त्यांना कर्ज होते. ना. फोल्दने काटकसरीचा सल्ला दिला, म्हणून त्यास राणीने बरतरफ केले. म्हणून नेहमी अंथरूण पाहूनच हातपाय पसरावेत, हे शहाणपणाचे असते.

१८१४ (२१ : २, १५ ज्यानुएरी ६२, ३०–३२)

कलकत्ता युनिवर्सितीच्या प्रश्नपत्रिकांची चोरी झाली. मुख्य कंपाझिटर व हुगळीचा एक विद्यार्थी त्यांच्यावर खटला दाखल झाला. मुंबई विद्यापीठातही असा प्रकार घडला आहे.

१८१५ (२१ : २, १५ ज्यानुएरी ६२, ३०–३२)

मि. लॅंगसाहेबाने सुचविलेले नाणे १ फेब्रुवारीपासून वापरात येईल.

**१८१६** (२१ : २, १५ ज्यानुएरी ६२, ३०–३२)

लंदनच्या लार्ड मेयरने मुंबईच्या गवरनर मि. क्लार्कना पत्र पाठवून वायव्य प्रांतातील दुष्काळ-फंडाचा विनियोग मुंबई आणि कलकत्ता शहरांच्या विकासाकरिता करण्यास परवानगी दिली आहे.

मुंबई, एक्सचेंज प्रेस, फोर्ट

---

## ज्ञानोदय, पुस्तक २१, अंक ३, मुंबई, १ फेब्रुएरी १८६२

---

**१८१७** (२१ : ३, १ फेब्रुएरी ६२, ३४–३८)

मादागास्करची मूर्तिपूजक म्हातारी राणी मृत्यु पावली. तिचा रादामा नामे पुत्र गादीवर आला. हा राजा इंग्रजी लिहू शकतो व ख्रिस्ती धर्माची आस्था बाळगतो. मॉरिशसच्या कला मंडळाने व व्यापारी सभेने त्याचे अभिनंदन केले. हा राजा अत्यंत दयाळू असून रक्तपाताचा तिरस्कार करतो. माजी राणीने ख्रिस्त्यांचा पाठलाग केला. शास्त्र बाळगण्यासही मनाई केली. पण रादामाने मिशनऱ्यांना बहुमानाने बागवले. जुलूम आणि क्रूरपणा संपून ते मुक्त झाले आहेत. राजधानी आंतानानारिओ येथे लोखंड शुद्ध करण्याचा कारखानाही सुरू झाला. १८१९ मध्ये स्थापलेले मिशन मध्यंतरी संकटात पडले होते. ते आता कार्यकारी झाले आहे. स्त्रियांना उपदेश करण्याची परवानगी मिळाली. १८३५ पासून राणीने ख्रिस्ती लोकांवर मृत्युदंड, दासपण किंवा देशपारीचे संकट लादले होते. ख्रिस्ताचा अशक्त कळप दुष्ट लांडग्यांकडून ताडिलेला, वेढलेला व पीडलेला झाला होता. पण ही कठीण परीक्षा संपून आता आनंद व समाधान झाले आहे. तरुण राजा रादामा ख्रिस्ती झाला. त्याचा चिटणीस राहानिराको हादेखील ख्रिस्ती धर्माबद्दल प्रीती बाळगणारा आहे.

**१८१७अ** (इंग : ३३–३४)

१८१८ (२१ : ३, १ फेब्रुएरी ६२, ३९–४१)

'साक्षीदार' पत्रात म्हणतो की : 'करमाळ्याजवळच्या हेलेगावी शुभवर्तमान सांगण्यास गेलो होतो. तेथील शेतकरी भाबडेपणाने मारुतीची पूजा करतात. त्यांना समजावून सांगितले की, मुख्य देव एकच आहे. तोच पीकपाणी देतो. मारुती काहीच देणार नाही. वडलांची चाल म्हणून पूजा होते. शिवाय मारुती गावाची राखण करतो, अशी समजूत, म्हणून या देवाचे महत्त्व वाढले. मारुती पहारा करतो, असे सांगणारे लोकच 'गाव जळाला तरी हनुमंत निराळा' ही म्हण वापरतात. योगायोगाने त्याच दिवशी गावात दरोडा पडला. 'मारुतील जागे करून गावाचे रक्षण करण्यास सांग', म्हटले तर वेसकरास थट्टा वाटली. ग्रामरक्षक देव जागेवर राहिला. वेसकर नगाऱ्याच्या आड लपला. चोरट्यांनी एका माणसास ठार मारून चार हजारांचा ऐवज लुबाडला. निर्जीव पदार्थांना देव मानणाऱ्या लोकांना पश्चाताप झाला पाहिजे. आपण जे देव आपणांसाठी केले, ते काही रक्षण करीत नाहीत. खरा देव निराळा व श्रेष्ठ आहे.

१८१८अ (इंम : ३८–३९)

**१८१९** (२१ : ३, १ फेब्रुएरी ६२, ४१–४२)

२५ जानेवारीस फारार मडमेचा मृत्यू झाला. ३४ वर्षांपूर्वी ती मुंबईस आली. विद्येच्या कामासाठी तिने फार परिश्रम घेतले. प्रत्येक शाळा ती स्वतः जाऊन पाही. अनेक परोपकारी साहेबांनी तिला द्रव्याश्रय दिल्हा. प्रकृती बिघडल्यामुळे तिला तीन वर्षे अमेरिकेत राहावे लागले, पण तब्येतीचा अटकाव न मानता तिने मरेपर्यंत विद्येकरिता श्रम केले. तिने शिकविलेल्या मुली इतक्या योग्यतेस चढल्या की, त्यांनीही शाळा सुरू केल्या. ७० व्या वर्षी मरणाकडून तिच्या अविरत परिश्रमांचा शेवट झाला. अखेरपर्यंत ती शुद्धीवर होती आणि प्रभू येशू आपला अंगीकार करील, यावर तिचा अविचल विश्वास होता. मरण म्हणजे बापाच्या घरात जाण्याचा दरवाजाच असतो. आमच्या कल्याणासाठी शक्ती आणि बळ खर्चिण्यास सर्वदा सिद्ध अशी एक मैत्रीण आकाशात विसावा घेत आहे.

**१८१९ अ** (इंम : ४१)

**१८२०** (२१ : ३, १ फेब्रुएरी ६२, ४३)

'एक वाचक' लिहितो की : 'मला स्वप्नात असे दृश्य दिसले : मध्यान्हीचा समय असताना विशाल काळा ढग आला. सूर्य तर पाहात होता. सगळीकडे भयंकर अंधकार झाला. सूर्य तर आरक्त झाला. समुद्रातील अक्राळविक्राळ मासा त्याला गिळू पहात होता. सगळीकडे भयंकर अंधकार झाला. आकाश फाटून प्रलयाग्नीच्या ज्वाला सागरात वर्षू लागल्या. जणू काही जळती भट्टी लवंडत होती. विजेचे लोळ पृथ्वीस तांडव करीत होते. पृथ्वी तर कंपायमान झाली. नंतर ढगाचे दोन तुकडे होऊन आकाश स्वच्छ झाले. सुंदर प्रकाश पडला. देदिप्यमान आकाशात शुभ्र घोड्यावर स्वार झालेला व पांढरा पोशाक घातलेला दिव्य पुरुष दिसला. त्याच्या दोहोभागी शुभ्र पोषाक केलेले दोन दिव्य पुरुष होते. एका वृक्षाखाली उतरून ते थांबले...या आनंदकारक स्वप्नाचा अर्थ वाचकांनीच लावावा.

**१८२० अ** (इंम : ४२)

**१८२१** (२१ : ३, १ फेब्रुएरी ६२, ४४)

'कळविणारा' लिहितो : आपल्या लोकांची अशी समजूत आहे की, पुस्तकात सापाची कात ठेवली, तर त्यास कसर लागत नाही. पण अनुभव असा आला की, ही समजूत पूर्ण चुकीची आहे. दोन वर्षांपूर्वी पुस्तकाच्या फडताळात कात ठेवली, पण आज उघडून पाहिले, तर सात अष्टमांश कात नाहीशी झाली होती. बारीक किड्यांनी कात खाऊन टाकली. कात विषमय नसते. सापाचे विष दातात असते, चर्मात नसते. तरी कापूर ठेवला, तर तो उपयुक्त ठरेल.

**१८२२** (२१ : ३, १ फेब्रुएरी ६२, ४५)

'वृत्तवैभव' पत्रात 'खऱ्या गुरूचा चेला' लिहितो की : नागर लोकांचे धर्मगुरू नगरात आले होते. जातीच्या स्त्रीपुरुषांनी उत्तम पोषाक व दागिने लेवून त्यांना वाजतगाजत गावामध्ये आणले. नुसत्या धूळदर्शनातच गुरूजींना मोठी कमाई झाली. दुसऱ्या दिवशी स्त्रियांच्या मेळाव्यात गुरुजी बसलेले दिसले. या गुरूस गुरुत्वाच्या हक्काने 'भोगाचा प्रसाद' मिळतो, असे म्हणतात. श्रीकृष्णाप्रमाणे रासक्रीडा करून ते शृंगाररसप्रधान लीळा करतात. वनभोजनाचे प्रसंगी स्त्रिया त्यांना आंघोळ घालतात. कोणासही संकोच कसा वाटत नाही ? मुंबई मुक्कामी या गुरुजींची फजिती झाली होती. हे गुरू इसापनीतीमधील न्यायाधीशाप्रमाणे न्याय देतात. पण त्यांची न्यायशैली वानराप्रमाणे असल्यामुळे मांजराचा तोटा होतो. बहिष्कृत व अपांक्त जातभाईकडून ते भरपूर दंड वसूल करतात. अशा भोंदू गुरूची भक्ती सोडून खरा महागुरू परमेश्वर त्यालाच का शरण जाऊ नये ?

**१८२३** (२१ : ३, १ फेब्रुएरी ६२, ४५–४६)

'उत्तर हिंदुस्थानातील बंड' या पुस्तकात म्हटले आहे की : बंडवाल्यांना इंग्रजांच्या बेइमानी पलटणी वश झाल्या. करोडो रुपयांचा नाश झाला. हजारोंची कत्तल झाली. रक्ताचे लोट वाहिले. गावे ओस पडली. शेतकी बुडाली, रस्ते अडले, व्यापाराचा धजाव कमी झाला. बंडवाल्यांना टक्कर देण्यासाठी विलायतेतून गोरे शिपाई आणावे लागले. या थोरांनी चटोरा पोरांचा तोरा उतरविला. पोरांस नाहीसे केले. बंडवाले हल्ला करून पळत. त्यांच्यावर हल्ला घालून कल्ला केला. हे धट्टेकट्टे भुक्कचोर इंग्रजी तोफखान्याचे दुट्टे खाऊन खाऊन खलास झाले. रट्टे बसून पतन पावले. आता फक्त 'बंड' हा शब्दच शिल्लक राहिला. (वृत्तवैभववरून) [याच आशयाची दोन श्लोकांची पद्यरचना आहे.]

**१८२४** (२१ : ३, १ फेब्रुएरी ६२, ४६–४८)

इराण सरकारने आपल्या फौजेस युरोपियन सैनिकांप्रमाणे शिक्षण देण्यासाठी फ्रेंच सरदार नेमले. तोड्याच्या बंदुका रद्द करून तोंड्याच्या बंदुका दिल्या. पोशाकही आधुनिक दिल्हे.

**१८२५** (२१ : ३, १ फेब्रुएरी ६२, ४६–४८)

इराणमध्ये महामारीचा उपद्रव सुरू झाला.

**१८२६** (२१ : ३, १ फेब्रुएरी ६२, ४६–४८)

सरकारने ज्यूडिशियल खात्याकडील नोकर कमी करून काही जणांचे पगारही कमी केल्यामुळे २२ हजारांची काटकसर केली.

**१८२७** (२१ : ३, १ फेब्रुएरी ६२, ४६–४८)

धारवाडजवळ कपरगुंड येथे सोन्याची खाण सापडली. सरकारी नोकरांना मात्र सुवर्ण-मंडळीचे भागीदार होता येणार नाही.

१८२८ (२१ : ३, १ फेब्रुएरी ६२, ४६–४८)

वराडमध्ये आगगाडीची सडक खोदीत असता लोखंडाच्या ४ खाणी सापडल्या. लोखंड शुद्ध करण्यासाठी मंडलेश्वरच्या तुरुंगातील कैद्यांचा उपयोग केला जाईल.

१८२९ (२१ : ३, १ फेब्रुएरी ६२, ४६–४८)

सन १८६२ मध्ये सूर्याची तीन व चंद्राची दोन अशी पाच ग्रहणे होतील. पण तीं हिंदुस्थानांत दिसणार नाहीत.

१८३० (२१ : ३, १ फेब्रुएरी ६२, ४६–४८)

टौन हालात सभा भरून राणीसाहेबांस भ्रतारवियोगावरून झालेल्या दुःखाबद्दल सांत्वनपर पत्र पाठविले जाईल.

१८३१ (२१ : ३, १ फेब्रुएरी ६२, ४६–४८)

खानदेशी भिल्लांनी एक गाव लुटले व डाक-कचेरी जाळली.

१८३२ (२१ : ३, १ फेब्रुएरी ६२, ४६–४८)

पंजाबात व वायव्य प्रांतात जलमार्गाच्या वाहतुकीचे उत्पन्न गेल्या वर्षी ८९ लाख ५० हजारांएवढे आले.

१८३३ (२१ : ३, १ फेब्रुएरी ६२, ४६–४८)

मुंबईचे गवर्णर सर ज्यार्ज क्लार्क येत्या मार्च महिन्यात खचित विलायतेस जाणार आहेत.

१८३४ (२१ : ३, १ फेब्रुएरी ६२, ४६–४८)

सन १८६० साली युनैटेड किंगडमची खानेसुमारी पूर्ण झाली.

**१८३५** (२१ : ३, १ फेब्रुएरी ६२, ४६–४८)

इंग्लंड, स्काटलंड व ऐरलंड यांची एकूण प्रजा २ कोटी ९० लाख ३१ हजार १६४ आहे. गेल्या दहा वर्षांत ती शेकडा सहाने वाढली. तरी २० लाख लोक अमेरिकेस गेले. अमेरिका आणि आस्ट्रेलिया धरून इंग्रजांची संख्या ६ कोटी ६० लक्ष आहे. दरवर्षी शेकडा १२ ची भर पडते. जगात चिनी भाषा बोलणारे लोक सर्वांत जास्त आहेत. त्या खालोखाल इंग्रजीचा क्रमांक आहे. अमेरिकेपेक्षा विलायतची प्रजा दहा लक्षांनी जास्त आहे.

**१८३६** (२१ : ३, १ फेब्रुएरी ६२, ४६–४८)

कलकत्याच्या नारमल स्कूलचा मुख्य गुरु बाबू भोरदेव मुकर्जी बंगालीत त्रैमासिक काढणार असून ईश्वचंद्र विद्यासागर त्यास साह्यय्य करणार आहेत.

**१८३७** (२१ : ३, १ फेब्रुएरी ६२, ४६–४८)

कुचबिहारच्या राजाने बंडखोर बाळासाहेबाला पकडून इंग्रजाच्या स्वाधीन केले. तो जर खरा बाळा असला, तर पहारेकऱ्यांना लाच देऊन पळून जाईल.

**१८३८** (२१ : ३, १ फेब्रुएरी ६२, ४६–४८)

कलकत्याचे रे. मलन्ससाहेब यांना मासाच्युसेत्स संस्थानच्या नाकम विद्यालयाकडून डाक्तर आफ दिविनिती किताब मिळाला.

मुंबई, एक्सचेंज प्रेस, फोर्ट

**१८३९** (२१ : ४, १५ फेब्रुएरी ६२, ५०–५२)

राणीसाहेबांचे भ्रतार प्रिन्स अल्बर्ट यांचा अचानक मृत्यू झाला. वयाच्या ४३ व्या वर्षी आणि विशेष आजारी नसताना ते गेले, हे पाहून लोक चकभूल होऊन गेले. राणीच्या प्राणपतीस अकाल मृत्यू आल्यामुळे तिच्याबद्दल असाधारण प्रीतीचे व सन्मानाचे उद्गार निघाले. ते राजकीय कामात तिला सुज्ञपणे मसलत देत असत. विद्या-कला-कौशल्यास आश्रय देत असत. प्रिन्स यांच्या मरणाकडून राष्ट्राची फार हानी झाली. ते आपल्या लेकरांच्या अभ्यासाविषयी सक्त मेहनत घेत असत. मुलांना सुशिक्षित, सुज्ञ बनवून अगत्याची व अब्रूची कामे करण्यासाठी त्यांना तयार करीत. नीतीची व धर्माचीही शिक्षा देत असत. त्यांच्या उत्तर-क्रियेच्या वेळी त्यांची आवडती गीते गाण्यात आली. प्रभू येशूच आपले तारण करण्यास समर्थ आहे, यावर त्यांचा विश्वास होता. त्यांची ज्येष्ठ कन्या विवाहापूर्वीच धर्मपरायण झाली. रे. आदाल्फ मानाद या प्रातेस्तंत उपदेशकाचे व्याख्यान वाचून तिच्यात पालट झाला. ती गरिबांची सेवा करी आणि त्यांना त्राक्टे वाचावयास देई. यावरून हे सिद्ध होते की, स्वापत्याचा प्रतिपाल करण्यामध्ये प्रिन्स किती चतुर होते. त्यांच्या धार्मिकपणाचे वजन त्यांच्या कुटुंबावर उत्तरोत्तर पडत राहील. आता त्यांना विद्याभ्यास शिकविण्याची जबाबदारी राणीसाहेबांवर पडली आहे. आकाशातील गौरवी मुकुटाचे वतन त्यांनी मिळवावे.

**१८३९ अ** (इंम : ४९–५०)

**१८४०** (२१ : ४, १५ फेब्रुएरी ६२, ५२–५३)

कोळगावच्या एका बाईने शेजारणीचा डागिण्यांचा डबा चोरला. आपली चोरी उघडकीस येऊ नये, म्हणून देवीची प्रार्थना करून देवीस एक डागिणादेखील वाहिला. पुजारणीने तो डागिणा सराफास विकला. योगायोगाने डागिण्याच्या मालकाने ते पाहिले. मग चौकशी सुरू झाली व ती चोर स्त्री सापडली. पोलिसांनी पकडल्यावर तिने देवीस खूप शिव्या दिल्या. 'म्हैस' म्हटले. तात्पर्य, देवास कितीही नवस केले किंवा अर्पणे वाहिली, तरी तो आपले पाप झाकणार नाही. पापाचा दंड चुकविण्यासाठी खरा पश्चात्ताप व शरणागती आवश्यक आहेत.

**१८४० अ** (इंग : ५२)

**१८४१** (२१ : ४, १५ फेब्रुएरी ६२, ५३–५६)

गवर्णर जेनरल नामदार कानिंग यांनी पार्लमेंट सभेचा विचार घेऊन हिंदुस्थानात कौन्सिल म्हणजे कायदेमंडळी नेमली आहेत. कलकत्त्यात व मुंबईत त्यांचे काम सुरू झाले. ही अविस्मरणीय घटना ठरेल. कारण पूर्वीचे राजे स्वेच्छाचारी जुलमी व दुष्ट होते. अर्थात काही चांगले व विचारशीलही होते. मनूच्या राजनीतीप्रमाणे ते कारभार करीत. अकबराचा नवरत्न दरबार, साताऱ्याचे अष्टप्रधान मंडळ, यांनाही कायदे करण्याचा काही अधिकार नसे. इंग्रजांनी राजाशी टक्कर घेऊन हा हक्क प्रस्थापित केला. काही युरोपियन देशांतही कौन्सिले सुरू झाली. अमेरिकन कौन्सिल तर सर्वोत्कृष्ट आहे. हिंदुस्थानच्या लोकांना प्रयत्नावाचून हा फायदा होत आहे. मात्र मुंबईच्या व कलकत्त्याच्या नेटिवांना हे पसंत नाही. कारण हे सभासद म्हणजे 'अनुमोदन देणाऱ्या बाहुल्या'च ठरतील असे त्यांना वाटते. इंग्रज पत्रकार म्हणतात की : ही पार्लमेंटची कुचेष्टा ठरेल. नालायक व नाकर्ते लोक नेमले गेले. आम्हांस वाटते की, माहितगार व विद्वान लोकच नेमावेत. अर्थात युरोपियन कौन्सिलाप्रमाणे त्यांच्याही हातून चुक्या होऊ शकतीलच. हिंदू, मुसलमान, पारशी, इस्रायली, यांचे एकेक प्रतिनिधी नेमावेत.

**१८४२** (२१ : ४, १५ फेब्रुएरी ६२, ५६–६०)

कलकत्त्यातील ब्राह्म समाजातर्फे एक सुधारलेल्या पद्धतीने विवाह झाला, म्हणून आम्हांस आनंद वाटतो. त्यात अर्घ्य, मधुपर्क, कन्यादान, या जुन्या चाली कायम आहेत, याचे मात्र वाईट वाटते. परंतु त्यांनी नवा पायंडा पाडला. निराकार ब्रह्माचीच फक्त प्रार्थना केली. संस्कृत मंत्र म्हणून जावयास सुवर्णदक्षिणा देण्यात आली. हेमेंद्र नाथ मुखोपाध्याय व सुकुमारी देवी यांचा हा विवाह अपूर्व होता. या देशात प्रत्येकजण आपल्या जातीच्या चालीप्रमाणे सर्व विधी पार पाडतात. 'सुपरस्टिशन' म्हणजे वेड्या, मिथ्या चालींचाच प्रभाव सर्वत्र दिसतो. शिवाय बापडे सुधारकही अशा वेळी या चालींना शरण जातात. दासपणातून सुटणे त्यांना कठीण वाटते. ते जर चोरीलुपीचा व्यवहार सोडून प्रामाणिकपणाने, प्रसिद्धपणे, आपल्या विवेकाप्रमाणे आचरण करतील, तरच त्यांस फार सुख होईल. बंगाल्यातील लोकांनी उघडपणे सुधारणुकीचा पाया घातला. 'बाबेलचा बुरूज' बांधण्याचे अवघड कार्य त्यांनी सुरू केले. अशी कामे एका दिवसात होत नाहीत. ईश्वरापाशी आग्रही प्रार्थना करावी लागते.

**१८४३** (२१ : ४, १५ फेब्रुएरी ६२, ६०–६१)

भायखळ्याजवळील एका तलावात एका साधूने आत्मघात केला, अशी बातमी त्याच्या सहमित्रांनी दिल्ही. काठावर फक्त तांब्याचे भांडे व चिठ्ठी होती. देवाच्या आज्ञेवरून त्याने आत्महत्या केली, असे इतर साधू सांगत होते. पण त्यांनीच अशी खात्री दिली की, काही दिवसांनी तो जिवंत परत येईल. १-२ दिवसांनंतर तो साधू तलावातून खरोखरच बाहेर आला. त्याने शिपायास सांगितले की, ईश्वराच्या आज्ञेने मी पृथ्वीखालून नाशकापर्यंतचा प्रवास करून आलो. माजिस्त्रेताने पाणी खराब केल्याबद्दल त्याच्याकडून चार आणे दंड घेतला व त्यास सोडून दिले.

**१८४४** (२१ : ४, १५ फेब्रुएरी ६२, ६१–६२)

बंगाल्यातील रानटी संथाळ लोकांत चर्चचे मिशनेरी धर्माचा व शिक्षणाचा प्रसार करतात. १८० लहान मोठ्या गावांमध्ये शुभवर्तमानाचे घोषण झाले. या लोकांना शिकण्याची चांगली मती आहे. पण मिशनऱ्यांनी तेथे कायमचे राहणे फार आवश्यक आहे. लोखंडी रस्त्यावर मजुरीचे काम करताना त्यांचा विश्वासूपणा दिसतो. रोजमुरा घेऊन ते झटून काम करतात. त्यांच्याशी दगाबाजी केली, तर मात्र ते काम सोडून जातात. त्यांच्यातील कित्येक लोक स्वतःच लिहिण्यावाचण्याला शिकले. तेथे १८ मिशनशाळा आहेत. त्यांपैकी दोन मुलींसाठी आहेत. शिवणकाम शिकवण्याची इच्छा असूनही तेथे शिक्षिका मिळत नाहीत. ३६६ मुले हमेशा शाळेत हजर राहातात. गुरेढोरे पाळून असतात व गुराखीपणाच त्यांना जास्त आवडतो. काहीकाही मुले आळीपाळीने शाळा व गुरांची राखण करतात. रानातही पुस्तके घेऊन जातात. म्हणून जास्त पंतोजी हवे आहेत.

**१८४५** (२१ : ४, १५ फेब्रुएरी ६२, ६२–६४)

चीनचा बादशहा अज्ञातवासात मृत्यू पावला. त्याने आपला लहान मुलगा वारस नेमला. त्याचा भाऊ कंग याने माजी राजा हायन फंगवर चुकीने राज्य कारभार केल्याबद्दल आरोप केला. इंग्रज-फ्रेंचांच्या तहनाम्याची खबरही त्याने प्रजेला दिलेली नव्हती. त्याच्या चार मदतनीसांना हद्दपार करून एकाचा शिरच्छेद केला. आता नवीन राजास मदत करण्यासाठी चौघांचे सल्लागार मंडळ आले.

**१८४६** (२१ : ४, १५ फेब्रुएरी ६२, ६२–६४)

कराचीस नाना म्हणून धरलेला माणूस आपण द्वारकेचे गोसावी आहोत, असे सांगतो. पण तपासाअंती असे आढळले की, तो द्वारकेस कधीच गेला नव्हता.

**१८४७** (२१ : ४, १५ फेब्रुएरी ६२, ६२–६४)

पृथ्वीवरील मनुष्यसंख्या ११ अब्ज २८ कोटी ३० लाख आहे. अमेरिकेत मृत्यूचे प्रमाण मोठे आहे. जगात दर सेकंदास एकाचा मृत्यू होतो व ५ जन्मास येतात. एका वर्षात ४ कोटी माणसे जन्म घेतात. शतकाच्या समाप्तीस ही संख्या किती वाढेल?

**१८४८** (२१ : ४, १५ फेब्रुएरी ६२, ६२–६४)

बंदुकीच्या दारूचा शोध सन १३३० मध्ये जर्मनीमधील कोलोन या ठिकाणी एका साधूने लावला. चिनी लोक इ. स. ८५ पासून या दारूचा उपयोग करीत आहेत. ही दारू प्रत्येक सेकंदास ५ हजार फुटांवर जाते. खडक फोडण्यासही तिचा उपयोग होतो. ती बर्फाचाही भेद करू शकते.

**१८४९** (२१ : ४, १५ फेब्रुएरी ६२, ६१–६२–६४)

हिंदुस्थानातील २०० तुरुंगांत एकूण ६३,१०५ कैदी आहेत. एका कैद्याचा वार्षिक खर्च सरासरीने किमान ३६ रुपये आहे. त्यांच्या मजुरीची एकूण रक्कम ७ लाख १९ हजार ८५७ रुपये होते.

मुंबई, एक्सचेंज प्रेस, फोर्ट

१८५० (२१ : ५, १ मार्च ६२, ६६–६८)

अमेरिकन व इंग्लिश सरकारांचा तह झाला, हे वृत्त आनंदकारक आहे. अमेरिकन सरदाराने त्रेंत या इंग्लिश गलबतावरील बंडखोरास पकडले. त्यावरून वाद सुरू झाला. वृत्तपत्रांचे शेकडो रकाने खर्ची पडले. राष्ट्राचा सन्मान व हक्क यांना बाधा आली. पण त्यांच्यात जर युद्ध झाले असते, तर व्यापार खुंटला असता. अनेक जिवांचा व्यर्थ संहार झाला असता. इतालीतील युद्धास सबळ कारण तरी होते. का की, तेथे राजाचा जुलूम प्रजेला असह्य झाला होता. प्रजेच्या अमोल्य स्वतंत्रतेसाठी ते युद्ध झाले. इंग्रज – अमेरिकनांचे युद्ध मात्र मूर्खपणाचे व क्रूरपणाचे प्रदर्शन ठरले असते. देशाचा मान राखणे किंवा योग्यता निष्कलंक राखणे, हे देशाभिमानी लोकांचे कर्तव्यच आहे. परंतु दरवेळी बुकीला बुकी देणे हा आक्रस्ताळेपणा नव्हे काय ? दुसऱ्याने आपले काही नुकसान केले, तर त्याचे १०० पट नुकसान करणे अयोग्य होय. उठसूट लढाईच्या धमक्या देणे, हा अविचारीपणाच होय. विद्वान आणि राज्यकार्यधुरंधर पुरुष असा पोरकटपणा करणार नाही. एका अमेरिकन सरदाराच्या वेडेपणाने नामदार राणीच्या प्रतिष्ठेला काहीही धक्का बसणार नाही. इंग्रजांची मागणी मान्य केल्यामुळे अमेरिकन सरकारासही कमीपणा येत नाही. दयाळू थोर व शहाण्या राज्यकर्त्यांची निंदा करण्यात अविचारी व युद्धखोर लोक अगदी तत्पर असतात. पण निःपक्षपाती इतिहासकर्ते अकारण रक्तपात टाळला, म्हणून त्यांची स्तुतीच करितील.

१८५० अ (इंम : ६५–६६)

**१८५१** (२१ : ५, १ मार्च ६२, ६८–६९)

एकदा इंग्लंडमध्ये दुष्काळ पडला होता, तेव्हा एका लहान मुलीने पावसाचे पाणी जमेल तितके जमविले आणि ते फद्यास पोहरा, या दराने विकून दहा रुपये जमविले. नंतर ते पैसे शुभवर्तमान प्रसारक मंडळीस दिल्हे. देणगीदार म्हणून आकाशातील पावसाचे नाव सांगितले.

**१८५१ अ** (इंम : ६८)

**१८५२** (२१ : ५, १ मार्च ६२, ६९–७१)

सीरिया देशात एक मांत्रिक होता. त्याने अलीकडे प्रातेस्तंत पंथ स्वीकारला आहे. पण आपल्या पूर्वाश्रमीच्या जीवनांतील युक्त्या तो मनमोकळेपणाने सांगतो. यार्देन नदीच्या पाणचक्कीजवळ एका स्त्रीचे पीठाचे पोते चोराने पळविले होते. तेव्हा या मांत्रिकाने जवळच्या अरबांच्या तंबूत जाऊन सर्वांना एकत्र बोलावले. प्रत्येकाला समान लांबीचा ऊस दिल्हा व सांगितले की, उद्यापर्यंत चोराचा ऊस दोन बोटांनी वाढेल; दुसऱ्या दिवशी पुन्हा कांडी तपासली. खऱ्या चोराने दोन बोटे ऊस कापून टाकला होता. एका स्पॅनिश सरदाराची पैशाची थैली चोरीला गेली होती. तेव्हा मांत्रिकाने त्याच्या घरातील सर्व स्त्रियांना एकत्र बोलावले. हेंगाडे दुर्बोधि मंत्र म्हणावयास सुरुवात केल्यावर एका स्त्रीचा चेहरा फार उतरला. रात्री तिने मांत्रिकाजवळ पिशवी आणून ठेवली. मांत्रिकाने मालकाचे पैसे परत दिले. चोराचे नाव मात्र 'विनंतीवरून' गुप्तच ठेवले.

**१८५२ अ** (इंम : ६९)

१८५३ (२१ : ५, १ मार्च ६२, ७१–७२)

मनुष्याचा आत्मा अनादि आहे, असे हिंदूंचे शास्त्र सांगते.

महानुभावाप्रमाणेच विष्णुबावा ब्रह्मचारीही हे मत ठासून सांगतात. त्यावर रे. रामकृष्णपंत मोडकांनी खंडनपर मत दिले आहे. ते म्हणतात : आत्मा जर अनादि असेल, तर ईश्वराप्रमाणेच तो परिपूर्ण, सत्त्वगुणी व पूर्णसुखी असला पाहिजे. ईश्वर त्याला काही देत नाही, म्हणून तो स्वतंत्र सत्ताधारी आहे, हे मत ग्राह्य धरले, तर त्याला नीच व दुःखदायक स्थिती कशी आली, याची तर्कशुद्ध संगती मिळत नाही. ईश्वर त्याचा अंत करू शकणार नाही. कारण कारणावाचून कार्य घडणार नाही. वसंत ऋतूत फुले फुलतात, त्याप्रमाणे त्यास उत्तम, मध्यम, कनिष्ठ दशा येतात, असे मानले, तर तो स्वतः होऊन प्रतिकूल व दुःखदायक दशा कशी काय लावून घेईल, हेही समजणे कठीण आहे. आत्म्यास अनादि मानणारांचे मत फक्त नास्तिकाशी जुळेल. कां तर ईश्वराचा अधिकारच ते अप्रत्यक्षपणे अमान्य करतात. ईश्वर आहे, ही पाच अक्षरे बोवा म्हणतात. पण जिवावर त्याचा अधिकार नाही, हे तत्त्व दुसरीकडे मान्यच करतात. मग ईश्वरास काहीही निर्माण करण्याची शक्ती नाही किंवा क्षुद्र कीटकाचेही तो रक्षण करीत नाही, असे मानावे लागते. या मतांचा परिणाम इतका भयंकर होऊ शकतो.

१८८४ (२१ : ५, २ मार्च ६२, ७२–७७)

वेदधर्मी लोकांचा वृत्तान्त या पुस्तकात म्हटले आहे की : वेदांची रचना इ. स. पूर्व ३००० मध्ये झाली. आर्य शब्दाचा अर्थ संभावित किंवा सभ्य असा आहे. ते मूळ पारशी देशाचे रहिवासी होते. इ. स. पू. ८०० मध्ये मनुसंहिता रचली गेली. तेव्हा ते पंजाबातून विंध्याद्रीपर्यंत आले होते. गाई, उंट पाळणे, हा त्यांचा व्यवसाय होता. त्यांचे ग्राम, पुर व गोष्ठ वसले होते. ते लोखंडाची आयुधे करीत व मादक सोमरस पीत. वेद मुखपाठ करीत. वेदाच्या बहुतेक सूक्तांत त्यांच्या कर्त्या ऋषींची नावे आहेत. म्हणजे वेद ईश्वरप्रणित नाहीत. वेदांच्या संस्कृत भाषेत लातिन जेर्मन शब्दही आढळतात. आर्यांत जाती नव्हत्या. ब्राह्मण व क्षत्रिय या वृत्ती आहेत. ज्ञानवृद्धीने ब्राह्मणाची प्रतिष्ठा वाढली. ब्राह्मण–क्षत्रियांत विवाह होत असत. त्यांनी अनार्यांना जिंकून त्यांजवर दासपण लादले. चतुर्मुख ब्रह्मदेवाचा वेदांत उल्लेखही नाही. ते पौराणिक पाखंड दिसते. ते सोवळे पाळीत नसत. अश्वमेध व गोमेध करून मांस खात असत. त्यांच्यात सतीची पद्धत नव्हती. पृथ्वीवर, आकाशात व अंतरिक्षात प्रत्येकी ११ च देव होते. पुराणांत ते ३३ कोटी बनले. वैदिक आर्य मूर्तीची पूजा करीत नसत. फक्त कणकीचा गोळा यज्ञात टाकीत. त्यावर काही आकृती असे. प्राचीन वेदांमध्ये सध्याचे वेदान्त मत नाही. म्हणून वेदान्ताचे सारतत्त्वही खोटे आहे. ज्ञानाच्या कोंबास अज्ञानाची फळे आली. ती खाऊन लोकांनी आपला पूर्ण नाश करून घेतला.

**१८९५** (२१ : ५, १ मार्च ६२, ७७–८०)

कोल्हापूरच्या मेडिकल बोर्डाने असे पत्रक काढले आहे की : स्वाभाविक रीत्या देवी रोग झाला तर तो भयंकर त्रासदायक असतो. त्याने कुरूपता, अंधत्व व क्वचित मृत्यूही येऊ शकेल. परंतु गोस्तनी देवीचे व्हॅक्सिनेशन केले, तर स्वाभाविक देवी कधीही येणार नाहीत. पूर्वी इंग्लंडमध्येही या रोगाने लोक मरत असत. तेव्हा एका इंग्रेजी वैद्याने–जेनर याने गाईच्या रोगाची लस टोचण्याची ही युक्ती शोधली. देवी टोचल्यामुळे शेकडा ९९ टक्के लोक रोगनिर्भय होतात. पूर्वी इंग्लिश लोकांनीही यास हरकत केली. पण आता या लशीचे फायदे सर्वांनाच समजलेले आहेत. देवी काढल्यानंतर आठव्या दिवशी वैद्यास पुन्हा दाखवावे. लसीने फोड फुगले, तर थोडी लस काढू द्यावी. म्हणजे यातना कमी होतील. अज्ञानी लोकांनी यास भिऊ नये. स्वाभाविक देवीच्या संकटातून कायमचे मुक्त व्हावे.

**१८९६** (२१ : ५, १ मार्च ६२, ८०)

प्राप्तिकरात काही फेरफार होणार आहे. लॅंगसाहेबाने अशी शिफारस केली की, प्राप्तीवरील बडा कर व उदमावरील कर एकत्र मिळवून त्यात फेरफार करावा.

**१८९७** (२१ : ५, १ मार्च ६२, ६२–८०)

कुत्रा चावला, तर ९ दिवसांनंतर बांदरकरी या मुळीचा वाटून रस काढावा व तो प्यावा. तीन दिवसांत गुण येतो.

मुंबई, एक्सचेंज प्रेस, फोर्ट

## ज्ञानोदय, पुस्तक २१, अंक ६, मुंबई, १५ मार्च १८६२

**१८५८** (२१ : ६, १५ मार्च ६२, ८२–८६)

पुस्तक व निबंध प्रसिद्ध करणाऱ्या मंडळीचा ३४ वा वार्षिक रपोट आला आहे. गेल्या वर्षी पैशाच्या कमताईमुळे या मंडळीची जरा अडचण झाली. तरीही त्यांनी रे. मिचलचे 'एत्तद्देशीय लोकांतील मिथ्याचार' रे. व्हैटचे 'नवस' आणि 'हार्त बुक' ही पुस्तके प्रसिद्ध केली. डा. मिचलचे मत असे आहे की : या देशात पद्यरूप पुस्तके कमी आहेत, म्हणून त्यांनी स्वतःच्र कविता करून सत्यदीपिकेत प्रसिद्ध केल्या. गतवर्षीपेक्षा यंदा ७ हजार पुस्तके कमी खपली. गेल्या १२ वर्षांत हिंदुस्थान व लंका या देशांत ९ कोटी पुस्तके खपली. त्यांत मराठी पुस्तके ५ लाख ८ हजार होती. दरसाल किमान १ लाख पुस्तके खपतात. पुस्तकांचा प्रसार जर वाढवायचा असेल, तर साक्षरता वाढली पाहिजे. मुंबई इलाख्याची प्रजा १ कोटी ५२ लाख ८३ हजार ६८५ आहे. परंतु वाचणाऱ्या प्रौढांचे प्रमाण फक्त शेकडा २॥ आहे. ते जर शेकडा १० वर गेले, तर योग्य रीतीने पुस्तके खपतील. विशेष महत्त्वाची गोष्ट म्हणजे, कोकणातील खेड्यांत वाचकांचे प्रमाण जास्त आहे. आमच्या ख्रिस्ती बांधवांनी उपलब्ध पुस्तकांचा नीट उपयोग करून ज्ञानाची लालसा वाढवावी.

**१८५८ अ** (इंस : ८१–८२)

**१८५९** (२१ : ६, १५ मार्च ६२, ८६–८८)

मि. बेहरामजी करसार्जींनी 'हिंदु लोक व प्राचीन पारशी लोक यांचा संबंध' हे पुस्तक इंग्रजी भाषेमध्ये रचले. दोघेही आर्य कुळाचे आहेत. संस्कृत व झेंद भाषांत आश्चर्यकारक साम्य आढळते. दोघेही बाक्त्रिया प्रदेशाचे मूळ रहिवासी होते. एकमेकांचे चुलतभाऊ असताना त्यांनी परस्परांस नीच समजावे, हे अयोग्य आहे. पारशांना म्लेंछ समजणे व त्यांनी ब्राह्मणांना 'दरवन' म्हणणे बरोबर नाही.

वि. को. ओक यांनी 'बालज्ञान' हे ४६ पृष्ठांचे पुस्तक लिहिले आहे. वृत्तवैभवाने सुंदर शिळाछापावर ते छापिले. पहिल्या भागात सामान्यज्ञान व कविता असून दुसऱ्यात गणित आहे. हे पुस्तक वाचले असता बालकांना प्रौढपणी सुखाचा वाटा मिळेल. पण पवित्र शास्त्राचा अभ्यास केला, तर चिरकाल टिकणाऱ्या सुखाचा लाभ होईल. तरीही 'बालज्ञान' मुलांना उपयुक्त ठरेल.

**१८५९ अ** (इंग : ८६)

**१८६०** (२१ : ६, १५ मार्च ६२, ८८–८९)

मि. बाबा पदमनजी कळवितात की : 'मोल्सवर्थकृत मराठी इंग्लिश कोशाचा संक्षेप', ह्या पुस्तकात २७ हजार शब्द आहेत. हे पुस्तक सर्वांना विकत घेता यावे, म्हणून पृष्ठे ५५० असूनही किंमत अवघी चार रुपये ठेवली आहे. वर्गणीदारांनी मे महिन्याच्या अगोदर आपली मागणी नोंदवावी.

**१८६० अ** (इंग : ८८)

**१८६१** (२१ : ६, १५ मार्च ६२, ८९–९२)

'एत्तद्देशीय ख्रिस्ती' पत्रात म्हणतो की : रात्रीच्या वेळी वाटेत तेलच्पाल्याचे भळांदे दिसले की हिंदू लोक भितात. एकदा मी माझ्या नोकरादेखत असे भळांदे उचलले व कोंबड्यांना खाण्यास दिले. पण कोंबड्यांना काही अपकार झाला नाही. या तेलच्पाल्या खाल्या, तरी काहीही होत नाही. माझा नोकर मात्र ते पाहूनच आजारी पडला. रात्री कुतरे दिसले, तरी 'खलीफ' पीर चालला, असे नेटिवांना वाटते. मग ते देवऋष्यास दारू देऊन भूतभयवह व बाधेवर 'उपचार' करतात. या वेडगळ समजुतीमुळे ते वैद्याकडे जात नाहीत. ढोंगी ठक मांत्रिकाने सांगितलेली धरबंधने मात्र करितात. ब्रह्मसमंधाची किंवा भूतराक्षसांची बाधा ख्रिस्ती लोकांना होत नाही, हे सिद्ध केले, तरी ते म्हणतात की, त्यांचा विश्वासच नाही, म्हणून ते 'मुक्त' आहेत. पीर, म्हसोबा, मारुती, यांना ते घाबरत नाहीत. भुताने पछाडलेल्या घरात ते राहिले, तरी ते सुरक्षित राहातात. जो घाबरतो तो दोरीला साप आणि झाडाला बाघ समजतो. म्हणून लोकांनी या व्यर्थ कांक्षा अगदी सोडाव्यात. खऱ्या परमेश्वराचें सद्भय धरून त्या मार्गावर चालावे.

**१८६२** (२१ : ६, १५ मार्च ६२, ९२–९३)

'कळविणारा' लिहितो की : राहुरीत एक गाय व्याली. तिला जुळी वासरे झाली. त्यांना आठ पाय व दोन डोकी होती. ती चिकटलेली होती. त्यांचे ४ पाय कापावे लागले. याप्रसंगी लोकांची फार गर्दी झाली. हे विचित्र अपत्य महारांनी नेले. पण 'इपरीत' म्हणून खाल्ले नाही. पोळीपंडित भटजी म्हणतात की, हे दुश्चिन्हसूचक अनर्थ आहेत. स्वाहाकार करून दक्षिणा दिली पाहिजे. पण मनुष्यातही असे विचित्र जन्म कधीकधी होतात. काही वर्षांपूर्वी एका म्हशीस दोन डोक्यांचे पारडू झाले. पण ते लगेच मेले. हे जुळेच असणार. पण जनावर भडकून उडी टाकते व मग ते जुळे गर्भातच चिकटत असावे.

१८६३ (२१ : ६, १५ मार्च ६२, ९३–९५)

'शोधक' लिहितो की : हिंदू पुराणात बहुत मुखांच्या पुरुषांचे वर्णन आहे. दत्तास तीन, तर रावणाला दहा मुखे होती. सूर्याचा घोडा सात शिरांचा, तर शेष हजार तोंडांचा आहे. परंतु ही एक असंभाव्य गोष्ट आहे. सृष्टिनियमाच्या विरुद्ध आहे. असे प्राणी जन्मले, तरी ते जगत नाहीत. किंबहुना, मृतावस्थेतच जन्मतात. एरव्ही हिंदू लोक हे दुश्चिन्ह मानतात. पण बहुमुखी देवांची मात्र पूजा करतात. असल्या विक्षिप्तपणामुळेच त्यांचे राज्य गेले आणि त्यांना दरिद्र आले असावे. देवांचे बहुमुखत्व जर लाक्षणिक मानले, तर ते कीर्ती, ज्ञान, पराक्रम, यांचे प्रतीक ठरेल. आणि बापापेक्षा ते देव तिप्पट, पाचपट पराक्रमी ठरतील. पण रावणाने जाळ फुंकला, तेव्हा त्याच्या दहा दाढ्या व वीस मिशा जळाल्या, असेही वर्णन चविष्टपणाने करतात. वालीने रावणास जलचर समजून पाळण्यावर उलटे टांगले होते, असे म्हणतात. ईश्वर जर अशा प्राण्यांना जन्म देत असेल, तर निरर्थक उत्पत्ती केल्याबद्दल दोष त्याच्यावर येतो, नव्हे काय ? एकीकडे म्हणतात, शंकरास पाच मुखे होती, दुसरीकडे उल्लेख करतात तो त्रिनयन आहे. मग त्याला दहा डोळे नकोत काय ? कोणीकडूनही पाहिले, तरी या शास्त्र-पुराणांना खोटेपणाचा टिळा लागतोच.

१८६४ (२१ : ६, १५ मार्च ६२, ९५–९६)

मोरिशियसमधील ऊसाच्या लागवडीसाठी ८२८६ मजूर मद्रास इलाक्यातून गेले. त्यांत २५११ स्त्रिया व ३६९ मुले होती.

१८६५ (२१ : ६, १५ मार्च ६२, ९५–९६)

हैद्राबादच्या निजामाने ब्रिटिशांकडून स्टार पदवी मिळाली, म्हणून ४० हजार रुपये खर्च करून अधिकाऱ्यांना मेजवानी दिली.

१८६६ (२१ : ६, १५ मार्च ६२, ९५–९६)

येशू ख्रिस्ताचे प्रेषित आणि शिष्य यांना मूर्तिपूजकांकडून पाठलाग सोसावा लागला. बहुतेकजण शिरच्छेदाने किंवा आगीमध्ये लोटून देण्याने मृत्यू पावले.

१८६७ (२१ : ६, १५ मार्च ६२, ९५–९६)

उष्ण देशात राहणाऱ्या युरोपियनांनी उन्हामध्ये डोके उघडे ठेवू नये. घाम आला, तर वाऱ्याच्या अंगास बसू नये. अंगरखा व बंडी यांच्या आतून फ्रानेलसारखे गरम वस्त्र ल्यावे. रात्री वाऱ्यात जाऊ नये. प्रकृती थोडी बिघडली, तरी वैद्याकडून औषध घ्यावे.

मुंबई, एक्सचेंज प्रेस, फोर्ट

**१८६८** (२१ : ७, १ एप्रिल ६२, ९९–१०३)
अमेरिकेतील लढाईमुळे पुष्कळांचे दिवाळे निघाले, उदीमधंदा बंद पडला. अमेरिकन मिशनाकडे पैसा येईनासा झाला. दरमहाचा ३ हजार रुपये खर्च भागविणेही मुष्किल झाले. तेव्हा एत्तद्देशीय खिस्ती बांधवांनी फार मदत केली. इंग्लंड व स्कातलंदहूनही मदत आली. एका हिंदू व्यापाऱ्याने १०० रुपये पाठविले. खिस्ती मिशनरी निष्काम बुद्धीने श्रम करतात, म्हणून त्यांस आदर वाटतो. मानवकुळास खिस्ती धर्मामुळेच अमोलिक लाभ होतात, हे अनेकांना पटले आहे. तीन युरोपियन साहेबांनी ३७०० रुपये दिले. एकूण १७,३७५ रुपयांचा द्रव्याश्रय मिळाला. सरळांना अंधारात उजेड उगवतो, कारण सैन्यांचा परमेश्वर आम्हांसंगती आहे. यंदा चार नवीन मंडळ्या सुरू झाल्या. ८५ जणांनी दीक्षा घेतली. प्रभुभोजनास ७२ ची वृद्धी झाली. खेड्यांत शुभवर्तमानाचा वेगाने प्रसार होत आहे. पण साह्यकारी पंतोजी नाहीत. २३ खेड्यांत मिशनाच्या शाळा असून २६० विद्यार्थी शिकतात. त्यांत मूर्तिपूजकांची मुलेही आहेत. उपदेशक तयार करण्याचे कामही चालू आहे. हे उपदेशक म्हणजे नीतिमत्त्वाची रोपे तयार करणारे वाफे आहेत. पवित्र शास्त्राची पुस्तकेही ते उत्साहाने खपवितात. जुन्या धर्माचे जू नाशकारक असून दासपणास उत्तेजन देणारे आहे. मूर्खाचारांच्या शृंखला व पशुत्वास पोचविणारी अनीती, यांतून त्यांना मुक्त करावयाचे आहे.

**१८६८ अ** (इंग : ९७–९९)

**१८६९** (२१ : ७, १ एप्रिल ६२, १०३–१०४)

मुंबई शास्त्रप्रसारक मंडळीच्या १८६१ च्या रपोटात म्हटले आहे की, गतवर्षी या मंडळीस ३४२६ रुपये मिळाले. त्यांपैकी १८७८ रु. शास्त्रविक्रीचे होते. नव्या कराराच्या मराठी प्रती फार खपतात. कारण त्यांची किंमत निम्मी, म्हणजे दोन आणे ठेवली आहे. काही ठिकाणी असे आढळले की, शाळेचे पंतोजी विद्यार्थ्यांना ही पुस्तके घेण्याची मनाई करतात. तरी ७९३५ प्रती खपल्या, हे विशेष आहे. शास्त्राची पुस्तके विकण्याकरिता नगर, पुणे व सुरत येथे ११ जण नेमले होते. काही खेडुतांना शास्त्र विकत घेण्याची इच्छा असते. पण ब्राह्मण मंडळी त्यांस मना करतात. एक गोसावी तर सांगतो की, ज्या गावात शास्त्राची प्रत असेल, ते गाव सहाच महिन्यात जळून जाते. अर्थात हे मिथ्या भय काही दिवसानंतर नाहीसे होईल. ब्राह्मणांना ख्रिस्ती धर्माचे फार भय वाटते आहे. शास्त्राच्या गुजराती तर्जुम्याच्या ५ हजार प्रती लवकरच तयार होतील. १८५९ मध्ये छापलेल्या नव्या कराराची मराठी आवृत्तीही पुन्हा तयार होईल. हे काम अधिक आवेशाने चालावे, म्हणून ईश्वराजवळ प्रार्थना करतो.

**१८६९ अ** (इंम : १०४)

**१८७०** (२१ : ७, १ एप्रिल ६२, १०६–१०९)

मलन्स मडमेकडे एक वसंतबाई नावाची संभावित व धनाढ्य कुटुंबातील विधवा आली. एका सत्यशोधक ब्राह्मणाने तिला पाठवले होते. सर्व तीर्थक्षेत्रे हिंडूनही तिला खरा धर्म गवसला नव्हता. ही स्त्री वयाने २४ होती व सौम्य व मर्यादशील अशी होती. निजघरामध्ये तिला बसवले. मडमेने ईश्वराची स्तुती करून तिच्यावर पवित्र आत्म्याची वृष्टी व्हावी, म्हणून प्रार्थना केली. व्रते, नेम व उपास करून वसंतबाई कंटाळली होती. तिला ख्रिस्ताजवळ दुर्लभ आत्मिक विसावा सापडला. आपल्या वडील बहिणीच्या दुखण्यात तिने नवस करताना पाहिले होते. पण तिच्या मनास शांती देण्यास नवसही अपुरा पडला. खरा प्रकाश मडमेजवळच सापडला. देव अंतःकरण पाहात असतो. तिला मडमेकडे पाठविणाऱ्या ब्राह्मण कुटुंबासही ख्रिस्ताबद्दल प्रेम वाटे. परंतु तसे उघड कबूल करण्यास ते भीत असत. नम्र विद्यार्थ्याप्रमाणे तिने शास्त्र वाचले. येशूच तारणारा आहे, अशी तिची खातरी झाली. तिचे 'आंधळेपण' नाहीसे झाले. मूर्तींची पूजा केल्यामुळे अंतःकरण सुधारत नाही. चंद्र आणि सूर्य ज्यास प्रदक्षिणा घालतात, त्या ईश्वरास शरण जावे.

**१८७० अ** (इंम : १०४–१०६)

**१८७१** (२१ : ७, १ एप्रिल ६२, १०९–११०)

'हर्षसूचक' लिहितो की : १ नोव्हेंबर १८५८ रोजी राणी सरकारचा अंमल सुरू झाला. आमचा वैरी जो नाना त्याने बेईमानी केली. प्रलय मांडला. वीड हळकुंडाने तो पिवळा झाला. पण पराक्रमी सर्कारीने त्याच्या तोंडास काळेपणा आणला. पण सर्कारास अफाट कर्ज झाल्यामुळे कर वाढले आणि रयतेचा पांढरेपणा मळीण होऊ लागला. जकातकर, प्राप्तिकर, काटकसर, या धोरणांमध्ये अल्प प्राप्तीचे गरीबही सापडले. परंतु राणीसरकार रयतेस असे कंगाल होऊ देणार नाही. काही कर कमी होणार आहेत. रस्ते, पूल, इत्यादी लोकोपयोगी कामे सुरू आहेत. आम्ही सुखपर्वताच्या पहिल्या पायरीवर आहोत. लवकरच बरे होऊन आम्ही उठू, पुन्हा वर चढू लागू व शिखरास जाऊन पोहोचू. दयाळू राणीसरकारास आशीर्वाद मागणे, हा आमचाच प्रजाधर्म आहे.

**१८७२** (२१ : ७, १ एप्रिल ६२, ११०–११२)

श्री. केरो लक्ष्मण छत्रे अहमदनगर एथील सरकारी शाळेत व्याख्यानांत माहिती देताना म्हणाले की, वीज हे द्रव्य सर्वत्र आढळते. तेज व आवाज निर्माण करणे, आकर्षण निर्माण करणे, हे विजेने साधते. काच, रेशीम, लाख घासली, तर वीज तयार होते. आकाशातील ढगात ती चमकल्यावर एक महान राक्षसी वाटते. पण लोखंडी खांब रोवला असता त्यावर पडून ती जमिनीत जाते. विजेने रोग बरे होतात, डोंगर फोडता येतात, सोन्यारुप्यास मुलामा देता येतो. विजेच्या दोन प्रकारांना धन व ऋण म्हणतात. हे एकमेकांना लोटितात. धातूच्या तारेतून विजेचा प्रवाह नेऊन त्याखाली होकायंत्र ठेवले, तर प्रवाहास काटकोनाची स्थिती येते. लोखंडास चुंबकत्वही प्राप्त होते. मनुष्याच्या अंगातून विजेचा प्रवाह गेला, तर त्यास धक्का बसल्यासारखे होते.

**१८७३** (२१ : ७, १ एप्रिल ६२, ११२)

चीनमधील तैपिंगचे राज्यकर्ते सर्वत्र विजयी होत आहेत. निंगपो हे महत्त्वाचे शहर त्यानी जिंकले. शांघाई शहरावरही हल्ला केला. गेल्या काही दिवसांत मिशनऱ्यांचे व त्यांचे बरे नाही. याचा हा परिणाम होय. पण लवकरच त्यांचा तंटा मिटेल. चीनमध्ये जुन्या राज्यकर्त्यांत अनेक तट असल्यामुळे इंग्रजांचाच जय होणार, यात शंका नाही.

**१८७४** (२१ : ७, १ एप्रिल ६२, ११२)

विलायतची डाक मुंबईत १८ दिवसांत पोहोचते, तर मद्रासेत ३० दिवसांत पोहोचते. ही डाक चीनमध्ये पोहोचण्यास ५० दिवस लागतात.

**१८७५** (२१ : ७, १ एप्रिल ६२, ११२)

अफूचा व्यापार वाढत आहे. कारण सरकारने एका पेटीवरची जकात ७०० वरून ६०० रु. केली. खरे तर १२९८ रु. करण्याची सूचना होती. हा व्यापार वाढून बहुत लोकांचा घात होणार आहे.

मुंबई, एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

**१८७६** (२१ : ८, १५ एप्रिल ६२, ११४–११७)

अहमदनगर मिशन रपोटावरून कोळगाव एथे बिसलसाहेबाकडून मुक्ताबाई नामक स्त्री खिस्ती झाली. पाच कोस चालून येऊन तिने खिस्त अंगीकारला. तिचा नवरा हिंदू असून त्याला फार राग आला. सणाच्या दिवशी त्याने तीस मारहाण केली. तेणेकरून ती बेशुद्ध झाली. पण तिने पतीविरुद्ध तक्रार केली नाही, म्हणून तिला चांगली वागणूक मिळते. पांडू नाना कोळगावचा महार रक्तपितीने ओंगळवाणा झाला होता. सगळे त्याचा रागराग करीत. म्हणून त्याने वस्ताऱ्याने गळा कापून घेण्याचा प्रयत्न केला. तो आपणांविषयी निर्दय होता, पण प्रभूने त्यास वाचवले. खिस्ती धर्म स्वीकारून तो नवा मनुष्य बनला. तो अतिशय आजारी झाला, तेव्हा त्यास प्रभुभोजनात भाग घेण्याची इच्छा झाली. बायकोकडून तो शास्त्र वाचून घेत असे आणि आपली उत्तरक्रिया खिस्त्यांप्रमाणे व्हावी, असेही सांगे. कोकऱ्याच्या जीवनी पुस्तकात नाव नोंदवून तो मेला. रे. भावाट या साहेबाकडे एक निःशस्त्रवादी तरुण आला. पोस्टात नोकरी करीत असताना तो येवल्यास होता. पण त्याचे मन खिस्तासाठी तळमळत होते. मरणाच्या वेळी बायकोकडून त्याने डोक्यावरती पाणी शिंपडून घेतले. खिस्ताने मानवासाठी शरीर मोडले व रक्त शिंपिले. बायकोस धर्मांतर करण्यास सांगून त्याने प्राणत्याग केला. त्याची हास्यमुद्रा शेवटपर्यंत कायम होती. असे आनंदयुक्त व जयवान मरण कोणीही कधी पाहिले नव्हते.

**१८७६ अ** (डंम : ११३–११४)

१८७७ (२१ : ८, १५ एप्रिल ६२, ११७–११८)

अहमदनगर जिल्ह्यांत रांजणगावापासून ८ कोसांवर होळकर सरकारचे कोरेगाव आहे. तेथे पेशवे व इंग्रज सरकार यांची १ जानेवारी १८१८ रोजी लढाई झाली. इंग्रजांचा जय झाला, म्हणून जयस्तंभ उभारला आहे. तो चाळीस हात उंच असून त्याच्याभोवती चौफेर ओटा आहे. त्याचे दगडी काम सुरेख असून त्यावर पाऊण लाख रुपये खर्च झाला. खांबावर दोन बाजूंस इंग्रजीत व मराठीत लढाईची हकीगत कोरली आहे. मुंबई सरकारच्या ७५० सैनिकांनी दोन तोफांचा उपयोग करून पेशवे व अरब यांचे सैन्य निकराची लढाई करून पळवून लावले. याची कीर्ती राहावी म्हणून हा जयस्तंभ उभारला आहे. त्याची रचना १८२२ त झाली.

१८७८ (२१ : ८, १५ एप्रिल ६२, ११८–१२५)

आमचा बातमीदार कळवितो की : चीन देश कोकणासारखा आहे. बारा महिने येथे पाऊस पडतो. गहू-ज्वारी-बाजरी पिकत नाही, तर फक्त राळे व साळी पिकतात. इकडे नापीक जमीन राहू देत नाहीत. नांगरास एकच बैल असतो. शेतीस मलमूत्राचे खत घालतात. जमीन उंचसखल आहे. स्त्रिया पुरुषांच्या बरोबरीने शेती करतात. लोकवस्ती दाट असून घरे पक्क्या विटांची कौलारू आहेत. जमिनीवर कोणीही बसत नाही. निदान चटया वापरतात. लोक गोरे, पण ओबडधोबड चेहऱ्याचे आहेत. पुरुष वयाच्या ५० व्या वर्षानंतर दाढी ठेवतात. स्त्रिया काचेची एखादी बांगडी घालतात. अगदी बाळंतीण स्त्रीसुदा तिसऱ्या दिवसापासून शेतात काम करते. स्त्रियांच्या पायात ल्हानपणापासून लोखंडी बूट घालतात. त्यायोगे त्यांचे पाय लहान असतात. त्या फारसे दागिने वापरताना दिसत नाहीत. प्रौढपणी विवाह होतात. विधवा स्त्रिया दुसरा विवाह करतात. मांजर, उंदीर, इतकेच काय, पण टोळसुद्धा हे लोक खाऊन टाकतात. दारू, अफू व चंडोल, या व्यासनांत अनेकजण गुरफटलेले असतात. सगळे एकमेकांचे उष्टे खातात. गौतम बुद्धाच्या मूर्तीची पूजा करतात. दरोडेखोर स्त्रियांनाही चोरून नेतात. इकडे गुन्हेगारांना फार क्रूर शिक्षा दिली जाते. व्यभिचारी स्त्रीला सगळ्यांदेखत लाजिरवाणी शिक्षा भोगावी लागते. यांचे उपाध्ये अविवाहित राहतात. गुरूस चेले व चेल्या वाहण्याची चाल आहे. मृतास कबरीत पुरतात.

१८७९ (२१ : ८, १५ एप्रिल ६२, १२५–१२६)

नगरच्या सरकारी शाळेचे मुख्य गुरू केरो लक्ष्मण छत्रे शास्त्रीय विषयांवर व्याख्याने योजितात. विद्यार्थांना व नागरिकांना त्याचा फायदा होतो. विष्णु सदाशिव पिसोळ यांनी इतिहासावर व्याख्याने दिली. पण उंच शब्द फार वापरले. तसेच इंग्रजाचे राज्य ही दुःखदायक घटना आहे, असेही ते म्हणाले. भूस्तरशास्त्रावरही व्याख्यान झाले. पण त्यातील शब्द फारच अवघड होते. रा. बाळाजी महादेव यांनी वाफेच्या यंत्राविषयी चांगली माहिती सांगितली. विद्यार्थ्यांनी सभाधीट व्हावे, म्हणून त्यांनाही बोलण्यास उत्तेजन दिले जाते. एकाने नेत्ररचनेविषयी भाषण दिल्हे. मि. केरोपंतांनी इतरांनाही बोलण्यास मोकळीक द्यावी, अशी सूचना 'एक नगरकर' ने केली आहे.

१८८० (२१ : ८, १५ एप्रिल ६२, १२६)

मारवाड प्रांतातही मिशनाचे कार्य चांगले चालू आहे. रे. शूल ब्रेद गावोगावी हिंडून उपदेश करतात. त्यांनी मारवाडी भाषेत शुभवर्तमान प्रसिद्ध केले. लोक आनंदाने त्यांचा उपदेश ऐकतात. एकजणही विरुद्ध बोलत नाही.

१८८१ (२१ : ८, १५ एप्रिल ६२, १२६)

नामदार राणीचे ज्येष्ठ पुत्र मिसर देशाहून तुर्कस्थान देशास जाणार आहेत.

१८८२ (२१ : ८, १५ एप्रिल ६२, १२६)

अमेरिकेत एकट्या ओहियो संस्थानात ८ लाख खंडी गहू व ३०॥ लाख खंडी मका असे पीक आले.

१८८३ (२१ : ८, १५ एप्रिल ६२, १२६)

अमेरिकन लढाईमुळे कापसाचा भाव कमीजास्त होत असतो. मुंबईचे भाटे जोशांना विचारून कापसाचा भाव ठेवितात.

१८८४ (२१ : ८, १५ एप्रिल ६२, १२६)

बडोद्याच्या गायकवाडाचा अंमल दुःखावह वाटून अनेकजण भावनगरमध्ये राहण्यास जातात. बडोद्यातील जुलूम व कर यांमुळे प्रजा दारिद्री होत आहे. भावनगरच्या राजाने अनेक सुधारणा केल्या. हा राजा कपूरथळ्याच्या राजासारखा दक्ष आहे.

१८८५ (२१ : ८, १५ एप्रिल ६२, १२६–१२७)

पटकीग्रस्त माणसाला सुंठ, लवंग, दालचिनी व मिरे यांचा काढा द्यावा. साखरमिश्रित ब्रांडी पाजावी. पथ्यासाठी कांजी द्यावी.
(वृत्तवैभववरून)

१८८६ (२१ : ८, १५ एप्रिल ६२, १२७)

फिलिप्पैन देशात मातिलाजवळ फार साप आहेत. एका माणसास साप चावला असता वैद्याने दंशाच्या जागी निखारा ठेवला, तर त्याच्या अंगावर सूज आली. मग वैद्याने नारळापासून तयार केलेली दारू त्यास पाजली, तेव्हा त्याच्या वेदना कमी होऊन सूज उतरू लागली. केवळ कोकोवेन या दारूनेच रोगी बरा झाला.

१८८७ (२१ : ८, १५ एप्रिल ६२, १२८)

कलकत्त्याचे कायदे-कौन्सिल नवीन कायदा करणार आहे. एखादा माणूस ख्रिस्ती झाला, तर त्याची पत्नी आपला विवाह रद्द करून घेऊ शकेल. ती जर अज्ञान असेल, तर सज्ञान झाल्यावर तिच्या मर्जीनुसार तिला निर्णय घेता येईल.
(वृत्तवैभववरून)

१८८८ (२१ : ८, १५ एप्रिल ६२, १२८)

चीनची बातमी लवकर कळावी, म्हणून तारायंत्राच्या कामदारास हजार रुपयाची लालूच दाखविली, म्हणून दोघांना अटक झाली.

**१८८९** (२१ : ८, १५ एप्रिल ६२, १२८)

कापसाचा भाव वाढत असल्यामुळे इंग्रज लोक वस्त्राकरिता कापसाला पर्यायी जिन्नस शोधीत आहेत.

**१८९०** (२१ : ८, १५ एप्रिल ६२, १२८)

नवे गवर्णर जेनराल लार्ड एल्गिन कलकत्त्यात दाखल झाले. लार्ड कार्निंग विलायतेस जाणार असल्यामुळे त्यांना मानपत्र देण्याचा विचार नेटिवात चालू आहे.

**१८९१** (२१ : ८, १५ एप्रिल ६२, १२८)

मुंबई इलाख्यासाठी गवर्णर म्हणून जे. पी. ग्रांत यांची नेमणूक होणार असून क्लार्कसाहेब विलायतेस जाणार आहेत.

**१८९२** (२१ : ८, १५ एप्रिल ६२, १२८)

असम प्रांताच्या हद्दीवर इंग्रज सरकारची नाखूष प्रजा दंगल करणार असल्याबद्दल बातमी आहे. पंजाबातही दंग्याची कुणकुण ऐकू येते. (वृत्तवैभववरून)

मुंबई, एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

**१८९३** (२१ : ९, १ मे ६२, १३२–१३९)

मुंबईचे लार्ड बिशप म्हणाले की : मनुष्याच्या अस्तित्वावरून उत्पन्नकर्त्याचे अस्तित्व सिद्ध होते. जसें घड्याळ पाहून कारागिराची ओळख पटते. ईश्वराने मानवी शरीर घडविले. योजकावाचून योजना नाही. करामत्यावाचून करामत होत नाही. डोळ्याची दुर्बिण त्याने बनविली. माणसाच्या सुखासाठी हे सर्व केले. उत्पन्नकर्त्याचे गुण त्याच्यावरून समजतात. म्हणून आत्म्याला काळजीपूर्वक जपले पाहिजे. परमेश्वराच्या वास्तविक गुणांचे अज्ञान असले की, देवांची संख्या वाढते !
साक्रतीस देखील म्हणे की, आत्मा विदेही स्थितीत कसा राहातो, ते कळणे कठीणच आहे. म्हणून ज्ञान देणारे शास्त्र वाचावे. विचारशक्तीने समजून घ्यावे. भक्तीचा मार्ग त्यातून कळतो. अद्भुत चमत्कारांच्या साहाय्याने ईश्वर जे प्रमाण देतो, ते ओळखावे. येशूने गालिलात पाण्यापासून द्राक्षरस तयार केला, अंधळ्यास दृष्टी दिल्ही, लाजारसला कबरेतून उठविले आणि तो स्वतः मेलेल्यांतून उठला. हे चमत्कार जर खरे नसते, तर हा धर्मही टिकला नसता. नाजोरी लोकांचे हाडवैरी किंवा जुलमी रोमी अधिकारी देखील हे चमत्कार कबूल करतात. सृष्टिनियमांना बाजूला टाकून केवळ इच्छाशक्तीने येशू चमत्कार करीत असे. ख्रिस्ती शास्त्रावर ईश्वरी कृपेचा शिक्का आहे. चमत्कारांचे प्रमाण डावलणे अयोग्य आहे. चमत्काराने आपण सत्यरूपी मंदिराच्या उंबऱ्यापासी जातो. आपण अढळ खडकावर उभे असल्याबद्दल मनसाक्ष मिळते.

**१८९३ अ** (इंम : १२९–१३२)

**१८९४** (२१ : ९, १ मे ६२, १३९-१४०)

नगर एथे ९ एप्रिल रोजी मोठे वादळ झाले. ४-५ दिवस पाऊस पडत होता. जोराच्या वाऱ्याने बंगल्यांची कवाडे व झडपा मोडल्या, तावदाने फुटली. कलेक्टरसाहेबांच्या बागेची फार नासाडी झाली. झाडे इतकी मोडली की, २० गाड्या सरपण पडलेले आहे. काही गावांत गारा पडल्या. गुडघ्याएवढा गारांचा थर झाला होता. आंबे झडून गेले. जनावरांना इजा झाली. आठ खेडूत मृत्यू पावले. काहींचे हातपाय भप सुजले. नदीतून गारांच्या ढेपा कलिंगडाबरोबर वाहताना दिसल्या. जुन्नर आणि येवला या गावी तर पेरूएवढ्या गारा पडल्या. जुनरास ३ वाजता, तर नगरात ४ वाजता वादळ झाले. कोरडे वादळ तर अनेक गावांत घोंगावत होते.

**१८९४ अ** (इंम : १३९)

**१८९५** (२१ : ९, १ मे ६२, १४०–१४३)

'अनीतिद्वेष्टा' लिहितो की : वामोरीच्या होळी यात्रेत तमाशे चालतात. यंदा काही पोरे बंडवाल्यांचे सोंग घेऊन त्यांनी साहेबास कसे मारले, त्याचे नाटक दाखवीत होते. ख्रिस्ती लोकांनी त्यांस उपदेश करून तमाशा बंद केला, तेव्हा जहागिरदार व मामलेदार यांनी वरती रिपोर्ट करून तमाशाची परवानगी मिळविली. 'नगरवासी' लिहितो की : केडगावातही तमाशा होतो. सरकारी कामदारही तो पाहातात. शेवटी फौजदारास खबर करून तमाशा बंद करविला, तर आमच्यावर दांडगाईचा आरोप करतात. बीभत्स गाणी व सोंगे यांविरुद्ध कायदा असताना सरकारी नोकर तेथे जातात, हे अगदी अयोग्य आहे. अजून बंडाच्या आठवणी ताज्या आहेत, अशावेळी हे गैरशिस्त काम अधिकाऱ्यांनीच बंद केले पाहिजे. येवल्याच्या ललितात सोंगे घेतल्याबद्दल काही लोकांना कडक शिक्षा झाली होती. ख्रिस्ती उपदेशकांचा द्वेष मनात धरून सरकारी अधिकारीच गुन्ह्यामध्ये सापडत आहेत. सरकारी पगार खातात, पण आपले कर्तव्य इमानेइतबारे करीत नाहीत. ख्रिस्ती लोक मात्र प्रजाधर्म पाळून सरकारास मदत करतात, पण तमाशे मोडीत मात्र नाहीत. रयतेने जागरूक राहून खबर दिली पाहिजे. १८५७ मध्ये कोल्हारच्या जत्रेत तमाशा झाला. ख्रिस्ती लोकांनी बातमी दिल्यावर साहेबाने फौजदारास तंबी दिल्ही व ख्रिस्त्यांचे आभार मानले. सगळ्या लोकांनी तमाशा बंद करण्यास झटावे.

**१८९५ अ** (इंग्र : १४३–१४४)

**१८९६** (२१ : ९, १ मे ६२, १४४)

मुंबई इलाख्याचे गवर्णर म्हणून ग्रांत साहेबाऐवजी सिंधचे कमिशनर फ्रियेर यांची नेमणूक झाली.

१८९७ (२२ : ९, १ मे ६२, १४४)

नानाचा पुतण्या बाळाराव याने आपले गुन्हे कबूल केले असून त्याची चौकशी होणार आहे.

१८९८ (२१ : ९, १ मे ६२, १४४)

नानाचा एक हस्तक रामराव हैद्राबादेत फितुरी आणि अधिकाऱ्यांच्या खुनाचे बेत करीत होता. परंतु तो पळून गेला. दुसरा एक बंडखोर गोसावी धरला होता. त्याने कैदेत आत्महत्या केली.

१८९९ (२१ : ९, १ मे ६२, १४४)

चाळीसगावाकडे कापसात भेसळ होते, या तक्रारीची अधिकाऱ्यांनी चौकशी केली, तर शेकडा १० गठ्ठे खराब निघाले. गठ्ठे जाळून मालकांना दंड केला.

१९०० (२१ : ९, १ मे ६२, १४४)

दिल्लीत एका इमारतीचा पाया खणीत असलेल्या कैद्यांना दाहा लक्षांची दौलत सापडली, असे वर्तमान आहे.

मुंबई, एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

**१९०१** (२१ : १०, १५ मे ६२, १४६-१४८)

कपूरथळ्याचा राजा रणधीरसिंग हा शिखांच्या १२ श्रेष्ठ कुळांपैकी फुलकियन कुळात जन्मला. त्याच्या राज्याचा वसूल बारा लाख आहे. त्याचा आजा जरसासिंघ स्वतःची नाणीसुद्धा पाडीत असे. बंडाच्या काळात रणधीरने इंग्रजांचा पक्ष स्वीकारला. ईस्त इंग्रनसाहेबाच्या कन्येशी लग्न केले. तिने त्यास ख्रिस्ताकडे फिरविले. राजाने आपल्या खर्चाने मिशन व भजनालय बांधली. दवाखाना, धर्मशाळा व शाळा, यांचा खर्च तो चालवतो. १२० विद्यार्थ्यांच्या या शाळेत दर रविवारी पवित्र शास्त्र शिकविले जाते. राजपुत्रदेखील बायबल वाचतात. राजाने आपली ख्रिस्तानुकूलता लपविलेली नाही. धर्मसंबंधी स्वतंत्रतेस तो संपूर्ण मान्य आहे. कलकत्त्यात आला, तर तो भक्तिभावाने प्रार्थना करतो, प्रभुभोजनाच्या प्रसंगी हजर राहातो. ख्रिस्ताने आम्हांसाठी सोशिले, ते त्याच्या मनावर चांगले बिंबले. त्याने बहुतकरून ख्रिस्ती व्हावे, असे आम्ही इच्छितो.

(फ्रेंड ऑफ इंडियावरून)

**१९०१ अ** (इंम : १४५-१४६)

**१९०२** (२१ : १०; १५ मे ६२, १४९–१५१)

शिक्षकांचे काम सुधारावे म्हणून क्रिस्तियन वर्नाकुलर सोसैटीने शिक्षकांना बक्षिसे जाहीर केली. ४४ उमेदवारांपैकी पुण्याचे बाळकृष्ण व्यंकटेश व त्यांच्या खालोखाल नारायण रामचंद्र खिस्ती यांची परीक्षा उतरली. त्यांना ३०–३० रुपये बक्षिस दिल्हे. शिवाय इतर तीस जणांना गुणानुसार बक्षिसे देण्यात आली. यांत ११ जण अगदी कनिष्ठ ठरले. या परीक्षा दरसाल होतील व १० पासून ४० रुपयांपर्यंत बक्षिसे मिळतील. पवित्र शास्त्रासह व्यावहारिक विद्यांचे विषय ठेविले आहेत. बक्षिसे मिळविणारांत नगरचे १५ जण आहेत. शिक्षकाचे काम अत्यंत जबाबदारीचे व अगत्याचे आहे. जसजसा विद्येचा प्रसार होईल, तसतसे हे लोकांच्या लक्षांत येईल. परीक्षा दिल्यामुळे शिक्षकांचे ज्ञान व बुद्धी वाढतील. हुशार पंतोजी मुलांना चांगले शिक्षण देण्यास समर्थ असतात. बुद्धीस आणि विद्येस नीतीची व धार्मिकपणाची जोड मिळाली, तर उत्कृष्ट शिक्षक तयार होतील.

**१९०२ अ** (इंम : १४८–१४९)

**१९०३** (२१ : १०, १४ मे ६२, १५१–१५४)

'स्वजनहितेच्छू' लिहितो की : पुण्याची नाटके पाहून चटोर तरुण नगरात नाटक उभे करतात. गेल्या वेळी पुणेरी नाटकवाल्याने १७०० रुपये लुबाडून नेले. मुले घरात चोरी–लबाडी करून नाटकापुरते पैसे मिळवतात. नगरचे काही तरुण नाटकाची सामग्री जमवीत आहेत. रावणाच्या भुजा व स्त्रियांचे पोशाक जमले आहेत. गांजा ओढून कविता तयार करतात. एका कारभाऱ्याने कर्ज काढूनच कंपणी स्थापिली. मुले स्त्रीवेष घेणार, म्हणून आईबापांनी जर त्यांना हाकलून दिले, तर हा त्यांचा खर्च चालविणार म्हणतो. आमचे छत्रे हेडमास्तर मात्र अशा मुलांना शाळेतून हाकलून देतात. त्यांची कडक शिस्त सगळीकडे आढळत नाही. जयरामबाबा साधूही नाटकास उत्तेजन देतात. तरुणांची बिघाडणूक थांबली पाहिजे.सांगलीकर विष्णुदास भाव्याची नाटके चांगली असतात, असे ऐकू येते. आम्ही कोणाच्या गुणांचा उपमर्द करीत नाही. परंतु तरुणांना चांगले वळण लागणे आवश्यक आहे. पोरे नाटकात गेली की, त्यांचे आईबाप रडत बसतात. कित्येक नाटकांचे अध्वर्यु लहान मुलांना आपल्या पाशात गोंवितात व त्यांच्या जन्माचे मातेरे करून टाकितात. चार महिन्यांपूर्वी एका नाटकी नारायणाने बराच द्रव्यापहार केला. पुरुषांनी बायकांचे वेष घेणे अत्यंत अयोग्य आहे. या उद्योगास प्रतिष्ठा समजणे, हीच चूक आहे.

**१९०४** (२१ : १०, १५ मे ६२, १५४–१५६)

जरीमरीच्या पहिल्या अवस्थेत डोळे पांढरे होऊन शक्ती क्षीण होते. अशा वेळी चिमूटभर पिठीसाखरेवर कापूरार्काचा एक थेंब टाकून रोग्यास द्यावा. १०–१० पळांनी असेच करावे. दुसऱ्या अवस्थेत हातापायास गोळे येतात. म्हणून विरात्रमच्या ३–३ गोळ्या अर्ध घटिकेचे अंतर राखून द्याव्यात. पोटात आग पडली, तर अर्सनिकच्या गोळ्या द्याव्यात. तिसऱ्या अवस्थेत नाडी बंद होते. मग कार्बन व अर्सनिक क्रमाक्रमाने द्यावे. रोगी बरळू लागला, तर सिकेलीच्या गोळ्या द्याव्यात. रोग्यास जरा आराम पडला की, तांदळाची पेज द्यावी. साथीच्या दिवसांत कापराचा अर्क सतत घरात ठेवावा.

**१९०५** (२१ : १०, १५ मे ६२, १५४–१५९)

एक मित्र 'ब' लिहितो की : जातीच्या किल्ल्यास आतून सुरुंग लावणारा असा 'जातिभेद–विवेकसार' हा ग्रंथ आहे. एका हिंदूने तो लिहिला. गुप्तरूपे जात मोडणारे पुष्कळ आहेत. खिस्ती धर्माशी जर जातीची गाठ पडली, तर मात्र ती जात खिस्ताच्या सेवेत विलीन होते. सुरुंगास बत्ती देणाराने स्वतः पळावे लागते, त्याप्रमाणे या लेखकाने जातीचे बंधन स्वतः उघडपणे तोडले पाहिजे. नाहीतर हजारो ग्रंथ लिहूनही काही उपयोग होणार नाही. तो स्वतः जातीसाठी माती खातो; मग त्याचे कोण ऐकणार ? जो स्वतःच्या लेखाप्रमाणे चालत नाही, त्याचे वजन पडत नसते. लूथराचा कित्ता जर घेतला नाही, तर हे लिखाण सोंगाड्याप्रमाणे वाटू लागेल. जातीमुळे हिंदू धर्म म्हणजे १८ धान्यांचे कडबोळे बनला. त्यात अगदी परस्परविरुद्ध मतांचे समर्थन आढळते. कर्त्याने ईश्वरी प्रतणिपणाचे मनावरचे ओझे फेकून द्यावे. ज्ञानोबातुकारामांची वचनेही तेवढीच महत्त्वाची आहेत. जातिभेद मोडल्याने खरा धर्मच वाढेल, असे या लेखकाचे मत आहे; पण गंगाधरशास्त्री फडके मात्र गंधाचा तिलक सोडल्याबद्दल नवशिक्या तरुणावर टीका करतात. 'तरुणांनी आपल्या स्वधर्मरूप बापाचा शिरच्छेद केला,' असा ताशेरा त्यांनी दिला आहे. म्हणून विवेकसाराच्या कर्त्याने जातीपणाच्या बेड्या आपल्या पायांतून तोडाव्यात. बोले तैसा चाले। त्याची वंदावी पाउले ।।! (प्रभोदयवरून)

**१९०६** (२१ : १०, १५ मे ६२, १५९–१६०)

मुंबईचे नवे गवर्णर म्हणून फ्रियरसाहेब रूजू झाले.

**१९०७** (२१ : १०, १५ मे ६२, १५९–१६०)

तायपिंग लोकांचे राज्य चिनात असतानाच खिस्ती मिशनरी शुभवर्तमानाचे बी पेरीत होते. तो उपदेश ऐकलेला एक माणूस मिशनऱ्यांना तुल्यू गावात भेटला. मिशनऱ्यांच्या कामास देवाचा आशीर्वाद आहे.

**१९०८** (२१ : १०, १५ मे ६२, १५९–१६०)

बंगालमध्ये महानदीच्या किनाऱ्यावर दर दहा वर्षांनी मोठे तुफान होते. भर दिवसा अंधार होऊन वेगाने वारे वाहातात. तुफानी पावसाने होड्या किनाऱ्यावर आदळतात. २७ मार्च रोजी कित्येक घरे उडून गेली. रानातील श्वापदे मरून पडली. १७१ माणसे मेली, १११ जखमी झाली. १०९३ जनावरे मेली. तरी हा उपद्रव ५ कोसांच्या प्रदेशातच होता.

**१९०९** (२१ : १०, १५ मे ६२, १५९–१६०)

नगरमध्ये १७ मार्च रोजी विलक्षण प्रकारचा उल्कापात झाला. भर दिवसा उल्का पडली. ती प्रखर अग्नीच्या गोळ्यासारखी दिसली. दर ३४ वर्षांनी अंतरिक्षामधून मोठ्या प्रमाणावर तारापतन होते, असे फ्रेंच विद्वानांचे निरीक्षण आहे. १७९९ व १८३३ या वर्षी फार तारे पडले. या हिशेबाने १८६७ मध्ये तारावृष्टी होईल.

मुंबई, एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

**१९१०** (२१ : ११, २ ज्यून ६२, १६२–१६७)

'सत्यप्रकाश'च्या गुजराती कर्त्याने गुरू जदुनाथ यांच्यावर अनीती फैलावून शिष्यिणीशी व्यभिचार केला, असा आरोप करून कोर्टात खटला भरला. वल्लभाचार्यांचे धर्ममत हे एक पाखंड होय. जातिबहिष्काराची चिंता न बाळगता पत्रकर्त्याने सत्य तेच बाहेर आणले. डाक्तर भाऊ दाजी, रे. विल्सन, हेही साक्षीदार होते. इतर साक्षीदारांनी जी माहिती दिली, ती वाचण्यासही शरम वाटते. कोर्टात जज्ज अरनाल्द यांनी मूर्तिपूजा व अज्ञानी चाली यांवरती कडक ताशेरे दिल्हे. बंगाली प्रजेतही शाक्तपंथीय लोकही मोठा अनाचार करतात. त्यांचा धर्म अगदी नीच पायरीवर गेला आहे. प्राचीन ग्रीक व रोमी लोकांचा असाच अधःपात झाला होता. बाजीराव पेशव्यानेही लाजावे, अशी वल्लभपंथी गुरूंची वागणूक आहे. लोकांनी आपल्या बायकांना देवळात जाऊ देऊ नये. कोर्टाने निकालपत्रात म्हटल्याप्रमाणे धर्माच्या नावाखालीं जर भ्रष्टता वाढत असेल, तर ते हानिकारक आहे. गुरू जदुनाथ तर पळून गेला. त्याचा डंका भर बादशाही कोर्टात वाजला! शक्ति व शिव यांच्या उपासकांबद्दलही अशाच गोष्टी ऐकू येतात. एखाद्या गुरूने स्वतःस श्रीकृष्ण समजून समाजात अनीती माजवावी, हे लांछनास्पद आहे. सर्वसाधारण माणसाची प्रवृत्ती पापाकडे असते. त्यास धर्माचा आधार मिळाला, तर गोष्टी खालच्या थरावर जातात. धर्माने जर पाप करण्याची मोकळीक मिळत असेल, तर त्याचा फेरविचार करावयास हवा.

**१९१० अ** (इंम : १६१–१६२)

१९११ (२१ : ११, २ ज्यून ६२, १६७–१७०)

कोहिनूर या शब्दाचा अर्थ तेजाचा खडक असा होतो. हा हिरा सुजाउल्मुल्काकडून रणजितसिंगाकडे आला. कोहिनूरचा पहिला धनी कर्ण, तो रणांगणावर मृत्यू पावला. नंतर तो ज्याच्या ज्याच्याकडे गेला, त्याचा अंत दुःखदायक झाला. विक्रमादित्य, अल्लाउद्दीन, नादिरशहा, अहमदशहा, शहा सुजा, यांना राज्यभ्रष्टता व मृत्यू हेच परिणाम भोगावे लागले. रणजितसिंगाच्या मृत्यूच्या वेळी कोहिनूर हिरा जगन्नाथाच्या मुकुटात ठेवावा, अशी सूचना झाली. पण पुढे हा हिरा शेरसिंघ, दलीपसिंग, असा प्रवास करीत करीत राणी विक्टोऱ्याच्या मुकुटात जाऊन बसला. जो राजा हा हिरा बाळगील, त्यास खाणीतील देवता पीडा देतात, असा समज आहे. अन्याय व दुष्टाई करणारांना शांतीने मृत्यू मिळणे दुरापास्तच असते. आता कोहिनूर हिऱ्यास विश्रांतीचे स्थळ मिळाले आहे. पूर्वीच्या सगळ्या धन्यांपेक्षा त्याची सध्याची स्वामिनी राणी विक्टोऱ्या ऐश्वर्यवान व सद्गुणी आहे. तिच्याजवळ शुद्ध आचरणाचा मंत्र असल्यामुळे तिचा अनर्थापासून बचाव होणार, हे निश्चित आहे.

१९११ अ (इंम : १६७)

१९१२ (२१ : ११, २ ज्यून ६२, १७०–१७१)

मुंबईकर ख्रिस्ती कळवितो की, विठू सुर्वा भंडारी हा मुंबईतील हत्यारी पोलीस होता. त्यास क्षयाची भावना असल्यामुळे मरणाचे भय वाटे. मरणापूर्वी तारण मिळावे, या चिंतेत मग्न असे. रस्ते पुष्कळजण सांगतात. पण खरा मार्ग एखादाच असतो. म्हणून तो ख्रिस्ताकडे आला. येशूच्या कृपेचे गूज त्याला समजले. संकटाचा मार्ग बिकट व वाट अरुंद म्हणतात, ते त्याच्या अनुभवास आले. त्याच्या भावाबंदांनी व जातीने त्याचा फारच पाठलाग केला. त्या छळणुकेस अंतच नाही. त्यास चाकरीतून बरतरफ केले गेले. पण त्याने ख्रिस्ताची भक्ती सोडिली नाही. प्रकृती बिघडल्यानंतर त्यास हास्पताळात ठेविले. या सौम्यस्वभावी तरुणास गीते फार आवडत असत. अखेरीस तो शांतीच्या दुनियेत गेला. आम्ही मात्र जगदरण्यात भ्रमण करीत आहोत.

देवापासी पोचला,
सुख पावला अपार।

दिव्य दूतांनी त्यास आकाशाच्या वतनामध्ये नेले.

१०१३ (२१ : ११, २ ज्यून ६२, १७१–१७३)

नगरच्या सरकारी शाळेचे व्यवस्थापक रा. छत्रे एक महिन्याच्या सुटीवर गेले, तरी पंतोजी बाळाजी महादेव यांनी सभा चांगली चालविली, असे नगरकर कळवितो. मि. बाळाचार्य यांनी रसायनशास्त्रावर सप्रयोग व अर्थशास्त्रावर माहितीपूर्ण व्याख्याने दिल्ही. रा. पांडुरंग सखाराम लोहचुंबक व होकायंत्र यांविषयी बोलले. मि. केरोपंतांनी मुलांनाही बोलण्याची सवय लावली. दहा वर्षांची मुले मंजूळ स्वराने व बालभाषेने सुरस भाषणे करतात. एक मुसलमान मुलगा शुद्ध मराठी बोलला. अस्पृश्यही शिकविले, तर चांगले बोलतील. महत्त्वाकांक्षी व जुलमी ब्राह्मणांनी त्यांस पायांखाली तुडविले आहे. एका महंमदी शिक्षकाने गर्वाविषयी उत्तम भाषण केले. परंतु तो म्हणाला की, पापाचा दोष माणसाकडेच आहे. काही ठिकाणी नेटिवांच्या पोथ्यात 'ईश्वर पाप करवितो', असे उल्लेख आहेत. ते बरोबर नाहीत. वास्तविक ईश्वरास पापाचा अत्यंत कंटाळा आहे. पवित्र शास्त्राचे मत वाचून पाहावे. काही सभेत भांडण करतात, हे मात्र अयोग्य आहे. निदान अशा भांडणांचा वृत्तपत्रामधून उल्लेख येऊ नये. तसेच, काही लोक सभेस उशिरा येतात व लोकांनी आपणास खडी ताजीम द्यावी, अशी अपेक्षा करतात. तरी श्रोत्यांनी अगदी वक्तशीर यावे.

**१९१४** (२१ : ११, २ ज्यून ६२, १७३–१७५)

'सदसद्‌विवेचक' कळवितो की : दाजीसाहेबांची इतकी तारीफ ऐकू आली की, कान किटले. परवा वेरूळास जाताना ते नगरहून गेले. तेव्हा सावेडीच्या लैब्रेरीस बंधूमार्फत १०० रुपये दिल्हे व इंग्रजी शाळेत उभाउभी २५ रु. इनाम दिल्हे. भट्टांना उद्या दक्षिणा वाटू म्हणाले. परंतु पहाटेच निघून गेले. त्यांचे औदार्य सर्व ठिकाणी सारखे नाही. मुंबई-पुण्यात त्यांनी दिवाणी कैद्यांचे ऋण फेडून त्यांना बंदमुक्त केले. तीर्थक्षेत्रात हजारो ब्राह्मणांना अन्नदान व दक्षिणा दिली. जवळपास राहणाऱ्या लोकांना खूष करणे, हा त्यांचा हेतू दिसतो. ज्या गावात मराठी वृत्तपत्रे आहेत, तेथे त्यांनी सढळ देणग्या दिल्या. रा. छत्रे यांना ते भेटलेही नाहीत. आंधळे किंवा अस्पृश्य यांना एक पैसाही दिल्हा नाही. तस्मात् ते प्रसिद्धीच्या द्वारे कीर्ती विकत घेताहेत, हे उघड दिसते. मि. कोक यांनी पुण्यात बोर्डिंग काढण्यासाठी ५० हजारांचा संकल्प सोडला. पण आपणास बरोनेत किंवा स्तार पदवी मिळेल, तर दाजीसाहेब ही सर्व रक्कम द्यावयास तयार होते. यास खरे औदार्य म्हणावे काय ? यावर ज्ञानोदयकर्ते लिहितात की : किताबतीच्या हेतूने द्रव्य वाटणे अयोग्यच ठरेल. पण देवस्थानांस द्रव्य देण्यापेक्षा शाळांना व दवाखान्यांना मदत करावयास हवी.

**१९१५** (२१ : ११, २ ज्यून ६२, १७५–१७६)

अमेरिकन लढाईत बहुत करून सरकारचा जय होत आहे. पण ३५ हजार बंडवाल्यांचा व २० हजार सरकारी शिपायांचा मृत्यु झाला.

**१९१६** (२१ : ११, २ ज्यून ६२, १७५–१७६)

पाणीप्रकरणाची खबर छापताना वृत्तवैभवाने म्हटले आहे की, या लोकांनी हौद बाटविले. असे लिहिणे आमच्या बंधूंना शोभत नाही. बाटणे हा शब्द वापरावयाचा नाही, असे गेल्या वर्षी ठरले होते.

**१९१७** (२१ : ११, २ ज्यून ६२, १७५–१७६)

अहमदनगरचा एक परदेशी तरुण मुसलमान झाला.

**१९१८** (२१ : ११, २ ज्यून ६२, १७५–१७६)

लंदनचे पदार्थसंग्रहालय पाहण्यास शेकडो लोक येत आहेत.

**१९१९** (शून्य नोंद)

**१९२०** (२१ : ११, २ ज्यून ६२, १७५–१७६)

वडोद्याच्या रेल्वे कामगारांनी एक मोलवान आगगाडी तयार केली व महाराजांना नजर केली. जोशाने मात्र सांगितले की, या गाडीला अपघात होईल. बोलाफुलास गाठ पडून गाडीस अपघात झाला. मग भटजोशांचे माहात्म्य वाढेल, यात शंका नाही. आपासाहेब गाइकवाडांनी जोशांना सल्ला घेणे बंद करावे.

**१९२१** (२१ : ११, २ ज्यून ६२, १७५–१७६)

छोटा नागपूरच्या मिशनऱ्याने चिनका नावाचे औषधी झाड शोधले आहे. त्याची पाने विवनैनप्रमाणे उपयुक्त ठरली आहेत. मिलिटरी बोर्ड त्याचे गुणधर्म तपासणार आहे. (ज्ञानप्रकाशावरून)

**१९२२** (२१ : ११, २ ज्यून ६२, १७५–१७६)

वृश्चिकदंश झाला, तर प्रज्वलित निखाऱ्याने शेकावे. म्हणजे दंशछिद्रातून निव्वळ पाणी जाऊन बरे वाटते. किंवा कडकडीत तेलात ओली विड्याची पाने चुरून त्यांचा शेक द्यावा. (वृत्तप्रकाशावरून)

मुंबई, एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

**१९२३** (२१ : १२, १६ ज्यून ६२, १७६–१८०)

विलायती डाक नेणाऱ्या आगबोटीत स्वदेशास जाणाऱ्या साहेबलोकांची फार गर्दी असते. नगरचे माजी कलेक्टर तैतलर स्वदेशी गेले. गेली २० वर्षे ते नगर जिल्ह्यातच अंमलदार होते. त्यांनी जिल्ह्यामधील भाषाभेदांचा चांगला अभ्यास केला. त्यांनी जमाबंदीची नीट व्यवस्था लावल्यामुळे शेतकऱ्यांची भरभराट होऊन ते सावकारांच्या जुलमापासून मुक्त झाले. साहेब मजकूर अगदी गोड बोलत व स्वतः अर्ज्या घेत. चोबदाराची लुडबुड किंवा लाचखोरी चालू देत नसत.

त्यांची सगळ्या जिल्ह्यात अशी आख्या होती की, ते खरोखरचे ख्रिस्ती आहेत. त्यांच्या निःपक्ष न्यायदानाची हिंदूंनीही तारीफ केली. त्यांचे निकाल वरचे अधिकारी बदलू शकले नाहीत. नगरच्या पाणीप्रकरणात पहिला निकाल त्यांनी दिल्हा व राणीच्या जाहिरनाम्याचा रास्त अर्थ लागला. तोच सर्व हिंदुस्थानास लागू झाला. पवित्र शास्त्रातील भविष्यलेखावर त्यांनी इंग्रजीमध्ये ग्रंथ रचिला. धार्मिक विषयांवर लहानाले निबंध प्रसिद्ध केले. धर्मसंबंधी आणि परोपकारी कृत्यांना ते यथाशक्ती साह्य करीत. पाच हजार रुपये खर्चून त्यांनी पिंपळस येथे बंगला व भजनालय बांधले. त्याची यादगिरी बहुत दिवस राहील. विलायतेच्या हितकारक हवेत राहून प्रकृती सुधारल्यावर त्यांचे मोठे कामावर येणे व्हावे, म्हणून आम्ही प्रार्थना करतो.

**१९२३ अ** (इंम : १७७–१७८)

१९२४ (२१ : १२, १६ ज्यून ६२, १८१–१८२)

ज्यूनच्या दुसऱ्या तारखेपासून इंदुप्रकाश या नावाचे नवे इंग्रजी व मराठी वर्तमानपत्र निघू लागले. ते साप्ताहिक आहे. याचा साचा मोठा असून ठशाच्या छापावर छापले आहे. विद्येची गोडी वाढली आहे. बरेच व्यापारी-उदमी व सर्कारी कामदार यांचा विपुल आश्रय त्यास मिळेल. मयत बाळ गंगाधराचा दर्पण, भाऊ महाजनांचा शुक्रोदय, आमचा ज्ञानोदय, नारायण शेषाद्रीचा प्रभोदय अशी चार वृत्तपत्रे निघाली. परंतु ज्ञानोदय आणि प्रभोदय, ही दोनच सध्या चालू आहेत. बाकीची बंद पडली. असे इंदुप्रकाशचे होऊ नये, म्हणून विद्वान देशाभिमानी लोकांनी जपले पाहिजे. नावाप्रमाणेच याचे गुण आणि वाणी सौम्य राहील, असे असे वाटत आहे. व्यावहारिक ज्ञानाबरोबरच व्यापाराच्या खबराही त्यात येणार आहेत. सर्वांशी स्नेहाने वागून स्वदेशाची सेवा करण्याचा मनोदयसुद्धा संपादकांनी व्यक्त केला आहे. इंग्रजी राज्यापासून या देशास किती लाभ झाले, ते या पत्रात चांगले दाखविले आहे. हे पत्र चिरकाल चालावे.

१९२४ अ (इंम : १८१)

**१९२५** (२१ : १२, १६ ज्यून ६२, १८३–१८५)

एक बंगाली गृहस्थ इंग्लंडहून आल्यानंतर लिहिलेल्या पत्रात म्हणतो की : या प्रवासाचे वर्णन लिहिणे आवश्यक आहे. इंग्लंदमधील घोडी व गाई हत्तीप्रमाणे स्थूल आहेत. अंगावर ऊर्णवस्त्र ठेवून शेक घेतला की, थंडीचा त्रास होत नाही. ब्रिटिशांचे चातुर्य व उद्योग अनुकरणीय आहेत. तेथील गावठी गावेही स्वच्छ व सोयीवार आहेत. मडमांचे पोशाक बंगाली स्त्रियांपेक्षा चांगले आहेत. इंग्लंड हा दुकानदारी करणारांचा देश आहे, असे नेपोलियन बोनापार्ताने म्हटले होते. इंग्लंडमध्ये रेल्वे स्टेशनवर, घरावर, सगळीकडे जाहिराती दिसतात. ब्रिटिश म्युझियम फार आश्चर्यकारक आहे. ग्रीस व रोममधील सुंदर पुतळे तेथे आढळतात. ब्रिटिशांच्या सभ्यतेच्या रीतीही चांगल्या आहेत. जांभई देणे, हे अमर्यादेचे लक्षण मानले जाते. लोक शांत व स्वस्थ असतात. ते कधी गोंधळून जात नाहीत. संभावित इंग्लिश स्त्रियाही नम्रतेने सलाम करून 'थांक यु' म्हणतात. वरच्या प्रतीचे लोक खालच्या प्रतीच्या लोकांना मनापासून साह्य करतात. इंग्लंदमध्ये एका वर्षाचा खर्च १५६० रुपये येतो. हिंदुस्थानातून येणारांना एथील अन्न बेचव लागते. कारण त्यांस मसालेदार अन्न खाण्याची सवय असते. एथील मासे फार चांगले लागतात. मासे म्हणजे पक्वान्नच आहे. (फ्रेंद आफ् इंडियावरून)

**१९२६** (२१ : १२, १६ ज्यून ६२, १८५–१८६)

चीनमधील एक मिशनरी लिहितात की : चिनी लोक मोठे लालुचखोर आहेत. पैशाकरता ते हवे ते करतात. प्राप्ती नसेल, तर काहीच करणार नाहीत. थोडीफार लालूच दिली, तर ते ख्रिस्ती होतात. काही पैसे दिले, तर मंडळीत बसून आपण बाप्तिस्मा घेतला, असा देखावा करण्यासही मदत करतात. शेवटी एका निष्ठावान ख्रिस्ती माणसाने चिनी लोकांना सांगितले की, पवित्र शास्त्र ही अमोलिक देणगी आहे. भारोभार सोन्यापेक्षाही ते मोलवान् आहे. हिंदुस्थानदेशातही लोकांना असे वाटते की, काहीतरी लाभ असल्यावाचून आईबापांचा धर्म कोणी सोडणार नाही. ख्रिस्ती धर्मातील प्रीत व तारणोपाय किती मोलवान आहेत याचा विचार करा.

१९२६ अ (इंम : १८५)

१९२७ (२१ : १२, १६ ज्यून ६२, १८६–१८८)

'समाधान करणारा' लिहितो की : गोविंद रामचंद्र नगरकर यांना महामारीने देवाज्ञा झाली. त्यांचे नातलग शोकार्णवात बुडाले आहेत. अकोळनेरच्या गरीब भिक्षुकाचा हा मुलगा प्रथम ज्युडिश्यल खात्यात नोकरीस लागला व नंतर तैतलरसाहेबांचा दुय्यम चिटणीस बनला. ते फार सचोटीचे गृहस्थ होते. तैतलरने त्यांस सर्तिफिकीत दिले आहे. अल्पवयात मोठ्या हुद्यावर जाऊनही ते अतिनम्र होते. ते डौली नव्हते. कामासी काम ठेवून वागत. लाच कधीही घेत नसत. ते संभावित असून अनीतीचा व बीभत्सपणाचा त्यांस कंटाळा होता. ज्या विवाहामध्ये कलावंतिणीचे नाच होतात, तेथे ते जात नसत. शर्यतीच्या घोड्यांवर पैसे उधळीत नसत. रा. रामचंद्र अमृत दुगलसाहेबाच्या समागमाने त्यांना अनेक सद्‌गुण मिळाले. त्यांच्या आईबापांची मात्र दया येती. कारण असा सुपत्र लाभणे अत्यंत कठीण आहे. जगिक समाधान किती अशाश्वत असते, याचा मात्र अनुभव आला. पण ज्याने पवित्र शास्त्र वाचले नाही, तो नेहमी असमाधानी असतो. त्यांचा पुत्र मात्र सुज्ञ व कर्ता होता. एखाद्या मुलाने परधर्म स्वीकारला, तर बापाने रागदुःख मानू नये. त्यासी अन्नादि व्यवहार ठेवून पुत्रधर्मांप्रमाणे सेवासाह्य केले, तर ते घ्यावे.

**१९२८** (२१ : १२, १६ ज्यून ६२, १८८–१९०)

सरकारने कागदाचे नाणे काढण्याचे ठरविले आहे. लोकांना वाटते की, आपला पैसा जाऊन हातो कागद मात्र राहणार. पण आजही ब्यांक नोटीचा व्यवहार चालतोच की ! या देशात कित्येक ठिकाणी कवड्यांची व बदामांची नाणीही चालतात. हुंडीपत्र हाही कागदच होय. कागदाच्या तुकड्यावर लिहिलेली रक्कम जर शहाजोग आहे, तर मग चिंता कशाची ? खतपत्र हेही कागदच असते. महत्त्व असते, ते फक्त पतीला ! पत असेल, तर नाणे कशाला, शब्दानेही पैसे मिळतात. सरकार ५ रुपयांपासून १ लाखापर्यंतच्या नोटा जारी करणार आहे. नोकरांचे पगार व सरकारी देणी या कागदी चलनामधून मिळतील. कागदी नाणे सोयीस्कर व सुलभ असते. त्यास चोरापोरांचे भय नाही. प्रवासात जवळ बाळगण्यासही ते सोयीचे आहे. पाहिजे तेथे वाटेल तेव्हा त्याची नाणी मिळतील. सोन्यारुप्याची नाणी चोरापोरांच्या डोळ्यांवर येऊन दगाफटका होतो. धातूची नाणी पुरून ठेवून श्रीमंती टिकविता येते. राज्यक्रांतीसारखे फेरफार झाले, तर पुरलेले सोनेनाणे उपयोगी पडते. तरीही कागदाचा व्यवहारच सर्वांत सोपा आहे.

**१९२९** (२१ : १२, १६ ज्यून ६२, १९०–१९२)

अमेरिकन लढाईत सरकारपक्षास सारखा जय मिळत असून बंडवाले पळून जात आहेत. सरकारने न्यू ऑर्लिन्स हे कापसाचे मुख्य ठिकाण जिंकले. तिकडचा कापूस इंग्लंडमध्ये येऊ लागला.

**१९३०** (२१ : १२, १६ ज्यून ६२, १९०–१९२)

अमेरिकन कापसाचा पुरवठा कमी झाल्यामुळे लांकेशीरचे कारखाने बंद पडले. मजुरांवर मोठी विपत्ती आली. त्यांचेसाठी वर्गणी गोळा होई. कापूस आयात झाला, तरी पूर्वीची स्थिती येण्यास बहुत दिवस हवेत.

**१९३१** (२१ : १२, १६ ज्यून ६२, १९०–१९१)

सोलापूरला पलटणीच्या सैन्याने बाजारात जाऊन धान्यवाल्यांना मारहाण केली. अधिकाऱ्यांनी त्यांचा बंदोबस्त केला.

**१९३२** (२१ : १२, १६ ज्यून ६२, १९०–१९२)

देशी वृत्तपत्रातील मजकूर तपासून इंग्रज सरकारला महत्त्वाच्या बाबी कळवाव्यात, यासाठी एका कामदाराची नेमणूक करण्याचा सरकारचा विचार आहे.

**१९३३** (२१ : १२, १६ ज्यून ६२, १९०–१९२)

हिंदुस्थानच्या गव्हर्नर जेनरालकडेच लंका बेटाचा कारभार सोपवावा, अशी पार्लमेंटात सूचना झाली. पण इंग्लंडच्या पंतप्रधानांनी ती सूचना नामंजूर केली.

**१९३४** (२१ : १२, १६ ज्यून ६२, १९०–१९२)

विलायतेत आशफर्द येथे एका मुलीस वांती झाली, तेव्हा तीत एक जिवंत बेडूक सापडला. हा बेडूक आठ महिने पोटात असावा. अजून तो चांगला जिवट आहे. तो पोटात कसा गेला असे ?

**१९३५** (२१ : १२, १६ ज्यून ६२, १९०–१९२)

निळीच्या व्यापारात व्यापाऱ्यांची खराबी होऊन त्यांचे दिवाळे निघते, यावर एका बंगाली माणसाने नाटक लिहिले. अनाथ शेतकऱ्यांवर होणाऱ्या जुलमांचे त्यात वर्णन आहे. या नाटकास प्रस्तावना लिहिल्याबद्दल रे. लांग या मिशनऱ्यावर अब्रूनुकसानीची फिर्याद होऊन लांगसाहेबास एक महिना कैदेची शिक्षा झाली.

**१९३६** (२१ : १२, १६ ज्यून ६२, १९०–१९२)

बंगाल हरकारू पत्राचा बादमीदार मालव्यातील अफूची पहाणी करण्यास आला होता. तो लिहितो की : अफू ही निळीचीच बहीण आहे. या मळयात्रचे गुमास्ते बारेमाप दस्तुरी वसूल करतात. सरकारच्या इतर वसुलीतून ते पैसे वळते करतात. अफू शेतकऱ्यांचा नाश करते व चीनमध्ये जाऊन लोकांचे प्राण हरण करते.

**१९३७** (२१ : १२, १६ ज्यून ६२, १९०–१९२)

इंग्रज सरकारने व्यापार-उदम्यावरील कर रद्द करून ५६ लाख रुपये परत दिले. ५०० रुपयांपेक्षा कमी उत्पन्नवाल्यांचा प्राप्तिकरही बंद केला. सरकारी खजिन्यातील १ कोटी ४२ लाख १० हजार रुपयांपैकी ४७॥ लाख रुपये विद्यावृद्धीसाठी दिले जातील.

**१९३८** (२१ : १२, १६ ज्यून ६२, १९०–१९२)

इंग्रज-फ्रेंच व तैपिंग यांच्या लढाईत तैपिंगचे एक हजार सैनिक मृत्यू पावले.

**१९३९** (२१ : १२, १६ ज्यून ६२, १९०–१९२)

इंदापूरच्या नव्या मिशनवर नारायण शेषाद्रीची नेमणूक झाली.

**१९४०** (२१ : १२, १६ ज्यून ६२, १९०–१९२)

मध्य हिंदुस्थानात गायरोनी गावी एक स्त्री सती गेली. तिला उत्तेजन देणाऱ्या दरोबस्त लोकांना अटक झाली. त्यांना जास्त कडक शिक्षा झाल्या पाहिजेत. म्हणजे असले प्रकार पुनःपुन्हा होणार नाहीत.

१९४१ (२१ : १२, १६ ज्युन ६२, १९०–१९२)

अहमदनगरात अमेरिकन मिशनाच्या वाड्यात मोठी आग लागून ४-५ घरे जळाली. गरीब लोकांच्या २-३०० रुपयांच्या मालमत्तेचे नुकसान झाले. मिशनाचे तर त्याहून जास्त मोठे नुकसान झाले.

मुंबई, एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

## ज्ञानोदय, पुस्तक २१, अंक १३, मुंबई, १ ज्युलै १८६२

१९४२ (२१ : १३, १ ज्युलै ६२, १९३–१९५)

कांस्तांतिनोपलच्या मिशनरी साहेबाने महंमदी व ख्रिस्ती धर्माबद्दल पुस्तके लिहिली, तेव्हा तुर्की लोक फार संतप्त होऊन गेले. त्याचे घर जाळून त्यास जिवें मारण्याच्या धमक्याही त्यांनी दिल्या. पण साहेब धीरोदात्तपणे आपले काम करीत आहे. मध्य तुर्कस्थानात पवित्र शास्त्राचा उत्तरोत्तर जास्त प्रसार होत आहे. दोन लक्ष लोक सहानुभूतिदार असून शास्त्र वाचतात. कुऱ्हाडीने व करवतीने झाड कापण्यापेक्षा खोडास भोक पाडून झाड पाडण्याची प्रातेस्तांताची रीत आहे. त्यांचा सामता म्हणजे पवित्र शास्त्र आहे. बादशहाने सगळ्या धर्मांना सारखीच मोकळीक दिल्ही आहे. तुर्की लोकातील अज्ञान व मिथ्या समजुती दूर होत आहेत. एक मिशनेरी मडुम स्त्रियांची सभा भरवून प्रार्थना म्हणते. स्त्रिया आस्थेने येऊन तारणाविषयी चर्चा करतात. वादळ होऊन बरफ पडले, तरी लोक खेड्यातून चालत येऊन प्रार्थना करतात. असे २०० लोक तर फार उत्तेजित झाले आहेत. एका आंधळ्या मुलाने प्रातेस्तंत पंथास अनुकूलता दाखविली, म्हणून बापाने त्याला घराबाहेर काढले. हे धर्मसंजीवन निबिड अंधकारात दीपाप्रमाणे प्रकाशत आहे.

१९४२ अ (इंम : १९३)

**१९४३** (२१ : १३, १ ज्युलै ६२, १९६-१९९)

ज्याचे हातपाय धड आहेत, अशा मुलांना अभ्यासाचे संकट वाटते. कामाचा कंटाळा ही लाजिरवाणी गोष्ट होय. ५१ वर्षांपूर्वी फ्रान्समध्ये हात नसलेले, पाय कमरेत बसलेले, असे लेकरू जन्मास आले. त्याचा बाप चांभार होता. आईने त्यास सीजराचे नाव ठेविले. जरा मोठा झाल्यावर तो पायाने कागद कापी. सुंदर अक्षरे काढी. शाळेतील पंतोजींनी त्यास शाळेत घेतल्यावर तो सुंदर चित्रेही रेखाटू लागला, म्हणून एका चितार्‍याने त्यास शिष्य केले. पुढे तो पारिसमध्ये गेला. राजविद्यालयात शिकून त्याने अनेक बक्षिसे मिळविली. लाकडाच्या घोड्यावर किंतानाचा पडदा पसरून हा अपंग चित्रकार चित्रे काढी. आपली खुरटलेली तनू तो विलक्षण चापल्याने फिरवी. किंतानासमोर परांची बांधून पायाने चित्रे रेखाटी. त्याचे बोलणे फार मनमोकळे व वृत्ती आनंदी होती. कोणी हस्तांदोलन करू म्हटले, तर नेत्रसंकेताने आपले बाहुरहित खांदे दाखवी. तो १८३६ मध्ये मृत्यू पावला. फ्रान्समधील अनेक राजपुरुषांची चित्रे त्यानेच काढली. पाहा की, उद्योग, आनंदी वृत्ती व दीर्घ प्रयत्न, यांच्या बलाने किती मोठाली कामे होऊ शकतात.

**१९४३ अ** (इंग : १९५-१९६)

१९४४ (२१ : १३, १ ज्युलै ६२, १९९–२०२)

अब्दुल मसी या गृहस्थाने ख्रिस्ती धर्म स्वीकारला, तेव्हा शाबुदीन याने त्याच्याशी वाद केला. शाबुदीनने त्यास असे वेडेपण न करण्याची विनंती केली, तेव्हा मसी म्हणाला की, बहुत शोध केल्यावर ख्रिस्ती धर्म खरा असल्याबद्दल माझी खातरी झाली. कोणत्याही पंथाच्या संस्थापकाची गुणलक्षणे पाहावी लागतात. अबुल फेदाने महंमदाविषयी साक्ष दिल्ही. पण तो सातशे वर्षांनी जन्मलेला आहे. इब्ने हाशम हा महंमदानंतर एका शतकाने होऊन गेला. कुराणामध्ये खलीफा अबू बकर आणि उसमान यांनी बदल केले असणे शक्य आहे. म्हणून ते शास्त्र विश्वसनीय नाही. खऱ्या पैगंबरात चमत्कार करण्याची शक्ती असावी आणि त्याने सांगितलेले भविष्य पूर्ण झालेले असावे. महंमद म्हणे की, मी फक्त उपदेश करणारा आहे. मी पाठविलेला माणूस आहे! चंद्राचे दोन तुकडे करणे, अंगठ्यातून पाणी वाहणे, एका रात्रीत ७ आसमानांतून ईश्वराच्या सिंहासनासमोर जाणे, या चमत्कारांनी त्याचा प्रेषितपणाचा दावा सिद्ध होत नाही. कारण ते भविष्यकाळाचे वर्णन आहे. निरक्षर प्रेषिताने अनुपम धाटणीचा ग्रंथ केला. तो ग्रंथ कशाच्याच तुलनेस येणार नाही, असे म्हणतात. पण त्यावरून त्यास ईश्वराची प्रेरणा मिळाली होती, असे काही सिद्ध होत नाही.

१९४९ (२१ : १३, १ ज्युलै ६२, २०२–२०५)

कलकत्त्याचे सरकारी डाक्तर माकफर्सन यांनी असा सिद्धान्त मांडला की, हिंदू लोक मांसभक्षक नसल्यामुळे त्यांना जरीमरीची बाधा विशेष होत नाही. पण जैन व ब्राह्मण वगळता अनेक हिंदू मांसही खातात. बंगाली ब्राह्मण, इकडचे शाक्तपंथी सर्रास मांस खातात. म्हणून वरील विधान एकपक्षी ठरते. शेकडा पाचच लोक मांसवर्जक असतील. पण ते मुसलमान व ख्रिस्ती लोकांतही असू शकतील. परधर्मतत्त्व ग्रंथात शिताराम रावजी लिहितात की, मांस खाणे हे पाप आहे. सत्यदीपिकेने या पुस्तकाचे सार तत्त्व दिलेले आहे. मात्र आमचे असे मत आहे की, मांस खाण्यात पाप नाही. रा. शिताराम म्हणतात की, मांसभक्षण हे ईश्वरविरोधी कृत्य होय. वास्तविक कित्येक पशु, पक्षी, मासे, हे मानवाच्या भक्षणाकरिताच निर्माण होतात. जाठररस त्यांचे पाचन करू शकतो. मानवाचे दात पुरेसे कठीण असतात. ते काही ऊस खाण्याकरिताच नाहीत. पवित्र शास्त्र म्हणते की, प्रत्येक जीव तुमचे खाणे व्हावा. ऋग्वेद सांगतो की, आपल्या मित्राचे साहाय्य करण्यासाठी अग्नीने तीनशे रेडे भाजले! इंद्र तीन प्याले सोमरस प्याला!

१९४६ (२१ : १३, १ ज्युलै ६२, २०५–२०६)

विष्णुपंतांनी घरी आंबे आणले. लक्ष्मीबाईने सर्व मुलांना सारखे आंबे दिल्हे. पण मधली मुलगी सगुणी जास्त आंबे मागत होती. आईने तीस नकार दिल्हा. मग सगुणीने चार आंबे तिची नजर चुकवून घेतले. सायंकाळी प्रार्थना करीत असताना तिला आपले पाप आठवले. आपण चोरी केली व मनाई केलेला पदार्थ घेऊन ईश्वराची आज्ञा मोडली, याची तिजला जाणीव झाली. आई आपणावर प्रीति करिते. आपल्या कल्याणासाठीच तिने आंबे खाण्यास मनाई केली. मग आपण अधम, दुष्ट व कृतघ्न ठरतो. म्हणून सगुणी आंथरुणावर तळमळत होती. उशी एकसारखी उलटीपालटी करीत होती. तिच्या आईस वाटले की, उशीमध्ये काटा असेल. म्हणून तिने दिवा घेऊन पाहिले. तेव्हा दुःखामुळे कंठ दाटून सगुणी रडू लागली. खरी पश्चात्तापी होऊन तिने आईची क्षमा मागितली. पापरूप काटा निघून गेल्यामुळे तिजला चांगली नीज लागली. लेकरांनो, तुम्हीही आपल्या पापाचा पश्चात्ताप करून क्षमा मागा.

१९४७ (२१ : १३, १ ज्युलै ६२, २०६–२०७)

रा. केरूनाना छत्रे परत आल्यामुळे अहमदनगर एथील सभेस विशेष रस आला, असे 'नगरकर' म्हणतो. पदार्थविज्ञानामधील तुटक असे विषय घेण्यापेक्षा समग्र शास्त्रावर व्याख्याने ठेवावीत, असे नाना म्हणाले. या उपक्रमाचा सर्वांना चांगला फायदा होईल. एका पारशी मुलाने 'सगळे जग रंगभूमी आहे' हा विषय घेऊन नाटकवाल्यांचा किंचित निषेध केला. एका मुस्लीम मुलाने सांगितले की, दुसऱ्याच्या दोषास हसण्यात मूर्खपण आहे. कृष्णाजी रत्नूजी या विद्यार्थ्याने 'खरे ज्ञान' हा निबंध वाचून सुरावर दिंडीही गायिली. मोरो बल्लाळ पंतोजींनी शेतकीविषयी सुरस भाषण दिल्हे.

१९४८ (२१ : १३, १ ज्युलै ६२, २०७–२०८)

रे. नारायण शेषाद्री यांनी बराच काळ इंदापूर मिशनाचे काम चांगले चालविले.

१९४९ (२१ : १३, १ ज्युलै ६२, २०७–२०८)

सरकारने कमी उत्पन्नावरील कर बंद केला, पण हर एक कागद व अर्ज यांवर एक आण्याचे तिकीट लावण्याची आज्ञा काढली, म्हणून इंदुप्रकाशने नापसंती व्यक्त केली आहे. प्राप्तिकराच्या रकमेपेक्षा सरकारास यातून जास्त उत्पन्न मिळेल.

१९५० (२१ : १३, १ ज्युलै ६२, २०७–२०८)

उत्तर हिंदुस्थानात एक मुस्लिमास मक्केहून पत्र आले. त्यात सरकारविरुद्ध बंडाची चिथावणी असल्यामुळे ते पत्र जप्त करण्यात आले. या लोकांत विद्येचा प्रसार कमी असल्यामुळे ते घमंडीपणा करतात. इंग्रजाचे वास्तविक सामर्थ्य त्यांस अजूनही समजले नाही. (ज्ञा. प्र. वरून) या शिवाय फरुकाबादेच्या नबाबाचाही यात हात असू शकेल. (ज्ञानोदयकर्ता).

१९५१ (२१ : १३, १ ज्युलै ६२, २०७–२०८)

अमेरिकेत दोन शिद्दी बहुत वर्षे बारिस्टराचे काम पाहात आहेत.

१९५२ (२१ : १३, १ ज्युलै ६२, २०७–२०८)

इंग्रजी रिवाजाप्रमाणे नेपाळात दिवाणी–फौजदारी कामे सुरू झाली. (वृत्तवैभववरून)

१९५३ (२१ : १३, १ ज्युलै ६२, २०७–२०८)

निजामी हद्दीमधून खालसा मुलखात धान्य आणण्यावरची बंदी निजामाने रद्द केली. जवस व करडी मात्र सर्रास येत आहेत. चोरून धान्य आणल्यामुळे नुकताच एकास दंड झाला.

१९५४ (२१ : १३, १ ज्युलै ६२, २०७–२०८)

कराची येथे रामबागेजवळ एका मराठ्याच्या मुलास जन्मतः दोन डोळे व शिंगे होती. हे विलक्षण मूल लगेच मेले.

१९५५ (२१ : १३, १ ज्युलै ६२, २०७–२०८)

पुण्याच्या लष्करी छावणीत एक खुजी स्त्री आहे. तिचे वय २० असून उंची १॥ फूट आहे! तोंड नारळासारखे व भेसूर आहे. तिचा बाप एकेक पैसा घेऊन लोकांना तिला पाहू देतो. (ज्ञानप्रकाशवरून)

१९५६ (२१ : १३, १ ज्युलै ६२, २०७–२०८)

१३ मे रोजी सियालकोटला मोठे तुफान झाले. १२ तास तुफानाचा जोर होता. वारा जोराने वाहून दिशा धुळीने भरल्या, अंधार पडल्यामुळे दिवसा दिवे लावण्याची वेळ आली. आकाश तर आग लागल्यासारखे लाल झाले. पाऊस येऊन गारा पडल्या. झाडे पडून द्राक्षपीक नष्ट झाले. या वर्षास 'वादळ नाम संवत्सर' म्हणावे.

१९५७ (२१ : १३, १ ज्युलै ६२, २०७–२०८)

लंकेत अनावृष्टी असल्यामुळे जंगली हत्ती माणसांच्या वसतीत घुसतात. माणसाचा चेंदामेंदा करून त्यास मारतात. कित्येक लोक मरण पावले आहेत.

१९५८ (२१ : १३, १ ज्युलै ६२, २०७–२०८)

नामदार विक्टोऱ्या राणीचे पती मृत्यु पावल्यावर मुंबईकरांनी शोकप्रदर्शक पत्र पाठविले होते. ते समाधानपूर्वक ग्रहण होऊन लंदन ग्याझिटात प्रसिद्ध झाले. (वृत्तवैभववरून)

१९५९ (२१ : १३, १ ज्युलै ६२, २०८)

मद्रासजवळ तुतिकोरीन येथे ८ मोत्यांचे भरीव शिंपले ५१,५०० रुपयांस विकले गेले. त्यांचा दर वाढला, पण यंदा शिंपलेच कमी आहेत. (वृत्तवैभववरून)

मुंबई, एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

## ज्ञानोदय, पुस्तक २१, अंक १४, मुंबई, १५ ज्युलै १८६२

**१९६०** (२१ : १४, १५ ज्युलै ६२, २११–२१७)

एका राजाचा धाकटा पुत्र फार छांदिष्ट होता. एक दिवस तो एकटाच राजवाड्यातून बाहेर पडला. काही वेळाने तो अरण्यात पोहोचला. त्याने तेथील फळे खाल्ली. सूर्य मावळल्यावर तो तेथेच झोपी गेला. जागा झाल्यावर त्याच्या लक्षात आले की, रानटी दांडग्यांनी त्यास घेरले आहे. त्याच्या सगळ्या वस्तू त्यांनी लुबाडून घेतल्या. मोबदला म्हणून त्यास शिळा तुकडा व घाणेरे पाणी दिल्हे. सर्वांनी दमदाटी करून त्यास धमक्या दिल्या की, तुझ्या डोईवरचे केस उपटून काढू डोळे फोडू, जीभ तोडू, कान कापू. ल्हानगा राजपुत्र भयाने थराथरा कापू लागला. अशी त्याची हेलणा करून रानदांडगे लोक झोपी गेले. रात्री अचानक राजपुत्रास जाग आली, तर त्याच्या डोक्याशी त्याचा थोरला भाऊ होता. या जोरदार व द्वाड लोकांपासून सोडविण्यासाठी त्याने राजपुत्रास घाईने तेथून दूर नेले. डोंगरच्या टेकडांवर आल्यानंतर त्यांना सुरक्षित वाटले. राजपुत्राच्या आता लक्षात आले की, आपण केवढा द्वाडपणा केला. भटकलेला मुलगा शेवटी घरी आला. याप्रमाणे माणसे स्वच्छंदाने वागून ईश्वरास विसरतात व सैतानाच्या जाळ्यांत सापडतात! म्हणून दयाळू ईश्वराने कृपा करून आपला एकुलता पुत्र जगात पाठविला. चुकलेले व भटकलेले यांचा त्याला कंटाळा आला नाही. लोकांनी संकटातून सुटून सर्वकाळचे जीवन पावावे, म्हणून तो प्रयत्न करतो. आम्हांस आकाशगड चढण्याची शक्ती तोच देईल.

**१९६० अ** (इंग : २०९–२११)

**१९६१** (२१ : १४, १५ ज्युलै ६२, २१७-२२१)

डोसाभाई फ्रामजी यांनी 'ग्रेत ब्रिटन देशात मुशाफरी' हा ग्रन्थ रचला. राजा राममोहनराय वगैरे पर्यटकांनी आपले अनुभव लिहून काढले नाहीत, ही मोठी दुःखाची गोष्ट आहे. कलकत्याच्या एका मडमेने इंग्लंडचे वर्णन प्रसिद्ध केले, ते सरकारी शाळांत प्रसिद्ध आहे. पण देशी गृहस्थांच्या लेखनास महत्त्व असते. या गुजराती पुस्तकाची पाने ३१४ असून मुखपृष्ठावर राणीचे चित्र आहे. छपाई उत्कृष्ट आहे. अनेक इमारतींची व कारखान्यांची चित्रे संग्रहित केल्यामुळे प्रत्यक्ष तेथे जाऊन येण्याचा आनंदच वाचकांना मिळतो. उद्योगव्यापार, संपत्ती व सामर्थ्य या गुणांमध्ये इंग्लंड अजोड आहे. त्यासाठी खर्च केलेले द्रव्य कधी वाया जाणार नाही. ब्रिटिश लोक पूर्ण वैभवाने बिराजमान झाले आहेत. ब्राह्मणात परदेशगमनास बंदी असल्यामुळे ते तिकडे जाऊ शकणार नाहीत. सुधारलेले हिंदू तिकडे गेले, म्हणजे आईबापांचा धाक अगर भट्टांचे बहिष्कार यांचे भय न बाळगता खानपान करतात. मग इकडे आले की, जातवाल्यांची खुशामत करून प्रायश्चित्त घेतात. हा ग्रंथ देशी भाषेत लिहिल्यामुळे जास्त उपयुक्त झाला. इंग्रजी भाषेमध्ये लिहिला असता, तर ते बंद कुलपातले धन कोणाच्याच उपयोगाचे ठरले नसते. इंग्रेजीचा सराव हवा असेल, तर त्या भाषेमध्ये पत्रव्यवहार करावा. शाळाखात्याचे विद्वान डैरेक्टर हावर्ड यांनी आर्थिक मदत दिल्यामुळेच हा ग्रंथ प्रकाशित झाला. म्हणून ग्रंथकर्ता कृतज्ञता प्रगट करतो.

१९६२ (२१ : १४, १५ ज्युलै ६२, २२१–२२३)

'एक दुःख पावणारा' लिहितो की : ३० वर्षांपूर्वी मराठीत फक्त 'दर्पण' निघत होते. नंतर 'प्रभाकर' निघाला. पण तो लवकर अस्तास गेला! पुढे एकाची एकतीस पत्रे झाली. म्हणून आनंद वाटला. पण संख्येपेक्षा सत्त्वास महत्त्व असते. जुनीनवी, थकलेली व उमेदवार, देशस्थ-कोकणस्थ, अशी या पत्रांची टोपण नावे आहेत. या पत्रांत बातम्यांखेरीज काहीच नसते. वजनदार विचार कधीच पाहण्यास मिळत नाहीत. कोठल्या तरी इंग्लिश पत्रावरून झरारा मजकूर भरून काढतात. हालोवेच्या गोळ्यांची व मलमाची जाहिरात नियमित येते. स्वदेशास लाभ कशामुळे होईल, याचा विचार ते कधीच करीत नाहीत. एक दोन इंग्रजी डेली वाचून त्यांचे वर्तमानपत्र तयार होते. शिवाय नवे सरकारी आक्ट आणि सरकुलरे असली की, सगळे कागद भरतात. ज्ञानोदय फक्त ठशाच्या छापाचा आहे. इतर सगळे शिळाछाप असल्यामुळे अक्षरे वाचतांना डोळ्यांना त्रास होतो. शाईचा वास, कागद वाईट, त्यामुळे पैसे फुकट जातात. याचा दोष वाचकांकडेही जातो. कारण त्यांना फक्त बातम्यांचा भाजीपाला हवा असतो. सुधारणुकेकडे त्यांची वांच्छाच होत नाही. वाचकांची पत्रे तर त्यात नसतातच. कोठल्या तरी मामलेदार-रावबहादुरांच्या बदल्या वाचून या वाचकांचे समाधान होते. इंदुप्रकाशाचे थोडेही आता थकले. तर निदान सर्वांनी ठशाचा छाप वापरावा.

१९६३ (२१ : १४, १५ ज्युलै ६२, २२३–२२४)

'लोकहितेच्छू' पत्रात म्हणतो की : कसबे राहुरी गावात महामारीचा उपद्रव सुरू आहे. रे. आबट हे मिशनरी सहकुटुंब येथे राहतात. त्यांनी अनेक औषधींचा संग्रह केला. काही तर परदेशाहून आणविल्या. पटकीच्या उपद्रवावर ते चांगली उपाययोजना करतात. वक्तशीर औषधे घेणारांना गुण येतो. पण काही हट्टवादी ब्राह्मणांना वाटते की, औषधात विटाळ कालविला आहे. संकटकाळी दोषादोषाचा विचार करू नये, एवढेही व्यवहारज्ञान त्यांना नाही. येथे सखाराम चिमणाजी हा पोतनीस कचेरीचा कारकून आहे. त्याच्या बायकोस प्रथम वाखा लागला. पण त्याने औषध दिले नाही. तेवढ्यात वाखा होऊन मुलगी गेली. कालच आपणही वाख्याने मेला. पण औषध घेतले नाही. भलेच सोवळे केले व बायको सोवळी करून स्वतः निघून गेले !! खरोखर औषधात काहीच बाट नसतो. म्हणून लोकांनी औषध घेण्यास अनमान करू नये. (वृत्तवैभववरून)

१९६४ (२१ : १४, १५ ज्युलै ६२, २२४)

मुंबईसारख्या मोठ्या शहरात पाण्याची फार कमताई होती, म्हणून सरकारने लाखो रुपये खर्च करून विहाड या ठिकाणी मोठा तलाव बांधला. काही खेडी उठवावी लागली. या तलावाचा घेरच १०-१२ कोस झाला. हा तलाव समुद्राप्रमाणे वाटतो. सरकारने गरिबांचा कनवळा करून तलाव बांधला. पण सर्वांना पाणी मिळत नाही. लहान गल्ल्यांमधून नळ टाकले. परंतु काही ठिकाणी पाणी येत नाही. १०–२० हौद मात्र झाले आहेत. श्रीमंत लोकांनी स्वतःची सोय करून घेतली. परंतु त्यांनाही निराळा पैसा पडतो, अशी टीका 'इंदुप्रकाश' ने केली आहे.

**१९६५** (२१ : १४, १५ ज्युलै ६२, २२४)

उत्तर आणि दक्षिण हिंदुस्थानात अनेक ठिकाणी गारांची वृष्टी झाली. बहुत नाश झाला. नीलगिरीवर आंब्याएवढ्या, तर अयोध्या प्रांतात एकेक शेर वजनाच्या गारा पडल्या. गोरखपुरात गारांच्या वर्षावाने ३०० मनुष्ये मेली.

**१९६६** (२१ : १४, १५ ज्युलै ६२, २२४)

अमेरिकेच्या टपाल खात्यात ४११ स्त्रिया पोस्टमास्तरचे काम करतात. त्यांपैकी बऱ्याच जणींची नोकरी ३०–३५ वर्षे झाली आहे.

**१९६७** (२१ : १४, १५ ज्युलै ६२, २२४)

यंदा पुण्यात जेवढी उष्णता वाढली, तेवढी गेल्या तीस वर्षांत नव्हती. (वृत्तवैभववरून)

**१९६८** (२१ : १४, १५ ज्युलै ६२, २२४)

निजाम सरकारने खुनाच्या गुन्ह्याकरिता फाशीची शिक्षा देण्याचा ठराव केला. (वृत्तप्रकाशवरून)

मुंबई, एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

ज्ञानोदय, पुस्तक २१, अंक १५, मुंबई, १ ऑगस्ट १८६२

**१९६९** (२१ : १५, १ ऑगस्ट ६२, २२६–२२९)

पुण्यांतील फ्री चर्च मिशनच्या शाळेच्या वार्षिक परीक्षेस नामदार गवर्नर हजर होते. गवर्नरांना पितळी नक्षीचे साहित्य नजर करण्यात आले. मिशनाची शाळा वाढत असून सध्या १२०० विद्यार्थी आहेत. कारण हिंदुस्थानी शिक्षण देणाऱ्या शाळाच नाहीत. विद्येची सतत वृद्धी होत आहे. काही वर्षांपूर्वी पुण्यात संस्कृत पाठशाळा मात्र होती. पण रे. स्तिवेन्सन व निज्बिट, तसेच मिचेल, यांनी श्रम करून पुण्यात शाळा चालविली. या शाळेच्या विद्यार्थ्यांपैकी दोन तृतीयांश मुले ब्राह्मण आहेत. पूर्वी उंच जातीचे विद्यार्थी अगदी कमी असत. नीच जातीबरोबरच 'नाही जातीचे'ही शिकण्यास येतात. येथे व्यवहार, नीती व धर्म, यांचे शिक्षण अगत्यपूर्वक दिले जाते. गवर्नर ना. फ्रियर हे आमचे जुने मित्र आहेत. त्यांनी शाळेचे काम पाहून संतोष व्यक्त केला. पन्नास मुलांवरून शाळेत पाचशे मुले येऊ लागली. ब्राह्मण व सरदार यांची शेकडो मुले येथे शिकतात. ब्राह्मणांची मुले बुद्धिमान असतात. त्यांच्यावर युरोपियन विद्येचा संस्कार होणे आवश्यक आहे. मिशनाच्या शिक्षणापासून चांगले फळ आहे. मिशनऱ्यांना सुशिक्षणाचे खरे तत्त्व सापडलेले आहे. सरकारी शाळेतील विद्यार्थी मगरूर व मंद असतात. मिशनाचा विद्यार्थी नम्र व हुशार असतो. सरकारी कचेरीत एखादा नम्र रैटर भेटला, तर खुशाल समजावे की, तो डफसाहेबाच्या शाळेत शिकलेला आहे. (पु. आ.)

**१९६९ अ** (इंम : २२५–२२६)

**१९७०** (२१ : १५, १ ऑगस्ट ६२, २२९–२३०)

१६ वर्षे वयाची एक ब्राह्मण विधवा स्त्री बंगाल्यातील पोरनचापूर गावी राहात असे. तिच्या बापाने तिला रे. जगदीश्वर भट्टाचार्यांच्या शाळेत घातले. पुढे ती त्याच शाळेत शिक्षकीणही झाली. तिने ख्रिस्ती धर्माविषयी पुस्तके वाचली, तेव्हा ख्रिस्ती धर्मच खरा, असे तिला वाटले. ३३ कोटी देव आणि देवी यांवरचा तिचा विश्वास उडून गेला. एका तरुण ख्रिस्ती शिक्षकाच्या घरी तिने आश्रय घेतला. तिच्या नातलगांनी तिचे मन वळविण्याचा प्रयत्न केला. पण शेवटी तिचे दागिने घेऊन ते घरी निघून गेले. ६ जुलै रोजी रे. जगदीश्वरांनी तिला बाप्तिस्मा दिल्हा. (इंग्रज रिफारमरवरून)

**१९७० अ** (इंम : २२९)

**१९७१** (२१ : १५, १ ऑगस्ट ६२, २३१–२३२)

'एक ख्रिस्ती' लिहितो की : सरकारच्या चौकशीत मामलेदार निर्दोषी ठरला. वांबोरीस झालेला तमाशा नसून ललित होते, असे हिंदूंचे म्हणणे आहे. परंतु पोऱ्यांना स्त्रियांचे वेष देऊन अचकट विचकट हावभाव करणे व अमंगल गाणी म्हणणे, यास कोणते नाव द्यावे ? आपल्या जबानीत मामलेदाराने कबूल केले की, लोकांचे वागणे अयोग्य होते. फक्त ते धार्मिकाच्या नावाखाली लपविण्याचा त्यांचा प्रयत्न दिसतो. 'ज्ञानोदयकर्त्यांने आरोपांची प्रचंड इमारत रचली', हा वृत्तवैभवाचा शेराही अप्रस्तुत ठरतो. १८५६ च्या कायद्यानुसार हे वागणे शिक्षापात्र आहे. पोरांनी बंडवाल्यांचे सोंग आणले, ही वस्तुस्थिती आहे. बंडवाल्यांच्या दुष्टपणामुळेच सर्व लोकांना अतिशय राग येतो. मामलेदारसाहेबांनी निःपक्षपाती न्याय करावा. एखादी सूचना ख्रिस्ती माणसाने केली, म्हणून ती डावलणे अयोग्य होय. योग्य रीतीने काम करून त्यांची मदत व अनुकूलता मिळवावी.

**१९७१ अ** (इंम: २३०–२३१)

१९७२ (२१ : १५, १ ऑगस्ट ६२, २३२–२३५)

सेंत्रल दीपोचे आक्टिंग क्युरेतर रा. सा. महादेव गोविंदशास्त्री यांनी प्राकृत कवितेचे २ रे पुस्तक काढले. यात ४८ कविता असून त्या ठशांनी छापल्या आहेत. इंग्रेजी पाठ्यपुस्तकांतील कवितांची भाषांतरेही त्यात आहे. या कविता हल्ली मुलांकडून मुखपाठ करवितात, गळ्यावर गावयास सांगतात. पंतोजी त्यांच्या तालमी घेऊन इन्स्पेक्तर आल्यावर त्यांच्यासमोर मुलाना गाण्यास लावतात. कारण दैरेक्तरांचा तसा हुकूम आहे. सरकारी पुस्तकातील कविता जुन्या मराठी कवींच्या आहेत. रा. भास्कर दामोधर व परशराम पंडित गोडबोले यांनी पद्यरचनेवर निबंधही लिहिला. परंतु दैवताबद्दलचे खोटे विचार आणि मूर्ख मते मुलांना सांगू नयेत. परशुरामपंताचे 'उत्तररामचरित' नाटक वाचून भावी कारकुनांना काहीच फायदा नाही. फार तर कथाकऱ्यांना ते उपयोगी पडेल. खऱ्या नीतिपर व ईश्वरपरायण कविताच मुलांना शिकवाव्या. म्हणजे ती सद्‌गुणी व नीतिमान होतील. म्हणून लघुहितोपदेश पुस्तकापेक्षाही प्राकृत कवितेचे पुस्तक उत्तम आहे. त्यात दुराचरणाचा किस्सा नाही. व्यवहारोपयोगी उपदेश आहे. इंग्रेजी कवितांवरून भूपाळ्याही रचल्या आहेत. या पद्यरचनेत काही दोष आहेत. पण नंतरच्या कविता चांगल्या होतील. इंग्रेजीचे भाषांतर नेहमीच कठीण असते. महादेवशास्त्रींच्या प्रयत्नांची तारीफ करावयास हवी.

**१९७३** (२१ : १५, १ ऑगस्ट ६२, २३५–२३६)

महंमदी धर्माबाबत शाबुद्दीन म्हणतो की, महंमदाचे भविष्य खरे झाले. तेव्हा अब्दुल मसी म्हणाला की, जे भविष्य साधारण बुद्धीसही कळते, त्यास प्रेषिताचे भविष्य म्हणता येणार नाही. आपणांस गुप्त गोष्टींचे ज्ञान नाही, असे तो म्हणत असे. त्याच्या धर्माचा फार वेगाने प्रसार झाला. कारण त्यात कित्येक खरे सिद्धांत आहेत. ईश्वराचे एकत्व, सर्व सामर्थ्य, दयाळूपणा, यांबरोबरच नामांकित भक्तांच्या चरित्रांना त्याने समाविष्ट केले. मूर्तिपूजकांची मर्जी सांभाळण्याकरिता प्राचीन धर्ममताचे अनुकरण केले. ग्रामस्थ लोकांच्या भक्तिभावनेची प्रशंसा केली. त्यांची देवळे आणि विलक्षण काळापाषाण, यांची उपासना कायम राखली. मक्केची यात्रा सुरू केली. मोशेचा प्रेषितपणाही कबूल केला. मनुष्याच्या भ्रष्ट जन्मस्वभावास गोड वाटतील, अशा गोष्टीही ग्रंथात आणल्या. तलवारीच्या जोरावर धर्म वाढविला. जे धर्मासाठी लढतील, ते स्वर्गात सुखाने राहतील, असे सांगितल्यामुळे त्याचे अनुयायी वाढत गेले. त्याने अरबांची लढाऊ प्रवृत्ती वाढविली. तो स्वतः उंच कुळातला होता व त्याची पत्नी श्रीमंत कुळामधील होती.

**१९७४** (२१ : १५, १ ऑगस्ट ६२, २३६–२३७)

अळंदीहून ज्ञानदेवाची व देहूवरून तुकारामाची अशा पालख्या गेल्या आठवड्यात पुण्यात येऊन पुढे पंढरपुरास गेल्या. पालख्यांच्या दर्शनासाठी अठरापगड लोक रस्त्यावर जमा झालेले दिसले. मामूल वहिवाटीप्रमाणे अनेकांनी दिंड्यांचे मेळावे आणले होते. आपली तीक्ष्ण व रूक्ष वाद्ये वाजवीत ते सर्वजण नाचत होते. आपली दिनसामग्री पडशीत घेतलेले वारकरी भगवी निशाणे उंच करून चालले होते. ईश्वराचा नामध्वनी व संतनामाचाच गजर चालला होता. पावसाने कृपा केल्यामुळेच त्यांना मिरविता आले. एक मैलपर्यंत मिरवणूक चालू होती. (ज्ञानप्रकाशवरून)

**१९७५** (२१ : १५, १ ऑगस्ट ६२, २३७-२४०)

माजी गवर्नर जेनराल लार्ड कानिंग यांचा मृत्यू झाला. त्यांच्या पत्नीच्या मृत्यूने ते फार खिन्न झाले होते. १८५७ च्या बंडामुळे पार्लमेंटात त्यांच्या कारभारावर फार टीकाही झाली होती.

**१९७६** (२१ : १५, १ ऑगस्ट ६२, २३७-२४०)

रे. इंटर यांना व त्यांच्या कुटुंबास ठार मारणारा हुरमतखान हा सियालकोट येथे चकमकीत ठार झाला.

**१९७७** (२१ : १५, १ ऑगस्ट ६२, २३७-२४०)

कलकत्त्यात चौघांनी बाप्तिस्मा घेतला, त्यात एक ब्राह्मण आहे.

**१९७८** (२१ : १५, १ ऑगस्ट ६२, २३७-२४०)

पुण्यात मि. रामचंद्र बाबाजींनी तांबट उद्योगाची एक शाळा काढली. तेथे नकशीदार तबके करण्यास शिकवितात. सध्या ८-९ मुले शिकतात. या शाळेस सर्वांनी आश्रय द्यावा. (इंदुप्रकाशवरून).

**१९७९** (२१ : १५, १ ऑगस्ट ६२, २३७-२४०)

इंदुप्रकाशने स्टांपड्यूटीवर टीका केली. पण हा नवा कर सर्वांना सारखा असून करवसुलीसाठी कामदार नेमण्याचा खर्च नाही. रयतेस चलबुलाईची व तगाद्यांची कटकट होत नाही.

**१९८०** (२१ : १५, १ ऑगस्ट ६२, २३७-२४०)

मुंबईत तीन गृहस्थांनी मुलींच्या शाळा काढल्या. शेट भगवानदास, जगन्नाथ शंकरशेठ आणि डा. भाऊ दाजी. परंतु भाऊएवढे सामर्थ्य इतर दोघांत नसल्यामुळे त्यांच्या शाळा मोडकळीस आल्या. त्यांचा खर्च चालविणे अशक्य झाल्यावर विद्वान तरुणांनी फंड गोळा करून त्याच्या व्याजावर या दोन शाळा चालविल्या आहेत. (इंदुप्रकाशवरून)

१९८१ (२१ : १५, १ ऑगस्ट ६२, २३७–२४०)

वाणी लोकांचा महाराज जदुनाथ ब्रिजरतन याला खटल्यामुळे ५०,००० रुपयांचा पेच आला. शिष्यांनी पैसे द्यावेत, असाही त्याने प्रयत्न केला. पण त्याचे श्रीमंत शिष्य म्हणतात की, तुमच्यामुळे आमच्या धर्माची थट्टा झाली; सबब आम्ही काही देत नाही. महाराजास चांगली शिक्षा झाली.

१९८२ (२१ : १५, १ ऑगस्ट ६२, २३७–२४०)

बंडखोर वाघर लोक द्वारकेच्या मूर्तीस काही त्रास देतील की काय, अशी भीती लोकांना वाटत आहे.

१९८३ (२१ : १५, १ ऑगस्ट ६२, २३७–२४०)

हिंदुस्थानातील ३०० विधवांनी विधवा राणी व्हिक्टोऱ्यास पत्र पाठवून तिच्या भ्रताराच्या निधनाबद्दल शोक व्यक्त केला. (इंदुप्रकाशवरून)

१९८४ (२१ : १५, १ ऑगस्ट ६२, २३७–२४०)

दाक्तर ब्यूस्त या संशोधकास दक्षिण अमेरिकेच्या समुद्रामध्ये गाणारे मासे आढळले. ते पांढरे असून त्यावर निळे ठिपके असतात. त्यांना 'गवयी मासे' म्हणतात.

१९८५ (२१ : १५, १ ऑगस्ट ६२, २३७–२४०)

मनुष्यांच्या शरिरात लोखंडाचा काही अंश असतो. ४२ जणांचे रक्त घेतले, तर त्यात ३ शेर लोह सापडेल.

१९८६ (२१ : १५, १ ऑगस्ट ६२, २३७–२४०)

पृथ्वीची लोकसंख्या १ अर्ब, असून १ हजार धर्म व ३०६४ भाषा तेथे चालतात. १७ वर्षांपेक्षा लहान वयाचे लोक फार मरतात. उंच, विवाहित, वसंत ऋतूत जन्मलेले लोक दीर्घायुषी असतात. म्हणून बालविवाह टाळावेत.

१९८७ (२१ : १५, १ ऑगस्ट ६२, २३७–२४०)

चीनमध्ये अफूच्या कैफाने दरवर्षी ३ लाख लोक मृत्यू पावतात. खरा आकडा यापेक्षा जास्त असावा.

१९८८ (२१ : १५, १ ऑगस्ट ६२, २३७–२४०)

दिल्लीच्या अंमलदारांनी मिशनऱ्यांना कोतवालीसमोर उपदेश करण्यास बंदी केली. मिशनऱ्यांनी पंजाब सरकारकडे तक्रार केल्यावर ही बंदी उठविण्यात आली.

मुंबई, एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

**१९८९** (२१ : १६, १५ ऑगस्ट ६२, २४२–२४३)

कलकत्त्याच्या इंग्लिशमान पत्रात म्हटले आहे की: खोंडांचा देव सूर्य हा आहे. काही जण पृथ्वीस देवता मानतात. ती क्रूर देवता असून तिला मनुष्यांचे रक्त आवडते, तसेच स्त्रिया फार अनिष्टकारक आहेत, अशी त्यांची समजूत आहे. म्हणून ते अघोरी पद्धतीने कन्यावध करतात. त्यावून कुटुंबात असमाधान होते. स्त्रिया केव्हाही नवऱ्याचे घर सोडून जातात. त्यांच्यात राखा ठेवण्याची फार चाल आहे. या राखेपैकी कोणी परद्वार केले, तर १२ गुरे व १ डुकर असा दंड घेतात. देवीच्या अपविद्याच्या बळीस मेरिया म्हणतात. मेरियाच्या रक्ताने हळदीस दाट रंग येतो, असे समजून ते नियमाने बळी देतात. अज्ञानी व देवभोळे असे हे लोक मेरियाचा क्रूर व अघोरी पद्धतीने वध करीत असतात. मेरियास ते फार माया लावतात. त्याची मिजास राखून त्याला हवे ते देतात. दुसऱ्या दिवशी बळी जाणारा मेरियादेखील फार आनंदी दिसतो. खाणेपिणे, दारू, अतिबीभत्स कर्मे यांची धूम उडते. आपल्याकडेही सती जाणारी स्त्री फार आनंदात दिसते. म्हणून या क्रूर चाली जेव्हा सरकारने कायदा करून बंद केल्या, तेव्हाच फायदा झाला. सामोपचाराने हे प्रकार थांबणार नाहीत. खोंडांच्या पुढाऱ्यांना क्रूर शिक्षा झाल्यापासून ते सुधारत आहेत व बळींची संख्या कमी होते आहे. सतीचे व बळीचे अर्पण हा खुनाचाच गुन्हा आहे.

**१९८९ अ** (इंम : २४१–२४२)

१९९० (२१ : १६, १५ ऑगस्ट ६२, २४४–२४५)

मुंबईच्या एका हिंदू व्यापाऱ्याने वेदावरील ३ सर्वोत्तम निबंध लिहिणारांना बक्षिसे ठेवली आहेत. १२००, ५०० व ३०० रुपयांची ही बक्षिसे विल्यम निकोल कंपनीजवळ ठेवली आहेत. प्राचीन हिंदूंची व्यावहारिक व धर्मसंबंधी स्थिती, त्यांच्या चाली आणि त्यांची मते, यांबाबत निबंध रचावा. त्याची पृष्ठसंख्या ३०० ते ४०० च्या दरम्यान असावी. जे संदर्भ वापरावयाचे ते तपशीलवार टीपांत द्यावेत. आधारभूत ग्रंथांची यादी पुरवणीत द्यावी. रे. विल्सन, डा. हौग, भाऊ दाजी, धनजीभाई नौरोजी, रावसाहेब मंडलीक, यांचे परीक्षकमंडळ याकरिता नेमले आहे. पहिल्या क्रमांकाचा विद्यार्थी आपल्या ग्रंथाचे संस्कृतात भाषांतर करून देईल, तर त्यास आणखी ३०० रुपये दिले जातील.

१९९० अ (इंम : २४३–२४४)

**१९९१** (२१ : १६, १५ ऑगस्ट ६२, २४५–२४७)

गुरू जदुनाथविरुद्धचा खटला मि. करसनदास यांनी जिंकला. जातीतले काही लोक त्यांच्यावर संतप्त झाले. त्यांना धमक्याही देण्यात आल्या. महाराजांची क्षमा मागावी, म्हणून दबाव आला. बहिष्काराचा धाक दाखवला. पण मि. दास बधले नाहीत. शेवटी त्यांचाच विजय होऊन महाराजाची मात्र फजिती झाली. अनीतीचे व भ्रष्टाचाराचे बंड मोडले, म्हणून सभा भरवून करसनदास यांचा सन्मान करण्यात आला.
रे. विल्सन यांनी साधूलोकांचा गोंधळ व अनाचार यांवर टीका केली.
रे. अलेक्झांदर यांनी खटल्याची हकीगत सांगितली. या देशात अनीतीचा अंधार असून सुधारणुकीस मोठाच प्रतिबंध आहे, हे स्पष्ट केले. अनेक बुद्धिमान साक्षीदारही सत्य सांगण्यास भ्याले. अंध परंपरा व जनापवादभय यांचा या देशात जुलूम आहे. ब्रह्मसमाजाची सुधारणा म्हणजे भ्रमाचा भोपळा होय. रे. मरेमिचेल म्हणाले की, सुधारणेसाठी फार प्रयत्न केला पाहिजे. मि. करसनदास यांनी एवढ्या मोठ्या लोकांचे पाठबळ असल्यामुळेच आपण विजयी झालो, असे नम्रतेने स्पष्ट केले. रे. हार्डिंग यांनी मि. दास याच्या धैर्याची प्रशंसा केली.
मि. पेस्तनजी जमशेद यांनी सुधारणेविषयी अनेक सूचना केल्या.
अशी सभा आजवर कधी झाली नव्हती.

१९९२ (२१ : १६, १५ ऑगस्ट ६२, २४७–२५५)

'एक जनमित्र' लिहितो की : यंदा नगर जिल्ह्यात पाऊस फार कमी आहे. जुलैची सरासरी गाठली गेली नाही. सोसाट्याचा वारा मेघांचे आवडंबर उडवून लावतो. वारा सुटला की, अभ्रांचा मंडप जाऊन निळे आकाश दिसते. पटकीचा उपद्रवही सुरू आहे. आषाढ गेला, तरी पाऊस नाही. धारण कडाडली. रुपयास ११ शेरच गहू मिळत आहेत. गेल्या वर्षी अतिवृष्टीने धान्य बुडाले. त्यामुळे रत्नागिरी व सातारा येथील स्थितीही कठीण आहे. लोक हवालदिल झाले. श्रीमंत लोक धान्याचा साठा करतात. पण वास मारणारे धान्य मिळते. गरिबांना दीडवाढीने धान्य घेऊन कर्ज वाढविण्याची वेळ आली आहे. खराब धान्याने पोटात आग पडून पटकी होते. पावसाची खात्री नसल्यामुळे धान्य कोणत्याही भावाने मिळाले, तरी घ्यावे लागते. नागपंचमीच्या जत्रेत मिठाई खपली नाही. कारण 'उदंड खाल्ला मेवा तरी चोतकुरीचा येईना येवा.' भटजी लोकांनी अनुष्ठाने व स्वाहाकारयज्ञ सुरू केली आहेत. खरपडाच्या वेळी त्यांची पोळी पिकली. त्यापेक्षा खऱ्या ईश्वराजवळ पापे कबूल करून त्याचीच क्षमा मागावी. आपल्या वाईट आचरणामुळे असली संकटे येतात, हे उघड आहे. हे पत्र लिहिल्यावर थोडा पाऊस पडला, स्वस्ताईची आशा वाढली.

**१९९३** (२१ : १६, १५ ऑगस्ट ६२, २५१–२५३)

कृष्णा रत्नूजी (खरे ज्ञान) या निबंधात लिहितो की : 'मला क्रमवार व शुद्ध बोलणे जमत नाही. सभेत बोलताना अडखळतो. लोखंड गार झाले नाही, तोवर ठोके मारले पाहिजेत. ईश्वराने मानवास चमत्कारिक बुद्धी दिली आहे. त्यातून तो भाषा व कौशल्य शिकतो. बुद्धीचा चांगला उपयोग करून ज्ञानी बनतो. व्यावहारिक आणि यंत्रविद्या शिकला की, तो गर्वाने फुगून जातो. अल्प विद्या, बहुगर्व; अशी म्हणच पडलेली आहे. पण लोक ज्ञानी असूनही चोरी, व्यभिचार, नाचतमाशादि कुकर्मेच करतात. बीभत्स बोलतात. देशबांधवांची सुधारणा व कल्याण करण्याऐवजी नाटक व नाच यांसाठी परिश्रम घेतात. सुंदर शरिरास वस्त्रे व आभूषणे लेवविली, पण त्यात जर प्राण नसेल, तर ते निरुपयोगी ठरते. सद्‌गुणी व गौरवर्णी कामिनीच लोकांना प्रिय होते. म्हणून गर्वाचे ओझे टाकून विनम्र व्हा. शेवटी स्वकृत आर्येमध्ये ते लिहितात की, खरे ज्ञान हे मोत्याप्रमाणे आहे. ते मोती मिळवावेत. विद्येचा अभिमान बाळगू नये. आपल्या बऱ्यावाईट कर्माचे फळ न्यायाच्या दिवशी मिळणारच आहे.

१९९४ (२१ : १६, १५ ऑगस्ट ६२, २५३–२५४)

ज्ञानप्रकाशकर्ता लिहितो की : चांगल्या गोष्टीचे प्रसरण व स्मरण अवघड असते. वाईट गोष्टींचे स्मरण लवकर राहाते, तिचा वरचेवर फैलाव होतो. १८५७ च्या बंडाची वाताहात व बीमोड होऊन ४-५ वर्षे झाली, तरी गप्पाष्टकात मात्र त्या गोष्टी जणू कालच झाल्या, अशा गप्पा निघतात. मीरतच्छावणीतील बंडाची कथा १५ दिवसांत हिंदुस्थानभर पसरली. कित्येक दुष्ट व क्रूर लोकांच्या बाह्या फुरफुरल्या व ते गर्गाचार्यांच्या मुहूर्तावरच निघून गेले. पुढे बंड मोडले. कित्येक अध्वर्यू व मोहोरपे यांची ससेहोलपट झाली. पण त्यावर विश्वास ठेवण्यास हे लोक अगदी तयार नव्हते. आग्रा-अयोध्या प्रांतात कंड्या पिकविणारे लोक फार आहेत. अजून त्यांना वाटते की, उद्या बंड उठणार आहे. सरकारास मोठ्या अनर्थास तोंड द्यावे लागेल. अज्ञान, मूर्ख रिकामटवळे लोक, यांनाच अशी गप्पाष्टके सुचतात. बदमाष गोळा झाले, लोक बिथरले; आतून काहीतरी घाटते आहे; अशा अफवा ते वारंवार उठवितात. ही मूर्खांची तरी बोलणी आहेत किंवा अमली लोकांची बाकसरे आहेत. सुज्ञ लोक असले वायफळ बोलणार नाहीत. (ज्ञानप्रकाशवरून)

**१९९५** (२१ : १६, १५ ऑगस्ट ६२, २५४–२५५)

सध्या विजापूर हे मामलेदाराचे ठाणे आहे. परंतु प्राचीन काळी ते विजयनगर म्हणून हिंदू राजाची राजधानी होते. सन १५०० मध्ये दौलताबाद घेतल्यावर मुसलमान सरदारांनी ते घेतले व तेथे आदिलशाही राजवंश सुरू झाला. आलमगीर बादशहाने आदिलशाही नष्ट केली. सन १७६० मध्ये सदाशिवराव भाऊने हे शहर जिंकले होते. या गावात हल्ली वस्ती थोडी असून खिडारी व ओसाड घरे मात्र जिकडे तिकडे दिसतात. पूर्वी हे शहर मुंबईप्रमाणे गजबजलेले होते. श्रीमंतांचे वाडे, आरामबागा, गोट, विहिरी, बुरूज, वगैरे जुने वैभव प्रेक्षणीय आहे. कबरीही बऱ्याच आहेत. पडक्या अवशेषांवर मातीचे ढीग मात्र दिसतात. जुम्मा मशीद, आदिलशाचा घुमट, तोफा, वगैरेवरील इमारती मात्र सुरक्षित आहेत. आनेगुंदीचा कृष्णराज नरपती यास मारून विजापुरकरांनी हे राज्य मिळविले. त्याकाळी गणपती, नरपती, हयपती, छत्रपती, अशीच बिरुदे असावयाची. शिवाजीचा पिता शहाजी हा याच राजांच्या पदरी होता. शिवाजीचा उत्कर्षही त्यांच्या अंमलातच झाला. (इंदुप्रकाशावरून)

**१९९६** (२१ : १६, १५ ऑगस्ट ६२, २५५–२५६)

जगात हल्ली ४-५ ठिकाणी लढाई सुरू आहे. अमेरिकेत गुलामगिरीवरून युद्ध सुरू आहे. मेक्सिकन व फ्रेंच सरकार तसेच तैपिंग व इंग्रज, काबूलवाले व इराणी, यांची लढाई सुरू आहे. एका नेपाळी व्यापाऱ्यास मारले, म्हणून नेपाळात व तिबेटातही लढाई सुरू झाली.

**१९९७** (२१ : १६, १५ ऑगस्ट ६२, २५५–२५६)

नाना म्हणून धरलेला कैदी कोण, याचा नक्की निर्णय होतच नव्हता. नुकताच हा कैदी मृत्यु पावला. खरा नाना बुतान प्रांतात असून नेपाळशी पत्रव्यवहार करतो आहे. तो सहकुटुंब काशीस येणार, अशीही बातमी आहे. खरे काय ते कळत नाही.

१९९८ (२१ : १६, १५ ऑगस्ट ६२, २५५–२५६)

विलायतेत लोकरीचे कागद करण्याची युक्ती निघाली आहे. आता चिंध्यांची गरज नाही. हातमोज्यासारखे जीर्ण ऊर्णावस्त्र उपयोगी पडेल. एका खंडीस त्याचा २०० रु. भाव आहे. (इंदुप्रकाशवरून)

१९९९ (२१ : १६, १५ ऑगस्ट ६२, २५५–२५६)

एका पंतसचिवाच्या मुलाची बायको लग्नानंतर १० दिवसांत मेली. त्यांनी मुलासाठी २४ महिन्यांची वधू शोधली. असल्या चालीनेच सरदार लोकांची राज्ये बुडाली. (इंदुप्रकाशवरून)

२००० (२१ : १६, १५ ऑगस्ट ६२, २५६)

बाबा पद्मणजी कळवितात की : मोल्सवर्थकृत मराठी व इंग्लिश कोशाचा संक्षेप या पुस्तकाची आगाऊ वर्गणी घेण्याचा हा शेवटचा महिना आहे. तरी चार रुपये सत्वर पाठवावे. नंतर पाच रुपये पडतील. शिवाय टपाल हशील पडेल. पुस्तकाची छपाई चालू आहे. 'ग' अक्षर लवकरच होईल.

मुंबई, एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

## ज्ञानोदय, पुस्तक २१, अंक १७, मुंबई, १ सप्तेंबर १८६२

**२००१** (२१ : १७, १ सप्तेंबर ६२; २५८–२६०)
फ्री चर्चचे जुने मिशनरी जेम्स मिचल स्कातलंदहून परत आले. त्यांनी पुणे व इंदापूर भागांत देशी भाषेत मिशनाचे कार्य करावे, असा ठराव झाला. या साहेबावर प्रवासामध्ये मोठेच संकट आले होते. त्याचा वृत्तांत विकली रेकार्दांत दिल्हा आहे. सौथाम्तनहून त्यांची बोट निघाल्यावर एंतेनास गावच्या किल्ल्याजवळ त्यांचे जहाज एका कठीण खडकावर आदळले. जहाज जमिनीत रुतून बसले होते. मडमा व लेकरे धावतच वरच्या मजल्यावर पळाली. अशावेळी ईश्वराखेरीज कोणी त्राता नाही. म्हणून मिचलसाहेबांनी प्रार्थना म्हटली. तेथून किनारा एक मैलावर होता. खलाशांनी लहान होड्या आणल्या व सर्वांना किनाऱ्याकडे सुरक्षित नेले. तेथे एक खेडे होते. खेडुतांनी सर्वांना मोठी प्रीत दाखविली. मडमांना राहावयास खोल्या दिल्या. तेवढ्यात जोराचा वारा सुटला आणि गाळात रुतलेले जहाज हलू लागले. ते पाहून सर्वांना हर्ष होऊन त्यांनी ईश्वराची उपकारस्तुती केली. जहाजाची आपटधोपट झाली, तरी मोडतोड काही झाली नाही. खलाशांनी सर्व ठीक झाल्यावर जहाज पुन्हा हाकारले व पुढे प्रवास सुरू झाला. सर्वजण सुखरूप हिंदुस्थानात आले.

**२००१ अ** (इंम : २५७–२५८)

२००२ (२१ : १७, १ सप्टेंबर ६२, २६१–२६४)

इराणात एका मिशनऱ्यास बेंजामिन हा गृहस्थ कसा राहतो, त्याची माहिती मिळाली. दरिद्री व कठीण शरीरभोगाने पीडित असून त्याचे धार्मिकपण कायम आहे. नेस्तोरी जमातीचा बेंजामिन प्रथमपासून मोठा मेहनती विद्यार्थी होता. पण त्याचे डोळे अधू बनले, मग तो दुसऱ्याकडून वाचून घेऊ लागला. पुढे अंगावरून वारे गेले, तरी या वातरोग्याने ख्रिस्तावरची भक्ती सोडली नाही. लोक थट्टेने त्यास 'इंग्लिस' म्हणत. काही लोक प्रेमाने त्यास खाण्यास देत. गावच्या बिशपाने हुकूम सोडून त्याजवर बहिष्कार टाकला होता. एक उपदेशक शिक्षक मात्र त्याला खाण्यास देई. या धार्मिक गृहस्थास एवढा त्रास झाला, तरी त्याने विश्वास व प्रीत सोडली नाहीत. त्याची बहीणही ख्रिस्ताकडे फिरली व त्यास सांभाळू लागली. त्याच्या खोपटात अंधार होता. तेथे जाऊन मिशनऱ्यांनी त्याची भेट घेतली. त्याची प्रकृती सुधारते आहे व हीदेखील येशूचीच कृपा समजून तो वागतो. त्याची चर्या आनंदभरित दिसते. आपल्यासाठी येशूने मृत्यू पतकरला, यावर त्याचा विश्वास आहे. काही दिवसांनी तो आपले अंधारमय खोपट सोडून ईश्वराच्या दिव्य मंदिरामध्ये जाऊन राहील.

२००२अ (इंग : २६०–२६१)

२००३ (२१ : १७, १ सप्टेंबर ६२, २६४–२६५)

रे. रामकृष्ण विनायक मोडक जातिभेदावर बोलताना म्हणाले की : काही लोक म्हणतात जातिभेद ईश्वराने लावला. पण ईश्वराने इतर देशही निर्माण केले. मग त्या देशांत जातिभेद नाही, हे कसे काय ? भिन्न हवेप्रमाणे वर्णही भिन्न असतात, असे जर म्हणाल, तर याच कटिबंधात इतर देशांत असा जातिभेद कां नसावा ? हवेच्या मानावरून मानवाचे परस्पर व्यवहाराचे नियम काही ठरत नाहीत. सगळे जग हे एक कुटुंब आहे. या कुटुंबाचा बाप ईश्वर आहे. मग त्याच्या लेकरांनी आपसांत वर्णभेद तयार करावा, हे योग्य आहे का ? नऊ भावंडे दहाव्याला शिवत नाहीत, हे ईश्वराच्या इच्छेविरुद्ध आहे. यावरून विचार करा की, खरा पक्ष कोणाचा ?

२००४ (२१ : १७, १ सप्टेंबर ६२, २६५–२६६)

'मुलांचा मित्र' लिहितो की : कित्येक मुले झाडावर चढून पक्ष्यांची कोटी धुंडाळतात. पिले धरून घरी आणतात. बिचाऱ्या पक्ष्यांना याचे फार दुःख होते. काही मुले पिलांना पाळतात, हे खरे. पण पुष्कळांचा हा केवळ बहाणा असतो. त्यांनी अशा पिलांना सोडले, तरी पक्षी त्यांस घरट्यात घेत नाहीत, टोचून त्यांचे जीव घेतात. बिचारे पक्षी दिवसभर अन्नकण गोळा करून आणतात व या पिलांना वाढवतात. आपण त्यांना उचलून निर्भय ठिकाणी ठेवले, तरी कावळा त्यांवर झपाटा मारतोच. पंख फुटलेले लहान पक्षी फांदीवर बसले, तर द्वाड पोरे त्यांस धरतात. त्यांच्या दीनवाण्या शब्दाकडे लक्ष न देता त्यांस पकडून ठेवतात. एकदा एका पोरास विनंती करून मी पिलांला पहिल्याप्रमाणे फांदीवर ती ठेवण्यास सांगितले, तेव्हा त्यांची आईबापे तेथे आली व त्यांस प्रेमाने चारा खाऊ घालू लागली. म्हणून आपण पिले पकडून त्यांचा नाश करू नये. आपणांस कोणी त्रास दिल्हा, तर आपल्या आईबापांस नाही का वाईट वाटत ? असा विचार करा आणि हा पिले धरण्याचा खेळ बंद करा.

२००५ (२१ : १७, १ सप्टेंबर ६२, २६६–२६८)

रामा प्रातःकाळी फिरावयास गेला असता त्याला एक चाकू सापडला. रामाच्या मनात आले की, मालकाचा शोध घेऊन चाकू त्यास द्यावा. पण गोपाळ, जगू आणि बाळू, यांनी त्याला वेड्यात काढले. रस्त्यात सापडलेली वस्तू आपल्याच मालकीची होत असते, असे ते समजत असत. पण प्रामाणिक रामाने शाळानाथाच्या धड्यामध्ये वाचले होते की, दुसऱ्यांनी तुमच्याशी जसे वर्तावे म्हणून तुम्ही इच्छिता, तसे दुसऱ्याशी वर्ता. त्याच रस्त्यावर घोड्यावरून जाणारा माणूस आपला माग सोडून गेला होता. घोड्याच्या खुरावरून रामा त्याचा शोध घेत त्याच्या घरापर्यंत गेला. जे आपले नव्हे, ते घेणे, ही चोरीच होय. रामा त्या सद्‌गृहस्थास म्हणाला की, तुमचा चाकू हरवला आहे. गृहस्थाने खिसा चाचपला, तेव्हा त्याच्या लक्षात आले की, चाकू गेला. मग रामाने चाकू परत दिल्हा. रामाचा सुस्वभाव व प्रामाणिकपणा पाहून तो सद्‌गृहस्थ संतुष्ट झाला. त्याने रामास पाच रुपयाचे नीतीचे पुस्तक बक्षिस दिल्हे. बालकांनी रामासारखे निःस्पृही व प्रामाणिक बनावे. स्वार्थी व अपहारी होऊ नये. त्या वस्तूच्या बहुतपट किमतीचा आशीर्वाद त्यांना मिळेल. देव नीतिमान् लोकांवर कृपा करतो.

**२००६** (२१ : १७, १ सप्टेंबर ६२, २६८–२७०)

'अनीतिद्वेष्टा' लिहितो की : वांबोरीच्या तमाशाविषयी मी पत्र लिहिले. त्यावर वृत्तवैभवात 'एक हिंदू'ने माझा मजकूर खोटा आहे, असा आरोप करून गालिकास्त्रांचा भडिमार केला. वृत्तवैभवकाराने अशी मखलाशी केली की : सरकारने बारीक चौकसी केली. ज्ञानोदयातील मजकूर खोटा आहे. मामलेदार निर्दोष ठरले. पण खटल्याचा निकाल अद्याप आला नाही, ही वस्तुस्थिती आहे. उग्र खंडेरायारूप अभिप्राय त्यांनी का द्यावा, ते समजत नाही. म्यां प्रत्यक्ष पाहिले की, तमाशात बंडवाल्यांचे सोंग घेतले गेले. या अघोर कृत्याचा विसर पडणे शक्य नाही. त्यांचे बोलणे माझ्या कानांत अद्याप घणघणत आहे. पण टक्याची दुनिया नाही. काही लबाड साक्षीदारांनी मात्र असे सोंग आले नाही म्हणून खोटा मजकूर लिहून दिल्हा. 'मनाऐसी गाही नाही त्रिभुवनी' विद्वान व सभ्य संपादकास हे शोभणारे नाही. असल्या द्वाड सवयी लागल्या की, आपली उतावीळ लेखणी ते कोणावरही चालवतील. हिंदू लोकांवर खिस्त्यांनी कुभांड रचले, असे या संपादकाचे म्हणणे आहे पण त्याने पुरावा दाबून टाकला आहे. एकंदरीत खिस्त्यांना तोंड बांधून बुक्क्याचा मार आहे!

**२००७** (२१ : १७, १ सप्टेंबर ६२, २६८–२७०)

रेल्वेचा बोरघाटातला रस्ता तयार झाला आहे. पावसाने १–२ महिने उघाडी दिली, तर तो पूर्ण होईल. १८६३ च्या प्रारंभी तेथून रेल्वे जाऊ शकेल. खंडाळा ते दहिवली रस्ता पूर्ण झाला. पण काही खंडे आहेत. सपाटी मिळवून रेल जोडावयाचे राहिले आहेत. (ज्ञानप्रकाशवरून)

**२००८** (२१ : १७, १ सप्टेंबर ६२, २६८–२७०)

अमेरिकेत लढाईमुळे कापसाची लागवड बंद झाली. इकडच्या शेतकऱ्यांनी कंबरा बांधून जास्तीत जास्त कापूस पिकवावा. (ज्ञानप्रकाशवरून)

२००९ (२१ : १७, १ सप्टेंबर ६२, २६८–२७०)
लंदन पदार्थसंग्रहालयाच्या विशाल महालाची लांबी ३०० फूट रुंदी ८५ फूट व उंची १०० फूट आहे.

२०१० (२१ : १७, १ सप्टेंबर ६२, २६८–२७०)
जानेवारीमध्ये नगर भागात ४९१० लोक पटकीने रोगी झालेले होते. त्यांपैकी १०२० जणांनी औषध घेतले. त्याच्यापैकी ३९९ लोक बरे झाले. शेकडा ४० टक्के लोक बरे होतात. सरकारी औषध न घेता इतर उपाय केले, तर अवघे २३ टक्के लोकच बरे होतात.

२०११ (२१ : १७, १ सप्टेंबर ६२, २६८–२७०)
सूर्याचा व्यास पृथ्वीच्या १११॥ पट मोठा आहे. त्याचे शरीरमहत्त्व १४ लक्ष पटीने मोठे आहे. त्याचे दार्ढ्य मात्र एकचतुर्थांशच आहे. पृथ्वीवर एक शेर वजन भरणारा पदार्थ सूर्यावरती २८ शेर भरेल.

२०१२ (२१ : १७, १ सप्टेंबर ६२, २६८–२७०)
हिंदुस्थानातले मोगलाई सुभे, हिंदुस्थानचे गवनर जनरल, मुंबईचे गवरनर, यांची यादी या अंकात दिली आहे.

२०१३ (२१ : १७, १ सप्टेंबर ६२, २६८–२७०)
जून १८६१ रोजी माशांचा पाऊस पडला. समुद्राच्या लाटा उसळून भरतीच्या वेळी जमिनीवर आदळतात. त्यातून हे मासे जमिनीवर पडतात. यासच 'माशांचा पाऊस' म्हणतात.

२०१४ (२१ : १७, १ सप्टेंबर ६२, २७०–२७२)
हैद्राबादचे रेसिडेंट कर्नर देविदसन मरण पावले.

मुंबई, एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

**२०१९** (२१ : १८, १५ सप्टेंबर ६२, २७३–२७४)

फ्रेंद ऑफ इंड्यावरून समजते की : सरकारी व मिशन शाळांकरिता सरकारास २५ लाख तर मिशन शाळासाठी १ लाख ६५ हजार खर्च येतो. हिंदुस्थानात तीन कोटी मुले शाळेत जाण्याच्या वयाची आहेत. त्यांपैकी मिशनच्या शाळेत १ लक्ष आणि सरकारी शाळांमध्ये १ लाख २७ हजार ५१३ मुले शिकतात. मुंबई इलाख्यामध्ये सिंध धरून ६१० पाठशाळा सरकारी आहेत. त्यांत सुमारे २५,१८७ विद्यार्थी नियमित शिकतात. हा तपसील पाहून कोणास काही उत्तर करिता येणार नाही. विद्येच्या कामामध्ये निःपक्षपात असला पाहिजे. सरकारने मिशन शाळांची स्थिती व विद्यार्थ्यांची संख्या पाहून त्यांना साह्य द्यावे.

**२०१९ अ** (इंग : २७३)

**२०१६** (२१ : १८, १५ सप्टेंबर ६२, २७५–२७९)

बौद्ध धर्मात दोन गोष्टी विशेष आहेत. एकतर बौद्धांची संख्या फार मोठी आहे व त्यांच्यापैकी फारच थोडे ख्रिस्ती होतात. महंमदी धर्मात एकाच देवाची भक्ती असून यहुद्यांच्या इतिहासापैकी अनेक गोष्टी घेतलेल्या आहेत. बौद्ध धर्म हिंदू धर्मापेक्षा अधिक मोहकारक आहे. त्यात उपाध्यांची सत्ता नाही. स्नानप्रायश्चित्त, दानविधी, यांचा त्रास नाही. जातिभेद नाही. तो नास्तिकमताचे प्रतिपादन करतो, म्हणून त्यात जास्त लोक आहेत. निर्वाण म्हणजे नाहीसे होणे. या सर्वोत्तम मरणोत्तर स्थितीत लोक खूष असतात. ब्रह्मदेशात मिशनऱ्यांचा बौद्धांशी संबंध आला. नानकाने जसा हिंदू व महंमदी यांपेक्षा वेगळा धर्म स्थापिला, तसा एखादा आत्मिक सामर्थ्य मिळवून ख्रिस्तपंथ निर्माण करील. ब्रह्मदेशाच्या राजाने कलकत्त्याच्या दोव्हतन कॉलेजात ३ विद्यार्थी पाठविले. ही मुले प्रख्यात सरदारांची आहेत. शाळेच्या नियमानुसार ती प्रार्थनेस थांबत असत. पुढे थोरला ओंग झो व दुसरा मोंगमीन यांना ख्रिस्ती धर्माबद्दल उत्सुकता निर्माण झाली. रे. लेस्ली यांचा उपदेश ऐकून त्यांनी बाप्तिस्मा घेतला. तिसरा पोथो यानेही त्या दोघांचे अनुकरण केले. आता आशा एवढीच की, मायदेशी त्यांच्यावर क्रूरपणाचे प्रयोग होणार नाहीत. कारण तेथील राजा इंग्रजांचा मित्र आहे. सध्या ब्रह्मदेशात ३७० मंडळ्या आणि १८,८५२ ख्रिस्ती आहेत. एकूण प्रजा ५० लाख आहे.

**२०१६ अ** (इंम : २७४–२७५)

२०१७ (२१ : १८, १५ सप्टेंबर ६२, २७९–२८४)

'जनमित्र' लिहितो की : पटकी थांबली, पण दुष्काळी परिस्थिती कायम आहे. १२ आगस्टला १॥ इंच पाऊस झाला. धान्याचा भाव ७ शेरांवर आला. व्यापारी धान्याचे दर वाढवीत आहेत. पलटणीच्या लोकांनी गाड्या अडवून स्वस्तात धान्य देवविले. व्यापाऱ्यांच्याकडे धान्याचा बेसुमार संग्रह आहे पण ते विकीत नाहीत. कारण अद्याप त्यांना हवी तितकी महागाई झाली नाही. दुर्गंधीचे धान्य महाग भावात देतात. ते खाण्याने रोगराई वाढेल. मोगलाईतून धान्य आणण्यास परवानगी मिळवली पाहिजे. खरपड व दुष्काळ असला शाब्दिक भेद न करता प्रयत्न करावेत. ६०–६५ वर्षांपूर्वी मोठा दुष्काळ पडला होता, तेव्हा लोकांनी माणसांची प्रेतेही खाल्ली होती. कित्येक खेड्यांत आज लोक बैलांचे मांस खाताहेत. ब्राह्मण मात्र काळेश्वर व अमृतेश्वर यांस अभिषेक करण्यात मग्न आहेत. एकाने पाण्याखाली बराच काळ बसण्याचे दिव्य केले. पण पाऊस आलाच नाही. नगरच्या सभेत दायलीसाहेब, मोरोबा कानोबा, रा. केरो लक्ष्मण, खंडेराव बाळाजी, रे. बालटैन, यांनी २८०० रुपयांची मदत गोळा केली. त्यातून अन्नसत्र सुरू झाले. पण या रकमेचा लगेच फडशा उडणार आहे. लोकांनी सढळ हाताने मदत करावयास हवी. श्रीमंतांनी आपले औदार्य दाखवावे.

२०१८ (२१ : १८, १५ सप्टेंबर ६२, २८४–२८६)

उत्तर हिंदुस्थान, द. महाराष्ट्र व वऱ्हाड येथे चांगला पाऊस झाला.

२०१९ (२१ : १८, १५ सप्टेंबर ६२, २८४–२८६)

जेजुरीस एका गृहस्थाने आपल्या भावास पायलीभर ज्वारी दिली, म्हणून त्याची बायको रागवली. तेव्हा त्याने बायकोमुलांना कण्हेरीचा रस पाजून मारले. नंतर स्वतःही रस पिऊन मेला. हा भयंकर प्रकार पाहून त्याच्या भावाने आत्महत्या केली. (इंदुप्रकाशावरून)

२०२० (२१ : १८, १५ सप्टेंबर ६२, २८४–२८६)
अमेरिकन सेनापती मॅकलेलन याच्या पराजयाची वार्ता खोटी आहे. त्याने बंडवाल्यांचे ६० हजार लोक मारले. त्याचे मात्र ११ हजारच मेले. इतालीचा गॅरिबाल्दी रोमला किंवा आस्ट्रियाकडे जाईल.

२०२१ (२१ : १८, १५ सप्टेंबर ६२, २८४–२८६)
अमेरिकन लढाईमुळे सरकारचा दैनंदिन खर्च २० लाखांवर गेला.

२०२२ (२१ : १८, १५ सप्टेंबर ६२, २८४–२८६)
विलायतेत करापासून सरकारला ७० कोटी रुपये मिळतात.

२०२३ (२१ : १८, १५ सप्टेंबर ६२, २८४–२८६)
अमेरिकन लढाईमुळे दरसाल ३ अर्ब ६० कोटींचा व्यापार बुडणार.

२०२४ (२१ : १८, १५ सप्टेंबर ६२, २८४–२८६)
विक्टोऱ्याचे चिरंजीव आल्बर्त पुढील वर्षी हिंदुस्थानात येणार.

२०२५ (२१ : १८, १५ सप्टेंबर ६२, २८४–२८६)
नामदार राणीची द्वितीय कन्या आलिसा हिचा विवाह जेर्मानीच्या प्रिन्स विल्यमशी झाला. राणीसाहेबांचे भ्रतार नुकतेच वारल्यामुळे विवाहसमारंभ अगदी साध्या पद्धतीने झाला.

२०२६ (२१ : १८, १५ सप्टेंबर ६२, २८४–२८६)
नानाचे सहकारी रावसाहेब व पांडुरंगराव या दोघांना कानपूर मुक्कामी फाशी देण्यात आले. आपले प्रेत आईच्या ताब्यात द्यावे, ही रावसाहेबाची विनंती इंग्रज सरकारने फेटाळली. वास्तविक तसे करण्यास काहीच हरकत नव्हती.

२०२७ (२१ : १८, १५ सप्टेंबर ६२, २८४–२८६)

दक्षिण हिंदुस्थानात काही देवभोळे लोक चपात्यांची देवाणघेवाण करीत आहेत. परंतु १८५७ सारखी भीती बाळगण्याचे कारण नाही. मुसळास अंकुर फुटत नसतात.

२०२८ (२१ : १८, १५ सप्टेंबर ६२, २८७–२८८)

अलीपूरजवळ नामलल्लोई गावी पावसातून मांसखंड पडले. (पूर्णचंद्रोदयवरून)

२०२९ (२१ : १८, १५ सप्टेंबर ६२, २८७–२८८)

रसीदपुरात जन्मलेल्या एका मुलीस ४ हात व ३ पाय होते.

२०३० (२१ : १८, १५ सप्टेंबर ६२, २८७–२८८)

नगरात एका स्त्रीस ३ आवळीजावळी पण मृत बालके झाली.

२०३१ (२१ : १८, १५ सप्टेंबर ६२, २८७–२८८)

मंगळवेढ्यात नाग चावल्यामुळे एक रक्तपित्तीचा रोगी बरा झाला.

२०३२ (२१ : १८, १५ सप्टेंबर ६२, २८७–२८८)

शेंडेनक्षत्र पुन्हा दिसत असून त्याची लांबी ८ अंश आहे.

२०३३ (२१ : १८, १५ सप्टेंबर ६२, २८७–२८८)

कल्याण येथे एक माणूस विंचू चावून मरण पावला.

२०३४ (२१ : १८, १५ सप्टेंबर ६२, २८७–२८८)

दिल्ली शहराच्या उपनगरात लांडग्यांचा मनस्वी उपद्रव होतो. लांडगे लेकरे पळवितात.

२०३५ (२१ : १८, १५ सप्टेंबर ६२, २८७–२८८)

पुण्यात ३ आगस्तला १ हजार लोकांचा जमाव रस्त्याने चालू लागला, तेव्हा लूटमार समजून व्यापाऱ्यांनी आपली दुकाने ताबडतोब बंद केली. फौजदार दादाभाई बेहरामजींनी तो जमाव मोडून टाकला. (पु. आ.)

२०३६ (२१ : १८, १५ सप्टेंबर ६२, २८७–२८८)

मद्रासकडे मरकारा गावी २४ आगस्त रोजी धरणीकंपाचा धक्का बसला. २॥ कोसांपर्यंत धक्के जाणवले. (ज्ञानप्रकाशवरून)

मुंबई, एक्सचेंज प्रेस, फोर्ट

**२०३७** (२१ : १९, १ आक्टोबर ६२, २९०-२९४)

मुंबईत मि. रामचंद्र कृष्णनाथ याने बाप्तिस्मा घेतला. तो आपल्या निवेदनात म्हणतो की : वयाच्या १३ व्या वर्षापर्यंत मी तारणाविषयी अज्ञानी होतो. कर्मठपणा करून निरर्थक व्रते पाळीत होतो. मिथ्याचाराबरती अंधळा विश्वास ठेवीत होतो. ख्रिस्ताची पुस्तके मी जाळून टाकीत असे. ख्रिस्ती लोकांचा पाठलागही करी. ऐषआरामासाठी लोक धर्म बदलतात, असे मला वाटे. पुढे एका ख्रिस्ती गृहस्थाच्या सहवासात मी शास्त्र वाचले. इंग्रजीचा अभ्यास वाढवणे, हाच माझा हेतू असे. ऑक्षस इन् क्रैरर हे पुस्तक वाचून मी वाद करी. पण विचार करू लागल्यावर हिंदू धर्मातील चुका ध्यानात आल्या. हिंदू लोक ईश्वराचे परस्परविरुद्ध वर्णन करतात. कोट्यावधी देव कल्पून त्याचा अपमान करतात. वंदनीय परमेश्वरास त्यांनी पशुसमान बनवले. हे सदसद्विवेकाच्या विरुद्ध आहे. त्यांचे विधीही पोकळ आहेत. ही माझी मते बोलून दाखवल्यामुळे माझे शाळगडी माझा पाठलाग करू लागले. रे. जेम्स शेरीफ यांची भेट झाल्यावर मी तारणाचा उपाय मागितला. यास विलंब करण्यात भय आहे, असे मला वाटले. अग्निज्वालेसारख्या परीक्षेतून मी सुरक्षित पार पडलो आहे. देवपुत्राने मला उजेड व मोकळीक दिल्ही, म्हणून मी त्याची स्तुती करतो. काही दिवसांपूर्वी माझ्या धाकट्या नातलगांचा मृत्यू पाहून माझा मनपालट झाला व मी तातडीने दीक्षा घेतली.

**२०३७अ** (इंग : २८९-२९०)

२०३८ (२१ : १९, १ आक्टोबर ६२, २९५–२९७)

क्रिस्तीयन वर्नाकुलर एज्युकेशन सोसैती या मंडळीने देशी ख्रिस्ती शिक्षक तयार करण्यासाठी विद्यालय स्थापण्याचे ठरविले. हे विद्यालय मधुरा येथे होईल कारण ते तामिळ देशातील अगत्याचे गाव आहे. या प्रदेशातील प्रजा २० लाख आहे. सहा हजार देशी ख्रिस्ती तेथे असून तिनेवेलीस ते जवळ पडते. प्राचीन काळी मधुरा हे संस्कृत विद्येचे आगर होते. तैलंगी राजांनी सहाव्या शतकात बांधलेल्या उत्कृष्ट इमारती तेथे आहेत. तेथील थोरले देऊळ ३१२ फुटी आहे. तामिळ भाषाही शुद्ध बोलली जाते. कापसाच्या व्यापाराचे ते केंद्र आहे. मधुरेस गेली ३० वर्षे मिशनाचे ठाणे आहे. चांगले पंतोजी, शास्त्र वाचणारे व शिक्षकिणी तेथे तयार होतील. व्यावहारिक विद्येबरोबरच धर्मतत्त्वेही तेथे शिकविली जातील. उपदेशपद्धती व धर्मांची तुलना यांवर भर राहील. बहुत ख्रिस्ती पंतोजी व उपदेशक तयार व्हावे, अशी योजना आहे.

२०३८ अ (इंम : २९४–२९५)

२०३९ (२१ : १९, १ आक्टोबर ६२, २९७-२९९)

'जनमित्र' लिहितो की : आता पर्जन्य पडला. नगरला ५॥ इंच झाला. धान्य स्वस्त व विपुल मिळू लागले. सोनेरी मशिदीत अनेक दिवस अन्न वाटले गेले. शिजलेले अन्न घेतल्यामुळे आपण बाटतो, असे ज्यांना वाटे, त्यांना कोरडे अन्न देत होते. अन्नसत्राचा खर्च १ हजार रुपये झाला. पाऊस पडल्यामुळे सुकलेल्या धान्यावर खटवी आली. पेरण्या झाल्या. मध्यंतरी अनेक गरिबांनी मक्यांची कणसे खाऊन गुजारा केला. काहींनी गाजरे व रताळी लावली होती. आता चारा बराच मिळतो. अशक्त गुरांना हिरवा चारा मिळून ती बळकट झाली. दाणेवाले मात्र दुःखी झाले. कारण भाव उतरल्यामुळे त्यांचा तोटा झाला. या निमित्ताने धनवान लोक किती निर्दय असतात, ते मात्र कळले. खोट्या देवाची भक्ती करणारे उघडे पडले. देव झाले लटिके । ब्राह्मण झाले बटके । दैहिक अन्नाचा दुष्काळ दूर झाला, पण आत्मिक अन्नाची खरपड चालूच आहे. शेकडो वर्षे नेटिवांनी कल्पित देवाची भक्ती केली. म्हणून दुष्काळ, मरी व तरवार यांची शिक्षा भोगावी लागते. ही असद्‌भक्ती किंवा अभक्ती दूर झाली पाहिजे. लोकांनी येशूचे खरे सेवक व्हावे.

२०४० (२१ : १९, १ आक्टोबर ६२, २९९-३०२)

महंमदी धर्माबाबत अब्दुल मसी म्हणाला की : आपण महमदी धर्मातील अंतर्गत प्रमाणे पाहू. शाबुद्दीनास मात्र त्यात काही वावगे वाटले नाही. पण या शास्त्रात एकीकडे म्हणतात जबरदस्ती करू नये, तर दुसरीकडे 'जे अविश्वासू आहेत त्यांना मारा,' असे म्हटले आहे. न्यायाचा दिवस १ हजार वर्षांचा की ५० हजार, तेही नक्की सांगितलेले नाही. एकदा दिलेले हुकूम ईश्वर रद्द करतो, असाही उल्लेख आहे. पण हे देवाच्या गुणांना शोभत नाही. मद्यपानाबद्दलही परस्परविरुद्ध उल्लेख आहेत. शालमोन सुलतान भुतांवर आणि वाऱ्यावर अंमल गाजवीत होता, हे पूर्वीच्या किताबाशी जुळत नाही. एज्रा व त्याचे गाढव १०० वर्षे मरून पडले होते व नंतर जिवंत झाले, येशूस ईश्वराने आकाशात उचलून नेले, अशा कथा प्रमाणावाचून दिल्या आहेत. येशूनंतर फोरकळीत येईल, असे म्हटले, पण तो फार पवित्र आत्मा होता. महंमदाने तर ख्रिस्ताची वचने खोटी म्हटली आहेत. जी भुते रात्री आकाशातील गोष्टी चोरून ऐकतात, ती ताऱ्यांच्या रूपाने जमिनीवर पडतात, असे इंजिलात म्हटले आहे. उपवासाच्या दिवसांत रात्री खाण्यास मुभा आहे. पण ध्रुवाजवळ कित्येक महिने रात्र होत नाही. म्हणून आम्ही म्हणतो की, या शास्त्रकर्त्यांस भूगोलाचे ज्ञानच नसावे. म्हणून ते कल्पित समजावे.

**२०४१** (२१ : १९, १ आक्टोबर ६२, ३०२–३०४)

अहमदनगर येथील सभेत एक विद्यार्थी आपल्या उद्योगावरील निबंधात लिहितो की : सगळ्यांनी आळस टाकून उद्योगी व्हावे. उद्योगावाचून निर्वाहच होणार नाही. पहिल्या अवस्थेत तर मानवास सर्वत्र हिंडून अन्न मिळवावे लागे. नंतर शेतीसाठी उद्योग व श्रम करावे लागले. उद्योगावाचून संपत्ती तयार होत नाही. पानांची वस्त्रे करणारा माणूस कापसाची वस्त्रे करण्यास शिकला. हत्यारे, नाणी, पुस्तके, हे सर्व उद्योगाचेच फळ आहे. उद्योगाने शरीर निरोगी व बळकट होते. मेहनत केली की, स्नायू बळकट होतात. उद्योगाचे काम पूर्ण करण्यासाठी कल्पना आणि युक्त्या काढाव्या लागतात. त्यातून विचारशक्तीस प्रोत्साहन लाभते. उद्योगाने मनुष्य सदाचारी होतो. त्याचे मन चांगल्या गोष्टींमध्ये असल्यामुळे कुभांड किंवा घातपात यांच्या तो नादी लागत नाही. मित्राजवळ त्याची पत व वजन कायम राहाते. आळशी लोक मात्र दरिद्री राहतात, उपासानेच मरतात. ते दुर्व्यसनी व मूढ बनतात. उद्योगाने माणसाचे कल्याण होते. अर्थात वाईट उद्योग मात्र करू नये.

**२०४२** (२१ : १९, १ आक्टोबर ६२, ३०४)

अमेरिकेतील लढाईमुळे कापसाच्या भावामध्ये जो चढउतार होतो, त्यातून काही व्यापार निहाल झाले, तर काहींचे दिवाळे निघाले. एका मुकादमास ४ लाख रुपये मिळाले, तर एका नेटिव व्यापाऱ्यास २५ लाखांचा फायदा झाला. काहीजण भोळेपणाने, तर काही ज्योतिषावर विश्वास ठेवण्यामुळे बुडाले. कापसाचे भाव उतरण्याचे भविष्य ऐकून त्यांनी जवळचा कापूस विकला. पण पुढे अफाट भाव वाढला. जोशावर विश्वास ठेवण्याचा हा दुष्परिणाम होय.

**२०४३** (२१ : १९, १ आक्टोबर ६२, ३०४)

बंगालमध्ये स्त्रिया गरोदर असताना अर्भकांचे विवाह ठरवितात. एकीस कन्या व दुसरीस जन्मताच मेलेला पुत्र झाला, तर ती कन्या कायमची विधवा राहाते. धर्माने मनुष्याचा कसा घात होतो ते पाहा.

**२०४४** (२१ : १९, १ आक्टोबर ६२, ३०४)

मुंबईच्या किल्ल्याचा तट ताबडतोब पाडून टाकावा, असा विलायत सरकारने हुकूम केला आहे. (वृत्तवैभववरून)

मुंबई, एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

---

## ज्ञानोदय, पुस्तक २१, अंक २०, मुंबई, १५ आक्टोबर, १८६२

---

**२०४५** (२१ : २०, १५ आक्टोबर ६२, ३०५-३०६)

अमेरिकन मिशनाने ६४ गीतांचे लेकरांची गायने हे पुस्तक छापले. चालींवर गीते म्हणता यावी, म्हणून युरोपियन रीतीप्रमाणे स्वरचिन्हे दिली आहेत. काही गीते तुकारामाच्या अभंगांच्या छंदावर केली आहेत. लातिन व मराठीतील छंदांचे नियम यात बराच मेळ आहे, हे पाहून आश्चर्य वाटते. काही गीते इंग्लिश मुलांच्या आवडत्या गाण्यांवरून तयार केली आहेत. किंमत अवघी चार आणे आहे. पूर्वी ईश्वरभक्तिपर २३६ गीतांचे पुस्तक प्रसिद्ध केले होते. त्याचा उपयोग अनेक ख्रिस्ती मंडळ्या करतात. यातून परमेश्वराचा गौरव होतो.

**२०४५ अ** (इंम : ३०५)

**२०४६** (२१ : २०, १५ आक्टोबर ६२, ३०८–३११)

कान्स्तान् तिनोपलचे वृत्त फार आशादायक आहे. मिशनाच्या पंतोजींनी व उपदेशकांनी सांगितले की : खऱ्या धर्माचा प्रसार त्या देशांत होत आहे. बिघडलेले ख्रिस्ती प्रातेस्तंत बनत आहेत. आर्मेनी लोक शिव्या व आणाशपथा वाहण्याची सवय सोडीत आहेत. जुने आर्मिनी मात्र याबद्दल नापसंती व्यक्त करतात. चांगल्या गोष्टीदेखील पाद्री लोकांकडून नकोत, असा त्यांचा विचार दिसतो. वजनदार कर्मठ घराण्यांतील लहान मुली शाब्बाथ शाळेत शिकण्याकरिता जाताहेत. आईबापांच्या विरोधास त्या जुमानीत नाहीत. तुर्की लोकही गुप्तपणे मिशनऱ्यांचा उपदेश ऐकतात. पवित्र शास्त्राची पुस्तके मुद्दाम मागून घेऊन वाचतात. अनेक लोक स्तांब्रूलला जातात. कारण तेथे धार्मिक स्वातंत्र्य जास्त आहे. अंगोऱ्यात मात्र जुने वातावरणच आढळते. तेथील फादरांनी काही पुस्तके प्रकाशित करून स्थापित देवावर टीका केल्यामुळे लोक चिडले. परंतु फादरांच्या आक्षेपांना उत्तर देण्यास कोणी तयार होत नाही. एकाने मात्र युक्तिवादापेक्षा शिव्यांचा उपयोग करून एक पुस्तक छापले आणि गुप्तपणे वाटले. तुर्कस्थानच्या सुलतानाने प्रिन्स आफ वेल्स यांच्या मेजवानीत सर्वांना एकाच पंक्तीत बसावयास लावले. यावरून तुर्कस्थानात फार अनुकूल फेरफार होत आहे.

**२०४६ अ** (इंग : ३०६–३०७)

२०४७ (२१ : २०, १५ आक्टोबर ६२, ३११–३१३)

'अज्ञान्यांचा कळवळा करणारा' कळवितो की : माणसाच्या मनांत भय ही चमत्कारिक वृत्ती असते. पण मिथ्या व काल्पनिक भयही हिंदू लोकांत फार आहे. भुतांची भीती बाळगून त्यावर उपाय करणे, हाही त्यातलाच प्रकार होय. एका ब्राह्मण मुलीस भूतबाधा झाली, असा सर्वांना संशय आला. त्यावर एका मुसलमान पंचाक्षऱ्याकडून उपाय करविले गेले. त्याने फां फू केले, ऊद जाळला, तेव्हा धुराने ती मुलगी बेशुद्धच पडली. काही वेळाने पंचाक्षऱ्याने तिला प्रश्न विचारले. तिने एका मेलेल्या बाईचे नाव सांगितले. त्या 'भुता'ने पुरणपोळीचा नैवेद्य मागितला. वेताच्या छडीचा धाक दाखवून त्या मुलीला तोंडात जोडा धरून घराबाहेर पाठविले. तरीही ती मुलगी चांगली बरी होत नाही. आता मांत्रिकाने एक ताईत दिलेला आहे. प्रश्न असा आहे की, ब्राह्मण मुलीने तोंडात जनावराच्या कातडीचे खेटर घालावे का? त्याला बाट नाही काय ? एकंदरीत भुताची भक्ती करणाऱ्यांना मिथ्या भय व कांक्षा यांचा फार त्रास होतो.

२०४८ (२१ : २०, १५ ऑक्टोबर ६२, ३१३-३१५)

'जत्रेस गेलेला' लिहितो की : यंदा भिंगारात पालखीच्या जत्रेस कमी यात्रेकरू आले होते. बाजार भरगच्ची भरला. पण दुष्काळाने लोक त्रासलेले आहेत. ते काय मिठाई खाणार ? अर्थात काहीजण उसनी रक्कम घेऊन चैन करतात. घरच्या बायका अन्नसत्रात गेल्या, तरी लाल पागोट्याचा समला झुलवीत चटकचांदण्यांची तोंडे पाहण्यात ते गर्क असतात. तरी यंदा तमाशे कमी आहेत, ही चांगली गोष्ट म्हणावी लागेल. दारूचा कलगीतुराही फारसा आढळला नाही. रेंद्यात लोळणारे दर्दी कमी दिसले. काटेऱ्या झाडीत कमल दिसावे, त्याप्रमाणे पवित्र शास्त्र वाचणारे उपदेशक शोभत होते. त्यांनी अनेक गाणी रचिली असून ती चालीवर म्हणतात. हिंदूंना ती गाणी आवडलेली दिसली. पण धर्मनिंदेमुळे ते नापसंती दाखवितात. दुराचाराचा व ढोंगाचा निषेध करण्यात अयोग्य काहीच नाही. पण कोणास अणखर वाटावे असे गाणे नसावे. ईश्वराला संतोषवीत असताना कोणाचेही मन विनाकारण दुखवू नये. सैतानाच्या सेनेची कठीण अंतःकरणे उपदेशरूप शरांनी नेहमी विंधीत राहावे.

२०४९ (२१ : २०, १५ आक्टोबर ६२, ३१५–३१८)

साळू नावाच्या सात वर्षांच्या मुलीस छंदास येईल त्याप्रमाणे वागण्याची इच्छा झाली. आपले आईबाप सुज्ञ, माहितगार व समर्थ असूनही त्यांचे ऐकावे, हे तिला पटत नसे. आईबापांचा जुलूम नको, म्हणून एक दिवस शाळा सुटल्यावर ती जंगलाकडे निघाली. कारण गावात कोठेही गेले, तरी आईबाप तेथे येऊन घरी घेऊन जाणार. मग वडील शिक्षा करणार. त्यापेक्षा जंगलात पक्ष्यांच्या सोबतीने राहावे, असा तिने विचार केला. प्रथम तिला फार आनंद झाला. मोर व ससे पाहण्यात तिने वेळ घालविला. सायंकाळ झाल्यावर तिला जेवणाची आठवण झाली. काही करवंदे खाऊन तिने भूक भागवली. पण तेथे उजेडासाठी दिवा किंवा हीवनिवारण करण्यास पांघरूण नाही, म्हणून नाराज झाली. ज्या झाडाखाली ती बसली होती, तेच झाड तिला विशाल राक्षसाप्रमाणे भयानक वाटले. रात्री हिंसक पशू येऊन आपणांस तोडतील, या भयाने ती चिंताग्रस्त झाली. भुकेने कल्पांत होऊन जीव व्याकुळ झाल्यावर ती रडू लागली. आईबापांवाचून आपले कोणी रक्षण करू शकणार नाही, हे तिला पटले. आपण किती अनुपकारी व कृतघ्न आहोत, याची जाणीव झाली. अंधारात वाट दिसत नव्हती, तरी ती ठेचकाळत घराकडे निघाली. गावकूस आल्यावर तिला एक शेतकरी भेटला. त्याने तिला घरी पोचविले. साळूने आईबापांची क्षमा मागितली. नंतर तिने केव्हाही त्यांची आज्ञा मोडिली नाही.

२०५० (२१ : २०, १५ आक्टोबर ६२, ३१८–३२०)

सेनापती गारिबाल्दी रोमवर हल्ला करणार होता. परंतु इताल्यन सैनिकांनी त्यास डोंगराळ प्रदेशात गाठून जखमी केले; नंतर कैद केले. एकंदरीत पोप ज्या विक्तर एमानुवेलास व लुइ नेपोल्यनास शिव्या देत होता त्यांनीच त्यास वाचवले. तुर्की सरकारने मॉंतेनिग्रनांचा पराभव केला. अमेरिकेची मात्र काही बातमी नाही.

२०५१ (२१ : २०, १५ आक्टोबर ६२, ३१८–३२०)
फत्तेपूरचे जज् मि. टकर यांना ठार मारणाऱ्या कुरबान अली या बंडखोरास सरकारने पकडले. मानसनसाहेबाच्या मोरकऱ्यासही अटक झाली.

२०५२ (२१ : २०, १५ आक्टोबर ६२, ३१८–३२०)
जहानाबादमध्ये कदंबिनीदेवी या बंगाली ब्राह्मण विधवेचा रामब्रह्म पाठक यासी पुनर्विवाह झाला. उच्चवर्णीयांनी खटपट करून या जिल्ह्यात २० पुनर्विवाह घडवून आणले.

२०५३ (२१ : २०, १५ आक्टोबर ६२, ३१८–३२०)
अमेरिकेत एकट्या न्यूयॉर्क शहरात १३० वृत्तपत्रे व ७२ मासिके प्रकाशित होतात.

२०५४ (२१ : २०, १५ आक्टोबर ६२, ३१८–३२०)
लार्ड कानिंग यांची मालमत्ता १९ कोटी ६० लाखावर होती.

२०५५ (२१ : २०, १५ आक्टोबर ६२, ३१८–३२०)
नागपूर प्रांतातील सर्व पडीत जमिनीमध्ये कापसाची लागवड करण्याची सरकारची योजना आहे.

२०५६ (२१ : २०, १५ आक्टोबर ६२, ३१८–३२०)
डेंडेनक्षत्र अगदी पृथ्वीजवळ आले, तेव्हा त्याचे पृथ्वीपासून अंतर दीड कोटी कोस होते. त्याचे वय १९३० वर्षे आहे.

**२०५७** (२१ : २०, १५ आक्टोबर ६२, ३१८–३२०)

जातिभेदविवेकसाराचा कर्ता म्हणतो : कौंडण्य ऋषी विधवेचा पुत्र होता, तर स्वाग ऋषी कुत्रीपासून जन्मला. पिंगलाचा जन्म घुवडापासून झाला. मांधाता, वेन, ध्रुव, रहूगण, मेधातिथी हे क्षत्रिय ब्राह्मणत्व पावून ऋषी झाले.

मुंबई, एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

## ज्ञानोदय, पुस्तक २१, अंक २१, मुंबई, १ नोव्हेंबर १८६२

**२०५८** (२१ : २१, १ नोव्हेंबर ६२, ३२३–३२६)

नीलकंठशास्त्री गोरे यांनी हिंदूंच्या सहा शास्त्रांचे संयुक्तिक खंडण हे पुस्तक हिंदीत लिहिले. त्याचा डा. हाल्ने इंग्रजी अनुवाद केला. परंपरेने चालत आलेली मते सबळ प्रमाणाने खोडून काढली, तरी नेटिवांचा त्यावर विश्वास बसत नाही. शास्त्रीबुवांचे बुद्धिसामर्थ्य व वक्तृत्व हे गुण त्यांच्या धर्मसंबंधी व्याख्यानांतून प्रगट झालेले आहेत. या दक्षणी ब्राह्मणाने न्याय-वैशेषिक, सांख्ययोग, मीमांसा व वेदांत यांचा समग्र विचार केला आहे. ही शास्त्रे ऋषींनी केली. यात चूक निघाली, तर ऋषी चुकले, असे सिद्ध होते. पण सामान्य माणूस त्याबद्दल निष्काळजी असतो. पढिक हिंदूंना त्यांची तत्त्वे सयुक्तिक वाटतात. निःपक्षपातीपणाने ते शोध घेत नाहीत. शास्त्रकर्ते विचक्षण व बुद्धिमान खरे, पण त्यांच्याही काही चुक्या आहेत. त्यांचे अनुयायी मात्र अंधविश्वासी आहेत. हातापायांची बोटे मोजून दाखविली, तरी ते ऋषिवाक्यावरूनच निर्णय करतील. बुद्धिवादाने त्यांची खात्री पटत नसते. स्थिर चित्ताने ते विचार करीत नसतात. पक्षपाती विचार करतात. पोकळ प्रमाणे खरी मानतात. स्वाभाविक विवेकाची बुद्धी त्यांच्याजवळ नाहीच. खरेखोटे, हिताहित ते पाहात नाहीत. आपल्या आवडत्या मतांचे समर्थन करण्याकरिता हे पढतमूर्ख अविचारात व भ्रांतीत पडून गोंधळतात. सोबत्याचे पागोटे डोक्यावर घातले की, आपणच 'तो सोबती' आहोत, असे त्यांना वाटते.

२०५८ अ (इंग : ३२१–३२३)

२०५९ (२१ : २१, १ नोव्हेंबर ६२, ३२७–३२८)

कराचीहून रे. शेल्डन लिहितात की : मेरवानजी पारशी तरुणाने बाप्तिस्मा घेतला, पण त्याच्या आईबापांनी काही भूलथापा देऊन त्याला घरी नेले. घरात त्याला नवा धर्म पाळणे अशक्य केले. शेवटी तो घर सोडून आला. घरी शांततेत राहणे त्यास कठीण वाटले. त्याला पुन्हा पारशी धर्मात घेण्याचा प्रयत्न झाला. किंबहुना त्याने ख्रिस्ती धर्माच्या त्याग केला, अशाही अफवा उठविल्या गेल्या. म्हणून मूर्तिपूजक ख्रिस्ती लोकांचा धिक्कार करू लागले, पण मेरवानजी आता चर्चमध्ये असून तो फार आनंदात आहे. नव्याने ख्रिस्ती झाल्यावर जिवालादेखील धोका असतो, हेच या प्रसंगाने सिद्ध झाले. हा तरुण सुमार्गात टिकून राहावा, म्हणून सर्व प्रार्थना करीत आहेत.

२०६० (२१ : २१, १ नोव्हेंबर ६२, ३२८–३३२)

रा. कृष्णशास्त्री चिपळोनकर यांनी संवादरूपाने 'दाणेवाल्यांवर सरकारने सक्ती करावी काय ? ' हे सुरस पुस्तक लिहिले. सध्या लोक म्हणतात की : सरकारने दाणेवाल्यांवर सक्ती करून धान्याचे भाव कमी केले पाहिजेत. पण सरकार वेगळ्या धर्माचे असल्यामुळे तसे करीत नाही. शिवाय सरकारच्या जातीच्या लोकांना भरपूर पगार आहेत. पण लेखक म्हणतात की : यात सरकारचा दोष नाही. दाणे महाग करणे, ही गोष्ट व्यापाऱ्यांच्याही हातात नाही. सवंग किंवा महाग वस्तू मिळणे पावसावर अवलंबून आहे. ते काही मुद्दाम महाग विकीत नाहीत. पावसाने ताण दिला की, व्यापारी धान्य कोठीत ठेवतात. पण त्यातही पुरवठा टिकवून धरण्याचाच हेतू असतो. थोडा पाऊस पडला, तर ते धान्य विक्रीसाठी बाहेर काढतात. कारण धान्य कुजून जाण्यात त्यांचाही तोटाच आहे. पूर्वी आलेला तोटा भरून काढण्याइतपत नफा मिळविला नाही, तर त्यांचाही धंदा चालणार नाही. खोटच खावी लागेल. सरकारने त्यांच्यावर सक्ती केली, तर त्यात प्रजेचादेखील तोटाच आहे. जबरीचा मार्ग अन्यायाचा ठरेल. अशावेळी श्रीमंतांनीच गरिबांची खरी कीव धरून निधी गोळा करावा, व सर्वांना धान्य पुरवावे. असा त्याग संतोषाने करावा. या पुस्तकाची छपाई टैपावर असल्यामुळे फार सुंदर झाली आहे. पूर्वी 'जनमित्रा'ने लिहिले की, जे येशूस सोडतात, ते शिक्षापात्र ठरतात. येशूस देव मानणाऱ्या सर्वांना असेच वाटते. म्हणून दुष्काळातही देवावरचा विश्वास कायम ठेवावा.

२०६१ (२१ : २१, १ नोव्हेंबर ६२, ३३२–३३५)

ज्ञातिभेदावरील निबंधात रे. रामकृष्ण लिहितात की : हिंदू असे मानतात की, उंच जातीने नीचास स्पर्श करू नये. पण विटाळ ही गोष्ट स्वयंभू नसते. आपण पृथ्वीवर राहातो. मग एकमेकांच्या स्पर्शाने, वाऱ्याने तो विटाळ आपल्यापर्यंत येतोच. त्यातून कोणी अलिप्त राहू शकत नाही. दुसऱ्याच्या हातून पाणी दुरून जरी घेतले, तरी सलग दोरीप्रमाणे पाण्याचे कण आपणापर्यंत येतात. स्नान केल्यामुळे कातडीच फक्त धुतली जाते. दुरून पाणी ओतले, तरी विटाळाच्या भावनेतून आपण सुटत नाही. प्रत्येक जातीस एक हौद दिल्हा, तरी हवेतील स्पर्शाने विटाळ होतोच. यांना ओले तांदूळ चालत नाहीत, पण फळे मात्र चालतात. वास्तविक फळे विकणाराच्या घरात राहतात, मुलेबाळे त्यांस शिवतात, शूद्र नोकर ती दुकानातून आणतो. विकणाऱ्याच्या घरी मांस शिजले, तर हवेतून त्याचा वास फळांवर येतोच येतो. मग गुंजभर जरी विटाळ झाला, तरी तो विटाळच आहे. हवेच्या योगाने विटाळ होतच असतो. तेव्हा असले स्पर्शास्पर्शाचे नियम मानव कधीच पाळू शकणार नाही व दयाळू परमेश्वर असले विटाळाचे नियम करणारच नाही. म्हणून जातिभेद पाळणे, हा मोठाच अधर्म आहे. ईश्वरी आज्ञा मोडली, हे पाप त्यात सामावलेले आहे.

२०६२ (२१ : २१, १ नोव्हेंबर ६२, ३३५–३३६)

अमेरिकन सैन्याने काही बंडखोरांना पळवून लावले.

२०६३ (२१ : २१, १ नोव्हेंबर ६२, ३३५–३३६)

कापसाच्या कमताईने युरोपातील अनेक देशांचे कापडाचे कारखाने बंद पडत आहेत. राणीने मजुरांसाठी २० हजार रुपये दिल्हे.

२०६४ (२१ : २१, १ नोव्हेंबर ६२, ३३५–३३६)

डाक्तर भाऊ दाजींना कापसाच्या व्यापारात एक लक्षाचा नफा झाला.

२०६५ (२१ : २१, १ नोव्हेंबर ६२, ३३५–३३६)

मद्रासेत एका वैष्णवाने बढाई मारली की, समुद्र मागे हटवून मी रोज पूर्णचंद्र आकाशात उगवीन. काय हा मूर्खपणा!!

२०६६ (२१ : २१, १ नोव्हेंबर ६२, ३३५–३३६)

श्वानदंशाप्रमाणेच मुंगसाचे चावणेही जलभीती किंवा हायड्रोफोबिया रोगास कारण होते. तंजावरकडे मौनोरगुंडीचा एक माणूस या रोगाने नुकताच मरण पावला. त्याला मुंगूस चावले, तेव्हा त्याने या घायावर वैद्याचे औषध लावले. घाय बरा झाला. पण एक महिन्याने तेथे रक्त जमू लागले. त्याचा घसा सुजला. तहान लागून पोटात दरद होत असे. नाडी बराबर चालत नसे. तो मनस्वी बरळत असे. अन्न पचेना. शेवटी ताप चढून तो मेला.

मुंबई, एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

**२०६७** (२१ : २२, १५ नोव्हेंबर ६२, ३४०–३४६)

अमेरिकन मराठी मिशनाच्या वार्षिक सभेस गतवर्षीपेक्षा जास्त लोक आले होते. रे. बोएन व मेकिन्ली हेही आले होते. एकूण उपस्थिती ४५० वर गेली होती. मुले व पालक यांची परीक्षा घेण्यात आली. नवा वर्ग सुरू करण्याचे ठरले. रे. बालंतैन व बिसेल यांना सुवर्णमुद्रिका देण्यात आल्या. धर्मसंजीवनावर उपदेशकांची व्याख्याने झाली. पवित्रशास्त्राच्या प्रसाराची माहिती देऊन खिस्ती लोकांचा पाठलाग कसा होतो, याचे वक्त्यांनी वर्णन केले. नेटिव लोक उत्सुकतेने शास्त्र ऐकतात, याबद्दल समाधान प्रगट करण्यात आले. नास्तिकांचे मतखंडन करण्यात मिशनरी यशस्वी होत आहेत. लोकांनी आपले अनुभव, भावना आणि स्वप्न यांचे वर्णन केले. अनेकांनी अर्पणे दिल्ही. कीर्तनाच्या पद्धतीने सत्यधर्माचा प्रसार करावा, यावर सर्वांचे एकमत झाले. येथेही कीर्तन झाले. कृष्णा रत्नूजींनी पदे गायिली. प्रभुभोजनाचाही कार्यक्रम झाला. चौघा खिस्ती लोकांना उपदेशक म्हणून नव्याने सनदा देण्यात आल्या. शेवटी ईश्वराने आपले अपराध पोटात घालावेत, म्हणून प्रार्थनागीत गाण्यात आले.

**२०६७अ** (इंम : ३३७–३४०)

**२०६८** (२१ : २२, १५ नोव्हेंबर ६२, ३४७–३४८)

लंका मिशनाचा १८६१ चा रिपोट आला. तेथील उपदेशक फार मेहनती व हुशार आहेत. मडमाही उपदेशकांचे काम करतात. ४५३ मनुष्ये प्रभुभोजन घेतात. २१०८ पुस्तके वाटण्यात आली. ४६८ लेकरांनी बाप्तिस्मा घेतला. या मंडळीच्या ३१ शाळांतून ५६ शिक्षक व ११९८ विद्यार्थी आहेत. धर्मकार्याकरिता पूर्वीच्या तिप्पट पैसा यंदा गोळा झाला. विश्रामवारी आणि इतर दिवशीही मडमा उपदेश करतात. 'मार्निंग स्तार' या पत्राकडूनही बराच लाभ झाला. नेटिवांची मने प्रकाशित झाली. नेटिवांनी शाळेस मदत केली, तर ते लाभदायकच ठरणार आहे. हे काम परमेश्वराने शीघ्रगतीने चालवावे, म्हणून प्रार्थना करतो.

**२०६८ अ** (इंम : ३४६–३४७)

**२०६९** (२१ : २२, १५ नोव्हेंबर ६२, ३४८–३५१)

'भोळा जनमित्र' लिहितो की : मागील पत्रात त्याने टीका केली होती की, नेटिवांनी येशूकडे जाण्याचे नाकारल्यामुळे दुष्काळ, मरी व तरवार ही शिक्षा होत आहे. यावर ज्ञानप्रकाशकर्त्याने विचारले की, ख्रिस्ती देशात दुष्काळ पडत नाही काय ? असले भोळवट लोक काय ख्रिस्ती धर्माचा प्रसार करणार ? त्यास उत्तर देताना 'भोळा' म्हणतो की, माझे विधान सगळ्याच देशातील मूर्तिपूजकाबद्दल होते. येशू ही द्राक्षवेल आहे व फळ न देणाऱ्या फाट्यास तो नष्ट करतो. ईश्वर अभक्त व भक्त या दोघांसही दुःख लावितो. पण भक्तांना सुखात व अभक्तांना नरकात टाकितो ! भक्तांना अविनाशी सुख मिळते, पण अभक्त व नास्तिक मात्र ही जगरहाटी समजून गर्वाने फुगलेलेच राहातात. त्यांनी पश्चात्ताप व नम्रता जर ठेवली नाहीत, तर नरक चुकणार नाही. मन व आचरण शुद्ध ठेविली पाहिजे. ईश्वराचा धिक्कार केला तर तो रागावतो. कोणताही ईश्वरवादी माणूस हे मान्य करीलच. धर्माचा प्रसारदेखील मानवाच्या हाती नसून ईश्वराच्या हाती असतो. जे स्वेच्छाचाराने वागतात, ते या पृथ्वीवरून लोप पावतील. ज्ञानी व तर्कवान यांपासून लपवलेल्या गोष्टी ईश्वर आपल्या लेकरांना देत असतो.

**२०७०** (२१ : २२, १५ नोव्हेंबर ६२, ३५१–३५२)

राणीच्या ज्येष्ठ पुत्राचे लग्न देन्मार्कच्या राजकन्येशी होणार.

**२०७१** (२१ : २२, १५ नोव्हेंबर ६२, ३५१–३५२)

कराचीकडे मोठी टोळधाड आली होती. या जिवंत ढगांची रुंदी तीन कोस होती. त्यांनी शेतीचा फार विध्वंस केला. काही टोळ मुंबईतही दिसले. घारी–गिधाडांनी त्यांस खाऊन टाकले. ईश्वरच जणू ही शिक्षा देत असावा.

**२०७२** (२१ : २२, १५ नोव्हेंबर ६२, ३५१–३५२)

हिंदुस्थानातील मिशनांना नवीन दहा व जुन्या चार अशा चौदा मिशनऱ्यांची कुमक मिळणार आहे.

**२०७३** (२१ : २२, १५ नोव्हेंबर ६२, ३५१–३५२)

लिवरपूल येथे कापसाची किंमत गतवर्षीच्या तिप्पट झाली.

**२०७४** (२१ : २२, १५ नोव्हेंबर ६२, ३५१–३५२)

होळकरसरकारही कापसाची लागवड करणार आहे.

**२०७५** (२१ : २२, १५ नोव्हेंबर ६२, ३५१–३५२)

काशीच्या आसपास वानरांनी मनस्वी धुमाकूळ घातला आहे. या रामदूतांना मारावे, म्हणून लोकांनी माजिस्त्रेताकडे अर्ज दिले आहेत.

मुंबई, एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

**२०७६** (२१ : २३, १ डिसेंबर ६२, ३५४–३५५)

श्री. सी. एन्. आपल्या पत्रात म्हणतात की : मिशनच्या वार्षिक सभेमध्ये यंदा कीर्तन हा नवाच प्रकार ऐकण्यास मिळाला. थोरल्या भजनालयात इतके लोक जमले की, त्यांस जागादेखील पुरेना. हिंदूंमध्ये गोसावी, हरिदास, यांची कीर्तने होतात. ती ऐकण्यास मनस्वी गर्दी होते. रात्ररात्र लोक कीर्तन ऐकतात. गायनाने व नाटकी चातुर्याने ते चकित होतात. श्रोतेही प्रेमभरित होऊन रडतात किंवा हर्षाचा ध्वनी करतात. ख्रिस्ती कीर्तन येशूबद्दल होते. कृष्णराव या तरुण भावाने अनुसंधानाची चतुर रचना करून सुंदर कविता केली होती. हातात वीणा घेऊन ते गात होते व त्यांच्यामागे चार साथीदार ध्रुपद म्हणत असत. दीड तास लोक तल्लीन होऊन गेले. जणू ते सौख्यप्रदेशात बावरत होते. गायनाचा व वाद्यांचा बेतबात चांगला उतरला. कल्पित देवाचे गुण सांगण्यापेक्षा खऱ्या प्रभूचे गुणगायन होऊ लागले, ही आनंदाची गोष्ट आहे.

**२०७६ अ** (इंम : ३५३–३५४)

**२०७७** (२१ : २३, १ दिसेंबर ६२, ३५६–३५९)

काशीच्या एका सभेत पंडीत बापूदेवशास्त्री यांनी व्याख्यान दिल्हे. ब्राह्मणांच्या ज्योतिषावरील विश्वास उडून जाऊन युरोपीय सिद्धांताबद्दल उत्सुकता निर्माण व्हावी, असा त्यांचा प्रयत्न आहे. ज्योतिष हे मनोरंजक नाही, तर ते उपयोगी शास्त्र आहे. ज्योतिषशास्त्राने नौकाविद्येस प्रोत्साहन मिळाले. माणसाची संकोचित मनोवृत्ती कमी झाली. हिंदू व पाश्चिमात्य ज्योतिषांत जमीन आसमानाचे अंतर आहे. त्यांच्या गणिताचा पायाही जुनाट, उलटा आहे. पृथ्वी स्वतःभोवती फिरून सूर्यास प्रदक्षिणा घालते, अचल तारे पृथ्वीपासून फार दूर आहेत, सर्व ग्रहांची गती सारखी नाही, ते दीर्घवर्तुळाकार फिरतात, असे युरोपियन ज्योतिषाने प्रयोगांनी सिद्ध केले. त्यांचे अवलोकन व गणित जास्त सूक्ष्म आहे. सायनमान जास्त बरोबर आहे. सयुक्तिक विद्या एखाद्या नीच कुळामधील माणसाने जरी सांगितली, तरी ती ग्रहण करावी. अप्रमाण गोष्ट खुद ब्रह्मदेवाने सांगितली, तरी ऐकू नये.

**२०७७ अ** (इंम : ३५५–३५६)

**२०७८** (२१ : २३, १ दिसेंबर ६२, ३६०–३६१)

वर्षारंभी प्रार्थनेचा आठवडा कसा पाळावा, हे स्पष्ट करण्यासाठी इवांजेलिकल अलायन्स मंडळीने पाचारणपत्र प्रसिद्ध केले आहे. जगावर आशीर्वाद मागण्यासाठी हा आठवडा पाळावा. अखंड प्रार्थना व उपकारस्तुती करावीत. ईश्वराच्या भक्तांनी पवित्र तेजात व आत्मिक बुद्धीत वाढावे, म्हणून प्रयत्न करावेत. मूर्तिपूजकांमध्ये शुभवर्तमानाचे घोषण करावे. प्रापंचिक आशीर्वाद व आत्मिक लाभ मिळाले, म्हणून ईश्वराची स्तुती करावी. जे जे कृपेच्या सिंहासनापुढे येतील, त्यांना आशीर्वाद मिळावा, यासाठी प्रार्थना करावी.

**२०७८ अ** (इंम : ३५९–३६०)

**२०७९** (२१ : २३, १ दिसेंबर ६२, ३६२)

बंगालचे जज्ज बाबू रासयामा दत्त यांच्या पुत्रांनी आपापल्या पत्न्यांसह बाप्तिस्मा घेतला. या शतकाच्या सुरुवातीस श्रीरामपुरात डाक्तर केरी यांनी एका बंगाल्यास दीक्षा दिल्ही. तेव्हापासून ही परंपरा अखंड चालू आहे. ख्रिस्ती धर्माची वृद्धी हळूहळू पण निश्चित होते आहे. त्यास विरोधही जबरदस्त होत होता. पण ख्रिस्ताच्या शुभवर्तमानाने हा विरोध हाणून पाडला.

**२०७९ अ** (इंग : ३६१–३६२)

**२०८०** (२१ : २३, १ दिसेंबर ६२, ३६२–३६३)

'लोककल्याणेच्छू' कळवितो की, हिंदू जोशांनी भविष्य वर्तवले होते की, २० आक्तोबरपासून ३ ते ५ दिवस मुसळधार पाऊस पडेल. भोळे लोक अगदी भयभीत होऊन गेले. एवढा पाऊस पडला, तर पृथ्वीवर बेसुमार पाणी साचून सर्वच लोक बुडून मरतील, असे त्या भावड्या लोकांना वाटले. प्रत्येक जण चिंतेत पडला. ख्रिस्ती शास्त्र असे सांगते की, नोहाच्या काळात पृथ्वीवरचे पाप धुऊन काढण्यासाठी ईश्वराने ४० दिवस व ४० रात्री पाऊस पाडला. पण ईश्वरभक्त नोहा याला व त्याच्या कुटुंबाला एका तारवात बसवून रक्षिले. भूमी कोरडी होण्यास एक वर्ष लागले. ईश्वराने नोहाला आश्वासन दिल्हे की, पुन्हा जलप्रलय होणार नाही. या आशीर्वादाची निशाणी म्हणून त्याने ढगामध्ये धनुष्य ठेविले. भट्ट वगैरे अनर्थाचे भविष्य सांगतात, ते मात्र खोटे आहे. ईश्वर स्वतः असले भविष्य कळवितो, म्हणून ठकबाजीवर व भुलथापीवर विश्वासू नये.

**२०८१** (२१ : २३, १ दिसेंबर ६२, ३६३–३६५)

इंग्लंडमध्ये एक मोठे गृह बांधून हे संग्रहालय तयार केले आहे. हस्तिदंती पेट्या, कोच, काशिदाकाम, विलक्षण भांडी, लापलंद व आफ्रिकन लोकांची राहाणी, यांची तेथे माहिती मिळते. आमच्या लोकांना अजून ज्ञानामृताची गोडी नाही. हे ज्ञानहीन पशू नुसतेच उपभोगात मग्न आहेत. १८५१ मध्ये पहिले संग्रहालय सुरू झाले, तेव्हा हजारो लोकांनी तेथे गर्दी केली. एकेका दिवशी लाख प्रेक्षक ते पाहून गेले. संग्रहालयाचे एका दिवसाचे उत्पन्न बँकेत नेण्यास दोन खटारे लागले. ऐरलंद, जर्मनी, फ्रान्स व फ्लारेन्स, यांनीही असे समारंभ केले. इंग्लंदमधील हे तिसरे संग्रहालय आहे. यातून हस्तकौशल्यास उत्तेजन मिळते. सुधारणूक वाढती, व्यापार वाढतो. आमच्या पूर्वजांना वाटे की, भरखंडाखेरीज सारे शून्याकार आहे. आपलाच धर्म खरा, बाकीचा मिथ्या !! आमच्या राजेलोकांनी एक तरी संग्रहालय काढावे.

**२०८२** (२१ : २३, १ दिसेंबर ६२, ३६३–३६५)

फ्रेंच सरकारने हुकूम काढला आहे की : पक्ष्यांच्या अंडी घालण्याच्या हंगामात द्वाड पोरे ती अंडी काढून नेतात. तरी त्यास प्रतिबंध करावा. कारण शेतातील टोळांस व कीटकांना मारण्यास पक्षी फार उपयुक्त आहेत. युरोपियन व अमेरिकन शेतकरीसुद्धा पक्ष्यांना शेतात फिरू देतात. कारण पक्ष्यांच्या योगे शेताचा खरावा करणारे किडे नष्ट होतात. आपल्या देशात मात्र पक्ष्यांना उपद्रवकारी समजून गोफणीच्या धोंड्याने उडवून लावले जाते. सगळेच पक्षी काही उपद्रवकारक नाहीत. थोडके दाणे त्यांनी खाल्ले, तरी किडे हे मोठ्या प्रमाणावर त्यांचे अन्न आहे. किडे मारण्याची मजुरी म्हणून त्यांना धान्य खाऊ द्यावे ! ते पिकाचे संरक्षकच आहेत. त्यांसच 'खरे राखणदार' असे मानले पाहिजे. पक्ष्यांचे नीट निरीक्षण करून खरोखर धान्य नष्ट करणाऱ्यांना मात्र पळवून लावावे. सर्वांवर गोफण चालवून एका शत्रूसाठी दहा मित्रांवर मोरचा लावू नये.

**२०८३** (२१ : २३, १ डिसेंबर ६२, ३६६–३६८)

सातारकर ब्राह्मणांनी असा नियम केला की, नाटक पाहणारास अपांक्त करावे. हा फार चांगला नेम झाला. नगरच्या नाटकमंडळीत ही बातमी कळल्यावर सर्वांची तोंडे उतरली. लहानपणी मुलींची लग्ने करू नयेत, असेही त्यांनी ठरविले आहे. मुलीचे वय किमान ८ असावे. मुलाचे वय निदान १६ असावे. असा सातार्‍यात ठराव झाला.

**२०८४** (२१ : २३, १ डिसेंबर ६२, ३६६–३६८)

कलकत्त्याच्या एका साहेबाने असी युक्ती काढली की : वाफेच्या यंत्रातून वाया जाणार्‍या वाफेचा उपयोग व्हावा. त्याने कोळशाचा खर्च दहा टक्क्यावर येईल.

**२०८५** (२१ : २३, १ डिसेंबर ६२, ३६६–३६८)

अमेरिकेत वस्त्रे पिळण्याचे यंत्र निघाले आहे. बायकांसही ते चालविता येते. किंमत १० ते २० रुपये एवढीच आहे.

**२०८६** (२१ : २३, १ डिसेंबर ६२, ३६६–३६८)

बंगालमध्ये एका मुसलमानाच्या कबरेतून आवाज येत असे. परंतु मयताच्या बायकोने कबरेस स्पर्श करताच आवाज बंद झाला.

**२०८७** (२१ : २३, १ डिसेंबर ६२, ३६६–३६८)

महाराज लैबेल खटल्यातील जदुनाथमहाराजांनी रेसिडेंताच्या बंगल्यानजिकच देऊळ बांधण्यास परवानगी मिळविली. परंतु निजामाच्या दिवाणाने त्यांना प्रतिबंध केला. महाराजमजकूर पुन्हा मुंबईत येणार, असे ऐकू येते. लोकांनी सावध व्हावे.

२०८८ (२१ : २३, १ दिसेंबर ६२, ३६६–३६८)

मोगलाईच्या सरहद्दीवर फिरणाऱ्या चपात्या कोणीतरी नवस फेडण्याकरिताच फिरवीत आहे. चपात्यांबरोबर एक चिठ्ठी असते की : 'चपात्या पोहोचल्याच अशा चार चपात्या पुढील गावी रवाना करा, नाहीतर मोठे संकट तुम्हांस प्राप्त होईल. काशीचे चार स्वार मागून येत आहेत.'

२०८९ (२१ : २३, १ दिसेंबर ६२, ३६७–३६८)

नानासाहेबाचा भाऊ मानला गेलेला माधवराव ऊर्फ रावसाहेब यास अटक झाली. तो गोसाव्याचा वेष घेऊन मोगलाईलगतच्या सरहद्दीवर आला होता. त्याचे काही दुष्ट दूतही त्याच्याबरोबर होते. काळ्या पलटणीत आपले कामदार पाठवून तो गुपचूप फितुरीचे काम चालवीत होता. कप्तान नटालसाहेबांनी त्यास शिताफीने पकडून फितुरीबद्दलचे कागदपत्रही पकडले. सोलापुरात त्यास बंदोबस्ताने ठेवलेले असून अधिकारी पुढील हुकुमाची वाट पहात आहेत. बहुधा त्यास फाशी होईल. ज्याने पकडून दिल्हे, त्यास जहागीर मिळणार आहे.

२०९० (२१ : २३, १ दिसेंबर ६२, ३६७–३६८)

पंढरपूरच्या कार्तिकी वारीत यंदा पटकीचा फार उपद्रव झाला. म्हणून सरकारने ठराव केला की, एक नेटिव डाक्तर वारीच्या वेळी तेथे पाठवावा.

२०९१ (२१ : २३, १ दिसेंबर ६२, ३६८)
सरकारच्या ठरावाप्रमाणे वर्तमानपत्राचे टपालहशील आता आगाऊ द्यावे लागते. तरी बाहेरगावच्या वर्गणीदारांनी एका वर्षाचा दीड रुपया एक जानेवारीपर्यंत पाठवून द्यावा. एत्तद्देशीय वर्गणीदारांनी वर्षाचे तीन रुपये पाठवावेत. ज्यान्युआरीअखेर पैसे आले नाहीत, तर त्यांचा अंक बंद केला जाईल.

२०९१ अ (इंग : ३६८)

मुंबई एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

## ज्ञानोदय, पुस्तक २१, अंक २४, मुंबई, १५ दिसेंबर १८६२

२०९२ (२१ : २४, १५ दिसेंबर ६२, ३७०–३७४)
कान्स्तान्तिनोपल एथे एक मुसलमान ख्रिस्ती झाला होता. त्याचे बायकोशी काही भांडण झाल्यामुळे त्याने लेकरास मारले. तेव्हा त्याची पत्नी माहेरी निघून गेली. आखमत असे त्याचे नांव होते. त्याने मिशनाकडे तक्रार नोंदवली. तेवढ्यात बायकोचा निरोप आला की : 'तुम्ही पुन्हा मुसलमानी धर्म स्वीकारीत असाल, तरच मी परत येईन. नाहीपेक्षा तुम्ही १६०० रुपये पाठवून तलाख द्यावा.' मग शिपायांनी आखमतला पकडून कैदेत ठेवले. त्यास कोणी जामीनही देईना. मोठ्या मिनतवारीने ख्रिस्ती लोकांनी एका मुसलमानाकडून जामीन देवविला. शेख उल इस्लाम यांच्यासमोर सुनावणी झाली. त्यात तिच्या नातलगांनी वरील गोष्टीस अनुमोदन दिल्यामुळे आखमत कैदेतच राहिला. त्याजवर १६०० रुपये दंड बसला. पुढे त्याची बायको बुंधी घालून मिशनेऱ्यास भेटली आणि तिने हे सर्व कुभांड असल्याबद्दल सांगितले. नातलगांनीच तिला फितवून माहेरी नेले होते. मग तिला न्यायाधीशासमोर नेऊन तिचा जबाब नोंदवला व खटला काढून टाकला. कोर्टामध्ये फार गर्दी झाली होती. सगळ्यांच्या समोर आखमतने आपले ख्रिस्तीपण जाहीर केले व पत्नीसह तो घरी गेला.

**२०९२ अ** (इंम : ३६९–३७०)

**२०९३** (२१ : २४, १५ दिसेंबर ६२, ३७५)

मद्रासेचे गवर्णर विल्यम देविदसनसाहेब एकदा तिनेवल्ली एथे गेले होते. त्यांना सभेत मानपत्र देण्यात आले. साहेबमजकुरांनी मिशनच्या शाळांना भेट दिली. १८६१ मध्ये ५०,३'२८ लोक उपदेश ऐकत असत. ३१,९७७ जणांनी बाप्तिस्मा घेतला. शाळेत १२,८८८ विद्यार्थी आहेत. त्यात ४,०९६ मुलीही आहेत. तिनवेली मिशनात ८३६ उपदेशक आहेत. गतवर्षी १६,६४१ रुपयांची मदत मिळाली. मिशनऱ्यांनी ग्वाही दिली की, ख्रिस्ती लोक प्रजेचे सर्व धर्म पाळतात. सरसाहेब म्हणाले की, सरकार लोकांना ख्रिस्ती धरण्याच्या कामात मदत करणार नाही. पण तुमच्या प्रयत्नांचे सरकारास मोठे अगत्य वाटते. आम्ही तुम्हांस आनंदाने मदत करू. (फ्रेंद ऑफ इंडियावरून)

**२०९३ अ** (इंम : ३७४–३७५)

**२०९४** (२१ : २४, १५ दिसेंबर ६२, ३७६)

पुणे पाठशाळेच्या गुरू हागसाहेबांनी ग्रीक तत्त्वज्ञानावर व्याख्यान दिल्हे. पैथागोरस या ज्ञानी साधूने 'फ्री मेसनरी' नावाचा पंथ स्थापन केला. त्यात स्त्रियांनाही प्रवेश होता. या पंथाचे काम गुप्तपणे चालत असे. कित्येक गोष्टी तो अंकसंज्ञेने दाखवीत असे. ऐतरेय ब्राह्मणातही ब्राह्मणास २७, गुरास ५, शूद्रास २१, अशा संज्ञा होत्या. परमिनेदीस याची मते तर उपनिषद व वेद यांसारखीच होती. व्यक्ति (एंतिती) आणि अभाव (नानेंतिती) म्हणजे माया होय. ब्रह्मच खरे असून बाकी सर्व गंधर्वपुर किंवा मृगजळ होय. ब्रह्म मात्र सर्वव्यापी तत्त्व आहे. (फ्रेंद आफ इंदियावरून)

२०९८ (२१ : २४, १५ डिसेंबर ६२, ३७६–३७८)

रा. नारायण विष्णु जोग यांनी मुलींचा खेळ हे ४० पृष्ठांचे पुस्तक रचले. ते सुंदरशा टशांनी छापले. मुलांनी अभ्यासाइतकेच खेळाकडे महत्त्व द्यावे, असे त्यांचे मत आहे. खेळामुळे गरीब-श्रीमंत भेद नाहीसा होतो. आरोग्यही वाढते. पण देशी खेळांमध्ये भांडणेच जास्त होतात. चहाड्या, लबाड्या, सासुरवास, त्यांत दिसतात. लुटुपुटीच्या शिव्या जरी दिल्या, तरी मुलांना चांगले वळण लागत नाही. बाळमित्रात खेळांचा तपशील आहे. परिचयाचे खेळ या पुस्तकात दिले आहेत. कोकणी शब्दांचा भरणा फार आहे. भातुकली किंवा आंगतपंगत, कुटुंबव्यवस्था, विवाह, यांचे खेळांतून दर्शन घडते. सागरगोटे व फुगड्या यांची माहिती देताना वाईट चालींचा निषेधही करावयास हवा होता. 'ब्राह्मणी लग्नाच्या चाली'मध्ये मानपान, हुंडा, करणी, वरपक्षाची खोटी ऐट, यांचे वस्तुनिष्ठ दर्शन मिळते.

२०९८ ब (२१ : २४, १५ डिसेंबर ६२, ३७८–३८२)

यमुना व गोदा यांच्या संवादातून ब्राह्मणी लग्नाच्या चालीरीतींबद्दल माहिती दिली आहे. ब्राह्मणी लग्नातील हुंडा, जावयाला करणी, विहिणींचा मानपान, वर्षभर सारे सण करणे, अशा रूढी, तसेच राशी, गण, नाड, वगैरे पत्रिका पाहणे, इत्यादींचा उल्लेख त्यात केला आहे.

**२०९६** (२१ : २४, १५ दिसेंबर ६२, ३८२–३८३)

'एक नगरकर' लिहितो की : रा. केरू लक्ष्मण छत्रे यांनी सुरू केलेल्या व्याख्यानांचा श्रोत्यांना फार लाभ झाला. आता छत्र्यांची पुण्यास बदली झाली. मे. कोक यांच्या सूचनेवरून नगरच्या सभा सुरू झाल्या. लोकांना अनेक विषयांचे ज्ञान मिळाले. उष्णता, वीज, रसायन, पदार्थविज्ञान, यांची माहिती झाली. श्री. केरूपंत यांच्या सन्मानार्थ सभा झाली. तीत मानपत्र देण्यात आले. पण त्यांनी नम्रतेने ते नाकारले. नजराणाही कबूल केला नाही. जो पैसा जमेल, त्यामधून हुशार विद्यार्थ्यांना केरोपंत प्रैझ देण्याचे ठरले. त्यांची तजवीर सरकारी शाळेत ठेवण्याचा निश्चय झाला. निरोप घेताना सर्वांच्या डोळ्यात आसवे आली.

दिसिल्वासाहेबांनी सुरू केलेली शाळा छत्रे यांनी नावारूपास आणिली. पंतोजीचा सन्मान नगर जिल्ह्यात प्रथमच होत आहे.

**२०९७** (२१ : २४, १५ दिसेंबर ६२, ३८३–३८४)

अयोध्या प्रांतातील बलरामपूरचे राजे दिग्विजय सिंध यांनी हुसेनाबादच्या मिशन शाळेस भेट दिल्ही. शाळेच्या इमारतीसाठी ५०० रुपयांची देणगी देऊन बरोबरच्या लोकांकडूनही ५०० रुपये देवविले. यावरून राजे खिस्ती लोकांचे द्वेषक नाहीत, हे सिद्ध होते.

**२०९८** (२१ : २४, १५ दिसेंबर ६२, ३८३–३८४)

१८६१-६२ मध्ये सरकारी वैद्यखात्याचा खर्च १ कोटी १२ लक्ष रुपये झाला. पुढील वर्षी अयोध्या व रोहिलखंड येथे नवीन दवाखाने उघडण्यासाठी ३० लाखांची जादा तरतूद केली आहे.

**२०९९** (२१ : २४, १५ दिसेंबर ६२, ३८३–३८४)

बोरघाटाच्या २५ बोगद्यांपैकी १६ तयार झाले व नऊ लवकरच होतील. नंबर १४ व १५ चे पूल चांगले दुरुस्त करावेत, अशी कंपनीस सूचना करण्यात येत आहे.

२१०० (२१ : २४, १५ दिसेंबर ६२, ३८३–३८४)

ओडिसा प्रांतात रानटी लोकांच्या मुख्यांनी किंवा राजांनी काळी देवीला मनुष्यबळी अर्पिले जातात, असे समजताच अधिकाऱ्यांनी तेथे जाऊन या अघोर कृत्यास प्रतिबंध केला. अपराधी लोकांना शिक्षा होईल.

२१०१ (२१ : २३, १५ दिसेंबर ६२, ३८४)

ज्ञानोदय घेणारांस सूचना

सरकारच्या ठरावाप्रमाणे वर्तमानपत्राचे टपालहशील आता आगाऊ द्यावे लागते. तरी बाहेरगावच्या वर्गणीदारांनी एक वर्षाचा दीड रुपया एक तारखेपर्यंत पाठवून द्यावा. एत्तद्देशीय वर्गणीदारांनी वर्षाचे तीन रुपये पाठवावे. ज्यान्युएरीअखेर पैसे आले नाहीत, तर त्यांचा अंक बंद केला जाईल.

२१०१ अ (इंग : ३८४)

मुंबई, एक्सचेंज प्रेस, फोर्ट

**२१०२** (२२ : १, १ जानेवारी ६३, ४–१०)

गतवर्षाचे सिंहावलोकन करताना दिसते की : अमेरिकेत लढाई चालूच आहे. या लढाईने शेकडो दास मुक्त झाले. त्यांच्या धन्यांना नुकसानभरपाई देण्यात आली. इतके दिवस अलग राहिलेली युरोपिय राष्ट्रेही अमेरिकेस मदत करतात. व्यापाऱ्यांचा कैवार घेणे त्यांनी बंद केले. तीन लाखांची जरूर असताना ४ लाख फौज तयार झाली. लढाईत जखमी झालेल्या लोकांना संभावित स्त्रियाही मदत करतात. सैनिक खखुषीने रक्त सांडीत आहेत. अमेरिकन मिशनरी बोर्डास गतवर्षापेक्षा ३४ हजारांची जादा मदतही मिळाली. पोपच्या जुलमातून इतालियन लोकांची सुटका होते आहे. ग्रीक लोक नवा राजा निवडणार आहेत. तुर्कस्थानचा बादशहा धर्मस्वातंत्र्य देण्यास तयार झाला. परंपरागत जीर्ण झालेल्या धर्मांचा जीर्णोद्धार करण्यास तो सिद्ध आहे. आश्या खंडातही अनेक लोक मिशनाच्या कामास मनापासून मदत देतात. ख्रिस्ताच्या शुभवर्तमानासमोर खोटे धर्म लोप पावतात. आत्म्याच्या सर्वकालिक कल्याणासाठी यत्न करतात. चीनचा ताटार राजा मिशनास मदत करतो. ज्यापानात व ब्रह्मदेशातसुद्धा मिशनाचे काम समाधानकारक चालू आहे. हिंदुस्थानचे नवे गवर्णर जनरल एलगीन् चांगला कारभार चालवितात. मुंबईचे व मद्रासचे गवरणरही आमच्याबद्दल सहानुभूती बाळगतात. त्रिवेल्यनसाहेबाची समिती बहुधा प्राप्तिकर बंद करील. दुष्काळाचे संकटही टळलेले दिसते. कायदेमंडळात नेटिवांचा समावेश झाला. व्यापारी गुरूचे ढोंग उघडे झाल्यामुळे ख्रिस्ती धर्माचा प्रकाश सर्वत्र पसरत आहे.

**२१०२अ** (इंम : १–४)

**२१०३** (२२ : १, १ जानेवारी ६३, ११–१३)

एक ख्रिस्तीण लिहिते की : मी लेकरासह प्रवास करीत असता बाभुळवेळ्याच्या चावडीत मुक्काम केला. तेथे एक म्हातारा बैरागीही होता. त्याने फडणिसाच्या चाकरास सांगून तीन लोक बोलावून आणले. ढोलकीच्या व टाळ्यांच्या तालावर 'गंमतीची गाणी' सुरू केली. राधाकृष्णाचे गाणे तर ऐकवत नव्हते. अशी गाणी म्हणून स्वर्ग मिळणार आहे काय? असे विचारल्यावर ते दुरुत्तरे करू लागले. सरकारचे अंमलदारही ही गाणी ऐकतात, असे सांगू लागले. शेवटी लेकरांना गाडीमध्ये निजवून मी बाहेर बसून राहिले. जमलेल्या लोकांपैकी एकजण पाटलाचा भाऊ होता. मी त्या सर्वांना समजावून सांगितले की, अशी गाणी गाऊ नयेत. तेव्हा ते म्हणाले, 'तुम्ही आमच्या मनाच्या तोंडात मारले.' ख्रिस्ती बायांनी धैर्य धरून अशा लोकांची मने वळवावीत. दृढनिश्चय केला, तरच ही बिघडणूक बंद होईल.

**२१०३ अ** (इंम : १०–११)

**२१०४** (२२ : १, १ जानेवारी ६३, १३–१५)

रा. महादेव गोविंद शास्त्री यांनी 'वी आर सेवन' या इंग्रजी कवितेचे पद्यात्मक भाषांतर केले आहे. एक लहान मुलगी म्हणते की : आम्ही सात भावंडे आहोत. पण तिची भावंडे मृत असून चर्चच्या स्मशानभूमीत चिरनिद्रा घेत आहेत. तरी ती हट्टाने सांगते, 'आम्ही सात आहो.' कारण त्यांच्या कबरी हिरव्यागार दिसतात. त्यांच्याजवळ बसूनच ती गाणी म्हणते. शिवण्याचे काम करते. वाचक म्हणतील की, ही मुलगी नादान, अडाणी व अज्ञान आहे. पण थोडा विचार केल्यावर कळते की, मानवाचा आत्मा अमर आहे. तो देवकृपेने पवित्र झाला, तर देवाजवळ सर्वकाळ राहातो. जगाचे पाप हरण करणारा देवाचा कोकरा हाच सर्वांचा आधार आहे. हे कळले की, मृत्यूचे भय बाळगण्याचे कारण नाही. अविश्वासी राहून जे मरतात, त्यांची संख्या मात्र कमी करावी. कारण असे लोक नरकयातना भोगीत राहातात.

**२१०५** (२२ : १, १ जानेवारी ६३, १५–१६)

१८६३ चे पंचांगात महिने, वार व तारखा यांचे एक सोपे कोष्टक करून छापले आहे. महिन्यासमोरच्या सात घरात तारखा दिल्या आहेत. त्यांच्या डोक्यावर अचूक वार दिला आहे. दुसरे कोष्टक १, ८, १५, २२, २९ अशा रीतीने केले. त्यांच्या डोक्यावरचा वार पाहून दोन्हीची संगती लागेल. यंदा सूर्याची व चंद्राची प्रत्येकी २ ग्रहणे आहेत. सूर्याचे १ खंडग्रास, तर दुसरे कंकणाकृती होईल. चंद्राचे मात्र खग्रास आणि खंडग्रास अशी ग्रहणे आहेत. १८६३ पंचांग मिशनाने छापले आहे. किंमत १ आणा आहे.

**२१०६** (२२ : १, १ जानेवारी ६३, १६)

नव्या वर्षाविषयी विचार, या कवितेत कृ. र. म्हणतात की : आयुष्य वेगाने पळते आहे, तरी लवकर देवाकडे फिरा. पळ-घटिका करीत मृत्यू झपाट्याने आपणाकडे येत आहे. तारुण्य गेले की तुम्ही वृद्ध व्हाल. मग छंद फंद आणि ढंग सोडून देवाकडे कां जाऊ नये? यात्रा-स्नान-दान यांनी शरिरच स्वच्छ व पवित्र वाटते, आत्मा मळीणच राहातो. सद्गुरू ख्रिस्ताने पाप्यांसाठी प्राण दिल्हा. तारण व्हावे म्हणून त्याच्या पायावर शिर वाहा.

**२१०७** (२२ : १, १ जानेवारी ६३, १६)

१ नोव्हेंबर १८६२ रोजी इंग्लंडमधील पदार्थसंग्रहालय बंद झाले. त्यास ५ लक्ष रुपये तोटा आला. परंतु ज्ञानाचा जो लाभ झाला, त्याचे मोल सांगता येणार नाही.

**२१०८** (२२ : १, १ जानेवारी ६३, १६)

नगरात तीन मनुष्यांचा बाप्तिस्मा झाला, त्यांत एक जैन-शिंपी आहे. घोडनदीस तिघे ख्रिस्ती झाले, तर काशीत एका ब्राह्मणाने पत्नीसह बाप्तिस्मा घेतला.

मुंबई, एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

**२१०९** (२२ : २, १५ जानेवारी ६३, २०–२६)

१८६२ मध्ये कलकत्त्यांत झालेल्या बाप्तिस्म्याविषयी–

कलकत्त्यात गतवर्षी ११ मनुष्यांनी बाप्तिस्मा घेतला. रामनाफर घोस हा भरद्वानच्या मिशन शाळेत शिकला. पापाच्या निराकरणासाठी तो येशूस अनुसरला. मधूनच त्याचे मन संशययुक्त व अनिश्चयी होई. परंतु तो तारकाच्या चरणापाशी आला. नातेवाईकांच्या धमकावण्या ऐकूनही त्याचे मन बदलले नाही. पूर्णचंद्र बासू हा महानदच्या फ्री चर्चचा विद्यार्थी होतो. त्याने स्वतःहोऊन दीक्षा घेतली. आशुतोष हालदार हा मात्र नातलगांच्या भुलावणीस बळी पडून निघून गेला. कुंजबिहारी सरकार हा अत्यंत हुशार विद्यार्थी म्हातारा आजा व विधवा आई यांच्या विनवणीस न जुमानता ख्रिस्ती झाला. त्यास माजिस्त्रेताच्या कचेरीतून पळविण्याचा प्रयत्न झाला. पण त्याचा निश्चय पक्का होता. तारामनी राय, क्षिवद या स्त्रिया व नीलमणी मुकरजिया हा विद्यार्थीदेखील ख्रिस्ताच्या पायाशी आले. मिशन शाळेत त्यांनी येशूच्या पायाशी दीक्षा घेतली. क्षिवद ही एका ख्रिस्ती माणसाची बायको होती. तिला माहेरी नेण्याचे सारे प्रयत्न फसले. अतिकर्मठ कुळामधील कृष्णा गोपाळ सरकार ब्राह्मतामधील पापी आचरणास कंटाळला आणि ख्रिस्ती झाला. त्याचे मित्र त्याचे मन वळविण्याकरिता फार प्रयत्न करीत होते. पापाचा भयंकर दण्ड टाळण्याकरिता तो सन्मार्गामध्ये आला. आकाशामधले वतन त्याने फुकट मिळविले. पृथ्वीचा न्यायाधीश त्यास क्षमा करील. प्रभूच्या द्राक्षमळ्यात काम करावे, म्हणून हे सर्व शास्त्र वाचतात.

**२१०९ अ** (इंम : १७–२०)

२११० (२२ : २, १५ जानेवारी ६३, २८–३२)

श्रीमती मनमोहिनीदेवी यांनी 'परिदर्शक' या बंगाली पत्रात जाहीर पत्र लिहिले की, कलकत्त्याच्या संभावित हिंदू घरात स्त्रियांना शिक्षणाची गोडी लागली. मनमोहिनीस तिच्या बापाने इसापनीती वाचण्यास शिकविले. नवऱ्याने पदार्थविज्ञान वाचण्यास दिल्हे. तिचे वाचन चुलतसासूला आवडले नाही. संस्कृत वाचले, तर स्त्री विधवा होत्ये, असे म्हणून ती वाचणे बंद करण्याच्या विचारात आहे. शेजाऱ्याच्या मुलाजवळून पुस्तके घेऊन वाचन करते. 'अविद्येची मोगरी' हे लहानु पुस्तकही तिने रचले व ते प्रकाशनास देण्याची तिची तयारी आहे. संपादक म्हणतात, अशी पत्रे वाचून आम्हांस सानंदाश्चर्य वाटते. मनमोहिनीदेवीच्या नवऱ्याची फार तारीफ केली पाहिजे. हे उदाहरण पाहून नेटिव मित्रांनी आपल्या पत्नीस व बहिणीस वाचणे शिकवावे. विद्यादानाचे पुण्य घ्यावे. त्या लिहू वाचू आणि ग्रंथ करू लागततोवर विश्रांती घेऊ नये.

२११०अ (इंम : २६–२७)

२१११ (२२ : २, १५ जानेवारी ६३, २८–३२)

पटियाल्याचा राजा मृत्यू पावला. बंडकाळात त्याने इंग्रजांची बाजू घेतली. सरकारने त्यास जीनतमहाल बक्षिस दिल्हा. राज्यातील विधवा स्त्रियांवरील बंधने त्याने कमी केली होती.

२११२ (२२ : २, १५ ज्यानुएरी ६३, २८–३२)

दिल्लीचा राजा बहादुरशाह रंगून येथे कैदेत मृत्यू पावला.

२११३ (२२ : २, १५ जानेवारी ६३, २८–३२)

मानसनसाहेबास ठार मारणाऱ्या विष्णु कुलकर्णी या बंडखोरास सरकारने फाशीची शिक्षा सुनावली.

२११४ (२२ : २, १५ जानेवारी ६३, २८–३२)
कर्नल बालमेन व विकाजी पारशी यांनी निवडुंग नाहीसा करणाऱ्या किड्यांचा शोध लावला आहे. कानागिरी गावातले निवडुंग त्यांनी हे कीटक सोडून नष्ट केले.

२११५ (२२ : २, १५ जानेवारी ६३, २८–३२)
प्रेसिडेंत लिंकन यांनी अमेरिकेतील सर्व दास मुक्त झाले, असा जाहीरनामा काढल्यामुळे बंडवाले चेकाळले. उत्तरेकडील सहा लक्षांची सेना तिकडे गेली आहे. बंडवाल्याचे बळ फारच कमी आहे.

२११६ (२२ : २, १५ जानेवारी ६३, २८–३२)
ग्रीसमधील राजास व राणीस लोकांनी पदच्युत केले. विक्तोऱ्या राणीचा पुत्र आलफ्रेद यास ग्रीसमधील राजपद मिळण्याचा संभव आहे.

२११७ (२२ : २, १५ जानेवारी ६३, २८–३२)
गारिबाल्दीच्या पायातील गोळी अद्याप निघालेली नाही.

२११८ (२२ : २, १५ जानेवारी ६३, २८–३२)
जापानची राजधानीची – यद्दोची लोकवस्ती १५ लाख ५४ हजार आहे. ओकावा नदीने या शहराचे दोन भाग झाले आहेत. जद्दोमध्ये २ लक्ष उपाध्ये आहेत. तेथे गोवराची साथ चालू असून ५६ दिवसांमध्ये ७३,१९८ लोक मेले. सरकारी गोदी दुसरीकडे नेणार आहेत.

२११९ (२२ : २, १५ जानेवारी ६३, २८–३२)
मद्रास शहराची लोकसंख्या ७ लक्ष आहे. (वृत्तवैभववरून)

२१२० (२२ : २, १५ जानेवारी ६३, २८-३२)

डा. भाऊ दाजी, अर्दसर फ्रामजी व सेठ करशेटजी सनरवानजी आपला देश पाहण्यासाठी निघाले आहेत. त्यांच्या हिंडण्याने काही शोध लागेल. नवा इतिहासच होईल. डॉ. भाऊ दाजी तर विद्वानांचा किताच होणार आहे. कोणतेही चांगले काम असेल की ते पुढारी होतात. (इंदुप्रकाशवरून)

२१२१ (शून्य नोंद)

२१२२ (२२ : २, १५ जानेवारी ६३, २८-३२)

चौपाटीच्या व गिरगांवच्या नागरिकांनी विहाडचे पाणी आपल्या भागास मिळावे, म्हणून कमिशनराकडे अर्ज केला आहे. (इंदुप्रकाशवरून)

२१२३ (२२ : २, १५ जानेवारी ६३, २८-३२)

आस्त्रियामधील कारखानदारांनी मकाची पाने, ताटे व कणसे यांपासून कागद करण्याची युक्ती शोधली. मकाच्या ताथूमधून हा कागद होईल. जो जो छापण्याची व विद्येची वृद्धी होईल, तो तो कागद जास्त लागेल. केळीपासून व केकताडापासूनही कागद तयार होतो. लोकांनी मकाचा पाचोळा करून युरोपास रवाना करावा.

**२१२४** (२२ : २, १५ जानेवारी ६३, २८–३२)

एका इंग्लिश पत्रात अशी बातमी आली आहे की : देवी काढल्यावर मुलास १५ व्या वर्षापर्यंत देवी रोगाचे भय राहात नाही. पण वयाच्या २५ व्या वर्षापर्यन्त लशीचा परिणाम कमी होऊन स्वाभाविकपणे देवी येण्याचा संभव जास्त असतो. २५ ते ३५ च्या दरम्यान रोगाचे भय कमी होत जाते. म्हणून १५ व्या वर्षी पुन्हा देवी काढल्या पाहिजेत. सन १७२१ मध्ये लेडी मांतेग्यू यांनी आपल्या कन्येस देवी काढून या प्राणरक्षक कृतीची सुरुवात केली. त्यावर्षी शेकडा ५० लोक या देवी रोगाने पछाडले होते. दर २७ मध्ये एक माणूस मृत्यू पावला. १७९२ मध्ये शेकडा ४६ लोक आजारी पडले. पुढे गोस्तन देवी काढण्यास सुरुवात झाल्यावर ही साथ फार अटोक्यात आली. गेल्या २८ वर्षांत मृत्यूचे प्रमाण शेकडा ३ वर उतरले.

**२१२५** (२२ : २, १५ जानेवारी ६३, २८–३२)

अमेरिकेमध्ये सरकारचा व रयतेचा औषधोपचार करणेसाठी दरसाल २ कोटी ४० लाख रुपये खर्च होतात.

**२१२६** (२२ : २, १५ जानेवारी ६३, २८–३२)

अमेरिकेत एकट्या ब्रुकलिन शहरामध्ये २८ हजार खंड्या पाणी खपते.

**२१२७** (२२ : २, १५ जानेवारी ६३, २८–३२)

काही दिवसांमागे लंदन शहरात पराकाष्ठेचे धुके पडून दिवसा निबिड अंधकार पडला.

**२१२८** (२२ : २, १५ जानेवारी ६३, २८–३२)

रेवा प्रांताच्या पूर्व भागात कोळशाची खाण सापडली.

२१२९ (२२ : २, १५ जानेवारी ६३, २८–३२)

दोन अडीच महिन्यांपूर्वी इंदूर व मंडलेश्वर भागांमध्ये धरणीकंप झाला. जमीन इतकी हालली की, माडीवरच्या माणसांना चक्कर आली. मेजावरील ग्लास एकमेकांवर आपटून त्यांचा छनत्कार झाला.

मुंबई, एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

## ज्ञानोदय, पुस्तक २२, अंक ३, मुंबई, २ फेब्रुवारी १८६३

२१३० (२२ : ३, २ फेब्रुवारी ६३, ३४–३६)

१५ वर्षांमागे रे. क्लार्कसन व फ्लेवर या साहेबांनी महीकाठा मिशन सुरू केले. पुढे हे ठाणे ऐरिश मिशनाकडे आले. एथील लोक उपदेश ऐकण्यास सिद्ध होतेच. ख्रिस्ती पुस्तके वाटल्यामुळे योग्य पार्श्वभूमीही तयार झाली होती. अवघड काम व गैरमाहीतगार कामगार असूनही मिशन वाढत गेले. बोरसदला राहाण्याची सोय नव्हती. नवा मार्ग शोधावा, तर पैसा नव्हता. परंतु गेल्या साली एका साहेबाने अकल्पित ५ हजार रुपये व्याजावर दिल्हे. तेरा कुटुंबांनी शाहवाडीच्या शिवारामध्ये वसात केली. स्वतः खर्च करून ते शेती करतात. मिशनाचा एकही पैसा त्यांनी घेतलेला नाही. पीक गेले, तर मात्र गळहाटा होईल. बिचारे कर्ज काढून मिशनाचे काम करीत आहेत. मूर्तिपूजकांतून ते ख्रिस्ती झाले. ख्रिस्ती मित्रांनी शाळा व भजनालय काढण्यासाठी द्रव्यसहाय्य दिले, तर बरे होईल. बोरसद येथे ९३ ख्रिस्ती मंडळी राहात आहेत. जे गेले ते शांततेने, प्रीतीने व उमेदीने गेले. परमेश्वर नेहमीच आम्हांसंगती राहील, अशी आशा वाटते. धेडलोकांमध्ये मिशनाचे काम चांगले चालते.

२१३० अ (इंग्र : ३३–३४)

**२१३१** (२२ : ३, २ फेब्रुवारी ६३, ३७–३९)

फ्रेंद आफ इंदिया लिहितो की : गेल्या वर्षी १३०० मैल लोखंडी रस्ता नव्याने तयार झाला. आता १८०० मैल रस्त्याचे काम होणार आहे. गतवर्षी कापसाची ने-आण फार झाली. उतारूंनाही विलायतेपेक्षा कमी भाडे पडले. मोठ्या रस्त्यांना जोडणारे हलके रस्ते करण्याकरिता काही मंडळ्या स्थापन झाल्या आहेत. अशा रस्त्यांना दर मैलास फक्त २० हजारांचा खर्च येतो. विद्येशिवाय या देशाच्या रीतीभाती सुधारणे शक्य नाही. मिशनरी व जनकल्याणेच्छू लोकांवाचून हे काम होणार नाही. मोठे शहर व त्याभोवतालच्या ५० कोसांचा प्रदेश मात्र आता सुधारत आहे. पण शिक्षित लोक नास्तिक होतात, याचे मात्र दुःख वाटते आहे. छापखाने, पुस्तके, स्त्रीशिक्षण, यांची वाढ होत आहे. जदुनाथ महाराजाच्या खटल्याने धर्मगुरूंच्या निंद्य वागणुकीवर प्रकाश पडला. सरकारी शाळेपेक्षा मिशनरी शाळा चांगले कार्य करतात, ही गोष्ट अधिकारीही कबूल करतात. हीदेखील हर्षाची गोष्ट आहे.

**२१३१ अ** (इंग्र : ३७)

**२१३२** (२२ : ३, २ फेब्रुवारी ६३, ३९)

गेल्या दहा वर्षांत मिशनांच्या कामात फार मोठी वाढ झाली. १८५२ मध्ये २२ मंडळ्या होत्या, आता ३१ आहेत. मिशनाची ठिकाणे ५८ ने वाढली. उपस्थळे १९२५ आहेत. नेटिव पालकांची संख्या ४८ वरून १४० वर गेली. साह्यकारी उपदेशक दुप्पट झाले. नेटिव मंडळ्या ३३१ वरून ११९० वर गेल्या. प्रभुभोजनास येणारांची संख्या १७ हजारांनी वाढली. ख्रिस्ती लोक १ लाख १२ हजारांवरून १,५३,८१६ झाले. २०० शाळा नवीन झाल्या. विद्यार्थी ३ हजारांनी वाढले आहेत. इंग्रजी शाळेत ही संख्या ९ हजारांनी वाढली. ४,०९८ मुली शिक्षण घेत आहेत.

**२१३३** (२२ : ३, २ फेब्रुवारी ६३, ३९–४१)

हिंदुस्थान सरकारने रुपयाचे नवे नाणे प्रचारात आणले आहे. छत्रपती शिवाजी, दिल्लीचे बादशहा, इस्त इंदिया कंपनी, यांनीही आपापली नाणी पाडली होती. विक्तोऱ्या राणीकडे देशाचा कारभार गेल्यामुळे नवे नाणे जारी करणे आवश्यक झाले. हा रुपया आकार, वजन, यांत १८४० च्या रुपयाएवढाच आहे. राणीची प्रतिमा त्यावर आहे. पूर्वीपेक्षा ती मोठी आहे. राजमुगुटाप्रमाणेच त्यात अंगावरील रेशमी वस्त्र स्पष्ट दिसते. तेणेकरून हे नाणे फार शोभिवंत दिसते. राणीच्या कानाजवळ वेणीचा गुंफलेला पदर येतो, म्हणून काही लोक त्यास नापसंत करतात, पण हे नाणे काही बेढब दिसत नाही. रुपयावर इंग्रजी मजकूर आहे, तसा देवनागरी मजकूरही असला पाहिजे. कारण हिंदुस्थानात प्रामुख्याने ही लिपी सर्वांस समजते.

**२१३४** (२२ : ३, २ फेब्रुवारी ६३, ४१–४३)

वृत्तवैभवाने बातमी दिल्ही की, : 'मद्रासेच्या एका मिशनऱ्याने एका ब्राह्मण मुलास ख्रिस्ती केले. पण त्याच्या बापाने कोर्टामध्ये फिर्याद केली. मुलाचे वय १४ ठरल्यामुळे मुलगा बापाच्या ताब्यात देण्यात आला. मिशनरी नाउमेद झाले'. पण मद्रासच्या तैम्स ऑफ इंदियाने लिहिले आहे की : एक ब्राह्मण मुलगा वेस्लियन मिशनाकडे जाऊन स्वखुषीने ख्रिस्ती झाला. जेंकिंसने त्यास दीक्षा दिल्ही. बापाने जन्मपत्रिका सादर केली. पण कोर्टाने ही जन्मपत्रिका अविश्वसनीय ठरविली. नातेवाईकांच्या जबान्यातही फरक आला. दाक्तरी तपासणीत त्याचे वय १६ ठरले, म्हणून कोर्टाने मिशनऱ्यास सोडून दिल्हे. वादीस खर्च देण्याची वेळ आली. पण मिशनऱ्याने उदारपणा दाखवून हा खर्च घेतला नाही.

२१३५ (२२ : ३, २ फेब्रुवारी ६३, ४३)

'सूचक' आपल्या पत्रात म्हणतो की : 'मेस्तक' ग्रंथातील एक कविता मी वृत्तवैभवकडे पाठविली. पण त्यांनी छापली नाही. म्हणून ज्ञानोदयास पाठविली. या कवितेत म्हटले आहे की : विद्येची आवृत्ती करणे मुनासिब आहे. लेखक कुलशीलाने चांगला व आचाराने पवित्र असावा. त्याची बुद्धी सूर्याप्रमाणे तेजस्वी असावी. तो शठ, कपटी, वितंडवाद करणारा नसावा. त्याचे वर्तन सात्त्विक असावे. अधर्माचे मूळ त्याने नाहीसे करावे. निर्भय व प्रेमळ बोलणारा असा तो असावा. मनाने संतुष्ट असावा.

२१३६ (२२ : ३, २ फेब्रुवारी ६३, ४४–४५)

'एक स्कूल मास्तर' लिहितो की : 'ज्ञानप्रकाशने अभिप्राय दिला की, पंतोजी विद्वत्तेने व प्रामाणिकपणाने कमती असतात. पण पंतोजीस पगार कमी म्हणून ते खोटेपणा करतात. सरकारी कायदेही चमत्कारिक आहेत. विशिष्ट पटसंख्येची सक्ती असते. खेड्याच्या शाळेत २०–२५ मुले असतात. त्यात काही शेतात, तर काही गुरे चराईत जाणार, काही शेण वेचतात, तर काही आजारी ! मग खोटी हजेरी मांडली नाही, तर हातात चौपदरी येते. दुसरी चाकरी पहावी, तर सगळीकडेच रिडक्शन चालू आहे. शिवाय लोकांत नास्तिकपणा वाढत असल्यामुळे खोटेपणा वाढला. लबाडीची कोणास भीती नाही. कां तर ईश्वराचे भयच वाटत नाही. कायद्याच्या भीतीपेक्षा पापाचे भयच मोठे असते. शिवाय अधिकारी लोकांना काहीच त्रास नाही. 'संक्रांत येती तो गरिबावर, शिक्षक, कारकून व पट्टेवाले यांवर !' यांवर संपादक म्हणतात : इल्लीचे पंतोजी तमाशे फार पाहातात. त्यांना जास्त पगार दिला, तरी तो त्यांस पुरणार नाही.

२१३७ (२२ : ३, २ फेब्रुवारी ६३, ४५–४८)
अमेरिकेचा नवा सेनापती बर्न सैद याचा बंडखोरांनी पराभव केल्यामुळे मेकलेलनची पुन्हा नेमणूक होईल. हिरान शहरास काबूलच्या सैन्याने घातलेला वेढा कायम आहे. तैपिंग राजे युरोपियनांच्या संयुक्त फौजेसमोर टिकाव धरणे कठीण आहे.

२१३८ (२२ : ३, २ फेब्रुवारी ६३, ४५–४८)
गारिबाल्दीच्या जखमा बऱ्या झाल्या. त्यास सरकारी माफी मिळाली.

२१३९ (२२ : ३, २ फेब्रुवारी ६३, ४५–४८)
प्रिन्स आल्फ्रेदला राजा करण्याची ग्रीक लोकांची इच्छा कायम आहे.

२१४० (२२ : ३, २ फेब्रुवारी ६३, ४५–४८)
ज्यापानने आपली राजधानी यद्दोहून मायाकोस हलविली.

२१४१ (२२ : ३, २ फेब्रुवारी ६३, ४५–४८)
बेळगावच्या मि. पिराजीची उपदेशक म्हणून नेमणूक झाली.

२१४२ (२२ : ३, २ फेब्रुवारी ६३, ४५–४८)
दिल्लीत चौघा महंमदी गृहस्थांनी मुलींच्या चार शाळा सुरू केल्या. मिर्जा इलाही बक्षच्या शाळेत ५० मुली शिकतात.

२१४३ (२२ : ३, २ फेब्रुवारी ६३, ४५–४८)
महाराज दलीपसिंग सर स्प्रिंगल बारोनेरच्या कन्येशी विवाह करणार.

२१४४ (२२ : ३, २ फेब्रुवारी ६३, ४५–४८)
कोचीन व त्रावणकोर येथे १३९१ यहूदी लोक राहातात.

२१४५ (२२ : ३, २ फेब्रुवारी ६३, ४५–४८)

मिसेस लेडी एल्गीन कलकत्त्यात दाखल झाल्या.

२१४६ (२२ : ३, २ फेब्रुवारी ६३, ४५–४८)

अमेरिकन लढाईमुळे शस्त्रांत व रेल्वे गाड्यांतही सुधारणा होत आहे. रैफल तोफेचा मोर्चा बांधण्याकरिता लोखंडाने मढविलेली आगगाडी त्यांनी तयार केली. ही तोफ ६ इंच व्यासाची आहे. लुटारू बंडखोरांना मारण्यास तिचा उपयोग होतो.

२१४७ (२२ : ३, २ फेब्रुवारी ६३, ४५–४८)

पोवळ्याचे किडे व मुसरे जीव कठीण खडक तयार करतात. इतकेच काय, पण स्वीडनच्या सरोवरातले काही जीव लोखंड तयार करतात. हे लोखंड एक वीत जाड व २०० गज रुंद असते. शेतकरी बर्फामधून लोखंड वेगळे करून ते विकतात. एकेक माणूस रोज सवा खंडी लोखंड काढतो.

२१४८ (२२ : ३, २ फेब्रुवारी ६३, ४५–४८)

निवडुंगनाशकाबद्दलची बातमी खोटी ठरली.

२१४९ (२२ : ३, २ फेब्रुवारी ६३, ४५–४८)

पंचांगाविषयीच्या गेल्या महिन्याच्या बातमीत थोडी चूक झाली. चंद्रग्रहण २ जानेवारीस नाही, तर २ जून रोजी आहे.

२१५० (२२ : ३, २ फेब्रुवारी ६३, ४५–४८)

बंगाल्यात ५० मिशनठाणी आहेत. २३ इंग्रजी शाळांमध्ये ६५१० विद्यार्थी शिकतात. मुलींच्या शाळा ५५ असून त्यांत १६७१ मुली शिकतात. एकट्या कलकत्यात १० मिशने आहेत. १२ शाळांत ४००१ विद्यार्थी आहेत. २३ मुलींच्या शाळांत ७७९ विद्यार्थिनी शिकतात.

**२१८१** (२२ : ३, २ फेब्रुवारी ६३, ४५–४८)

एका व्यापाऱ्याने कुळावर २८ रुपयांची फिर्याद केली. मुद्दल फक्त १ रुपया होते. कोर्टाने फक्त १ रुपया कबूल केला.

**२१८२** (२२ : ३, २ फेब्रुवारी ६३, ४५–४८)

विलायतेची लोकसंख्या ३ कोटी, तर हिंदुस्थानची लोकसंख्या २० कोटी आहे.

**२१८३** (२२ : ३, २ फेब्रुवारी ६३, ४५–४८)

लांकशीरच्या विपत्तिग्रस्त मजुरांसाठी रजपूत राजांनी निम्मी वर्गणी, म्हणजे ४४,४९९ रुपये दिल्हे.

मुंबई, एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

**२१८४** (२२ : ४, १६ फेब्रुवारी ६३, ५०-५३)

काही वर्षांमागे गुजरातेत धेड लोकांत धर्माचा प्रचार केला. पण फक्त दोन लोक मंडळीस मिळाले. मग काही दिवस कोळी व पातिदार यांमध्ये प्रचार केला. पुढे धेडांच्या बोलावण्यावरून त्यांच्यात गेलो, तेव्हा आढळले की, पेरलेले बी मेले नाही, ते अजून फळ देण्यास सिद्ध आहे. आनंदजवळच्या २० गावांत १०० कुटुंबे खिस्ताकडे फिरली. १०० पेक्षा जास्त मुले शाळेत येतात. ब्राह्मणांचे व वाणी पातिदारांचे हे दास होते. भावांची वाटणी झाली, तर धेडही विभागले जातात. इंग्रजी राज्यात त्यांच्यात स्वतंत्रतेची भावना वळावून ते लष्करात व लोखंडी रस्त्यावर कामे करू लागले. ब्राह्मणांनी भ्रष्ट मानलेला 'वर्णसंकर' होऊ लागला आहे व त्यांची दुरावस्था दूर होते आहे. दहावा अवतार कल्की एका धेडणीशी लग्न करील, असे ब्राह्मण समजतात. जुन्या करारातील गोष्टी धेडांच्या दंतकथेशी मिळतात. धेडांना फार पूर्वी 'सत्य' असे नाव होते. नंतर मेघ, एलिया व धेड अशी नामांतरे झाली. एलिया ऋषीने तर राजास शिक्षा करण्यासाठी पाऊस बंद केला होता. यहुदी लोकांच्याच वंशाचे ते असावेत. त्यांची मांडलिकी व मानसिक स्थिती चमत्कारिक आहे. ईश्वराच्या आशीर्वादाने त्यांच्यात धर्माचे अगत्यही निर्माण होईल, असे वाटते. पापाची व सैतानाची बंधने ते तोडतील.

**२१८४ अ** (इंम : ४९-५०)

२१८८ (२२ : ४, १६ फेब्रुवारी ६३, ५४–५६)

'एक मित्र' लिहितो की : एका गावात ७०–८० लोकांना दरोडा घालण्याच्या आरोपावरून बेड्या घालण्यात आल्या. दरोड्याचे कारण असे की, गावच्या वाणी सावकाराचे त्यांच्यावर कर्ज होते. गरीब व अज्ञानी रयतेकडून तो जबर व्याज घेत असे. कर्ज फेडण्याचे सामर्थ्य नसल्यामुळे त्यांनी गर्दी करून सावकाराचे दुकानच फोडून जाळण्याचा प्रयत्न केला. सावकारास जखमा झाल्या. माल पळविला गेला. सावकाराने सर्वांना पकडून दिले. कितीही जुलूम झाला, तरी कायदा हातात घेऊ नये. दरोडा तर फारच वाईट आहे. परंतु या सरळ स्वभावी लोकांनी हा मार्ग अवलंबिला. तुरुंगवासाच्या सततच्या धमक्या ऐकून त्यांनी हे अघोर कर्म केले. त्यांना शिक्षा देणे योग्य आहे. पण सावकारी कर्जावर नियंत्रणे हवीत. या देशाचे कायदे फक्त सावकारांसच अनुकूल आहेत. रक्ताचे पाणी करून पीक काढावे, ते सावकार मुरगाळून घेऊन जातो. व्याजाचा दर शेकडा १५० आहे. मग कर्जाचे ओझे काढून टाकण्यासाठी असले प्रकार घडतात. या जगातील कोर्टापेक्षा ईश्वराचे कोर्ट मोठे आहे. ते यांच्या बायकामुलांच्या प्रार्थना ऐकेलच.

२१८८ अ (इंम : ५३–५४)

२१५६ (२२ : ४, १६ फेब्रुवारी ६३, ५६–६२)

राहुरी मिशनाचे रे. आबट यांनी दरवर्षी राहुरी व वांबोरी तालुक्यांतील सभा भरविण्याचे ठरविले आहे. या सभेस ५० लोक आले होते. पहिल्या दिवशी कीर्तन झाले. पवित्र आत्मा मिळविण्याकरिता प्रयत्नांची गरज आहे. पाठलाग होऊन आपली परीक्षाच होते आहे. वाऱ्याने कोंडा उडून जाऊन निर्मळ गहू उरतात. शाब्बाथ व्यवस्थित पाळण्यासाठी प्रयत्न करावेत. मानवाच्या तारणाची काळजी करावयास हवी. अमेरिका देशासाठी प्रार्थना करावी. दासपणाची प्रथा बंदच व्हावी. शुक्लपक्षाचाच जय व्हावा. बंडखोरांचे पारिपत्य व्हावे. मेहनती बनावे. ईश्वरावर भरोसा ठेवावा. बोधासाठी गाणी गावीत. युरोपियन चाली जास्त सुरस असतात. तरी नेटिव चालीही गाणे म्हणताना वापराव्या. लेकरांची लहाणपणी लग्ने करू नयेत. जातिभेद किती नाशकारक आहे, याची लोकांना जाणीव द्यावी. हिंदू महार ख्रिस्ती महारांना दूर ठेवतात, हे अयोग्य आहे. मांगातून ख्रिस्ती झालेल्या लोकांशी चांगला व्यवहार ठेवावा. गैरशिस्त समजुती टाकून द्याव्यात. अशा लोकांचा निषेध करणारे पदही म्हणण्यात आले. 'गर्वाची भांग पिऊन इतर जातींचा द्वेष करू नका.' असा उपदेश करण्यात आला.

२१५७ (२२ : ४, १६ फेब्रुवारी ६३, ६२–६४)

उत्तर अमेरिकेचे २० हजार मृत्यु पावले, तरी लढाईमध्ये त्यांचाच जय होत आहे (ज्ञानप्रकाशवरून)

२१५८ (२२ : ४, १६ फेब्रुवारी ६३, ६२–६४)

काबूलच्या अमिरातर्फे शाह नवाझखान लढाईस गेला, तेव्हा तोफेचा गोळा त्याजवर पडला, पण तो सुदैवाने वाचला (लोकमित्रवरून)

२१५९ (२२ : ४, १६ फेब्रुवारी ६३, ६२–६४)

कलकत्ता ते काशी हा रेलवेमार्ग सुरू झाला. (इंदुप्रकाशवरून)

२१६० (२२ : ४, १६ फेब्रुवारी ६३, ६२–६४)
बहादूरशहाची पत्नी जीनत हिला दिल्लीत येण्यास परवानगी मिळाली.

२१६१ (२२ : ४, १६ फेब्रुवारी ६३, ६२–६४)
उत्तरेकडे सूर्यग्रहण झाले. ४० लक्ष लोक तीर्थक्षेत्रावर जमले होते.

२१६२ (२२ : ४, १६ फेब्रुवारी ६३, ६२–६४)
शंभुनाथ पंडितांना कलकत्त्याच्या हैकोर्टात जज नेमले आहे. एका हिंदूचे या जागेवर प्रथमच अरोहण होत आहे.

२१६३ (२२ : ४, १६ फेब्रुवारी ६३, ६२–६४)
सर त्रिविलियन प्रासिकर लगेच रद्द करण्याची तजवीज करीत आहेत.

२१६४ (२२ : ४, १६ फेब्रुवारी ६३, ६२–६४)
पटियालाचा राजा अज्ञान असल्यामुळे तेथे रेसिडेंत नेमला जाईल.

२१६५ (२२ : ४, १६ फेब्रुवारी ६३, ६२–६४)
मिसरचा सैय्यद पाछा मृत्यू पावला.

२१६६ (२२ : ४, १६ फेब्रुवारी ६३, ६२–६४)
राकी मौंटनवर (अमेरिकेत) लांब धाग्याच्या तंतूंचे झाड सापडले. (ज्ञानप्रकाशवरून)

२१६७ (२२ : ४, १६ फेब्रुवारी ६३, ६२–६४)
आग्रा मिशनने सैरखा हिंद हे हिंदुस्थानी, तर लोकमित्र हे देवनागरी अशी वर्तमानपत्रे सुरू केली. त्यांचे ठसे उत्कृष्ट आहेत.

२१६८ (२२ : ४, १६ फेब्रुवारी ६३, ६२–६४)

बटाटे टिकविण्यासाठी त्यावर चुन्याचा थर द्यावा. असे बटाटे ४–४ वर्षे टिकतात.

२१६९ (२२ : ४, १६ फेब्रुवारी ६३, ६२–६४)

तोफेच्या पोकळ गोळ्याप्रमाणे विलायतेत जे. नार्टन यांनी बंदुकीची पोकळ गोळी तयार केली आहे.

२१७० (२२ : ४, १६ फेब्रुवारी ६३, ६२–६४)

अमेरिकन सैन्याबरोबर फोतोग्राफी करणारे लोकही हिंडतात. ते दररोज १५०–१६० चित्रे तयार करतात. दर चित्रास फक्त एक डालर म्हणजे २ रुपये पडतात.

२१७१ (२२ : ४, १६ फेब्रुवारी ६३, ६४)

सरकारतर्फे सिंधू नदीखाली बोगदा किंवा सुरुंग करीत होते. त्यांचा कारखाना आता बंद केला आहे. सगळ्या कामगारांना रजा दिल्ही आहे. याचे कारण काय, तसेच हे काम पुन्हा केव्हा सुरू होणार, ते कळत नाही (खैरखा खल्कवरून)

मुंबई, एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

२१७२ (२२ : ५, २ मार्च ६३, ६६–६९)

नवीन पुस्तके–

'मुलांकरिता चौथे पुस्तक' हे मि. बाबा पदमनजींनी रचले. यात १८० पाठ आहेत. विद्या, इतिहास, शास्त्रे व धर्म हे विषय आहेत. भाषा सुरस असून योजना व विवरण सुज्ञ आहे. क्रिस्तियन वर्नाकुलर सोसायटीच्या उत्तेजनाने बाबांनी हे पुस्तक तयार केले. दक्षिणा प्रेज कमिटीने हे छापले नसते. कारण मागे दाऊदजी महंमद यांचा एक निबंध अजून त्यांच्याकडे धूळ खात पडला आहे.

'हृदयदर्पण' हे पुस्तक रे. स्वार्टर्स यांनी मराठीत रचले. पृष्ठे ८६ आहेत मनुष्याच्या अंतःकरणाची स्थिती सचित्र निवेदन केली आहे. ईश्वरोक्त शास्त्राच्या प्रकाशाचे साह्य त्यांस मिळाले आहे. पापी मनुष्याच्या तारणाचा उपायही त्यात दिला आहे.

'नवसाला पावणे'– रे. व्हैट यांनी हे २२ पानी पुस्तक लिहिले. नेटिवांच्या देवतांचा खोटेपणा यात सोदाहरण सिद्ध केला आहे.

'शकुन मुहूर्त इत्यादीविषयी'–रे. मरे मिचेल यांनी रचिले. पाल, मांजर, यांच्या शकुनाचे मिथ्या भय यात स्पष्ट केले आहे.

'आमची भक्तिसंबंधी पापे वहाणारा उपाध्या'–मि. बाबा पदमनजी. ५२ पृष्ठांचे पुस्तक लिहिले. उपाध्येपणाचा परिस्फोट यात केला आहे. पवित्र कर्मही कसे सदोष असते, ते दाखविले. साहित्याच्या शुद्धतेपेक्षा अंतःकरणाची शुद्धता श्रेष्ठ, असे बाबा सांगतात.

'पंढरीचा वारकरी'–मि. बाबा पदमनजींनी रचले. खिस्ती गृहस्थ आणि एक वारकरी यांचा संवाद त्यात आहे. पंढरीच्या विठोबाच्या दर्शनाने होणाऱ्या लाभाची यात चिकित्सा केली आहे. निर्जीव मूर्ती टाकून येशूस शरण जावे, हे पटवून दिल्हे.

२१७३ (२२:५, २ मार्च ६३, ६९-७३)

प्राचीन मूर्तिपूजक धर्म व खिस्ती धर्म यांविषयी– या पुस्तकात रे. मरे मिचलच्या व्याख्यानाचा सारांश नारायण शेषाद्री यांनी दिला आहे. प्राचीन रोमी व ग्रीक देवता हिंदूंप्रमाणेच होत्या. आज त्या देवतांच्या जागी प्रातेस्तंत देवळे आहेत. जुने जराजर्जर धर्म असेच नष्ट होणार व भरतखंडाचे खरे आत्मिक कल्याण होणार.

दिव्यप्रकाश–रा. सदोबा भागोबा पवार यांनी इंग्रजीवरून भाषांतरित केले. पवित्र शास्त्राच्या रत्नखाणीमधून अमोल्य रत्ने निवडून हा तिपदरी हार गुंफिला. यातील प्रार्थना मुखपाठ कराव्या. हे मोलवान पुस्तक लिहिल्याबद्दल लेखकाचे उपकार मानावेत.

पदसंग्रह– मि. भागोबा पवारांनी रचिला. वयाच्या ७५ व्या वर्षी त्यांनी पदे रचली. खिस्ती होण्यापूर्वी ते नाचतमाशे करीत. सैतानाच्या सेवेतून ते खिस्ताकडे फिरले. प्रत्येक यात्रेमध्ये ही गाणी त्यांनी गायिली. भाषा प्रौढ, सुलभ व देशवहिवाटीची आहे. बीभत्सपणा अजिबात नाही. हे रसाळ व गोड फळ सर्वांनी सेवन करावे.

मनुष्य जबाबदार आहे काय ? हे पुस्तक त्राक्त सोसैटीनेच प्रकाशित केले. पापाचा कर्ता करविता देव आहे, ही खोटी समज आहे. पुण्याचा अभिमान धरू नये. पापाच्या क्षालनाची मात्र चिंता करावी व प्रभू येशूकडे फिरावे. पृष्ठे २०, किंमत अर्धा आणा.

अर्वाचीन ग्रंथकर्त्यांच्या अडचणी– याची एक प्रत ज्ञानोदय–कचेरीत आली आहे.

२१७४ (२२ : ५, २ मार्च ६३, ७३–७४)

शिरसगाव मुक्कामात एक विलक्षण चमत्कार घडला. तेथे एक निंबाचा वृक्ष आहे. त्याचे खोड २॥ हात इतके विस्तृत आहे. पण त्याच्या खोडातून पिंपळाच्या फांद्या निघाल्या आहेत. निंबाचे खोड रुंद होऊन नूतन पिंपळाचे खोडही दिसू लागले. बहुधा पक्ष्यांनी पिंपळाचे बीज निंबाच्या फांद्यावर टाकले असावे. पिंपळ वाढला व त्याच्या दाटणीने निंब तडकला. एखाद्या जर्जर म्हाताऱ्याने बालदैत्याचे हात धरावे, तसे हे दृश्य दिसते. निंब लवकरच स्थानभ्रष्ट होईल. याचप्रमाणे जुनाट हिंदू धर्मावर आकाशातील दूतांनी खिस्ती धर्माचे बी आणून टाकले. प्रथम जुन्या वृक्षाने नवीन रोपड्यास तुच्छ मानिले. आता मात्र खिस्ती धर्माच्या मुळ्या त्यात प्रवेश करून बळकट बनल्या. नव्या धर्माची वाढ थांबविणे आता त्यास अशक्य आहे. नवा वृक्ष जातिभेद व मूर्तिपूजा यांस तोडीत आहे. हा कडू व जुनाट वृक्ष लवकरच उन्मळून पडेल.

२१७४ अ (इंम : ७३)

२१७५ (२२ : ५, २ मार्च ६३, ७४–७६)

ल. रा. लिहितो की : तुळजापुरात शुभवर्तमानाची घोषणा करून आलो. बार्शी वैराग मार्गाने गेल्यामुळे फार हाल झाले. गावाजवळ मात्र आंबराई पाहून प्रसन्न वाटले. देवीचे देऊळ डोंगराच्या दऱ्यात आहे. इकडील गावांची मोगलाई अंमलामुळे मातेरी झाली. डोंगराच्या पायऱ्या उतरल्यावर पाण्याचे टाके लागते. त्याचे पाणीच गोमुखीतून काढून लावले आहे. देवीच्या दारासमोर भक्तांनी शेकडो रुपये फरसात बसविले आहेत. हेच रुपये लोककल्याणाच्या कामास लावता आले असते. ही देवी महिन्यातून ७-८ दिवस विश्रांती घेते, म्हणतात. निजामाने व हिंदू राजांनी देवळास मोठी नेमणूक करून दिली आहे. पंढरपूरच्या बडव्यांप्रमाणे येथे भोजे असतात. विशेष म्हणजे ते फासेपारधी असतात. यात्रेकरूंना ते राजरोस ठकवितात. देवळासमोर शुभवर्तमान सांगू लागल्यावर पहारेकरी रागावले व त्यांनी मनाई केली. तरीही आम्ही सत्यधर्माचे बी पेरून आलो. शास्त्राच्या १००–१५० प्रती वाटल्या. लोकांचा भ्रम व अज्ञान जाऊन ते खऱ्या धर्माचे सेवक बनावेत, अशी प्रार्थना आहे.

२१७६ (२२ : ५, २ मार्च ६३, ७६–७७)

ज्ञानप्रकाशाचा इंदूरचा बातमीदार लिहितो की : २१ डिसेंबरला दुपारी एकाएकी अंधार पडला. ग्रहण झाले, हे लक्षात घेऊन लोक काजळ लावलेल्या काचेतून सूर्य पाहू लागले. दुर्बीण व उपनेत्रे शोधू लागले. कित्येकजण नदीवर स्नानासाठी गेले. लोकांनी घरातले अन्न गाईला देऊन टाकले. जपही सुरू झाला. पण हे सूर्यग्रहण पंचांगात का नाही, याचे गणित करणे कोणासही सुचले नाही. याबद्दल भट्टांसच दोष दिला पाहिजे. पंचांग करतेवेळी त्यांस झोपेने गाठले की, आळसरूप महापुरुषाशी ते झोंबी खेळत होते? हे सूर्यपर्व ज्योतिर्षांनी तोंडात टाकले की काय? की आदित्याने त्यांशी विपरीत पक्षपात केला? ग्रहण मागणाऱ्या भिकाऱ्यांच्या पोटावर मात्र पाय आला. आता तरी लोकांनी जोश्यांवरचा विश्वास सोडावा.

२१७७ (२२ : ५, २ मार्च ६३, ७७)

शेवटाचा विचार या कवितेत कृ. र. म्हणतात की : प्राण्या, तू विद्या शिकून चाकरी करतोस, उंच हवेल्या बांधतोस, मेजखुर्च्या ठेवून झुंबरेही लावतोस, लग्न करून प्रपंच वाढवतोस, हारतुरे लेवून सभेत मिरवतोस, पालखीत बसून चौऱ्या ढाळतोस, पृथ्वीचे राज्य जिंकून राजा बनतोस, आणि येशूस शरण न जाता मरून जातोस. शेवटाचा काही विचार कर.

२१७८ (२२ : ५, २ मार्च ६३, ७८–८०)

शहानवाझला ठार मारण्याचा हुकूम अमीराने रद्द केला. (प्रजाहितवरून)

२१७९ (२२ : ५, २ मार्च ६३, ७८–८०)

भिंतीसाठी वापरल्या जाणाऱ्या मसाल्यात मीठ असल्यामुळे मुंबईतील घरांना लोणा लागतो. चुन्याचा वापर करावयास हवा.

२१८० (२२ : ५, २ मार्च ६३, ७८–८०)

मिसरच्या गादीवर इस्माइल पाछा राजा झाला. त्याने राज्यकारभार चांगला चालवावा व खजिन्यातून कवडीही घेऊ नये, असे ठरविले आहे. जबरी मजुरीची पद्धत तो बंद करणार व न्याय, विद्या खात्यांची सुधारणा करणार आहे. असा विचार हिंदुस्थानातले राजे व नवाब करतील काय ?

२१८१ (२२ : ५, २ मार्च ६३, ७८–८०)

तुर्कस्थानचा सुलतान अजीज मगजमारीने फार आजारी झाला.

२१८२ (२२ : ५, २ मार्च ६३, ७८–८०)

राजस्थानच्या दरबारात जोडे काढण्याचे बंधन आता युरोपियनांना नाही.

२१८३ (२२ : ५, २ मार्च ६३, ७८–८०)

मकरसंक्रांतीस अलाहाबादेत मोठी यात्रा भरली. रेल्वेची फार सोय आहे. पण पटकीने शेकडो मरण पावले.

२१८४ (२२ : ५, २ मार्च ६३, ७८–८०)

कलकत्त्यात एका मुस्लिमाने स्वैपाक बिघडला, म्हणून बायकोस पेटवून दिल्हे. त्याला तीन वर्षांची कैद झाली. (लोकमित्रवरून)

२१८५ (२२ : ५, २ मार्च ६३, ७८–८०)

आश्या मैनरच्या भूकंपात ५ गावे नष्ट झाली व ५०० लोक प्राणास मुकले. (इंदुप्रकाशवरून)

२१८६ (२२ : ५, २ मार्च ६३, ७८–८०)

सुरतच्या पत्राचे नाव 'खैरखा हिंद' नसून 'खैरखा खल्क' असे आहे.

२१८६ ब (२२ : ५, २ मार्च ६३, ७८–८०)

नवीन शोध केल्यामुळे मनुष्यकृतीचा विद्युत् वाहकपदार्थ न लाविता बातम्या पाठविता येतात. (हरकारूवरून)

२१८७ (२२ : ५, २ मार्च ६३, ८०)

मनुष्ये आपली संपत्ती वाढविण्यासाठी घुसीप्रमाणे उकरून समुद्राखाली बिळे करीत असतात. इंग्लंडला खाणीच्या कोळशापासून ४१ कोटी ४९ लाखांचे उत्पन्न मिळते. तेथील कोळसा आणखी ७ शतके तरी पुरेल. चेश्शीरच्या दकेनफील्डची खाण तर अडीच हजार फूट खोल आहे. बहुतेक खाणी अतिशय खोल आहेत. ग्रेत ब्रितन समुद्राच्या तळाच्याही खाली गेले आहे. कथलाच्या व तांब्याच्या खाणीही अशाच खोल आहेत. अटलांटिक समुद्राच्या खाली अर्धा मैल हे कामगार काम करतात. पाझरणारे पाणी उपसून टाकता यावे, म्हणून अजस्र यंत्रांचा उपयोग करतात. यंत्रानेच लोक वर येतात. तीस कोटींचा माल खाणीतून निघतो व बाजारात त्याची किंमत दसपट होते. पण खाणीच्या विलक्षण हवेत दरसाल तीन हजार तरी मरतात. शिवाय शरीरकष्टाने मरणारे निराळेच.

मुंबई, एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

---

ज्ञानोदय, पुस्तक २२, अंक ६, मुंबई, १६ मार्च १८३६

---

२१८८ (२२ : ६, १६ मार्च ६३, ८१)

नवे तीन मिशनेरी मडमांसुद्धा मुंबईत दाखल झाले आहेत. रे. मंगर पुन्हा सातान्यास जातील. रे. बालंतैन मुंबईत राहणार. रे. ब्रूस नगरजवळच्या खेड्यात जातील. स्काच मिशनाचे रे. फार्ब्सही मुंबईत आले आहेत.

२१८८अ (इंम : ८१)

२१८९ (२२ : ६, १६ मार्च ६३, ८३–८७)

आम्ही एक सूक्ष्मदर्शक यंत्र पाहिले. स्वप्नातही दिसणार नाही, असे चमत्कार त्याने दाखविले. दाट पानांचे आपण कौतुक करतो. पण पानाच्या रेषा या यंत्रानेच दिसतात. असली कारागिरी कोणी कलावंतही करू शकणार नाही. फुलाची पाकळीही यातून विशेष सुंदर वाटते. शालोमन राजानेही असले वैभव उपभोगले नसेल. ल्हानशी पिसू यात हत्तीच्या छोट्या नमुन्याप्रमाणे दिसते. आपल्या शरीरातील रुधिराभिसरणाची क्रिया यंत्राने पाहाता येते. म्हणून शास्त्र म्हणते की, मी भयकारपणे व विस्मयाने घडलो. फौजदारी खटल्यातही यंत्राचा उपयोग होतो. एका स्त्रीवर नातेवाईकास ठार मारले, हा आरोप आला होता. पण तिच्या पांघरुणातील रक्त कोंबड्याचे आहे, हे सूक्ष्मदर्शक यंत्राने सिद्ध झाले व ती निर्दोष सुटली. ईश्वर हा एक श्रेष्ठ कारागीर आहे. त्याने प्रत्येक गोष्ट मोठ्या चतुराईने घडविली. मूर्ख लोक मात्र म्हणतात की, देव नाही. आपले स्नायु व शिरा, हाडांचे सांधे ही त्याने बारकाईने घडविली. सृष्टीच्या पूर्णतेविषयी आपणांस फार आश्चर्य वाटते. प्रत्येक फुलझाड पाहून आकाशातील बापाबद्दल भययुक्त आदर वाटतो.

२१८९ अ (इंम : ८२–८३)

२१९० (२२ : ६, १६ मार्च ६३, ८८-९०)

'लोककल्याणेच्छू' लिहितो की : शिमग्याविषयी बराचसा निषेध व बोध ज्ञानोदयाने केला, तरी हा दुष्ट सण मोडत नाही. सुज्ञ अंमलदारामुळे काही काळ हा अनर्थ कमी झाला. पण यंदा शिमग्याच्या धुमाळीत तमाशा पाहण्यास हजारो लोक जमा झाले. नगरात सगळीकडे रेंदा व गुलाल दिसत होते. काहींनी गवळ्याच्या घरात घुसून लोणी खाल्ले. एकदा जुन्या बाजारात मोठी मारामारी झाली होती. अंमलदारांनी बंदोबस्त केला. पण ते सर्व विसरून लोक होळी खेळतात. सोंगे घेऊन बोंबा मारतात. मि. रामचंद्र दुगलसाहेबांनी तजवीज ठेवली. पण सावकारांना तमाशाही हवाच. लोकहितवादीने आपली समशेर म्यानात घालून ठेवलेली आहे. सुधारक हिंदूंना गाढ निद्रा लागली आहे. खरे म्हणजे ही काही नीज घेण्याची वेळ नाही. शिमग्याच्या दिवसांत सर्व शाळा सुरू ठेवाव्या. म्हणजे मुलांना वाईट सवय लागणार नाही. शिमग्याविरुद्ध निबंध लिहिण्यास लोकांना उत्तेजन द्यावे. वर्तमानपत्रांनी सुसमयी बोध करावा. पुस्तके फुकट वाटावीत. थोर व वजनदार लोकांनी इतरांचे मन वळवावे. सरकारने कडक बंदोबस्त ठेवावा.

२१९० अ (डंम : ८७-८८)

२१९१ (२२ : ६, १६ मार्च ६३, ९०–९३)

ल. रा. मा. लिहितात की : बारसीच्या महारांना वाटते की, येथे शाळा असावी. सरकारी शाळेत त्यांना घेत नाहीत. हिंदूंनी त्यांना गाढव व कुत्रे यापेक्षाही हीन केले. ख्रिस्ती लोकच काय तो त्यांचा कळवळा करतात. मिशनाने हार्डिंगसाहेबाला बारसीत पाठविले. पंतोजी व उपदेशक गेले, पण चावडीची जागा कोणी देईना. लोक ब्राह्मणांचा फार धाक बाळगतात. हे अस्पृश्यांना स्वतः शिकवणार नाहीत, व दुसऱ्यांना ते काम करू देणार नाहीत. महार जर शिकले, तर यांची हमाली कोण करील? यांच्या दास्यत्वात कोण राहील? हे अज्ञानाचे लोभी व ज्ञानाचे शत्रू आहेत. बारसीत व्यापाराची मोठी भरभराट आहे. स्पृश्यांची मुले गावठी शाळेत शिकतात. देवभोळे लोक तीर्थयात्रेस जाणारांना २–२०० रुपये देतात. परंतु शाळेस मदत देणार नाहीत. मेलेल्या बैलाची मूर्ती करून त्याची पूजा करतात व यात्रा भरवितात. पण शिक्षणास पैका देत नाहीत. यांचे भोळेपण व अज्ञान दूर होणे कठीण आहे.

२१९२ (२२ : ६, १६ मार्च ६३, ९३-९६)

अहमदनगर हे जिल्ह्याचे गाव आहे. औरंगजेब बादशहाचे हे आवडते गाव होते. त्याच्या वैभवाच्या खुणा या गावामध्ये दिसतात. येथील भुईकोट किल्ल्याभोवती खंदक आहे. त्यात हरिणे हिंडत असतात. पश्चिमेस सीना नदी आहे. पण ती पावसाळी नदी असल्यामुळे एरव्ही जोडेही भिजवू शकत नाही. मग पत्र्याची चोच कुठून भिजणार? शहरास ९ गावकुसूचे दरवाजे आहेत. त्यांस वेस असे नांव आहे. रस्ते स्वच्छ व सुंदर आहेत. कारण म्युनिसीपालिटी फार काळजी घेते. निजामशाहीत बसवलेल्या नळांनी पाणी येते. गंजबाजारात भाज्या मिळतात, तर कापडबाजारात सुशोभित अशी कापड-दुकाने आहेत. शेकडो मशिदी व दरगे आहेत. पूर्वेस लष्कराची छावणी असून युरोपियन भजनालय आहे. उडकाकच्या बागेजवळ मंगळवारी बाजार भरतो. सर्जेपुर वेशीजवळ मोठी धर्मशाळा आहे. गावाजवळ 'फऱ्याबाग' म्हणून तीन मजली इमारत आहे. तेथेच औरंगजेब बादशहा मुक्काम करी. चांदबिबीच्या महालात सलाबतजंगाची कबर आहे. सरकारी इंग्लिश शाळा असून तीन मराठी शाळा आहेत. व पोलिसांकरिता एक शाळा आहे. महारमांगांसाठीही शाळा आहे. एक पुस्तकालय आहे. परंतु आश्रय कमी असल्यामुळे त्याची स्थिती भिक्षुकी आहे. एक छापखाना असून तेथे वृत्तवैभव पत्र निघते. हे शहर पाऊण मैल लांब व अर्धा मैल रुंद आहे. (वृत्तवैभववरून)

२१९३ (२२ : ६, १६ मार्च ६३, ९६)

इराणची मदत बंद झाल्यामुळे हिरातचा सुलतान अहमद ज्यान हा अमिराशी सल्ला करण्यास तयार झाला आहे. आता तेथील लढाई थांबेल.

२१९४ (२२ : ६, १६ मार्च ६३, ९६)

रशियात एक राजविद्यालय आहे. तेथील पुस्तकालयात एक लक्ष ग्रंथ आहेत. हस्तलिखित पुस्तके व लेखमुद्रा आहेत. पदार्थसंग्रहालयात १६ फुटी चतुष्पाद प्राण्याचा पुतळा आहे. त्यास मामोथ म्हणतात. त्यास हत्तीप्रमाणे मोठे दात आहेत. याच्या शेजारी हत्तीचा सापळा आहे. पण तो मामोथापुढे लहान वाटतो. मामोथ सायबीरियात सापडला. आता त्याची अवलाद बुडून गेली आहे.

२१९५ (२२ : ६, १६ मार्च ६३, ९६)

आपल्यामागून आपल्या पुतण्यास राज्य मिळणार असेल, तर साकसीकोबर्गचा ड्यूक ग्रीसचा राजा होण्यास तयार आहे.
(खैरका खल्कवरून)

मुंबई, एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

## ज्ञानोदय, पुस्तक २२, अंक ७, मुंबई, १ एप्रिल १८६३

**२१९६** (२२ : ७, १ एप्रिल ६३, ९७-९८)

अमेरिकेतील बास्तनचा बातमीदार कळवितो की : मुंबईचे शेट माधवदास यांचे सुपुत्र करसनदास यांनी अमेरिकन लढाईत ज्यांची मोठी हानी झाली, त्या कुटुंबांना दोन हजारांची मदत पाठविली. ज्या दोन कुटुंबांतील दोन दोन उमेदवार पुत्र मेले, त्यांना ही मदत मि. रिचर्ड एच्साहेब देतील. मि. देनांनी या उदारपणाची फार स्तुती केली. ती अमेरिकन पत्रांमधून गाजते आहे. शेट करसनदास स्तर्न्स आणि कंपनीचे दलाल आहेत. त्यांच्या भलेपणाचे कौतुक करावे, तेवढे थोडेच ठरेल. कलकत्ता व मद्रास यांपेक्षा मुंबईचे लोक जास्त उदार आहेत, असे फ्रेंद आफ इंदियाने लिहिले. लग्नात व मूर्तींच्या उत्साहात खर्च करण्यापेक्षा दरिद्री व अज्ञानी लोकांसाठी खर्च करणे, जास्त चांगले असते. अशी परोपकाराची कृत्ये केली, तर ब्रिटिशांप्रमाणे त्यांस नैतची पदवी मिळेल.

**२१९६ अ** (इंग : ९७)

२१९७ (२२ : ७, १ एप्रिल ६३, ९९–१०१)

'हिंदुस्थानविषयी सन १८६१ सालचे पुस्तक' : हे पुस्तक मे. मर्डक यांनी छापले. यातील माहितीचा संग्रह फार उपयुक्त ठरेल. दर साल असे पुस्तक व्हावयास हवे. व्यवहारविद्या व धर्मसुधारणा यांची माहिती प्रसिद्ध झाली पाहिजे. राज्यकारभार, न्याय, शेतकी, टपालखाते, वाहतूक, शाळा, मिशने आणि मृत्यु, असे विषय त्यात आहेत. स्त्रीशिक्षण व स्त्रियांतील अनिष्ट चाली यांचीही माहिती दिली आहे. मिशनेऱ्यांच्या रपोटामध्ये अनेक अगत्याच्या गोष्टी आढळतात. मिशनांच्या कामाची किती भरभराट झाली, त्याची माहिती मिळते. इंग्रजी जाणणाऱ्या एत्तद्देशीय मित्रांनी हे पुस्तक जरूर वाचावे. अज्ञान व निकृष्टावस्था दूर होऊन ज्ञान व सुधारणा हे कार्य कसे चालते, ते जाणून घ्यावे. १८६२ चेही असेच पुस्तक तयार होईल. रे. मलन्स यांनी दशवार्षिक अहवालही तयार केला आहे. म्हणून दुसरे पुस्तक जास्त चांगले आहे.

२१९७अ (इंग : ९८–९९)

२१९८ (२२ : ७, १ एप्रिल ६३, १०२–१०४)

मुंबई एथील मनसाराम निवेदन करतात की : त्यांनी रीतसर बाप्तिस्मा घेतला. मालेगावचा हा गृहस्थ पोलिसात रैटर होता. मूर्तिपूजा व इतर चाली अत्यंत अयोग्य आहेत, अशी त्यांची खात्री झाली. प्रथम त्यांनी शास्त्रेपुराणे वाचली. एका भारथी गोसाव्यास गुरू केला. आपण ब्रह्म आहोत, अशा बाण्याने तीर्थक्षेत्रात हिंडले. युरोपियन सैन्याबरोबर हिंडताना इंग्लिश बुके वाचली. असिरगडच्या एका मित्राने पवित्रशास्त्राची माहिती करून दिल्ही. समुद्रमार्गे प्रवास करताना पडावातून ते पडले. ईश्वराचा धावा केल्यावर एका लाकडी फळीच्या आधाराने किनाऱ्यास लागले. जणू काही पापरूप समुद्रातून ईश्वराने वाचविले. २५ उतारूंपैकी सहाच जिवंत राहिले. वस्त्र गेले व द्रव्यही गेले. मित्राने बोध केल्यावर खात्री पटली की, येशू तारक आहे. शास्त्ररूपी निरे दूध रोज प्राशन केले. तारणाची भूक लागून ख्रिस्ताकडे गेले. आता रा. मनसाराम हनुमंतसिंघ आपल्याकडून ईश्वराचे गौरव व्हावे, म्हणून प्रार्थना करतात.

२१९८अ (दंम : १०१–१०२)

२१९९ (२२ : ७, १ एप्रिल ६३, १०४–१०८)

महंमदी धर्माबाबत (पुढे चालू)

शाळेत भूगोलखगोल शिकल्यामुळे धर्मावरील विश्वास उडतो, असे शाबुद्दीनास वाटते. पण मसी सांगतो की, पापाचा कर्ता ईश्वरच होय, असे प्रतिपादन करणे चूक आहे. ईश्वर लोकांना बहकावतो, नरकलोक भरण्यासाठी लोकांना अंधळे करतो, हे मत विपरीत आहे. ईश्वर पाप करवीत नाही. ईश्वराची आज्ञा मोडणे, हेही पापच आहे. म्हणून येशू म्हणतो, शेजाऱ्यावर प्रीती करा. विधर्मी लोकांना जकात घेऊन सोडावे किंवा तलवारीने मारावे, हे अयोग्य आहे. महंमदाच्या २५–३० स्वाऱ्यांत २५–३० हजार लोकांचा संहार झाला. स्वधर्मीयांचाच जीव फक्त मोलवान मानावा, ही क्रूरता नव्हे काय? जो धर्म दैहिक वासना तृप्त करण्यास मुभा देतो, तो अयोग्य आहे. वाटेल तेवढे निकाह लावणे, हे मानवतेविरुद्ध आहे. स्वर्गात पऱ्या व शराब मिळतात, असे सांगून लोकांच्या विषयवासना चेतविल्या जातात. पाप केल्यावर खैरात करून पुण्य मिळवावे, हा तर विपरीत विचार आहे. हज व जकात केली की, पापाचा नाश होतो, नमाज पापे दूर करतो, असे समजण्यात चूक आहे. तारणारा पवित्र असावा. स्वतः लावलेले नियम त्याने स्वतः मोडू नयेत. त्याचे चरित्र लाजिरवाणे असता कामा नये. येशू मात्र पवित्र असून सर्वकालचे जीवन देईल. अय मसी राहामदिल मैं छोडूं न दामन तेरा।

**२२००** (२२ : ७, १ एप्रिल ६३, १०८–१०९)

मारुती बापूजी नेवासकर हा अहमदनगरचा विद्यार्थी निबंधात लिहितो की : लेखणी ही ईश्वराची आवडती कन्या आहे. ज्ञान व विचार नसले की, माणूस जनावर बनतो. म्हणून ती श्रेष्ठ भूषणे बनली. इतर दागिने म्हणजे शरिरास केवळ भार होत. लेखणीचे तिळप्रायही ओझे होत नाही. लेखणी असली की, मनुष्य ज्ञान मिळविण्यासाठी सतत प्रयत्न करतो. ज्ञानाची शोभा चिरकाल टिकते. लेखणी इतर देशांतील रीतीभातींचेही ज्ञान देते. नक्षत्र व तारे यांची माहिती देते. हजारो वर्षांतील कथा लेखणीनेच स्मरणात ठेवल्या. लोहाचे सुवर्ण करणाऱ्या परिसापेक्षाही तिचे मोल अधिक आहे. परीस कल्पित आहे, तर लेखणी अगदी खरी आहे. एका दिव्यापासून दुसरा दिवा प्रकाशित होतो, त्याप्रमाणे लेखणी लोकांच्या जीवनात ज्ञानाचा प्रकाश वाढविते. दिवा विझून जातो, पण लेखणी मृत माणसांची आठवणसुद्धा जिवंत ठेवते.

**२२०१** (२२ : ७, १ एप्रिल ६३, १०९–१११)

ईश्वराने आपल्या शरिरात अन्नपुरवठ्याची स्वाभाविक अशी व्यवस्था केली आहे. त्याने शरिराचे सर्व व्यापार सुरळीत चालू राहातात. एखाद्या बिंदूवर दृष्टी एकाग्र करून धोंडा मारता येतो. शरीर थकले, तर डोळे आपोआप झाकून विश्रांती मिळते. उष्णता वाढली, तर रोमरंध्रातून घाम जाऊन उष्णता कमी होते. शरिराचे रस पातळ राहून पाण्याचा पुरवठा व्हावा, म्हणून आपणांस तृषा लागते. थंड प्रदेशात चरबीची आवश्यकता फार असते. पण उष्ण कटिबंधात स्निग्ध पदार्थ जास्त खाऊ नयेत. आपल्याकडे रगड पुरणपोळ्या व तूप खाण्याची पद्धत आहे. ती अयोग्य होय. ताप आलेल्या माणसास थंड पाण्याची गरज असते. इकडील वैद्य आजाऱ्यास पाणी पिऊ देत नाहीत. ते अशास्त्रीय आहे. जे जिभेस गोड लागते, ते खाण्यातही संयम असावा. बुद्धीचा रसनेंद्रियावर ताबा असला पाहिजे. जो पदार्थ बाधक आहे, तो वर्जावा.

२२०२ (२२ : ७, १ एप्रिल ६३, १११–११२)

(भागोबा कृत पदसंग्रह)

भागोबा पदामध्ये लिहितात की : दिव्य लोकाच्या किल्ल्यात आमचा उपाध्या राज्य करतो. पुराणातले सूर्यसिद्धांत चूक आहेत. जपीतपी संन्यासीही येशूसमोर हतबल होतात. चारी वेद या किल्लेदारापुढे थकून गेले. छत्तीस पाखंडांना त्याने नामोहरम केले. भुते व दैवते यांचे तोंड काळे झाले. सैतानाचे बंड मोडले. असा हा अजिंक्य किल्ला आहे. ब्रह्माविष्णुमहेशही थकले. ब्रह्मकर्माची पोकळ बडबड बंद पडली. सर्वांचा पिता दयाळू ईश्वर तेथे नांदतो आहे. नास्तिकांनी किल्लेदारास फितविण्याचा प्रयत्न केला. पण तो वाया गेला. येशू हा पक्का जामीन आहे. यज्ञपशूच्या अर्पणाची त्याला गरज नाही. खांबावर चढून त्याने प्रत्येकाचा जामीनदंड भोगला. आपल्या जीवाचे बलिदान करून जगाला पवित्र केले. खिस्ताच्या कृपेने आकाशाचे वतनदार व्हा. तेथे भूक-तहान-मरण नाही. दुःखे व संकटे नाहीशी होऊन येशूचा जयजयकार करतील. तेथून ढोंगेही दूर पळतील. बाप, पुत्र व पवित्र आत्मा, हा एकच निराकार भगवंत आहे. त्याच्यावाचून तारणारा नाही.

२२०३ (२२ : ७, १ एप्रिल ६३, ११२)

आताशा फार लोक विलायतेस जातात. रा. रामचंद्र बाळकृष्ण, वासुदेव बाबा, करसनदास मुळजी, हे व्यापारासाठी गेले. मोरेश्वर आत्माराम मात्र अभ्यासाकरिता गेले आहेत. ते सिविल इंजिनियर होतील. जमखंडीकरांनी मात्र बेत रहित केला.

२२०४ (२२ : ७, १ एप्रिल ६३, ११२)

१८५२ मध्ये खिस्ती शास्त्राचे भाषांतर १० भाषांत झाले. नव्या कराराचे १५ भाषांत झाले. ब्रह्मदेशात तर १४ भाषांत शास्त्र व १९ भाषांत नवा करार वाचण्यास मिळतात. हिंदुस्थान व लंका यांत शास्त्राचा अनुवाद बारा भाषांत व नवीन कराराचा पंधरा भाषांत झाला.

**२२०५** (२२ : ७, १ एप्रिल ६३, ११२)

मुंबईतील एका व्यापाऱ्यास कापसाच्या व्यवहारामध्ये १ लक्ष ६० हजार रुपये नफा झाला.

मुंबई, एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

---

## ज्ञानोदय, पुस्तक २२, अंक ८, मुंबई, १५ एप्रिल १८६३

---

**२२०६** (२२ : ८, १५ एप्रिल ६३, ११५–१२०)

अमेरिकेत लढाई चालू असूनही मराठी मिशनांचे काम व्यवस्थित चालले. १८६२ पर्यंत ६ लाख ७८ हजार रुपये मिळाले. खर्चापेक्षा ३३,५६४ रुपये जास्त मिळाले. बोर्डाचे कर्ज ३३ हजारांनी कमी झाले. एका साहेबाने तर २० हजार देऊन कर्जफेडीस मदत केली. सत्याचा पक्षी ईश्वर आहे. मूर्तिपूजकांत शुभवर्तमानाचा प्रसार करण्यासाठी स्वतःस नाकारले पाहिजे. सगळीकडून मनस्वी द्रव्य गोळा होते आहे. प्राप्तीच्या एकदशांश सर्वांकडून मिळतो. उत्तर अमेरिकेत भरपूर पीक आले, ते तुटीच्या प्रदेशात रवाना केले. हिंदुस्थानात तर एकही शाळा बंद पडली नाही. विधर्मी नेटिवांनी २४५ रुपये दिल्हे. १०९ गावांत ९९५ खिस्तीं लोक आहेत. सत्रा लग्नसमारंभ झाले. शास्त्र गाजविणारे उपदेशक चांगले कार्य करतात. २९ शाळांत २८५ विद्यार्थी शिकतात. त्यांत २८ मुली आहेत. पंतोजी गावकऱ्यांसही उपदेश करतात. एकेका शाळेचा खर्च वर्षाकाठी ६० ते ८० रुपये एवढा येतो. ईश्वरविद्येसाठी २५ विद्यार्थी येतात. त्यांत कुटुंबवत्सल माणसेसुद्धा आहेत. आठजण नवीन मंडळीस मिळाले, ते शेख दाऊदचे मुलगे आहेत. विद्यार्थी शिक्षकांबद्दल फार आदर व प्रीती दाखवितात. अनेक उमेदवार विद्यार्थ्यांना मिशनाने साह्य केले. महागाईशी मुकाबला करण्यास ही मदत उपयोगी पडते. एका सधन गृहस्थाने दिलेल्या देणगीमधून दहा विद्यार्थ्यांचा खर्च निघाला. कृपाळू ईश्वर मदत देतो. द्रव्यवान् गृहस्थ पुढे येत आहेत. कारण या कार्याचे मोल त्यांना समजते.

२२०६ अ (हंस : ११३–११५)

२२०७ (२२ : ८, १५ एप्रिल ६३, १२०–१२३)

बेळगाव जिल्ह्यात हलसगीला प्राणाचार्य या वैष्णवाने सोमयज्ञ केला. एक हजार रुपये खर्च झाला. त्यास सर्व जातींनी मदत दिली होती. यज्ञमंडपही घालून दिल्हा. २०० पासून चार हजार ब्राह्मणांना दक्षिणा दिल्या व जेवण दिल्हे. तुपाची इतकी चंगाळी झाली की, एक अजीर्णाने मेला. गावोगावचे ऋत्विज तसेच भोजनभाऊ आले होते. मात्र यज्ञाच्या आहुतीसाठी पिष्टपशु वापरण्यात आला. ब्राह्मणाकडूनच लाकूड घेतले. पण तो 'जातिभ्रष्ट' झाला, म्हणून त्यास २० रुपये दिल्हे. यजमानाच्या बायकोस स्वतंत्र खोलीत हरिणाजिनावर बसवून ठेवले होते. यजमान दांपत्यास उपवास करावा लागला. सोमरस तयार करून त्याची आहुती यज्ञात दिल्ही. पिष्टपशूस मेंढ्याचा आकार दिल्हेला होता. त्याला 'लटीकेचे' मुठीने मारण्यात आले. त्यातील पीठ मांस समजून यज्ञकुंडात टाकले. कड्याच्या यज्ञात खराखुरा पशू मारला होता. या यज्ञात मात्र पिठाचा पशू केला, कारण ही मंडळी वैष्णव आहेत. कानडी ब्राह्मणांना मांसाची इतकी किळस वाटते की, ते मांसाहार करीत नाहीत. कड्यात पशू मारण्याचे काम कुणब्याकडे दिले होते. विशेष म्हणजे जातिबहिष्कृत माणसास बक्षिस देण्यात आले आहे. सध्या त्याच्याकडूनच जेवण व दक्षिणा घेण्याची प्रथा पडली आहे. वेदधर्माच्या काळात स्त्रियांना मान होता, असे आपण समजतो. पण या यज्ञात यजमानपत्नीस कसलाच मान दिला गेला नाही.

२२०८ (२२ : ८, १५ एप्रिल ६३, १२४)

भागोबाच्या पदसंग्रहात ५० वर्षांपूर्वी पंढरपुरावरती जरीमरीने जो प्रलय केला, त्याचे वर्णन आहे. मरीचा शिक्का बसल्यावर लोक पळू लागले. हजारोंचा प्राण घेऊन पटकीने अगदी आकांत केला. गव्हाबरोबर तिने किडेही रगडले. यात्रेच्या क्षेत्राची मसणवाट बनली. दसऱ्यास त्यांनी रेड्याबकऱ्यांची आहुती दिली. तळकोकणासही मरीने वेढले. महागंगेला ६८ तीर्थांचा झाडाही मिळाला. सगळे प्राणी थरथर कापू लागले. पण लोक असे देवभोळे आहेत की, ते विठ्ठलास सोडून शेंदरी देवतांची भक्ती करू लागले.

२२०९ (२२ : ८, १५ एप्रिल ६३, १२४–१२८)

प्रिन्स आल्बर्ट यांचा विवाह डेन्मार्क देशाची राजकन्या अलेक्झांड्रिया हिच्याशी झाला.

२२१० (२२ : ८, १५ एप्रिल ६३, १२४–१२८)

ले. मेजर जेम्स उत्रामसाहेबाचा मृत्यू झाला.

२२११ (२२ : ८, १५ एप्रिल ६३, १२४–१२८)

६०-६१ मध्ये मुंबईतील ८६० लोकांनी देशांतर केले.

२२१२ (२२ : ८, १५ एप्रिल ६३, १२४–१२८)

सरकारी टाकसाळ रात्रीही चालू असते. रोज ३ लाखांची नाणी पडतात. (इंदुप्रकाशवरून)

२२१३ (२२ : ८, १५ एप्रिल ६३, १२४–१२८)

कलकत्त्यात २२५ देवळे आहेत. त्यात १४ प्रातंस्तनांची आहेत.

२२१४ (२२ : ८, १५ एप्रिल ६३, १२४–१२८)
नानासाहेबाची बायको काशीहून बिठूर येथे गेली.
(फ्रेंद ऑफ इंडीयावरून)

२२१५ (२२ : ८, १५ एप्रिल ६३, १२४–१२८)
साताऱ्च्या राजघराण्यावर काही संकट येऊ नये, म्हणून होळीमध्ये जिवंत मेंढरू जाळण्यात आले.

२२१६ (२२ : ८, १५ एप्रिल ६३, १२४–१२८)
रे. नारायण शेषाद्रींनी एका ब्राह्मण स्त्रीला अतिसारावर औषध दिल्हे. पण तिच्या नातेवाइकांनी गवगवा करून तिला पंचगव्य दिल्हे. आता लोक तिला शुद्ध समजतात.

२२१७ (२२ : ८, १५ एप्रिल ६३, १२४–१२८)
आग्रा येथे दरबार भरला, त्यात गवरनर जनरल यांनी सुरस भाषण दिले. समारंभ चालू असताना एका हत्तीने युरोपियनास ठार मारले.

२२१८ (२२ : ८, १५ एप्रिल ६३, १२४–१२८)
अयोध्येत ह्याही फिरवून कोणीतरी मुस्लिमांना इंग्रजाविरुद्ध चिथावले. कित्येक लोक आता अटकेत आहेत.

२२१९ (२२ : ८, १५ एप्रिल ६३, १२४–१२८)
इंग्लिश चर्चने ३० नेटिवांना पालकाची दीक्षा दिल्ही.

२२२० (२२ : ८, १५ एप्रिल ६३, १२४–१२८)
दक्षिण अमेरिकेचे सरकार उत्तर अमेरिकेची बाजू घेणाऱ्या गुलामांना ठार मारीत आहे. पोलिश लोकांनी रशियाविरुद्ध बंड केले.

**२२२१** (२२ : ८, १५ एप्रिल ६३, १२४–१२८)

खंडाळयात साहेबलोकांना मारहाण करणाऱ्या काळया शिपायांना सक्तमजुरींच्या शिक्षा झाल्या. महार शिपायांना तळयाचे पाणी पिऊ देऊ नये, या वादावरून ही मारामारी झाली होती.

**२२२२** (२२ : ८, १५ एप्रिल ६३, १२४–१२८)

वसईचा लोखंडी पूल तयार झाला असून त्यावर सुरतेस जाणाऱ्या रेल्वेगाड्या जाऊ शकतील.

**२२२३** (२२ : ८, १५ एप्रिल ६३, १२४–१२८)

रशियन राजपुत्र अमेरिकेस भेट देणार.

**२२२४** (२२ : ८, १५ एप्रिल ६३, १२४–१२८)

कमी अन्न खाण्याचा प्रयोग केल्यामुळे एक ख्रिस्ती मुलगा मरण पावला.

**२२२५** (२२ : ८, १५ एप्रिल ६३, १२४–१२८)

नामदार प्रिन्स ऑफ वेल्स यांची नेमणूक ब्रिटिश पार्लमेंटने चार लक्षांवर दहा लक्ष रुपये इतकी वाढविली, कारण त्यांचा विवाह झाला.

**२२२६** (२२ : ८, १५ एप्रिल ६३, १२४–१२८)

मिशनरी गरिबांनाच काय ते बाटवितात आणि गरीब माणसे पोटासाठी धर्म बदलतात, अशी टीका बंगाली वृत्तपत्रे करीत असत. पण आता बाबू ग्रीसचंद्र पत या सधन गृहस्थाने पत्नीसह ख्रिस्ती धर्माची दीक्षा घेतली. अर्थात् यात पराक्रम काहीच नाही. कारण ज्यास सत्याचा शोध लागतो, तो धर्मपालट करतो. खाजगीमध्ये अनेकजण नेटिवांच्या चालीबद्दल उद्वेगाने बोलतात. पण प्रसिद्धपणे धर्म बदलण्यास कोणी तयार नसते. आमच्या दृष्टीने गरीब व मातब्बर हा भेद गौण आहे.

मुंबई, एक्सचेंज प्रेस, फोर्ट

## ज्ञानोदय, पुस्तक २२, अंक ९, मुंबई, १ मे १८६३

**२२२७** (२२ : ९, १ मे ६३, १२९)

आपल्या महाराणी साहेबांचे ज्येष्ठ पुत्र आलबट एद्वर्ड् यांचे लग्न देन्मार्कची राजकन्या अलेक्झांद्रा हिजशी १० मार्च रोजी झाले. विन्सर किल्ल्यात हा समारंभ झाला. इंग्लंडमध्ये मोठाच दीपोत्सव झाला. या उत्साहात इतकी भीड जमली की, सात बाया चेंगरून मरण पावल्या. अनेकांना दुखापती झाल्या. भावी राजाराणींचा लोकांनी पराकाष्ठेचा सत्कार केला. या महानंदात एकाच गोष्टीने दुःख कालवले गेले, म्हणजे राणीच्या भ्रताराचा नुकताच झालेला अकालमृत्यू होय. राणीच्या दुःखाने प्रजेसही टोचणी लागली. राणीचा पुत्र व त्याची वधू त्यांची योग्य प्रकारे सेवा करोत व त्यांना मानसिक शांती मिळो, अशी प्रार्थना आहे. देवा, राणी वाचीव.

**२२२७अ** (इंग्र : १२९)

२२२८ (२२ : ९, १ मे ६३, १३१–१३३)

सोलापूरचे सेशन जज मि. होबर यांनी माधवराव पेशव्याचा मुकादमा कसा चालविला, ते जाहीर झाले आहे. माधवराव हा नानाचा सख्खा चुलतभाऊ होता. नानास नेपाळात सुखरूप सोडून माधवराव हैद्राबादेत आला होता. तेथे बंड करण्याचा प्रयत्न अयशस्वी झाल्यावर तो मोगलाईत गेला. नानाने त्यास सेनापतीचा किताब देऊन मोठ्या बक्षिसांची लालूच दिली होती. सालीना दहा हजार पगार ठरविण्यात आला. माधवरावाने कार्तिकाच्या आत पुण्याची गादी परत मिळवून अधिकारीसाहेब व मडमा यांना मारले, तर एक लाख त्रेपन्न हजारांचे बक्षिस व दोन मोठ्या जहागिऱ्या देण्याचे आश्वासन मिळाले होते. रदुल्लाखान नावाच्या इसमास अहमदनगर शहर लुटून किल्ला घेण्याचा हुकूम नानाने दिल्हा. त्यासाठी ५० हजारांचे बक्षिस कबूल केले. अधिकाऱ्यांना व युरोपियांना ठार मारले, तर १८ हजारांचे वेगळे बक्षिस देऊ केले होते. हैद्राबादच्या रेसिडेंतास ठार मारावे, असे नाना सांगे. पुण्यातील सावकारांच्या नावे १ लाख ११ हजार रुपयांच्या हुंड्याही त्याच्याजवळ सापडल्या. हा सर्व पुरावा पाहून जज्जाने माधवराव यास फाशीची शिक्षा सुनावली. मुंबई हायकोर्टाने ती रद्द करून त्यास काळ्या पाण्याची जन्मठेप मंजूर केली.

२२२८ अ (इंम : १३०–१३१)

२२२९ (२२ : ९, १ मे ६३, १३३–१३४)

२१ एप्रिल १८६३ रोजी बोरघाटातील लोखंडी रस्त्याने आगगाडी प्रथम धावली. मुंबई-पुण्याचे साहेब व मडमा समारंभ पाहण्यास आल्या होत्या. गवर्णरसाहेबांनी आधीच दोन दिवस खंडाळ्यात मुक्काम केला होता. गाडी घाटावरून उतरण्यास एक तास लागला. १५-१६ गाड्यांच्या मालिकेस वाफेची दोन यंत्रे जोडिली होती. गाडीतून जाताना दशदिशांचा सृष्टिसौंदर्याचा भव्य देखावा दिसला. रेल्वे कंपनीचे अचाट काम पाहून लोकांनी मोठ्याने जयजयकार केला. गाडीचे लोखंडी घोडे (यंत्रे) दीर्घ स्वराने भुभुकार करीत होते. खंडाळ्यात गाडी आल्यावर १९ तोफांची सरबत्तीही झाली. तेथेच सर्वांचे भोजन झाले. हा खर्च कंपनीने केला. बेंडबाजांचे मनोरंजक वाद्यवादन झाल्यावर भाषणे झाली. हा लोखंडी रस्ता ८ कोस आहे. समुद्रसपाटीपासून तो १८३१ फूट उंच आहे. त्यात २५ बोगदे असून ३९८६ यार्ड लांबी आहे. १ कोटी दहा लक्षांचे हे काम ७ वर्षे चालले. त्यापूर्वी ४ वर्षे पहाणी चालली होती. युरोपातील घाटरेल्वेपेक्षा हे काम अजस्र आहे. तीस वर्षांपूर्वी सर ज्यान माल्कम यांनी हा प्रस्ताव केला होता. त्यांनी पुणे ते पनवेल रस्त्याचे काम करून घेतले, तेव्हा एकाच दिवसात तो रस्ता ओलांडता येतो, हे पाहून लोक थक्क झाले. पण ईश्वर चांगल्या कामाचा बुद्धिदाता आहे. त्याची ज्ञान, बुद्धी व पराक्रम अनंत आहेत. म्हणून त्याच्यासमोर लीन व्हावे.

२२३० (२२ : ९, १ मे ६३, १३५)

मुंबई इलाख्यातील चर्च मिशनचे १५ युरोपियन मिशनरी, लंदन मिशनचा एक, स्कॉच असेंब्लीचा एक, फ्री चर्चचे आठ, ऐरिश मिशनाचे सहा, अमेरिकन बोर्डाचे १२, बाप्तिस्मा मिशनाचे २, जेर्मन मिशनचे ८, युनायटेड प्रेस्बितिरियनांचा एक, असे ५८ युरोपियन इकडे काम करतात. शिवाय २ इस्त इंद्यन आहे. एत्तद्देशी पालकांची संख्या ९ असून दीक्षा पावलेले उपदेशक ६९ आहेत.

२२३१ (२२ : ९, १ मे ६३, १३५–१३७)

'अ. त. ऐ. सां.' पत्रात लिहितात की : शिमग्याच्या दिवसांमध्ये पुराणिक व शास्त्री सावकारांची गाढवावरून मिरवणूक काढण्याचा प्रकार नेवाशात घडला. सावकारीचे प्रायश्चित्त म्हणून त्यांना गाढवावर बसविण्यात आले. या गर्दभारूढ व्यक्तींनी ब्राह्मणभोजनसुद्धा घातले. पशूचा स्पर्श झाल्यावर ते भ्रष्ट होतात की नाही, याचे उत्तर कोणीच देईना. कारण पोळीच्या ग्रासाला ते मुकले असते. प्रतिष्ठान नगराहूनही शुद्धिपत्र आणले गेले. मग ते ब्राह्मण भोजनास गेले. त्यांनासुद्धा प्रायश्चित्त घ्यावे लागले. विशेष म्हणजे, त्या दिवशी एकादशी असूनही ही मंडळी जेवली. यातून प्रश्न असा निर्माण होतो की, गाढवावरती बसणे, हे अयोग्य कर्म नाही काय? अपकीर्ती होत असूनसुद्धा असे कर्म ब्राह्मणांनी करावे काय? असल्या मोहिमा फत्ते होतील किंवा नाही, ते ज्योतिष्यांनी सांगावे, त्यांनाही लाभ होईल.

२२३२ (२२ : ९, १ मे ६३, १३७–१३९)

'भा. यं. पवार' पत्रात लिहितात की : महूपासून ४० मैलांवरती मांडवगड हे प्रख्यात शहर आहे. पूर्वीचे हे सुंदर शहर आता ओसाड दिसते. येथून १२ मैलांवर बियाबानी पिराची यात्रा दरवर्षास भरते. दीड दोन हजार लोक जमतात. एक भिल या ठिकाणाहून जात असताना त्याच्या हातातला वेळू या ठिकाणी हिरवा दिसू लागला. तेव्हा भिलाने मेंढरू कापून पीर शांत केला. तेव्हापासून ही यात्रा भरते. उरूसाच्या दिवशी तेथे हिरवी चादर (गलफे) व मलिदा ठेवतात. नैवेद्य देण्याचा मान भिल कुटुंबास आहे. येथून १५ हातांवर दगडाचा बहिरोबा आहे. त्यास प्रथम शेंदराचा टिळा लावतात. एका गृहस्थाची बायको नुकतीच वारली होती, म्हणून तो पिरास शिव्या देत होता. पण लोकांनी त्याची समजूत घातली की, तिचीही कबर पिराजवळ राहील. तेव्हा तो नेहमीप्रमाणे भक्ती करू लागला. धारच्या पवार सरकारचे शिपाई पिराचे श्वापदांपासून संरक्षण करतात. यात्रा संपल्यावर एक वाघ तेथे येतो व शेपटीने जागा झाडतो, असेही सांगतात. यात्रेत ढोलावरती गाणी म्हणण्याचा प्रघात आहे. हे लोक इतके ज्ञानशत्रू आहेत की, ते खऱ्या परमेश्वराऐवजी कल्पित देवांची भक्ती करतात. यांची भाषा रांगडी आणि चमत्कारिक आहे. ज्ञानाचा सूर्य त्यांच्या अंतःकरणांत उगवेल तो सुदिन.

२२३३ (२२ : ९, १ मे ६३, १३९–१४१)

ना. शे. आपल्या निबंधात लिहितात की : ख्रिस्ती धर्म काही १८०० वर्षांपूर्वीचा नाही. या जगात जेव्हा पापाचा प्रवेश झाला, तेव्हाच या धर्माचा उदय झाला. रोग झाला की, त्यावरचे औषध तयार होत असते. आदामने व हाव्वाने पाप केले, तेव्हा देवाने आश्वासन दिल्हे की, स्त्रीचे बीज सर्पाचे (सैतानाचे) मस्तक फोडील. हे वचन येशूबद्दल होते. कारण तो नामांकित आहे. तारणारा जन्मास येणार, या बाबतचे भविष्य सर्वांना ठाऊक होते. पुढे अब्राहामाच्या भाग्यवान संततीस हे भविष्य समजले होते. यहुदी लोकांनी हा संदेश राजामहाराजांपर्यंत पोचविला होता. ग्रीक व रोमी ग्रंथकारही त्याच्या जन्माची वाट पाहात होते. येशूवाचून दुसरा तारक नाही, हे सर्वांना पटले होते. पौलसाने सांगितले होते की, शास्त्र जाणूनही पाप करणारांचा तो न्याय करील. म्हणूनच हा धर्म इतरांपेक्षा प्राचीन ठरतो. येशूच्या जन्मानंतर सारेच आनंदित झाले. सुज्ञ व विचारशील लोकांनी त्याच्या जन्मदायी मार्गावर यावे.

२२३४ (२२ : ९, १ मे ६३, १४१)

कृ. र. आपल्या अभंगात म्हणतात की : देव नाही म्हणणारे मूर्ख आहेत. सूर्य–चंद्र, ग्रहण व उल्कापात यांवरून त्याचे सामर्थ्य दिसते. पाऊस, ढग, गारा, त्याचे अस्तित्व सांगतात. ज्वालामुखी आणि धरणीकंप त्याचे सामर्थ्य कळवितात. जरीमरीने व दुष्काळाने माणसे तडफडून मरतात, तेव्हा त्याच्या कोपाची जाणीव होते. अन्न, द्रव्य, संतती, या जगिक सुखांच्या मागे लागू नये. ज्ञानी लोकांनी खूप शोध केला, तरी तो गवसला नाही. नास्तिकांनाही अखेरीस पश्चात्ताप झाला. म्हणून दुर्जनपणा व दुर्बुद्धी सोडून देवावर विश्वास ठेवावा.

**२२३५** (२२ : ९, १ मे ६३, १४१–१४४)

इराणच्या शहाने निर्वाणीचा इशारा दिला की, हिरातचा वेढा उठविला नाही, तर आपण त्यावर हल्ला करू. हिरातचा सुलतान मात्र शरणागती पत्करण्यास तयार नाही. काकेशस पर्वतातील सर्केश्यन रहिवाशांनी झारच्या सैन्याचा पराभव केला. पोलिश सैन्यही मागे हटत आहे.

**२२३६** (२२ : ९, १ मे ६३, १४१–१४४)

नामदार विक्तोऱ्याचे दुसरे राजपुत्र आल्फ्रेद आजारातून बरे झाले.

**२२३७** (२२ : ९, १ मे ६३, १४१–१४४)

रे. मलन्स यांच्याकडून कळते की, कलकत्त्याच्या जनानखान्यात अभ्यासाकरिता २०० बाया व १०० मुली येतात.

**२२३८** (२२ : ९, १ मे ६३, १४१–१४४)

खंडाळ्याजवळ लानौलीस गारा पडून दोन माणसे मेली.

**२२३९** (२२ : ९, १ मे ६३, १४१–१४४)

ब्रिटनचे पंतप्रधान च्यार्लस वुड यांनी हिंदुस्थानामधून निर्यात होणाऱ्या कापसाचा सर्व तपशील मागितला आहे.

**२२४०** (२२ : ९, १ मे ६३, १४१–१४४)

हिंदुस्थानच्या ब्रिटिश मुलखात अडीच अर्ब रुपयांचा शेतकी माल पिकतो.

**२२४१** (२२ : ९, १ मे ६३, १४१–१४४)

मुंबईत डोळ्यांचे हास्पितल उघडण्याकरिता सेठ कावसजी जहांगीर यांनी ५० हजारांची देणगी दिल्ही.

२२४२ (२२ : ९, १ मे ६३, १४१–१४४)

साक्सी कोबार्गचा ड्यूक ग्रीसचा राजा होण्यास तयार नाही. सध्या तर मेंढपाळ नसल्यामुळे मेंढ्यांची व्हावी, तशी दयनीय स्थिती ग्रीकात दिसते.

२२४३ (२२ : ९, १ मे ६३, १४१–१४४)

रेल्वे रस्त्यासाठी ज्यांची घरे पाडावी लागतील, त्यांची वसाहत दिल्लीजवळ कुताळ या ठिकाणी केली जाईल. त्यांच्यावर सरकारची नजर राहील.

२२४४ (२२ : ९, १ मे ६३, १४१–१४४)

अहमदाबादच्या बाजारात १५ दिवसांत धान्याची मनस्वी महागाई झाली, कारण तिथले व्यापारी रेल्वे वॅनमधून धान्य मुंबईकडे पाठवून देतात. धान्याच्या तुटीस आगगाडी हे मोठेच कारण होऊन बसले.

२२४५ (२२ : ९, १ मे ६३, १४१–१४४)

महागाई वाढत असल्यामुळे मुंबई सरकार आपल्या नोकरांच्या पगारात शेकडा २० टक्के वाढ करणार आहे.

२२४६ (२२ : ९, १ मे ६३, १४१–१४४)

महागाईमुळे रामोशांचा पगार परवडत नाही, म्हणून साहेबलोकांनी रामोशांऐवजी बंगल्याच्या रखवालीसाठी कुत्र्यांची योजना केली.

२२४७ (२२ : ९, १ मे ६३, १४१–१४४)

हैद्राबादेचा दिवाण सालारजंग याने महागाईवर उपाय म्हणून ४ लक्ष रुपयांचे धान्य उत्तर हिंदुस्थानात खरेदी केले. सर्व शहरभर स्वस्ताई झाली. बंगालकडे त्याने ८ लक्ष रुपये रवाना केले आहेत. मछलीपट्टण बंदरातून धान्य येण्यास सुरुवात झाली. अहमदनगर जिल्ह्याच्या सरहद्दीवर मोगलाईत धान्याची मोठी पेवे साठली, पण ब्रिटिश हद्दीत आणण्यास मनाई आहे. म्हणून असे वाटते की, ही धान्याचे साठे आहेत, ही बातमी चुकीची असावी. कारण उदमी लोक तोटा सोसून साठा करणार नाहीत.

२२४८ (२२ : ९, १ मे ६३, १४१–१४४)

हैद्राबादच्या नबाबाचे चुलते अमीन एकबीर शमसूल यांचे ८३ व्या वर्षी निधन झाले. ते विद्वान व सुस्वभावी होते.

२२४९ (२२ : ९, १ मे ६३, १४१–१४४)

पाटस ते नगर असे सडकेचे काम चालू आहे. तेथील एक ब्राह्मण कारकून म्हारणीस लागू होता. त्याचे आस म्हणत तो आम्हांस मेला. पण आपल्याजवळच्या द्रव्याचा उदारतेने वेच करून तो प्रायश्चित्त घेईल व शुद्ध होईल !

मुंबई, एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

**२२५०** (२२ : १०, १५ मे ६३, १४५–१४८)

१ मे रोजी प्रिन्स आफ वेल्स याच्या विवाहाचा उत्सव मुंबईमध्ये साजरा झाला. उत्सव कमिटीने ११,५७५ रुपये जमविले होते. जागोजाग कमानी उभारलेल्या होत्या. रंगीत दरवाजे, दिवे, यांनी शहर लखलखत होते. कांपावर दारूकाम झाले. ८ हजार मुलांना जेवण देण्यात आले. अनाथ मुलांना पोषाक देण्याकरिता कावसजी मानकजी लिमजी व हामजी करसेटजी दादी यांनी तीन हजार रुपये दिल्हे. सोराबजी पेस्तनजी यांनी गरिबांचे सावकारी कर्ज फेडण्यासाठी साडेपाच हजार दिल्हे. जागोजाग दिवे प्रकाशत होते. दारूच्या भडक्याने एक पारशी मेला, तर १५-१६ मनुष्यांना जखमा झाल्या. गरम पेयांची पिंपे जागोजाग ठेवून लोकांना चहा, काफी वाटली. शाळांची नावे सोनेरी वर्खांनी सजविलेली होती. मुलांना मिठाई वाटली. शाळेतील मुलांनी बेंडबाजा लावून मिरवणुका काढल्या. राजपुत्र व त्याच्या पत्नी यांच्या नावातील अक्षरांचा आकार दिव्यांना दिला होता. त्यांच्या नावांच्या पताकाही चमकत होत्या. मुंग्यांप्रमाणे माणसे जमली. शिग्रमचे भाव दुप्पट झाले. शाळांनाही देणग्या मिळाल्या. एवढा भव्य व भडक समारंभ पूर्वी मुंबईत झाला नव्हता. बोहरी, हलवाई, तेलविक्ये, यांनी दुप्पट तिप्पट नफा मिळविला.

**२२५० अ** (इंग : १४५)

२२८१ (२२ : १०, १५ मे ६३, १४८–१४९)

रे. मिचेल २५ वर्षांपूर्वी या देशात आले. फ्री चर्चच्या पुणे व मुंबई येथील शाळांत त्यांनी शिकविले. गावोगाव हिंडून शुभवर्तमान गाजविले. यात्रेत खोट्या चाली सोडून देण्याचा उपदेशही केला. तसेच पुस्तके लिहिली. त्यांची भाषा शुद्ध व मजकूर बोधप्रद आहे. ते पुन्हा हिंदुस्थानात येतील, याची खात्री नाही. म्हणून जेनराल असेंब्ली विद्यालयात त्यांना निरोप देण्याचा समारंभ झाला. डा. भाऊ दाजी हे मिचेल यांचे विद्यार्थी असल्यामुळे त्यांनी समर्पक व उत्कृष्ट भाषण केले. हिंदुस्थानच्या खऱ्या कल्याणासाठी निष्काम बुद्धीने व मोठ्या आस्थेने श्रम करणारा विचारवंत म्हणून मिचल यांचा गौरव केला. रे. मिचेल यांच्या नावे स्कालरशिप चालू होणार आहे.

२२८१ अ (इंम : १४८)

**२२५२** (२२ : १०, १५ मे ६३, १५२-१५७)

अहमदनगर मिशनाच्या रपोटात रे. आबट लिहितात की : डोळ्यांचे दुखणे झालेला राहुरीचा माणूस पिराची भक्ती करीत असे. शेवटी आत्म्याच्या उद्धारासाठी तो आमच्यात आला. यावर्षी प्रत्येक ख्रिस्ती माणसास एक पेटी देण्यात आली. दर सप्तकास लोक तीत पैसे टाकतात. त्यांतून भोजनाची पात्रे घेतली. सामळ, खोकर, येथे साह्यकारी उपदेशक बोध करतात. एकच दुःखदायक घटना घडली, ती म्हणजे तैतलरसाहेबाची प्रिय कन्या अचानक मरण पावली. तिची कबर नगरास आहे. एक ८० वर्षांचा मानभाव म्हाताराही दीक्षा घेणार होता, पण त्याचा मृत्यू झाला. ख्रिस्ताच्या नावासाठी पाठलाग व निंदा सोसण्यास तो तयार होता. मिशनरी लोकांची एक चूक अशी होते की, ते नवीन ख्रिस्ती माणसाला आपल्या बंगल्यातच ठेवून घेतात. त्याऐवजी त्यांच्या गावातच त्यांस काही धंदा सुरू करून द्यावा. प्रभुभोजनास येणारांची संख्या सतत वाढते आहे, असे मि. बारकर सांगतात. पिंपळगावापासून वडाळ्यापर्यंत २७ गावांत मिशनाचे काम समाधानकारक आहे. एक रामोशीही सतत उपदेश ऐकतो. १३७ लोक कायम मिशनात राहातात. त्यांचा खर्च मंडळी चालविते. त्यांना शेतकीचा व्यवसाय दिल्यामुळे हा खर्च कमी होतो आहे. दुष्काळाने धारण महाग झाली. म्हणून ते निघून जाण्याचा संभव आहे. प्रत्येक गावात ज्ञानाचा दिवा असला पाहिजे. म्हणजे अंधक उजेड व अंधार नाहीसे होतील. बाप्तिस्मा व ख्रिस्ती विवाहसमारंभ पाहण्यास बरेच लोक येतात.

**२२५२ अ** (इंम : १४९-१५२)

**२२८३** (२२ : १०, १५ मे ६३, १५७–१५९)

'बीभत्सतेचा द्वेषक' लिहितो की : रा. भवानी विश्वनाथ यांच्या चालनामक निबंधाबद्दल ज्ञानबोधक पत्रातून कोणीतरी बीभत्स शब्दांत टीका करतो. मराठी वर्तमानपत्रे अशा मजकुराने बदनाम होत आहेत. संयुक्तिक व सभ्य टीकेचे कोणीही स्वागतच करील. पण पीनल कोड अशा हलकट भाषेसाठी सोटा घेऊन बसले आहे. सभ्य लोक असल्या लिहिण्याचा तिटकारा करतात. ईश्वराने दिलेल्या बुद्धीचा व विद्येचा हा दुरुपयोगच आहे. छद्मीपणाने व खोचून लिहिणाराच्या अंगात संभावितपणा, नीतीची आवड व देवाचे भय, यांचा अभाव असतो. असे लिहिण्याने वर्तमानपत्राची वजनदारी राहात नाही, तर कमी होते., चांगले विषयदेखील व्यर्थ जातात. याने कोणी सुधारत नाही किंवा त्याचे कल्याण होत नाही. गोड उत्तर कोप हरविते. क्रोध वाढतो तो कठोर भाषणाने. हलकट लिहिण्याचीच सवय लागू नये. वर्तमानपत्राचा धंदा तमाशेवाल्याप्रमाणे बिघाडणूक करण्याचा नाही, तर लोकांना सन्मार्गाकडे वळविण्याचा आहे. जसा गुरू, तसा चेला असतो. नीट विचार केला, तर हे बोलणे पटेल.

**२२८४** (२२ : १०, १५ मे ६३, १५९)

कृ. र. कवितेत लिहितो की : प्रभूने माझ्या संकटात मदत करावी. सदोम गमोराच्या नाशातून त्यानेच लोटास वाचविले. यहुदी लोकांना गुलामीतून सोडविले. सागर दुभागून त्यांना वाचविले. दाविद राजाची सगळी संकटे सहजगत्या निवारण केली. दानिएलास शत्रूंनी गुहेत फेकले तर देवाने सिंहाचे तोंडच बंद केले. शद्राख, मेशाख, आबेदगो, यांना अग्नीमधून वाचवले. ख्रिस्ती भक्तांनो, संकटात त्याची प्रार्थना करा.

**२२८५** (२२ : १०, १५ मे ६३, १५९–१६०)

प्रिन्सेस आलीस, विक्तोऱ्या राणीची द्वितीय कन्या व प्रिन्स हेसाची पत्नी, हिला कन्या झाली.

२२८६ (२२ : १०, १५ मे ६३, १५९–१६०)

प्रिन्सेस अलेक्झांद्रा विवाहाकरिता लंदनमध्ये आली, तेव्हा २० लक्ष लोकांनी तिचे स्वागत केले. घरे शृंगारून रोशनाई केली होती.

२२८७ (२२ : १०, १५ मे ६३, १५९–१६०)

कलकत्त्यात नवीन प्रकारचे धुराचे दिवे लावण्यात आले असून दिल्ली, अलहाबाद व लखनौ येथेही लावले जातील.

२२८८ (२२ : १०, १५ मे ६३, १५९–१६०)

कित्येक युरोपियन स्त्रियांनी तिरंदाजीमध्ये प्रावीण्य संपादून महमदा बाग एथे स्पर्धेत इनामे मिळविली.

२२८९ (२२ : १०, १५ मे ६३, १५९–१६०)

ज्ञानप्रकाशमध्ये एका पत्रात वसंत ऋतूबद्दल चमत्कारिक वर्णन केले आहे. लेखक म्हणतो की : वसंत ऋतू फार रमणीय, तसेच सुखकारक असतो, असे पूर्वीच्या कवींनी म्हटले. पण हा ऋतु अजिबात सुख देत नाही. त्याचे काव्यातील वर्णन वास्तविक नसून केवळ कवीचे लाघव आहे. वसंतात अवयव शिथिल होऊन ग्लानी येते. नऊ वाजताच तहान लागते. अन्नावर वांछा होत नाही. वाऱ्याच्या झुळकांत ऊन मिसळून चटके बसतात. दर चार दिवसांनी अभ्रे येतात. रात्रीही थंडावा वाटत नाही.

मुंबई, एक्सचेंज प्रेस, फोर्ट

ज्ञानोदय, पुस्तक २२, अंक ११, मुंबई, १ ज्यून १८६३

**२२६०** (२२ : ११, १ ज्यून ६३, १६१–१६२)

क्रिस्तियन व्हर्नाक्युलर सोसैतीच्या वतीने मिशन शाळांच्या पंतोजी लोकांची परीक्षा घेण्यात आली. ५३ उमेदवार होते. त्यांपैकी तीसजण परीक्षा उतरले. त्यांना १० पासून ३० रुपयांपर्यंत बक्षिसे मिळाली. नगर मिशनाचे सुदाम राघोबा यांना ३०, तर धोंडबा बापू यांना २५ रुपयांची बक्षिसे मिळाले. खिस्ती धर्माच्या सत्यतेची प्रमाणे आणि व्यावहारिक विद्या, असे विषय होते. दरसाल परीक्षा घेऊन त्यांना उत्तेजन दिल्हे जाते. गेल्या वर्षापेक्षा परीक्षा कठीण होती. गणिताचे प्रश्न तर कूटासारखे असून त्यांत हिशेबाचे भारूड होते. पण परीक्षेने पंतोजींचा फायदा होतो. खिस्ती धर्माबद्दल कोणी काहीही प्रश्न विचारले, तरी त्यास निरुत्तर करता येते.

**२२६० अ** (इंग : १६१)

**२२६१** (२२ : ११, १ ज्यून ६३, १६३–१६५)

जे. ब. ग. अमेरिकेतून भारतीय बहिणींना लिहिते की : तुमच्यामधील प्रत्येकीबद्दल मला प्रेम वाटते. तुम्ही येशूच्या कृपादानात व सद्‌गुणात वाढावे, असे मला वाटते. आमच्या देशात तर भयंकर लढाई चालू आहे. भाऊ भावासी भांडतो. रोज हजारो लोक मरत आहेत. आम्ही पापी असून ईश्वरासमोर दंडास पात्र आहोत. फावल्या वेळात बहिणी कपडे, सुरंबे करून सैनिकांसाठी पाठवितात. सोजरलोकांनी त्यांच्याबद्दल कृतज्ञ असावे. दर रविवारी शाळेतील मुले आपल्या खाऊचे पैसे आणून देतात. हा पैसा आम्ही तुमच्याकडे पाठवितो. इकडे शास्त्रपठणाच्या वर्गातून गोळा होणारी वर्गणी हिंदुस्थानात पाठवतात. मुली कपडे शिवून, फळे विकून येणारे पैसेही तुम्हांस पाठवतात. एक लहान मुलगी तर झाडण्याचे काम करून मजुरी तिकडे धाडते. तुम्हीही आम्हांस पत्रे पाठवा. आम्ही ती या उत्साही मुलांना वाचून दाखवू. प्रेमपूर्वक सलाम.

**२२६१ अ** (इंम : १६२–१६३)

**२२६२** (२२ : ११, १ ज्यून ६३, १६३–१६५)

फ्रेंद आफ इंदिया लिहितो की : मुंबईचे लोक फार उदार आहेत. लवकरच येथे युनिवर्सितीत शोभण्याजोगे विद्यालय बांधले जाईल. कावसजी ज्याहांगीर याने सुरतेस मोठा दवाखाना बांधला. तसेच मुंबईत युनिवर्सिती बांधण्यासाठी एक लाख रुपये दिले आहेत. देशोदेशी पर्यटक कामगारांसाठीही येथे फंड जमा होत आहे. बंगालमध्ये असे कोणी केले काय? एका रजपूत संस्थानिकाने, म्हणजेच जयपूरच्या महाराजांनी प्रेसिडेन्सी कॉलेजात ३० रुपये महिन्याची स्कालरशिप सुरू केली. आमचे बाबूलोक सहस्रावधी रुपये मिळवितात व एका रात्रीच्या पूजेत उडवून टाकतात. त्यांनी शिक्षणाकरिता देणगी दिल्ही, असे लिहिण्याची सुसंधी आम्हांस केव्हा प्राप्त होणार आहे ? विलासी बाबूंचा वर्तमानपत्रात होणारा निषेध अगदी योग्य आहे. अमेरिकेतील एक शाबाथ शाळा एका वर्षात जेवढे परोपकाराचे काम करते, तेवढे कलकत्त्याच्या सर्व धनाढ्य बाबूलोकांच्या हातून सगळ्या आयुष्यात होणार नाही.

**२२६२ अ** (इंम १६५)

**२२६३** (२२ : ११, १ ज्यून ६३, १६६–१६७)

'एक मित्र' कळवितो की : एका नेटिव खिस्ती माणसाने मुंबईतील व्यापारीसाहेबास देण्याकरिता काही माल भरून पुण्यास नेला. रेल्वेच्या हिंदू नोकरांनी बहुतेक माल घेतला. परंतु काही माल, म्हणजेच हाडांचे गठ्ठे घेण्यास फार जिकीर केली. त्याला शिवीगाळ केली. शिवाय मुंबईऐवजी खंडाळ्याची पावती दिल्ही. खंडाळ्याच्या मक्तेदार मंडळींनीही त्याची हेळणाच केली. जो भेटे तो शिव्या देई. म्हणूनच हा गृहस्थ पुण्यास परत येऊन नंतर मुंबईस गेला. हाडे मात्र खंडाळ्यात पडली आहेत. हिंदू चाकरांच्या सोवळ्यामुळे त्याचे नुकसान होईल. कारण हाडे लवकर नेली नाहीत, तर त्यास दंड होईल. आमची कंपनीस सूचना आहे की, असले सोवळ्याचे किंवा जातिभेदाचे मूर्ख नियम त्यांनी चालू देऊ नयेत. नाहीतर मुस्लिम व खिस्ती नोकर नेमावेत.

**२२६३ अ** (इंम : १६६)

**२२६४** (२२ : ११, १ ज्यून ६३, १६७–१६८)

'सूचक' पत्रात लिहितो की : भिंगारचा एक ब्राह्मण मुलगा नगरच्या इंग्रजी शाळेत शिकण्यासाठी पायी येतो. ऊनपावसाचा त्रास होतो, म्हणून त्याने भिंगारच्या लष्करी शाळेत नाव घातले. पण तेथे असा नेम झाला आहे की, काळ्या लोकांच्या मुलांनी दरमहा एक रुपया फी द्यावी. या मुलाचे वडील इंग्रेजी विद्येच्या विरुद्ध आहेत, म्हणून ते फी देत नाहीत. काही गोवेकर मुलांनी पाद्र्यास ही गोष्ट सांगितली. तेव्हा पाद्र्याने च्यापलेनसाहेबाच्या नावे चिठ्ठी दिली. मुलगा बंगल्यावर गेला, तर साहेबाच्या बुटलेराने त्याची चौकशी केली व स्वतःच त्याची फी देण्याचे कबूल केले. या नोकरास फक्त बारा रुपये पगार आहे. पण शिक्षणाची कळवळ फार आहे. ब्राह्मण मुलास धाकटा भाऊ समजून त्याने मदत दिल्ही. एकीकडे एक अज्ञानी बुटलेर शिक्षणास परक्या जातीला मदत करतो आणि दुसरीकडे ७०० रुपये पगारवाले कोणाला काहीही देत नाहीत! महागाई फार वाढली अश्या सबबी सांगतात. त्यांनी या बुटलेराचा कित्ता घ्यावा.

२२६८ (२२ : ११, १ ज्यून ६३, १६९–१७१)

'स्त्री कल्याणेच्छु' लिहितात की : आपल्या पत्राने ज्ञानलाभ होतो. ज्ञानसेन राजाच्या सैन्याकडून दैत्य अज्ञानासुराचा पराभव होतो. कुबुद्धी नामे रक्षक नामोहरम झाला. दुर्मतीने स्त्रीराज्यात बंडावा मांडला आहे. म्हणून मी ज्ञानसेनाच्या सैन्यात दाखल होणार आहे. स्त्रियांचा जन्मच व्यर्थ आहे. स्त्री जन्मली की, आईबाप कपाळावर आठ्या घालतात. मुलाचे मात्र लाड करतात. मुलीची ब्याद घालविण्यासाठी तिचे लग्न करून देतात. सासवा, दीर, नणंदा, तिला जाच करतात. सासर म्हणजे यमपूर असते. तेथे पोटभर अन्नही मिळत नाही. आपली स्त्री कोणाशी बोलली, तरी नवरा तिला जाच करतो. वृद्धपणी त्यांना भीक मागण्याची वेळ येते. विद्या नसल्यामुळे त्यांचा जन्म फुकट जातो. वास्तविक संसारसागरात स्त्री हा मानवाचा खरा सोबती आहे. परंतु तिच्या उद्धाराकरिता कोणी काहीही प्रयत्न करीत नाहीत. स्त्रीशिक्षणासाठी लेखक मोहीम उघडीत आहे.

यावर ज्ञानोदयकर्त्याची टीप : 'अशा उपयुक्त विषयावर वारंवार पत्रे आली, तर ती आम्ही आनंदाने प्रसिद्ध करू.'

(गद्य-पद्य-मिश्रित)

२२६६ (२२ : ११, १ ज्यून ६३, १७१–१७२)

'एक मुसलमान' पत्रात लिहितो की : घोडनदीजवळ मौजे कामरगावजवळ शाह अरफ या पिराची यात्रा भरते. ४० वडांच्या सावलीत हे ठिकाण जंगलात आहे. शेकडो लोक पुत्रप्राप्तीसाठी व संपत्तीसाठी नवस करतात. त्यांत हिंदूंचे प्रमाणही मोठे आहे. लग्न न होणाऱ्या कुमारिकाही त्याला नवस करतात. प्रथम मीरावली बाबा, नंतर शाह अरफ आणि शेवटी शैव्याचा झरझरीबक्ष, यांच्यासमोर त्या जातात. यावरून न्यायकोर्टांची आठवण होते. प्रथम सेशन कोर्ट, नंतर हायकोर्ट व शेवटी सुप्रीम कोर्ट. हा प्रवास करावा. विद्वान मुस्लीम म्हणतात की, ही तर शुद्ध मूर्तिपूजा होय. एका मुसलमानास अंत्यविधीसाठी नेले असता त्याच्या जावयाने एक कुराणाची प्रत व ५ रुपये देऊन मौलवीस म्हटले की, हे घ्या आणि याची पापे तुमच्याकडे लावून घ्या. मौलवी याला तयार झाले. खरे म्हणजे ईश्वराजवळ असल्या शिफारशी चालत नसतात. देवाचा पुत्र येशू यास खऱ्या भावनेने शरण जावे लागते.

२२६७ (२२ : ११, १ ज्यून ६३, १७३)

स. म. नांदगांवकर लिहितात की : वैराटगडाच्या पायथ्याजवळ दोन वडाची झाडे आहेत. एका वृक्षाचा घेर ६ बिघे आहे. दुसरा थोडा लहान असून तंबूप्रमाणे दिसतो. हे वड एकमेकांस शिवले, म्हणजे जग नष्ट होईल, असे साताऱ्याचे लोक सांगतात. पण या दोहोंचा स्पर्श होण्याचा काहीच संभव नाही. कारण त्यापैकी एक वृक्ष पार वठलेला असून तो तोडावा लागेल. झाडाचा मात्र नाश होईल. तर पहा, असली भविष्ये किती खोटी असतात. येशूची वार्ता ऐकल्यावर इकडच्या लोकांना मानसिक समाधान वाटले. प्रकाशाची जरूरी आहे.

**२२६८** (२२ : ११, १ ज्यून ६३, १७३)

कृ. र. कवितेत म्हणतात की : ख्रिस्तपदाची प्रीत मनामध्ये निर्माण झाली पाहिजे. शास्त्राचे चिंतन करण्यात आळस करू नये. भाविक भक्तांना पोथीची गोडी लागावी. प्रार्थनेच्या वेळी झोप घेण्याची खोड नसावी. अगणित पापांचा नाश व्हावा. आपणांला छळणाऱ्या सैतानाचे मस्तक देवाने फोडावे. तन-मन-धन देवाच्या पायी अर्पण करावे आणि शेवट गोड व्हावा.

**२२६९** (२२ : ११, १ ज्यून ६३, १७३–१७६)

लार्ड कार्निंगला ग्रीसचे राजपद मिळणार, ही अफवा मागे पडली आहे. आता म्हणतात, प्रिन्स विल्यम हा राजा होईल. विल्यमच्या बापाने अशी अट घातली की, पूर्वीचा राजा ओथो याने त्यागपत्र दिले पाहिजे. विक्टोऱ्याची कन्या लुइजा इसी विल्यमाचा विवाह होणार आहे.

**२२७०** (२२ : ११, १ ज्यून ६३, १७३–१७६)

दमास्कसमध्ये ख्रिस्ती व मुस्लीम या जमातींत दंगली सुरू झाल्या.

**२२७१** (२२ : ११, १ ज्यून ६३, १७३–१७६)

नानासाहेब अद्याप नेपाळातच आहे. पण नेपाळ सरकारने सहकार्य केल्याखेरीज त्याला पकडणे अशक्य आहे.

**२२७२** (२२ : ११, १ ज्यून ६३, १७३–१७६)

लाहोरात एका पाळीव हरिणाने मालकास शिंगांनी भोसकून मारले.

**२२७३** (२२ : ११, १ ज्यून ६३, १७३–१७६)

सिंध हैद्राबाद येथे दारूच्या कारखान्यास आग लागून २६ मनुष्ये मरण पावले. गंधक दळताना घर्षण होऊन आग लागली असावी.

**२२७४** (२२ : ११, १ ज्यून ६३, १७३–१७६)

वाण्यांचे महाराज कच्छमधून पुन्हा मुंबईत आले. या हत्यारबंद महाराजांना भजणारे अनेक संभावित शिष्य आहेत.

**२२७५** (२२ : ११, १ ज्यून ६३, १७३–१७६)

डाक्तर भाऊ दाजी व मि. कामा चार महिने हिंदुस्थानचे पर्यटण करून स्वस्तिक्षेत्र मुंबईत दाखल झाले. (इंदुप्रकाशवरून)

**२२७६** (२२ : ११, १ ज्यून ६३, १७३–१७६)

हिंदू पेत्रियत पत्रावरून कळते की : बंगालमध्ये दोघा अल्पवयीन विधवांचे पुनर्विवाह झाले. एकीचे वय ७, तर दुसरीचे ६ आहे. अनाथ वैधव्यग्रस्त अर्भकांस दुःखाग्नीतून वर काढण्याचे काम मुंबई शहरातही एक परभू गृहस्थ करीत आहेत. ते सुज्ञ व वजनदार आहेत. (ज्ञानप्रकाशवरून)

**२२७७** (२२ : ११, १ ज्यून ६३, १७३–१७६)

नगरचे नेतिव कमांडिंग अब्राहाम देविद हे पुण्यास बदलून गेले. त्यांच्या जागेवर सुभेदार बापूजी इस्राएल यांची नेमणूक स्टरसाहेब यांनी केली. सुभेदारांनी रैफल पलटणीत मोठी हुशारी दाखविली.

**२२७८** (२२ : ११, १ ज्यून ६३, १७३–१७६)

प्रकाशाचे किरण दर सेकंदास १,९०,२४९ मैल जातात.

**२२७९** (२२ : ११, १ ज्यून ६३, १७३–१७६)

मुंबईची लोकसंख्या सन १७१६ त सोळा हजार होती. १८४९–५१ मध्ये ती ५ लक्ष भरली. १३३ वर्षांत सवाएकतीस पटीची वाढ झाली. पण मुंबईत बाहेरून राहावयास येणारांचे प्रमाण फार मोठे आहे. शिवाय लोक पत्रके बरोबर भरून देत नाहीत, म्हणून मोठी तफावत राहाते.

२२८० (२२ : ११, १ ज्यून ६३, १७३–१७६)

इंग्लंदात १८६१ मध्ये रेल्वे अपघातांत १० लक्षांपैकी १·५ मेले व ३·१९ दुखावले, हिंदुस्थानात १० लक्षांत ५ मेले ६ जखमी झाले. पण इंग्लंडमध्ये जास्त लोखंडी रस्ते आहेत.

२२८१ (२२ : ११, १ ज्यून ६३, १७३–१७६)

ज्ञानोदयाने पूर्वी विनंती केली की, 'बाट्ये' हा निंदास्पद शब्द वापरू नये. ज्ञानप्रकाशने म्हटले आहे की, शब्द वापरण्यात काही दुष्ट बुद्धी नव्हती. वर्तमानदीपिकेने मात्र जाहीर केले की, आपण हा शब्द पुन्हा वापरणार नाही.

२२८२ (२२ : ११, १ ज्यून ६३, १७६)

मोलस्वर्थच्या मराठी इंग्लिश कोशाचा संक्षेप मि. बाबा पदमनजी करीत आहेत. बहुतजण विचारतात की, हे काम कोठवर आले आहे. सबब मि. बाबांनी जाहीर केले की, हा कोश एका महिन्यात तयार होईल. (ज्ञानोदयकर्ता)

मुंबई, एक्सचेंज प्रेस, फोर्ट

२२८३ (२२ : १२, १५ ज्यून ६३, १७८–१८०)

पुस्तकमंडळीने मुलांसाठी दहा छोटी नवीन पुस्तके छापली आहेत. चोरी, चहाडी, विश्वास, कल्याण, ईश्वरी अस्तित्व, असे विषय आहेत. प्रत्येकी किंमत १-२ पै आहे. 'कुणब्यासीं संभाषण 'मध्ये खरे ज्ञान आहे. 'पुष्पमाला' या पुस्तकात रे. मिचलनी मुलांकरिता रचलेली गीते आहेत. काही गाणी चांगली आहेत. पण काही जातींमध्ये अक्षररचना सुराला योग्य नाही. नेटिवांच्या नियमहीन चालीप्रमाणे लपेटीने व गडबडीने म्हणावे लागते. मराठी यमकांनी ही उणीव थोडीशी सावरली गेली. पुस्तक मंडळीचे कार्य सतत वाढत आहे. उष्ण काळाच्या भरातसुद्धा वसंत ऋतू आल्यावर रूक्ष अरण्यातील झाडांना नवे पल्लव फुटतात, त्याप्रमाणे ही पुस्तके आहेत. दहा पुस्तके येणेप्रमाणे : ( १ ) मुलांची पहिली पायरी, ( २ ) आकाशलोकाविषयी संवाद, ( ३ ) चोरी करण्यापेक्षा प्रार्थना करणे बरे, ( ४ ) कोणावर अथवा कशावर विश्वास ठेवावा, ( ५ ) चहाडी, ( ६ ) माझ्याने एथे कोणाचे काही कल्याण करवेल काय ? ( ७ ) एका नास्तिकाची ईश्वराच्या अस्तित्वाविषयी खातरी झाली, ( ८ ) लहान बदली, ( ९ ) कुणब्यासी संभाषण, ( १० ) पुष्पमाला अथवा लेकरांसाठी रचिलेली गीते.

२२८३ अ (इंम : १७७–१७८)

२२८४ (२२ : १२, १५ ज्यून ६३, १८१–१८३)

एडिन्बरा युनिवर्सिटीचे प्रो. सिंपसन यांनी येशूच्या मरणाविषयी शास्त्रीय विचार मांडले. खांबी खिळल्यावर त्याचे हृदय किंवा रक्ताशय फुटले असावे. पण त्याच्यासारखे ज्वानलोक इतक्या चटकन मृत्यू पावत नसतात आणि तो तर ६ तासांत मृत्यू पावला. खांबावर माणूस म्लान, अशक्त व मूर्च्छित होतात. हृदयाची धमणी फुटली, तरी लगेच मृत्यू येत नाही. मृत्यूअगोदरही तो बोलत होता. लगेच हृदयावर हात राहातो, हे मात्र खरे. एका रोमी शिपायाने त्याच्या कुशीत भाला भोसकला, तेव्हा रक्त व पाणी वाहू लागले. योहान्न जवळ उभा होता. म्हणून त्याला हे दिसले. फार दुःख झाले, तरी हृदय फुटते. येशूस मानसिक क्लेश फार झाले. दाविदाच्या गीतात म्हटले आहे की, 'हृदय मेणासारखे झाले। धिक्कारानेच फुटले।' खिळ्यांच्या जागी मात्र थोडे रक्त निघाले असावे. पाहा की, येशूने केवढे दुःख सोसले. आम्हांस नरकदंडातून सोडविले.

२२८४ अ (इंम : १८०–१८१)

२२८५ (२२ : १२, १५ ज्यून ६३, १८४–१८६)

रा. मोरोबा कानोबा प्रभृतींनी जाहीर विनंतिपत्र काढले की : स्त्रीचा भ्रतार मृत्यू पावला, तर मोठा अनर्थ होतो. म्हणून पुनर्विवाह करण्याची रीत असावी. पराशर स्मृती, हा कलियुगाचा आधार आहे. त्यात म्हटले आहे की, नवरा परागंदा, मृत, संन्यासी, नपुंसक, पतित असेल, तर स्त्रीचा पुनर्विवाह विधियुक्त आहे. बंगालमध्ये असा विवाह कायदेशीर ठरला. ब्राह्मण वगैरे जातींतील सुधारक तरुणांना हे मान्य आहे. बहिष्काराचे भय न बाळगता ही रीत सुरू करावी. जे लोक अनुकूल आहेत, त्यांचे साह्य घ्यावे, पुनर्विवाहित कुटुंबाकडे आपण भोजनादि व्यवहार करू, अशा अर्थाचे करारपत्र तयार केले आहे. त्यावर सर्वांनी सह्या कराव्यात. अनाथ स्त्रियांचे सहस्त्रशः आशीर्वाद घ्यावेत. यावर संपादक लिहितात की : हिंमत धरून असे प्रयत्न करावेत. कोरडे पांडित्य नको.

२२८५ अ (इंम : १८३-१८४)

२२८६ (२२ : १२, १५ ज्यून ६३, १८६-१८८)

रे. नारायण शेषाद्रींनी इंदापुरास मिशन स्थापन केले. ते सकुटुंब तेथे राहातात. हा विद्वान व समंजस माणूस तेथे आला आणि अशिक्षित गावाचे भाग्य उजळले. गावकरीही आर्थिक मदत करतात. एक इंग्रजी व तीन मराठी शाळा व पुस्तकालय चालू आहेत. शेषाद्री दर आठवड्यास व्याख्यान देतात. सरकारी शाळेतही शिकवितात. गरिबांसाठी दवाखानाही ते लवकरच सुरू करतील. गावावर अनायास वळलेल्या या वाहत्या गंगेचा त्याने फायदा करून घ्यावा. चव्हाट्यावर बसून निरर्थक गप्पा छाटू नयेत. लोकांनी विद्या व गुण घ्यावेत. गावकऱ्यांवर कोणतीही सक्ती केली जाणार नाही. पाद्रीलोक इतरांना फुस लावून ख्रिस्ती करतात, किंवा पाव देऊन बाटवतात, या समजुती खोट्या आहेत. विचारलहरीसारखे निंदा करणारे लोक निष्कारण टीका करतात. वृत्तवैभवाने मात्र चांगला अभिप्राय दिल्हा आहे.

२२८७ (२२ : १२, १५ ज्यून ६३, १८८-१९०)

स्त्रियांच्या स्थितीविषयी 'स्त्री कल्याणेच्छू' लिहितात की : काही स्त्रियांना लहानपणी विद्या मिळाली नाही, तरी सुशिक्षित व सुधारक पती मिळाल्यावर प्रौढपणी त्या शिकतात, विद्यामृताची कनकवाटी तोंडी लावतात. स्त्रियांनी तारुण्यात दुष्ट बुद्धीच्या लोकांच्या नादी लागू नये. असत्य व तर्कटी बोलून भ्रताराची अवज्ञा-अपमान करू नये. नाहीतर तुमचे भ्रतार स्त्री-शिक्षणाबद्दल प्रतिकूल ग्रह करून घेतील. त्यामुळे इतर स्त्रियांचेही शिक्षण बुडेल. मग स्त्रीशिक्षणासाठी विद्वान व संपादक लोक जे प्रयत्न करीत आहेत, ते वाया जातील. कित्येक सुज्ञांनी मुलींसाठी शाळा घालण्याचे प्रयत्न केले, ते अयशस्वी झाले. म्हणून तुम्ही सदाचारी नम्र सत्यवक्त्या व आशंकित व्हावे. तेणेकरून स्त्रीशिक्षण वाढेल. तुमच्याही काळाचा सद्व्यय होईल. नाहीतर, आपले दिव्य चक्षु फोडून दुराचरण करणाऱ्या आंधळ्याप्रमाणे तुम्ही उभयलोकी दुःखी व्हाल.

२२८८ (२२ : १२, १५ ज्यून ६३, १९०)

क्र. र. कवितेत म्हणतात : 'मरण प्रत्येकास येणार आहे. एखादा गोरगोमटा असला किंवा दूध-पेढे खाऊन पहिलवान झाला, अगर शेटसावकार किंवा राजा असला, तरी तो मरणारच. भोवताली कोट बांधून पहारा ठेवल्यामुळे मरण चुकत नाही. ज्ञानी माणसाचीही मूठभर मातीच होणार. देवऋषी, मांत्रिक, ज्योतिष, अगर डाक्तर जरी असला, तरी मृत्यू येणारच. संपत्तीचा ढीग केला, तरी मरण येणारच. बायकोमुळे दुःखी होणार. पण जो देवाच्या पावलाशी रमला, त्याच्या दृष्टीने मरण हा श्रेष्ठ लाभ ठरतो.

२२८९ (२२ : १२, १५ ज्यून ६३, १९०-१९२)

अमेरिकन युद्धात उत्तरेचा जय होत आहे. पोलंदमध्ये तह होणार. अमीरशी सुलतानाच्याही सल्ला होणार. तैपिंग राजाचा पराभव झाला.

२२९० (२२ : १२, १५ ज्यून ६३, १९०-१९२)

ग्रीसमध्ये एका गटाचा विल्यमला राजपद देण्यास विरोध आहे.

२२९१ (२२ : १२, १५ ज्यून ६३, १९०-१९२)

बंडखोर फिरोजशहा व फिरोजबख्त तेहरान येथे असून काही सरकारी नोकर त्यांच्याशी गुप्त पत्रव्यवहार करतात, असे समजले आहे.

२२९२ (२२ : १२, १५ ज्यून ६३, १९०-१९२)

वाघरलोक द्वारकेत पुन्हा गडबड करण्याचा संभव आहे.

२२९३ (२२ : १२, १५ ज्यून ६३, १९०-१९२)

हिंदुस्थानातील राज्यकारभारात काही उलटपालट होण्याचा संभव दिसतो.

२२९४ (२२ : १२, १५ ज्यून ६३, १९०–१९२)

बंगाल सरकारने देशी वर्तमानपत्रांतील मजकूर पाहून रपोट करण्याचे काम त्रान्सलेतराकडे दिले.

२२९५ (२२ : १२, १५ ज्यून ६३, १९०–१९२)

काश्मीरमध्ये नव्या मिशनाची स्थापना होणार.

२२९६ (२२ : १२, १५ ज्यून ६३, १९०–१९२)

१९ एप्रिलला नगरात मोठी उल्का पडली. यापूर्वी १८३२ त पडली होती.

२२९७ (२२ : १२, १५ ज्यून ६३, १९०–१९२)

या बातमीत पृथ्वीवरील हाल्लीचे मुख्य राज्यकर्ते, यांची माहिती दिली असून त्यात युरोपियन राजांचा व बादशहांचा तपशील आहे.

२२९८ (२२ : १२, १५ ज्यून ६३, १९०–१९२)

कोणाच्याही पोटात चुकून विष गेले, तर ९ मासे मोहऱ्यांची बुकणी अदपाव गरम पाण्यात मिसळून पाण्यात द्यावी, म्हणजे विष बाहेर पडून माणूस जगतो. शक्यतो विलायती मोहऱ्या द्याव्यात. देशी नकोत. (खैरखा खल्कवरून)

मुंबई, एक्सचेंज प्रेस, फोर्ट

## ज्ञानोदय, पुस्तक २२, अंक १३, मुंबई, १ ज्युलै १८६३

**२२९९** (२२ : १३, १ ज्युलै ६३, १९४-१९६)

'कवींचा मित्र' लिहितो की : हल्ली वृत्तपत्रांत अनेक विषयांवर कविता असतात. रा. महादेव गोविंदशास्त्रींनी प्राकृत कवितेची दोन पुस्तके प्रकाशित केली. स्मरणशक्तीस साह्य व्हावे, म्हणूनही कविता तयार होते. उदा. अष्टप्रधानांची नावे कवितेत गुंफली गेली. इतकेच काय, १८६० चा आक्ट मराठीत आर्याबद्ध झाला. सारांश, उत्कृष्ट कवी थोडे आहेत, बाकीची खोगीरभरती आहे. कविता करणारास गायन व वृत्त यांचे नियम माहीत असणे चांगले. भास्कर दामोदराचे वृत्तप्रकाश वाचावे. चाल शिकून कविता करावी. संस्कृत व गूढ शब्द वापरू नयेत. हलकट व कुणबाऊ शब्द वर्जावे. बीभत्स व निंदायुक्त काव्य करू नये. अन्यदेशीय लोक जर कविता करीत असतील, तर त्यांनी आपल्या देशाच्या चाली वापराव्यात. श्रीधर–मोरोपंतादि विख्यात कवींचे अवलोकन करूनही त्यांच्यासारखी कविता जमेलच, असे नाही. परदेशस्थांस तर २५–३० वर्षे अभ्यास करूनही आमची भाषा येत नाही. मग कविता करणे, ही अमळ विलक्षण गोष्ट म्हणावी लागेल. अशा हास्यास्पद कवीची उघड प्रशंसा तरी करू नये. आपणांस माहीत असलेल्या चालीवरच कविता करावी. काही इंग्रजी चालीही गोड वाटतात. तसेच, अभंगओवीच्या चालीतच कविता हवी, हा हट्टही अयोग्य वाटतो. गवईलोक कोणत्याही कवितांना योग्य चाली लावतात. यातून मराठी कवितेला प्रौढी येईल. कवींनी राग मानू नये.

**२२९९ अ** (इंम : १९३–१९४)

२३०० (२२ : १३, १ ज्युलै ६३, १९८–२०१)

कसबे कुंभारी जि. सोलापूर येथे वि. का. पाचेगावकर राहातात. हे गाव फार दुमदार आहे. आपल्या गावालगत ख्रिस्ती पंतोजी आला, म्हणजे संकट आले, असे लोकांना वाटले. 'मिशनरी काऱ्या' चा ते फार धसका घेतात. ईश्वर कृपेने अंधारी रात्र संपून उजेड झाला. ख्रिस्ती लोक आपल्या मुलांना शाळेतून विलायतेस नेतील, ही त्यांची भीती त्यांनी खोटी ठरविली. पण महार लोकांनाच शिकविण्यास सुरुवात केल्यावर त्यांस वाटले की, अस्पृश्य आपली बरोबरी करतील. ते महारांना धमक्या देऊ लागले. महारांनीही तोंडीस तोड उत्तर देऊन उंचवर्णीयांना गप्प केले. गावातल्या गोसाव्यांनी ८ दिवस भंडारा केला होता. लोकांना भोंदून खाणाऱ्या गोसाव्याची झडती झाली. मनुष्य मनुष्याचा गुरू होऊ शकत नाही. निष्पाप देवपुत्रच माणसाचा गुरू असतो. हे देशी गुरू आपण पापात लोळतात व इतरांसही लोळवितात. शिष्याचे घर लुटणे, त्याची बायको पळविणे, असले उद्योग करतात. एकदा एक स्त्री अंगात येऊन घुमू लागली. पण काही वेचक प्रश्न विचारल्यावर गाय झाली. संध्यकाळच्या वेळी भंडारावाले भ्रष्टाचारी गवळणींची सोंगे आणून करमणूक करतात. पण आता लोक शहाणे झाल्यामुळे गोसाव्यांची प्राप्ती कमी झालेली आहे.

ज्ञानोदयकर्त्यांची 'न थकता शुभवर्तमान गाजवावयास हवे आहे,' या आशयाची टीप.

२३०० अ (इंम : १९६–१९८)

२३०१ (२२ : १३, १ ज्युलै ६३, २०२–२०३)

पुणे स्माल काज कोर्टाचे जज्ज मोरोबा कानोबा यांनी पाठारे प्रभूमध्ये पुनर्विवाहाची रीत सुरू करण्यासाठी पत्रक काढलेले आहे. त्यांच्याच कुटुंबात दुःखकारक घटना घडली. त्यांची कन्या बालवयात विधवा झाली. मूर्ख रीतीच्या नादी लागून तिचे जीवन कायमचे दुःखमय करण्यास ते तयार नाहीत. पण असले अनुभव हजारो विधवा स्त्रियांना येत आहेत. विधवांना असह्य दुःखे भोगावी लागतात, अनेक मोह पडतात. याचे वर्णन 'यमुनापर्यटन' ग्रंथात बाबांनी केले आहे. तरुणांनी आपल्या कन्या, बहिणी व सुना यांची रूढीच्या बेडीमधून सुटका करावयास पाहिजे. या कामात घरातल्या म्हाताऱ्या स्त्रियांचा विरोध असतो. एका म्हातारीने मोरोबाच्या मुलीला चिथावले की, तुझा बाप तुझी दुर्दशा करीत आहे. म्हणून तिने विहिरीत उडी टाकली. पण असले लोक पुरुषांतही पुष्कळ आहेत. या वैधव्यरूप अनर्थाच्या खोल मुळावर घाव बसला पाहिजे. त्याकरिता लहानपणी लग्ने करण्यावर बंदी आली पाहिजे. विद्या मिळून प्रौढ झालेल्या मुलींची लग्ने झाली, म्हणजे भावी अनर्थ टळेल. दहा वर्षांच्या आत मुलींचे लग्न करणे, हे केवळ क्रौर्य आहे. रूढीस लाथ मारा. अज्ञानी लोकांचे सांगणे एकीकडे गुंडाळून ठेवा. अबला कन्यांचे वास्तविक कल्याण करा.

**२३०२** (२२ : १३, १ ज्युलै ६३, २०५–२०६)

ज्ञानप्रकाशावरून दिसते की : पुण्यात पुन्हा पाण्याचे प्रकरण उपस्थित झाले आहे. २१ जूनला रामचंद्र बाबाजी या ख्रिस्ती माणसाने बुधवार पेठेतील हौदामधून पाणी घेतले. नंतर ब्राह्मणांनी हौद शुद्ध केला, तरी त्याने रविवारी पुन्हा पाणी घेतले. सरकारी हौदातून पाणी घेण्याचा प्रत्येकास हक्क आहे. ज्ञानप्रकाशकर्ता उगाचच बाट्ये शब्दाचा वापर करतो. बाट म्हणजे विटाळ, असा त्याचा अर्थ असावा. त्यास वाटते की, विचारी व सत्यप्रिय लोकांना हे आवडणार नाही. परंतु रामचंद्राच्या वागण्यात अयोग्य काहीच नाही. त्रासदायक किंवा दुराचारी वागणुकीस 'बाट' म्हणतात. त्या अर्थाने पाणी घेण्यात दुराचरण काही नाही. अहमदनगरच्या पाणीतंट्यात इंग्लंदचे पंतप्रधान च्यार्लस वुड यांनी स्पष्ट निर्णय दिला होता की : मलिका-मा- आझमच्या जाहीरनाम्याचा लोक चुकीचा अर्थ लावतात. पाणी घेणारांना कोणीही त्रास देऊ नये. त्यास हरकत करणे हा गुन्हा ठरतो. बाबा परळीकर व महादेव दातार स्वतंत्र हौद बांधणार आहेत. त्याला कोणी मनाई करणार नाही. पुण्याचे सुभेदार अब्राहाम डेविड यांनी लोकांना कायदा समजावून देऊन थांगवले. जर तक्रार करावयाची असेल, तर ती लेखी करता येईल.

**२३०२ अ** (इंम : २०३–२०४)

**२३०३** (२२ : १३, १ ज्युलै ६३, २०६–२०८)

हिरातचा सुल्तान अहंमद तीन लक्ष रुपये प्रथम व नंतर दरसाल एक लाख रुपये घेऊन लढाई बंद करण्यास तयार होता. पण त्याचा मृत्यू झाला. त्याचा मुलगा शानवाज याचे मन अजून कळले नाही.

**२३०४** (२२ : १३, १ ज्युलै ६३, २०६–२०८)

रोमचा पोप फार आजारी आहे.

**२३०५** (२२ : १३, १ ज्युलै ६३, २०६–२०८)

टपालचे हशील व वजन यांबाबत एकच कायदा व्हावा, असे पारिस येथे भरलेल्या युरोपियन प्रतिनिधींच्या परिषदेत ठरले.

**२३०६** (२२ : १३, १ ज्युलै ६३, २०६–२०८)

तुर्की बादशहाने कान्स्तान्तिनोपल येथे पदार्थसंग्रहालय भरविले. त्यात चोबान्ताश नावाचा साठ लक्षांचा हिरा होता. तो चोरीस गेला आहे. दररोज १८०० लोक या ठिकाणास भेट देतात.

**२३०७** (२२ : १३, १ ज्युलै ६३, २०६–२०८)

१८५७ च्या बंडाविषयी एका नेटिवाने दिल्लीकडे एक पुस्तक प्रसिद्ध केले. त्यातील चित्रे पाहून अंगावर शहारे येतात. (वृत्तवैभववरून)

**२३०८** (२२ : १३, १ ज्युलै ६३, २०६–२०८)

महागाईमुळे लोकांची कर्जे बुडविण्याची प्रवृत्ती वाढते आहे. (वृत्तवैभववरून)

**२३०९** (२२ : १३, १ ज्युलै ६३, २०६–२०८)

पंजाबच्या राजघराण्यातील १०० बाया सुमारे एक लाख रुपयांचे पेन्शन खातात. त्यातील किती खऱ्या जिवंत आहेत, तेही कळत नाही. अंधळी दळती व कुत्री पीठ खाती.

**२३१०** (२२ : १३, १ ज्युलै ६३, २०६–२०८)

उटकमंडच्या एका साहेबाने कानात तीक्ष्ण शस्त्र घातले. त्याने जखम होऊन त्याची दातखीळ बसली व तो मृत्यू पावला.

मुंबई, एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

**२३११** (२२ : १४, १५ ज्युलै ६३, २१०–२११)

फ्रेंद आफ इंदियावरून समजते की : हिंदू ट्रेनिंग अकादमीमधील एक लहान मुलगा मिशनरी शिक्षकाकडून ख्रिस्ती धर्माविषयी माहिती मिळवीत होता. दाक्तर दफच्या मिशनात तो शिकत होता. उपदेशकाने त्याचे लहान वय पाहून त्यास घरी जाण्यास सांगितले. परंतु तो वारंवार राहण्याचा आग्रह करू लागला. मुलाने आपल्या बापासमोर सांगितले की, मला येथेच राहावयाचे आहे. पण बाप म्हणाला की, मुलाची आई म्हणते मुलगा घरी यावा. सर माडंट वेल्स या न्यायाधीशाने असा निकाल दिला की, या मुलाने आपल्या घरी जावे. पण १८४३ मध्ये श्रीपत शेषाद्रीप्रकरणात जज बर्टन यांनी वयापेक्षा बुद्धी व समज महत्त्वाची आहे, असा निर्णय दिलेला होता. १८४७ त एर्स्कंड गां बियर यांचाही निर्णय असाच होता. १८५६ त सर लारेन्स पील यांनीही बाब मुलाच्या मर्जीवर सोपविली होती. ही वहिवाट कायम असताना वेल्स यांनी आईबापाकडे मुलास धाडले. तेथे त्याच्या जिवास धोकाही होऊ शकेल. म्हणून आम्हांस दुःख वाटते.

**२३११ अ** (इंग : २०९–२१०)

**२३१२** (२२ : १४, १५ ज्युलै ६३, २११–२१२)

एप्रिल १८६४ मध्ये मिशन शिक्षकांची परीक्षा होईल, त्यासाठी दावीदाची बखर, रोमेकरांस पत्र, शिक्षापद्धती, या बरोबरच, गणिताची कोष्टके, क्षेत्राची मोजणी, रोमी बादशहांचा वृत्तांत, हे विषय आहेत. पुस्तके आपापल्या मिशनेरीसाहेबाकडून घ्यावी.

**२३१२ अ** (इंग : २११)

**२३१३** (२२ : १४, १५ ज्युलै ६३, २१४–२१८)

रा. ह. साळवे पत्रात म्हणतात की : कोपरगांवजवळ सावळाविहीर खुर्द व बुद्रुक ही जोडगावे आहेत. बुद्रुख सडकेच्या जवळ असल्यामुळे वाटसरू तेथे येतात. या गावात पंढरीचे वारकरी फार आहेत. अर्जुनबाबा हा महार मनुष्य तर चांगदेवाच्या वारीसही जाई. पंथाबद्दल तो फार आवेशी होता. त्यास ख्रिस्ती धर्म पटल्यामुळे त्याने दीक्षा घेतली. दैवतांचे खोटेपण पटून तो तारणाऱ्याकडे आला. मिशनपंतोजी म्हणून येथे आल्यानंतर अर्जुनचा जावई गवाजी मोरेही पोथीस येऊ लागला. गावकऱ्यांनी त्याचा तिरस्कार करून पाठलाग केला. हे लोक इतके भोळे आहेत की, पिंपळाच्या शेजारी पिंपरी होती, त्यांचा करकर आवाज ऐकून त्यांस मुंजोबाचे भय वाटले व त्यांनी २० रुपये खर्चून त्या दोघांचे लग्न लावले. तरीसुद्धा करकर ऐकू येतेच. गवाजीने बाप्तिस्मा न घ्यावा म्हणून लोक त्याजला खेटरे मारतात. एकदा त्याचे ७ रुपये, पागोटे चोरली व त्याजवर चोरीचा आरोप लादला. पाटील त्याची तक्रार घेईना. नंतर त्याने मारेकऱ्यांना दंड मात्र केला. माजिस्त्रेत माकफर्सन यांनी त्या दुष्टांना चांगली ताकीद केली. आता गवाजी आमच्याकडे येऊन ख्रिस्ताच्या कळपातील चांगले कोकरू होईल. सर्वसमर्थ ईश्वर त्याच्यावरची दुःखे व आरिष्टे दूर करील. अंधारमय ईश्वराचे गौरव होईल.

**२३१३अ** (इंम : २१२–२१४)

२३१४ (२२ : १४, १५ जुलै ६३, २१८–२२०)

'तुलाधारी' लिहितो की : मि. हावर्ड यांनी 'राजपुतान्यातील स्त्रियेची स्थिती' हे पुस्तक लिहिले. पण त्यांची भाषा तैम्सने अशुद्ध ठरविली. अर्थात त्यास मिशनऱ्यांच्या श्रमांची कल्पना आहे, पण ज्ञानप्रकाशने तर जास्त कडक टीका केली. बैबलाच्या भाषांतरास मेहरबानगीने मराठी म्हणावे लागेल. आणि मिशनऱ्यांच्या सहवासाने मराठी भाषाच बिघडली असल्याबद्दल अभिप्राय आहे. पण सध्याची मराठी, की जी मिशनरी लिहितात, ती शुद्ध व अस्सल आहे. अर्थात प्रत्येकाचा दृष्टिकोन वेगळा असतो. लाला ज्योतिप्रसादाचा मेणाचा पुतळा काहींना नानासारखा वाटला. त्याप्रमाणे एकाचे मत दुसऱ्याशीं मिळत नसते. मिशनऱ्यांचे लेखन अस्सल ब्राह्मणांसारखे वाटत नसेल. या बाबत लिहिताना वृत्तवैभवाने म्हटले होते की, मिशनेऱ्यांच्या सहवास नसताना अशुद्ध व विलक्षण शब्द लिहितात, त्याचे काय ? मरेकृत इतिहास नरसिंह विनायक ओकांनी भाषांतरित केला होता, त्यात अनेक चुका होत्या. मेजर कँडीने तर दादोकृत व्याकरणातही कितीतरी चुका दाखविल्या. अर्थात मिशनऱ्यांच्या भाषेस सर्वोत्कृष्ट कोणी म्हणणार नाही. पण भाषा बिघडविण्याइतकी वाईट खास नाही.

२३१५ (२२ : १४, १५ जुलै ६३, २२०–२२३)

सध्या तंबाखू हा पदार्थ कुळंबीमाळ्यांसही ठाऊक आहे. जागोजाग तंबाखूची दुकाने असतात. पण हा पदार्थ या देशात केव्हा आला, हे कोणास फारसे ठाऊक नाही. पांढरपेशे लोक व हरिदास म्हणतात की, मारुतीने द्रोणागिरी'पर्वत उचलून आणून लक्ष्मणाला जी वनस्पती औषधासाठी दिली, तिचा चौथा म्हणजे तंबाखू होय! पण हे वर्णन स्वकपोलकल्पित आहे. खरी हकीगत अशी की, तीनशे वर्षांपूर्वी हिंदुस्थानात तंबाखू कोणासही माहीत नव्हता. संस्कृतात याला शब्दच नाही. तंबाखू हा अमेरिकन देशभाषेतील आहे. १५६० साली तो अमेरिकेतून युरोपात आला. १५८६ त त्याची इंग्लंदमध्ये लागवड झाली. यानंतर तो हिंदुस्थानामध्ये आला आहे. आता हा पदार्थ लोकांना स्वदेशीच वाटतो. वर्जिनियाचा तंबाखू उत्कृष्ट असतो. आपल्याकडे मिरजेचा तंबाखू उत्तम आहे. पण हा पदार्थ शरिरास हितकारक नाही, तर तो विषतुल्य आहे. तंबाखूने कफ व वायू नष्ट होतात, या म्हणण्यात काही अर्थ नाही. गुण थोडे व अवगुण मात्र शतगुणित, असा हा पदार्थ आहे. तंबाखूने शरीराची मातीच होते. तंबाखू ओढल्यामुळे क्षुधा मंद होते. राजमान्य वाटणारी तपकीरसुद्धा घाणेरी व त्रासदायक आहे. क्रमाक्रमाने ही व्यसने कमी करावीत.
(बोधसागरवरून)

यानंतर तंबाखूचा निषेध करणारी कवने–आर्या, अभंग, श्लोक–दिली आहेत. (ज्ञानप्रसारकवरून)

२३१६ (२२ : १४, १५ जुलै ६३, २२३–२२४)

उत्तर अमेरिकेच्या सैन्याने विक्सबर्ग एथे विजय मिळविला. पोलंडमधील बंड पसरत आहे. दोस्त महंमदाच्या प्राणांतिक आजाराचा फायदा घेऊन अमिराने हिरात शहर जिंकले होते.

२३१७ (२२ : १४, १५ ज्युलै ६३, २२३-२२४)

नगरच्या सरकारी दवाखान्यातील डा. मि. दौलतसिंग हे गरीब आजाऱ्याकडे लक्ष न देता श्रीमंताकडेच लक्ष पुरवितात. तसेच सरकारी औषधे विकतात. श्रीमंताकडून दामदुपटीने पैसे घेतात. अशी खोटी अर्जी कोणीतरी पाठविली आहे. पण युरोपियन डाक्तरांनीच खात्री दिल्ही की, तक्रार खोटी आहे. मि. दौलतसिंघ गरिबांनाच नव्हे, तर अस्पृश्यांनाही चांगले वागवितात. कोणाचा एक पैसाही घेत नाहीत. कोणी देऊ केला, तर नम्रतेने नाकारतात.

२३१८ (२२ : १४, १५ ज्युलै ६३, २२३-२२४)

नानासाहेब पेशव्यास अजमेर येथे अटक झाली अशी बातमी आहे.

२३१९ (२२ : १४, १५ ज्युलै ६३, २२३-२२४)

बगदादच्या एका यहुद्याने मुंबईत बाप्तिस्मा घेतला.

२३२० (२२ : १४, १५ ज्युलै ६३, २२३-२२४)

वैद्यखात्यातील बेसनदी अधिकाऱ्यांनीही रूढीप्रमाणे पेन्शन देण्याचा सरकारने ठराव केला आहे. (वृत्तवैभववरून)

मुंबई, एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

**२३२१** (२२ : १५, १ ऑगस्ट ६३, २२६–२२७)

नानाने आपल्या दुष्टपणाच्या कीर्तीने जग भरून टाकिले, त्यास सहा वर्षे झाली. त्याने १८५७ त विश्वासघात करून युरोपियन लोकांना ठार मारले होते. नीरोच्या किंवा कलियुगाच्या क्रूर कृत्यांच्या मालिकेत नानाचे हे कृत्य गोवले गेले. बंडाचे इतर पुढारी मारले गेले. नाना मात्र वेषांतर करून नेपाळच्या पहाडात व तेराईच्या झाडीत लपत छपत फिरत राहिला. अटक न झाल्यामुळे त्याचा धिटावा वाढला व तो राजपुतान्यात हिंडू लागला. तो आजमिरास आला, तेव्हा त्याला कल्पनाही नव्हती की, न्यायाचे दूत रस्ता आटोपीत त्याच्यामागे आले आहेत. मुंबईचे पोलीस-अधिकारी फार्जेट यांनी आपली पराईत माणसे त्याच्या मागावर धाडली होती. गोसाव्याचा वेष धरून त्यांनी पाठलाग केला. नाना दृष्टिपथात आल्यावर डेविडसनला खबर दिल्ही. कप्तान ब्राडिगन याने नानास २ सोबत्यांसह पकडले. हा नानाच आहे, अशी अनेकांनी खात्री दिली. त्याच्या क्रूर कर्मांमुळे अनेकांना क्रोध आला आहे. नानाने बिऱ्हाड बदलले, तरी तो पकडला गेला. नानास शिक्षा झाली, म्हणजे इतर बंडखोर असली कृत्ये करण्यास भितील. ईश्वरी सूत्राने या जगदारण्यात असे विषारी वृक्ष उगवतात. त्यांच्या घातक दुर्गंधीने काही नाश होतो. पण असाही दिवस येतो की, त्याच्या मुळावर कुऱ्हाड पडून ते निर्मूळ होतात.

**२३२१ अ** (इंम : २२५–२२६)

२३२२ (२२ : १५, १ ऑगस्ट ६३, २२८–२३०)

मादागास्करचा तरुण राजा रादामा याचा खून झाला. पूर्वीच्या राणीच्या पदरच्या मुत्सद्यांनी त्याच्याविरुद्ध बंड केले. त्यांना इंग्रजी व फ्रेंच भाषा लिहिता येतात. रादामाने मिशनऱ्यांना मोकळीक दिल्ही. लॅबर्ट या फ्रेंच साहेबास जमीन दिल्ही. यातून आपल्या बेटाची स्वतंत्रता धोक्यात येईल, असे मुत्सद्यांना वाटले. यातच भर पडली ती अशी की, रे. एलीसने पूर्वीच्या राणीच्या थडग्याकडे ख्रिस्ती उपदेशक पाठवले. यातून माजी राणीची कबर विटाळली, असा त्यांचा समज झाला. नव्या राज्यघटनेचा प्रस्ताव त्यांनी आणला. त्यास विरोध केल्याबद्दल २७ जणांना फाशी देण्यात आले. राजानेही नवा कायदा नाकारला. म्हणून राणीदेखत त्यास मारण्यात आले. मिशनेऱ्यांनी काही कारवाई केली. त्यांना फाशी द्यावे, असा ठराव झाला. राबुदूस नामधारी राणीपद दिले. खरा कारभार होवा लोकांच्या हातात आहे. फ्रेंच सरकार कोणती कृती करणार, ते अद्याप समजले नाही. उदारमतवाद व परकीयांना स्नेहभाव या कारणांनी रादामाचा मृत्यू ओढवला. या हतभाग्य बेटाचा खरा हितकर्ता गेला. राबुदू ही नवीन राणी लोक कल्याणाची कृत्ये करू शकणार नाही. म्हणून ईश्वरानेच आपल्या भक्तांना वाचवावे, अशी आम्ही प्रार्थना करतो.

२३२२ अ (इंम : २२८)

**२३२३** (२२ : १५, १ ऑगस्ट ६३, २३०-२३१)

'एक बातमीदार' लिहितो की : कसबे बांबोरीत पारसनाथ आणि बालाजी यांची देवळे आहेत. तेथे एक साधू राहात असे. त्याचा खर्च समाजातील पंचायत देई. या बुवाला कृष्णकर्माची द्वाड सवय होती. हा धष्टपुष्ट साधू विनासायास खाण्यास मिळू लागल्यामुळे भ्रष्टाचारी झाला. त्याने एका स्त्रीस भ्रष्ट केले. भक्तांनी याकडे डोळेझाक केली. पुढे देवाचे डोळे चोरून विकून तो या स्त्रीसह परगावी जाण्यास निघाला. लेकरांची आठवण अनावर होऊन ती बाई घरी परत गेली. सरकारने चौकसी करून बुवास २० रु. दंड केला. त्याच्या भक्तांनी त्याचा दंड भरला ! मेंढराच्या वेशाने येऊन क्रूर लांडग्याप्रमाणे वागणाऱ्या साधूपासून सर्वांनी जपावे.

**२३२४** (२२ : १५, १ ऑगस्ट ६३, २३१-२३२)

'रिणको नाम हिंदू देवळालीकर' लिहितात की : उपाध्या भट्ट हा जबरदस्त सावकार असून त्याचे कर्ज २-३ पिढ्या फिटत नाही. मूल जन्मले की, पत्रिकेबद्दल त्यास दक्षिणा द्यावी लागते. ते जर मूळ नक्षत्री जन्मले, तर याची पोळी पिकलीच म्हणून समजा ! नामाभिधान, लग्न, वार्षिक ग्रहमान, वास्तु, शेतीचा मुहूर्त, प्रवास, मृताचे क्रियाकर्मान्तर, गोप्रदान, भूमिदान, वगैरे अनेक कारणांनी तो पैसा वसूल करून घेतो. तेणेकरून आम्ही फार दरिद्री झालो आहोत. सावकाराने कर्जाबद्दल एकदम हुकूमनामा करुन घ्यावा, असे वाटते. यावर संपादक म्हणतात की : थकलेले कूळ नादार असते. बापाच्या जिनगीचा वाटा सोडून द्या. म्हणजे सावकारी कर्जही मिटेल. वडिलोपार्जित धर्माचा त्याग करून स्थापित धर्माचा स्वीकार करा.

२३२८ (२२ : १५, १ ऑगस्ट ६३, २३२-२३५)

एक नगरकर पत्रात म्हणतो की : रा. केरो लक्ष्मण यांच्या बदलीनंतर रा. सा. नारायण विष्णु यांनी नगरच्या शाळेतील सभेची प्रथा चालू ठेवली. लोखंडाची माहिती देताना ते म्हणाले : जोड्यापासून पागोट्यापर्यंतच्या वस्तू लोखंडामुळे प्राप्त झाल्या. वैद्यक्रियेत लोह पौष्टिक ठरतो. हा धातू त्रिखंडांत सापडतो. तो दगडांशी मिश्रित असतो. भट्टीत अशुद्ध लोखंड शुद्ध होत असते. भट्टीत अशुद्ध लोखंड शुद्ध होत असते. बिलायतेत १०० हात उंचीच्या विशाल भट्ट्यांत त्याचा रस केला जातो. ज्यात कारबोन जास्त असते, त्यास बीड म्हणतात. शेतीची हत्यारे, बंदुका, तोफा, पोलादापासून बनवितात. तारायंत्र, लोखंडी रस्ते, जहाजे, यांत या धातूचा फार उपयोग होतो. गलबत खडकावर आदळले, तरी फुटू नये, याकरिता त्याच्यावर लोखंडाचे पत्रे मारतात. युद्धामध्ये शत्रूने बंदुकीच्या गोळ्या जरी मारल्या, तरी ते सुरक्षित राहतात. म्हणून या पत्र्यांची जाडी आता दहा इंच करण्यात येते. उल्कापात म्हणजे चंद्रावरून उडून येणारे धोंडे असू शकतील, असा शास्त्रज्ञांचा कयास आहे. वातावरणाशी घर्षण पावण्यामुळे ते तैजस बनून आकाशात उंच जातात. म्हणून लहान ताऱ्यांप्रमाणे दिसतात.

**२३२६** (२२ : १५, १ ऑगस्ट ६३, २३५–२३६)

दाक्तर चक्रबत्ति हा नामांकित पुरुष सन १८२२ मध्ये धाका प्रांतात जन्मला. लहानपणी आईबापे मरण पावल्यामुळे तो पोरका पोर झाला. त्याने गावातील शाळेत संस्कृत, फारशी व बंगाली भाषांचा अभ्यास केला. १३ व्या वर्षापर्यंत त्यास इंग्रजीचे काहीच ज्ञान नव्हते. एका सरकारी अंमलदाराचा परिचर झाल्यावर त्यास शिक्षणाची इच्छा झाली. तीन कोसांवरील इंग्रजी शाळेत तो जात असे. गुरूच्या घरी त्याने स्वैपाक्याची चाकरी पतकरली. पुढे त्याने वैद्यशाळेत प्रवेश केला. प्रसिद्धपणे हिंदू धर्माचा त्याग केला. त्याने विलायतेस जाण्याचे ठरविल्यावर त्याच्या नातलगांनी त्यास फार विरोध केला. पण त्याच्या मनोनिग्रहासमोर त्यांचे काही चालले नाही. इंग्लंडमध्ये त्यास सोन्याचा चांद, तसेच अबरूपत्रेही बक्षिसे मिळाली. हिंदुस्थानात परत आल्यावर त्याला सरकारने वैदशास्त्राच्या गुरूचे काम दिल्हे. पाहा की, उद्योग व हिंमत यांच्या जोरावर किती मोठ्या गोष्टी घडून येतात.
(मुलांकरिता चौथे पुस्तकवरून)

**२३२७** (२२ : १५, १ ऑगस्ट ६३, २३६)

देन्मार्कचा प्रिन्स क्रिश्चियन ग्रीसचा राजा होणार असून त्याने ग्रीसचे कायदे पाळण्यास तयारी दर्शविली.

**२३२८** (२२ : १५, १ ऑगस्ट ६३, २३६–२४०)

इंदापुरजवळ टेंभुर्णी या गावी विहिरीतून सतत दुर्गंधी येत असे. ७ जुलैला त्या विहिरीतून दुधासारखे पाणी येऊ लागले. तेव्हा गंगा प्रकटली, असे समजून लोकांनी तिची पूजा केली. करविरास दहा वर्षांपूर्वी असे झाले. त्यावर्षी भरपूर पाऊस पडून सुबत्ता झाली होती. पर्वतांचा स्वामी परमेश्वर याजवर विश्वास ठेवावा. निर्जीवावर भक्ती ठेवू नये.

**२३२९** (२२ : १५, १ ऑगस्ट ६३, २३६–२४०)

सरकारने विलायतेच्या डाकेसाठी ८ पैंची तिकिटे काढलेली आहेत.

**२३३०** (२२ : १५, १ ऑगस्ट ६३, २३६–२४०)

१८५७ मध्ये हुशंगाबादेस महामारीचा मनस्वी उपद्रव झाला होता. तेव्हा तेथील अधिकाऱ्यांनी तुरुंगातील कैद्यांना नियमाने अर्धा तोळा मीठ खाण्यास दिले. तेणेकरून त्यांचा बचाव झाला. मात्र स्वयंपाकात शिजविलेल्या मिठापेक्षा ते वेगळे असले पाहिजे. अग्नीच्या योगाने मिठाचा रोगमारक गुण नाहीसा होतो.

**२३३१** (२२ : १५, १ ऑगस्ट ६३, २३६–२४०)

तेलंगणाकडचे लोक बनवाघूळ किंवा वटवाघूळ यास पक्ष्यांमधील ब्राह्मण समजतात. परंतु हा पक्षी तर मांसे खातो. हा पक्षी अपशकुनी वाटतो. पण वटवाघूळ असले, तर डास आपोआप नाहीसे होतात.

**२३३२** (२२ : १५, १ ऑगस्ट ६३, २३६–२४०)

बंगालमध्ये ७४ मिशनें आहेत. २९ इंग्रजी शाळांत ७११९ विद्यार्थी, तर १५२ देशी शाळांमध्ये ५५१५ मुलगे व १९७७ मुली शिकतात.

**२३३३** (२२ : १५, १ ऑगस्ट ६३, २३६–२४०)

इंग्रज लोकांनी स्वदेशातून बाहेर जाऊन ३३॥ लक्ष चौरस मैल प्रदेश वसविला. त्यासाठी सरकारला तीन कोटी ३५ लक्ष रुपये खर्च येतो व त्यातील वसूल ११ कोट असून खर्च मात्र २७ कोट येतो. उत्पन्नाच्या अडीच पट त्यांना कर्ज झाले आहे.

(ज्ञानप्रकाशवरून)

**२३३४** (२२ : १५, १ ऑगस्ट ६३, २३६–२४०)

इंग्लंडमधून सालीना ५० कोटींचा माल निर्यात होतो. हिंदुस्थानसह राणीच्या साम्राज्यात पृथ्वीची १/३ (एक तृतीयांश) जमीन आहे व १/४ (एक चतुर्थांश) लोक प्रजा आहे.

२३३५ (२२ : १५, १ ऑगस्ट ६३, २३६–२४०)
धारवाडकडे निवडुंगाचा नाश करणारे किडे सापडले आहेत.

२३३६ (२२ : १५, १ ऑगस्ट ६३, २३६–२४०)
जर्मन संशोधकांनी गाणाऱ्या बिछान्याचा शोध लावला. माणूस निजला की, सुस्वर नाद येतो. विशिष्ट वेळी मधुर आवाजाने तो जागे करतो. (वृत्तवैभववरून)

२३३७ (२२ : १५, १ ऑगस्ट ६३, २३६–२४०)
ग्रेट ब्रिटनात ४० हजार यहुदी असून लंडनात २५ हजार आहेत.

२३३८ (२२ : १५, १ ऑगस्ट ६३, २३६–२४०)
मद्रासमध्ये ४ लक्ष २७ हजार लोक असून त्यांत २१,८३९ खिस्ती लोक आहेत. मुंबई–कलकत्त्यापेक्षा तेथे खिस्ती लोक जास्त आहेत.

२३३९ (२२ : १५, १ ऑगस्ट ६३, २३६–२४०)
हिंदुस्थानात ९८४ टपालकचेऱ्या आहेत. हिंदुस्थानची डाक ४५,५९४ मैल जाते. टपालातून ४ कोटी ६५ लक्ष पत्रे जातात. १७ लक्ष ५९ हजारांची तिकिटे विकतात. यंदा ३ लक्ष ९० हजारांचा तोटा आला. ६०-६१ मध्ये ८॥ लाखांचा तोटा आला होता.

२३४० (२२ : १५, १ ऑगस्ट ६३, २३६–२४०)
आगीच्या ठिणगीने रेल्वेमधील १५ हजारांचा कापूस जळून गेला. अमेरिकेत अशी आग आपोआप विझविण्याची युक्ती निघाली.

२३४१ (२२ : १५, १ ऑगस्ट ६३, २३६–२४०)
ग्रेट ब्रिटनमध्ये दरसाल शेकडा १ अशी प्रजा वाढते. युरोपात ती आठाने वाढते. ग्रीसमध्ये सर्वांत जास्त, ऑस्ट्रेलियात व फ्रान्समध्ये हे प्रमाण सर्वांत कमी आहे.

२३४२ (२२ : १५, १ ऑगस्ट ६३, २३६–२४०)

मुंबईच्या पवित्रशास्त्र प्रसारक मंडळीला माळव्यामध्ये काम करील, असा देशी ख्रिस्ती कामदार पाहिजे. त्याला मराठी, हिंदी, हिंदुस्थानी या भाषांचे किंवा निदान एका भाषेचे ज्ञान असणे आवश्यक आहे. तो धार्मिक माहीतगार व अब्रूदार असावा. पगार लायकीप्रमाणे १० पासून ३५ रुपयांपर्यंत मिळेल. उमेदवारांनी मि. रिचार्ड ग्यालब्रेथ यांजकडे अर्ज करावेत.

मुंबई, एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

ज्ञानोदय, पुस्तक २२, अंक १६, मुंबई, १५ ऑगस्ट १८६३

**२३४३** (२२ : १६, १५ ऑगस्ट ६३, २४३–२४७)

१८५९ मध्ये आग्रा येथे शाकेलसाहेबांनी एका भंग्यास दीक्षा दिली व त्यास शाळेवर शिक्षक नेमले. त्याच शाळेत त्याचा ७ वर्षांचा मुलगा शिकत होता. हिंदू स्पृश्य मुलांनी चळवळ सुरू केली की, त्याच्या मुलास शाळेतून काढून टाका. स्पृश्य मुले शाळा सोडून जातील, अशी परिस्थिती आली. १८० जण तर शाळा सोडून गेले. पण मूळ शाळेचा दाखला नव्हता, म्हणून त्यांना दुसऱ्या शाळेत प्रवेश मिळेना. त्यांनी मे. कॅम्पसन, डायरेक्टर यांजकडे तक्रार अर्ज दिल्हा की, या शाळेत उंच जातीचे नियम पाळणे कठीण झाले आहे, म्हणून आम्हांस सरकारी शाळेत घ्यावे. यावर कॅम्पसनने उत्तर दिल्हे की, विद्यार्थ्यांची वागणूक शिरजोर व गैरशिस्तीची आहे. मिशनचे मुख्य गुरू मेहनती असून विद्यार्थ्यांच्या कल्याणासाठीच ते प्रयत्न करतात. जातीवरून एखाद्या विद्यार्थ्यास शाळा प्रवेश नाकारू शकत नाहीत. राणीच्या जाहीरनाम्याच्या ते विरुद्ध ठरते. काही विद्यार्थ्यांच्या जातीय मागणीवरून कोणतीही चांगली शाळा आपले नियम सैल करू शकत नाही. अशी फजिती झाल्यावर या विद्यार्थ्यांनी हिंदूंचे कॉलेज काढून त्यास विक्टोऱ्या कॉलेज असे नांव दिले. मिशन शाळेमधील शिक्षकांना बहिष्काराचे भय दाखवून घाबरून सोडले. मिशनच्या शाळेतील विद्यार्थी मात्र सुज्ञ आणि आज्ञाधारक आहेत. निंदा आणि छळ सोसून ते आपले कर्तव्य पाळतात.

**२३४३ अ** (इंग : २४१–२४३)

**२३४४** (२२ : १६, १५ ऑगस्ट ६३, २४८–२५०)

नगर मिशनाची एक सेविका खेड्यात उपदेशकाचे काम करीत आहे. नगरात राहणे चांगले, पण आपण अज्ञानी लोकांची सेवा करावी, या हेतूनेच ती लहान गावात राहाते. जे आपणास येते, ते दुसऱ्यांना शिकवावे, असे तिला वाटते. खेड्यातील बहुतेक स्त्रिया सडकेचे काम करावयास जातात. खेडुतांच्या मूर्ख समजुती दूर करून त्यांना उपदेश करावा, असा या स्त्रीचा ध्येयवाद आहे. तेथील स्त्रिया इतक्या अडाणी आहेत की, त्या नेहमी उपदेशिकेस भुताचे भय दाखवितात. ती राहाते, ते घर भुताने झपाटलेले आहे, तेथे पीर आहे, असे मानून तेथे येण्यास कोणी धजावत नाहीत, आले तरी दहा हात दूर उभे राहातात. घराच्याभोवती चिंच, लिंब व कवठ अशी झाडे असल्यामुळे त्यांच्या दाट सावलीमुळे सूर्याचे ऊन घरात येत नाही. रात्रीच्या वेळी ते घर फार भयंकर वाटते. हे लोक भूतच काय, पण सटवाई, जोखाई, या क्षुद्र देवतांनाही फार भितात. म्हणून त्यांना पेत्रसाचा अभंग म्हणून दाखविला. त्याचा सारांश असा आहे की : देवाजवळ एक दूत होता. तो गर्वाने मत्त झाला. म्हणून तो भूत झाला. म्हणजेच, जो खरा भक्त आहे, त्याला भुतांची भीती बाळगण्याचे कारण नाही. तेव्हापासून स्त्रिया उपदेश ऐकण्यास येतात. ('भुताची उत्पत्ति' नावाचा अभंग दिला आहे.)

**२३४४ अ** (इंम : २४८)

२३४८ (२२ : १६, १५ ऑगस्ट ६३, २५१-२५२)

शरणपूर मिशनचे रे. इसेनबर्ग कळवितात की : एक मुसलमान तरुण मुंबईत मिशनात आला. देवळात शुभवर्तमान ऐकू लागला. दा. विल्सन यांचे 'महंमदी धर्माचे खंडण' हे पुस्तकही त्याने वाचले. फ्री चर्च मिशनाच्या शाळेत तो शिकत होता. परंतु त्याच्या बापाने त्यास रागावून या शाळेमध्ये न जाण्याची ताकीद दिल्ही. तेव्हा त्याने पुण्यास राहून मिचेलसाहेबाच्या शाळेत नाव घातले. त्याचा बाप तेथेही जाऊन पोहोचला, तेव्हा हा मुलगा नगरला आला. बापाने धमक्या देऊन त्याला मुंबईस नेले. पुढे वडलांस न कळविता त्याने जहाजावर नोकरी धरली. लंकामार्गे तो हाँगकाँगला गेला. तेथेही तो मिशनात नियमाने जात असे. काही काळ मकौ येथे राहिल्यावर तो मुंबईस आला व रे. शेषाद्रीकडे आला. बापाचा जाच सहन झाला नाही. म्हणून तो शरणपुरात आला. तेथे उद्योगशाळेत काम करून त्याने आजारी असूनसुद्धा बाप्तिस्मा घेतला.

२३४८ अ (इंस : २५०-२५१)

२३४६ (२२ : १६, १५ ऑगस्ट ६३, २५२–२५४)

'एक नगरकर' लिहितात की : राजे हे लोकांचे प्रभू असल्यामुळे त्यांच्या चालीरीती वरकड लोकांपेक्षा वेगळ्या असतात. राजकुळामधील क्रिया सुवर्णाच्या पद्धतीने चालतात. नगरला सातारकर व्यंकोजी राजे २-३ वर्षांपासून होते. त्यांची पत्नी मरण पावली. तिची उत्तरक्रिया विशेष सन्मानाने केली. पालखीचा शोध केला, पण ती न मिळाल्यामुळे मेण्याची व्यवस्था करावी लागली. चंदनाची लाकडेही मिळाली नाहीत. भारी वस्त्रप्रावरणे व अलंकार यांसह उत्तरक्रिया करावी लागते. परंतु हे घराणेच विपत्तिग्रस्त झाले आहे. म्हणून हलक्या किंमतीचे दागिने आणले. ब्राह्मणांना मात्र चौकाळ रुपये मिळाले. हस्तिदानाऐवजी एकास ५० रुपये दिले. शय्यादानाबद्दल बाजारू पलंग दिल्हा. तरीही क्रियाकर्मांतरास चार हजार खर्च झाले. राजघराण्यातील व्यक्तीने हे कर्म करावयाचे नसते. तसेच त्यांना सुतकही नसते. म्हणून दोघा मराठे मनुष्यांनी हे केले. त्यांना २–२०० रुपये दिल्हे. राव आणि देव समान, या समजुतीमुळे अशा रीती पडल्या असाव्यात. तरी राज्यभ्रष्ट लोकांनी या चाली पाळू नयेत. व्हिक्टोरिया राणीचे भ्रतार मृत्यू पावले, तेव्हाही त्यांची उत्तरक्रिया साध्या रीतीनेच झाली.

२३४७ (२२ : १६, १५ ऑगस्ट ६३, २५४–२५६)

ग्वाल्हेरचे महाराज जयाजीराव शिंदे अलीकडे मनस्वी दानधर्म करीत आहेत. सर्व क्षेत्रांच्या ठिकाणी ब्राह्मणभोजने करण्यात दोन लक्ष खर्च झाले. शिवालयेही बांधली जात आहेत. विठूरचे अन्नसत्र चालू करून अलिजा बहादूरांनी ६५,००० सोन्याच्या मोहरा वाटल्या. कार्तिकी पोर्णिमेच्या ब्राह्मणभोजनास १५ लाखांचा खर्च होणार आहे. कीर्तने, ज्योतिर्लिंगावर अभिषेक, यांची झिम्मड उडाली आहे.

१०८ तहशिलाच्या गावी शंकराची देवळे तयार करून पूजेसाठी नेमणूक होईल. कै. बायजाबाई शिंदे यांनी १५ लक्ष रुपये ठेवले होते. त्या व्यतिरिक्त शिंदे स्वतः दानधर्म करताहेत. कारण त्यांच्यावर गंडांतर येण्याचे भविष्य वर्तविले गेले. पार्थिवपूजा करीत असताना हातावर लिंग फुटले, हा अपशकुन झाला. त्यातून काही अरिष्ट उद्भवू नये, म्हणून हे कार्य चालले आहे. सत्यदीपिकेने त्यांना फार बोध केला होता. पोटबाबू भट्ट काही फुसक्या कारणावरून दानधर्माचा सल्ला देतात. म्हणून या कार्यात पुण्य तर नाहीच, व्यर्थ खर्च मात्र होतो. अनाथ व पंगू यांची सोय करा, शाळा, रस्ते, पूल बांधा, ग्रंथ करणारांना बक्षिसे द्या. आमचे राजे सुशिक्षित झाल्याखेरीज हे अशक्य आहे.

२३४८ (२२ : १६, १५ ऑगस्ट ६३, २५४–२५६)

उत्तर अमेरिकेचा सेनापती जनरल मीड याने बंडखोरांचा सेनापती ली याचा संपूर्ण पराभव केला. विक्सबर्ग हे महत्त्वाचे ठाणे जिंकले.

२३४९ (२२ : १६, १५ ऑगस्ट ६३, २५४–२५६)

दलीपसिंग महाराज इंग्लंडमध्येच स्थायिक झाले असून त्यांनी ५२०० एकर जमीन महालासाठी दहा लक्ष वीस हजार रुपयांस खरेदी केली.

२३५० (२२ : १६, १५ ऑगस्ट ६३, २५४–२५६)

मुंबईचे माजी गवर्णर सर ज्यान क्लार्क यांना दहा हजार रुपये पेन्शन मंजूर झाले. त्यांची चाकरी ४० वर्षे झाली. पण कलेक्टरांना व जड्जांनाही एवढीच पेन्शन मिळते, असे ऐकतो, तर हे कसे काय ?

२३५१ (२२ : १६, १५ ऑगस्ट ६३, २५४–२५६)

जयाजीराव शिंद्यांची आजी बायजाबाई वयाच्या ८० व्या वर्षी मृत्यू पावली. तिची जिनगी पाऊण लाख रुपयांची आहे. तिचा पूर्वेतिहास दानधर्म व परोपकार यांबरोबरच जुलूम, कपट व क्रूरपणा यांनी भरलेला आहे. खरा वृत्तांत कोणी प्रसिद्ध करील तर बरे !

मुंबई, एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

**२३५२** (२२ : १७, १ सप्तेंबर ६३, २५९–२६३)

हानोरचा पौलस गणेशराव कौसिक याने जेर्मन मिशनात दीक्षा घेतली. हा सारस्वत तरुण इंग्रजी शाळेत ख्रिस्ताविषयी माहिती मिळवून शास्त्राचा एकांतात अभ्यास करी. मूर्तिपूजेवरचा विश्वास उडाल्यामुळे प्रसिद्धपणे ख्रिस्ती होण्याचे त्याने ठरविले. त्याचा बाप मामलेदार होता व सारस्वत मंडळी समाजात वजनदार आहेत. म्हणून आपणांस मोठे झुंज करावे लागेल, याची त्यास कल्पना होती. त्याचा ख्रिस्ती मित्र कौंडिन्य त्यास मदत करी. एकदा तर त्याच्या बापाकडे एक खास औषध आले होते. ते घेतले की मुलगा परत हिंदू धर्माकडे वळेल, अशी चिठी त्यासोबत होती. मिशनरीसाहेबाने त्याची परीक्षा घेतली. पण त्याचा बाप मिशनऱ्याच्या घरी आला. गावकरीही जमा झाले. गणेशरावाच्या गळ्यात रुमालाचा वेढा टाकून त्यास मारण्याचाही त्यांनी प्रयत्न केला. बापाने काकुळती येऊन मुलास विनंती केली की, तू घरी चल. मुलाने उत्तर दिल्हे की, जर मूर्तीचा अनर्थ नसता, तर आपली अशी ताटातूट झालीच नसती. लोक म्हाणाले की, हा बापाचा पूर्वजन्मीचा शत्रू असून त्याजवर सूड उगवीत आहे. शेवटी गणेशरावाने बायकोची समजूत घालावी, अशी तडजोड झाली. पण घरी गेल्यावर प्रीतीने व धमकावण्याने त्यास फितविण्याचा प्रयत्न झाला. शेवटी मित्राने त्यास दूरच्या गावी नेले. ख्रिस्ताची सेवा करण्याचा त्याचा निश्चय पक्का होता. दीक्षेनंतर त्याचे नाव पौलस ठेवण्यात आले. तो उपदेशक होणार आहे.

**२३५२अ** (इंम : २५७–२५९)

**२३८३** (२२ : १७, १ सप्टेंबर ६३, २६४–२६६)

रे. एलिस कळवितात की : आता मिशनरी कामास जसी बळकटी आली, तसी पूर्वी कधी आली नव्हती. माजी राजा दुसरा रादामा क्रूर, दुष्पी, भोळवट व अल्पविचारी होता. त्यातच तो मनस्वी मद्यपी झाला. मूर्तिपूजकांनी त्याच्या दुबळ्या मनाचा फायदा घेतला. आपणाला काही चमत्कारिक आजार झाला, असे त्यांनी दाखविले. कित्येक लोक रस्त्याने उड्या मारीत चालत. ते म्हणत की, मृत राजमाता व दुसरे मृतात्मे शरिरात येऊन सांगतात की, प्रार्थनेस बंदी करा. म्हणून राजाने हुकूम काढला की, यांच्या स्मरणार्थ रस्त्यावर टोपी काढून उभे राहा! कित्येक ख्रिस्ती लोकांना व दरबारी सरदारांना तो मारणार होता. तलवारीने झुंज करणारास त्याने अभय दिल्हे. मग सहा हजार लोकांनी सभा भरवून राजास घेरले आणि बळजबरीने हुकूम रद्द करावयास लावले. झटापटीत राजा मरण पावला. सभेने ठराव केला की राजाची आपमुखत्यारी रद्द झाली आहे. प्रतिनिधी सभेचाच बेटावर अधिकार चालेल. राजाराणीने दारू पिऊ नये व बेटावर धर्मसंबंधी मोकळीक असावी. विधवा राणीस त्यांनी या करारनाम्यावर सही करण्यास फर्माविले. मग तिच्या नावाचा जाहीरनामा फिरविला. इथले सरदार सुज्ञ व गंभीर आहेत. ख्रिस्ती लोकांचा छळ करण्याचे प्रायश्चित्त रादामाला मिळाले. एलिससाहेबही सुखरूप असून देवाचे काम करीत आहेत.

**२३८३ अ** (इंम : २६३–२६४)

२३८४ (२२ : १७, १ सप्टेंबर ६३, २६६–२६९)

'इंग्रजांचा एतद्देशी मित्र' लिहितो की : सहाशेव्या वर्षांपूर्वी इंग्रज, रानटी, दुर्गुणी व अधर्मी होते. शेतीऐवजी गुरे पाळणे, पारध करणे, कंदमुळे व मांस यांवर निर्वाह, अशी त्यांची स्थिती होती. गोसावी राख लावतात, त्याप्रमाणे ते अंगास निळा रंग फासीत. शिक्षण, धर्मशास्त्र, त्यांना माहीतही नव्हते. क्रूर व जुलमी उपाध्यांच्या सांगीप्रमाणे ते चालत. रोमी राज्याचे ते प्रजाजन होते. मूर्तींच्या भक्तीचे त्यांना इतके पिसे होते की, माणसांचा बळी देत. हेच अज्ञानी लोक आज मात्र नामांकित, ज्ञानी, द्रव्यवान, अक्कलवान व नीतिमान आहेत. उत्तम खाण्याचे पदार्थ, सुंदर फुलझाडे, खुर्ची टेबलावरील जेवण, स्वच्छता, यांनी ते वेगळेच वाटतात. अनेक शास्त्रांत त्यांनी प्रगती केली. पृथ्वीच्या चारी खंडांत त्यांचे राज्य पसरलेले आहे. ते इतके श्रीमंत आहेत की, इतर देशांना कर्जे देतात. वाफेवर, वाऱ्यावर व पाण्यावर यंत्रे चालवितात. पंचमहाभूतांकडून चाकरी करून घेतात. विद्याभ्यासाची त्यांना इतकी रुची आहे की, शेकडो पाठशाळा त्यांनी उघडल्या. पुस्तके व वर्तमानपत्रे यांचा अफाट खप होतो. धर्मप्रसाराकरिता त्यांनी अनेक मंडळ्या सुरू केल्या. म्हणून ईश्वराने त्यांना आशीर्वादित केले. ते पवित्र शास्त्रावर विश्वासले, म्हणून त्यांची प्रगती झाली. हा सारा चमत्कार ईश्वराच्या कृपेनेच झाला, नव्हे काय? इस्रायली लोक पूर्वी देवाचे आवडते होते. त्याप्रमाणे इंग्रज देवाचे लाडके आहेत.

२३६५ (२२ : १७, १ सप्तेंबर ६३, २६९–२७०)

स. म. नांदगावकर लिहितात की : सुकृताने परमार्थ साधतो, असे लोक म्हणतात. पण खारट आडातून गोड पाणी येणारच कसे? नुकतीच माहुली गावात भागीरथी आली, अशी हूल उठली. तेव्हा तेथे हजारो लोक आले. कसबिणीही आल्या. उदमी व्यापाऱ्यांनी ठकबाजी केली. एका तेल्याने स्त्रियांविषयी इतके अभद्र शब्द उच्चारले की, ते लिहावयासही लाज वाटते. देवभोळे लोक भागीरथीच्या मृगजळामागे हिंडत आहेत! यास 'कुकृत' म्हणणेच योग्य आहे. आषाढात अनेकांनी गर्दी केल्यामुळे तेथे महामारीचा उपद्रव मात्र सुरू झाला. मरीच्या पांजी करून सुकृत मिळत नाही. प्रत्येक कृत हे पापमिश्रित असते. यातून परमार्थाचे साधन होणार नाही. त्यापेक्षा येशूचे पुण्य प्राप्त करून घेण्याचे प्रयत्न करा. तारकाची सुवार्ता कर्मठजींच्या कानावर घाला.

२३६६ (२२ : १७, १५ सप्तेंबर ६३, २७०–२७२)

मीडसाहेबाच्या फौजेस चुकविण्यासाठी मेजर लीचे सैन्य पळते आहे. मिसिसिपी नदीच्या किनाऱ्यावरील अनेक किल्ले उत्तर अमेरिकेने घेतले. ६५०० दक्षिण अमेरिकन कैदेत आहेत.

२३६७ (२२ : १७, १ सप्तेंबर ६३, २७०–२७२)

फ्रेंचांनी मेक्सिको शहर जिंकले. पोलंडमध्ये बंडखोरी वाढते आहे. रशिया व फ्रान्स यांमध्ये युद्धाची तयारी सुरू आहे.

२३६८ (२२ : १७, १ सप्तेंबर ६३, २७०–२७२)

कलकत्त्यास न्यायशास्त्राचा विद्यार्थी राजकुमार भट्टाचार्य या ब्राह्मण गृहस्थाने बाप्तिस्मा घेतला. इंदापुरात माधव राजाराम या नगरकर तरुणाने रे. शेषाद्रीकडून दीक्षा घेतली.

२३५९ (२२ : १७, १ सप्टेंबर ६३, २७०–२७२)
वायव्य प्रांतात ११२ मिशनठाणी आहेत. ४९ इंग्रजी शाळांमध्ये ५९७८ विद्यार्थी शिकतात. मुलींच्या ५९ शाळांत १५९८ मुली आहेत.

२३६० (२२ : १७, १ सप्टेंबर ६३, २७०–२७२)
सिंधू नदीच्या खालून बोगदा कोरण्याची योजना राबटसनसाहेबांनी सुरू केली. अगदी कमी पावसाच्या फेब्रुवारी महिन्यातसुद्धा तिचे २०० खंड्या पाणी समुद्रात पडते. नदीतून होड्या चालविण्यापेक्षा सुरुंगाची योजना फक्त ५ लाख रुपयांची, म्हणजे कमी खर्चाची आहे. सुरुंग करण्यास सुरुवात झाली. १५०५ फुटांचा बोगदा तयार होणार असून ३८८ फूट खोदाई पूर्ण झाली. पण खडकातले पाणी त्यात जमा होऊन काम बंद पडले. ते काढून टाकण्याकरिता बिलायतेहून यंत्रे येणार आहेत.

२३६१ (२२ : १७, १ सप्टेंबर ६३, २७०–२७२)
उमरावतीकडील खराब रस्त्यांची दुरुस्ती करून चांगले रस्ते करण्यासाठी सरकारने दोन लाख रुपयांचे सांक्षन दिल्हे आहे. या कामावर दोन जादा इंजनेर नेमले जातील.

२३६२ (२२ : १७, १ सप्टेंबर ६३, २७०–२७२)
एतद्देशीय वर्तमानपत्रांतील मजकुराविषयी रपोट करण्यासाठी रे. राबिन्सन यांची नेमणूक झाली. त्यांच्या मदतीस एक बंगाली नेटिव दिला आहे. अर्थात आपले निर्भीड अभिप्राय व्यक्त करण्यास संपादकांना मनाई नाही.

२३६३ (२२ : १७, १ सप्टेंबर ६३, २७०–२७२)
बडोद्याच्या गायकवाडाच्या भावाने काही लोक मदतीस घेऊन राजाविरुद्ध कट केला, म्हणून त्यास कैद झाली.

२३६४ (२२ : १७, १ सप्टेंबर ६३, २७०–२७२)

हिंदुस्थानचे गवर्णर जेनरलसाहेब यांनी वर्षांमधून काही काळ पुण्यात मुकाम करावा, म्हणून जमशेटजीच्या धरणाजवळ त्यांच्याकरिता एक बंगला बांधला जात आहे.

२३६५ (२२ : १७, १ सप्टेंबर ६३, २७०–२७२)

जबलपूर पोस्टातील एका बाबूने लालचीने काही पत्रे गारद केली, म्हणून त्यास काळ्या पाण्याची शिक्षा झाली. तरी दुसऱ्यांनी सावध व्हावे.

२३६६ (२२ : १७, १ सप्टेंबर ६३, २७०–२७२)

कोचीन संस्थानमध्ये १८०० यहुदी लोक राहातात.

२३६७ (२२ : १७, १ सप्टेंबर ६३, २७०–२७२)

एलफिन्स्टन कॉलेजचे प्रो. म्युलर यांनी एशियाटिक सोसैटीमध्ये निबंध वाचून सिद्ध केले की, अल्पवयात मुलींची लग्ने करणे वेदास मंजूर नाही. लग्नसंस्काराच्या मंत्रावरून असे दिसते की, ही कन्या वयात आलेली असावी. (इंदुप्रकाशवरून)

मुंबई, एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

**२३६८** (२२ : १८, १५ सप्टेंबर ६३, २७४-२७७)

नगरकर बातमीदार लिहितो की : गवर्णर बार्तल फ्रेयरसाहेब हे नगरला भेट देण्याकरिता आले होते. त्यांनी या इलाख्यात महसूल खात्यात अनेक वर्षे काम केले होते. त्यांच्या सन्मानार्थ लष्करी व मुलकी अंमलदारांनी मोठा समारंभ केला. बंगाली दरवाजापासून माजिस्तेतसाहेबाच्या बंगल्यापर्यंत लष्कराचे सैनिक उभे होते. किल्ल्याजवळ बाजा वाजत होता. १७ तोफांची सलामी झाली. सैनिकांनी मानवंदना दिली. फ्रेयरसाहेबांनी लष्कराची पहाणी केली. मिशनेरी व कमिशनर यांचीही भेट घेतली. जज तिरमल वेंकटेश यांनी अशी सदिच्छा प्रगट केली की, त्यांना हिंदुस्थानच्या वैसरायचे पद मिळावे. नामदार म्हणाले की, नेटिवांना मोठ्या हुद्यावर जागा देण्याचे आमच्या मनात आहे, पण त्यांनी उत्तम प्रकारची विद्या मिळवावी. नगरला लोखंडी नळाने पाणी पुरवावे, अशीही सूचना त्यांनी केली. नगर शहर वसविणारा मलिक अहमद उर्फ निजामशा बहिरी याच्या कबरीस त्यांनी भेट दिली. भिंगारच्या लष्करास भेट दिल्यावर त्यांनी अमेरिकन मिशनाच्या शाळा पाहिल्या. १८३५ मध्ये नगर मिशनाची शाळा सुरू झाली. मुलांना चांगले वळण लावले आहे. व्यावहारिक विषयांबरोबर धर्म व नीती यासंबंधी शिक्षणही दिले जाते. मुले धार्मिक गीते गातात, म्हणून नामदार संतुष्ट झाले. सातारकर व्यंकोजी राजे यांनाही ते भेटून आले. नामदारसाहेब कोळगावमार्गे पुण्याकडे रवाना झाले.

**२३६८अ** (इंग्र : २७३-२७४)

२३६९ (२२ : १८, १५ सप्टेंबर ६३, २७८–२८०)

मि. बाबा पद्मनजींनी मोल्स्वर्थच्या कोशावरून मराठी व इंग्लिश लघुकोश हा लहान कोश तयार केला. त्याची पृष्ठे ४९४ असून किंमत सहा रुपये आहे. छाप ठळक व बिनचूक आहे. शब्दसंख्या २९ हजारांहून जास्त आहे. अशा लहान व स्वस्त कोशाची फार आवश्यकता होती. मूळ कोश ३६ रुपयांचा असून मनस्वी जड आहे. लोक लघुकोशाची चातकाप्रमाणे वाट पाहात होते. पण काही चुकाही विस्मृतीने राहून गेल्या. फक्कड शब्दासमोर फकड पहा म्हटले आहे, परंतु फकड हा शब्दच आढळत नाही. तरीही हे अवघड काम सिद्धीस नेल्याबद्दल बाबांची तारीफच करावयास हवी. कागद पातळ आहे, म्हणून लोक तक्रार करतात. पण त्यांना अल्पमोली व बहुदुधी गाय हवी असते. या ग्रंथास परमेश्वर आशीर्वाद पाठवो व त्याचे गौरव या देशात होवो. कागदाबद्दल बाबा लिहितात की, यापेक्षा जाड कागद मिळेना. अगदी ग्रंथाची छपाई पूर्ण होत आल्यावर एका गृहस्थाने लिहिले की, जाड कागद मिळतो. एकूण तीन हजार प्रतींची छपाई झाली. पण अवघे सहाशे वर्गणीदार मिळाले. मग ग्रंथकर्त्यांनी कोणाच्या आश्रयाने असली जोखमीची कामे करावीत? ज्यांनी पातळ कागदाबद्दल लेखकास दोष दिल्हा, त्यांची चूकच झाली.

२३७० (२२ : १८, १५ सप्टेंबर ६३, २८०–२८१)

घोडनदीजवळच्या निमोणी गावी एका स्त्रीला नातलगांनी उत्तम वांग्याचे बी दिल्हे. या मांगीण स्त्रीने गावात काही लोकांना ते देऊन स्वतःच्या घरीही लावले. एका रात्री कोणी तरी त्यात वाईट जिन्नस टाकला. घरवालीला हे मोठे दुश्चिन्ह वाटले. तेथे जमलेल्या गावकऱ्यांनी चौकशी केल्यावर तिने सांगितले की, अमक्या अमक्याने वांग्याचे बी दिले. तेव्हा ते म्हणाले की : 'त्यांचा एक भाऊ ख्रिस्ती झाला आहे. हे बी नक्कीच पाद्रीसाहेबाकडचे असले पाहिजे. तुम्ही वांगी खाल्ली, तर तुम्हीही ख्रिस्ती व्हाल.' तेव्हा बाई फार घाबरली. तिने ती सुंदर झाडे उपटून टाकली. केवढे हे अज्ञान. अमुक खाल्ल्यामुळे जात बिघडेल, या वेड्या भयाने लोक अगदी नीच दशेस आले आहेत.

२३७० अ (ईम : २८०)

२३७१ (२२ : १८, १५ सप्टेंबर ६३, २८१–२८४)
स्त्रियांच्या स्थितीबाबत 'स्त्रीकल्याणेच्छू' लिहितो की : ज्यांना ऐकू येते, त्यांनाच उपदेश करता येतो. पण तोंडी उपदेशापेक्षा लेखी उपदेश जास्त उपयोगी पडतो. स्त्रियांच्या कल्याणासाठी ग्रंथकार व संपादक प्रयत्न करीत असतात. पण व्हावी तेवढी स्त्रियांची सुधारणूक होत नाही. स्त्रिया अज्ञानी असल्यामुळे मोठे अनर्थ होत आहेत. स्त्रिया शिकल्या, तर त्या तर्कटी, अमर्याद व जारिणी होतील, अशी त्यांना भीती आहे, पण त्यांनी सुनीतीने चालावे, याकरिताच विद्येची गरज आहे. पुराणवाचन व कीर्तनश्रवण तेवढेच स्त्रियांनी करावे, हे मत अयोग्य होय. हरिविजयातील विलासामुळे त्यांचे मन मात्र बिघडेल. यावर संपादक लिहितात की, विद्येने स्त्रिया बिघडतील, हे मत चूक आहे. शिकलेल्या पुरुषांत लबाडी करणारे नाहीत काय ? ईश्वराबद्दल सद्भीती वाटेल, असे नीतीचे शिक्षण त्यांनाही द्यावे. मुंबईमध्ये स्त्रियांची शाळा काढण्याकरिता ५० हजार रुपये जमले आहेत. विद्येची व नीतीची मूलतत्त्वे त्यांनाही शिकविणे आवश्यक आहे.

२३७२ (२२ : १८, १५ सप्टेंबर ६३, २८४-२८५)

माधवराव राजाराम वर्तमानदीपिकेत लिहितात की : मी कौलिक किंवा शाक्तपंथीयांत काही दिवस होतो. पण त्या पंथामध्ये भ्रष्टता आणि मलिनता फार आहे. चक्रपूजा व मद्यपान ही लाजिरवाणी प्रकरणे असतात. भगवंताचे एकाग्रतेने चिंतन करणे कठीण आहे, म्हणून सर्व गोष्टींची विस्मृती पडावी व नंतर दारूच्या अंमलात ईश्वरचिंतन व्हावे, असे त्यांचे अचरट तत्त्वज्ञान आहे. दारूच्या अंमलास ते बोध म्हणतात.
दारू गुल्यात गेल्यामुळे लोकनिंदेस तोंड द्यावे लागेल, म्हणून काही पूजा करतात. त्यास अर्चन म्हणतात. दारूच्या बाटल्या म्हणजे कुंभ व मांस ते द्वितीय. दारू पिऊन भूमीवर पडल्यामुळे पुनर्जन्म टळतो, अशी त्यांची श्रद्धा आहे! अट्टल पिणारांना वीर म्हणतात. अमावास्येच्या मध्यरात्री यांचे मद्यमांससेवन चालू राहाते. चक्रपूजेत स्त्रियांबरोबर राजरोस कामक्रीडा करतात. या साऱ्याच प्रकारांची घृणा वाटून श्री. माधवराव येशू ख्रिस्ताकडे वळले. येशूनेच त्यांच्या बुद्धीचे डोळे उघडले.

२३७३ (२२ : १८, १५ सप्टेंबर ६३, २८५-२८८)

नाना जिवंत आहे की मेला, याविषयी सतत अफवा उठत.
अजमिरास धरलेला माणूस हा नानाच होय, असे सर्वांना वाटले. पण कानपूरमध्ये अनेक युरोपियन अधिकाऱ्यांनी लिहून दिले आहे की, हा नाना नव्हे. बहुधा अजमिरात काही अदलाबदल झाली असावी, असा संशय येतो. एकंदर काय, नानाबाबतचा गोंधळ कायम आहे.

२३७४ (२२ : १८, १५ सप्टेंबर ६३, २८५-२८८)

देशोदेशी प्रेतकर्मांच्या वेगवेगळ्या रीती असतात. दहन व दफन असे दोन्ही प्रकार आहेत. काही जातींत तर प्रेत हिंस्र श्वापदांना खाऊ घातली जातात. (सत्यदीपिकावरून)

२३७५ (२२ : १८, १५ सप्टेंबर ६३, २८५–२८८)

इंग्लंडमधून १०० कोटी रुपयांचा माल देशोदेशी निर्यात होतो. एशिया खंडातून ३८ कोटींचा माल तेथे जातो. हिंदुस्थानची मात्र आयातीपेक्षा निर्यात दीड पटीने जास्त आहे.

२३७६ (२२ : १८, १५ सप्टेंबर ६३, २८५–२८८)

इग्लंडमध्ये १,१५० वृत्तपत्रे आहेत, तर इंग्रजांच्या साम्राज्यामध्ये ३५० वृत्तपत्रे प्रकाशित होतात.

२३७७ (२२ : १८, १५ सप्टेंबर ६३, २८५–०८८)

मद्रासमध्ये १,७२१ मिशने असून १ लाख १० हजार ख्रिस्ती लोक आहेत. ७४ शाळांत ६,८३६ मुलगे असून मुलींच्या २१४ शाळांमध्ये ११ हजार मुली शिकतात.

२३७८ (२२ : १८, १५ सप्टेंबर ६३, २८५–२८८)

पश्चिमी देशात पिण्याची उत्तम सोय असते. प्रत्येकाच्या घरात नळाला पाणी येते. हिंदुस्थानात फक्त मुंबईची व्यवस्था उत्तम आहे. कलकत्त्यात तर तलाव अतिशय घाणेरडे आहेत. तलावाजवळच स्मशानभूमी असल्यामुळे काळी राख व सडके मांस या वस्तू पाण्यामधून वाहात येतात. सोलापूरच्या तलावातही कर्दम व क्रिमी फार आहेत. चांगले पाणी मिळणे मुश्किलीचे असते.

२३७९ (२२ : १८, १५ सप्टेंबर ६३, २८८)

हिंदुस्थान देशातील शेती पर्जन्यवृष्टीवर अतिशय अवलंबून आहे. एका वर्षी अवर्षण झाले, तर लक्षावधी मनुष्यांचे व जनावरांचे पराकाष्ठेचे हाल होतात. म्हणून दुष्काळासाठी भरीव स्वरूपाची तरतूद करणे आवश्यक आहे. सरकारने गंगानदीस कालवे काढून ६०० एकर जमिनीस पाणीपुरवठा केला. त्यातून २ लाख १२ हजार खंडी धान्याचे उत्पादन झाले. त्यातून ८ लाख लोकांचे एक वर्ष पोषण होऊ शकेल. कालव्याच्या काठावरती चारा उगवल्यामुळे जनावरांचेही पोषण होईल. यातून १। कोटी रुपयांचा उदीम झाला. दरवर्षी वीस लक्षांची सूट शेतकरी लोकांना द्यावी लागते, तीही वाचली. एकंदरीत कालव्यांमुळे सरकारास व रयतेस फार फायदा आहे.

मुंबई, एक्सचेंज प्रेस, फोर्ट

## ज्ञानोदय, पुस्तक २२, अंक १९, मुंबई, १ आक्टोबर १८६३

२३८० (२२ : १९, १ आक्टोबर ६३, २८९–२९०)

४ सप्टेंबर रोजी नागपूर मिशनाचे हिसल्पसाहेब नदी ओलांडीत असताना वाहून जाऊन मृत्यू पावले. नागपूरचे कमिशनर टेंपलसाहेब यांनी त्यांस टाकळघाटचे जुने शिल्प पाहण्याकरिता बोलावले होते. परत येताना बोरी गावाजवळ ते नदी पार करीत असता हा प्रकार घडला. टाकळघाटच्या सरकारी शाळेमधील भाषणाने त्यांना तेथून निघण्यास रात्र झाली. अंधारात पटेवाल्याची व त्यांची चुकामुक झाली. तीन तासांनी साहेबाचे प्रेत सापडले. या घटनेने त्यांच्या प्रिय पत्नीस अत्यंत दुःख होईल. साहेबाचे ख्रिस्ती मित्र व विद्यार्थी शोकसागरात बुडतील. या साहेबांनी १८ वर्षे नागपूर मिशनासाठी अपार श्रम केले. ईश्वराने या निष्ठावंत सेवकास दिव्य लोकात नेले.

**२३८० अ** (इंम : २८९)

**२३८१** (२२ : १९, १ ऑक्टोबर ६३, २९१–२९३)

पुस्तक मंडळीने मि. बाबा पदमनजींचे कृष्ण व ख्रिस्त यांची तुलना करणारे पुस्तक प्रकाशित केले. पूर्वी त्यांनी हिंदू व ख्रिस्ती धर्मांची तुलना एका ग्रंथाद्वारे केली होतीच. एत्तद्देशीय बंधूंना दोन्ही धर्मांची तपशीलवार माहिती त्यांनी करून दिल्ही. कृष्णाची व ख्रिस्ताची तुलना करताना हिंदू व ख्रिस्ती शास्त्रांतून अनेक वाक्ये उतरून घेतली. येशूचा काळ ठरविताना राबिन्‌सन्‌ या ग्रंथकाराचा आधार घेतला. ४८ पृष्ठे असून किंमत एक आणा आहे. छापही सुंदर आहेत. प्रत्येक पृष्ठावर दोन मोडी पाडून एकीमध्ये कृष्णचरित्र व दुसऱ्या मोडींत प्रभूचे चरित्र, असे दिल्हे आहे. अवताराची कारणे, जन्मवृत्तांत, मरणाच्या गोष्टी, मरणानंतरचा वृत्तांत, धर्मविषयक संदेश, यांचा तुलनात्मक अभ्यास त्यांत येतो. जुन्या हिंदू ग्रंथातले उतारे वापरले आहेत. कृष्णाचे चरित्र अयुक्तिक, अविश्वसनीय व विसंगत आहे, हे त्यांनी सिद्ध केले. बाबांचे लेखन रास्त व निःपक्षपाती वाटते. येशू ख्रिस्ताच्या अमोल्य गोष्टींचा लोकांनी विचार करावा. आपण केवळ सुकृतावरून तरून जात नाही. येशू हा सर्वकाळचा रक्षक असल्यामुळे त्याचा आश्रय करा. ईश्वराच्या पवित्र आत्म्याकडून अंतःकरणात मोठा बदल होऊ शकतो. खोट्यावर विश्वास ठेवण्यात मोठे पाप आहे. बाबांच्या ग्रंथावरती ईश्वराचा आशीर्वाद येवो, अशी आम्ही प्रार्थना करतो. पुस्तक मंडळीची ४२ पुस्तके हातोहात खपली. विक्री वाढते आहे. (बांबे गार्डनवरून)

**२३८१ अ** (इंम : २९०–२९१)

२३८२ (२२ : १९, १ ऑक्टोबर ६३, २९४–२९५)

मथुरेच्या पलीकडे मिशनाचे धर्मोपदेशक नेहमीप्रमाणे शुभवर्तमान सांगत होते. ईश्वर एक आहे व अनेक मूर्तींची पूजा करणे अयोग्य आहे, हे सांगत असताना समुदायातून एकाने मोठ्या आवाजात म्हटले की, 'अग्नीवाचून व पाण्यावाचून जळाले त्या साधुपुरुषास तुम्ही काय म्हणाल?' चौकशी करता असे समजले की, मस्तनाथ नामक एका साधूचा शिष्य जागेवरच कोळसा होऊन पडला. तेथे आग लागल्याबद्दल काहीच चिन्ह नव्हते. पण खरी गोष्ट अशी की, तो अट्टल दारूबाज होता. ईश्वर त्याच्यावर संतुष्ट असल्याबद्दल हे प्रमाण मानले जाते. महादेवाचे दुर्गुण त्याने धारण केले. पण त्याला सुदैवी मरण आले, अशी भाबड्या लोकांची समजूत आहे. त्याच्या समाधीवरती देऊळ बांधले असून अंधळे व अज्ञानी लोक त्याच्या पाया पडतात. अचाट दुष्टाई व अघोर कर्म यांवरून कोणीही साधुपुरुष बनतो!

२३८३ (२२ : १९, १ ऑक्टोबर ६३, २९५–२९७)

'सणांचा विचार करणारा' लिहितो की : सगळ्या महिन्यांत श्रावणाला फार महत्त्व दिले जाते. प्रत्येक वारी एकेका देवाची खास पूजा होते. एरव्ही अमावास्येस अनिष्ट समजतात. पण त्या अमावस्येला बैल पुजतात. श्रावणी पौर्णिमा हा एक प्रायश्चित्ताचा दिवसच मानलेला आहे. बारा महिन्यांतला काइक, वाचिक, मानसिक, सांसर्गिक पापे नष्ट व्हावीत, म्हणून सप्तर्षींची पूजा करून ब्राह्मणदक्षिणा वाटतात. ब्राह्मण मंत्र सांगतो. यजमान घाईने व दुर्लक्षाने पोपटाप्रमाणे बोलणार. मानवी जीवनात पापाचे मनस्वी हीण मिसळलेले असते. त्याबद्दलचा खरा पश्चात्ताप दिसावयास हवा असतो. शिवाय हिंदूंत पौर्णिमेची पूजा व पंचगव्यप्राशन यांत ताळमेळ नाही. हाच दिवस राखीपुनव म्हणून साजरा होतो. शोभिवंत रेशमाचा हा धागा मंत्र म्हणून ब्राह्मण हातात बांधतो. व्यापारी या दिवशी भरपूर नफा मिळवितात. लोक दौतलेखणीसही राखी बांधतात. माणूस तृणाचाही सांभाळ करू शकत नाही. तेथे सूत व रेशीम माणसाचे काय रक्षण करणार ? या दिवशी समुद्रकिनाऱ्यावर नारळीपौर्णिमा म्हणून सागरास नारळ वाहातात. परदेशी तेलीलोक दारू पिऊन नाचतात. निर्जीव अशा सागरास नारळ अर्पिणे, हे अज्ञान होय. असल्या वेड्या चालींनी धूर्त लोकांची मात्र पोळी पिकते.

२३८४ (२२ : १९, १ आक्टोबर ६३, २९७–३००)

भाद्रपदात शुद्ध चतुर्थीपासून दहा दिवस गणपतीचा उत्साह असतो. त्यावर 'विचार करणारा' टीका करतो. घरी धातूचा गणपती असला, तरी हा मातीचा देव आणावा लागतो. रीतीप्रमाणे त्याच दिवशी, २ऱ्या, ३ ऱ्या,५ व्या, ८व्या १० व्या दिवशी त्याचे विसर्जन करतात. शोभायमान मखरात उंदरावरचा गणपती व शारदेच्या मूर्ती बसवितात. त्यांच्या भोवताली हंड्याझुंबरांची आरास करतात. गणपती हा विद्यांचा व कलांचा नायक म्हणून प्रत्येक विधीत आधी त्याची पूजा होते. कोणत्याही रोजकीर्दीवर गणेशास नमन असतेच. गणपतीने चंद्रास शाप दिला, अशी कथा गणेशपुराणात आढळते. म्हणून गणेशचतुर्थीस चंद्राचे दर्शन घेत नाहीत. जर चुकून चंद्र पाहिला, तर दुसऱ्याच्या घरावर दगड मारावेत, म्हणजे चोरीचा आळ येत नाही, अशी भ्रामक समजूत आहे. भावडे लोक खुशाल दुसऱ्याच्या घरावर दगड मारतात. आपल्या मिथ्या समजुतीने लोकांना त्रास होतो, याची त्यांना पर्वा नसते. त्यातून हे शिमग्याचे धाकटे भावंडच तयार झाले आहे. गणपतीपुढे गायन चालते. कसबिणींच्या गायनात लोक पैसे टाकतात. बीभत्स लावण्या व विलासी गाणी यांची रेलचेल चालते. यातून भक्ती काय घडणार ? या कुत्सित चाली टाकाव्यात.

२३८५ (२२ : १९, १ आक्टोबर ६३, ३००–३०४)

उत्तर अमेरिकन सेनेने सम्टर व वागनर हे दोन किल्ले जमीनदोस्त केले. सम्टरचा किल्ला युद्धास तोंड लागल्यानंतर बंडखोरांच्या ताब्यात होता. लवकरच च्यालेस्तनही जिंकता येईल.

२३८६ (२२ : १९, १ आक्टोबर ६३, ३००–३०४)

रशियन सरकारजवळ ६ लाख १८ हजार ४७० फौजा आहे. २००३ तोफा व ६० हजार पायदळ आहे. (इंदुप्रकाशावरून)

**२३८७** (२२ : १९, १ आक्टोबर ६३, ३००–३०४)

सीरियात एका मुस्लिमास देहांताची शिक्षा झाली. कारण त्याने एका यहुद्यास ठार मारले.

**२३८८** (२२ : १९, १ आक्टोबर ६३, ३००–३०४)

दोस्त महंमदाचा मुलगा शियरअल्ली हा राजा झाल्यामुळे त्याचे सावत्र भाऊ त्याच्याविरुद्ध युद्धाची तयारी करीत आहेत. माजी राजाचा नातू अहमदखान हा राज्यपदाच्या लोभाने शत्रूकडे गेला.
(इंदुप्रकाशवरून)

**२३८९** (२२ : १९, १ आक्टोबर ६३, ३००–३०४)

१८५७ च्या बंडातील ३ हजार हिंदू शिपाई अफगाणिस्तानात गेले. तेथील बादशहा शियर अली याने त्यांना इंग्रजी सरहद्दीवर स्वारी करण्याचे काम दिल्हे. या सर्वांनी इस्लामी धर्म स्वीकारला आहे.

**२३९०** (२२ : १९, १ आक्टोबर ६३, ३००–३०४)

पेशावरमध्ये मिशन ठाणे झाल्यामुळे १२ लोक ख्रिस्ती झाले. पंजाबी व अफगाणी मुस्लिम पेशावरास विद्येचे मुख्य स्थान मानतात. अनेक विद्यार्थी तेथे शिकत असतात.

**२३९१** (२२ : १९, १ आक्टोबर ६३, ३००–३०४)

सुरतेस सुरतमित्र हे गुजराती व इंग्रजी वृत्तपत्र सुरू झाले.
(इंदुप्रकाशवरून)

**२३९२** (२२ : १९, १ आक्टोबर ६३, ३००–३०४)

गायकवाड सरकारवर विषप्रयोग केला, या आरोपावरून विनायक गंगाधर पटवर्धनांच्या पुतण्यास जन्मठेपेची शिक्षा झाली.
(वृत्तप्रकाशवरून)

**२३९३** (२२ : १९, १ आक्टोबर ६३, ३००–३०४)

कलकत्त्याच्या लॉर्ड बिशपनी चापलेन लोकांना अशी सूचना केली की, घड्याळ व उष्णतामापक यंत्रे जवळ ठेवून उपदेशाचा वेळ कमी करावा. उष्णता फार नसेल, तर सर्मन् जास्त वेळ द्यावे.
(इंदुप्रकाशवरून)

**२३९४** (२२ : १९, १ आक्टोबर ६३, ३०२–३०४)

पर्शियन बादशहाच्या दोन हेरांना हैद्राबादेत अटक झाली. (इं. प्र. वरून)

**२३९५** (२२ : १९, १ आक्टोबर ६३, ३०२–३०४)

सदाशिवगडास सरकारने 'करवर' हे प्राचीन नावच कायम केले.
(इंदुप्रकाशवरून)

**२३९६** (२२ : १९, १ आक्टोबर ६३, ३०२–३०४)

गवर्णर जेनरालसाहेबांच्या बंगल्यासाठी पुण्यात ४०० एकर जमीन विकत घेण्यात आली. आसपासच्या लोकांनाही परस्पर विक्री करण्यास बंदी करण्यात आली. १८६५ पासून नामदार पावसाळ्यात पुण्यात राहणार आहेत. (इंदुप्रकाशवरून)

**२३९७** (२२ : १९, १ आक्टोबर ६३, ३०२–३०४)

एल्फिन्स्तन कॉलेजच्या एका विद्यार्थ्यासाठी दर ३ वर्षांस ८०० रुपये खर्च होतो. एवढ्या पैशात मराठी शाळा बारा वर्षे चालेल. सरकारी खर्च दर मुलास २९७ रुपये आहे. (ज. मि.)

**२३९८** (२२ : १९, १ आक्टोबर ६३, ३०२–३०४)

मुंबापुरीत गणपती उत्सवामध्ये दिव्यांचा चकचकाट, वाद्यांचा घणघणाट, मंडळीचा थाटमाट, हरिदासांचा कलकलाट, रुपयांचा खळखळाट या गोष्टी दृष्टीस पडतात. एकेका कीर्तनाचे हरिदासास १००–१५० रुपये मिळतात. डोल्यापेक्षा हा समारंभ नेत्रदीपक असतो. (इं. प्र. वरून)

**२३९९** (२२ : १९, १ आक्टोबर ६३, ३०२-३०४)

ओरिएंटल ट्रान्सलेटर रा. विनायक वासुदेव यांचे वेतन द. म. ७५० वरून १००० वर नेण्यात आले. (इंदुप्रकाशावरून)

**२४००** (२२ : १९, १ आक्टोबर ६३, ३०२-३०४)

मुंबई इलाख्यातील मिशने सर्व प्रकारे कमी आहेत. ठाणी ६७, तर ५० उपदेशक असून ३७ ख्रिस्ती मंडळ्यांमधून २,२३१ ख्रिस्ती लोक आहेत. ८ इंग्रजी शाळांमध्ये १,७८७ विद्यार्थी शिकतात. ५४ देशी शाळांमधून २,२१९ विद्यार्थी आहेत. मुलींच्या शाळा ३२ असून १,४२६ विद्यार्थिनी शिकतात. या आकडेवारीवरून दिसेल की, इतर प्रांताच्या मानाने मुंबई इलाख्यातील कार्य कमी आहे.

**२४०१** (२२ : १९, १ आक्टोबर ६३, ३०४)

कप्तान स्वान्सन याला तंजावरच्या किल्ल्याजवळ आगासीथमराई नावाचे कमळ सापडले. ते ढेकूणनाशक आहे. भिंतीजवळ २-३ दिवस ते ठेवले, तर सगळे ढेकूण मरतात.

**२४०२** (२२ : १९, १ आक्टोबर ६३, ३०४)

पदार्थांच्या ठिकाणी किती उष्णता आहे, ते उष्णतामापक यंत्राच्या योगाने समजते. या फारनैतच्या मोजमापाने मनुष्याच्या शरिरात ९८ अंश उष्णता असते. अगदी लापलंद या थंड देशातही उष्णतेचे प्रमाण हेच असते. जिभेच्या खाली यंत्राचा गोल ठेवला, तर हे प्रमाण कळते. एकूण वातावरणातील उष्णता निदान १६० अंश असते. मानवी शरिरातील उष्णता मात्र ९८ वर टिकून राहाते. याचे कारण शरिरातील रंध्रांतून घामाच्या रूपाने ती निघून जाते. काही कारणाने ही रंध्रे बंद झाली, तर मात्र उष्णता साठून ज्वरादि विकार होतात. म्हणून नेहमी स्नान करून त्वचा निर्मळ करावी.

मुंबई, एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

**२४०३** (२२ : २०, १५ आक्तोबर ६३, ३०६–३०९)

पाठारे रिफार्म असोसिएशनने 'हिंदु विधवांचे पुनर्विवाह' हे पुस्तक प्रकाशित केले. उंच जातींत विधवांचे विवाह करण्यास हरकत नाही, अशी प्रमाणे त्यात दाखविली आहेत. विरुद्ध पक्षाने दिलेल्या प्रमाणांना उत्तर दिलेले आहे. पाद्री लोकही खोचून लिहिणार नाहीत, एवढे खोचक शेरे मि. मोरोबा कान्होबांनी दिले आहेत. 'जातिभेद विवेकसार'च्या कर्त्याप्रमाणे या लेखकासही नास्तिकतेची पदवी मिळेल. विशेष म्हणजे सनातन्यांइतकाच सुशिक्षितांचाही पुनर्विवाहास विरोध दिसतो. वाईच्या एका स्नानसंध्याशील ब्राह्मणाचे मत ज्ञानप्रकाशचे लेख वाचून पुनर्विवाहास अनुकूल झाले होते. तरीही हिंदू शास्त्रामध्ये याबाबत एकवाक्यता नाही. मूर्तिपूजेबद्दलच परस्परविरुद्ध अभिप्राय त्यात मिळतात. प्रत्येक पक्ष स्वतःला सोईस्कर विधाने निवडून मांडत राहातात. पुनर्विवाहाने काही अनर्थ होतील, अशी सर्वांचीच समजूत दिसते. द्विजापेक्षा पुनर्विवाहाची रीत असणारे लोक १,६२५ पटीने जास्त आहेत. विधवाविवाहाची रीत सुरू झाली, तर स्त्रिया नवऱ्यावर विषप्रयोग करतील, हे मतच अचरट आहे. कलीच्या युगात पाराशर स्मृती महत्त्वाची आहे. ती अशा विवाहास परवानगी देते. व्यभिचाराचे नीच कर्म समाजात घडते, म्हणून असे विवाह आवश्यक आहेत. नवऱ्याच्या मृत्यूनंतर विवाहसंस्कारातील करार संपतो. कलियुगास प्रारंभ झाल्यावर ६५० वर्षांनी अर्जुनाने ऐरावताच्या विधवा कन्येशी विवाह केला.

**२४०३ अ** (इंम : ३०५–३०६)

**२४०४** (२२ : २०, १५ आक्तोबर ६३, ३१०–३१३)

रा. ह. साळवे लिहितात की : देवाने आपला पवित्र आत्मा पाठवून अर्जुनबावावर वृष्टी केली. हा ५५ वर्षांचा माणूस भोळा, नम्र व गरीब होता. मर्त्यभूमीतून निघून तो दिव्य लोकी प्रथम फळ पावला. सुवर्णमय वेष धारण करून बापाच्या उरासी आनंद भोगीत आहे. सुतारकीचे अथवा बेलदारकीचे काम करताना तो मित्रांना उपदेश करी. जगिक गोष्टी त्यास माती अशा वाटत. तो कोणत्याही जातिबांधवाबरोबर भोजन करण्यास तयार असे. प्रथम तो हगवणीने आजारी पडला. त्यातून बरा झाला, तेवढ्यात सरदीने उचल खाल्ली. उत्तरोत्तर अशक्त व दुखण्याकडून गांजलेला होऊन खोकल्याने बेजार झाला. देहास इजा झाली, तरी आत्मा आनंदित, उल्हासित दिसे. यात्रिक क्रमण व मंगर मडमेचे निरूपण उपदेशकाने वाचून दाखविल्यावर त्यास समाधान वाटे. मिशनेरी स्नेहाळू व सौम्य मनोवृत्तीचे आहेत, तर हा देश रानटी व अंधारमय आहे, असे तो म्हणे. कित्येक दिवस त्याला एखादा तासच झोप मिळत असे. तो सतत आकाशाकडे पाहात राही. घरात त्याला गुदमरल्यासारखे होई. दिव्य दूत त्यास स्वर्गाची वाट दाखवीत होते. मृत्यूच्या आदल्या दिवशी त्याचे खाणे व झोप नेहमीपेक्षा जास्त झाली. प्रार्थना करीत असताना त्यास मृत्यू आला. त्याची पत्नी सकुबाई येशूविषयी विश्वासी आहे. आणखीही काही मंडळी ख्रिस्ताकडे फिरतील.

**२४०४ अ** (इंम : ३०९–३१०)

२४०८ (२२ : २०, १५ आक्तोबर ६३, ३१३–३२०)

या देशातील लोकांना काव्यरूपी उपदेश फार आवडतो, म्हणून मि. हरी रामचंद्र खिस्ती यांनी उद्धारमहिमा ही कविता केली. स्तोत्ररूप काव्यात ते म्हणतात : 'हे यहोवा ईश्वरा तू कृपासिंधू आहेस. तुझा पवित्र आत्मा लोकांच्या अंतःकरणात भरून राहावा. तुझ्या त्रैकपणाची फोड आम्हां मतिमंद लोकांना कशी जमावी? गुरूची कृपा मिळाली, तर अवाच्य व अगाध असे धर्माचे रहस्य समजते. निर्दोष आदाम व हव्वा यांच्या मनामध्ये सैतानाने विष पेरिले व ईश्वराची आज्ञा मोडण्यास त्यांना उद्युक्त केले. ज्ञानवृक्षाचे फळ खाऊन ती पृथ्वीवर आली. प्रत्येक माणूस काहीना काही पाप करतो. पापाचे परिमार्जन करण्यास पूजा निरुपयोगी ठरते. ब्रह्मज्ञानाने मनुष्य संभ्रमात मात्र पडतो. येशूने मनुष्यरूप धारण करून उद्धाराचा मार्ग दाखविला. जगाला पवित्र शास्त्ररूप दुर्बीण दिल्ही. आपले रक्त देऊन तारणाचे सामर्थ्य सिद्ध केले. त्याच्याच जीवार्पणावर भरवसा ठेवून मानवांनी चालावे. तो शांतीचा राजा व खरा न्यायाधीश आहे. कुमारी मातेच्या पोटी जन्मास येऊन त्याने ईश्वरी आशीर्वादाचे सार्थक केले. अंधळयांना डोळे दिले, मृतांना जिवंत केले. येशू हा सूर्य आहे, तर शालोमान हा काजवा वाटतो. कबरेतून उठून तो आकाशात गेला व देवबापाजवळ स्थिर झाला. न्यायाच्या दिवशी तो सर्वांच्या पापपुण्याचा निवाडा करणार आहे. मात्थी, मार्क, योहान व लूका, या चार शिष्यांना आत्म्याची प्रेरणा मिळाली. त्यातून पवित्रशास्त्र साकारले.

मुंबई, एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

**२४०६** (२२ : २१, २ नोवेंबर ६३, ३२१-३२५)

इंदुप्रकाशावरून असे दिसते की : जदुनाथ महाराजांचे रहस्य चव्हाट्यावर आणल्यामुळे करसनदास मुलजी यांना लोकांनी अपांक्त ठरविले आहे. हे गृहस्थ विलायतची यात्रा करून आले. त्यांचे दोघे मित्र करसन माधव व प्राणजीवन यांच्याबरोबर जेवले, पण मंगलदास मात्र जेवत नाही. हे तिसरे मित्र इतके उदार की, त्यांनी परदेशपर्यटकास वीस हजारांचे बक्षिस जाहीर केले. मि. करसन यांनी वल्लभपंथीयांची अवघ्या पृथ्वीवर फजिती केली, म्हणून वाणी लोक त्यांच्यावर नाराज आहेत. अटक नदीच्या पलीकडे जाऊ नये म्हणतात. पण कित्येक हिंदू मसकत, काबूल, चीन, येथे गेले. त्यास कोणी गोमूत्र पाजीत नाही. करसन यांनी विलायतेतसुद्धा स्वतःचा स्वयंपाकी नेला, अभक्ष्याला व अपेयांना ते शिवतही नाहीत. पण या देशात परस्परविरुद्ध विधाने खूप आहेत. भटजीचा मुलगाच जर काळे कुत्रे मारून खात असेल, तर 'काळ कुत्रं परम पवित्रं' असा निर्णयच दिला जातो. मग त्यास प्रायश्चित नाही!! सुशिक्षित तरुणामध्येही धैर्य नाही. सोयीने ते रूढीच्या आड लपत असतात. या कारणाने सुधारणुकीचे हातपाय तोडून डोळेही फोडिले जातात. एखादा मि. करसनदास धैर्य दाखवून महाराजाचे बिंग फोडतो. बाकीचे भरतभूमीचे सुपुत्र धैर्यशून्य झाले आहेत. माणूस युरोपात गेला, तर भ्रष्ट होतो. पण अफ्रिकेत गेला, तर मात्र पवित्र राहातो. असाही आचरट विचार काही मंडळी सांगतात.

**२४०६ अ** (इंग : ३२१)

२४०७ (२२ : २१, २ नोव्हेंबर ६३, ३२६–३२८)

एक बंगाली तरुण निःशास्त्रवाद्यांच्या नादी लागला. यंग बंगाल गटाचा सभासद झाला. बंडकाळात त्याने मक्तेदारी करून काही द्रव्य गोळा केले. त्यात गैरमार्गाने धन मिळविले, म्हणून एक वर्षाची कैद भोगावी लागली. नेटिवांच्या वेडगळ चालीवरून त्याचा विश्वास उडाला होता. ईश्वर एकच आहे, या तत्त्वाशी मात्र तो दृढ राहिला. पुढे मिशनऱ्यांनी त्यास उपदेश केला. एका खटल्यावरून तो बंदामध्ये पडला. त्याने प्रसिद्धपणाने येशु ख्रिस्तास स्वीकारले. आता त्याला उपदेशक व्हावयाचे आहे. अंधारात वावरणाऱ्या नेटिवांचा उद्धार करावयाचा आहे. त्याची पत्नी मात्र धर्मांतरामुळे रागावली. ईश्वर तिलाही येशूकडे फिरवो, म्हणून प्रार्थना करा.

२४०८ (२२ : २१, २ नोव्हेंबर ६३, ३२८-३३२)

ग्वाल्हेरच्या जयाजीराव शिंद्यांच्या दानधर्मावर, इंदुप्रकाश, वृत्तवैभव, ज्ञानप्रकाश, दीपदर्शक, या नेटिव हिंदू पत्रकारांनीसुद्धा टीका केली. प्रत्येक क्षेत्रात ब्राह्मणभोजनाची रेलचेल झाली. पोळ्यांची व लाडूंची भोजने होती. दक्षिणेचा दर १-२ आणे असा राहात असे. व्यवस्था नीट राहीना, म्हणून मोहल्यामोहल्यातून जेवण देण्यात येत होते. काही ठिकाणी भोजनाची तिकिटेही होती. महाराज ग्वाल्हेरीत व धर्म कोकणात. म्हणून अफरातफर होणे अटळ होते. सावकारांनी हुंडीचे दर वाढवले व ते गबर झाले. कारभारी मंडळीने तीन लक्षांची अफरातफर केली. तयार अन्नाचा मोठ्या प्रमाणावर नाश झाला. कंत्राटदारीची पद्धत अवलंबिल्यामुळे अन्नाचा दर्जाही कायम राहिला नाही. कित्येक ब्राह्मणांनीही जेवणाचे कंत्राट घेतले होते. कित्येकजण अजीर्ण होऊन मेले. जणू ते शिंद्याचे मोठेपण समक्ष सांगण्यास वैकुंठामध्ये गेले! बाजीरावानंतर एवढा दानधर्म शिंद्यानेच केला. 'जन्मकाळा वाजविला थाळा।' क्रियानष्ट लोकांना जेवण देण्यात काय पुण्य आहे, ते शिंदेच जाणोत! दूरदृष्टीच्या सुधारकांना हा सर्व प्रकार दुःखदायक वाटतो. आळसाची वृद्धी करण्यात कसलेच पुण्य नाही. सुधारलेल्या देशांत शाळा, धर्मशाळा, दवाखाने, रस्ते, पूल, यांसाठी देणग्या दिल्या जातात. आमच्या राजेलोकांनी असा काही धर्म करावा.

२४०९ (२२ : २१, २ नोव्हेंबर ६३, ३३२–३३६)

'सत्येच्छु' लिहितो की : प्राचीन भाषेतल्या ग्रंथांचा अर्थ जाणणारे थोडकेच असतात. जुन्या व अवघड ग्रंथांना विशेष मान तरी दिला जातो, किंवा एकदम अनादर होतो. ही शास्त्रे साधारण लोकांना कळू नयेत, अशी काळजी उंचवर्णी लोक घेतात. वेदांपेक्षा पुराणांची भाषा सोपी आहे. वेदांतले कोरडे नियम मनोरंजक वाटत नसले, तरी तो मुख्य आधार आहे. वेद ब्रह्मदेवाने केले, असे म्हटल्यावर ते गहन आहेत, असा भास होतो. ज्ञानप्रकाश, इंदुप्रकाश, वृत्तवैभव, या पत्रांतून लिहिले की, पोपटपंचीमध्येच फार वेळ वाया जातो आहे. या वेदांचा परकीय विद्वानांनी अभ्यास केला. सायणभाष्यामुळे त्यांचा अर्थ समजतो. मोक्षमुलरने ऋग्वेद छापला. होगसारखे मिशनरी अतिशय समतोलपणे वेदांचा विचार करतात. तरीही वेदांना अनादि मानणे चूक आहे. ते ऋषींनी रचले, ही वस्तुस्थिती आहे. एखादा मंत्र जुना झाला की, त्यात सामर्थ्य आहे, असे समजून त्याचाच जप केला जातो. पंचमहाभूतांची स्तुती, यज्ञाची कृती व अर्पणे वेदांमध्ये आढळतात. हिंदू लोकांनी स्वतः वेदांचा शोध करावा. उगीच खोटा अभिमान ठेवू नये. नीट वाचल्यावर भ्रमाचा भोपळा फुटेल आणि धर्माच्या ईश्वरदत्त स्वरूपाचा भ्रम नाहीसा होईल. वेदांत फक्त सृष्टीच्या तत्त्वांची भक्ती आहे. अयोग्य मतेही खूप आहेत. म्हणून कोरडे पांडित्य व बाबावाक्य आता सोडावी.

२४१० (२२ : २१, २ नोव्हेंबर ६३, ३३६)

अमेरिकेत उत्तरवाल्यांचा जय होत आहे. मक्षिको देशावरून अमेरिका व फ्रान्स यांचा वाद होणार आहे. पोलंडमधील बंडाचा जोर कमी होत आहे.

२४११ (२२ : २१, २ नोव्हेंबर ६३, ३३६)

कान्स्तानतिनोपलचे १५० तरुण व तरुणी युरोपीय देशांच्या पर्यटनास निघाले आहेत.

**२४१२** (२२ : २१, २ नोव्हेंबर ६३, ३३६)

तुर्की सुलतानाने एका मुस्लिमास यहुदी मारल्यावरून मरणाची शिक्षा दिल्ही. सुलतानाने आपली तसबीरही फोटोग्राफरकडून काढविली. तुर्कस्थानामध्ये नवे विचार कसे येत आहेत, ते यावरून दिसते.

**२४१३** (२२ : २१, २ नोव्हेंबर ६३, ३३६)

महाराजा दलीपसिंघाची आई चंद्राकुवर हिचा लंदनमध्ये मृत्यू झाला. तिचा अंत्यविधी ख्रिस्ती पद्धतीने झाला.

**२४१४** (२२ : २१, २ नोव्हेंबर ६३, ३३६)

सोरा तयार करण्याची लैसेन्स फी सरकारने १० वरून ५० रुपयांवर नेली आहे. (खैरखा खल्कवरून)

मुंबई, एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

---

## ज्ञानोदय, पुस्तक २२, अंक २२, मुंबई, १६ नोव्हेंबर १८६३

---

**२४१५** (२२ : २२, १६ नोव्हेंबर ६३, ३३७–३३९)

प्रकृती बिघडल्यामुळे दहा वर्षांपूर्वी रे. आलन अमेरिकेस गेले होते. तेथे त्यांचा मृत्यू झाला. ते ६३ वर्षांचे होते. मिशनात त्यांनी २७ वर्षे काम केले. पैकी २५ वर्षे मुंबई इलाख्यात घालविली. पवित्र शास्त्राचा व इतर पुस्तकांचा प्रसार केला. विजापूर, नागपूर, नगर, या भागांत त्यांचे विशेष कार्य होते. पवित्र शास्त्राचे भाषांतर केले, तसेच शमुवेलाच्या पहिल्या पुस्तकाचा तर्जमा त्यांनी केला. टामस ग्राहम यांच्या छापखान्यात ठसे तयार करणे, छापणे, पुस्तके बांधणे, या कामांस त्यांनी साहाय्य केले. या छापखान्याची आर्थिक स्थिती इतकी सुधारली की, त्या पैशांतून अमेरिकन मिशनांचा सर्व खर्च भागत असे. या देशात एकच मद्यपाननिषेधक पत्र होते व ते आलनसाहेबांनी अनेक वर्षे चालविले. अमेरिकेत त्यांनी ६०० पृष्ठांचा हिंदुस्थानचा इतिहास लिहिला.

**२४१८ अ** (इंम : ३३७)

**२४१६** (२२ : २३, १६ नोव्हेंबर ६३, ३४१–३४६)

नगरकर बातमीदार कळवतो की : सालाबादप्रमाणे अमेरिकन मराठी मिशनाची सभा झाली. प्रभू तारणाऱ्याचे राज्य कोठे वाढत आहे आणि त्यास काय अडचणी येतात किंवा उत्तेजन मिळते, त्याच्या गोष्टी या सभेत सांगण्यात येत असतात. यंदा ५०० लोक जमले. त्यांत बायाही होत्या. २५ तारखेस जाहीरसभा, प्रार्थना झाल्या. मुलींच्या शाळेची परीक्षा घेण्यात आली. मुलींच्या व मुलग्यांच्या अभ्यासाची चांगली प्रगती दिसून आली. खेड्याचे अळशी पंतोजी व शहरातील सुज्ञ पंतोजी, यांची स्थिती संवादरूपाने सादर झाली. उपदेशकांच्या परीक्षाही पार पडल्या. सभेचे अध्यक्ष रे. दीन होते. ख्रिस्ती होण्यासाठी इच्छिणारे दीड हजार लोक तरी आहेत. यावरून ईश्वराचे आभार मानण्यात आले. नेटिवांना देवाविषयी खरे ज्ञान कसे शिकवावे, याबद्दल भाषण झाले. धर्मप्रसाराचे अगत्य एका पालकाने समजावून सांगितले. शांती, मौन, शिक्षा, पापमोचन, यांवर भाषणे झाली. पाठलाग सोसून देवास अर्पण व्हावे, असे विचार प्रगट करण्यात आले. शक्यनुसार अर्पणे देण्यात आली. सल्ले दिले व बुगड्याही देण्यात आल्या. कोणी शेताचे पीक, तर कोणी रोजगाराचा पाचवा हिस्सा देण्याचे वचन दिल्हे. आनुभविक व बोधकारक गोष्टी लिहू गेले, तर विस्तार फार वाढेल. ५०० जणांनी प्रभुभोजन घेतले. विधवेच्या दोन टोळ्या समाधानाने घेणाऱ्या प्रभूची स्तुती असो.

**२४१६ अ** (इंम : ३३९–३४१)

२४१७ (२२ : २२, १६ नोवेंबर ६३, ३४६–३४९)

'स्त्रीकल्याणेच्छू' लिहितो की : हिंदु स्त्रियांची अवस्था फार वाईट आहे. त्यांचे जीवन म्हणजे जन्मठेप व अंधारकोठडीची कैदच होय. काहींना नीच व कठीण प्रकारची सक्तमजुरी करावी लागते. श्रीमंत लोक स्त्रियांना चिकाऱ्या पडद्याचा गोषा करतात. दासींचा व खोजांचा जागता पहारा ठेवतात. अशी अंधारकोठडीची जन्मठेप आहे. मध्यमप्रतीचे लोक स्त्रियांना नेहमी घरात राहण्याची सक्ती करतात. इतर स्त्रियांना दिवसभर रानात काम करावे लागते. श्रीमंताचे खोजे नपुंसक असतात, तरी या स्त्रिया विद्याहीन व अधर्मी असल्यामुळे व्यभिचारास प्रवृत्त होतात. त्यांना दास-दासी मदत करतात, म्हणून ती त्यांची लाडकी बनतात. तिच्या नवऱ्यास हे समजले, तर खून व पलायन, यांपैकी एकच घडते. विषयसुखाचा उपभोग घेण्याचे ध्येय ठेवून त्या परपुरुषाशी समागम करतात. बाहेरकामास जाणारी स्त्री ही अविचाराने व्यभिचारी बनते. मग त्यांचे भ्रतार त्यांना ताडण करतात व कधीकधी त्यांचा प्राणही घेतात. म्हणून त्यांच्याभोवती सुनीती, तसेच ईश्वराचे सद्भय, यांचे पडदे उभारावेत. अज्ञानी व मूढ स्त्री पापमार्गात जाते. यावर संपादक लिहितात की, स्त्रियांची वागणूक जरी चांगली असली, तरी त्यांना विद्या व सुशिक्षा आवश्यक आहे. गोषात राहून त्या पिंगट व अशक्त बनतात. त्यांना मोकळी हवा व प्रकाश हवा आहे. त्यांच्या मनालाही धर्मप्रकाशाची गरज आहे.

२४१८ (२२ : २२, १६ नोव्हेंबर ६३, ३४९–३५१)

'नगरकर' लिहितो की : भिंगारमध्ये अश्विनात यात्रा होती. महागाईमुळे यात्रा भरणार नाही, असे वाटले. पण जत्रेकऱ्यांचे पोषाक पाहून महागाईची आठवणही झाली नाही. लुच्चे दारूबाज लोक आणि स्वेच्छाचारी वाया चट्टीपट्टीचे पोषाक करून अत्यंत कुकर्मे करतात. पोऱ्यांच्या तमाशाची मोठी धूम झाली. त्यांनी यावेळी अशी युक्ती केली की, लष्करी हद्दीत तमाशा लावला. एरव्ही ख्रिस्ती लोक लक्ष ठेवून असतात. पण येदा काही करता आले नाही. सुज्ञ अंमलदारांनी हे तमाशे बंद करावयास हवे होते. पीनल कोडात बंदी आहे, असे बाजाराच्या मास्तरांनी सांगितले. पण काही उपयोग झाला नाही. लोकांची मने भ्रष्ट करण्याचे काम निर्विघ्नपणे चालू राहिले. जत्रेत उपदेश केल्यावर चावडीजवळ भरलेला तमाशा माजिस्त्रेतास सांगून मोडला. जत्रेत शुद्ध आणि पवित्र काम केले, तरच तुम्ही सन्मार्गाने चालता, याविषयी खातरी पटेल. देव भ्रष्ट व दुष्ट ठरणार नाहीत. दुष्ट कवींच्या बीभत्स लावण्यांनी मने भ्रष्ट होतात. जारजारिणींच्या युक्त्या–प्रयुक्त्या, निर्लज्ज व अचकट विचकट संवाद ऐकून हा समाज नक्की बिघडेल. आपला मुलगा नाच्या व व्यभिचारी व्हावा, असे कोणासही वाटत नसते. कोणास राग येवो की लोभ, तमाशा मोडलाच पाहिजे. सरकारी कामदारांना याविषयी लोकांनी मदत करावी.

२४१९ (२२ : २२, १६ नोव्हेंबर ६३, ३५२)

सिविल सर्विसची परीक्षा लंडनमध्ये होऊन उत्तीर्ण उमेदवारांना सनद मिळते. नेटिवांना या परीक्षेस बसता येणार नाही. कारण स्नेहीजनांच्या भिडेस पडून ते कायदा पाळू शकणार नाहीत. यंदा मात्र बाबू सत्येन्द्रनाथ ठाकूर हा बंगाली गृहस्थ परीक्षेत उतरला, म्हणून आम्हांस आनंद वाटतो. त्यांची नेमणूक याच इलाख्यात झाली. सध्या बाबू युरोपात गेले आहेत. परत आल्यावर ईश्वराचे भय बाळगून ते काम करतील, अशी आशा आहे.

**२४२०** (२२ : २२, १६ नोव्हेंबर ६३, ३५२)
नेटिव लोक इंग्लंडमध्ये जागा घेऊन स्थायिक होत आहेत. येथील इस्रायली सावकार डेविड सासून यांनी ५ लक्ष रुपयांस टेम्स नदीच्या काठावर जागा खरेदी केली.

**२४२१** (२२ : २२, १६ नोव्हेंबर ६३, ३५२)
लंकेमध्ये मिशनाची लहानमोठी २१० ठाणी आहेत. १८१ उपदेशक आहेत. २२४ मंडळ्यांत १५,२७३ नेटिव आहेत. २३ इंग्रजी शाळांमध्ये १६५७ विद्यार्थी शिकतात. २१७ देशी शाळांमध्ये ८,३९० मुले आहेत. ११५ मुलींच्या शाळा असून ३,९८९ मुली शिकतात.

मुंबई, एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

## ज्ञानोदय, पुस्तक २२, अंक २३, मुंबई, १ डिसेंबर १८६३

**२४२२** (२२ : २३, १ डिसेंबर ६३, ३५३)
हिंदुस्थानचे गवर्णर जेनरल लार्ड एलगिन यांना २० नोव्हेंबरला देवाज्ञा आली. मुंबईमधील किल्ल्याचा बावटा अर्ध्या काठीवर लावण्यात आला. मुलकी व लष्करी अधिकाऱ्यांना शोकसूचक पोशाक घालण्याचा हुकूम झाला. सर्वच साहेबलोकांनी साहेबमवसूफ यांच्या सन्मानार्थ शोकसूचक पोशाक घालावा, अशी विनंती करण्यात आली.

**२४२२ अ** (इंग : ३५३)

२४२३ (२२ : २३, १ डिसेंबर ६३, ३५४–३५५)

रा. कासम महंमद हे आता एतद्देशीय ख्रिस्ती मंडळीचे पालक झाले. रे. रामकृष्ण विनायक मोडक यांनी त्यांना दीक्षा दिल्ही. १८५६ मध्ये रा. कासमना सुवार्तिक व्हावयाचे होते. तीन वर्षे त्यांनी ईश्वरविद्येचा अभ्यास केला. त्यांचे ज्ञान व सेवा मिशनास पसंत पडली. ते पालकाचे कामास लायक आहेत, असे परीक्षकांचे मत झाले. वडील मंडळींनी मस्तकावर हात ठेविला. अनेक ख्रिस्तीजनांच्या उपस्थितीत नगरकर यांनी 'खरी नम्रता' वर कीर्तन केले. खेड्यांमधील मंडळीस पालक मिळाल्याबद्दल आनंद वाटतो, पण अजून १७ पालक हवे आहेत. खोकरप्रमाणेच इतर मंडळ्यांसही पालक निवडून घेण्याचे उत्तेजन मिळेल. प्रत्येकाने देवाजवळ पटलेला, खरेपणाचे वचन नीटपणे पाळणारा कामकरी व्हावे.

२४२३ अ (इंम : ३५३–३५४)

**२४२४** (२२ : २३, १ डिसेंबर ६३, ३५७–३६०)

रा. ह. साळवे लिहितात की : प्रभूच्या मंडळीत कृष्णाजी साबळे आले. सूर्य सर्व ग्रहांना आपणाकडे ओढतो, त्याप्रमाणे प्रभू त्यांना आकर्षित करतो. कृष्णाजीचा जन्म कृष्णाष्टमीचा आहे. त्यांचा आजा लाडू याने पन्नास सोन्याच्या मूर्ती देव्हाऱ्यात ठेवल्या होत्या. बाप येसोबा मूर्तिपूजा करी. आई मुक्ताबाई मानवी गुरूचा धाक बाळगीत असे. १८१८ त जन्मलेले साळवे घरात फार लाडके होते. बापास वाटे की, त्यांनी हरिभक्तच व्हावे. कार्तिकस्नानही ते निष्ठेने करीत. शाळेत रे. रीड, बाग व रे. आलन यांचा उपदेश मिळे. जुन्या धर्माचा पगडा त्यांच्या मनावर असल्यामुळे ७०० शिष्यांचा गुरू बनून ते कीर्तन करीत. पुढे देवाने त्यांना नाशाच्या अवस्थेमधून काढून पवित्र कळपात मिळविले. असाच एक ज्योतिषीही लोकांना फार भोंदीत असे. मिशनऱ्याचा उपदेश ऐकून तोही ख्रिस्ती झाला. इकडे देवाचे शेत फार मोठे आहे. पण कामकरी थोडे आहेत. पापी जनांना पश्चात्ताप होऊन त्यांची मने प्रफुल्लीत करावीत. 'याबर संपादक लिहितात की : हे पत्र लिहिणारे रा. ह. साळवे यांचा नुकताच मृत्यू झाला. प्रभूचा दिवस चोराप्रमाणे येतो. या उद्योगी तरुणाने बरीच विद्या संपादिली होती. ख्रिस्तावर विश्वास ठेवून तो मेला.

**२४२४ अ** (इंम : ३५५–३५६)

**२४२५** (२२ : २३, १ डिसेंबर ६३, ३६१–३६२)

दरवर्षीप्रमाणे दि. ३ ज्यान्युएरीपासून १० तारखेपर्यंत प्रार्थना कराव्यात, असे इंवाजेलिकल एलायन्सने जाहीर केले. ईश्वराची उपकारस्तुती करा. त्याने दिलेल्या आशीर्वादाचे मनन करा. भ्रांतीच्या मनावर सत्याचा जय कसा होत आहे, त्याचा अभ्यास करा. पश्चातापी मनाने पाप कबूल करा. अधार्मिक व दुराचारी लोकांनी देवाकडे फिरावे, यासाठी प्रार्थना करा. लढाया बंद होऊन शांती नांदावी, पृथ्वीवर पवित्र आत्म्याची विपुल वृष्टी व्हावी, यांकरिता देवाचा आशीर्वाद हवा आहे.

२४२८ अ (इंम : ३६०)

२४२६ (२२ : २३, १ डिसेंबर ६३, ३६२–३६३)
मोरोबा कानोबाच्या 'हिंदु विधवांचे पुनर्विवाह' या पुस्तकावर अभिप्राय लिहिताना ज्ञानोदयाने म्हटले होते की : या सुधारणुकीच्या कुल्यास जुन्या इतकाच नवीन मंडळींचाही विरोध आहे. ते खरे ठरले. कारण वर्तमानदीपिकाकर्ता लिहितो की, नारायण सुंदरजी हे ३५ ते ४० च्या दरम्यान असून त्यांचा सुधारणेस विरोध आहे. 'जुन्या शाळेतील लोक' नव्या शाळेत येण्यास तयार नाहीत. उलट रा. भाऊ महाजन, दादोबा पांडुरंग, मोरोबा कानोबा, ही पिकलेल्या केसांची पोक्त मंडळी पुनर्विवाह प्रकरणास अनुकूल आहेत, म्हणून त्यांना 'तरुण सुधारक' म्हणावयास हवे. ते खरे विचारी आहेत.

२४२७ (२२ : २३, १ डिसेंबर ६३, ३६३–३६६)

'एक ख्रिस्ती' पत्रात म्हणतो की : पूना आब्झरवरने अशी सूचना केली की, युरोपियन व ख्रिस्ती लोकांसाठी पृथक पृथक शाळा असाव्यात. सरकारी शाळेत ब्राह्मण वगैऱ्यांची मुले शिकतात. ती सर्व स्वतःला उंच जातीची मानतात. उलट युरोपियन मुलांना वाटते की, मूर्तिपूजकांच्या समागमाने आपण बिघडू. पण तेच घरात हिंदू नोकर ठेवतात. पृथ्वीवरील सर्व माणसे एकाच रक्ताची आहेत, हे विसरू नये. युरोपियन मुलांतही काही मुले मलिन असतात. नेटिवांची मुले शिव्या देतात, लहानशा कारणावरून आणाशपथा वाहातात, त्यांच्यात चोरीचा हातवळा असतो, अचकट विचकट बोलून ती लाजिरवाण्या गोष्टी करतात. शिवाय बरेचजण नास्तिक आहेत. निःसंग मतांनी ते बेलगाम बनले. मरणानंतर न्याय, दंड, देणगी, काहीच नाही, असेही ते समजत असतात. शालाखात्याने मकलकृत पाठ्यपुस्तक बंद केले. कारण त्यात ख्रिस्ती धर्माचे धडे होते. सध्याच्या पाठांत कसलीच शिकवण नाही. शिक्षकांतही काही माल्चास्थे साध्या कारणावरून ख्रिस्ती मुलांना धारेवर धरतात. वेळीअवेळी बैबलाची कुचाळी करतात. मग या मुलांना सुखाने अभ्यास करणे अशक्य वाटते. म्हणून त्यांच्या पालकांनी अर्ज केलेला आहे की, त्यांच्याठी पृथक शाळा असाव्यात. तर त्यांनी मिशनच्या शाळेत आपली मुले पाठवावीत.

२४२८ (२२ : २३, १ डिसेंबर ६३, ३६६–३६७)

भा. यं. पवार लिहितात की : इंदूरचा दसरा फार प्रेक्षणीय असतो. समारंभासाठी महाराज तुकोजीराव होळकर सोन्यारुप्याने शृंगारलेल्या हत्तीवरील अंबारीत बसतात. मागून लष्कराच्या पलटणी चालतात. रसिदंत मेजर मीडही स्वतंत्र अंबारीतून येतो. यंदा जावऱ्याचे नबाब महंमदसाहेब पाहुणे म्हणून उपस्थित होते. अपट्याच्या पानांची पूजा केल्यावर हेले मारण्याचा कार्यक्रम होतो. हे प्राणी देवीची अर्पणे समजली जातात. गाय मारू नये, असे मानणारे लोक एवढा क्रूरपणा करतात! मुंगीपासून हत्तीपर्यंत सर्वांचा जीव सारखा आहे ना? मग हेला काय वैरी आहे का? अठरा वर्णांचे गुरू असणारे ब्राह्मण अशा कृत्यास प्रतिबंध कां करीत नाहीत? ते तर मन लावून हा प्रकार पाहात बसले. पाप व नरकदंड यांतून सुटका होण्याकरिता ईश्वराची प्रार्थना करावी. प्राणी मरण्याने पापच वाढते.

२४२९ (२२ : २३, १ डिसेंबर ६३, ३६७–३६८)

ग्यारिबाल्दीचा मुलगा तुर्कस्थानात सैन्य जमा करीत आहे. त्यामुळे रुशियाशी त्याची लढाई होण्याचा संभव आहे. अमेरिकेत तुमुळ युद्ध चालू आहे. इंग्लिश सैन्य अफगाण बंडखोरांचा बीमोड करण्यात गुंग आहे. त्यांनी ५०० अफगाण मारले.

२४३० (२२ : २३, १ डिसेंबर ६३, ३६७–३६८)

मद्रासचे गवर्णर विल्यम देनिसन हे एल्गीन यांच्या जागी गवर्णर जेनरल होणार आहेत. त्यांचा एक भाऊ पार्लमेंटचा सभासद, तर दुसरा बिशप आहे. तिसरा मद्रासेत मिलिटरीचा सेक्रेटरी आहे. १८४६ पासून देनिसन सरकारी चाकरीत आहेत.

**२४३१** (२२ : २३, १ डिसेंबर ६३, ३६७–३६८)

महाराणी विक्टोऱ्या यांनी वैसराय यांना युनियन जैक वापरण्यास परवानगी दिल्ही. त्यावर स्टार आव इंडिया व राजाचा मुकुट राहतील. (इंदुप्रकाशावरून)

**२४३२** (२२ : २३, १ डिसेंबर ६३, ३६७–३६८)

वायव्य प्रांतातील टाक संस्थानचा मौलवी फांडर या मिशनऱ्याकडून दीक्षा घेऊन खिस्ती झाला. नातेवाईकांनी तसेच नबाबाने त्यास पाठलाग करून फार दुःख दिल्हे. तरीही त्याचे मत कायम आहे.

**२४३३** (२२ : २३, १ डिसेंबर ६३, ३६७–३६८)

वनस्पतिविद्येचे ज्ञान वाढावे, म्हणून सर जमशेदजी रुस्तमजी हे नवीन शोध लावणारास १०० रुपयांचे बक्षिस देणार आहेत. अशी दहा बक्षिसे देण्यास ते तयार आहेत.

मुंबई, एक्सचेंज प्रेस, फोर्ट

## ज्ञानोदय, पुस्तक २२, अंक २४, मुंबई, १५ डिसेंबर १८६३

**२४३४** (२२ : २४, १५ डिसेंबर ६३, ३६९)

नेक नामदार एलगिन यांच्या जागेवर सर देनिसन यांची नेमणूक झाली. त्यांनी कलकत्त्यास जाऊन अधिकार स्वीकारला. आनराबल माल्तबी यांची मद्रासचे गवरनर म्हणून नेमणूक झाली.

**२४३४अ** (इंग : ३६९)

**२४३८** (२२ : २४, १५ डिसेंबर ६३, ३६९–३७०)

सिती आफ शांघै हे गलबत लिवरपूलला गेले. त्यातून अमेरिकन मिशनचे बिसेलसाहेब विलायतेस गेले आहेत. या देशात त्यांनी १२ वर्षे मिशनरी कार्य केले. घोडनदी व नगर या मिशनांत त्यांचा मुक्काम असे. प्रकृति बिघडल्यामुळे ते स्वदेशी गेले. ज्ञानोदयासाठी त्यांनी अनेक उपयुक्त विषय व सदरे लिहिली होती. त्यांची प्रकृती सुधारून ते लवकर परत येवोत, ही प्रार्थना!

**२४३८ अ** (इंम : ३६९)-

**२४३९** (२२ : २४, १५ डिसेंबर ६३, ३७१–३७३)

हिंदुस्थानाविषयी १८६२ सालचे पुस्तक प्रसिद्ध झाले. मर्दक साहेबांची वार्षिक पुस्तक प्रकाशित करण्याची ही पद्धत फार संतोषजनक आहे. हिंदू लोकांची गृहस्थिती, धर्म व विद्यावृद्धी, यांचा तपसील त्यात येतो. बिगरसरकारी शाळांच्या मदतीचे नियम योग्य नाहीत. तसेच विद्याखात्याचे अधिकारी त्यांना उत्तेजन देत नाहीत. त्यामुळे शाळा चालविणे कठीण होते. पण मिशनऱ्यांची खात्री झाली की, सरकारी मदत घेऊ नये. सरकार म्हणते की, सरकारी शाळांत आम्ही कोणताच धर्म शिकवीत नाही. पण नेटिवांच्या धर्मातील कथा शिक्षकमंडळी अती पाल्हाळिकपणाने शिकवतात. ख्रिस्ती कथा मात्र पुस्तकातून काट्याप्रमाणे उपटून टाकल्या! या अहवालावरून असे दिसते की, स्त्रियांच्या शिक्षणास फार उत्तेजन मिळते. काशीतील मडमा स्त्रियांना नियमितपणे शिकवितात. मडम नथ घालीत नाही, म्हणून नेटिव बाया त्यांच्यावर टीका करतात. मडमांना नेटिवांच्या मूर्ख चालीशी फार झगडावे लागते. दागिन्यांपायी इथले लोक लाखो रुपये खर्च करतात. रोमन कॅथालिक मिशनांचा जो तपशील मिळाला, त्यावरून असे दिसते की, या देशात १० लाखांवर कॅथालिक आहेत. पैकी ९० हजार गोव्यामध्ये राहात आहेत. दहा वर्षांपूर्वी त्यांचे २८८ उपदेशक होते. आता ४११ आहेत, तर प्रॉतेस्तंत उपदेशकांची संख्या ३९२ वरून ५१९ वर गेली.

**२४३६ अ** (इंम : ३७०–३७१)

**२४३७** (२२ : २४, १५ डिसेंबर ६३, ३७३–३७७)

आमचे बंधु ज्ञानप्रकाशकर्ते लिहितात की : आशेवर मोठे कार्य चालते. ते खरे आहे. पण मृगजळामागे धावणाऱ्या हरणापेक्षा बी पेरणाऱ्या शेतकऱ्याची आशा जास्त फलदायक असते. पाद्री लोक पैसा, हिंमत, अंमल, उद्योग, यांच्या साहाय्याने धर्मप्रसार करतात. वक्तृत्वाचा मोठाच बाणा बाळगतात. पण एवढी अनुकूलता असून पाच–दहा अज्ञानी व पोटार्थी महारमांग तेवढे ख्रिस्ती होतात! यावर आमचे उत्तर असे की, ख्रिस्ती धर्माबद्दल सर्व अधिकाऱ्यांना आस्था वाटते. असे असूनही आम्ही कधी जबरदस्ती केली नाही. आमच्यावर पैशांची व साधनांची तशी कमताईच आहे. एकूण उपदेशकांपैकी एक चतुर्थांश लोक नेटिव आहेत. सोवळे करणारी मंडळी त्यांची सावलीही पडू देत नाहीत. उदमी लोक व सरकारी नौकर दुरभिमानात व बदफैलीपणात इतके गर्क आहेत की, ते धर्माविषयी विचारही करीत नाहीत. तरुण मंडळी थोडे शिक्षण घेतले की, निःशास्त्रवादी बनतात. अपकीर्ती व पाठलाग यांचे भय वाटल्यामुळे ते विचारच करीत नाहीत. असली प्रतिबंधक कारणे असूनसुद्धा मिशनऱ्यांच्या मेहनतीस मोठे फळ आले. दहा वर्षांपूर्वी १,१२,८१६ ख्रिस्ती होते. आता ते १ लाख ६० हजार झाले आहेत. म्हणजे दरवर्षी सरासरी ४,१३२ लोक ख्रिस्ती झाले. यावरून दिसते की, मिशनऱ्यांची आशा काही व्यर्थ नाही. आमचा सत्यधर्म सतत जय पावतो आहे.

२४३८ (२२ : २४, १५ डिसेंबर ६३, ३७७–३७९)

'यहुद्यांचा कळवळा करणारा' लिहितो की : पोप हा रोमन कॅथालिकांचा शंकराचार्य आहे. रोममध्ये ५ हजार यहुदी राहातात. टैबर नदीच्या तीरावर घेटो विभागात हे लोक आपल्या राबी गुरूसमवेत राहातात. तेथील शाळेत १५० मुले हिब्री भाषा व राबी विद्या शिकतात. बुधवारी आपला माल ते बाजारात विकतात. पूर्वी त्यांस मोठे कर द्यावे लागत. उदा. कार्निवल या घोड्यांच्या पैजेचा कर व ईस्टरचा कर देऊन त्यांना एक वर्ष रोमात राहण्याची परवानगी मिळे. फुलांच्या झेल्यांतून लाच देऊन प्रधानाच्या शिव्या खाव्या लागत. आता वर्षाकाठी फक्त २,६०० रुपये द्यावे लागतात. त्यांना सैनिकाचे काम किंवा अधिकारपद मिळत नाहीत. खोदकाम करणारे कसबी कारागीरही बेकार राहातात. श्रीमंत यहुदी परप्रांतातून गरिबांसाठी पैसे पाठवितात. यरूशलेम या शहरावर त्यांचा प्राचीन अधिकार असून तो परत मिळण्याची ते वाट पाहातात. हे नेमनिष्ठ यहुदी नेहमी प्रार्थना करतात. शास्त्राचे पुस्तक खाली पडले, तरी ते संकट समजतात! त्यांच्या स्त्रिया विद्याहीन आहेत. हे लोक प्रामाणिक व नीतिमान असून जारकर्माचा त्यांना कंटाळा आहे. संध्याकाळ झाल्यावर ते बाहेर हिंडतही नाहीत.

**२४३९** (२२ : २४, १५ डिसेंबर ६३, ३७९–३८१)

'नगरकर' लिहितात की : नगरात मे. दिसिल्वा यांनी दिबेतिंग सोसैती सुरू केली होती. दिवानी व लष्करी लोकांची तेथे व्याख्याने होत असत. स्नेहभाव वाढीस लागे. पुढे मे. कोक व छत्रे मास्तरांनी ही सभा चालविली. छत्रे यांची बदली झाल्यावर रा. नारायण विष्णुपंत यांनी उत्तम कार्य केले, रा. सखाराम बाळकृष्ण, रा. सा. गोपाळराव हरि, रा. ब. मोरोबा कानोबा, रा. नारायण विष्णु, तसेच. रा. सा. रामचंद्र अमृत दुगल, हे दर आठवड्यास वादसभा भरवितात. मराठी सभेचे कार्यही उत्तम चालते. उत्तम निबंध लिहिणाऱ्या विद्यार्थ्यांना उत्तेजन देऊन बक्षिसेही देतात. मुलांचे इंग्रजी निबंध चांगल्या रीतीने शुद्ध करावयास हवेत. महिन्यातून एकदोनदा जरी अशा सभा भरल्या, तर ज्ञानाची वृद्धी होईल.

**२४४०** (२२ : २४, १५ डिसेंबर ६३, ३८१–३८२)

'एक वाचक' लिहितो की : रत्नागिरीजवळ मालगुंड गावात २६ सप्टेंबरला रात्री पूर्वेकडे मेघधनुष्य दिसले. रात्री मेघधनु दिसणे, ही गोष्ट आम्हांला ऐकून ठाऊक होती. पण ते पूर्वेस दिसले, हे मात्र चूक असावे. चंद्रकिरणांच्या योगाने दिसणारे मेघधनु पश्चिमेस दिसले पाहिजे. या लिहिण्यात काहीतरी हस्तदोषच असावा. वेड्या समजुती बाळगणारे लोक यातही तर्क लढवितात. ते म्हणतात, हा अपशकुन आहे. याने महर्गतात वाढ फार आहे. खरे म्हणजे, या दोन गोष्टींचा काहीच संबंध नाही.

**२४४१** (२२ : २४, १५ डिसेंबर ६३, ३८२–३८४)

अलीकडे इंग्लंडमध्ये फार प्रवासी लोक जातात. त्यांच्यासाठी लंदन शहरात स्ट्रेंजर्स होम बांधले आहे. एशया, अफ्रिका, तसेच सागरी प्रदेशांतून गेल्या ६ वर्षांत २ हजार लोक तेथे राहून गेले. कित्येक लोक तेथे ३–३ महिने राहिले. या गृहास अजून ५० हजारांचे कर्ज आहे.

२४४२ (२२ : २४, १५ डिसेंबर ६३, ३८२–३८४)
इंग्लंडमध्ये १०० एत्तद्देशीय लोक राहातात. त्यांत मुंबईमधील ८० लोक आहेत. ५ लोक तर काही काम न करता नुसते भटकतात.

२४४३ (२२ : २४, १५ डिसेंबर ६३, ३८२–३८४)
कोल्हापूरच्या राजास पूर्ण अखत्यारीचा अधिकार मिळाला.

२४४४ (२२ : २४, १५ डिसेंबर ६३, ३८२–३८४)
एका अमेरिकन मुलास रात्रभर चांदण्यात झोपण्याने अंधत्व आले.

२४४५ (२२ : २४, १५ डिसेंबर ६३, ३८२–३८४)
ग्रेत ब्रितनमध्ये ३ कोटी एकर जमीन पडीत आहे. कारण तेथील लोकांचे लक्ष शेतीपेक्षा इतर धंद्यांत जास्त आहे.

२४४६ (२२ : २४, १५ डिसेंबर ६३, ३८२–३८४)
गरूड पक्ष्याचा वेग मिनटास १ मैल असतो. (वर्तमानदीपिकावरून)

२४४७ (२२ : २४, १५ डिसेंबर ६३, ३८२–३८४)
रेशमाच्या किड्यापासून आणि सापाच्या कातीपासूनही साखर करण्याचा शोध एम्. डी. लूफस याने लावला आहे. (इंदुप्रकाशावरून)

२४४८ (२२ : २४, १५ डिसेंबर ६३, ३८२–३८४)
ब्रह्मदेशात ३८७ मिशन ठाणी आहेत. ५९,३६६ ख्रिस्ती आहेत. ८ इंग्रजी शाळांत ५८६ विद्यार्थी आहेत. नेटिवांच्या ४१६ शाळांमध्ये ४,२१६, तर ५ मुलींच्या शाळांत १,०६६ मुली शिकतात.

२४४९ (२२ : २४, १५ डिसेंबर ६३, ३८२-३८४)

गेल्या ४९ वर्षांत इंग्लंडमधून ५३,३३,८१२ लोक परदेशी गेले. पैकी १२ लाख ३४ हजार अमेरिकेत, ८ लाख आस्ट्रेलियात, ३२ लाख ३८ हजार दक्षिण अमेरिकेत गेले. (ज्ञानप्रकाशवरून)

२४५० (२२ : २४, १५ डिसेंबर ६३, ३८४)

सरकारच्या ठरावाप्रमाणे आता वर्तमानपत्रांचे टपाल हशील आगाऊ भरावे लागते. तरी ज्ञानोदयच्या वर्गणीदारांनी आपली पुढील वर्षाची वर्गणी १॥ रुपया त्वरित पाठवावी. ज्यांचे पैसे येणार नाहीत, त्यांचा अंक बंद केला जाईल. साहेबलोकांनी ४ रुपये ८ आणे पाठवावेत.

२४५० अ (इंम : ३८४)

मुंबई, एक्स्चेंज प्रेस, फोर्ट

# सूची

धार्मिक व धर्मप्रसार :

बाप्तिस्मा :

मिशनाविषयी :

## शैक्षणिक-शिक्षणसंस्था-परीक्षा वगैरे :

## विज्ञान, संशोधन, कला, वगैरे :



## प्राणी, पशुपक्षी, वृक्ष, वगैरे

## इतिहास, भूगोल, खगोल, वगैरे



## लोकस्थिती :

## प्रजा व सरकारी कारभार :

आरोग्य :

पत्रव्यवहार :

बातम्या :

संपादकीय :



स्थलनामसूची :

व्यक्तिनामसूची :

## प्रकाशने व प्रकाशननिर्मितीसंबंधी : पुस्तके :

## कविता :



## नियतकालिके :

| पृष्ठ | ओळ | मुद्रित | वाचावे |
|---|---|---|---|
| ३० | ६ | फत्तेगड व मिनपुरीस | फत्तेगड व मिनपुरी येथे |
| ३६ | २ | ११ एप्रिल १८५८ | [? चूक मुळांत दिसते !] |
| ४९ | २ | पराकष्ठेचे | पराकाष्ठेचे |
| ६७ | १९ | पलटणीच्या | पलटणींच्या |
| ७२ | २५ | पयामध्ये | पयांमध्ये |
| ७३ | २० | रूपये | रुपये |
| ७४ | ६ | सैनिकात | सैनिकांत |
| ७७ | २ | इंग्रज | इंग्रज |
| ७८ | २१ | ५ जुलै | १५ ज्युलै |
| ९० | ६ | १५ ऑगस्त | १६ ऑगस्त |
| ९८ | १५ | निणय | निर्णय |
| १०८ | ११ | शोवयास | शोवयांस |
| १४६ | २० | यासारिखे | यांसारिखे |
| १४८ | १७ | नेटिवास | नेटिवांस |
| १५२ | ९ | कोणच्याही | कोणाच्याही |
| १५५ | ६ | धर्मामधील | धर्मांमधील |
| १५७ | १९ | धर्मात | धर्मांत |
| १७६ | २० | कोणाच्याहा | कोणाच्याही |
| १९० | ४ | वंशपरंपरने | वंशपरंपरेने |
| २०९ | १६ | बडखोरास | बंडखोरांस |
| २१२ | ९ | त्यास | त्यांस |

| पृष्ठ | ओळ | मुद्रित | वाचावे |
|---|---|---|---|
| २२६ | १६ | आर्शीवाद . . . सिद्धिस | आशीर्वाद . . . सिद्धीस |
| २३४ | २४ | नगर पार्कवर | नगरपार्कवर |
| २३९ | १८ | स्पट | स्पष्ट |
| २३९ | २१ | मिळाला | मिळाली |
| २६६ | ११ | दरिद्रिच | दरिद्रीच |
| २७५ | ३ | सुधाकर | सुधारक |
| २७९ | ११ | १९ : २२ नोव्हेंबर ५९ | १८ : २२ नोव्हेंबर ५९ |
| २९७ | २४ | आहे | आहेत |
| ३११ | १९ | ३० लाखाहून | ९० लाखांहून |
| ३१२ | १७ | यात्रेकरून | यात्रेकरू |
| ३१६ | ७ | तटबंटी | तटबंदी |
| ३२० | ६ | लिंच बर्गला | लिंचबर्गला |
| ३२३ | ५ | तुफु झल | तुफुझल |
| ३२९ | २० | ब्राह्मणाच्या | ब्राह्मणांच्या |
| ३३३ | ३ | ब्राह्मणातील | ब्राह्मणांतील |
| ३३४ | ३ | चरित्र पुस्तकावरुन | चरित्र-पुस्तकावरुन |
| ३४७ | ८ | नगर पार्कच्या | नगरपार्कच्या |
| ३४९ | १३ | ६ तोळ्यापर्यंत | ६ तोळ्यांपर्यंत |
| ३५१ | ८ | पाणी प्रकारात | पाणीप्रकरणात |
| ३५९ | ४ | ब्राद | वाद |
| ३७५ | १८ | विषयामध्ये | विषयांमध्ये |

| पृष्ठ | ओळ | मुद्रित | वाचावे |
|---|---|---|---|
| ३७९ | २ | बान्याचे | वाळयाचे |
| ३८३ | ९ | आर्शीवादाने | आशीर्वादाने |
| ३८४ | ७ | त्याचे | त्यांचे |
| ३८६ | १५ | अकाशात | आकाशात |
| ३८६ | १९ | रुपयाचे | रुपयांचे |
| ४०१ | ५ | डांके | डाके |
| ४०२ | ४ | धृतकुल्या | घृतकुल्या |
| ४०३ | ३ | त्यास | त्यांस |
| ४१४ | ११ | तर आणि | आणि |
| ४१७ | ३ | पाणी प्रकरणाचे | प्राणीप्रकरणाचे |
| ४२३ | ४ | धर्मग्रंथ | धर्मपंथ |
| ४२८ | १६ | जातीचे | जातींचे |
| ४३२ | २ | पाणी प्रकरणाबाबत | पाणीप्रकरणाबाबत |
| ४३२ | १४ | पाप दृष्टी | पापदृष्टी |
| ४३३ | ५ | युधकैचांना | युद्धकैद्यांना |
| ४३५ | १९ | सुतारकी लोहारकी | सुतारकी, लोहारकी |
| ४६० | ९ | त्यानी | त्यांनी |
| ४६१ | ११ | पोळी बहाद्दर | पोळीबहाद्दर |
| ४८५ | १६ | साक्षीदाराना | साक्षीदारांना |
| ४८७ | २ | पुष्टिकरण | पुष्टीकरण |
| ४८९ | ७ | सर्व धर्माचे | सर्व धर्मांचे |

| पृष्ठ | ओळ | मुद्रित | वाचावे |
|---|---|---|---|
| ४९७ | १० | अठरा वर्णांचे | अठरा वर्णांचे |
| ५०३ | ९ | शास्त्र वाचनाची | शास्त्रवचनांची |
| ५१३ | ४ | पुर्नविवाह प्रकरणी | पुर्नविवाहप्रकरणी |
| ५१८ | १६ | वाफेही | वाफेची |
| ५२२ | १३ | स्फुंदु | स्फुंदू |
| ५२२ | १५ | त्याची | त्यांची |
| ५२२ | १९ | त्याचा | त्यांचा |
| ५२३ | २२ | पेशावर पासून | पेशावरपासून |
| ५३० | ८ | स्वामीनारायण | स्वामिनारायण |
| ५३१ | २५ | ३ लाखावर | ३ लाखांवर |
| ५४० | १४ | इराणी लोकांनी | इराणी लोकांना |
| ५४३ | ९ | दिक्षा | दीक्षा |
| ५४५ | १६ | त्यानाच | त्यांनाच |
| ५६० | १४ | मतात | मतांत |
| ५७७ | १३ | नाच तमाशामध्ये | नाचतमाशामध्ये |
| ५७८ | १८ | अन्न व इतर मालाची | अन्नाची व इतर मालाची |
| ५८२ | १३ | काळात ल्या | काळातल्या |
| ५८४ | ६ | शिस्त व | शिस्त बाणावी व |
| ५८४ | ७ | यांवा | यावा |
| ५८७ | ६ | स्मशताप्रमाणे | स्मशानाप्रमाणे |
| ५८९ | ३ | डाक हृशील | डाक-हंशील |

| पृष्ठ | ओळ | मुद्रित | वाचावे |
|---|---|---|---|
| ५९१ | ६ | राज्याभिषेक प्रसंगी | राज्याभिषेकप्रसंगी |
| ५९६ | २ | (२१ : २१, १ . . . . ) | (२१ : २, १५ . . . .) |
| ६०२ | ९ | 'मारुतील' | 'मारुतीला' |
| ६०४ | १४ | गुरूजींना | गुरुजींना |
| ६०७ | ११ | ईश्वचंद्र | ईश्वरचंद्र |
| ६२८ | १५ | नि:शस्त्रवादी | नि:शास्त्रवादी |
| ६३४ | १० | साक्रतीस देखील | साक्रतीसदेखील |
| ६३४ | १७ | अधिकारी देखील | अधिकारीदेखील |
| ६४० | ४ | लुंबाडून | लुबाडून |
| ६४८ | ११ | जोशांना | जोशांचा |
| ६५४ | १५ | कसा गेला असे ? | कसा गेला असेल ? |
| ६५९ | ९ | सार तत्त्व | सारतत्त्व |
| ६६५ | ६ | पात्रांची | पत्रांची |
| ६७३ | १४ | त्यावर | त्यांवर |
| ६७७ | ८ | साधूलोकांचा | साधुलोकांचा |
| ६८८ | २१ | कर्नर | कर्नल |
| ७०१ | २ | कास्तान् तिनोपलचे | कास्तान्तिनोपलचे |
| ७०५ | १३ | ६० लाखावर | ६० लाखांवर |
| ७२८ | ३ | सात धरात | सात घरांत |
| ७३८ | २० | यहूदी | यहुदी |
| ७४८ | १० | रोपड्यास | रोपट्यास |

| पृष्ठ | ओळ | मुद्रित | वाचावे |
|---|---|---|---|
| ७६३ | २ | भागोवा कृत | भागोबाकृत |
| ७६३ | १५ | करतील. | करतील, |
| ७६९ | ३ | महाराणी साहेबांचे | महाराणीसाहेबांचे |
| ७८३ | ७ | मिळाले. | मिळाली. |
| ७९३ | २३ | साह्य घ्यावे, | साह्य घ्यावे. |
| ७९५ | ६ | ज्योतिष | ज्योतिषी |
| ७९८ | ५ | ईश्वर कृपेने | ईश्वरकृपेने |
| ८११ | ७–८ | भट्टीत लोखंड शुद्ध होत असते | [वाक्याची द्विरुक्ती झाली आहे. एक वाक्य गाळावे] |
| ८३० | २३ | प्रेत | प्रेते |
| ८३१ | १३ | पिण्याची | पाण्याची |
| ८३६ | २४ | फौजा | फौज |

